# स्वा.
# वा.
# श्री
# अवधूत
# महाराज
# कुरुंदवाडकर
# यांचा चरित्र-ग्रंथ



संपादक :

का. स. ताम्हनकर

बी. ए.

किंमत १८ रुपये

# शुद्धिपत्र

## ( श्री अवधूत महाराजांचें चरित्र )

| पान | ओळ | अशुद्ध | शुध्द |
|---|---|---|---|
| ८ | शेंवटून ५ वी | निदत्युंन | नित्युंदन |
| १७ | १ ली | " आदिपुरुषानें | एक ओळ वगळावी |
| ३२ | शेंवटून ३ री | अण्णाकाकांचा | अप्पाकाकांना दत्तपादुकांचा |
| ४५ | शेंवटून ४ थी | कद | कंद |
| ४६ | शेंवटून ८ वी | गजानन शेगांवच्या | शेगांवच्या गजानन |
| ७९ | वरून २ री | घेऊन | होऊन |
| ११६ | ५ व्या ओळीनंतर फुल्या | ×× ×××| फुल्या नकोत |
| ११७ | ७ वी ओळ | रक्तदानाचा | रक्तदात्याचा |
| १३२ | १ ली ओळ | वामप्रस्थ | वानप्रस्थ |
| १३६ | शेंवटून ११ | चाळले | चालले. |
| १४१ | वरून ५ वी | ' मातबर ' | हा शब्द वगळा |
| १४३ | वरून १० वी | केल्या | केली. |

## श्री अवधूत महाराजांचें चरित्र

### ( आठवणी भाग १ )

| पान | ओळ | अशुद्ध | शुध्द |
|---|---|---|---|
| १९२ | वरून ३ री | त्यांना | त्यांनीं |
| २५४ | सर्वांभूती...अल्ला या खाली ६ वी ओळ | शोधण्यास | सोडण्यास |
| २५४ | वरील ओळीखाली २ री ओळ | कुरणांतील | कुराणांतील |
| २५४ | ३ री ओळ | आमचे पेढे | आमचे पुढें |

# शुद्धिपत्र

## आठवणी भाग २

| पान | ओळ | अशुध्द | शुध्द |
|---|---|---|---|
| २२ | शेंवटून २ री | गारवा | गौरवा |
| ३७ | शेंवटची | पानांत | गानांत |
| ५० | शेंवटून १३ वी | मोहेगांवीं | गोहेगांवीं |
| ५९ | .... | कुलकर्णी | सहस्रबुद्धे |
| ६० | खालून ११ वी | चिद्विास | चिद्विलास |
| ६३ | शेंवटून २ री | डेधों | धोंडे |
| ६७ | शेंवटून ११ वी | खानंदांत | स्वानंदांत |
| ७१ | कामाठीपुरा या पॅऱ्यातील ७ वी ओळ | यला | मला |
| १०२ | शेंवटून ६ वी | आत्मवास्येत्वा | अमावास्येचा |
| १७३ | शेवटून | ग्रैगुण्यात्मक | त्रैगुण्यात्मक |

—:०:—

## प्रिय वाचकांकरितां

सदरील शुद्धिपत्र तयार करतांना अनुस्वार, वेलांट्या, काना, मात्रा इत्यादि दुरुस्त्या शुद्धिपत्रांत वगळल्या आहेत. तसेंच सहज वाचतांना वाचकांना सहज सुचतात असल्याहि शाब्दिक दुरुस्त्या दिल्या नाहींत; कारण छपाईच्या पानांची मर्यादा पाळणें आवश्यक होतें.

फक्त अर्थाचा 'अनर्थ' करणारे अशुद्ध शब्द तेवढेच शुद्धिपत्रांत दुरुस्त केले आहेत.

## एक जरूरीचा खुलासा

पुरस्कारांत आठवणी **सारांशरूपानें न देतां, त्या जशाच्या तशा छापल्या आहेत,** असें विधान आहे! 'जशाच्या तशा' म्हणजे आठवणी देणाऱ्यांचे **विचार जसेच्या तसे दिले आहेत.** हें खरें, पण आठवणी सांगणाऱ्यांची द्विरुक्ति व पाल्हाळ यांना फाटा देऊन त्यांचे विचार आकर्षक व सोप्या भाषेत मांडण्यासाठीं ७८ आठवणी लेखकाला फिरून लिहिण्यासाठीं **मुंबईत सहा महिने** आणि **भडगांवांत सहा महिने सतत लेखन करावे लागलें!** तेव्हां छापण्यास पाठविणेस त्या तयार झाल्या! **आठवणीदारांपैकी सर्वांना** फिरून लिहिलेल्या आठवणी दाखवून त्यांची संमति घेण्यांत आली.

—आठवणीचे संपादक

# श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचा चरित्र-ग्रंथ



पुरस्कार :

श्री. ग. मा. दिवेकर,

बी. ए. एलएल. बी., सॉलिसिटर, बाँबे हायकोर्ट.

संपादक :

श्री. का. म. ताम्हनकर, बी. ए.,

( निवृत्त वृत्तपत्र-व्यवसायी, चरित्र लेखक आणि शिक्षक )

आठवणी श्रमपूर्वक जमविणारे :

श्री. मेघःशामबुवा संकपाळ ( महाराजांचे पट्टशिष्य )



# श्री. अवधूत महाराजांची जन्म व राशिकुंडली

" अवधूत महाराज यांची पत्रिका "

." श्री वरद मूर्तिर्जयति ॥१॥

॥ श्रीशंवंदे ॥ अथ श्री शके १७९५ श्रीमुखनामाब्दे॥ दक्षिणायणे ॥ वर्षाऋतौ ॥ भाद्रपद कृष्णपक्षे ॥ तिथौ ३. भौमवासरे घ.३४ प.१६ ॥ रेवती नक्षत्रे घ.३१ प.४८ ॥ वृध्दियोगे घ.४० प.१५ ॥ शुभकरणेच. जन्मसमये पंचांगस्थ रविउदय ६ वा.२७ मि. ॥ तारीख ९ सप्टेंबर १८७३ सन गवंशुध्दावत्र दिने श्रीसूर्योदयात् प्राक् घ० प.२८ (६वा.१६मि.) समये श्री हरिभक्त (गुरुभक्त) परायण श्री रा.रा.-केशवदातार. तस्य गृहिणी सौ ॥ नाम्नी पुत्ररत्न प्रसूत: ॥ रेवतीनक्षत्रस्य २ चरणे जन्म: ॥ ॥ तेन-सोमदेव जन्मनामप्राप्ति.॥ मीन राशी ॥ विप्रवर्ण:॥ जलचर वश्य:॥ देव-गण: ॥ सर्प-वर्ग: ॥ शुभं भवतु ॥१॥

| "अथ जन्म लग्न कुंडली॥ | " अथ राशी कुंडली॥ |
|---|---|
| सू. ४ २४ ; ६ ; ४ शु. ; ७ के. ; सू.५ बु. गु. ; ३ ; ८ मं. ; २ ; ९ ; ११ ; १ रा. ; १० श. ; १२ चं. | १ रा. ; ११ ; २ ; १२ चं. ; श. १० ; ३ ; ९ ; ४ शु. ; ६ ; ८ मं. ; सू. ५ बु. गु. ; ७ के. |

" जन्मस्थ रविरंभ: ॥ " बुधदशारंभ: ॥१॥

॥ वंशो विस्तारतां यातु कीर्तिर्यातु दिगं. ॥

. ॥ यस्यैषा जन्मपत्रिका.॥

# श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचा चरित्र-ग्रंथ

## विषय सूचि





# पुरस्कार

( लेखक श्रीयुत **ग. मा. दिवेकर** )

स्वानंदवासी श्री. मोरेश्वर केशव दातार तथा श्री अवधूत महाराज यांच्या या चरित्रग्रंथाला पुरस्कार अथवा अभिप्राय लिहिण्याची जेव्हां मला विनंति करण्यात आली तेव्हां कांहीं वेळ मी बुचकळ्यांतच पडलों होतों. हें कार्य माझेंवर कां सोंपविण्यांत आलें हें मला तेंव्हां व आजहि समजलें नाहीं. पण ज्यांनीं मला ही विनंति अगर आज्ञा केली त्यांची ती आज्ञा अव्हेरणें मला शक्य नसल्यानें मी 'चार' शब्द लिहिण्याचें कबूल केलें, व ते लिहिण्याचें धाडस आतां करीत आहे. या पुस्तकाला पुरस्कार लिहिण्याचा माझा अधिकार आहे, या अभिनिवेशानें मात्र नव्हे.



**ग. मा. दिवेकर** सॉलिसिटर, मुंबई हायकोर्ट )

आपला भारत, विशेषतः महाराष्ट्र, ही संतांची भूमी आहे. या देशांत आजपर्यंत अनेक संत, महासंत होऊन गेले; व त्यांच्यापैकीं अनेकांची चरित्रें लिहीलीं गेलीं आहेत. त्यांत या पुस्तकाची आणखी एक चांगली भर पडत आहे. पण अवधूत महाराजांचें हें चरित्र कांहीं दृष्टीनें वैशिष्ट्य पूर्ण आहे, यांत शंका नाहीं.

श्री अवधूत महाराज हे अवधूत-सांप्रदायाचे एक मोठे मानकरी होते. ‘अवधूत-सांप्रदाय’ म्हणजे ‘गुरुभक्ति-सांप्रदाय’. गुरुभक्ति म्हणजे गुरु व शिष्य यांचें अनन्य-साधारण प्रेम-श्रद्धा संबंध, त्या या सांप्रदायांतील सत्पुरुषाच्या जीवनाचा मुख्य गाभा म्हणजे भक्ति व भक्त यांचा सोहाळा.

राजकीय, समाज सुधारक अगर अन्य महापुरुषाच्या जीवनांत ज्या घडामोडी अगर उलथा पालथी दिसून येतात, त्या अशा सत्पुरुषांच्या जीवनांत दिसून येत नाहींत. अशा सत्पुरुषाचें चरित्र अगर जीवन म्हणजे भक्तिप्रेमजलानें परिपूर्ण असें अथांग व शांत सरोवर व त्या सरोवरांत निश्चित अवगाहन करणाऱ्या भक्तजनांचे निरनिराळे अनुभव भक्तांचे अनुभव, हेंच त्यांच्या सद्गुरूचें चरित्र.

श्री अवधूत महाराजांचें चरित्रहि त्या भूमिकेवरूनच लिहिलें गेलें आहे. या पुस्तकांत चरित्र–लेखकानें स्वतः श्री अवधूत महाराजांचें जीवन चरित्र सुमारें १५२ पानांत लिहिलें आहे. अर्थात हें चरित्र अवधूतमहाराजांच्या भक्तांनीं लिहिलेल्या अगर सांगितलेल्या आठवणींच्या आधारेंच मुख्यतः लिहिलें गेलें आहे पण त्यांचें खरें चरित्र अगर जीवनेतिहास हा त्यांच्या अनेक भक्तांनीं त्यांच्याच शब्दांत लिहिलेल्या आठ-वणींतच वाचायला मिळतो. चरित्र लेखकानेंहि या आठवणी केवळ सारांश रूपानें न देतां, त्या जशाच्या तशा छापल्या आहेत.

या **पुस्तकाचे तीन भाग** पाडलेले आहेत. पहिल्या १५२ पानांच्या भागांत लेखकानें दातार घराण्याची पूर्व पिठिका व श्री अवधूत महाराजांच्या व्यावहारिक जीवनाचा थोडक्यांत आढावा घेतला आहे. **या पुढील** म्हणजे **आठवणींच्या पहिल्या भागांत** श्री अवधूत महाराजांच्या व भक्तांच्या एकूण अंदाजे ७८ आठवणी दिल्या आहेत.

चरित्र लेखनाची ही अभिनवपद्धत स्वीकारल्यामुळें हें पुस्तक केवळ तारखा घडामोडी, वादविवाद वगैरे रुक्ष गोष्टींनीं कोरडें वाटण्याऐवजीं, चरित्रनायकाच्या भक्तांच्या शुद्ध व भाबड्या भक्तिरसानें व भावना-प्राधान्यानें ओले झालेले दिसून येईल.

हे आठवणी लिहिणारे भक्तही सर्व तऱ्हेचे आहेत. श्री अवधूत महाराजांचे जव-ळचे आप्त आहेत, व त्यांचेशी कसलाहि नात्यागोत्याचा संबंध नसलेले इतर भाविकही आहेत; तसेंच ते सर्व जमातींतील व सामाजिक पातळींतील आहेत, हेहि वैशिष्ट्यपूर्ण आहे. इतकेंच काय ह्या आठवणीदारांत कांहीं परधर्मीय मुसलमानहि आहेत. त्यांत नवल मात्र नाहीं. कारण अवधूत सांप्रदाय हा जाति-धर्म निरपेक्ष आहे. अवधूत सांप्रदाय हा सद्गुरुनिष्ठ सांप्रदाय असल्यानें तिथें धर्माला अगर इश्वरालाहि जागा नाहीं. निरनिराळ्या धर्मांत निरनिराळे देव अगर ईश्वर मानलेले आहेत. पण

धर्माचें बंधन सद्‌गुरूला लागूं नाहीं. व त्यामुळे निरनिराळ्या धर्मांचे लोक एकच सद्‌गुरूचे भक्त होऊं शकतात व असतातहि. विशेषतः अवधूत सांप्रदायांत **जाती भेदाला वाव नाही**, अवधूत महाराजांचें हें चरित्र वांचून वाचकाला त्याचा पुरेपूर अनुभव येईल. आणि इथें केवळ सुधारकाचा दांभिकपणा नाहीं; तर ज्यांनीं प्रत्यक्ष भडगांवच्या मठींतील रोजच्या जीवनांत अगर तेथें होणाऱ्या उत्सवांत भाग घेतला असेल त्यांना तसा प्रत्यक्ष अनुभव आल्यावांचून राहिला नसेल व अजूनहि येतो. या दृष्टीनें व हल्लींच्या कालमानाचा विचार केला तरी ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. व हें चरित्रवाचून कोणाहि वाचकाला या गोष्टीचे महत्त्व पटल्यावांचून राहणार नाहीं.

या पुस्तकाच्या पहिल्या चरित्रभागात, पानें १३ ते २५ मध्ये चरित्र लेखकानें श्री. दत्तात्रय मोरेश्वर तथा अण्णा दातार अगर श्री दत्तमहाराज ( अवधूत महाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव ) यांनीं दिलेल्या माहितीच्या आधारें, अवधूत सांप्रदायाचा इतिहास थोडक्यांत दिला आहे. त्यामुळे त्या सांप्रदायाशी अपरिचित असलेल्याना त्याचें मर्म व वैशिष्ट्य याची थोडीफार कल्पना येईल. अर्थात् या पुरस्कारांतहि त्याविषयीं जास्त लिहितां येणार नाहीं; व त्याची आवश्यकताहि नाहीं. कारण श्री अवधूत महाराजांचे परात्पर गुरू श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकर यांच्या कै. केशव रा. दिवेकर यांनी लिहीलेल्या चरित्रांत, ४३ ते ४५ या प्रकरणांत या सांप्रदायाची भूमिका व तत्त्वज्ञान अधिकारवाणीनें विशद केली आहे, ती जिज्ञासूंनीं अवश्य वाचावी.

थोडक्यांत सांगावयाचें तर अवधूत सांप्रदाय हा गुरुप्रधान, बहुपरंपरेचा, अनादिसिद्ध श्रुतिसंमत, अद्वैतवादी आहे. अर्थात् हा सांप्रदाय वेद श्रुति स्मृति यांचे अधिकार व महत्त्व मानीत नाहीं, असें नाहीं. उलट त्यांतील अद्वैत सिद्धांत व तत्वज्ञान त्याला मान्य आहे. पण या सांप्रदायाचे दृष्टीनें, आपलीं जुनी शास्त्रें म्हणजे " घोर भयंकर शब्दारण्य " असून त्यांत मतभेदांचा गोंधळ बराच आहे; म्हणून त्यांच्या वाटेस न जातां, सर्वसामान्य माणसाला चिन्मयानंद उपभोगावयाचा असेल तर " गुरुविण अन्य दैवत नाहीं " अशी या सांप्रदायाची भूमिका आहे.

अर्थात् सद्‌गुरूचें महत्त्व सर्व संतांनीं गायिलें आहे. श्री संत ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरींत सद्‌गुरूचें महत्त्व अनेक ठिकाणीं वर्णन केलेलें आहे. अध्याय १० मध्ये सुरवातीलाच आपल्या अनन्यसाधारण भाषेंत ते म्हणतात:—"तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळिते के असे साधन । हें जाणोनि मियां नमन । निवांत केलें ॥ जरी प्रज्ञेचेनि आथिलेपणें । श्रीगुरु सामर्थ्यारूप करूं म्हणे । जरी तें मोतिया भिंग देणें । तैसे होइल ॥ कां साडे पंधरया रजत वणी । तैशी स्तुतीची बोलणीं । उगियाची माथा ठेविले चरणीं । हेंचि भलें ॥

**अर्थ** :—त्याचप्रमाणें, श्रीगुरूंचा महिमा जाणण्याचें साधन कोठें आहे ? हें समजूनच मी गुरूंना मुकाट्याने स्वस्थ राहून नमस्कार केला—जर बुद्धीच्या जोरावर

श्री गुरूंच्या सामर्थ्याचें वर्णन करूं म्हटलें तर तें मोत्याला अभ्रकाचें पुट देण्यासारखें होईल किंवा उत्तम सोन्यावर रुप्याचा मुलामा ज्याप्रमाणें व्यर्थ आहे, त्याचप्रमाणें श्रीगुरूंची स्तुति करूं लागलें असतां व्यर्थ होईल. म्हणून गुरुचरणी लीन होऊन त्यांच्या पदीं मस्तक ठेवणें बरें होईल. ( साखरे महाराजकृत )

पण इतर सांप्रदायांनीं [ उदाहरणार्थ वारकरी सांप्रदाय ] प्रत्यक्ष ईश्वराचें म्हणजे पांडुरंगाचेंही माहात्म्य व भक्ति अमान्य केली नाहीं.

पण अवधूत सांप्रदायांत गुरु हाच " एकमेवाद्वितीय " अगर " सर्वं खलु इदं ब्रह्म " आहे. श्री पंतानीं म्हटल्याप्रमाणें या मार्गी गुरुवचनच सर्व वेदान्त, गुरुरहाटीच सिद्धांत व गुरुवचनच श्रेष्ठ अर्थात् सद्गुरूंची भक्तांवरील अप्रतीम प्रीति व भक्ताची सद्गुरूवरील अव्यभिचारिणी भक्ति यांचा मिलाफ हें या सांप्रदायाचें गूढ अगर इंगित आहे. गुरूचें भक्तावरील प्रेम व भक्ताची गुरूवर श्रद्धा ही किती अमाप व निर्लोभ असूं शकतात व त्या योगें, संसारांतील नित्यनैमित्तिक कष्ट सोसूनही, परस्परांना कसा आत्म नंद उपभोगितां येतो, यांचें प्रत्यंतर या पुस्तकांतील आठवणी वांचून पदोपदीं येते.

श्रद्धा व भाविकपणा हीं सर्व आत्मिक सुखाची ( शारिरीक व भौतिक सुखाची नसली तरी ) एकमेव साधनें आहेत हेंही या आठवर्णांत दिसून येईल. अगदीं सर्व सामान्य माणूस सुद्धां सद्गुरुवरील श्रद्धेनें व भक्तीनें कसा भारावून जातो व इतर परिस्थिति विपरीत व अनुकूल नसतांहि त्याची आध्यात्मिक भूमिका उंचावून, तो कसा निजानंदांत सुखी व समाधानी होऊं शकतो याचीं अनेक उदाहरणे या आठवर्णांतून दिसून येतात. भक्तिरसानें व श्रद्धा भावनेनें ओथंबलेल्या किती तरी आठवणीं या पुस्तकांत आहेत. त्यांतल्या त्यांत श्री. मेघःशामबुवा संकपाळ व श्री. नामदेव नेमाडे यांच्या आठवणी तर अवश्य वांचण्यासारख्या आहेत. किंबहुना मी असेंहि म्हणेन कीं या दोन आठवणींत श्री अवधूत महाराजांचे आध्यात्मिक जीवन-चरित्र व तत्त्वज्ञान आपल्याला प्रकर्षानें आढळून येते.

सत्पुरुषाचें अगर साधकाचें चरित्र म्हटलें कीं प्रत्येकाला त्याच्या चमत्कारशक्ति-विषयीं कुतूहल निर्माण होतें. व पुष्कळ चरित्रांतून असे चमत्कार ओतप्रोत भरलेले आढळून येतात. या बाबतींत हें चरित्र वांचून असें आढळून येईल कीं श्री अवधूत महाराजांच्या जीवनांत चमत्कारांना प्राधान्य नव्हतें. तीच गोष्ट त्यांचे परात्परगुरू श्रीपंत महाराज यांच्याहि जीवनांत दिसून येते. **श्रीपंतांनीं तसेंच श्री अवधूत महाराजांनीं चमत्कारांना अगर ऋध्दि सिध्दी-योग वगैरे साधनांना महत्त्व दिलें नाहीं.** अर्थात् त्यांच्यावरही त्यांच्या भक्तांनीं भाविकपणानें 'चमत्कार' लादलेले आढळून येतील! पण सूक्ष्मपणानें व बुद्धिप्रामाण्यानें विचार केला तर असें आढळून

येईल कीं, हे चमत्कार श्रध्देतून व निरागस भक्तींतून निर्माण झालेले असतःत. वास्तविक चमत्कार म्हणजे निसर्ग-विरूद्ध घटना कधींच घडत नाहींत. त्या घडलेल्या भाविक मनाला भासतात. पुष्कळवेळां ‘ काकतालीय ’ न्यायावर त्या आधारित असतात. जें घडणारें तेंच घडतें. पण त्या घडण्याचें कारण अगर निमित्त बुद्धीला नीट पटणारें अगर इंद्रियांना समजणारें नसलें कीं तो ‘ चमत्कार ’ आहे असा आभास होतो ! निदान एक गोष्ट तरी नक्कीच कीं कांहीं साधक योगी, अगर जादुगार लोकांची दिशाभूल करून बुद्धिपुरस्सर नवरत्नांची आंगठी निर्माण करणें वगैरे चमत्कृति करून समाजांत सत्पुरुष, साधू म्हणून मिरवितांना दिसतात ! त्या प्रकारचा भोंदूपणा अगर फसवेगिरी श्रीपंतांच्या श्री अवधूत महाराजांच्या चरित्रांत कोठेंहि दिसून येणार नाहीं. अशा साधूंचे पुष्कळसे भक्त, मग ते कितीहि सुशिक्षित अगर धनवान् असोत, ‘ आर्त ’ प्रकारचे भक्त असतात. श्रीपंत महाराज अगर श्री अवधूत महाराज यांचा पुष्कळसा भक्तवर्ग हा ‘ जिज्ञासू ’ ‘ अर्थार्थी ’ अगर ‘ ज्ञानी ’ प्रकारचा होता. वास्तविक मनःशांति, आत्मबोध व सहजानंद मिळण्याकरितां जर सद्गुरूकडे जावयाचें व अशा भक्तांना सद्गुरूनें आपल्या अनुभवजन्य ज्ञानाचा लाभ द्यावयाचा तर त्याला चमत्कारांची जरूरीच काय ? माझें तर असें मत आहे कीं, स्वतःजवळ असलेल्या कांहीं योगबलाचा अगर जादुबलाचा फायदा घेऊन जे लोक अशा चमत्कारांचा उपयोग व्यवहारांत करतात, ते सत्पुरुष अगर सद्गुरुच नव्हेत ! व जे लोक केवळ त्यामुळेच त्यांच्या भजनीं लागतात ते खरे सत् शिष्य अगर सत् भक्तच नव्हेत !

या दृष्टीनें श्री पंतमहाराज काय किंवा अवधूत महाराज काय, यांची जितकी थोरवी गावी तेवढी थोडीच आहे.

वरील व इतर दृष्टीनें श्री अवधूत महाराजांचें हें चरित्र अवश्य वाचण्यासारखें आहे. त्यांच्या भक्तांना तें आवडेलच. पण इतरांनाहि त्यांत गोडी व कुतूहल वाटल्या वांचून राहाणार नाहीं. अर्थात् यांत अजिबात दोष नाहींत असें नाहीं. विशेषतः कांहीं गोष्टींची पुनरावृत्ति झालेली आढळून येईल. कांही आठवणींत चरित्र नायकापेक्षां आठवणी लेखकाच्या चरित्राला प्राधान्य दिलेलें आढळेल ! वगैरे पण असे दोष किरकोळ स्वरूपाचे आहेत.

एकंदरींत अवधूत महाराजांच्या आप्तेष्टांचा व भक्तांचा हा स्तुत्य प्रयत्न जनता-जनार्दना पुढें ठेवण्याचा पुरस्कार करण्याला मला आनंद होत आहे.

कामदार सदन
१६३ डॉ. आंबेडकर मार्ग
दादर मुंबई १४
५-६-१९६६

ग. मा. दिवेकर

## श्री अवधूत महाराज यांच्या हस्ताक्षराचा नमुना

श्री गुरुदेव भडगांव
१५।१०।३४

प्रेमपूर्वक आशीर्वाद.
श्री येथून मंगळवार ता
२३।१०।३४
रोजी सकाळी बारावे कुंडीत
जाण्यास निघणार. तेव्हा कोण
मंडळी येणार असेल त्यांनी
हांतरूण पांघरूण पाणीभ-
ण्यांचा तांब्या इत्यादी सामान-
सह सोमवारी येऊन भडगां
वास हजर राहावें. श्रेयस्कर
असते. दरबार पांगुळ श्री
खबर॥ ल

मो. के. दातार

॥ ॐ नमःशिवाय ॥

# प्रस्तावनेचें उद्दिष्ट

' हा चरित्र ग्रंथ प्रकाशित करण्याचा हेतू काय ! ' असा प्रश्न, स्वानंदवासी श्री अवधूत महाराज-तथा-श्री मोरेश्वर केशव दातार कुरुंदवाडकर यांच्या चरित्र ग्रंथाविषयीं, त्यांच्या कांहीं भक्तांच्या अंतःकरणांत उत्पन्न होण्यासारखा आहे. या विषयींचें स्पष्टीकरण आम्ही ( या प्रस्तावनेच्या शेवटीं सह्या करणारे त्यांचेच भाविक भक्त ) करीत आहों.

श्री अवधूत महाराजांच्या जीवन कार्याविषयीं किंचितसा गैरसमज, श्री. पंत-महाराज बाळेकुंद्रीकर यांच्या कांहीं भक्तांचे मनांत आणि त्यांच्या स्नेह्यांचे वर्तुळांत, असल्याचें आम्हांपैकीं कांहींच्या निदर्शनास आलें ! वास्तविक श्री. पंतमहाराजांच्याच अवधूत सांप्रदायाचा झेंडा, रामेश्वरापासून काशी-हरिद्वारपर्यंत फडकविण्याचें पुण्यकार्य श्री. पंत महाराजांचे एकनिष्ठ शिष्य या नात्यानें आणि श्री. पंतांच्या शुभाशीर्वादानेंच श्री. अवधूत महाराजांनीं केलें, हें त्यांच्या कार्याविषयीं पूर्ण माहिती असलेले आम्ही आणि आमच्या सारखेच उभय महाराजांचे अनेक भक्त जाणतात.

श्री अवधूत महाराजांच्या महान् सत्कार्याला, वर उल्लेख केलेल्या गैरसमाजाचा यत्किंचितही डाग लागूं नये आणि दोन्हीहि महाराजांनीं केलेलें लोकोद्धाराचें उज्वल कार्य त्यांच्या आजच्या व उद्याच्याहि भक्तांचे डोळ्यापुढें आदर्शासारखें राहून सर्वांचेंच पारमार्थिक कल्याण साधावें, हीच प्रस्तुतचें चरित्र प्रकाशनांत आणण्यांत आम्हां सर्वांची हार्दिक इच्छा व तळ-मळ आहे. दोन्हीहि महाराजांच्या कृपाशीर्वादानें आमची इच्छा पुरी होईल असा आत्मविश्वासहि आम्हांस वाटत आहे.

• • •

खानदेश जिल्ह्यांत श्री. पंतमहाराजांच्या अवधूत सांप्रदायाचे हजारों भक्त आहेत. श्री अवधूत महाराजांनीं भडगांवच्या श्रीपंत अधिष्ठान-केंद्रांतूनच हे निर्माण केले असून श्री. अवधूत महाराजांचे सुपुत्र श्री. दत्तमहाराज यांच्या प्रचार-भक्तीमुळें या संस्थेंत शेंकडोंची भर दरसाल पडत आहे.

* * *

## अवधूत महाराजांचा व्यापक प्रचार

स्वानंदवासी श्री अवधूत महाराजांना त्यांच्या प. पू. सद्गुरु पंतमहाराज बाळेकुंद्रीकरांच्या इ. स. १९०५ सालीं झालेल्या अकाली देहत्यागाबद्दल अत्यंत दुःख झाले. यापुढें त्यांच्या अमृततुल्य बोधाचा लाभ आपणास होणार नाहीं म्हणून त्यांचे मन अत्यंत उद्विग्न झाले व मनास थोडी शांती मिळावी म्हणून तीर्थ-यात्रेस जावें असे त्यांनी ठरविलें व त्याप्रमाणें ते काशीयात्रेस निघाले.

वाटेत जातां येतां ठिकठिकाणीं त्यांनी श्रीपंतमहाराजांच्या श्री दत्तप्रेमलहरींतील पदांचा जयघोष, भजन व कीर्तन द्वारें अत्यंत प्रभावीपणें केला व श्री दत्तप्रेम-लहरींल पदांची अवीट गोडी सर्व थरांतील लोकांस चाखावयास दिली.

प्रथम एक काशीयात्रा दोन मित्रांसह मोठ्या खडतर पद्धतीनें आणि दुसरी काशियात्रा वडील मातुश्री व ७–८ साथीदार यांसह कीर्तनें करीत केली. प. पू. अवधूत महाराज इ. स. १९०९ मध्यें, दोन काशीयात्रा वगैरे संपवून, पहिल्या-प्रथमच मुंबईत आले. त्यावेळीं त्यांचा मुक्काम, मुगभाट येथें चौघडेवाल्यांच्या चाळींत होता. ह्या इमारतीत तळमजल्यावर चौघडेवाले रहात असत व म्हणून ती इमारत चौघडेवाल्यांची चाळ म्हणून प्रसिद्ध होती. त्यांच्याबरोबर त्यांची कुटुंबीय मंडळीसुद्धां होती. ह्यानंतर पुढें सतत २५ वर्षें त्यांनी आपल्या अतिरसाळ अमृत-तुल्य बोधरूपी शुद्ध प्रसाद वाणीनें, श्रीसद्गुरु पंतमहाराज बाळेकुंद्रीकर त्यांच्या श्री. दत्तप्रेम लहरींतील सद्गुरु भक्तीनें ओथंबलेल्या पदांचा व त्यांतील ज्ञान बोधाचें विवरण, त्याचप्रमाणें श्री. नाथ संप्रदायाचा व नवनाथांच्या अगाध लीलांचा व भक्तिरसानें ओथंबलेल्या अशा कीर्तनांच्या व आख्यानांद्वारें मुंबई व तिच्या आसपासच्या भागांतच नव्हे तर कन्याकुमारीपासून रामेश्वरापर्यंत अत्यंत सोज्वल असा प्रसार केला.

श्री. अवधूत महाराजांचा हा श्रीपंतबोध, राव–रंक, लहान–थोर, सुशिक्षित –अशिक्षित, स्त्री–पुरुष व बाळगोपाळ ह्यां सर्वांस सहज पटेल अशा प्रेमळ व सहज सुलभ वाणीनें समजावीत असत व म्हणूनच इतर देवळांतील कीर्तनापेक्षां त्यांच्या कीर्तनाकडे श्रोते लोक जास्त आकर्षिले जात असत.

त्यांच्या निर्याणाला आज २५ वर्षांपेक्षां जास्त काळ निघून गेला तरी त्यांच्या प्रेमळ वाणीचा तो बोध ज्यांनीं ऐकला त्यांच्या कानांत आजसुद्धां तो अखंड घुमघुमत असतो व असा सुबोध त्यांच्याशिवाय इतरांकडून ऐकावयास मिळत नाही, ह्या बद्दल अनेकांना हळहळ वाटते, हेंच त्यांच्या बोधाचे श्रेष्ठत्व होय.

श्रीपंतबोधाप्रमाणें त्यांची दिव्य मूर्तीहि श्रोतृमंडळाच्या हृदयांत ठसावी म्हणून त्यांच्या कीर्तनांत त्यांच्या आसनासमोर श्रीपंतांचा फोटो ठेवला जात असे व त्याकरितां कांहीं देवळांत विरोधसुद्धा केला जाई ! कारण 'देवासमोर कीर्तन होत असतां त्या फोटोची काय जरूर आहे !' असे कांहीं लोक म्हणत ! परंतु अवधूत महाराजांनी ह्या विधानास न जुमानता आपली फोटो ठेवण्याची पद्धत सोडली नाहीं ! त्यांचे म्हणणे असे की श्रीपंत बोधाबरोबर त्यांची मूर्तीही बोधश्रवणास येणारांच्या असंख्य हृदयांत कायमची ठसली जावी.

श्री अवधूत महाराजांनी जितक्या प्रभावीपणानें भारताच्या विस्तृत भागांत आपल्या ओजस्वी प्रसाद वाणीनें श्रीपंत बोध व वाङ्मय प्रसाराची जी अमोल सेवा केली, तीबद्दल श्रीपंत बंधु व श्रीपंत मातोश्री त्यांचे अतिशय कौतुक करून त्यांना धन्यवाद देत असत. इतकेच नव्हे तर श्रीपंत बंधु परमपूज्य गोविंद दादा, ज्यांनीं श्रीपंताच्यामागें हजारो लोकांचा उद्धार केला, त्यांचे उद्गार म्हणजे अवधूतकार्याचे प्रशस्ती पत्रच आहे.

अवधूत महाराजांचे पट्टशिष्य श्री. मेघःशाम संकपाळ कागलास भेटीसाठीं गेलें असतां श्री. गोविंददादा म्हणाले, "मोरबांनींच पंतांचा बोध खरोखर पचनीं पाडून लोकांत त्याचा प्रचार केला हें आम्हांला देखील साध्य झालें नाही, सर्व देशभर फिरून त्यांनीं हजारों लोकांना गुरुभक्तीचें वेड लावलें" (आठवणी भाग १)

## वाङमय प्रसार

श्री. पंत चरित्र आवृत्तीं १ ली व श्री दत्त प्रेमलहरीच्या तर शेंकडो प्रती त्यांच्या कीर्तनांत विकल्या गेल्या व अशा तऱ्हेने श्री पंत बोधाचे लेण घरोघरी पोंहचविले गेले त्याचा फायदा पिढ्यान पिढ्या लोक घेत आहेत. आज त्यांचे सुपुत्र श्री. दत्तात्रय उर्फ अण्णा ह्यांच्या कीर्तनांतसुद्धां श्रीपंत महाराजांचा बोध व श्री. दत्त प्रेमलहरींतील पदांचा समावेश असतो व त्यांच्याही कीर्तनांत पुष्कळशा प्रेमलहरी विकल्या जातात.

## अत्यंत आदरणीय प्रचार

श्री अवधूत महाराजांनी आपल्या सर्व आयुष्यांत श्री. पंत बोधाचा, वाङमयाचा व मार्गाचा प्रसार करतांना श्रीपंत महाराजांच्या नांवाला व कीर्तीला किंचित सुद्धां दोष लागणार नाही याबद्दल दक्षता घेतली व बोध

प्रसार व कार्यपद्धत अगदीं निर्दोष व इतर श्रीपंत भक्तांनी अनुकरण करावी अशी ठेवल्यामुळें त्यांचे थोरपण सतत लोकांच्यापुढें धुतलेल्या तांदळासारखें स्वच्छ राहून अत्यंत आदरास पात्र झाले.

## श्री अवधूत महाराजांची अद्वितीय कामगिरी

श्री अवधूत महाराजांनी जशी ही अत्यंत बहुमोल कामगिरी केली तशी श्री. पंत भक्तांपैकीं दुसऱ्या कोणी केल्याचे दिसत नाही. त्यांच्या निर्याणानंतर सुद्धां त्यांचे सुपुत्र श्री. दत्तात्रय उर्फ अण्णा यांनी श्रीपंत बोधाचा प्रसार आपल्या परमपूज्य वडिलांच्या अभय हस्ताच्या व आशीर्वादाच्या कृपेमुळें आज सतत २५ वर्षें चालू ठेवला आहे. इतकेंच नव्हे तर आपला एक सुपुत्र अवधूत ( ज्याचा जन्म अवधूत महाराजांच्या निधनानंतर चारच दिवसानी झाला. ) त्यास मार्गदर्शन करून श्रीपंत कृपेनें व अवधूत महाराजांच्या आशीर्वादानें श्रीपंत बोध असाच अखंड चालू रहावा म्हणून प्रयत्न करीत आहेत. म्हणजे श्रीपंत बोध प्रसाराचे कार्य अवधूत महाराजांच्या तीन पिढ्यांत चालू आहे ही अत्यंत अभिमानाची क्वचितच दृष्टोत्पत्तीस येणारी घटना आहे. गुरु भक्त परायण दत्तात्रय उर्फ अण्णा त्यांची ही मनकामना श्रीपंत पूर्ण करतील ह्यांत शंका नाही.

## उणीव भरून काढण्यासाठीं या चरित्राचा प्रयत्न

श्री अवधूत महाराजाच्या वरील सर्व अत्यंत अलौकिक श्रेष्ठ व अद्वितीय कार्याची महती त्यांच्या पुष्कळशा गुरुबंधूस व इतर पंतभक्तास जितकी असावयास पाहिजे होती तितकी ती असलेली दिसत नाही. इतकेंच नव्हे तर त्यांच्या ह्या अलौकिक कार्याची माहिती श्रीपंत चरित्राच्या दोनही आवृत्त्यांत जशी सविस्तर यावयास पाहिजे होती तशी ती आलेली दिसत नाहीं. ह्याला कारण कांहींही असो; परंतु पुष्कळ श्रीपंत भक्तांस व अवधूत महाराजांच्या शिष्यांस ह्याबद्दल आश्चर्य व वाईटहि वाटते.

हे चरित्र करणाऱ्यांनीं कांहीं पंत भक्तांच्या हृदयांतील रुखरुखीची ही उणीव भरून काढावी आणि श्री अवधुत महाराजांची प्रचारयात्रा श्री पंतांच्या जीवनातील अवधूत मार्गच पूरक व पोषक कशी आहे हें पटवून द्यावें हा या चरित्र प्रकाशनाच मुख्य हेतू आहे.

आठवणीच्या मांडणीरूप, लिहिण्याची थोडीशी नाजूक आणि अवघड कामगिरी आम्ही श्री. का. म. ताम्हनकर बी. ए. यांच्यावरच कां सोपविली,

याच्याहि स्पष्टीकरणाचा तपशील सर्व भक्तांच्या माहितीकरतां नमूद करणें आम्हांला आवश्यक वाटत आहे.

श्री अवधूत महाराजांचा षष्ठ्यब्दिपूर्ति समारंभ भडगांवास १९३४ साली झाला त्यावेळीं, श्रीअवधूत महाराजांचे भाचे जावई श्री. काशिनाथ महादेव ताम्हनकर हे त्या समारंभांत उपस्थित होते. त्याप्रसंगीं अनेकांनी भाषणें केलीं. त्याप्रसंगीं श्री महाराजांच्या व श्री. दत्तमहाराजांच्या सूचनेवरून श्री. का. म. ताम्हनकर यांनींहि भाषण केलें. त्यावेळीं सर्वांनीं व महाराजांनींहि त्यांच्या भाषणाचें कौतुक करून त्यांना प्रोत्साहित केलें. त्यावेळीं श्री अवधूत महाराजांचें चरित्र प्रसिद्ध व्हावें ' अशी इच्छा श्री. ताम्हनकर यांनीं व्यक्त केली आणि ती श्री. मेघःश्यामबुवा व श्री. दत्तमहाज तथा श्री अण्णा महाराज, यांनाहि ती पसंत पडली. त्यावेळींच आठवणी जमविल्या असत्या तर पुष्कळ काळपर्यंत महाराजांच्या परिचयांत असलेले अनेक आप्त आणि भक्त स्त्री-पुरुष त्यावेळीं हजर असल्यामुळें महाराजांच्या चरित्रात्मक आठवणींना विशेष पूर्णता खचित आली असती! पण मनांत इच्छा असूनहि अनेक अपरिहार्य अडचणीमुळें श्री. मेघःश्याम आणि श्री. दत्तमहाराज यांना आठवणी जमविण्याला १०-१२ वर्षांत फुरसतच मिळाली नाहीं! नंतर हें काम श्री मेघःश्याम बुवांनीं हातीं घेतलें त्यावेळीं महाराजांच्या परिचयांतील बरीच माणसें मेघःश्याम बुवांच्या दुर्दैवानें देवाघरीं गेलीं! तरीहि श्री. मेघःश्यामबुवांनीं मोठ्या चिकाटीनें खूप प्रवास करून आणि कष्ट सोसून प्रस्तुत चरित्रग्रंथासाठीं अमोलिक आठवणी जमा केल्या आणि त्याहि प्रस्तुत चरित्र लेखकाला फार उपयुक्त व मार्गदर्शक ठरल्या. वाचकांचीहि या आठवणी वाचल्यानंतर तशीच खात्री पटेल, या विषयीं आम्हांला विश्वास वाटतो.

श्री. काशिनाथपंत ताम्हनकर यांनाच या चरित्राचें लेखन कार्य सांगण्यास आणखीहि सबळ कारणें आहेत. १९२१ पासून १९६० पर्यंत तें संपादकीय आणि चरित्रादि स्वरूपाचें लेखन कार्य करीत असल्यामुळें त्यांना अशा प्रकारच्या लेखनाचा गेल्या ४० वर्षांचा अनुभव कसा व किती आहे याचा तपशील खालीं देत आहों, त्यावरून वाचकांना त्यांच्या या प्रकारच्या कार्यांतील अनुभवांची ठीक कल्पना यावी अशी आमची अपेक्षा आहे आणि ती वाचकांना व सर्व भक्तांना पटेल असा आम्हांला आत्मविश्वासहि आहे.

## लेखक श्री. का. म. ताम्हनकर यांच्या लेखनकार्याची ओळख

(सरकारी अधिकाऱ्यांच्या मागणीवरून सरकारला पुरवण्यात आलेल्या माहितीचे आधारें)

१९२०-२१ मध्ये डायर व ओडवायर या क्रूर हडेलहप्पांच्या कारकीर्दीतील जालियनवाला बागेंत जे अमानुष अत्याचार झाले, त्यांच्या निषेधासाठीं भारतवर्षभर सत्याग्रहाची व सविनय असहकारितेची चळवळ झाली, त्यावेळीं ताम्हनकर यांनीं 'मिलिटरी अकाउंटस' मधली नोकरी आणि लॉकॉलेज कोर्सहि, पहिल्या वर्षातूनच सोडून ते स्वयंसेवक दलांत सामील झाले. १९२० सालीं मुंबई युनिव्हर्सिटींतून बी. ए. झाले त्यापूर्वी ते विल्सन कॉलेजांत ना. मुरारजी देसाई यांचे बरोबर फिजिक्स व केमिस्ट्री विषय घेऊन सीनियर बी. ए. क्लासांत होते. केमिस्ट्रीचे प्रो. ए. आर. जॉमंड यांचेसह या ग्रूपचा एक फोटो काढलेला आहे.

स्वयंसेवक या नात्यानें ताम्हनकर लोकमान्य टिळकांच्या अखेरच्या आजारांत सरदारगृहांत डॉ. आठवले यांच्या हाताखाली काम करीत आणि लो. टिळकांचे अति दुःखद देहावसान झालें त्यावेळीं श्री. ताम्हनकर सरदार गृहांतच हजर होते. स्वयंसेवक या नात्यानें या प्रसंगीं ताम्हनकरांनीं जी सेवा केली ती ध्यानांत घेऊन त्यांना डॉ. भडकमकर, डॉ. आठवले, डॉ. डी. डी. साठये वगैरे पुढाऱ्यांनीं कलकत्त्याच्या खास काँग्रेस अधिवेशनास हजर राहण्यासाठीं आपल्या बरोबर नेलें. त्या प्रवासांत डॉ. भडकमकर, डॉ. साठये प्रभृतींचें बरोबर, श्री. चिंतामणराव वैद्य (महाभारताचे संशोधनपटु विद्वान्), श्री. काकासाहेब खाडिलकर, श्री. तात्यासाहेब केळकर, श्री. गंगाधरराव देशपांडे प्रभृति महाराष्ट्रीय मोठे पुढारीहि होते.

कलकत्ता काँग्रेसमध्ये असहकारितेचा ठराव प्रचंड बहुमतानें पास झाला व सर्व महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनाहि अखेर तो मान्य करावा लागला. ताम्हनकरांनीं परत आल्यावर सरकारी नोकरी व लॉक्लास सोडण्याचा निश्चय केलेला पाहून त्यांना लोकमान्य टिळकांच्या स्मारकासाठीं काढण्यात आलेल्या 'लोकमान्य' पत्रांत, सहसंपादक म्हणून घेण्यांत आलें. हें 'लोकमान्य' दैनिक लोकमान्य टिळक पब्लिशिंग कंपनी नांवाच्या लिमिटेड कंपनी मार्फत चालू झालें होतें. या कंपनीचे डायरेक्टर व मुख्य संस्थापक डॉ. भडकमकर व श्री. बाळासाहेब लिमये होते आणि मुख्य संपादक म्हणून श्री. काकासाहेब खाडिलकर यांची नेमणूक सदरील कंपनी मार्फत झाली होती. या कंपनीचें शेअर भांडवल

श्री पंत महाराज बाळेकुंद्रीकर



जन्म
श्रावण वद्य ८, शके १७७७
(३-९-१८५५)

समाधि
आश्विन वद्य ३, शके १८२७
(१६-१०-१९०५)



चरित्रलेखक

काशिनाथ महादेव ताम्हनकर

जन्मः- ८-४-१८९४ बी. ए.

जमविण्यासाठीं डॉ. भडकमकर यांच्या नेतृत्वाखालीं श्री. ताम्हनकर यांनी पुष्कळ सेवाहि केली होती.

दोन वर्षें 'लोकमान्य' दैनिक श्री. काकासाहेब खाडिलकर यांच्या मुख्य संपादकीयत्वाखालीं अत्यंत भरभराटीला आलें आणि त्याचा खप झपाट्यानें वाढला! पण दोन वर्षांनंतर 'लोकमान्य पब्लिशिंग कंपनी' च्या डायरेक्टरांनीं काँग्रेसच्या असहकारी धोरणांत फेरफार करण्याचें धोरण पुढें आणल्यामुळें आणि श्री. काकासाहेबांना तें पसंत नसल्यामुळें त्यांचा व डॉ. भडकमकर यांचा इतर डायरेक्टरांशीं मतभेद झाला आणि श्री. काकासाहेब खाडिलकर यांनीं तडका-फडकी 'लोकमान्य' दैनिकाचें संपादकत्वाचा राजीनामा देऊन स्वतःच्या मालकीचें 'नवाकाळ' दैनिक सुरूं केलें. श्री. काशिनाथपंत ताम्हनकर यांनींहि सहा महिन्यानंतर श्री. काकासाहेब खाडिलकर यांच्या 'नवाकाळ' दैनिकांत सहसंपादक म्हणून काम पत्करलें. १९३७ सालीं श्री. काकासाहेब खाडिलकर 'नवाकाळ' चीं व्यवस्था वडील चिरंजीवांवर सोंपपून सांगलीस जाऊन राहूं लागले तोपर्यंत म्हणजे १९२०-२१ ते १९३७ या १६-१७ वर्षांच्या अवधींत श्री. ताम्हनकर यांनीं श्री. काकासाहेब खाडिलकर यांचे नेतृत्वाखालीं सहसंपादक म्हणून सेवा केली

सदरील १६-१७ वर्षांच्या अवधींत श्री. ताम्हनकरांनीं केलेल्या राष्ट्रसेवेचा थोडासा तपशील नमूद करण्यासारखा आहे :—राष्ट्रीय चळवळ ऐन जोमांत असतांना 'नवाकाळ' च्या संपादकीय खात्यांतील ४-५ कार्यकर्त्यांना सरकारनें पकडून तुरुंगांत घातलें. त्यावेळीं श्री. काका साहेब खाडिलकरांनीं ताम्हनकरांना बजावलें "तुम्ही हिंदुस्थानी सेवादल संस्थेचे एक घटक म्हणून व्याख्यानें देतां आणि चळवळीत भाग घेऊन जाहीर सभांतूनहि राष्ट्रीय चळवळीला पोषक अशी भाषणें करतां, तीं या पुढें बंद ठेवा. 'नवाकाळ' दैनिक चालू ठेवणें ही देखील राष्ट्रसेवाच आहे. चळवळींत यापुढें तुम्हीही भाग घेऊन तुरुंगांत गेला तर 'नवाकाळ' चालू ठेवणार कसा? या कामाकरितांच तुम्हाला 'नवाकाळ' कार्यालयांत कैद केलें आहे असे समजून' या पुढें काम करा"—या 'राष्ट्रीय कैदेंत' रोज रात्रपाळ्या करून 'राउंड टेबल कॉन्फरस' गोलमेज परिषद आणि भारतांतील कायदेभंगाची चळवळ यांची कांटेकोर माहिती देण्यासाठीं रोज रात्रंदिवस जाग्रणें करून ताम्हनकरांचे डोळे खराब झाले आणि त्यांना दांतहि गमवावे लागले! उलटपक्षी सरकारी तुरुंगांत गेलेले त्यांचे सहकारी, ठणठणीत तब्येती सुधारून परत आले आणि 'राष्ट्रकार्यासाठीं कैद भोगून आलेले देशभक्त'

म्हणून त्यांचा गौरव झाला ! या " तुरुंगवासी देशभक्तीच्या गौरवाला " मात्र ताम्हनकर मुकले ! ' तुरुंगवासी देशभक्त ' म्हणून आज अनेक जण कॉंग्रेस-सरकारांत बड्या अधिकारांवर असून डौलानें मिरवीत आहेत ! पण ताम्हनकरांच्या वाट्याला देशभक्तीचा असला गौरव " व आर्थिक भरभराट यापैकीं कांहीच आलें नाहीं ! ' तुरुंग-यात्रेच्या कालापूर्वी आणि नंतर त्यांनी लोकजागृतीसाठीं राष्ट्रीयध्वज-विषयींच्या आणि इतर राष्ट्रीय जाहीर सभा-समारंभांतून शेंकडों व्याख्यानें देऊन व इतर मार्गांनीं १९२१ ते १९४६ चे मध्यापर्यंत सतत सेवा मात्र केली.

'नवाकाळ' मध्ये सहसंपादकाचें काम करीत असतानांच, नवाकाळच्या चालकांच्याच सूचनेवरून त्यांच्याच सहानुभूतीनें आणि सहकार्यानें 'प्रावीण्य' नांवांचे स्वदेशी उद्योगधंद्यांच्या प्रगतीसाठीं प्रचार करणारें मासिक श्री. ताम्हनकांनीं १९२९ साली दसऱ्याच्या सुमुहूर्तावर सुरूं केलें. या कामीं त्यांना, ':नवाकाळच्या संपादकीय मंडळीतील श्री. नानासाहेब खाडीलकर आणि श्री. भालचंद्र रावजी धुरंधर यांचेंहि हार्दिक सहकार्य लाभलें. हें मासिक १९२९ ते १९४१ अखेर बारा वर्षे पर्यंत अत्यंत झीज सोसून चालविण्यांत आलें. " महाराष्ट्रांतील तरुणांनीं नव्या युगाला आवश्यक असा 'व्यापारी बाणा' पत्करल्या वांचून महाराष्ट्रीयांना यापुढें राष्ट्रीय, आर्थिक व सामाजिक क्षेत्रांत पुढें येण्याला आणि महाराष्ट्राची प्रगति साधण्याला वाव मिळण्यासारखा नाहीं, कारण ' Flag follows the trade, असा सांप्रतच्या युगाचा महामंत्र आहे " असें प्रावीण्याच्या प्रचाराचें स्वरूप होतें. या दृष्टीनें अनेक व्यापारी क्षेत्रांतील उपयुक्त माहितीनें भरलेले खास अंक (उद्योगी महाराष्ट्र, विमा अंक, सिनेमा अंक) काढण्यांत आले आणि त्यांचे जनतेनें आणि सरकारांनींहि स्वागत केलें. मुंबई सरकार व मध्यवर्ती सरकारांनीं 'प्रावीण्याला' मान्यता देऊन शाळा-कॉलेजासारखा शिक्षण संस्थाना आणि वाचनालयांना तें घेण्याची शिफारस केली. बडोदा, औंध व फलटण इत्यादि संस्थानांतील शिक्षण-संस्था व सार्वजनिक लायब्ररयांतूनहि प्रावीण्याचे अंक जाऊं लागलें. सरकारी मंत्र्यानींहि स्वातंत्र्योन्मुख काळांत खास शुभाशीर्वाद व संदेश देऊन या मासिकाचा गौरव केला. पण महायुद्धाचे वावटळींत छपाईचीं साधनें दुर्मिळ व महाग झाल्यामुळें आणि प्राविण्याला स्वतःच्या मालकीचा छापखाना नसल्यामुळें १९३८ ते १९४१ हा काळ आर्थिक दृष्ट्या फार अडचणीचा गेला ! मध्यंतरीच्या काळांत डॉ. भडकमकर, श्री. वालचंद हिराचंद श्री. एम. एल. डहाणूकर अॅक्चुअरी श्री. जी. एस. मराठे व श्री गजानान महाराज बोरकर प्रभृतींनी अनेक मार्गांनीं प्राविण्याच्या उपयुक्त कार्याला सक्रिय प्रोत्साहन

दिलें. बारा वर्षें हें मासिक अविरत झीज सोसून चालविल्यानंतर ' नवशक्ती ' चा मुख्य संपादक म्हणून ताम्हनकरांनीं जबाबदारी पत्करली. नंतर ( फ्री प्रेस ग्रूप मधीलच ' नवशक्ति ' असल्यामुळें ) फ्री प्रेस पत्रांचे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. सदानंद यांच्या आग्रही सूचनेमुळें १९४१चे अखेर प्राविण्य मासिक बारा वर्षानंतर बंद करावें लागलें. कारण श्री. ताम्हनकरांनीं आपल्या सर्व शक्ति ' नवशक्ति ' यशस्वी करण्यासाठींच खर्च कराव्या, असा मॅनेजिंग डायरेक्टर श्री. सदानंद यांचा कटाक्ष होता !

जून १९४० ते फेब्रुवारी १९४६ पर्यंत ' नवशक्ति ' दैनिकाची मुख्य संपादक या नात्याची जबाबदारी श्री. ताम्हनकरांचेकडे होती. हें पत्र त्या मुदतींत ' मराठी दैनिकांत जास्तीत जास्त खपाचें ' असे सरकारी अहवालांतून ठरलें व फार लोकप्रिय झालें. फक्त याच मराठी दैनिकाला सरकार, म्युनिसिपालिटी व रेल्वे यांच्या जाहिरातींचा मुख्य वांटा त्यावेळीं मिळाला. ना. मुनशी, श्री. स. का. पाटील व श्री. एस. एल. सिलम या कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं व महर्षि कर्वे आणि श्री. एल. बी. भोपटकर इत्यादि थोरांनींहि पहिल्या वर्षं अखेरीस व नंतरहि या पत्राला गौरवपूर्वक अभिनंदनपर पत्रें पाठविलीं.

पण १९४२ च्या भूमिगत चळवळीनंतर ' फ्री-प्रेस ग्रुप ' च्या चालकांनीं आपलें धोरण बदललें आणि कॉंग्रेस ऐवजीं कम्यूनिझमशीं झुकतें धोरण ठेविलें. ' श्री. का. म. ताम्हनकर हेच मराठी फ्री प्रेसचे ( अर्थात् नवशक्तीचे ) कायम यशस्वी संपादक होवोंत ' अशी परमेश्वराची प्रार्थना करून ताम्हनकरांना गुप्त सक्रिय प्रोत्साहन देणाऱ्या सदानंदांनींच, ताम्हनकरांनीं राजीनामा द्यावा, अशी गुप्त कारवाई सुरूं केली, आणि नोव्हेंबर १९४५ अखेर ती प्रगट स्वरूपांत श्री. का. म. ताम्हनकर यांचे समोर मांडली ! ताम्हनकरांना याची कल्पना आल्यापासून त्यांनीं आपल्या खिशांत राजीनामा तयारच ठेविला होता ! सदिच्छा व सरळ व्यवहार संपलेल्या जागीं काम करावयाचे नाहीं, असा ताम्हनकरांचा बाणा तेव्हां होता व आतांहि आहे. अखेर ता. १८ जानेवारी १९४६ रोजीं ताम्हनकरांनीं व नवशक्तीचें संपादकत्व सोडलें. याची मोठी मजेशीर नोंद १८ जानेवारी १९४६ च्या फ्री प्रेस जर्नलच्या पहिल्या पानावर चौकटींत आहे. " सतत ५–६ वर्षें काम करून नवशक्ति यशस्वी रीतीनें चालविल्यानंतर विश्रांतिसाठीं ताम्हनकर नवशक्ती सोडून जात आहेत. " असा त्या मजकुराचा आशय आहे !

× × ×

'नवशक्ती' चा मुख्य संपादक म्हणून जबाबदारी पत्करण्यापूर्वी १९३७ ते १९४० जून पर्यंत श्री. का. म. ताम्हनकर यांनीं जी थोडी राष्ट्रसेवा केली तिचाहि थोडक्यांत सारांश नमूद करण्यासारखा आहे. 'नवामनु' नांवाचें साप्ताहिक डॉ. भडकमकर श्री. गजानन महाराज बोरकर श्री. दामोदर सावळाराम यंदे प्रभृतींच्या सक्रिय मदतीनें आणि प्रोत्साहनानें काढून दोन वर्षें यशस्वी रीतीनें चालविलें. त्याप्रसंगीं प्रथितयश लेखक प्रबोधनकार ठाकरे श्री. भा. वि. उर्फ मामा वरेरकर श्री. वामन मल्हार जोशी व श्री. आप्पा पेंडसे प्रभृतींचें लेखन सहकार्यहि या साप्ताहिकाला लाभलें होतें. पण अति दगदगीमुळें श्री. का. म. ताम्हनकर यांच्यावर मूळव्याधीकरतां डॉ. भाजेकरांचे दवाखान्यांत एकाएकी शस्त्रक्रिया करावी लागल्यामुळें 'नवामनू' साप्ताहिक नंतर बंद करावें लागलें.

सदरील शस्त्रक्रियेतून प्रकृति थोडीं सुधारल्यावर श्री. का. म. ताम्हनकर यांनीं सुप्रसिद्ध गोभक्त व गोसेवक श्री. चौंडे महाराज यांच्या गोरक्षण संस्थेचा प्रचारक म्हणून दोन वर्षें काम केलें. त्यासाठीं अखिल महाराष्ट्रांत प्रवास करून त्यांनीं 'कायद्यानें गोवधबंदी व्हावी' अशी मागणी करणाऱ्या छापील अर्जावर एक लाख लोकांच्या सह्या मिळवून एक प्रत त्या काळचें मुंबईचे गव्हर्नर व एकप्रत व्हॉइसरॉय यांचेकडे पाठविली त्याकरितां ताम्हनकरांनीं गांवोगांवीं 'गोरक्षण' विषयाचें महत्त्व पटविण्यासाठीं व्याख्यानें दिलीं आणि खाजगी बैठकांतील चर्चेतून या विषयाचा राष्ट्रोद्धाराशी संबंध किती महत्त्वाचा आहे, हेंहि पटवून दिलें. मात्र त्यानंतर 'गोरक्षण संस्थेकरतां निधि' जमविण्याचें काम या संस्थेमार्फत सांगण्यांत आल्यामुळें 'हें काम आपल्या स्वभावाला व तब्येतीला झेपण्यासारखें नाहीं' असें सांगून श्री. का. म. ताम्हनकर या संस्थेच्या कामांतून मोकळे झाले व नंतरच त्यांनीं 'नवशक्ति दैनिकाचें संपादकत्व १९४० च्या जूनमध्ये पत्करलें.

## शिक्षक या नात्यानें केलेली सेवा

'नवशक्ति' दैनिकाचें संपादकत्व १९४६ च्या जानेवारींत सोडल्यानंतर त्याचवर्षी फेब्रुवारी महिन्यांत 'सरस्वती गर्लस स्कूल' या श्रीमती पिरोज आनंदकर बी. ए. बी. टी. टी. डी. लंडन, यांच्या नेतृत्वाखालीं शिक्षक या नात्यानें ताम्हनकरांनीं सेवा केली.

गिरगांवातील सरस्वती हायस्कूलांत श्री. ताम्हनकर हे फुल टाइम ॲसिस्टंट टीचर म्हणून शिक्षकाची कामगिरी करूं लागले. १९४६ ते १९५४ पर्यंत त्यांनीं या संस्थेंतून निवृत्त होतांना शिक्षण संस्थेची उत्कृष्ट सेवा करून सर्वांशीं

गोडीनें वागल्याविषयीं 'जाहीर गौरव समारंभ' त्यावेळचे मंत्रि ना. नरवणे यांचे अध्यक्षतेखालीं केला. शिक्षकांनीं व विद्यार्थ्यांनींहि मिळून केलेला निवृत्त शिक्षकाचा हा या शाळेंतील पहिलाच जाहीर समारंभ होय. या संस्थेच्या प्रिन्सिपॉल श्रीमती पिरोज आनंदकर बी. ए. बी. टी. (टी. डी. लंडन) यांनीं ताम्हनकरांचें त्यांच्या निरलस व गोड सहकार्याविषयीं आभार प्रदर्शक पत्रहि पाठविलें आहे.

शिक्षण-संस्थेंत काम करीत असतां व त्यापूर्वीहि श्री. ताम्हनकरांनीं अनेक चरित्रें लिहिलीं. नवशक्ती दैनिकांत काम करीत असतांच पुण्यास १५ दिवस राहून दररोज सकाळीं नवशक्तिसाठी ताज्या बातम्या वृत्तपत्रांतून वाचून ताज्या विषयावर अग्रलेख पाठवून द्यावयाचा आणि सकाळीं ११ पासून रात्रीं ११-१२ पर्यंत काम करून डॉ. भडकमकरांच्या जीवन चरित्राचा मजकूर तयार करून छपाईसाठीं पाठवावयाचा; मध्यंतरी या मजकुराच्या तपशिलाविषयीं डॉ. भडकमकरांची संमतीहि घ्यावयाची अशा पद्धतीनें काम करून अवघ्या १५ दिवसांत डॉ. भडकमकरांच्या षष्ठ्यब्दि पूर्ति गौरव ग्रंथांतील' १२५ पानें चरित्रविषयक लिखाण ताम्हनकरांनीं तयार करून दिलें. श्री. का. म. ताम्हनकरांचा, या लेखनकार्याच्या पुरस्कारांत साहित्यसम्राट श्री. तात्यासाहेब केळकरांनीं आणि प्रस्तावनेंत प्राध्यापक माटे मास्तर यांनीं गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. (१९४४)

आतां श्री. का. म. ताम्हनकर यांनीं लिहिलेल्या आणखी कांहीं चरित्र ग्रंथांचा उल्लेख करून त्यांच्या विषयींच्या माहितीचा हा लांबलेला तपशील आवरतां घेऊं.

श्रीमती देवी सरोजनी नायडू या कॉंग्रेसच्या अध्यक्षपदीं निवडून आल्या त्या वर्षीं श्री. सौ. अवंतिकाबाई गोखले यांच्या संपादनाखालीं चालत असलेल्या 'हिंदमहिला' साप्ताहिका तर्फे श्री. ताम्हनकर यांनीं 'श्री सरोजिनी नायडूंचें चरित्र व भाषणें' असा ग्रंथ १९३० सालीं प्रकाशित केला.

त्यानंतर श्री. गजानन महाराज बोरकर व पद्मनाभस्वामींचे प्रमुख शिष्य यांच्या आग्रहावरून अवघ्या १५ दिवसांत श्री. का. म. ताम्हनकर यांनीं 'श्री पद्मनाभ स्वामींचें चरित्र' हा २५० पृष्ठांचा (रॉयल साइज) ग्रंथ प्रकाशित करण्यास लेखनाची मदत केली. या ग्रंथाला श्रीमंत बाळासाहेब, राजेसाहेब संस्थान औंध यांनीं प्रस्तावना लिहून ताम्हनकरांचा गौरवहि

केला आणि पुस्तकाच्या प्रकाशन समारंभाचें अध्यक्षत्वहि ( पालघर टेंभवडे ) ( श्री. पद्मनाथ स्वामींच्या समाधीचें स्थान ) येथील समारंभांत स्वीकारलें ( १९४६ ) या स्वामींनीं महात्मा गांधींच्या 'हृदय–परिवर्तन पद्धतीनें' ( कायद्याच्या मदतीवांचून ) जवळ जवळ पाऊण लाख कामगार. शेतकऱ्यांना केवळ मद्यपानापासूनच नव्हे तर सर्व प्रकारच्या व्यसनांपासून निवृत्त केलें. अखिल महाराष्ट्रांत आणि मध्यप्रांतांत व सध्याच्या पाकिस्तानांतील कराचींत देखील श्री. पद्मनाभस्वामींचे हजारों शिष्य व्यसन निवृत्त होऊन उर्जितावस्थेस आले. या स्वामीजींच्या कार्याचा लोकमान्य टिळकांच्या व महात्मागांधींच्या काळांत सर्वत्र गौरव झाला !

यानंतर ताम्हनकरांनीं 'The Library Movement and organization या मुंबई सरकारच्या इंग्रजी ग्रंथांचा मराठी अनुवाद करून दिला व त्याचाहि यथोचित गौरव झाला.

त्या काळांतील भारतभर ज्यांचें नांव गाजलें असे 'देशगौरव सुभाष बोस' यांच्या सिंगापूरकडील जाहीर भाषणांची प्रत, आरमारी दलांत काम करणाऱ्या एका तरुणाकडून मिळवुन तिचें ठीक संपादन ताम्हनकरांनीं केलें. 'On to Delhi' हें इंग्रजी पुस्तक, प्रकाशक श्री. ढवळे यांनीं आपल्या कर्नाटक प्रिंटिंग प्रेस मध्ये १९५० सालीं प्रकाशित केलें. याचवेळीं सिंगापूरकडील इंग्रजी नियतकालिकांतून आलेल्या माहितीचे आधारें 'चलो दिल्ली' ही मराठी छोटी पुस्तिकाहि याच प्रकाशकांनीं प्रकाशित केली. या कामीं श्री. ताम्हनकरांना प्रबोधनकार श्री. केशव सिताराम ठाकरे आणि इंग्रजी मराठी लेखनांत प्रभावी स्तंभलेखक म्हणून प्रसिद्ध असलेले कै. श्री. पी. आर. लेले या थोर पत्र पंडितांकडून प्रोत्साहन पूर्वक सहकार्य लाभलें !

१९४९–५० सालींच सैगल, धिलॉन व शहानवाझ या नेताजींच्या 'आझाद हिंद फौजेंतील' सेनानींच्या इंग्रजी मुलाखतींच्या आधारें श्री. ताम्हनकर यांनीं 'वीरांच्या भेटी' हा ग्रंथ लिहिला याचा 'नेताजी सुभाष बोस' ज्या आझाद हिंद फौजेचे प्रमुख सेनापति म्हणून ज्यांचें नांव गाजले त्या श्री. जगन्नाथराव भोसले यांनीं गौरवपर पुरस्कार केला आहे.

नंतर 'अमेरिकन इन्फर्मेशन ऑफिसमार्फत' 'परचुरे पुराणिक' या प्रकाशन संस्थेमार्फत प्रसिद्ध झालेलें 'सागर सफरींतून स्वातंत्र्य' Sailing to freedom हें पुस्तकहि श्री. ताम्हनकर यांनीं लिहून दिलें.

"प्रावीण्य मासिका खेरीज डॉ. श्रीमती चंद्रकला हाटे एम. ए. यांच्या संपादनाखाली त्याकाळीं प्रसिद्ध होत असलेलें 'वनिता विश्व' मासिक तसेंच दामोदर सावळाराम यंदे यांचे मार्फत प्रसिद्ध होत असलेलें 'ज्ञानमंदिर' मासिक आणि 'शिवाजी साप्ताहिक' 'चित्रमय जगत्' इत्यादि नियत कालिकांतून 'संपादकीय व्यवस्थापक' अगर लेखक या नात्यानें श्री. ताम्हनकर यांनीं काम केलें. याचप्रमाणें 'फ्रीप्रेस ग्रुप' चें 'भारतज्योति' साप्ताहिक, 'संडे क्रॉनिकल' 'इंडियन रीडर्स डायजेस्ट' नॅशनल हेरल्ड इत्यादि वृत्तपत्रांतून इंग्लिश लेखन श्री. ताम्हनकर मधून मधून करीत 'माइस इंडिया' या म्हैसूरकडील इंग्रजी साप्ताहिकाचे मुंबईचे खास बातमीदार म्हणूनहि कांहीं काल श्री. ताम्हनकर यांनीं इंग्रजी बातमीपत्रें पाठविलीं."

श्री. ताम्हनकरांनीं लेखक या दृष्टीनें ४० वर्षांवर केलेल्या कामगिरीचा जो आतांपर्यंत थोड्या विस्तारानें उल्लेख केला त्यावरून त्यांची आम्ही श्री अवधूत महाराजांचे चरित्र लिहिण्यासाठीं योजना केली हें वाचकांना आतां आमच्या प्रमाणेंच पटेल, या विषयीं आम्हांला आत्मविश्वास आहे. वास्तविक १९३४ सालीं श्री अवधूत महाराजांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीचा जो समारंभ त्यांच्या भक्तांनीं मोठ्या उत्साहानें केला त्याचवेळीं त्या समारंभासाठीं जमलेल्या महाराजांच्या भक्तांनीं श्री. दत्तमहाराज व श्री. मेघःश्यामबुवा यांना विनंति करणारा आग्रहपूर्वक ठराव केला कीं हें चरित्र प्रकाशित करण्याची व्यवस्था त्वरीत करावी आणि श्री. का. म. ताम्हनकर यानांच श्री. दत्तमहाराज यांच्या इच्छेप्रमाणें चरित्रलेखन करण्याची विनंति करावी

श्री. अवधूत महाराजांच्या ह्या चरित्रानें श्रीसंत भक्तांचे व अवधूत महाराजांच्या शिष्यांचे थोड्या प्रमाणांत कां होईना समाधान होईल अशी आशा करणें गैर होणार नाही.

थोड्या प्रमाणानें म्हणण्याचे कारण कीं परपूज्य अवधूत महाराजांच्या निर्याणानंतर २५ वर्षांनी हें चरित्र प्रसिद्ध होत आहे. त्यांच्या हयातींत त्यांच्या प्रेमळ सहवासाचा व बोधाचा लाभ ज्यांना झाला, अशी बहुतेक मंडळी आज हयात नाहींत. त्यांच्या हयातींत त्यांच्या अगदीं सतत जवळ असलेले त्यांचे परमप्रिय गुरुबंधु शिवाप्पा हे सुद्धां ३ वर्षांपूर्वी श्रीपंतचरणीं लीन झाले. ते जरी आज हयात असते तरी अवधूत महाराजांची पुष्कळशी माहिती आपणास मिळू शकली असती व ती चरित्र वाचकांस देता आली असती, परंतु तसा योग नव्हता असे म्हणावे लागते

तरी सुद्धां आपणांस आज जे चरित्र मिळत आहे त्याचे पुष्कळसें श्रेय अवधूत महाराजांचे परम प्रिय शिष्य गुरु भक्ति परायण मेघःशाम बुवानाच आहे. कारण त्यांची महाराजांच्या चरित्राची खरी तळमळ व माहिती मिळविण्याची जिद्द त्यास कारणीभूत आहे व त्याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावेत तितके थोडेच आहेत.

सदरील ठरावाच्या आग्रही सूचने प्रमाणें श्री अवधूत महाराजांचे हें चरित्र श्रीं. दत्तमहाराज–तथा श्री. अण्णा महाराज व श्री. मेघःशाबुवा यांनी खूप प्रयत्न आणि दगदग करून प्रसिद्ध केलें आहे. त्यांतील आठवणींच्या व चरित्र लेखनाचे रूपानें ६०० पानावर हा ग्रंथ झाला असून त्याची किंमत बरीच ठेवावी लागेल. तरीपण ज्या वाचक व भक्तांनी या महत्वाच्या प्रकाशनासाठीं आगाऊ रक्कम दिली असेल त्यांना हें चरित्र कमी किंमतींत देण्यात येईल. कारण अशा भक्तांच्या अगाऊ मदतीमुळें चरित्र ग्रंथाचें प्रकाशन त्वरीत व चांगल्यां प्रकारें झालें असाहि आम्हांला अनुभव आला.

---

सह्या :—श्री. मेघःशाम संकपाळ, श्री. खंडेराव सहानी, श्रीमान् मुकुंदराव राणे, श्री. मल्हारराव कीर्तीकर, श्री. रामकृष्ण बाबुलाल श्री. झिपरूशेट वाणी (भडगांव) आणि ह. भ. प. द. मो. दातार



स्वां. वा. मोरेश्वर केशव दातार उर्फ अवधूत महाराज ( कुरूंदवाडकर )



जन्म
मगळवार, भाद्रपद संकष्टी शके १७९५
ता. ९-९-१८७३

समाधि,
बुधवार, चैत्र शुद्ध १ शके १८६१
ता. २२-३-१९३९



चरित्र नायकाचे वडील

स्वानंदवासी केशव नारायण दातार (कुरुंदवाड)

## श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचें चरित्र

# दातार घराण्याची पूर्वपीठिका



सावंतवाडीपासून ८–१० मैल असलेल्या अडिवरे गांवानजीक रहाणारें दातारांचे घराणें. त्यांच्याकडे इसवी सन १३ व्या शतकापासून १५ व्या इ. सनाचे दरम्यान त्या काळच्या बखरींतून प्रसिद्धी पावलेला सिद्ध पुरुष येऊन, त्या काळांतील त्या दातार घराण्याशीं ऐक्यरूपानें राहिला. त्या घराण्यांत त्या काळीं एक विधवा मुलगी आणि तीन मुलगे होते. त्या चौघांना सिद्धपुरुषानें वेदविद्या शिकवून वेदशास्त्र संपन्न केलें आणि बंगाली शाबरी विद्या शिकवून एकप्रकारचें ऐहिक सामर्थ्यहि त्यांच्यांत निर्माण केलें. अखेर त्या वेदशास्त्रसंपन्न विधवा मुलीकडूनच सिद्धपुरुषानें मुरूडची वसाहत वसवून दातार घराण्याला देवस्थानांच्या व्यवस्थेचा व पुजारीपणाचा मुख्य मान दिला, इत्यादि हकीकत पुण्याच्या ऐतिहासिक दप्तरांतून आणि मुरूडचे वैशंपायन, मंडलीक व कर्वे यांच्या घराण्यांतील उपलब्ध झालेल्या बखरीवरून घेतला आहे. ‘मुरूड ऐतिहासिक व सांस्कृतिक’ हा ग्रंथ या शतायुती अण्णासाहेब गौरव समितीं मुरूड (हर्णै) तर्फे श्री. वामन रामचंद्र गानू यांनी १९५८ सालीं प्रकाशित केला. या ग्रंथाचे आधारे दातार घराण्यासंबंधींचा मजकूर या चरित्रासाठीं वापरण्याची परवानगी सदर ग्रंथकर्ते श्री. वा. रा. गानू यांनीं दिली तीबद्दल त्यांचे आभार नमूद करतों.

**दातार घराण्याची पूर्वपीठिका मुरूड वसविणाऱ्या सिद्धपुरुषाच्या बखरींतील संदर्भात आढळते. ती खालीलप्रमाणें :—**

### हकीकत कसबे मुरूड

हकीकत कसबें मुरुड प्रांत दाभोळ. पूर्वी **सिद्ध पुरुष नागर ब्राह्मण** फिरत फिरत आला. तो नांदिवडे यांसी आला. **तो दातार ब्राह्मण यांचे घरीं राहिला.** त्यामध्ये अनेक प्रकारच्या विद्या होत्या. आणि देवता सिद्ध होती व वेताल सिद्ध होता. व साबरी बंगाली विद्या होती. **दातार ब्राह्मण यांना मुलें तीन व कन्या बालविध्वा एक,** एकूण चार जणें होतीं. त्या चोहोंजणास आपली विद्या सांगोन परम विद्वान आपल्याप्रमाणें केलें, त्यामध्ये ती विध्वा बायको ती परम निपुण साबरी बंगाली विद्येमध्ये निपुण जाहली. विद्या सिद्ध होऊन **जालंधर राजा राज्या करीत होता, त्याजवळ सिध्दपुरुष तीं चार भावंडे घेऊन आला.** त्याजवर आसूद (या पुढील भाग हरवून १०–१२ ओळी ( मजकूर ) गेला असावा ) ब्राम्हण वस्ती केली. आणि ब्राह्मणास अधिकार दिल्हे. स्नानसंध्या करून श्रीची आराधना करीत असत. त्यास **कोणे येक दिवसी** प्रांतोप्रांतीं **बहुरूपी बहुरूप** घालून जीतपत्र घेत घेत असे या राजद्वारीं आले. बहुरूपी फुगडी आणि बहुरूप घालून जीतपत्र घेऊन जावे. तेव्हां ते बहुरूप घालूं लागले, तेव्हां राजेयासी संकट पडले कीं आपले राज्यांतून हे जीतपत्र घेऊन जातात. याजकरितां आपले राज्यामध्ये दवंडी पिटली कीं या बहुरूपी–याजबरोबर कोणी गावगुंड खेल करी ऐशा असला तर आणावा. तेव्हां ते फिरोन आले कीं कोणी नाहीं ऐसें जाहले **तेव्हां गंगाधरभट आपल्या गुरूची व श्रीची आज्ञा घेऊन राजाद्वारीं गेले.** आणि राजश्रीजवळ विनंति केली कीं आम्ही ब्राह्मण आहो. आम्हास आज्ञा जाहली ( तर ) आम्ही या जवल खे (ल) पाहों. याजवर बहुरूपी बहुरुप घालू लागले. आणि त्याजबरोबर हे खेलो लागले. खेळतां खेळतां चार दिवस जाहाले. परंतु कोणी कोणास आटपेना ऐसे जाहले. **यामध्ये बालविधवा त्याची बहीण बोडकी जी मायेविद्ये उत्कृष्ट परंतु तिचीहि विद्या त्या बहुरूपीयांपुढें चालेना ऐसे जहाले.** तेव्हां गंगाधर भट यांणीं आपले गुरूचे व श्रीदुर्गेचे ध्यान करून श्रीस विनंति केली त्याजवरून श्रीचे कानचे तानवडी अमोलक अमोलिक याचे हातीं आले. त्याजवर बहुरूपी याजला दुसरे आणावयासी सांगितलें. परंतु त्याजला दुसरे येईना. त्याजवरून हे हटले, बहुरूप समाप्त जाहाले. **बहुरूपी याजला जितले.** बहुरूपी याजपासून

मागील जीतपत्रें घेतलीं. तेव्हां बहुरूपी यांनीं फिरोन बहुरूप घालूं नये ऐसें जाहालें. तेव्हां बहुरूपी याजला शरण आले कीं आम्ही बहुरूप घालूं नये ऐसें जाहाले. परंतु आमचें पोट भरणार नाहीं. तुम्ही कृपा करून आम्हास बहुरूप घालावयाची आज्ञा द्यावी. त्याजवर याणी बहुरूपाची आज्ञा दिली. आणि जेथें आपले दाताराचे गावी घर असिलियासी त्याचे घरची भिक्षा घेऊं नये. या प्र॥ (प्रमाणे) त्या (ज)वल करार करून त्याजला आज्ञा दिली. याज प्र॥ जाहले असता राजश्री फार सुप्रसन्न जाहाले. आणि बोलिले कीं, हे प्रसंगीं जे मागाल ते तुम्हास बक्षीस आहे. त्याजवर हे बोलले की आम्हास स्नानसंध्येस स्थळे उदरनिमित्याचे चाले आणि कोणा येकाचा वेध नाहीं व मागील कोणाचा वेध नाहीं याज प्र॥ करून दिल्यानें स्नानसंध्या करून राहों आणि राजयास अभिष्ट चिंतू. याज प्र॥ बोलले. त्याजवर राजश्रींनी आज्ञा केली की तुम्ही असी स्थलें निर्वेध पाहोन (येणे) याजवर आसूदाहून निघाले ते बंदरकि (नारा) दक्षिणेकडे पहात पहात गेले. बंदरकि (नारिया) सी वसाहत नव्हती, त्यामध्ये (बंदरोबंदरी) गाव पहात सेतवडे याचे खाडी पावेतो गेले. आणि तेथून फिरले ते उत्तरेस पाहात पाहात चोळे पावेतों गेले आणि तेथून फिरोन आले आणि राजश्रीजवळ सांगितलें कीं बंदर किनारेयाचे जागा रान वाढोन ओघाड आहेत. व वेलाटीस पाटपाणी येत असे. जागा ब्राह्मण राहलियास स्नानसंध्या योग्य आहेत. आज्ञा जाहलियान (व) साहात करू.

आज्ञा घेऊन निघाले ते आद्य ग्रामाचे पश्चिमेस रान बंदर किनारा जागा नीट करूं लागले. त्यास वटवृक्ष मोठा होता. तोडूं लागले. (त्या) मध्ये स्वयंभु देव निघाली. आणि बहुत भुतावलि उठली. त्याणें माणसे मरो लागली. तेव्हा सिध्दपुरुष ध्यानस्थ बसले त्याजवरून भुतावलीस भुतावली काढावी व वर्षामध्ये एक नरबल द्यावी याप्र॥ करार करून वेताजवळ सर्व बंदोबस्ती करून जंगल तोडून त्याची बहिण बोडकी जो माय तिजला सावरी वेताल साध्य होता. ती मध्ये केळीचे कालाची नांव करून समुद्र पलाटण करावे याजप्र॥ अनेक विद्या होत्या तिजला ग्राम सिध्द करावयासी सांगितला. तिणे अल्पयासेक (येथें कांही ओळी गेल्या असाव्या) रून ग्रामाची भूमि सिद्ध केली. आणि कर्णाटक प्रांतीहून देवाच्या प्रतिमा आणून गांव वसाहत करावयासी प्रारंभ दक्षिणेकडून केला. प्रथम आपणास १ दातारास

जागा नेमून उत्तरेस गडदू स्थापिला. त्याचे उत्तरेस २ **वैशंपायन** याजला जागा नेमून त्याचे उत्तरेस सीमे पलीकडे रुद्रभूमीस शव न्यावयासी मार्ग ठेविला. त्याचे उत्तरेस ३ **रिसबूड** ब्राह्मणास जागा नेमिला. त्याचे उत्तरेस ४ **वैद्य** ब्राह्मणास जागा नेमिला. त्याचे उत्तरेस ५ **बाळ** ब्राह्मणास जागा नेमिला. त्याचे उत्तरेस श्री. **गंगानारायण** याचे देवतास व त्याचे पूजेस ब्राह्मण ६ **परांजप्या** यासी जागा नेमिला. त्याचे उत्तरेस ७ **जोसी** याजला जागा नेमिला. त्याचे उत्तरेस गडदू स्थापून श्रीचे देवालयासी व त्याचे अधिष्ठानास ८ **दांडेकर** याजला जागा नेमिला. त्याचे उत्तरेस गडदू स्थापून त्याचे उत्तरेस ९ **कोपरकर** ब्राह्मणास जागा नेमिला. त्याचे उत्तरेस १० **सुतर** ब्राह्मण याजला जागा नेमिला. त्याचे उत्तरेस रुद्रभूमीस स्थळ ठेविलें. त्याचे उत्तरेस १० **म्हाळकर** ब्राह्मण याजला जागा नेमिला. त्याचे उत्तरेस ११ **धारप** ब्राह्मणास जागा नेमिला. त्याचे उत्तरेस गडदू स्थापून त्याचे उत्तरेस **यवनास** जागा नेमून त्यामध्यें शून्यालयासी जागा नेमिला. त्याचे उत्तरेस खाडी पलीकडे उत्तरेस बाहेरवाडील जागा नेमून त्यामध्ये सोनार, कासार, सींपी, सुतर, न्हावी, परीट, कुंभार, तेली, साळी, कुळवाडी, भंडारी, चाम्हार एकूण संपूर्ण अन्य जातीसी जागा नेमिला. त्याचे उत्तरेस श्री सीमादेवीचे देवळास जागा नेमिला.

त्याचे उत्तरेस सीमे-(दोन अक्षरें गेलीं आहेत) पर्वत त्याचें नांव चंद्रा सारिखा पाहोन त्याचें नांव **चंद्रागिरी** ठेविलें. त्याचे पूर्वेस पूर्वेकडचे सीमेस पर्वत. पर्वता अलीकडेस उदक पाहोन क्षेत्रपाळ देव स्थापावयासी जागा नेमून दक्षिणेकडेस जाऊन दक्षिणेचें सीमेचा पर्वत त्याचे **भद्रागिरी** नांव ठेवून त्याचे उत्तरेस उदक पाहोन तेथें क्षेत्रपाल स्थापावयासी जागा नेमून त्याचे पूर्वेस उदक पाहोन क्षेत्रपाल स्थापावयासी जागा नेमिला. **त्याचप्रमाणें चतुःसिमा** चतुःसीमेस देव स्थापू लागले. तेव्हां श्रीचे व गुरूची आज्ञा घेऊन आद्य ग्रामी मान दिले होते त्याच प्र ॥ क ॥ (कववे) केला त्यामध्ये मान दिल्हे. प्रथम **पहिला मान महाजनकीचा आपणास (दातार घराण्यास) ठेविला.** त्याजवर पहिला मान **वैशंपायन उपाध्ये** यासी दिल्हा **दुसरा मान वरवडे याहून जोसी आणिले त्यास दुसरा मान ज्योतिषपणाचा दिल्हा. तिसरा मान फिरोज वैशंपायन** यासी धर्माधिकार दिल्हे. चवथा (मा) न **वैद्य** याजला दिल्हा. **याजप्रमाणे भिक्षुकपणाचे मान देऊन श्री दुर्गेची स्थापना केली. श्रीस इनामत वेगळी नेमली. आणि**

श्रीचे अधिष्ठानास चाकरीस साहित्यास कारभारी नेमावे त्यास इनामत पैकी सेतें द्यावी. त्या प्रथम महाजनकीचा मान दांडेकर ब्राह्मण यासी दिल्हा. आणि त्याणें श्रीची पूजा करावी. अधिष्ठानाचें धणीपण त्याणें करावें. त्याजला दुसरे साहित्यास कारभारी वर्तक असे नांव ठेवून दुसरा मान कोपरकर यासी दिल्हा. आणि त्याजला श्रीचें अधिष्ठान, लिहिणें, व इनामतीची जमाबंदी कोठी व जमादारखाना त्याचा त्याणे कारभार करावे व तिसरा मान बालवर्तक यास दिल्हा. श्रीचे देवालयामधी श्रीचे दर्शनास येईल त्याची चवकसी करावी. व देवळांत बसावयासी घालवावे व सारा वेळ देवळांत असावे. चवथा मान सुतर ब्राह्मण याजला दिल्हा आणि त्याणे देवळाचे काम मोडिलें तुटले पाहोन ते करवावे. व पांचवा मान धारप ब्राह्मण यास दिल्हा त्याणे सीवायाचे काम कापडाचे त्याणे करावे. याजप्रमाणें सर्वांनी आपली कामे करावी आणि त्रिकाल श्रीचे पूजेचे साहित्य करावे व यात्रेचें साहित्य करावे. चवथा मानकरी याणे त्रिकाल पूजा सांगावी. धर्माधिकारी याणी पुराण सांगावे. बारीक याजला सातवा मान देऊन त्याणे श्री सन्निध जी चाकरी पडेल ती करावी. आणि नरवल देणे ती त्यासी द्यावी. याज प्र॥ श्रीचे अधिष्ठान करून त्याजला इनामतीपैकीं सेते वाटून दिल्ही. महाजन याजला आगर व बावील सेत दिल्हे. व चवथा मानकरी याजला मळा कोपरकर याजला पेढे व बाळ यासी लंगर व सुतरा याजला गुबरवणे धारप याला कणकीच्या पाख्या व बारीक याला पड सेते याजप्र॥ सेते देऊन त्याही सेते लावून चवथाई पीक श्रीचे कोठीस श्रीस द्यावे. आणि बाकीचे आपण घ्यावे. आणि श्रीची चाकरी जी पडेल ती करावी.

याजप्र॥ श्रीचे अधिष्ठान करून आपले अधिष्ठानास रिसबूड याजला गृहस्थ मंडलीमध्यें मान देऊन आपला दातार ( घरचा ) घरचा कारभार सांगितला. रहाळकर याजला मान देऊन बाहेर वाडीचा कारभार सांगितला. याजप्र॥ अधिष्ठान करून ग्रामदेव श्री भैरव श्री काळंबा स्थापून त्याजला गुरव पूजेस ठेविला. आणि त्याजला कशेडी रहावयासी ठिकाण दिल्हे. सोमेचे ठिकाणा अलिकडे तीहि जागा क्षेत्रपाळ स्थापिले, श्री सीमादेव स्थापिली आणि तिजला सेवा अधिकारी स्थापिला. त्याणे पूजा व लावणी त्याणे करावी व त्याजला बाहेरवाडीचा अधिकार सांगितला. त्याजकडे बाहेरवाडीचे वडीलपण दिल्हे. याज॥ ग्रामदेवते स्थापून श्री नारायण व गंगानारायण यासी स्थापना करून त्याजला पूजेस-पराणजप्या यासी ठेविला. आणि त्याजला श्री गंगानारायण याचा आगर व नारायण पाख्या सेत दिल्हे. श्री महारुद्र याची स्थापना करून गुरव पूजेस ठेवून त्याजला चंदनखरी सेत दिल्हे. व श्री व्याघ्रेश्वर याजला पलिकडे इनाम सेत करून दिल्हे.

व शून्यालयासी त्या करून स्थापना करून त्याजला काजी स्थापून व अनखी मुकादम वगैरे स्थापिले (तीन अक्षरे गेलीं आहेत) केस सेत इनामत करून दिल्ही. त्याजप्रा। गावाची रचना करून राजश्री याजवल जाऊन गावाचे इनामपत्र करून दिल्हे व ताम्रपट करून घेतले. व गुहागर व दिवे व करदली याचेंहि इनामपत्रे घेऊन त्याची त्यास दिल्हीं. याज प्रा। तीन कसबे दर कसबे यासी कर्यातीं गाव कसब्यास चवऱ्यासी. त्याची यादी आलाहिदा आहे.

चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून श्रीयात्रा वसंत नवरात्र प्रारंभ प्रतिपदेचे दिवसी श्रीचा अधिकारी याणे श्रीचे यात्रेची प्रातःकालीं आमंत्रणें करावी.

—: हकीकत समाप्त :—

## परिशिष्ट ऐतिहासिक साधनें पान ४

'ऐतिहासिक साधनें' या परिशिष्टांतील पान १ मध्ये परिशिष्ट पान ४ वरील बखरीच्या उताऱ्याविषयीं 'ऐतिहासिक आणि सांस्कृतिक मुरूड' या ग्रंथाचे लेखक श्री. **वामन रामचंद्र गानू** म्हणतात-" लेखांक १ ही मुरुडची बखर आहे. वैशंपायन दप्तरांत दोन बखरी मिळाल्या. एक संपूर्ण. ती दोन यांत दिली. भाषाशैली व लेखन पद्धतीवरून **ही बखर १७ व्या शतकांतील ठरते.** वैशंपायन बखर २ ही अपुरी आहे. पण मंडलीकांनीं प्रसिद्ध केलेली बखर व ही बखर या जवळ जवळ सारख्याच आहेत. यामुळें अपुरी वैशंपायन-बखर ही मंडलीक बखरीवरून पुरी करून येथें दिली आहे. या दोन्हीहि बखरींची तुलना करून अनेक निष्कर्ष काढतां येणें सारखे आहेत. वैशंपायन–प्रतीच्या अखेरीस "**करवा महाजन याणे चोह्लोगावीचे व आपले गांवचे शुद्र आणवावे**" हा उल्लेख आहे. त्यावरून **कर्वे महाजन** झाल्यानंतर, या प्रतीचें लेखन झालें हें उघड आहे. मंडलिक प्रतींत कर्वे यांचा उल्लेख नाहीं. तसेंच मंडलीक प्रतींत हिरे-जोशी यांचा उल्लेख आला आहे तो वैशंपायन प्रतींत नाहीं. यावरून **मंडलीक–प्रत जुनी ठरते,** आणखी कांही सामाजिक बाबतींत निष्कर्ष निघूं शकतील. पण तें काळाचे काम आहे. तेव्हां सध्या एवढेंच पुरें"

* * *

## परिशिष्ट पान १

यांतील प्रस्तुत चरित्रासाठीं **मुरुडच्या दुर्गादेवीचे** प्रमुख व्यवस्थापक व मानकरी '**दातार घराणें**' यांच्या संदर्भापुरता या परिशिष्टांतील उल्लेख करावयाचा आहे. परिशिष्ट लेखांक १ परिशिष्ट पान ४ वरील सुरवातीच्या पानावरील मजकूर, प्रकरण २ पान 'सिद्धपुरुष' पानें ११ ते १५ मधील बखरींतील मजकुराहून **वेगळा आहे.** तो खालीलप्रमाणें :—

या बखरींतील हकीकत समग्र ग्रामस्त यांही लि ॥ धृ ॥ मुरूड येथील आपले गांवीची मालमानी स्थिति सिधानें (सिद्धपुरुषानें) कोणे प्रकारें कोणकोणी कैसी वर्तणूक करावी त्याची हकीकत मिळोन लि ॥ (लिहिली) आहे.

या बखरीच्या उताऱ्यांत सिद्धपुरुषाचें नांव 'गंगाधर भट्ट' या ऐवजीं 'पद्माकर भट' असें आहे. तसेंच प्रकरण २ मधील पान १३ वर वडाचें झाड तोडतांना 'भुतावली उठली माणसें मरो लागली' असें म्हटलें आहे तर परिशिष्ट पान ४ वर 'घाव घालतां दातार ब्राह्मग मृत्यू पावला' असा उल्लेख आहे. पुढें देवतेची प्रार्थना (सिद्धपुरुषानें करून) 'पिशाचे याचें बंधारण करून ब्राह्मण जिवंत करविला' असेहि म्हटलें आहे. पण प्रकरण २ पान १३ वर झाड तोडतांना माणसे मरू लागल्याच्या उल्लेखानंतर पुढील मजकूर बखरींत आहे :—

"तेव्हां सिद्धपुरुष ध्यानस्थ बसले आणि ध्यानीं आणिले त्याजवरून भुतावलीस गुतावली (उतारा) काढावी व वर्षामध्ये एक नरबळ द्यावी याज ॥ करार करून वेताजवळ सर्व बंदोबस्ती करून जंगल तोडून त्याची बहीण बोडकी जो माय तिला साबरीं वेताल साध्य होता. तीमध्ये केळीचे कालाची नांव करून समुद्र पलाटण करावे ॥ याज प्र ॥ अनेक विद्या होत्या तिजला ग्राम सिद्ध करावयासी सांगितला. तिणे अल्पयासेक (येथें कांहीं ओळी गेल्या असाव्या) रून ग्रामाची भूमी सिद्ध केली."

वर दिलेले फरक वगळल्यास प्रकरण दोन मधील ११ ते १५ पानावरील ऐतिहासिक बखर आणि परिशिष्टांतील बखरी यांचे तपशिलांत फरक नाहीं.

तीन्हीहि बखरींतून मुरूड गांवाची वसाहत वसविण्याचा मान दातार घराण्यावरच सिद्धपुरुषानें सोंपविला असें दिसून येतें. तीन्हीहि बखरींतून दुर्गादेवींचे व्यवस्थापक व पुजारीपणाचा मुख्य मान दातार यांच्याकडेच असल्याचा अनेक जागीं उल्लेख आहे.

दातार यांचे खालोखाल वैशंपायन, जोशी, नेने परांजपे, कर्वे इत्यादि १०-१२ कोकणस्थ ब्राह्मणांना मुरूड देवस्थानाच्या व्यवस्थेंत सिद्ध पुरुषानें निरनिराळीं कामें दातार घराण्यामार्फतच देऊन १०-१२ कोकणस्थ कुटुंबीयांना मुरूड वसाहतीच्या देवस्थानांच्या व्यवस्थेंत गुंतविलें असे दिसून येते. या १०-१२ कोंकणस्थ कुटुंबीयांना सिद्धपुरुषानें शांडिल्यगोत्री दातार यांचे मार्फत आणविले शक्यतों त्यांची गोत्रासह यादी पुढीलप्रमाणें :—(१) वैशंपायन (निदत्युंन) (२) परांजपे (विष्णुवृद्ध) (३) जोशी (शांडिल्य) (४) दांडेकर (वाशिष्ट) (५) कोपरकर (वाशिष्ट) (६) भुतर (७) रहाळकर (भारद्वाज) (८) घारप (कपि) (९) वैद्य (१०) बाळ (बाभ्रव्य) (११) रिसबूड (शांडिल्य) (१२) हिरे (वत्स).

वाचकांच्या माहितीसाठीं एकमेकांशीं न पटणाऱ्या गोत्रांचें कोष्टक पुढीलप्रमाणें :—

| | | |
|---|---|---|
| कपि, गार्ग्य, भारद्वाज | काश्यप, शांडिल्य | कौंडिन्य, वासिष्ट |
| कौसिक बाभ्रव्य | जामदग्न्य, वत्स | विष्णुवृद्ध, निल्युंदन |

या कोष्टकांत दिलेल्या प्रत्येक गटांतील गोत्रांचें आपसांत पटत नाहीं, इतर गोत्रांशीं पटतें.

यापुढें मुरूडच्या वसाहतींत इ. स. १६६० चे सुमारास ६० हून अधिक ब्राह्मण कुटुंबें नांदत होती, असा उल्लेख श्री. वा. रा. गानू यांचे ग्रंथांत आहे. त्यांत पावगी, छत्रे, देवल, दाते, खाडिलकर, नेने, अभ्यंकर, रहाळकर, बापट कोल्हापूरकर इत्यादींचा उल्लेख प्रामुख्यानें आहे.

× × ×

## सहकार्य व स्वयंपूर्णता या तत्त्वांवर सिद्ध पुरुषानें गांवाची रचना केली

" मुरूड गांवचा व्यवहारहि सदरील तत्त्वांना धरून सुरू केला. दुर्गादेवी व इतर देवळांचे उत्सवांत सोनार, कुणबी, मराठे, न्हावी, तेली, परीट, साळी, चांभार, इत्यादि सर्व जमातींना, कांहींना कांहीं काम, मानाचे विडे व नैवेद्य देण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. मुरूडचा हा उत्सव सुरवातीपासूनच गाजत असला पाहिजे. सर्व ज्ञाती-जमातींच्या सहकार्यानें चैत्र शुद्ध प्रतिपदे-पासून ते नवमी दुपारपर्यंत मुरूडला मोठ्या यात्रेचें व मेळ्याचे स्वरूप येत असे. दक्षिणेकडील हेदवीनरवणपासून तो उत्तरेकडे दिवे आगर व पूर्वेकडे चिपळूण परशराम येथपर्यंत ८४ गांवांना दरवर्षी यात्रेचें निमंत्रण जात असे. शेंकडों वर्षें हा उत्सव चालू होता. " असें वर्णन दुर्गादेवी व इतर देवळें या मथळ्याखालीं श्री. वा. रा. गानू यांनीं आपल्या मुरूड संबंधींच्या ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या ग्रंथांत पान ४६ वर केलें आहे. याच ग्रंथात याच प्रकरणीं पान ४७ वर ग्रंथ लेखक म्हणतात " नवे विचार व संततीचें पाठबळ

यांच्या जोरावर देवीचें देऊळ पुनः नवीन करावयाचें असें काही मातब्बर लोकांनी ठरविले. शंकरभट दीक्षित, विश्वनाथ जोशी, आषाभट दातार, केशवभट कर्वे व नारो हरीबाळ असे मुरूडचे ब्राह्मणे आणि कर्ते लोक या कामाला लागले. प्रत्येकानें पांच पांच हजार रुपये या कामाला लावले."

पुढें याच ३७ पानाचे अखेरीस ग्रंथकार म्हणतात, "देवळाचें बांधकाम सतत ३ वर्षे चालले होतें. इ. स. १७६३ मध्ये मंदिर उभें राहिलें. आज आपण दुर्गादेवीचें मंदिर पाहतो तें हेंच. इतकें सुंदर मंदिर त्या पट्ट्यांत दुसरें आढळणार नाहीं."

या ग्रंथांत ऐतिहासिक व सामाजिक संशोधनाच्या शास्त्रीय दृष्टीनें ग्रंथ लेखक श्री. वा. रा. गानू यांनीं महत्त्वाचे विचार ठिकठिकाणीं मांडलें आहेत पण यांचा विस्तार करण्याचें या चरित्र लेखनांत प्रयोजन नाहीं.

## दातार घराण्याची दानत; चारित्र्य आणि अधिकार असूनहि निस्वार्थी औदार्य

याची प्रचीति दातार घराण्यासंबंधीच्या उल्लेखांत आणि तीन्हीहि बखरींच्या उताऱ्यांत जागोजाग दिसून येते. या संबंधीचे दोन उतारे 'सुरस कथा व दंतकथा' या प्रकरणांतील पान ५८ वर आहेत त्यांचा सारांश नमूद करण्यासारखा आहे. "या दातारांपैकीं एकाचा सदाशिव नाईक दातार असा उल्लेख मिळतो. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत दातारांचा मुरूड येथें चौसोपी वाडा होता. खैऱ्याच्या कोंडांतील व गिम्हवण्याच्या वाटेवरील दातार बाव याच दातारांनीं बांधली. दूधदुभत्याकरितां एक चांगली म्हैस त्यांनीं मुरूडला आणविली होती. सड्यावर चढून डोंगर-कपारी उतरत असतां, म्हैस अवचित घसरून पडली! या अपघातांतून म्हैस कांहीं वांचली नाहीं. सड्यावर जाण्यायेण्यांतला हा धोका या प्रसंगाइतका दातारांना कधीच जाणवला नव्हता! या प्रसंगाची पुनरावृत्ति होऊं द्यायची नाहीं, असें त्यांनीं ठरविलें. या निर्णयाचें फलित म्हणजे कर्द्यांच्या डोंगरावर जायची सुंदर पाखाडी होय.

## 'दातार बाव'

दातार बाव (विहीर) सुद्धां अशाच एका प्रसंगामुळें खणली गेली. "पुण्याहून कोणी एक सरदार दातारांकडे येत होता. सड्यावर वाळवंटासारखी स्थिति नाहीं. दापोली पासून मुरुड हें अंतरहि फार नाहीं. मग काय असेल तें असो; या

सरदाराचा घोडा पाण्यावाचून तडफडून मेला ! तो ज्या ठिकाणीं, मेला त्याठिकाणीं दातारांनीं त्या घोड्याच्या स्मरणार्थ व पांथस्थांना उपयोग व्हावा म्हणून, विहीर बांधली. ती 'दातारबाव' म्हणून आजहि प्रसिद्ध आहे."

## दुर्गादेवीविषयीं दंतकथा

"एकदां पेंढाऱ्यांचा (किंवा त्याहूनहि प्राचीन असावा असें कोणी मानतात) हल्ला झाला. तेव्हां देवी स्वतः रणांगणांत उतरली. माडाच्या झाडावर भराभर चढली (......) व माडाची पातीं काढून व त्यांचा तलवारीप्रमाणें उपयोग करून तिनें हल्लेखोरांना दक्षिणेकडे पिटाळून लावलें ! लढतां लढतां तिची मान दुखावली व वांकडी झाली, ती अजूनहि तशीच आहे ! लढतांना तिच्या नथींतील मोती पडले. ते तिनें मुरुडच्या दक्षिण सीमेवर असलेल्या 'मीमाच्या धोंडी' खालीं ठेविलें. पुढें देवीनें स्वप्नांत येऊन सांगितल्यावरून, गांवकऱ्यांनीं वाजत गाजत तें मोती परत आणले.

× × × ×

"देवीचें देऊळ बांधले, तेव्हां देवळांतील खांब नीट बसतना. मशीदीचा खांब बसवा' असा आदेश पुजाऱ्याचे स्वप्नांत येऊन देवीनें दिल्याप्रमाणें मशीदीचा खांब प्रथम बसविला त्यानंतर देवीच्या देवळांतील खांबांचें काम सुरळीत झालें. तेथील 'जुम्मा मशीदीचे खांब देवीच्या देवळांतील खांबाप्रमाणेंच आहेत."

× × × ×

मुरुडच्या दुर्गादेवीचे मंदिराविषयीचें कुतुहल पुष्कळांना असल्यामुळें वरील आख्यायिकेचा उतारा पुराव्याचा उल्लेख करून दिला आहे. देवीचे मुख्य मानकरी व पुजारी म्हणून दातारांचे नांव सर्वच ऐतिहासिक कागद पत्रांतून व बखरींतून आहे. हे बखरींतील अधोरेखित उल्लेखावरून वाचकांचे ध्यानीं येईल.

## दातार घराण्याचा विशेष

**दानत, चारित्र्य व औदार्य** यां सद्गुणांनी युक्त अशा या **दातार घराण्याचा** विशेष हा कीं, इ. स. सोळाव्या शतकाचे सुमारास या घराण्यांतील पूर्वजांपैकीं एका विद्वान् व विधवा तरुणीकडून (सिद्धपुरुषाच्या प्रेरणेनें) मुरुडची वसाहत आणि दुर्गादेवीसह सर्व मंदिरांची व्यवस्था करविण्यात आल्यापासून दातारांनी सतत परोपकाराचीं कृत्यें केल्याचेच दाखले असून स्वार्थी वृत्तीचें उदाहरण या कागदोपत्रीं कोठेंहि नाहीं !

मुरूडला प्रख्याती पावलेल्या या दातार घराण्यातील पुरुष गणपती पुळे येथें आलेल्या त्या काळांतील पटवर्धन घराण्यांतील कुरुंदवाडच्या संस्थानाधिपतींच्या आस्थेवाईक निमंत्रणावरून इ. स. सतराशेंचे सुमारास तिकडे 'एक विद्वान् वैदिक' म्हणून स्थाईक झाले आणि दुसरे नाशीक येथें येथील एका ऐतिहासिक देवीच्या मंदिराचे मुख्य व्यवस्थापक या नात्यानें नाशीक येथें स्थायिक झाले असें दिसतें. अलिकडे मिळालेल्या पुराव्यावरून असेंहि दिसतें कीं 'विद्वान् वैदिक दातार' यांना कोल्हापुरच्या अधिपतींनीं शिरोळ पेठ्यांतील चिपरी येथील जमीन इनाम दिली होती. या संबंधींचे कागदपत्र चरित्र नायकांचे मोठ्या पोलीस हुद्यावर असलेले द्वितीय चिरंजीव श्री. पांडुरंग मोरेश्वर दातार यांना पहावयास मिळाले होते, अशी त्यांची मुलाखत घेतल्यावरून समजलें.

सदरील सर्व तपशिलावरून दिसून येते कीं मुरूडच्या दुर्गादेवीचे विख्यात मानकरी व पुजारी दातार यांचे वंशज गेल्या शंभर दीडशें वर्षांत अनुक्रमें कुरुंददवाड व नाशीक येथें जाऊन स्थाईक झाले. या दातारांपैकीं कोणीहि मुरूडच्या इनामी इस्टेटीसाठीं पेशव्यांकडे किंवा कोल्हापूरच्या छत्रपतींकडे, वैशंपायन, जोशी, काणे प्रभृतींप्रमाणें तक्रारी केल्या नाहींत! अयाचित वृत्ति, त्याग व औदार्य हा या घराण्याचा अखंड विशेष गुण दिसून येतो. प्रस्तुत चरित्रनायकाचेहि चरित्रांत याच सद्गुणांचा प्रकर्ष वाचकांना आठवणीवरून आणि चरित्रांतील तपशीलावरून दिसून येईल.

## अवधूत सांप्रदायाची परंपरा

चरित्र नायक श्री. मोरेश्वर केशव दातार तथा श्रीअवधूत महाराज कुरुंदवाडकर, यांचे सद्गुरू श्री पंत महाराज बाळेकुंद्रीकर यांच्या 'अवधूत' परंपरेचा संदर्भ कीर्तन सांप्रदायाचे आद्यजनक श्रीनारद यांच्या नारदपुराणांत आहे, त्याचा जरूर तेवढा सारांशाने उल्लेख करूनच श्री अवधूत महाराजांच्या लौकिक व पारमार्थिक जीवनाचा वृत्तांत द्यावयाचा आहे.

श्री दत्तात्रय मोरेश्वर दातार उर्फ श्रीदत्तमहाराज यांनीं श्री अवधूत मार्गाच्या परंपरेचा तपशील, श्रीदत्तप्रबोध, यदु-अवधूत संवाद तथा तत्व विचारसार आणि श्रीगुरुचरित्र या प्राकृत ग्रंथाचा आधार घेऊन आमच्याकडे दिला. त्याचा सारांश पुढीलप्रमाणें :—

## अनादि कालापासून आलेला अवधूत सांप्रदाय

### पद

सांप्रदाय सद्गुरूचा ॥ बहु बहु परंपरेचा ॥ धृ० ॥
सिंहासनारूढ जरी जाहला । परी मान राखी या मातेचा ॥ १ ॥
पूर्ण बोधो परी कृतघ्न नोहे ॥ अंकीत सद्गुरूचा ॥ २ ॥
जीवनमुक्त होऊनी भजन ॥ सहजानंद प्रेमाचा ॥ ३ ॥

अवधूत सांप्रदाय हा अनादि कालाचा आहे. तुमच्या आमच्यासारख्या उपऱ्यांनीं निर्माण केलेला नाहीं. तो अवधूत सांप्रदाय अनादि कालापासून कसा आहे याचे विवेचन कृतयुगामध्ये जयदेव ब्रह्मचारी या नांवाच्या महारुद्राची उपासना करणाऱ्या ब्रह्मनिष्ठानें केलें आहे. या उपासनेच्या योगानें महारुद्र आदिनाथ शंकर प्रसन्न झाल्यावर जयदेव ब्रह्मचारी म्हणतात, "मला याचि देहीं याचि डोळा मुक्ति सोहळा भोगावा अशी इच्छा आहे, तरी तो मार्ग मला दाखवा." शंकर म्हणालें, "तो अधिकार आमचा नाहीं, जगाचें रहाटगाडगे चालविण्याकरितां आदिमायेनें आम्हाला निर्माण केलें. आम्ही उत्पति स्थिति लय यामध्ये गढलेले; तेव्हां तुझी जी मागणी आहे तीसाठी आदिपुरुषाची उपासना कर." याप्रमाणें आदिपुरुष नारायणाची उपासना जयराम करीत असताना दृष्टांत झाला "तुझी आयुष्य-समाप्तीची वेळ आली तरी तूं पुन्हा जन्म घेशील त्यावेळीं तुला मी पूर्ण करीन. तुझ्या वंशी चार पुत्र होतील. तूं गौड देशीं विंध्य नगरीस कन्होज ब्राह्मणवंशांत प्रगट होशील. तुझ्या व तुझ्या वंशास ४ पुत्र कुलोद्धारक होतील." असा दृष्टांत झाल्यावर कांहीं काळानें हा जयदेव ब्रह्मचारी पंचत्व पावला व आदिपुरुषाच्या दृष्टांताप्रमाणे विंध्य नगरींत कनोज ब्राह्मण म्हणून जन्माला आला. त्याचे नांव गोपीनाथ असें ठेविलें. तोच हा जयदेव ब्रह्मचारी. पुढे गोपीनाथ रूपानें स्वाश्रम धर्माने राहूं लागल्या-नंतर पूर्वजन्मीचें स्मरण असल्याकारणाने आदिपुरुष नारायणाचे उपासनेस त्यानें सुरवात केली. उपासना चालू असतांना त्यास ४ पुत्र झाले. त्यांची नांवे नारायण नरहरी, बाळ व नरसोबा अशा चार मुलांना पुढे सनक, सनंदन, सनद, कुमार अशी नांवे प्राप्त झाली. जगाचे रहाटगाडगे चालविणारे तीन देव यांना आपल्या कर्तृत्वाचा अभिमान होऊन आत्मशुद्धीकरितां तपश्चर्या करणाऱ्या ऋषी मुनींना त्रास होऊं लागला. आपणच अवतार घेतला पाहिजे व त्या अवताराचे पूर्व तयारीला लागले पाहिजे असा विचार आदि पुरुषानें करून ब्राह्मण

वेषधारी रूपाने प्रथम आदिनाथानें गोपीनाथास भेट देऊन त्याला पूर्ण ब्रह्मचारी केलें. दत्ताचा म्हणजे आदि पुरुषाचा पहिला अवतार. 'केव्हा प्रगट केव्हा गुप्त' असा अवतार आहे. पुढें गोपिनाथाची मुलें वेदशास्त्रसंपन्न होऊन शास्त्रांत पारंगत झाली व पिताजी गोपीनाथ यांस प्रसन्न केले. "आतां आपल्या सांगण्याप्रमाणे अध्ययन केलें आम्हाला आतां संसाराची इच्छा राहिली नाहीं तरी आतां ब्रह्मप्राप्तीकरिता आम्ही काय करावें?" म्हणून त्यांनी पित्याला प्रश्न केला. आपल्या पुत्रांची तयारी पाहून गोपीनाथ म्हणाले, "आतां यापुढें आत्मोद्धाराचा मार्ग म्हणजे सदगुरू उपासना. शिवाय दुसरा मार्ग नाहीं. तीन देवांची उपासना कांहीं उपयोगी पडणार नाहीं. आत्मप्राप्ती व्हावी, अशी इच्छा असल्यास ज्याच्या सत्तेने विश्व चालते, असा जो आदि पुरुष त्याची तुम्ही उपासना करा, असा सद्गुरू भेटल्याशिवाय तुमच्या इच्छा पूर्ण होणार नाहींत." अशी आज्ञा ऐकल्यावर ते चौघे पुत्र वडिलांना प्रणाम करून तपश्चर्येस गेले. तपश्चर्येचें सामर्थ्य जसजसें वाढत गेले तसतशीं ही चारी बालकें ब्रह्मस्वरुपांत विलीन होऊन देह जागच्या जागी स्थिर झाले. हे पाहून आदीनाथ ब्रह्मदेव आणि विष्णु या तीघांनीं आपल्या लोकास नेण्याकरितां आपल्या दूतांस पाठविलें.

या तीन्हीं देवांचे दूत या कुमारांच्या जवळ येऊन आपसांत भांडूं लागले! शिवदूत म्हणाले, हे शिवाचे भक्त आहेत आम्ही याना कैलासाला घेऊन जाणार! विष्णुदूत म्हणाले, "हे विष्णुभक्त आहेत आम्ही यांना विष्णु लोकाला घेऊन जाणार" ब्रह्मदेवाचे दूत म्हणाले, हे ब्रह्मदेवाचे भक्त आहेत यांना आम्ही ब्रह्म लोकाला घेऊन जाणार." असें भांडण, जुंपलें तेव्हां आदिपुरुषानें विचार केला "आतां आपण प्रगट व्हावें." मग ब्राह्मण यतीवेषधारी या रूपाने त्याठिकाणीं आदिपुरुष प्रगट झाले व तीन्ही देवदूतांना ते म्हणाले "यांच्यावर कोणाचाही हक्क नाहीं. जगाचे रहाटगाडगें चालविणारा जो आदिपुरुष तो व हे माझे भक्त आहेत त्यावर कोणाचाही हक्क नाही याउपर यांना घेऊन जाण्याचा प्रयत्न कराल तर इथेच तुमचा निकाल लागेल!" एवढे ऐकल्याबरोबर तीन्हीही देवांचे दूत परत गेले व त्यांनीं ही हकीगत तीन्ही देवांना सांगितली ती ऐकून तीन्ही देव विचार करू लागले "तीन्ही लोकाची सत्ता आमच्याकडे असतांना मध्ये अडथळा करणारे असे हे यती कोण? यांचा समाचार घेतलाच पाहिजे." इकडे यती वेषधारी आदि पुरुषानें या चारी बालकांचे स्थिर झालेले देह पुन्हा जागृत करून

त्यांच्यावर कृपादृष्टीचा वर्षाव करून त्यांना ब्रह्मज्ञानाचे अधिकारी केले व सांगितलें, "बाळांनो, तुमचे चौघांचे देह विलीन झाले होते ते पुन्हा जागृत करून तुमच्यावर पूर्ण कृपा केली आहे व आजपासून तुमची पूर्वाश्रमींची नांवें बदलून तुमची नवीन नांवें ठेवितो. १ सनक, २ सनंदन, ३ सनद व ४ कुमार अशी तुमची नांवें विश्वांत गाजतील. तुमच्या वडिलांना जो ब्राह्मण-वेषधारी भक्ति–तपश्चर्या पाहून भेटला, तोच मी आदिपुरुष वेळोवेळीं भक्तोद्धारा-करितां प्रगट होत असतो, तरी आतां तुम्ही माझे आज्ञेनें ब्रह्मलोक, विष्णुलोक व शिवलोक या ठिकाणीं जाऊन ब्रह्मचर्चा करावी." असें सांगून चारी कुमारांना स्वयंपूर्ण ज्ञानी केलें आणि "जरूर वाटल्यास मी देवलोकास प्रगट होईन" असे सांगून आशीर्वाद देऊन आदिपुरुष अन्तर्धान पावले. इकडे चारी कुमार देवलोकीं निघाले व पहिल्या प्रथम ब्रह्मलोकीं येऊन ब्रह्मदेवाचे चरणीं वंदन केले व बोलले, "आम्ही मृत्युलोकाहून आलों. ब्रह्मांड बीजाची माहिती आम्हाला पाहिजे आहे. आम्ही सर्व शास्त्रें-पुराणें, वेद पाहिलेत पण ब्रह्मांड बीजाचा उगम कुठेंच सांपडत नाहीं! म्हणून आपल्याकडून कांहीं माहिती मिळेल अशा इच्छेनें आम्ही चौघे कुमार आपणाकडे आलो आहोत, तरी आम्हाला ब्रह्मांडबीजाची उत्पत्ति सांगा" तेव्हां ब्रम्हदेव म्हणाले, "हा महान् विषय आहे, तुम्हास कळणार नाहीं. तुम्ही लहान बालकें आहात तेव्हां तुम्हाला हे कसें कळणार?" हें उत्तर ऐकल्याबरोबर चौघे कुमार बोललेः–"आम्ही विष्णु लोकाला जातो व श्री विष्णूंना विचारतों" मग ते विष्णु लोकाला आले व श्रीविष्णूंनाहि तोच प्रश्न केला. श्रीविष्णूकडूनहि समाधान-कारक उत्तर मिळाले नाहीं. तेव्हां श्रीविष्णूना ते म्हणाले, "आम्ही शिव लोकाला जातो." नंतर ते चौघे 'शिव लोकाला' आले व शिव देवांनाहि तोच प्रश्न केला ते ऐकून शिवदेवही विचारमग्न झाले व यांना उत्तर काय द्यावे हे सुचेना! शेवटी तीन्ही देव एकत्र येऊन विचार करू लागले की "बालकें तर अगदीं लहान आणि ब्रह्मांडबीजाची उत्पत्ती विचारतात तेव्हां यांना काय उत्तर द्यावें? हे चौघे कुमार मृत्युलोकाहून आलेले आपल्या सर्व देवदेवतांना प्रश्न करून विचाराच्या गोंधळांत यानी टाकले आहे! तेव्हां सगळे इंद्रादिक देवगण गंधर्व अप्सरा त्या ठिकाणीं गोळा झाले व देव लोकांची मोठी सभाहि भरली! त्या सभेत या चारी कुमारांनी चर्चेला सुरवात केली व प्रश्नांचा भडिमार केला! येवढे ब्रह्मज्ञानी म्हणविणारे शंकरहि स्तब्ध बसले! तेव्हा आदि-पुरुषाने विचार केला की आता आपण प्रगट व्हावे कारण हे जगाचे हे जगाचे रहाट गाडगे चालविणारे ३ देव! यांची अब्रू जाऊं नये मान रहावा.

म्हणून त्याठिकाणीं 'हसपाल' या नावानें आदिपुरुष प्रगट झाले. ब्रह्मांड बीजाची सर्व माहीती सांगून त्यांनीं सर्वांचे समाधान केलें. सर्व देवांचे समाधान झाल्यावर "जेथून पिंड ब्रह्मांड निर्माण झाले असा जो आदि लोक तेथें आमुची वस्ती" असे सांगून आदिपुरुष निघून गेले. तीन अवतार कृतयुगामध्यें कारण कार्यानें प्रगट एरव्ही गुप्त असे झाले. त्यानंतर त्रेतायुगी पुन्हा दत्तात्रय या नांवानें प्रत्यक्ष प्रगट रूपानें अवतार घेऊन द्वापारयुगापर्यंत प्रगट राहिले—असा त्रेता-युगांतला दत्ताचा म्हणजे आदिपुरुषाचा चवथा अवतार, हा अवतार द्वापार युगाचे अखेरपर्यंत प्रगट होता.

त्रेता युगी जो ह्याचा प्रगट अवतार झाला त्याची **कारणमीमांसा** ब्रह्म-देवाचे ७ मानस पुत्र (नारदासह) त्यांत अत्री ऋषी सह्याद्रि पर्वती, ज्याला ब्रह्म-गीरी म्हणतात, तेथे आनंद सरोवराचे ठिकाणी पर्णकुटी तयार करून तपश्चर्येस राहिले व बाकीचे निरनिराळ्या ठिकाणी पर्णकुटी उभारून राहिले. ७ वे नारद हे तिन्ही लोकी संचार करावा, पुन्हा ब्रह्मलोकी वस्तीस यावे, असा दैनंदिन कार्यक्रम सगळ्यांचा चालू झाला.

## तपस्वी ऋषींचा छळ

परंतु पुन्हा ऋषीमुनी, तपस्वी तापसी, ब्रह्मचारी इत्यादींचा छळ सुरूं झाला ! कित्येक ऋषीमुनी तापसी या छळास कंटाळले. मग सर्व ऋषी मुनीचा मुगुटमणी जो अत्रीऋषी त्यांच्या सान्निध्यांत सह्याद्रीपर्वतीं ब्रह्मगिरीवर येऊन राहिले.

कृत युगांत जेव्हां पुन्हा साधु सज्जनादींना उपद्रव होऊं लागला तेव्हां आदिपुरूषाने विचार केला "आपण प्रगट रूपाने अवतार घेतल्याशिवाय भागणार नाहीं तेव्हां अत्रीला गृहस्थाश्रमाचा अंगिकार करावयास सांगावें; पण त्याला योग्य वधू पाहिजे व आपणालाहि मातृसुखाचा आनंद मिळण्याचाहि योग पाहिजे." मग ते कपील मुनीची माता देवहुती हीची मुलगी अनसूया ही अत्रीला योग्य वधू आहे. तेव्हा आदिमायेला आज्ञा केली तूं कपील महामुनीची माता देवहुती हिच्या अंतरगृहामध्ये मध्यरात्रीं प्रगट होऊन तिला सांग "तुझा मुलगा हा तुला पंच ब्रह्माचे ज्ञान सांगून पंच कोष्टाचा निवाडा सांगत असतांना तुझ्या गर्भामध्ये तुझी मुलगी अनसुया ही गर्भांत होती. तेव्हा तिला गर्भज्ञान प्राप्त झालें, तरी तिला योग्य पती ब्रह्मदेवाचा मानसपुत्रच योग्य आहे. तरी तुझी मुलगी अनसूया ही अत्रीलाच दे. कारण अत्री अनसूयाच्या आश्रमांत प्रत्यक्ष आदि पुरुष प्रगट होणार आहेत त्यांचा संभाळ करण्याकरिता अनसुया व अत्रीच योग्य आहेत. तरी तूं त्या तयारीला लाग.

एवढे ठरवून आदिपुरुषानें मायेस देवहुतीकडे पाठविले. त्याप्रमाणें आदिपुरुषानें आदिमायेस देवहुतीकडे पाठविले त्याप्रमाणे आदिमायेने देवहुतीच्या अंतरगृहात, लख्ख प्रकाशाचे वलय निर्माण केलें ! त्या प्रकाशामध्ये आदिमाया प्रकट झाली ! व देवहुतीस तिनें हालवून जागे केलें व आदिपुरुषाने सांगितलेला वृत्तांत सांगून "तुझी मुलगी अनसूया हीस अत्रीऋषीसच दे. अनसुयेस अत्री हाच पतियोग्य आहे असे सांगून आदिमाया अंतर्धान पावली.

देवहुतीच्या अंतरगृहांतून बाहेर पडणार तों देवहुतीनें विचारले, "आपण कोण आहात ?" आदिमाया म्हणाली, "आदिपुरुषाची धर्मपत्नी आदिमाया; मी जाते. तूं सांगितलेल्या तयारीला लाग." त्याप्रमाणें देवहुती त्या तयारीस लागली. इकडे आदिपुरुषाने रात्री बाराला अत्रीऋषीच्या आश्रमांत प्रवेश केला. प्रकाशाच्या वलयामध्यें आदिपुरुषाची स्वारी उभी ठाकली ! "अत्री, अरे अत्री, सावध हो व मी काय म्हणतों तें ऐक. तूं आतां हा ब्रम्हचर्य आश्रम सोडून गृहस्थाश्रमांत प्रवेश कर. कारण मी तुझ्या वंशांत प्रगट होणार आहे. तुला योग्य अशी वधू देवहुतीची मुलगी अनसूया हीच आहे. तिचा तूं अंगीकार कर. आतां मी जातों." अत्रीनें आदिपुरुषाच्या चरणावर मस्तक ठेविले व विचारले, "आपण कोण ?" आदिपुरुष उत्तरले "मला आदिपुरुष नारायण म्हणतात. मीं तुझ्या आश्रमी प्रगट होणार आहे; तेव्हां माझा संभाळ करणारी योग्य माता पीता पाहिजेत. म्हणून तूं गृहस्थाश्रम धर्माचा स्वीकार कर." असे सांगून आदि पुरुषाची स्वारी गुप्त झाली. त्यानंतर अत्री अनसूयेचे लग्न होऊन गृहस्थाश्रमास सुरवात झाली. अत्रीऋषीचे तप-सामर्थ्य व अनसूयेचे पातिव्रत्य या दोहोंच्या प्रभावानें ब्रह्मगिरी दुमदुमून गेला ! कर्णोपकर्णी या सामर्थ्याच्या वार्ता चोहोंकडे पसरूं लागल्या ! असा बराच काळ गेल्यावर नारदाची स्वारी मृत्यूलोकी संचार करीत असतां सहज पर्वतांचा राजा जो सह्याद्रि त्या ब्रह्मगिरीकडे आले. या ब्रम्हगिरीवर कोण कोण लोक आहेत-ऋषीमुनीच्या भेटी घ्याव्या म्हणून ब्रम्हगिरीची शोभा पाहात ब्रम्हगिरीवर माध्यान्हकाळीं आले. रोज यावेळीं अथितीपूजन करावे व त्याना भोजन देऊन मग आपण जेवावें, असा अत्रिऋषींचा नित्यक्रम असे. त्याप्रमाणे अथितीची वाट पहात बसले आहेत तोंच नारदानीं आश्रमांत प्रवेश केला. अत्री-अनसूयेचा आश्रम म्हणजे आनंदाचे माहेरघर ! नारदाना पाहिल्याबरोबर उभयतांना आनंद झाला. आपल्या सारख्या अथितीचा आपल्या आशिर्वादाने लाभ झाला व पुढेंही असाच लाभ चालावा. असे म्हणुन अत्रिऋषींनी नारदांचें स्वागत केलें. ब्रह्मगिरीच्या पायथ्याशीच स्नान उरकले आहे. पण प्रवासाचा शीण स्नानानें घालवावा म्हणून स्नान करीतो असें नारद बोलले

२

लगेच अनसूयेने अभ्यंगस्नानाची तयारी केली. नंतर नारदाच्या चरणाची षोडषोपचारे पूजा करून दोघानी त्यांना भोजनाची विनंती केली. वाढतां वाढतां अनसूयेच्या पायांच्या बोटांत तीन सुवर्णमुद्रिका होत्या त्या लक्ष्मी, सावित्री व पार्वती यांच्या होत्या. त्या सुवर्णमुद्रिका पाहून आश्चर्य वाटलें! भोजन झालेवर अत्रिऋषी व नारद बोलत बसले. नारद म्हणाले, " या अथीति-सत्काराच्या आनंदांत आपलें नांवही मी विचारलें नाहीं; तेव्हां आपले नांव व वृत्तांत कळावें अशी इच्छा आहे. " अत्रि ऋषी म्हणाले, " ब्रह्मदेवांच्या सात मानसपुत्रांपैकीं मी अत्रि व माझी पत्नी अनसूया ही देवहुतीची मुलगी " हें सांगितल्याबरोबर नारद बोलले, " सगळा उलटा प्रकार झाला! मीही ब्रह्मदेवाचा मानसपुत्र अर्थात् तुम्ही माझे वडील बंधु व अनसूया ही माझी वडील भावजय. तुमचीच पूजा करून तुमचे चरणतीर्थ मीच घ्यावयाचे! तो सगळाच कारभार उलटा झाला! " असें म्हणून नारदांनीं अत्री-अनसूयेच्या चरणांवर मस्तक ठेवलें! अत्रींनी नारदाला प्रेमानें पोटाशीं धरून म्हटलें," आज एकमेकांना आपली ओळख पटली" नारद बोलले,"मी आजपर्यंत संचार करीत असतांना पुष्कळ आश्रम पाहिले पण या आश्रमासारखें 'आनंदाचे माहेरघर' कोठें पाहिलें नाहीं. आत बाहेर जिकडे तिकडे आनंदच वावरतोय! दुःखाला व निराशेला जागाच नाही. बरे आहे आतां मी येतो " असे म्हणून नारदाची स्वारी तेथून निघाली. ते ब्रम्हलोकाला आले, तेथे आल्यावर ब्रम्हदेवानी व सावित्रीनें विचारलें, '' नारदा तूं संचारार्थ गेला असतांना कांहीं नवल विशेष पाहिले असल्यास कथन कर. " हें एकून नारद म्हणाले, " मृत्युलोकी संचार करीत असतांना सह्याद्रि पर्वती ब्रम्हगिरीवर 'अनसूयेचा आश्रम' पाहिला. तो आश्रम म्हणजे आनंदाचे माहेरघरच आहे! अत्रीऋषीसारखा दुसरा तपस्वी या त्रिभुवनांत सापडणार नाहीं व अनसूयेसारखी पतिव्रताही त्रिभुवनांत नाहीं. " ब्रम्हदेव म्हणाले, " काय म्हणतोस, आमच्यापेक्षांहि यांचा अधिकार मोठा अशी ती आहेत तरी कोण? " नारद म्हणाले, त्यांचा तसा अधिकार असल्याशिवाय का अनसूयेनें तीन्ही देवींच्या सुवर्ण मुद्रिका करून पायांतील जोडव्यांत घातल्या आहेत. " सावित्री म्हणाली, " काय? आमच्या सुवर्णमुद्रिका अनसूयेच्या पायाच्या बोटांत! हा आमचा धडधडीत अपमान आहे! ठीक, असली कसली पतिव्रता आहे तें पाहून घेईन! " तेथून नारदांनीं विष्णु लोकाला येऊन लक्ष्मीदेवीला हीच हकीगत सांगून तिच्या मनांत मत्सर व राग उत्पन्न केला! शिव लोकाला येऊन पार्वतीवरहि तोच प्रयोग केला! तीन्हीहि देवतांचा राग अनावर झाला! या अपमानाचें उट्टें काढण्यासाठीं आतां काय करावें अशा मत्सरी विचार-चक्रांत तीघीहि सांपडल्या!

नंतर सावित्री, लक्ष्मी व पार्वती यांनी आपापल्या पतींना अनसूयेचें सत्वहरण करण्याकरितां वचनबद्ध केलें! त्याप्रमाणे ब्रह्मा, विष्णू, महेश अथितीचीं रूपें घेऊन ब्रह्मगिरीकडे निघाले! प्रवास करीत करीत ब्रह्मगिरी जवळ आले तो तेथली वन शोभा व मुनींचे आश्रम पाहून थक्क झाले! या तीन्ही देवांच्या मागोमाग नारदाची स्वारीहि निघाली! त्यावेळींच अत्रीऋषी तपाश्रम सोडून एकांत स्थळीं निघाले होते. अनसूया म्हणाली, "आपण निघाला खरे, परंतु आश्रमांत अतिथी अभ्यागत आले तर दोघांचीहि जबाबदारी मला एकटीलाच घ्यावी लागणार! तेव्हां माझें संरक्षण व्हावे, एवढ्याकरितां आपला आशिर्वाद असावा." मग पाण्याने भरलेल्या कमंडलूमध्ये चरणतीर्थ अधिष्ठानाशी ठेवून म्हणाले, "जरूर त्यावेळीं त्याचा उपयोग कर." नंतर अत्रिऋषी तपाला निघून गेले. इकडे माध्यान्ह काळाचे वेळीं अनसूयेनें नित्यनेमाप्रमाणें अतीथी पूजनाची वाट पाहिली. इतक्यांत तीन्ही देव अतिथींच्या रूपाने आश्रमासमोर येऊन उभे राहिले! त्यांना पाहून अनसूया पुढे आली व तीघांच्या चरणांस वंदन करून आश्रमात यावे अशी तिनें विनंती केली. त्याप्रमाणे तिन्ही देव आश्रमांत येऊन बसले.

अनसूयेस तिन्ही देवांनीं विचारले, "अत्रीऋषी कोठे आहेत?" तेव्हां अनसूया म्हणते, "ते तपानुष्ठानास गेले आहेत." तेव्हां अतिथी म्हणाले, "आम्ही फार लांबून आलों आहोंत, भुकेनें व्याकूळ झालों आहोंत, तरी आम्हास त्वरित भोजनास वाढावे." अनसूयेनें विनंति केली "पाणी तापलेलें आहे. आपली स्नानाची व्यवस्था करितें. स्नान उरकून आपलें आन्हिक उरकावे; भोजन तयार आहे." तिन्ही देव म्हणाले, "आमचे स्नानादि आन्हिक सर्व ब्रम्हगिरीचे पायथ्याशींच उरकलें आहें तेव्हां आम्हास भोजनास वाढ." हे ऐकल्याबरोबर तिन्ही अथितींच्या चरणाची षोडषोपचारे पूजा अनसूयेनें केली व नंतर पाट रांगोळी घालून पानें मांडली. तेव्हां हे अतीथी म्हणाले, 'भोजन घालतेस ना?' अनसूया म्हणाली, "आपण काय पाहिजे ते सांगा. तयार करून वाढते." तिन्ही अतिथी म्हणाले, "इच्छा अशी आहे कीं तूं आम्हाला नग्न होऊन वाढावे." अनसूया मनांत विचार करूं लागली. कीं हे जगाचे राहाटगाडगे चालविणारे तीन देव अतिथींच्या रूपाने आले आहेत. आपला आश्रम पावन झाला. मग सौ. अनसूया नम्रपणें म्हणाली, "आपली इच्छा पूर्ण होईल. आपण आसनावर बसावे." त्याप्रमाणें तिन्ही देव आसनावर बसले मग अनसूया आंत गेली आणि तिनें अधिष्ठानाला वंदन करून पतिस्मरण केले आणि कमंडलुतील पतिचरणाचें तीर्थ हातांत घेऊन बाहेर

आली व तिन्ही अतिथि देवाच्या आंगावर तें चरणतीर्थ शिंपडून आंत गेली! वस्त्र सोडून वाढण्याकरितां अनसूया बाहेर आली, तों आसनावर अतिथी नसून तीन सुंदर बालकें दिसलीं !

त्या बालकांना पाहिल्याबरोबर अनसूयेच्या स्तनीं दुग्धाच्या धारा दाटल्या ! मग अनसूयेनें तीन्ही बालकांना स्तनपान करविले व आतां यांचा सोहळा केला पाहिजे असें ठरवून सर्व ऋषींच्या बायकांना बोलावून त्या बालकांना पाळण्यांत घालण्याचा सोहळा केला ! सुवासिनींच्या ओट्या भरल्या. हें सर्व नारदांनी पाहिले व तावडतोब ते ब्रह्म लोकाला आले ! मातोश्री सौ. सावित्रीला सर्व सांगितलें ! "आई, माझ्या बाबांना मी अंतरलों !" असें दुखःवेगानें म्हणाले ! सावित्रीनें विचारलें "नारदा तूं हें काय बडबडतोस ? झाले तरी काय तुला ?" नारद बोलले, "होऊ नये तें झालें ! तुम्ही तिघींनी तीन्ही देवांना अनसुयेचे सत्वहरण करण्याकरतां पाठविलेत खरें; पण तिनें आपल्या पातिव्रत्याचे सामर्थ्यानें तीन्ही देवांची बाळें केलीं ! आश्रमांत मातृसुखाचा आनंद घेत अनसूयेच्या आश्रमांत ते खेळताहेत ! "तुम्ही आपल्या पतींना मुकलात व मी माझ्या बाबांना मुकलों !" हें ऐकतांक्षणींच सावित्रीदेवी म्हणाल्या, "चला आपण लक्ष्मी पार्वतीकडे जाऊं." नारद व सावीत्री यांनी लक्ष्मी-पार्वतीला सर्व सांगितले ! तेव्हां त्या तिघींनीं अत्रीकडे जाण्याचे ठरविलें. मग नारद, तीघी देवी अत्रीच्या आश्रमाकडे निघाल्या. इकडे अनुष्ठान उरकून अत्री आश्रमांत परत आले त्यावेळेस अनसुया बाळांना पाळण्यांत घालून गात आहे असें दृश्य त्यांना आश्रमांत दिसलें. मग पाळण्याजवळ येऊन पाहून अत्रिऋषी म्हणाले, "अग, हे तर तीन देव ! प्रत्यक्ष ब्रम्हा–विष्णु–महेश. आपले खरोखरच भाग्य थोर ! तीन्ही लोकांचे स्वामी आपल्या आश्रमीं आले ! इकडे नारदासह लक्ष्मी, पार्वती व सावित्री आश्रमाच्या दाराशीं आल्या. तो अत्रीचे लक्ष तिकडे गेलें आणि अनसूयेस ते म्हणाले," अग समोर पाहा तीन्ही देवताही आल्या. ते पाहिल्याबरोबर अनसूया व अत्री दोघांनी आश्रमाच्या बाहेर तिघी देवतांच्या चरणास वंदन करून त्यांचें स्वागत केलें व त्यांची पूजा करून नंतर त्यांना पाळण्यापाशीं आणलें. तीं तीन्हीं बालकें पाहून अतिशय लाजून तिघींनी माना खालीं केल्या ! विचारमग्न स्थितींत उभ्या राहिल्या ! अनसूया, देवींना म्हणाली, "आपापला पती ओळखून घ्या व आपल्या ठिकाणाला आनंदानें जा." येवढें म्हटल्यावर तिघीही आपला पती कोणता याचें निरीक्षण करूं लागल्या ! पण उचलून घेण्याचें कोणालाही धाडस होईना ! असा बराच वेळ गेल्यानंतर अत्री अनसूयेस म्हणाले, "तूंच त्यांचे पती त्यांना परत दे." मग अनसूयेनें ओळखून एकेक बालक त्या त्या देवीच्या ओट्यांत घातले ! त्याबरोबर स्तनपाना-

करितां तीं बालकें झोंवूं लागली व तिन्ही देवता लज्जायमान होऊन एका बाजूला उभ्या राहिल्या ! तेव्हां अत्री म्हणाले, "अग ह्या बालकांना घेऊन त्या काय करणार ? तेव्हां त्यांच्या मूळच्या रूपांत त्यांना तिन्ही देव परत कर." तेव्हां अनसूयेने पतीचे चरणतीर्थ आणलें व त्यांच्यावर शिंपडलें तेव्हां ते पूर्ववत् ब्रम्हदेव, विष्णू व शंकर झाले ! इतकें होईतों मध्यरात्रीचा सुमार झाला ! परत जातांना तिन्हीं देवांनीं आपले पूर्णांश अत्रिमुनींना अर्पण केले. विष्णु देवांनीं पूर्ण सत्वांश ब्रम्ह-देवांनीं पूर्ण रजांश व शंकरांनीं पूर्ण तमांश यांचे अनसूयेच्या हातावर पाणी सोडलें. चहूकडे प्रकाशाचें वलय निर्माण झालें ! त्या प्रकाशाच्या वलयामध्ये त्रिमुखी बालक निर्माण झालें ! असा हा दत्तात्रयाचा अवतार अनसूयेच्या आश्रमामध्यें प्रगट झाला व पुन्हां अनसूयेने त्या बालकाला पाळण्यांत घालून सोहळा केला ! व देवदेवता आपल्या स्थानी निघून गेल्या ! हा दत्तात्रयाचा अयोनीसंभव अविनाश दत्तदिगंबर त्रेतायुगीं अत्री-अनसूयेच्या आश्रमांत प्रगट झाला. तो द्वापार-युगांत अखेरपर्यंत प्रगट होता. त्यांच्या प्रगट अवतारकार्यात सहस्त्रार्जुन आणि भार्गव यांना ब्रम्हपदीं बैसविले. राम वनवासाला निघाले असतांना सीता लक्ष्मणा-सह तीन रात्र मुक्काम अत्रीअनसूयेच्या आश्रमात केला. अनसूयेनें पतिव्रता धर्म सीतेस समजावून सांगितला. 'निःक्षत्रीय पृथ्वी करीन' म्हणून ज्याने प्रतिज्ञा केली, त्या परशुरामाचे पौरोहित्य अत्रीच्याकडे होते. परशुरामजन्माच्या वेळेस अत्री, अनुसूया व दत्त हजर होते. पुढें दत्त-भार्गव संवाद होऊन भार्गवाला पूर्ण केले व द्वापार युगाचें अखेर अखेर मातुश्रीच्या ऋणांतून मोकळे होण्याकरितां पंचब्रम्ह पंचकोषाचे मातोश्रीस ज्ञान सांगून श्रीदत्तपुत्र ऋणांतून मुक्त झाले व नंतर ते मातेस म्हणाले, "मातुश्री, मी तुमच्या ऋणातुन मुक्त झालो ! द्वापार युग संपत आले. आतां मला जगराहटीप्रमाणे अवतारकार्य संपविले पाहिजे. जरी मी अवतारकार्य संपविले तरी कलीयुगी माझे वास्तव्य पंढरीला राहील. तेथे मी गुप्तवास करीत जगाला पांडुरंग रुक्मीणी या रूपाने प्रगट दिसेन."

**ज्ञानेश्वर चरित्राचा याला आधार आहे.** कारण ज्ञानेश्वर महाराजांचे वडील विठ्ठलपंत दक्षिणयात्रेस निघाले. यांना पंढरपुरास पांडुरंग रुक्मीणीचें दर्शन झालें. याप्रसंगीं पांडुरंग म्हणाले," विठ्ठला, तूं माझे दर्शन घेतलेस हे माझे प्रगट रूप आहे, पण माझें गुप्तरूप काय आहे हें तुला जर पाहावयाचे असेल तर रात्रीं बारा वाजतां चंद्रभागेमध्यें उडी घे म्हणजे पाहावयास मिळेल." त्याप्रमाणे विठ्ठल

पंतानी रात्री बारा वाजतां चंद्रभागेमध्ये मध्यरात्री उडी घेतली. त्यावेळेस त्यांना पाताळांत नेऊन दत्तदर्शन दिलें व षडाक्षरी "ॐनमः शिवाय" मंत्र सांगितला. नंतर विठ्ठलपंत वर आले व पुढे त्यांना गोरक्षाची भेट झाली व दत्त अवताराची साक्ष पटली. तात्पर्य श्रीदत्तांचा वास पंढरीस आहे याची साक्ष श्रीदत्तानींच विठ्ठलपंताना पटविली. नंतर कलीयुगीं दत्त महाराजांचा पहिला अवतार 'श्रीपाद श्रीवल्लभ' पीठापुरी झाला. औदुंबर शिरोळ येथे साक्ष पटवून कुरुंदवाडास बारा वर्षे दत्त मंदिरांत ठकार स्वामीचे समाधीचे खोलींत राहून नरसोबाची वाडी हे अधिष्ठान पुढे आणीलें. कुरुंदवाडास सहज रोज स्नानसंध्या अनुष्ठानाकरिता नरसोबाचे वाडीस जात असत. तें आधिष्ठान श्रीपाद श्रीवल्लभांनी प्रगट केले हा दत्ताचा अवतार. कार्य संपविल्यानंतर कलीयुगीं पहिला अवतार. दुसरा अवतार नरसिंह सरस्वती-तर नरसिंह वाडीस एक ब्राम्हण स्त्रीच्या मुलास वेदाक्षरसुद्धा उच्चारता येत नव्हते. म्हणून सर्व गांवाने त्या बाईची निंदा केली. 'ब्राम्हणजातीला हा कलंक आहे' म्हणून सर्वांनीं बाईची व मुलाची टवाळी केली! तेव्हां त्या बाईनें आपल्या पुत्रास नदीत लोटून द्यावे व त्याचे मागोमाग आपणहि देहत्याग करावा म्हणून नरसोबाचे वाडीला कृष्णा पंचगंगा संगमावर ती ब्राम्हण-बाई व तिचा मुलगा प्राणार्पण करण्याकरितां उभी राहिली. त्यावेळेस श्रीगुरु श्रीपाद श्रीवल्लभ आपले अनुष्ठान आटोपून कुरुंदवाडास जाण्याकरितां संगमावर आले व त्यांनीं हें दृश्य पाहिलें. त्यावेळेस ते म्हणाले, "बाई, या मुलास नदींत कां ढकलीत आहांत?" बाई म्हणाल्या, "ज्याला वेदाक्षर उच्चारतां येत नाहीं तो जगून तरी काय उपयोग! माझ्या पोटीं असा पुत्र जन्मास आला मग मला तरी जगून काय करावयाचें?" तेव्हां श्रीपाद श्रीवल्लभ म्हणाले, "जरा थांबा. या मुलाला इकडे आणा. तुम्ही जीव देऊं नका!" त्याप्रमाणें त्या बाईनें श्रीपाद श्रीवल्लभांचे चरणावर मुलाला घातलें. श्रीपाद श्रीवल्लभांनीं आशीर्वाद दिला कीं, 'हा वेदामध्ये पारंगत होईल!' व मुलाच्या आईस सांगितलें, "आतां तुम्हाला काय मागणी मागावयाची ती मागा!" तेव्हां ती म्हणाली, "मला आपल्यासारखा मुलगा लाभावा." श्रीपाद श्रीवल्लभ हंसून म्हणाले, "ठीक आहे. पुढें तूं जेव्हां जन्म घेशील तेव्हां शनि प्रदोषाचे व्रत कर. तुझी इच्छा पूर्ण होईल. मी तुझ्या पोटीं अवतार घेईन." पुढें करंजपूर नगरामध्यें जो अवतार झाला तेच 'नरसिंह सरस्वती.' विस्तारभयास्तव सगळी हकीगत देत नाहीं. दत्त प्रबोध यदु अवधूत संवाद व गुरुचरित्र यांच्या आधारें ही माहिती दिहिली.

## श्री पंत बाळेकुंद्रीकर-नरसिंह सरस्वतीचा अवतार

आतां नरसिंह सरस्वतीचा अवतार पंत महाराज बाळेकुंद्रीकरच कसे याविषयीं माहिती नमूद करतो. पंतमहाराजांचे मूळ पुरुष गुराप्पा हे निजाम संस्थानांत 'राजा देऊळगांव' येथें कुळकर्णी वतनाचें काम पहात होते. तिकडे त्यांना 'पाटील पांडे' म्हणत. गुरप्पा नरसिंह सरस्वतीचें परमभक्त होते. कांहींही संकट आलें तर नरसिंह सरस्वतींना ते गाऱ्हाणे घालीत व दृष्टांत होईल त्याप्रमाणें पुढें वागत. असा त्यांचा नियम असे. पुढे कालांतरानें दिवंगत झाले. तेव्हां राजा देऊळगांवची परिस्थिती अत्यंत वाईट झाली. निजामी संस्थानांत सत्तेकरितां एकमेकांत तंटे सुरू झाले!

## स्त्रियांची अब्रू धोक्यांत आली!

बेदिली माजली व काळ फार कठीण आला! सगळा भार गुराप्पांचा मुलगा नरसिंह याचेवरच पडला! पण नरसिंहानें विचार केला "आतां अशा काळांत येथे राहणे कठीण! आतां नरसिंहसरस्वतींना' गाऱ्हाणे घालावें व ते सांगतील त्याप्रमाणें करावे." असा विचार करून नरसिंहानें आपल्या मातेला विचारलें, "अशा समयाला नरसिंह सरस्वतींना गाऱ्हाणे घालून ते आज्ञा देतील त्याप्रमाणें पुढें वागावेंसें वाटतें. तेव्हां मला गाणगापुरास जाण्यास परवानगी दे." मातुश्रींनीं खुषीनें परवानगी दिली. त्याप्रमाणें नरसिंह गाणगापुरास जाऊन अश्वत्थ वृक्षाखालीं एका पायावर उभा राहून गुरूचरित्राच्या सप्ताहास सुरवात केली. ७ वे दिवशीं रात्री १२ वाजता झंजावात सुटला विजा कडाकड चमकूं लागून वादळ निर्माण झाले. तेव्हां नरसिंह म्हणाले, "नरसिंह सरस्वती, माझ्या भक्तीला आपण विटलात कां? माझा कंटाळा आला कां? मग मला जिवंत तरी कां ठेविलेत?" असे म्हणताहेत तों वादळ शांत झालें! नरसिंह सरस्वतीदेवाची स्वारी तिकडेच येत आहे असें दिसलें. नरसिंहाला वाटले कोणीतरी भीमा-अमरजा-संगमांत प्राण वाचविण्याकरितां धडपड करीत आहे! 'सप्ताह पूर्ण होण्यास थोडा अवधी आहे. काय करावे?" 'त्या बुडणाऱ्याला वाचविण्याकरितां जावे कां?' असा विचार करीत आहेत तो अंगावर वस्त्र नाहीं अशा दिगंबर स्थितींत नरसिंह सरस्वतीची स्वारी अश्वस्थवृक्षा खाली प्रगट झाली! देव म्हणाले, बाळा नरसिंहा, तुझी भक्ती पाहून प्रसन्न झालों. तुझ्या तिसऱ्या पीढीस पेशवे दरबारी मानसन्मानाची जागा मिळेल व तुझ्या ७ व्या पीढींत मी प्रत्यक्ष अवतार घेईन." ही सातवी पिढी म्हणजेच प्रत्यक्ष

नरसिंह सरस्वतीचा अवतार पंत महाराज बाळेकुंद्रीकर ! ही सर्व हकीगत श्रीपंत चरित्रात आली आहे ती वाचून पहावी.

आता या मालिकेप्रमाणें नरसिंह सरस्वतींचे शिष्य सायंदेव हे कुलकर्णी होते त्या घराण्यांतून ही परंपरा पुढें चालत आली, पंतांचे गुरु बालमुकुंद उर्फ बाळाप्पा हे कुलकर्णीच होते. त्यांना लोक ' हुच्चबाळप्पा ' म्हणत ! बाळाप्पा यांचे राम चैतन्य उर्फ रामावधूत हे कुलकर्णीच होते व त्यांचे गुरुही कुलकर्णीच होते. ' सायंदेवापासून मध्यंतरी दोन पिढ्या गेल्या ' असा हा सायंदेवा पासून कुलकर्णी घराण्यांतून चालत आलेला सांप्रदाय पंताना मिळाला, असें पंतांनीं आपल्या पदात लिहिले आहे.

चित्‌शक्ती सांप्रदाय आमचा पंथ अवधूत। आलक्ष्य मुद्रा मार्ग अगोचर रहाटी अनंत ॥
उपास्य दैवत नरसिंह मुनी बालावधूत। सहजस्थितीने चिद्विलासी भजन नित्य होत ॥

असे हे पंत महाराजांचे मूळ पुरुष गुराप्पा राजा देउळगावास राहाणारे निझाम स्टेटमधून बाळेकुंद्रीस कसे आले याची थोडीशी माहिती नमूद करण्या: सारखी आहे. नरसिंहास तुझ्या सातव्या पिढींत मी प्रत्यक्ष अवतार घेईन हे सांगितल्यानंतर नरसिंहदेव म्हणाले, देऊळगाव सोड तें वेळगावपासून बाळेकुंद्रीहून आठ मैलावर आहे तेथे इनामदार थोरात म्हणून माझा अत्यंत नीस्सीम भक्त आहे त्याच्या आश्रमास तूं जा. तुला मी वचन दिले आहे की सातवे पिढीत मी अवता-घेईन त्याची व्यवस्था मलाच केली पाहिजे. थोरात इनामदारांना त्याबद्दल मी सूचना देत आहे." असें सांगून नरसिंह सरस्वती अदृश्य झाले. इकडे बाळेकुंद्रीस रात्री १२ वाजतां नरसिंहास हालवून जागे करून थोरात इनामदारास नरसिंहदेव म्हणाले, "राजा देऊळगांवचा पांडु कुलकर्णी वतनाचे काम पाहणारा गुराप्पा माझे चरणी लीन आहे. तरी त्याचा मुलगा नरसिंह याने गाणगापुरी येऊन उग्र तपाचरण केलें तेव्हां मी प्रसन्न होऊन सांगितलें, "तुझ्या तिसऱ्या पीढींत पेशवे दरबारी मान सन्मानाची जागा मिळेल व तुझ्या ७ व्यां पिढीत मी प्रत्यक्ष अवतार घेईन. तरी तो तुझ्या आश्रयास येईल तरी त्याची व्यवस्था लाव" या थोरात इनामदारांना जागृती दिली व त्याप्रमाणें हें घराणे बाळेकुंद्रींत आले. श्री. केशवराव दिवेकर यांनीं लिहिलेल्या पंत–चरित्रांत याचा विस्तृत तपशील आहे, सातव्या पिढीत अवतारलेले पंतमहाराज हा दत्ताचा तिसरा अवतार. पहिला श्रीपाद

श्रीवल्लभ, दुसरा नरसिंह सरस्वती, व तिसरा पंतमहाराज बाळेकुंद्रीकर–पंत महाराज बाळेकुंद्रीकराकडूनच हा अवधूत सांप्रदाय चरित्रनायक मोरेश्वर केशव दातार ऊर्फ अवधूतमहाराज यांना मिळाला. असा हा अवधूतसांप्रदाय परंपरेनें आला. याच सांप्रदायाचा झेंडा काशीपासून रामेश्वरापर्यंत अवधूत महाराजांनी फडकाविला व नरसिंह सरस्वतींचा अवतार म्हणजे दत्ताच्या तिसऱ्या अवताराचें माहात्म्य वाढविलें. पंत गोकुळाष्टमीचा उत्सव करीत असत. तेव्हां लोकांना वाटे हा आपलाच उत्सव करतात. तसें नाहीं. पंत गोकुळाष्टमीचा उत्सव करीत असत ते त्यांचें गुरू बालमुकुंद; त्यांचा जन्म गोकुळाष्टमीचा आहे म्हणून करीत असत व अवधूत महाराजांनी गोकुळाष्टमीचा उत्सव चालू केला तो पंतजन्म व बालमुकुंद जन्म गोकुळाष्टमीला म्हणूनच होय. कित्येकाचे म्हणणें असे होते कीं हा उत्सव बंद करावा, परंतु अवधूत महाराजांनी ज्या उद्देशानें हा उत्सव चालू केला तो बंद राहूं नये म्हणून आम्ही तो तसाच चालू ठेविला आहे. आता पुढें जी इच्छा आहे ती प्रगट करून लेख पुरा करीत आहे. श्रीपंतांना गुरुद्वादशीस गुरुवारींच उपदेश झाला व महाराजांनाहि गुरुद्वादशी गुरुवारीच उपदेश झाला ! म्हणून हा गुरुद्वादशीचा उत्सव भडगावास म्हणा किंवा मुंबईस म्हणा लहान प्रमाणांत का होईना सुरू करावा, अशी इच्छा आहे. परंतु ती इच्छा सद्‌गुरु पूर्ण करील तेव्हां खरें.

* * *

दातार घराण्याची पूर्वपीठिका आणि अवधूत सांप्रदायाची परंपरा याविषयींचा तपशील नमूद केल्यानंतर—

## चरित्र-नायकांच्या पूर्वजांविषयीं उपलब्ध झालेली माहिती

श्री. मोरेश्वर केशव दातार–तथा–श्री अवधूत महाराज यांच्या पूर्वजांविषयीं उपलब्ध झालेली माहिती यापुढें नमूद केली आहे :—वेंगुर्लें गांवच्या अलीकडे 'अडिवरे' गांवापासून अंदाजें ४ मैलांवर मूळ पुरुष 'दातार ब्राह्मणदेव' या नांवानें तेथील लोकांकडून ओळखला जातो. तेथें अजून जुन्या पद्धतीचा पडीक वाडा आहे. हें घराणें मुख्यतः शेतीवरच उपजीविका करी. त्यांची अंदाजें १०० बिघे भात–जमीन होती. जमिनदारी सरंजामी थाटानें राहणारें तें दातार-घराणें होतें. तेथील दातारांच्या शेवटच्या वंशजानें कांहीं कारणानें ती जमीन अवघ्या ५०० रुपयांस विकली! ती सध्यां आडिवरे येथील एका व्यापाऱ्याचे ताब्यांत आहे. त्या जमिनीनजीक एक दगडाचा पहार व औदुंबराचें झाड आहे. त्या झाडाखालींच एक दगडाचें अधिष्ठान आहे त्यालाच 'ब्राम्हणदेव' म्हणतात. हाच सिद्धपुरुषानें मान्यतेस आणलेला दातार घराण्याचा मूळ पुरुष असावा. ही जमीन घेणाऱ्याला त्रास होऊं लागला व त्याला दृष्टांत झाला. स्वप्नांत एका ब्राह्मणानें येऊन सांगितले, "मी येथे दातार ब्राह्मणदेव, दातारांचा मूळ पुरुष आहे. त्याची ब्राम्हणाकडून पूजा करण्याची व्यवस्था कर. म्हणजे तुला त्रास होणार नाहीं." त्याप्रमाणें 'काळे' या आडनांवाच्या ब्राम्हणाला दरमहा ५ रु. देऊन त्या व्यापाऱ्याने 'ब्राम्हणदेव दातारा'च्या नित्यपूजेची व्यवस्था केली.

### सिद्धपुरुषाचे सहकार्यानें मुरुड गांवीं

पुढें कालांतरानें दातार घराण्यास कांहीं कारणानें उतरती कळा लागल्यावर, आणि घराण्याचा विस्तारहि वाढल्यामुळें, कुटुंबपोषणाची पंचाईत पडूं लागली असावी. मग दातार घराण्यांतील एक पुरुष 'दाभोळ लाईन'वरील हरणई बंदरानजीक मुरुडगांवीं येऊन स्थायिक झाले असावें. सिद्धपुरुषाचे सहकार्यानें ते मुरुडगांवीं 'नवदुर्गा' या दैवताचे पुजारी म्हणूनच स्थायिक झाले. या नवदुर्गेच्या नित्यपूजा वगैरे व्यवस्थेकरतां नारळी, पोफळी, आंबे वगैरे बागाइतीचें उत्पन्न होते. हेच 'ब्राह्मणदेव दातार' घराण्याचे (दातार चरित्रनायकाचे नजीकचे) पूर्वज होत.

चरित्रनायक श्री. **मोरेश्वर केशव दातार**-तथा-श्री **अवधूत महाराज** हे या हरणई-मुरूडच्या दातारांचे निकट वंशज होत. तेथें या दातारांचे जुनें पडीक घर आहे आणि आंबा, पोफळी नारळीची झाडेंहि आहेत. पण तेथें सध्यां व्यवस्था नसल्यामुळें घर व बाग पडीक स्थितींत आहेत.

तीस वर्षांपूर्वी **श्री. दत्तात्रय मोरेश्वर दातार** मुरूड गांवीं गेलें होते. त्यावेळीं तेथील लोकांनी त्यांना 'ही तुमची बाग व घर' म्हणून सर्व पडीक स्थितींत असलेली दाखविली आणि 'तेथें तुम्ही घर बांधा' असेंहि सुचविलें! पण तेथें घर बांधण्याचा उपयोग होण्यासारखा नसल्यामुळें त्या लोकांच्या शिफारशीकडे त्यांनीं दुर्लक्षच केलें!

## कुरुंदवाडास संस्थानाधिपतींकडून निमंत्रण

या मुरूडच्या दातारांपैकींच एक दशग्रंथी ब्राम्हण गणपतीपुळें येथें गेले असतां त्यांच्या वैदिक विद्वत्तेवर खूष होऊन कुरुंदवाड संस्थानच्या अधिपतींनीं 'आपल्या पदरीं असा विद्वान्' असावा या हौसेनें त्यांना कुरुंदवाड संस्थानच्या कुरुंदवाड या मुख्य गांवीं आणले. हे कुरुंदवाडचे पटवर्धन अधिपति 'गणपतीपुळें' या दैवताचे पूर्वीपासून भक्त होते. सध्या विलीन झालेल्या कुरुंदवाडाच्या अधिपतीचे ते खापरपणजे होत. या दातारांना (कोल्हापूरच्या ताराबाई राणीसाहेब यांचे कारकीर्दीत) कांहीं जमिनी व घर देऊन कुरुंदवाडकरांनीं आपल्या पदरीं ठेवून घेतलें. कोकणांतून अशा पुष्कळ विद्वान् व सुसंस्कृत ब्राम्हणांना कुरुंदवाडास आणून तो गांव सुसंस्कृत व दर्जाच्या दृष्टीनें श्रेष्ठ करण्याचा त्या पटवर्धन घराण्याच्या पूर्वजांना हव्यास असल्यामुळे पुष्कळ वैदिक व नामांकित शास्त्री-ब्राम्हणांची घराणीं त्या काळांत कुरुंदवाड गांवीं स्थायिक झालीं!

कुरुंदवाडास जे अडिवरे येथील दातार घराण्याचे वंशज, (मुरूडला स्थायिक झाल्यानंतर) आले. ह्यांचें नांव **विनायक नारायण दातार** त्यांना राजवाड्यांतील गणपतीची पूजा वगैरे कामगिरी सांगून श्रीमंतानीं आपल्याकडे आश्रयास ठेवून घेतलें; आणि मुलांना गृहस्थाश्रमास लागणारीं नित्य नैमित्तिक कर्तव्यें शिकवावीं आणि कांहीं तरुणांना विद्वान वैदिक तयार करवावें म्हणून प्रोत्साहनहि दिलें. गरीब विद्यार्थ्यांना जवळ ठेवून घेऊन त्यांना पोसण्याचीहि थोडीफार व्यवस्था व्हावी म्हणून रहाण्यास घर व कांहीं शेत जमीनहि दिली. या कुरुंदवाड येथें स्थायिक झालेल्या दातार घराण्याचा वंशवृक्ष पुढीलप्रमाणें आहे.




* [ सदरील वंशावळ कुरुंदवाडचे दातार यांनीं शके १८४६ मध्यें, नाशिकचे कै. वामनशास्त्री दातार यांच्या मागणीवरून पाठविली. तीच २१–७–६४ रोजीं नाशिकचे वैद्य श्री. सखाराम वामन दातार यांनीं श्री. दत्तमहाराज तथा श्री. अण्णा यांनीं पत्रद्वारें विनंति केल्यावरून त्यांना पाठविली. ]

कुरुंदवाडास स्थायिक झाल्यानंतर दातार घराण्याची वंशवेल वाढली. पुढें या घराण्यांत वांटण्या झाल्या. तशा संस्थानकडील कामाच्याहि वांटण्या झाल्या. या वांटण्यांत विषमता झाली. चरित्रनायकांचे वडील ' श्री. अप्पाकाका ' यांच्या वांटणीला पडकें घर आणि चिपरी रानांतील पडीक जमिनीचें शेत आलें. दुसरे दोन भाऊ कृष्णंभट व गोविंदभट यांचेकडे चांगलीं घरें व सुपीक जमीनी गेल्या. केशवभट ऊर्फ अप्पाकाका सत्वशील वृत्तीचे असल्यामुळें त्यांनीं आपल्या वांटणीला आलें तें, भोळेपणानें तक्रार न करितां, समाधानानें पत्करलें. संस्थानाकडील दातार घराण्याच्या वांटणीचाहि प्रकार असाच झाला ! संस्थानच्या मोठ्या व धाकट्या पातींतील कमी दगदगीचीं पण भरीव उत्पन्नाचीं कामें श्री. कृष्णंभट व श्री. गोविंदभट यांचेकडे आणि जास्त श्रमाची पण कमी प्राप्तीचीं कामें मात्र श्री. अप्पाकाकांच्या वांटणीला आलीं !

वरील प्रकारच्या विषम वांटण्यामुळें कृष्णंभट व गोविंदभट यांच्या कुटुंबांची आर्थिक स्थिति दिवसेंदिवस सुधारून भरभराटली आणि श्री. अप्पाकाकांची गृहस्थिति मात्र उत्तरोत्तर खालावत गेली. त्यांतच त्यांच्या उदार वृत्तीमुळें कुटुंबाचा विस्तार वाढत जाऊन कुटुंबाच्या हलाखींत भर पडली !

## हृदयाची श्रीमंती

तरीहि अप्पा काकांनीं आपल्या हृदयाची श्रीमंती सोडली नाहीं. काथ्याच्या दोऱ्या वळून शिंकाळ्या कराव्या, पत्रावळीकरितां पानें जमवून पत्रावळी लावाव्या. जानवीजोड तयार करून ते विकावे आणि अक्षर सुरेख असल्यामुळें कांहीं मोल घेऊन पोथ्याहि लिहून द्याव्या, इतकें जास्त उद्योग करून आपल्या तुटपुंज्या प्राप्तींत भर घालण्याचे प्रयत्न श्री. अप्पाकाका समाधानानें करीत. सदा हंसतमुख असत. दुर्मुख होऊन त्यांनीं कपाळाला आंठ्या घातलेल्या कोणालाहि दिसत नसत !

त्यांतच ' एकादशी जवळ शिवरात्र ' या म्हणीप्रमाणें चरित्रनायकाचे मावस भाऊ हरबाण्णा व विष्णुअण्णा ( पंचनदीकर जोशी ) हे दोघेहि वारल्यामुळें कुटुंबाची व मुलांची जबाबदारीहि अप्पां काकांचेकडे आली व तीहि त्यांनीं तत्परतेनें उचलली !

चरित्रनायकाच्या आजीला, म्हणजे अप्पाकाकांचे आईला, वैद्यकीचे ज्ञान आणि अनुभव चांगल्यापैकीं होता. त्यांचा थोडासा हातभार अप्पाकाकांच्या

प्राप्तीला लागला; पण आजी औषधपाण्याची फी अगर मूल्य रोखीनें घेत नसल्यामुळें प्राप्तींत पडणारी भर अगदीं थोडीच असे. तरीहि खचून जाऊन दुःखी कष्टी न होता अप्पाकाका समाधानानें संसाराचा गाडा ओढीतच होते.

त्यांतच श्री. अप्पाकाकांची आते बहीण सौ. व्यंकूअक्का तिचे यजमान कोंडोपंत पर्वते आणि मुलगा वासू पर्वते या कुटुंबाचाहि भार थोड्याफार अंशानीं अप्पाकाकावरच पडला! या सर्व कारणांनीं कुटुंबाची दारिद्र्यावस्था वाढत गेल्यास नवल काय!

## चरित्रनायकाच्या जन्मकाळची कौटुंबिक स्थिति

अप्पाकाकाची कौटुंबिक स्थिति अत्यंत खालावली तरी **त्यांचें मनाचें औदार्य व श्रीमंती** याचें एकच उदाहरण नमूद करण्यासारखें आहे. चरित्र-नायकाचा जन्म झाला त्यावेळीं बाळंतपणाकरितां लागणारीं अगदीं साधीं औषधें आणण्यासाठीं सुद्धां जवळ पुरेसा पैसा नव्हता! त्यावेळीं अप्पाकाकांच्या आईनें मोठ्या प्रयत्नांनीं साठविलेले १२ आणे अप्पा काकांना देऊन बाळंतिणी करितां लागणारीं अत्यावश्यक औषधें आणण्यासाठीं बाजारांत पाठविलें. परंतु औषधें न आणतां अप्पाकाका दोन तीन टोपल्या भरून वांगी, कांकड्या, भोपळा वगैरे भाजी घेऊन आले! त्यावेळीं आई कपाळाला हात लावून म्हणाल्या, “अरे अप्पा, हें रे काय! ही तीन टोपल्या भाजी कशाला! आपल्याकडे ब्राम्हण-भोजन कां आहे! तुला बाळंतिणीसाठीं जरूरीची औषधें आणण्यासाठीं ना मी बाजारांत पाठिवलं!” हें ऐकून अप्पाकाका म्हणाले, “भाजीवाली म्हणाली, दोन दिस झालं, माझीं पोरं बाळं उपाशी हैती. करा, आज भवानी!” **मग मला तिची दया येऊन मी १२ आणे तिला देऊन तीन्ही भाजीच्या टोपल्या घेऊन आलों** बघ आई! गरीबांना पैशाची पुष्कळ मदत करण्याची आपल्याला संधीच मिळत नाहीं, म्हणून अशी मदत करावीशी वाटलं!” अप्पाकाकांच्या आई फिरून कपाळाला हात लावून म्हणाल्या, “छान केलंस माझ्या बाबा!” आईनीं विचार केला. या ‘**कर्णाच्या भोळ्या अवताराशीं**’ वाद करण्यांत अर्थ नाहीं! आईला वाईट वाटलेसें पाहून अप्पाकाका म्हणाले, “अग आई, इतकी भाजी नको असली, तर गल्लींत घरोघर वाटून टाकूं. आनंदानें खातील की, शेजारी पाजारी!” हें ऐकून आई सर्दच झाल्या! मग बाळंतिणीच्या औषधाकरितां आईनीं उसनवारी करून, ८-१२ आणे जमविले आणि कोणाकडून तरी तीं औषधें आणविली! या एकाच

उदाहरणावरून चरित्रनायकाच्या जन्माचे वेळीं त्यांच्या घरांतील दारिद्य आणि त्यांचे वडील अप्पाकाका यांची तसल्या दारिद्यांतहि टिकून राहणारी "हृदयाची श्रीमंती' याची वाचकांना कल्पना येईल !

चरित्रनायकाचा जन्म भाद्रपद संकष्टी ( शके १७९५ सन १८७३ ) सूर्योदयाचे सुमारास झाला. जन्म दारिद्र्यावस्थेंत झाला. तरी त्यांच्या जीवनांत सुरवातीपासून शेवटीं स्वानंद समाधी घेईपर्यंत राजयोग होता असें त्यांच्या जीवनचरित्रावरून दिसून येते. 'एका गरीब वैदिक ब्राम्हणाचा पुत्र' होऊन जन्माला आले खरे, परंतु ऊर्जितावस्थेपासून समाधि-काळापर्यंत त्यांच्या वाट्याला सहजावस्थेनेंच राजयोग कसा येत गेला, हा तपशीलहि पुढील चरित्रांत येईलच.

## चरित्रनायकाला बालपणापासूनच दत्तोपासनेचा छंद

चरित्रनायकांना लहानपणापासूनच श्रीदत्तभक्तीचा छंद होता. त्यांना घरची मंडळी 'मोरया' म्हणत आणि बरोबरचे सवंगडी व मित्र 'मोरबा' म्हणत. ( म्हणून बालपणच्या व तरुणपणाच्या हकीगतींचा तपशील नमूद करतांना त्यांचा 'मोरया' अगर 'मोरबा' या नांवानेंच उल्लेख करणें सोयीचें होईल. ) लहानपणचे 'मोरयाचें खेळ' देखील दत्तांच्या उपासनेचेच होते. वयाच्या पांचव्या वर्षांपासून आपल्या बरोबरीचीं लहान मुलें जमवून 'मोरया' दत्तांचा उत्सव करीत असे. चरित्रनायकाच्या वडिलांना म्हणजे अप्पाकाकांनाहि मोरयाची ही दत्तभक्ति मनापासून आवडे. श्री. अप्पाकाकांचे वडिलहि दत्तसांप्रदायी असल्याने श्री. अप्पाकाकांची श्री दत्तोपासना प्रत्यक्ष दृष्टांतानें दृढ झाली होती. म्हणूनच लहानपणीं वयाच्या पांचव्या वर्षांपासूनच 'मोरयानें' दत्तोपासनेचा छंद घेतलेला त्यांनाहि प्रिय होता. पांच वर्षांच्या मोरयानें श्रीदत्तोत्सव सुरूं केलेला पाहून अप्पाकाकांनींहि मुलाच्या हौसेसाठीं एक लहानशी पालखी घेऊन दिली ! बरोबरीच्या बालगोपालांना घेऊन मोरया श्रीदत्ताच्या तसबिरीची मिरवणूक त्या पालखीतूनच काढी आणि मग श्रीदत्तजयंतीच्या उत्सवास सुरवात होई. सात आठ दिवस स्थापन केलेल्या श्रीदत्ताच्या तसबिरीची पूजा-अर्चा चाले. त्यांत अप्पाकाका स्वतः भाग घेत. जन्म सोहाळा वगैरे यथासांग या घरांतील उत्सवांत होत असे. हीच दत्तभक्तीची गोडी उत्तरोत्तर 'मोरया' चे हृदयांत वाढत गेली. पारमार्थिक विचारांचे बीजारोपण याच वयांत होऊन तोच मोरयाच्या जीवनाचा पुढील आयुष्यांत स्थायी भाव कसा झाला, हे यापुढील जीवनावरून दिसून येईल.

## तरुणपणीहि पारमार्थिक छंदाची वाढ जोपासना

तरुणपणीहि मोरया व त्याचे संवगडी गणपती, मारुती आणि विशेषतः श्रीदत्त या देवतांचे उत्सव मोठ्या हौसेने करूं लागले. सुरवातीच्या संवगड्यांत पुढील मंडळी होती. पंडित विष्णु दिगंबर पलुस्कर, अप्पाजी धोंडदेव टाकवडे, दत्तोबा कवाडे, रामभाऊ लेले, रामभाऊ वज्रमुष्टी, अण्णाराव छत्रे, व बाळाराम कपडेकर सर्व देवतांचे उत्सव मोठ्या हौसेनें व थाटानें करण्यांत या तरुण मंडळींना आनंद वाटे. उत्सवाच्या शेवटच्या दिवशीं सोंगें घेऊन ललीतहि करीत. रामभाऊ लेले यांच्या घरच्या मागील अंगणांत श्रीदत्त-पादुका स्थापन करण्यात आल्या होत्या तेथें या तरुणांनीं श्रीदत्तजयंतीचा उत्सव साजरा करण्याचा क्रम सुरूं केला. हे सर्व संवगडी सुरपाटाचा खेळ खेळण्यातहि पटाईत होते.

पुढे या संवगड्यांतील कांहीजण व्यवसायानिमित्त इतर ठिकाणीं गेले आणि कुरुंदवाडांतच व्यवसाय असलेले मोरोबा, रामभाऊ लेले, छत्रे बंडोबा टाकवडे व कपडेकर येवढीच मंडळी गावांत राहिली. मोरोबा त्या काळांत इंग्रजी शिक्षण चालूं असतांच, पूजा, वैश्वदेव, त्रिसुपर्ण, पुरुषसूक्त, विष्णुसहस्रनाम महिम्न स्तोत्र, रुद्र, पवमान, अमरकोश वगैरे वैदिक व संस्कृतचें पाठांतर घरीं करीत, पण नोकरी करण्याचा आग्रह वडील व इतर वडील माणसांनीं चालविल्यामुळें ते या रहाणीला कंटाळून उदास झाले होते !

## वकीलीव्यवसाय करण्याची संधि

'मोरबा 'सह केशवभटांना ऊर्फ अप्पाकाकांना चार मुलगे, त्यांपैकीं वडील चिरंजीव गणपतराव अप्पाकाकांच्या वांटणीला आलेल्या चिपरीच्या मळींत पहाणी करण्यासाठीं जाऊन येऊन असत. वडील बंधु व सर्वांत धाकटा बंधु रामभाऊ प्लेगनें देवाघरीं नेले आणि मघलाभाऊ भालचंद्र धुळवडीदिवशीं पंचगंगेंत पोहावयास गेला असतां डोहांत बुडून देवाघरीं गेला ! तेव्हां वर उल्लेख केलेल्या काळांत मोरबांनाहि मधून मधून चिपरीच्या मळीकडे जावें लागे.

## श्रीदत्तपादुकांचा लाभ : श्रीगुरुदत्तभक्तीची परंपरा

चिपरीच्या मळीचा उल्लेख करतांना ओघानेंच अप्पाकाकांचा लाभ कसा झाला व त्यांच्या दातार कुटुंबांत पूजेसाठीं मानलेलीं दैवतें कोणती याचाहि उल्लेख येथें करण्यासारखा आहे. चिपरीकडील पडीक जमीन अप्पाकाकांचे वांटणीला

कशी आली याचा उल्लेख मागें येऊन गेलाच आहे. त्या पडीक जमिनींत स्वकष्टानें विहीर खोदण्याचा अप्पाकाकांनीं प्रयत्न केला पण पाणी लागलें नाहीं म्हणून दुसरी विहीर खणण्यास सुरवात केली. ती विहीर खणीत असतांना सुमारें ४० फुटांवर अंदाजें १॥ फूट खोल व १ फूट रुंद असें खबदाड निघालें. त्या खबदाडांत, मंगळुरी लाल कौलांच्या ४ इंच गोल आसनावर १। इंचाच्या वर नागाची फणा असलेल्या, श्री दत्तपादुकांचा लाभ झाला! तेव्हांपासून मोरबांच्या दातार घराण्यांत श्रीदत्तोपासना सुरू असलेली विशेष दृढ झाली. अप्पाकाकांचे स्वप्नांत 'मी येथे आहे मला काढ' असा श्री दत्तांचा दृष्टांत अगोदर झाला होता त्याप्रमाणेंच या श्रीदत्तपादुका लाभल्या.

मोरबांचें मातृघराणें, पितृघराणें व श्वशुरघराणें या तीन्ही घराण्यांतून ईश प्रीतिची, परमार्थाची व श्रीदत्तभक्तीची जोपासना झाली आणि या सर्वांचा संघटित लाभ मोरबांना मिळाला. तो विशेष ध्यानांत घेण्यासारखा आहे!

मोरबांच्या आजी बयाअक्का या वैद्यकी करीत असून श्रीदत्तभक्त होत्या, पिताजी अप्पाकाका दत्तभक्त होते याचा उल्लेख वर आलाच आहे आणि श्वशुर बळवंतराव दिवेकर यांची विशेष माहिती कुरुंदवाड नजीक गणेशवाडींतील एका माहितगाराकडून पुढीलप्रमाणें मिळाली आहे:—मोरबांच्या श्वशुर घराण्याचे मूळ पुरुष श्रीयुत विठ्ठलपंत दिवेकर हे कोकणांतून येऊन कुरुंदवाडास संस्थानाधिपतीचे आश्रित म्हणून स्थाईक झाले. ते कागवाडकर संस्थानिक यांचेकडेहि गवई होते, त्याबद्दल त्यांना दरसाल ५०० रु. ची तैनात होती. श्री. विठ्ठलपंत दिवेकरांच्या ३ मुलांपैकीं सर्वांत वडील श्री. बळवंतराव दिवेकर. त्यांचे दोन भाऊ लहानपणींच देवाघरीं गेले. कागवाड संस्थान खालसा झाल्यामुळें १४ एकर जमीन कुरुंदवाडाधिपति पटवर्धन यांचेकडून त्यांना मिळाली. अर्थात् त्यांचें उपजीविकेचें साधन तेंच होते. बळवंतराव दत्तोपासकच होते.

गणेशवाडी पासून ७ मैलावरील श्री नरसोबावाडीचे श्रीदत्ताचे दर्शनास दर-पौर्णिमेला जाण्याचा त्यांचा नियम होता. तेथें जाऊन श्री. बळवंतराव गोरगरिबांना दानधर्म करीत. त्यांना याज्ञिक चांगल्यापैकीं अवगत होतें. वृध्दापकाळांत त्यांनीं आपला वेळ श्रीदत्ताची आराधना व भजन-पूजन यांतच घालविला.

## मोरबांचा विवाह

श्री. बळवंतराव दिवेकरांना एकूण ८ मुली. त्यापैकीं ५ वी मुलगी सौ. कां. **अंबूताई कुरुंदवाडचे दातार घराण्यांत श्री. मोरबा तथा अवधूत महाराज यांना दिली.** या विवाहाचा उल्लेख सौ. कां. अंबूताईंचे एकुलते एक बंधु श्री. हरीभाऊ दिवेकर यांनीं पुढीलप्रमाणें केला आहे.

" मोरोपंत दातार यांचे वडील केशव भट गणेशवाडीस येऊन ते आणि मुलीचे (सौ. का. अंबूताईंचे) मामा, गणेशवाडीचे शिवरामभट केळकर अशा उभयतांनीं श्री. मोरोपंत दातार यांच्याशीं विवाह ठरविला. सौ. कां. अंबूताई त्यावेळीं दहा वर्षें वयाची होती आणि मोरोपंत अंदाजें वीस वर्षें वयाचे होते. "

मोरबांच्या आजी श्री. बया अक्का कुरुंदवाडांतील देवघर घराण्यांतील होत्या. यापूर्वींहि देवघर घराण्याशीं दातार घराण्याचा संबंध आल्याचा उल्लेख अवधूत महाराजांचे जावई श्री. द. कृ. देवघर यांच्या आठवणींत नमूद आहे. तो असा :—

"श्री. अप्पा भट दातार यांची आत्या ही आमचे वडील कृष्णाजी गणेश यांची पणजी" श्री. कृष्णाजी गणेश देवघर यांच्या मुलाला, मुलीच्या विवाहासाठीं पहाण्यास, श्री. अप्पाकाका देवघरांचे घरी आपली बहिण सौ. आऊताई यांचेसह गेले. त्यावेळीं, श्री. कृष्णाजीपंत देवघर म्हणाले, " आमचे पणजी पासून मुलाची पांचवी पिढी व त्याच पणजीच्या माहेरची चौथ्या पिढींतील आपली मुलगी आहे. तेव्हां लग्न जमणेस हरकत नाहीं " याप्रमाणें लग्न नक्की ठरून श्री. दत्तात्रय कृष्ण देवघर हे अवधूत महाराजांचे जावई झाले.

आतां **पितृगृही** आजोबा व पिता यांच्यापासून गुरुभक्ती आणि परमार्थ मोरबा, तथा अवधूत महाराज, यांना कसा लाभला या विषयींचा उल्लेख श्री. वामन नरहरी कामत यांनीं लिहिलेल्या आणि दत्तात्रय वामन पंत बाळेकुंद्री या पंतघराण्याच्या प्रतिनिधीमार्फत प्रसिद्ध झालेल्या (२४-१०-१९५३ च्या प्रतीत) (पान ५४०-४१ ओव्या १३ ते १८] पुढीलप्रमाणें आहे :—

आतां कुरुंदवाडासी। नारायण दातार नामेंसी। असती वैदिक परियेसी। कोकणस्थ शांडिल्य गोत्री॥ १३॥ केशव नामें तयांचा सुत। असे सुशील नीतिमंत। सिद्ध पुरुष सांगलींत। चिंतामणराव म्हणून असती॥ १४॥ तयांचा अनुग्रह पाही। केशवरावें घेतला त्या ठायीं। भक्तिभावें निजगृहीं। पूजन होतसे॥ १५॥ केशव सुनीतिमंत। गुरुभजनीं सदा रत। अतिथि अभ्यागत। नित्य सदनीं होतसे॥ १६॥ तयाचे पोटीं मोरेश्वर। नामें सुत झाला साचार।। तोही सदाचारी पवित्र। पित्यासम सुशील॥१७॥

अशा 'गुरुभजनीं सदा रत' असलेल्या पिताजींनीं (श्री. अण्णाकाकांनीं) आपल्या 'नीतिमंत' पुत्राला गुरुमार्गाचा उपदेश केल्याचा उल्लेख ५४१ पानावरील २० व २१ ओव्यांत पुढीलप्रमाणें आहे :—

नाना साधन संभार। जप-तप-क्रिया अपार। शरीर दंडिलें नाना प्रकार। तरी श्रीगुरुविणें व्यर्थचि ॥ २० ॥ तरी तूं नाना उपायेंसी। शरण जाई सद्गुरूंशीं। गुरूंचे कृपेनें तरसी। सहज तूं संसारीं ॥ २१ ॥

पिताजींच्या या उपदेशाप्रमाणें मोरबा यांनीं बेळगांवीं पंत बाळेकुंद्रीकर यांचा अनुग्रह कसा घेतला इत्यादि तपशील या चरित्र-कथनांत यथाक्रम येईलच.

## दातार घराण्यांतील दैवतें

श्रीगुरुभक्ति आणि श्रीदत्तभक्ति 'मोरबा दातार' यांच्या घराण्यांत परंपरेनें कशी आली आणि दृढ झाली, याचा विस्तारानें तपशील नमूद केल्यानंतर या घराण्यांत आणखी कोणतीं दैवतें कशीं व कां मानली गेली, याचाहि उल्लेख संक्षेपानें करणें क्रमप्राप्त आहे.

दातार घराणें हें पटवर्धनांचें आश्रित व पटवर्धन घराण्यांत श्री गणपती उपासनेस प्राधान्य; म्हणून दातार घराण्यांतहि गणपती-उपासना आली. अजूनहि दातारांच्या घरांत मांदाराखालीं सांपडलेली श्री गणपतीची 'स्वयंभू मूर्ति' आहे. संकष्टीचें व्रतहि या घराण्यांत चालू होतें. चरित्रनायकाचा जन्म भाद्रपद संकष्टी दिवशीं सूर्योदयास झाला म्हणूनच यांचें नांव 'मोरया' ठेविलें असणें स्वाभाविकच आहे!

या दातार घराण्याची कुलस्वामिनी हरणई-मुरूडची 'नवदुर्गादेवी' मूळ पुरुष : 'ब्राह्मणदेव' ग्रामस्थ देवता : 'सातेरीदेवी'. त्याचप्रमाणें अण्णाकाकांना दृष्टांत झाल्यामुळें, कुरुंदवाडच्या घराचे पुढील दरवाजाजवळ खिडकींत स्थापन केलेला 'भरमदेव'. या सर्व देवांची उपासना या दातार घराण्यांत आहे. कुरुन्दवाडहून हें घराणें भडगांवीं येऊन स्थायिक झालें तरी या सर्व दैवतांना देवाच्या दिवाळीस आठवणीनें नैवेद्य घातले जातात.

## मोरबांचें राजयोगी शिक्षण

कुरुंदवाडचे श्रीमंत थोरले बापूसाहेब यांनीं आपले चिरंजीव श्रीमंत भाऊसाहेब यांचे सहाध्यायी म्हणून मोरबांना वाड्यांतच ठेवून घेतलें. उपाध्याचा चुणचुणीत, तेजस्वी व हुशार मुलगा म्हणून श्री. भाऊसाहेबांच्या व्रतबंधाबरोबरच

मोरबांचाहि व्रतबंध सरकारी वाड्यांतच थाटानें करण्यांत आला. मोरबा घरीं भिक्षुकीला आवश्यक असें वेदाचें व संस्कृतचें अध्ययन करीत असतां श्रीमंत भाऊसाहेब यांचेबरोबर इंग्रजी शालेय शिक्षणहि घेत होते. भिक्षुकीपेक्षां इंग्रजी शिक्षणानें जास्त प्राप्ती होते, असा काळ पालटल्यामुळें, इंग्रजी शिकून कारकुनी करण्याकडे वेदपठण करणाऱ्या घराण्यांतील तरुणांचा ओढा यावेळेपासून होता !

## वकीली व्यवसाय करण्याची संधि

इंग्रजी पांचवी पुरी होईपर्यंत मोरबांचें शिक्षण झालें. (त्यावेळीं कुरुंदवाडास ५ वी पर्यंत शिक्षण देणारीच इंग्रजी शाळा होती.) त्यावेळीं घरच्या गरीबीमुळें नोकरी करण्याविषयीं मोरबांना घरची व आप्तेष्ट मंडळी आग्रह करूं लागली. मोरबांनी मुल्की परीक्षा देऊन वकिलीचाहि अभ्यास, वकिलीचा स्वतंत्र धंदा करण्याचे दृष्टीनें केला. घरच्या आग्रहामुळें बेळगांवनजीक अबकारी खात्यांत कांही दिवस नोकरीहि केली. परंतु त्यांना वकिली करण्याची संधि अचानक एका मित्राकडून मिळाली ! वडील बंधू गणपतराव वारल्यानंतर चिपरीच्या मळीचे देखरेखीसाठीं मोरबाहि अधूनमधून जाऊन येत. यावेळीं चिपरीचे (मोरबांचे इंग्रजी शाळेंतील सहाध्यायी दादा पाटील) यांच्याशीं मोरबांचा दाट स्नेह जमला होता. मोरबांच्या अभिजात विनोदी आणि आनंदी स्वभावामुळें मोरबा व दादा पाटील यांचें साध्या स्नेहांतून दाट मैत्रींत रूपांतर झालें होतें.

या दादा पाटलांच्या वडील बंधूचा व कोल्हापूरच्या शाहू छत्रपतींचा चांगला लोभ असल्यामुळें, छत्रपतीकडून दादा पाटलांना, गडइंग्लज तालुक्यांत व शिरोळ पेठ्यांत वकिली करण्याची सनद मिळाली. तेव्हां दादा पाटलांनीं आपला प्रेमळ विनोदी व आनंदी मित्र ‘ मोरबा दातार ’ यांना ‘ आपल्या वकिली व्यवसायांतील हुषार सहकारी भागीदार ’ म्हणून बोलावून घेतले ! अशा रीतीनें मोरबांची वकिली करण्याची हौस फिटली ! या व्यवसायांत दादा पाटील व मोरबा यांना बरेंच यश आलें. पण कांहीं दिवसांनीं प्लेगच्या सांथीच्या या टापूंत कहर झाल्यामुळें धंदा मंदावला आणि मोरबांच्या वृत्तींतहि एकदम पालट झाला ! त्यांचें मन आतां नाटकाच्या व्यवसायाकडे वळलें ! १८९८ सालीं मिरजेचे श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन यांच्या ॲमॅच्यूर नाटक क्लबांत ते दाखल झाले आणि त्या व्यवसायांतहि ‘ उत्कृष्ट नट ’ म्हणून त्यांनीं नांव कमविलें. प्रेक्षकांचीं मनें स्वतःकडे खेंचून घेण्याची मोरबांना उपजत देणगीच होती ! या क्लबांत श्री. रामभाऊ लेले आणि त्यांचे दोन लहान भाऊ गणू आणि गोविंदा व

बंडोपंत टाकवडे असे कुरुंदवाडचेच सहा नट होते. या क्लबातर्फे गोव्यांत जाऊन या क्लबाची संगीत नाटकेंहि केली. पावसाळा सुरू झाल्यावर या क्लबाची कंपनी मिरजेकडे परतली.

पावसाळा संपल्यावर या ॲमॅच्युअर क्लबांची कंपनी, गुलबर्गा, औरंगाबाद, हैदराबाद, रायचूर, शिकंदराबाद इत्यादि ठिकाणीं फिरली. याही टापूंत संगीत नाटकें करून या क्लबानें म्हणजे मुख्यतः या कुरुंदवाडच्या सहा नटांनी, मोरबांच्या नेतृत्वाखालीं बराच लौकिक संपादन केला!

इतक्यांत लेले बंधूंचे वडील प्लेगनें अत्यवस्थ आजारी झाल्याची तार आली. ती इंग्रजी जाणणाऱ्या मोरबांनींच वांचली! त्याबरोबर त्या रात्रीचा व पुढचेहि 'क्लबाचे' खेळ बंद असल्याचे जाहीर करून चौघे लेले बंधु व श्री. बंडोपंत टाकवडे यांच्यासह, मोरबा कुरुंदवाडास आले. लेले बंधूचे वडील त्या आजारांत देवाघरीं गेल्यामुळें पुढें सर्वांनींच कंपनी सोडली! नाटकाचा नाद सोडून सर्वजण कुरुंदवाडास घरीच राहूं लागले. नंतर मोरबांनीं आपल्या मित्रांना भजनाचा व परमार्थाचा नाद लावला.

### कुरुंदवाडांतहि नट म्हणून ख्याति झाली!

कुरुंदवाड संस्थानाधिपतींनीं आपल्या आश्रयास उत्तम शास्त्री, पुराणिक, वैदिक गवई, नट, तबलजी, पेटीवाले आणि पैलवान देखील ठेविले होते. श्रीमंत अशा गुणी जनांना अनेक उत्सवांचे निमित्तानें आणि विशेषतः गणपती उत्सवांत अशा कलावंताना प्रोत्साहन देत. उत्सवांत वाड्यांत नाटकगृह तयार करून नाटकेंहि होत.

श्री. द. कृ. देवधर आपल्या आपल्या आठवणींत लिहितात :–“ बाणासूर नाटकांत मोरबांनीं काम केलें होतें. भगवान महादेवाचे पार्श्वरक्षक शृंगी–भृंगी या जोडीचा हास्यरस उत्पन्न करण्यासाठीं विनोदी पात्रें म्हणून उपयोग केला होता. त्यांपैकीं एक भूमिका मोरबांनीं केली होती. या भूमिकेनें प्रेक्षकांत हंशा पिकविला आणि प्रसंगीं टाळ्याहि मिळविल्या! मोरबांचा अभिजात विनोदी स्वभाव होता. श्लील–अश्लील वगैरेंची पर्वा न करतां साध्या शब्दांचें विश्लेषण करून आणि शाब्दिक कोट्या करून ते साध्या बैठकींतहि हास्याचे फवारे उडवीत!”

## वीर रसात्मक अभिनयासाठी सुवर्ण भेट !

मोरबांच्या अंगांतील अभिजात विनोदाचें हें उदाहरण झालें; पण वीररसांची आवेगात्मक भाषणे करूनहि त्यांनीं नाटकांत टाळ्याच नव्हे तर, खुद्द श्रीमंत बाळासाहेब यांचेकडून सुवर्ण कंकणाचे पारितोषक स्टेजवर असतानाच मिळविण्याचे दृश्य प्रस्तुत चरित्र लेखकाने वयाच्या ८ व्या वर्षी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलें आहे !

एकदां 'वेणी संहार' या सरकारी वाड्यांतील नाटकांत मोरबांनी महारथी कर्णाची भूमिका केली होती. नाटकांत अश्वत्थामा (गुरुवर्य सेनापती द्रोणांचा मुलगा) आणि महारथी कर्ण यांचा आवेशपूर्ण वीररसात्मक संवादाचा प्रवेश होता. अश्वत्थामाची भूमिका पैलू शास्त्र्यांनीं केली होती. हा संवाद इतका आवेशपूर्ण कडाक्याचा झाला कीं प्रेक्षकांचेहि बाहू स्फुरण पावून अंगावर शहारे आले !

पुढच्या रांकेत बसलेल्या बाळासाहेबांनीं बेहद्द खूष होऊन हातांतील सोन्याची सलकडी बक्षिसादाखल स्टेजवर फेकलीं ! टाळ्यांचा सर्वत्र एकच कडकडाट झाला ! भांवड्या अगर बालगंधर्व यांच्यासारख्या सुंदर व सुरेल गळ्याच्या पात्रांनीं रंगभूमीवर टाळ्या व पारितोषकें मिळविली. पण एकट्या शाहूनगरवासी कंपनीच्या गणपतराव जोशींसारख्या एखाद दुसऱ्या अभिजात नटांखेरीज वीररसात्मक गद्य संवाद उत्कृष्ट वठवून टाळ्या मिळविणारे नट क्वचितच आढळतील ! अशा रीतीनें धंदेवाईक नाटक कंपनीत आणि सरकारी प्रयोगांतहि उत्कृष्ट नट म्हणूनहि मोरबांनीं कमालीची कीर्ती संपादन केली !

## भजनाचा व परमार्थाचा नाद

मोरबांचें इंग्रजी शाळेंतील शिक्षण श्रीमंत भाऊसाहेबांबरोबर झालें असल्यामुळें ते कुरुंदवाडांत असले कीं त्यांचे जेवण आणि बैठकहि वाड्यांतच श्रीमंत भाऊसाहेबांकडे असे. त्या बैठकींत भजन आणि वेदांत-विवरण व निरूपण चालत असे. पंचीकरणासह परमार्थ बोधांत मोरबा सवंगडी श्रोत्यांना चांगलेच रंगवीत ! रामभाऊ लेले व विठोबा गोखले हे पंतभक्त त्या भजनादि निरूपणांना हजर असत. भजनें साधीं पण प्रेमळपणानें गोड गळ्यांनीं गाण्यांत मोरबा आणि हे पंतभक्त यांची भजनानंदीं टाळी लागे !

## बेळगांवीं श्रीपंतांचा अनुग्रह

मिरजेच्या 'ॲमेच्यूर क्लब' नाटक कंपनींत असतांना श्री. रामभाऊ लेले व मोरबा' कंपनींतून थोडे दिवस रजा घेऊन (इ. स. १९०३ चे सुमारास) कुरुंदवाडास आले होते. घरीं आल्यादर श्री. अप्पाकाकांना व मोरबांच्या आईनाहि आनंद झाला. थोड्याच दिवसांनीं गुरुद्वादशीच्या उत्सवासाठीं श्रीपंतांच्या भेटीस जाण्याचा बेत श्री. रामभाऊ लेले यांनीं ठरवून त्यांनी आपल्याबरोबर मोरबांनाहि नेलें. सायंकाळी ५-५॥ चे सुमारास हे दोघेहि श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांच्या निवासस्थानीं पोचले. त्यावेळीं पंतमहाराज बेळगांवच्या मिशनस्कूल मध्ये शिक्षक होते. त्यावेळीं श्री. रामभाऊ लेले यांनीं मोरबांना दरवाजांतच सोडलें आणि 'थोडें खाजगी काम आटपून परत येतो' असें म्हणून ते बाहेर कोठेंतरी गेले. पंतांनी मोरबांना विचारलें 'कोठून आलांत आपण'? मोरबा म्हणाले "मी व माझे मित्र रामभाऊ लेले, असे दोघे, पंतमहाराज बाळेकुंद्रीकर म्हणून सत्पुरुष येथें राहतात, त्यांच्या भेटीला आलों आहोंत" आपल्याला विचारणारे 'हेच श्रीपंत' याची कल्पना मोरबांना त्यांच्या पोषाखामुळें झाली नाहीं! कारण बूट, स्टॉकिंग्ज, पर्शियन कॉलरचा लाँग कोट, अशा तऱ्हेच्या पोषाखांत पंत होते! मोरबांना अशा पोषाखांतील पंत स्वतःच म्हणाले "पंत बाहेर गेले आहेत, तुम्ही येथें आसनावर बसा, थोड्यावेळांत ते येतील!

## 'सोंगाच्या अभिमानांत सांपडणारा मनुष्य फसतो'!

मोरबांना वर उल्लेख केल्याप्रमाणें बसावयास सांगून, पंतांनीं तो मिशनस्कूलमध्ये जाण्याचा पोषाख उतरला, हातपाय धुतले आणि धोतर नेसून व उपरणे पांघरून ते बाहेर मांडलेल्या आसनापाशीं येऊन नमस्कार करून बसले. इतक्यांत बाहेरून एकेक मनुष्य येऊन त्यांना नमस्कार करून त्यांचे पुढें बसूं लागला. मोरबा मनांत म्हणाले 'हेच पंत महाराज वाटतं'

'यानांच पंतमहाराज कोठे भेटतील?' असा प्रश्न मघांशी मी विचारला! हा विचार मनांत येऊन मोरबा थोडेसे खजिल झाले! इतक्यांत रामभाऊ लेलेहि तेथें येऊन पंतांना नमस्कार करून बसले! रामभाऊंना पंत म्हणाले, "काय राम, ठीक चाललें आहेना? रंगभूमीवर जय मिळतो ना?" रामभाऊंनीं उत्तर दिलें" आपणच आशिर्वाद दिलात, मग जय कां नाहीं मिळणार? नाहीं तर आपला आशिर्वाद खोटा ठरेल" यावर हंसत पंत म्हणाले "आपण सर्वेचजण जगाच्या रंगभूमीवरील नट आहोंत. आपापल्या

सोंगाला अनुकूल अशी कामगिरी बजावण्याचा प्रयत्न करतो आहों. नटाच्या भूमिकेप्रमाणें कामें केलींच पाहिजेत; पण सोंगाचें विसर्जन करावयाचें असतें, ही खूण लक्षांत ठेविली पाहिजे. 'घेतलेलें सोंग म्हणजेच मी' अशा अभिमानांत मनुष्य सांपडतो म्हणून फसतो! सोंगाचें विसर्जन करून मूळ स्वरुपावर येण्यास शिकणें, हाच परमार्थ असें संत शिकवितात!" सदरील संवाद ऐकल्यावर मोरबा चटकन् उठले आणि पंतांच्या चरणीं त्यांनी मस्तक ठेविलें! पंतांनीं मग मोरबांना विचारलें "कांहो, पंत भेटले कां तुम्हांला?" मोरबा लाजून म्हणाले 'हो भेटले,!

श्रीपंत त्यावर म्हणाले -"मघां मी 'मिशन स्कूलचा मास्तर' होतों, तें सोंग आणि हेंहि सोंगच! मूळचा मी निराळाच आहे!"

संध्याकाळीं पंत भजनाला बसत, त्यावेळीं रोज ७-८ पदें नवीन रचत. त्या दिवशीं भजनाचे वेळीं 'तबला वाजविणारा कोणी आहे का?' असें पंतांनीं रामभाऊ लेल्यांना विचारलें, मोरबांचें नांव त्यांनीं सुचविल्याबरोबर मोरबाच तबला वाजविण्यास बसले. इतक्यांत एका गृहस्थांनी येऊन पंतांना नमस्कार करून त्यांचे हातीं एक बतासा दिला. तो पंतांनीं लगेच मोरबाचे तोंडांत घातला! तेव्हां रामभाऊ लेले हळूंच मोरबांच्या कानांत कुजबुजले, "मोरबा, तुमचें काम झालें असें आतां समजा."

## मोरबांना अनुग्रह व गुरुकृपेचा वरदहस्त

दुसऱ्या वर्षी गुरुद्वादशीचे उत्सवाकरितां मोरबा बेळगांवास पंताचेकडे गेले. गुरुवारीं गुरुद्वादशी दिवशीं मध्यरात्रीं दोन वाजतां पंतांनीं मोरबांना अनुग्रह देऊन पूर्णकृपेचा वरदहस्त मोरबांचे मस्तकीं ठेविला (इ. स. १९०५) मागील सालीं रामभाऊ लेले यांचे बरोबरच्या पहिल्याच भेटींत तोंडांत बतासा घालून मोरबांच्या तोंडी सरस्वतीची गोडी असल्याची जाणीव पंतांनीं दिलीच होती! कुरुंदवाडास परत येतांना मोरबांनी पंतांना विचारलें "नोकरी करूं कां?" पंत म्हणाले, "मला देह अर्पण केलास, आतां नोकरी कुणाची करणार? एकच जमीन किती जणांकडे गहाण टाकणार?" यावर निरुत्तर होऊन मोरबा कुरुंदवाडास परतले! [ पंतांचा अवधूत मार्गाचा झेंडा कीर्तन प्रचाराने सर्वत्र फडकावण्याचें कार्य बजावतां बजावतां मोरबांची उपजीविकेची सोय सहजच साधेल, अशीच गर्भित सूचना पंतांच्या सदरील भाषणांत असावी

पंतांच्या बोधामृताची चटक लागल्यामुळें पंतांचा सहवास वारंवार घडावा अशी तळमळ या प्रसंगानंतर मोरबांना वाटूं लागली. परंतु वरचेवर बेळगांवीं जाण्याचा खर्चाची व्यवस्था कशी करावी, या चिंतेनें त्यांचें मन थोडें अस्वस्थ झालें !

## बहिणीकडून मदत व थोर मनाच्या मेहुण्यांचे प्रोत्साहन

सदरील चिंतेंत असतां मोरबांचे मनांत आले कीं आपली वडील बहीण सौ. आऊताई कोल्हापुरास आहे. तिचेकडून बेळगांवास वारंवार जाण्यायेण्याच्या खर्चाची मदत घ्यावी. त्याप्रमाणें कोल्हापुरास जाऊन भेटल्यावर सौ. आऊताई यांनी आनंदानें अशी मदत करण्याचें ठरविलें आणि तशी मदत त्या करूं लागल्याहि. या कामीं त्यांचे थोर मनाचे आणि अत्यंत उदार वृत्तीचे पति श्री. त्रिंबकराव मराठे यांनींहि मोठ्या खुषीनें प्रोत्साहन दिलें.

श्री. त्रिंबकराव मराठे हे त्यावेळीं किती सुस्थितींत होते, या विषयीं हा तपशील महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री अण्णा तथा दत्तमहाराज श्री मेघःश्याम बुवा व कोल्हापूरचे श्री बाळकृष्ण नारायण यज्ञोपवित यांचे आग्रहानें नमूद केला आहे. तो विस्तारानें देण्यासारखा आहे. याविषयीं श्री त्रिंबकराव मराठे कोल्हापूर दरबारांत दप्तरदार व हुजूर चिटणीसाचे हुद्यावर होते. श्री छत्रपती शाहू महाराज त्यांना खरा ब्राह्मण म्हणून मानीत, इतकेंच नव्हे तर 'त्रिंबकराव मामांची' कचेरी सरकारी वाड्यांतच असल्यामुळें बाहेर पडतांना ते त्रिंबकराव मामांना वंदन करून बाहेर पडत! इतर कोणाहि ब्राह्मणाला ते नमस्कार करीत नसत! दरबारांत त्रिंबकराव मराठे यांना 'मामासाहेब मराठे' म्हणूनच सर्व लोक ओळखत. त्यांच्या पत्नी सौ. आऊताई व 'मोरबा' दातार यांच्यांत बहीणभाऊ या नात्याची खरी आपुलकी व प्रेम असे. यामुळें या बहिणीच्या मदतीनें मोरबांना बेळगांवास वरचेवर जाऊन पंतभेटीचा लाभ घेतां आला. बहिणीनेंहि पंतांचा अनुग्रह घेतला. बहिणीच्या या मदतीची आठवण मोरबांनीं जन्मभर कृतज्ञतेनें ठेविली. आणि तिच्या आपत्कालीं या मदतीची शक्य तितकी कृतज्ञतेनें फेडहि केली.

## उदारवृत्तीचा एक प्रयोग

मोरबांचे मेहुणे, सौ. आऊताईचे पतिदेव. यांनीं मोरबांना व त्यांच्या वडिलांना किती मोकळ्या व उदार अंतःकरणानें प्रोत्साहन दिलें या विषयींचा एक प्रसंग नमूद करण्यासारखा आहे.

श्री. त्रिंबकराव मामा यांना त्यावेळीं अंदाजें ४०० रुपये पगार होता. दफ्तरदारीच्या फिरतीवर असतां, लांचखाऊ वृत्तीनें ते वागले असते तर, घर बांधून लाखों रुपयांची इस्टेट त्यांनीं केली असती ! पण लांचेच्या पैशालाही ते कधींहि शिवले नाहींतच, पण गांवोगांवीं गूळ, तूप, भाजी वगैरे कोणी आणल्यास ते रागें भरून त्याला परत पाठवीत ! वरील प्रकारच्या जिनसा घेऊन येणाऱ्याला ते रागानें म्हणत " हे जिन्नस घेऊन परत जा कसे ! याची काय जरूर आहे ? तुमचें काय काम असेल तें योग्य रीतीनें करण्यासाठींच मला भत्ता मिळतो—त्याप्रमाणें योग्य तें मी जरूर करीन. तुम्ही लांच देण्याचे पाप करूं नका व मलाहि त्यांत पाडण्याची उठाठेव करूं नका !" त्रिंबकराव मामांचा हा बाणेदारपणा सर्वत्र मशहूर होता ! म्हणूनच शाहू महाराज त्यांना 'खरा ब्राह्मण' म्हणून मान देत.

स्वतःला मिळणाऱ्या ४०० रु. पगारापैकीं २०० रु. धर्मपत्नी सौ. आऊताई यांचे हातीं देऊन त्रिंबकराव मामा कधीं त्याचा हिशोब विचारीत नसत ! उरलेल्या १०० रुपयाची एक 'गव्हर्मेंट प्रॉमिसरी' नोट घेत आणि बाकीचे १०० रु. ते स्वतः आणि सौ. आऊताई मिळून धर्म करीत. (१) गरीब विद्यार्थ्यांना, फीची पुस्तकांची मदत (२) अनाथ गरीब विधवांना चरितार्थासाठीं दरमहा कांहीं मदत (३) पदरच्या व घरीं असणाऱ्या शिपायांनाहि दरमहा कांहीं खुशाली देण्यांत हे शंभर रुपये खर्च होत !

हातीं दरमहा २०० रु. आल्यावर सौ. आऊताई संसारखर्च कांटकसरीनें करून दरमहा कांहीं शिल्लक टाकीत आणि या शिलकींतून आपल्या माहेरीं वडील श्री. अप्पाकाका यांचेकडे मदत पाठवीत. असें करून सांठविलेले दोन हजार रुपये त्यांनीं श्री. अप्पाकाकांना देऊन त्यांची गहाण पडलेली जमीन सोडविली होती !

श्री. त्रिंबकराव मामा आपल्या धर्मपत्नीला हिशोब विचारीत नसले तरी तिच्याकडून माहेरीं होणाऱ्या मदतीची त्यांना कल्पना होती व त्याचें त्यांना कौतुकहि वाटे ! एकदां सोप्यावर फिरत असतांना त्यांनीं आपल्या धर्मपत्नीला म्हणजे सौ. आऊताईंना हांक मारून सहज गमतीनें विचारलें, ( सौ. आऊताईंना ते 'धर्मपत्नी' म्हणूनच बोलावीत !) " अग, तूं आजपर्यंत आपल्या माहेरीं किती पैसे पाठविलेस ?" सौ. आऊताई प्रांजळपणें म्हणाल्या, " पाठविले असतील

आतांपर्यंत दोन हजारांवर रुपये. आमच्या अप्पाकाकांनीं त्यांतून गहाण शेत सोडवून घेतलें!"

आपली धर्मपत्नी 'खरें बोलली' या आनंदाने त्रिंबकरावमामा बराच वेळ हंसतच राहिले! मग ते म्हणाले, "वाः वाः! फ़ारच चांगलं केलंस! तूं खरं बोललीस यापुढें दोन हजार रु. म्हणजे कांहींच नव्हेत! अशीच आणखी मदत माहेरीं जरूर करीत जा!"

अशा दिलदार, उदार आणि निर्मळ अंतःकरणाचे मेहुणे श्री. त्रिंबकरावमामा मराठे यांनीं व मोरबांची बहिण व त्रिंबरावांची पत्नी सौ. आऊताई यांनीं आपले बंधु मोरबा यांना बेळगांवास जाण्यास मदत केली. त्यासाठीं प्रोत्साहन दिलें यांत काय नवल!

मोरबा, पुढें मुंबईस कीर्तनाचे पहिल्या दौऱ्यावर जातांनाहि सौ. आऊताईंनी मोरबांना प्रवासखर्चाची मदत केली आणि पहिला कीर्तन-दौरा मुंबईत संपल्यावर मोरबांना अंदाजे हजार रु. रोख आणि धोतर-जोड्या, लुगडी, दागिने, आंगठ्या व सोन्या-चांदीची भांडी मिळालीं. त्यांनीं ७ पेट्या भरल्या! ती सर्व मिळकत घेऊन मोरबा प्रथम कोल्हापुरास बहिणीकडे गेले त्यावेळीं 'त्रिंबकरावमामांना' खूप आनंद झाला व अत्यानंदानें सर्व सामान कुरुंदवाडास नेण्यास सांगितले.

त्यावेळीं ते सौ. आऊताईंना म्हणाले, "अगे धर्मपत्ने, पाहिलेस कां तुझ्या मोरूनें आतां एखाद्या मामलेदारावर मात केली! कारण मामलेदाराचे हाताखालील थोड्या कारकुनांना सरकारी तिजोरींतून पगार मिळतो. पण मोरबांनीं स्वतःच्या हिंमतीवर झांजवाला, तबल्जी, पेटीवाला, एकतारीवाला इत्यादि सहासात साथीदारांना स्वतःच्या खर्चातून थाटांत पोसले आहेत! मग मोरबांना मामासाहेब म्हणाले, "मोरबा, आतां हें सर्व साती पेट्या सामान कुरुंवाडास आपल्या घरीं घेऊन जा आणि उधळ पट्टी न करता प्रत्येक कीर्तनाचे फेरीनंतर बँकेंत निदान ५०० रु. तरी शिल्लक टाकीत जा! म्हणजे तुमचे वडील मातुश्रींना धन्य वाटेल!"

मामासाहेब मराठे यांनीं शाहू महाराजांचे ' हुजूर चिटणीस ' * या नोकरींत, मुलाचे लग्नासाठी फक्त तीन दिवस रजा घेतली! अखेरच्या दिवशींहि नोकरी संपवून संध्याकाळीं परत आले आणि रात्रीं अकराचे सुमारास त्यांनीं देह ठेविला. शाहू महाराजांनीं स्वतः हजर राहून सर्व कचेऱ्या व शाळा यांना रजा दिल्या.

अशा अत्यंत न्याय निष्ठुर व उदारधी मामासाहेबांना कै. शाहू महाराज 'खरा ब्राह्मण' समजत हें योग्यच होतें. श्री. त्रिंबकराव मामा मराठे यानीं आपल्या नोकरीचे हयातींत आणि तेंहि आपला मुलगा श्री. विष्णुपंत मराठे याचे लग्नासाठीं कुरुंदवाडास जाण्याकरतां फक्त तीनच दिवस रजा घेतली होती! नोकरीतील रजा न घेण्याचा हा विक्रमच होता! ज्या दिवशीं नोकरीचें काम संपवून परत घरीं आलें त्याच रात्रीं बाराचे सुमारास हृदय विकार बळावून त्यांनीं नामस्मरण करीत देह ठेविला! या तपस्वी सत्पुरुषाच्या शवाला खांदा देण्यास दशग्रंथी ब्राह्मण मध्यरात्रीं धांवून आले हाहि त्यांच्या पुण्याईचा विशेष! इतकेंच नव्हे तर शाहू महाराजांना त्रिंबकराव मामांचें औदार्य, निस्पृह बाणा व सत्य बोलणें, सत्य वागणें इत्यादि चारित्र्यसंपन्न आचाराची ओळख ठीक पटली असल्यामुळें ते मध्यरात्रीं स्वतः त्यांच्या प्रेतयात्रेला हजर राहिले आणि संस्थानांतील सर्व शाळा व कचेऱ्या यांना तीन दिवसांच्या दुखवट्याची सुटी दिली. त्यावेळेपर्यंत कोणत्याहि संस्थानच्या नोकराच्या दुखवट्यासाठीं तीन दिवसांची सुटी देण्यांत आली नव्हती हाहि त्या दृष्टीनें विक्रमच होता!

---

टीप —* हा विस्तृत तपशील कोल्हापूरचे श्री अवधूत महाराजांचे भक्त व शिष्य श्री. बळवंतराव यज्ञोपवीत यांच्या ताज्या आठवणीवरून त्यांच्या आग्रहाने दिला आहे.

× × × ×

## पंतांनीं मोरबांना कफनी दिली व ' ठीक संभाळ ' असा आदेश दिला

श्री पंतांशी सहवास घडण्याच्या वर उल्लेख केलेल्या काळांत ' मोरबांनी ' ' अवधूत हरिपाठ ' आणि ' बावनमांत्रिकांची लावणी ' अशी परमार्थपर काव्य रचना केली. पंतांना हें समजल्यावर मोरबांकडून ती म्हणूनच घेऊन पंतांनीं ती स्वतः ऐकली. ५२ मात्रिकांच्या लावणीची सुरवात पुढीलप्रमाणें आहे :—

निरंजनीं सद्गुरू खेळतो । निशिदिनीं जाऊनि शरण त्याला ॥
सच्चा गुरूचा चेला असेल तो । सांगेल माझ्या प्रश्नाला ॥

ही लावणी ऐकण्यास कांही पंतबंधू व अनुग्रहीत शिष्यहि हजर होते. त्यांपैकीं कांहींनीं पंतांना विचारलें, " सच्चा गुरूचा चेला " म्हणून या लावणीच्या

धूपदांत टोला मारलाय ! मग आम्ही काय कच्चा गुरूचे चेले की काय ? ”
[ वास्तविक ठीक अन्वय केला तर ‘ सच्चा ’ हे विशेषण मुख्यतः चेल्याला अनुलक्षून आहे गुरु म्हणजे सद्गुरुच. त्यांना हें विशेषण नाहीं ! ]

वरीलप्रकारें पोवाडा-गायन व चर्चा झाल्यावर पंतांनीं स्वतःच्या अंगावर घातलेली कफनी काढून ती मोरबांचे अंगावर घातली आणि म्हणाले, ‘ हिचा ठीक संभाळ कर ! ”

## पंतांची स्वानंदवासी-समाधि

पंतांच्या सहवासांत वरीलप्रमाणें आनंदानें कालक्रमणा चालली असतां, वरील तपशिलावरून लक्षांत येईल कीं पंतांचा स्वानंदसमाधीचा काल नजीक आला होता ! म्हणूनच त्यांनीं ‘ मोरबांना ’ आपल्या अवधूत मार्गाचा प्रचार करणारा योग्य शिष्य समजून स्वतःच्या अंगावरील कफनी आपल्या हातांनी मोरबांचे अंगावर चढविली !

१९०५ सालीं आश्विनवद्य तृतीयेस पंतांचा दिव्यात्मा इहलोक सोडून स्वानंदवासी समाधीत लीन झाला.

त्यावेळीं पंताच्या सर्व शिष्यांना व भक्ताना दुःखसागरांत बुडाल्याप्रमाणें दुःख झालें ! मोरबांना तर गुरुविरहामुळें विलक्षण उदासीनता आणि वैराग्य वाटूं लागले.! या वैराग्यभरांत ते एकदम काशीयात्रेस निघाले !

## गुरु-विरहाच्या वैराग्यांत काशीयात्रा

मोरबांचे अंगावर पंतांनीं घातलेली कफनी व एक पितांबर येवढेच कपडे होते. त्यांच्या सोबतीला नरसोबा वाडीस असलेला रामू हलवाई व रामभाऊ लेले निघाले. कांहींहि जवळ नसतां पायीं पायींच काशीयात्रा करण्याचे त्यांनीं ठरविलें.

मिळेल तेथें व मिळेल तेवढें खावें, मिळेल तसल्या जागी झोंपावें आणि पुढें चालूं लागावे. या काशीयात्रेचा क्रम आणि शिदोरी अशीच !

## वाटेंत झालेलीं साधूंचीं दर्शनें

या काशीच्या पदयात्रेंत, पळसचे धोंडीबुवा, नारायण महाराज, शिरडीचे साईबाबा, शेवगांवचे गजानन महाराज, राकस पहाडावरील नाथपंथी तपस्वी शीलनाथ महाराज यांनीं मोरबांना एक कंद दिला. तो खाल्लयावर ५-६ दिवस भूक लागत नाहीं. अशा सर्वांच्या गांठीमेटी मोरबांना झाल्या. श्री गजानन महाराज गांजा ओढीत असत. पांच तोळे गांजा राहील येवढी त्यांची मोठी चिलीम होती, ती सारखी भरलेली असे ! आपली चिलीम ते कोणालाही देत नसत, मोरबांचे

जवळ एकतारी व चिपळ्या होत्या तेव्हां तेथें त्यांनीं थोडावेळ भजन केलें. तेव्हां त्या महाराजांनीं भजनावर खूष होऊन आपली चिलीम मोरबांचे पुढें केली! पण मोरबा गांजा ओढीत नसल्यामुळें त्यांनीं ती चिलीम घेतली नाहीं. फिरून महाराजांनीं चिलीम पुढें केली. तरीहि मोरबा ती घेईनात! तेव्हां त्या महाराजांचा शिष्य

"म्हणाला :– चिलीम नाकारूं नका! मी यांच्या सेवेला जवळ जवळ तीस वर्षें आहे. तरी आपली चिलीम महाराजांनीं कोणालाही दिलेली माझ्या पाहाण्यात नाहीं, फार काय, माझ्यासारख्या जवळच्या शिष्यालाहि दिली नाहीं! **तुमचें भाग्य थोर म्हणूनच तुम्हाला देत आहेत!** "**नाहीं म्हणू नका**" त्या शिष्यांचें हें बोलणें संपतें न संपतें तोंच महाराजांनीं चिलीम फिरून मोरबापुढें केली! मोरबांनीं ओढलीसें करूनं महाराजांचे हातीं परत दिली. महाराजांनीं स्वतः एक दम मारून फिरून मोरबांचे हातीं देऊन म्हटलें "और जोरसे खेंचों,! मोरबांनीं तसें केल्यावर महाराज म्हणाले, "**तुझ्या जिभेवर यापुढें सरस्वती नाचेल, बृहस्पतीसारखा बोलशील!**"

नंतर काशीक्षेत्रांत पोचल्यावर तेथे संन्यासी शांताश्रम स्वामी यांच्या सहवासाचा लाभ मोरबांना झाला. काशीहून परतल्यावरहि अनेक साधूंचीं दर्शनें घेत १९०७ सालीं मोरबा कुरुंदवाडास येऊन पोचले.

### श्रीपंतांचा स्वप्नांत दृष्टांत : 'प्रेमलहरी' चें भजन व निरूपण

कुरुंदवाडास आल्यानंतर एक दिवस स्वप्नांत दर्शन देऊन श्रीपंत मोरबांना म्हणाले "अरे, तूं स्वस्थ काय बसलास? एवढी 'प्रेमलहरी' कुणाकरितां केली? तिचा उपयोग कर!"

### भजन निरूपणाचा पहिला चातुर्मास

तेव्हां १९०७ सालींच चातुर्मासांत, रामभाऊ व गोपाळराव लेले या गुरुबंधूच्या, नाक्यावरच्या असलेल्या घरांत, मोरबांनी 'प्रेमलहरी' च्या आधारें भजन व निरूपण करण्यास सुरवात केली.

खूपच श्रोते भजन निरूपण ऐकण्यास जमूं लागलें! पंतांनीं समाधीचे अगोदर घातलेली कफनी व दिलेला आदेश, गजानन शेवगांवच्या महाराजांचा काशी यात्रेंत मिळालेला आशिर्वाद आणि पंतांचा स्वप्नांतील नुकताच झालेला दृष्टांत,

यांचा पूर्ण फायदा मोरबांना मिळून त्यांचे जिभेवर जणु सरस्वती नाचूं लागली. आणि बृहस्पतीसारखें मर्मग्राही सुबोध निरूपण त्यांचे वाणींतून प्रगट होऊं लागल्यावर श्रोत्यांची गर्दी व्हावी, यांत काय नवल? अशा रीतीनें भजन-निरूपणाचा पहिला चातुर्मास मोठ्या उत्साहानें पार पडला. पेटी, तबला, एकतारी वगैरेंची सांथ लेले गुरुबंधूंनीं चांगलीच जमविली.

तो चातुर्मास संपल्यावर मोरबांनी यापुढे कीर्तने करण्याचें ठरवून त्यासाठी नवनाथाचीं आख्यानें बसविलीं.

## प्लेगचा कहर व घरांत सर्वस्वाची चोरी!

याच सुमारास कुरुंदवाडास प्लेगची सांथ येऊन तिनें कहर उडविला! या प्रसंगीं मोरबा व त्यांचे गुरुबंधू घरोघर जाऊन गांवच्या दुःखितांना सर्व प्रकारें यांनीं जरुरीपुरती मदत केली. इतरांप्रमाणेंच एक दिवस गांवाबाहेरच्या झोंपडीत सर्व घरची मंडळी गेलीं. जवळ फक्त अंथरायची साधनें होतीं. त्या रात्रींच चोरांनी दातारांचे घर लुटून सर्व साफ केलें! त्यावेळीं मोरबा वडिलांना धीर देऊन म्हणाले, "आपण आतां कीर्तनें करीत भिक्षावृत्तीनें काशी यात्रा करूंया" वडील अप्पाकाका म्हणाले, "वीष खाऊन मरायला देखील आपल्या जवळ पैसा नाहीं अन् काशीयात्रा कशी करणार?" "ते आपण पाहूं" असें उत्तर देऊन मोरबांनीं वडील मातुश्री आणि कीर्तनासाठीं रामभाऊ व गोपाळराव लेले बंधूंसह आठ साथीदार, बाळा आचारी व एक बाई, यांचेसह कीर्तन करीत अकरा जणांनीं काशीयात्रा करण्याचा बेत नक्की ठरविला!

## वडील मातुश्रीसह कीर्तन करीत दुसरी काशीयात्रा

१९०८ च्या चातुर्मासानंतर सदरील काशीयात्रेच्या सुरवातीचे खर्चासाठीं श्री. रामभाऊ साठे यांचेकडून दहा रुपये अर्जाऊ म्हणून घेतले. साथीदार गुरुबंधूंनीं पगार वगैरे कांहीं घ्यावयाचा नाहीं; मिळेल त्यांत सर्वांचे भाडें व अन्न खर्च करून, ठिकठिकाणीं कीर्तनाचे मुक्काम करीत पुढें जावयाचें, असें सर्वानुमतें ठरलें. गांवांतील कांहीं लोकांनीं अशी काशीयात्रा करणाऱ्यांची टिंगल टवाळीहि केली; पण यांकडे लक्ष न देतां ही मंडळी काशीयात्रेला निघाली! पहिला मुक्काम कुरुन्दवाडाहून अन्दाजें ३-४ मैलांवरील शिरोळ गांवीं अन्नपूर्णा-दत्तमंदिरांत पडला. सात दिवस कीर्तन झाल्यावर शेवटच्या दिवशी आरतींत १५० रुपये जमले. सुरवातीला तर चांगला शकून झाला

असें सर्वांना वाटलें ! या सर्व रकमेचा भाड्याकरितां खर्च करून मोरबा बरोबरच्या मंडळींसह सातान्यास गेले. तेथेंहि सप्ताहाचे शेवटीं आरतींत दोनशें रुपये जमले ! सातान्याहून ही सर्व मंडळी नाशिकला गेली. नाशिकला दीड महिना मुक्काम झाला; प्राप्ती कमी झाली तरी कीर्ति खूप वाढली ! मध्यंतरी मिरज, सांगली, बुधगांव, विटें, वाटेगांव, कऱ्हाड, वाई, सातारा ते पुणें हीं गांवें थोडे थोडे दिवस घेतलीं.

खर्चाला पुरेसे पैसे न उरल्यामुळें नाशीकहून चाळीसगांवास जाण्याचें मोरबांनीं ठरविलें. स्टेशनवर येऊन चाळीसगांवच्या भाड्याची चौकशी करीत असतां, नाशीकचे स्टेशन मास्तरच पुढे होऊन म्हणाले, "नाशीकच्या लोकांकडून अवधूतबुवांच्या कीर्तनांचा लौकिक ऐकला पण कीर्तन ऐकण्याचा योग नोकरीच्या परावलंबनामुळें आम्हांला मिळाला नाहीं ! म्हणून मी विनंति करतो कीं आतां सर्व मंडळी आमच्या रहात्या घरावर चला, जेवण करा आणि मग आम्हां स्टेशनवरील मंडळींना कीर्तन ऐकण्याचा लाभ द्या, उद्यां पहाटे चाळीसगांवाकडे जाणारी गाडी आहे; त्या गाडीनें तुम्हांला चाळीसगांवाकडे पाठविण्याची हमी घेतो." या विनंती-प्रमाणें सर्वांची जेवणे झाल्यावर स्टेशनवरील सर्वांकरितां स्टेशनमास्तरांचे बंगल्यावर कीर्तन झालें. आरतींत दहा रुपये जमले आणि स्टेशनमास्तरांनीं दिलेल्या आश्वासनाप्रमाणें त्यांनीं पहाटेच्या गाडींत कीर्तनमंडळीचे सामान स्टेशनच्या पोर्टरांकडून चढवून देऊन अवधूतबुवांची रवानगी स्टेशनमास्तरांनीं चाळीसगांवाकडे केली. (येथपासून मोरबा असा चरित्रनायकाचा उल्लेख न करतां 'अवधूतबुवा' असा करणे यापुढें सोईचे होईल.)

## चाळीसगांव स्टेशनवरहि स्वागत

चाळीसगांव स्टेशनवर येऊन गाडी थांबली त्यावेळीं 'अवधूतबुवा' कोणत्या डब्यांतून खाली उतरतात हें पाहून त्यांचें स्वागत करण्यासाठी स्टेशनमास्तरच पोर्टरसह उभे होते ! (नाशीकच्या स्टेशनमास्तरनीं अवधूत बुवांच्या आगमनाची बातमी त्यांना आगाऊच कळवून ठेविली) अवधूतबुवा व बरोबरील मंडळी यांच्या बरोबरील सामान गाडींतून उतरून घेववून आणि स्टेशनबाहेर गाड्या ठरवून त्यांतहि सामान चढवून आणि बरोबर दोन पोर्टर देऊन त्या सर्व मंडळीना चाळीसगांवच्या राममंदिरांत पोचविण्याची योजना स्टेशनमास्तरांनीं ठरविली असावी; त्याप्रमाणें ती व्यवस्थित अंमलात आली !

## बिदागीसाठीं भिक्षा नको !

कीर्तन सुरूं झाल्यावर पहिल्या दिवशीं आरतींत २॥ रु. जमलेले पाहून तेथील पुजाऱ्यानें अवधूतबुवांना सांगितलें, "येथें कीर्तनकार हरदास घरोघर जातात व त्यांची संभावना लोक यथाशक्ति करतात अशी चाल आहे. तुम्ही तसे घरोघर गेलात तर मीहि तुमच्याबरोबर येईन." अवधूतबुवा म्हणाले, "प्रत्येकाच्या घरोघर जाऊन बिदागी-भिक्षा मागणे मला पसंत नाहीं. वाटल्यास आम्हीं रस्त्यावरून भजनें म्हणत फेरी काढूं. कोणाच्या घरांशी जास्त वेळ थांबणार नाहीं आणि घरांत तर मुळींच जाणार नाहीं, कोणास वाटल्यास त्यांनी आमच्या भिक्षेच्या झोळींत काय द्यावयाचें असेल तें धान्य अगर पैसा आणून टाकावा" अवधूतबुवांची ही अट पुजाऱ्यांनीं, व मंदिराजवळील श्री. हरीभाऊ म्हणून गृहस्थ होते त्यांनीं, कबूल केली आणि तसें लोकांना कळवून फेरीबरोबर स्वतःहि येण्याचें ठरविले. त्याप्रमाणें चाळिसगांवांत अवधूतबुवा व कीर्तनांतील सांथीदार यांनी श्री. हरीभाऊच्या मार्गदर्शनानें दोन फेऱ्या केल्या. दोन्ही फेऱ्यांत मिळून २५० रु. रोख व कांही धान्य मिळालें !

## भडगांवला निमंत्रण

नंतर भडगांवास जाण्यासाठीं सोयिस्कर मार्गाची चौकशी करण्याकरतां श्री. गोपाळराव लेले व कीर्तनांतील साथीदार (स्टेशनवर) गेले असतां त्यांना श्री. **विनायकराव करंदीकर** हे ओळखीचे गृहस्थ भेटले. ते कुरुंदवाडच्या श्री. नारायणराव कोल्हटकरांच्या बहिणीचे पति. त्यांनीं अवधूतबुवादि सर्व मंडळींना आपल्या बंगल्यावर आणण्याची व्यवस्था केली. ते जी आय. पी. रेल्वेच्या 'ट्रेन एक्झॉमिनर' या हुद्यावर होते आणि चाळिसगांव स्टेशनवरच रहात असत. त्यांच्या बंगल्यात श्री. अवधूतबुवांचें कीर्तन झालें कीर्तनाच्या समाप्तीचे ५० रु. रोख व आरतीची रक्कम मिळाली. येथे त्यांना भडगांवांस नेण्यासाठीं अवधूतमहाराजांचे कीर्तनास श्री. राजाभाऊ सहस्रबुद्धे वकील अवधूतमहाराजांचे कीर्तनाच्या समाप्तीचे अखेरीस आले. त्यांनीं बुवांना भडगांवास रामनवमीच्या सप्ताहासाठीं कीर्तनास येण्याचें आमंत्रण दिलें. या उत्सवाच्या चालक मंडळीनीं असे ठरविलें कीं अवधूतबुवांबरोबरील सर्व मंडळीचा येण्याजाण्याचा भाडेखर्च आणि भडगांवास रहाण्याचा भोजन खर्च करून बिदागीचे ५० रु. बुवांना द्यावे. श्री. राजाभाऊ सहस्रबुद्धे चाळिसगांवांत यशस्वी वकील पुढारी म्हणून प्रसिद्ध होते. ते अवधूत-बुवांच्या राममंदिरांतील कीर्तनास चाळिसगांवांत येत असल्यामुळें त्यांना त्यांची कीर्तनशैली व पद्धति आवडली होती. शिवाय भडगांवच्या रामनवमी उत्सवाचे

ते प्रमुख चालक असून भडगांवचेच प्रमुख रहिवासी होते. त्यांनीं भडगांवच्या उत्सव मंडळास शिफारस करून त्यांचेकडून अवधूतबुवांच्या कीर्तनसप्ताहाचा कार्यक्रम रामनवमीच्या उत्सवासाठी (१९०८ चैत्र शु. नवमीस) ठरविला होता. नंतर भडगावांतहि कांहीं कीर्तनें झालीं. कीर्तनाची आरती व कीर्तनांतील रोख भिक्षा अशी ५०० रु. वर प्राप्ती झाली. भिक्षेच्या फेरीत धान्यहि बरेंच जमलें.

अवधूतबुवा यावेळीं भडगांवच्या 'पंचायतन मंदिरांत' उतरले होते. उत्सवाचे अखेरीस अवधूतबुवांनी सत्यनारायणाची पूजा केली. आणि खीर-भात भंडाऱ्याचा प्रसाद सर्व गांवकरांना गोरगरीबांना आमंत्रण देऊन वाढला. गांवांतील गांवकर आणि गोरगरीब भिकारीहि खूष झाले! भडगांवांत अवधूतबुवांची कीर्ति खूप वाढली. येथूनच श्री. अवधूतबुवांनीं सर्वांसह पाचोऱ्याहून थेट काशीची तिकीटें काढली व ते काशी क्षेत्रांत जाऊन पोचले!

## काशी क्षेत्रांतील व त्रिस्थळींतील अनुभव

काशीक्षेत्रीं श्री. भय्या दामले यांचेकडे एक महिना मुक्काम झाला. यावेळीं श्री. शांताराम स्वामीच्या सहवासाचा योग अवधूत महाराजांना लाभला. रोज स्वामीजींच्याकडे बैठक होऊन चर्चा चाले. त्यावेळीं स्वामीजीनीं अवधूतबुवांना विचारले, "तुम्ही कीर्तनांत नाथांची आख्यानें लावतां, मग सैली कां घालीत नाहीं?" अवधूतबुवा म्हणाले, "पंतांनीं स्वहस्ते दिलेला प्रसाद म्हणून कफनी घालतो." यावर शांताश्रम स्वामी म्हणाले, "आम्ही श्री काशीविश्वेश्वराचा प्रसाद म्हणून सैली दिली तर घालाल की नाहीं?"

## काशी विश्वेश्वराकडून सैलीचा प्रसाद!

काशी विश्वेश्वर मंदिरांत रोज रात्रीं बारा वाजतां चिताभस्मासह श्री विश्वनाथाची पूजा होत असते, त्यावेळीं काशीतील सर्व विद्वान आणि अधिकारी मंडळी जमतात. त्याचवेळीं श्री शांताश्रम स्वामीजींनीं अवधूतबुवांना बोलावून पूजाविधीनंतर 'प्रसाद' म्हणून समारंभानें सैली अर्पण केली. तेव्हांपासून अवधूतबुवा कफनीवर सैली घालूं लागले.

## मलकापुरास कीर्तनामुळें नाटकें बंद पडली!

नंतर काशीचा मुक्काम संपविला. तेथून मंडळीनीं गया–प्रयागला जाऊन त्रिस्थळी यात्रा पुरी केली. खर्चासाठीं कर्जाऊ म्हणून प्रयागच्या मथुरादास पंडानें २०० रु. खुषीनें दिले. नंतर सर्व मंडळींना घेऊन अवधूतबुवा मलकापूर भंडारा

मार्गानें परत फिरले. मलकापुरास लेले बंधूंची ' करुणेश प्रासादिक मंडळी मुक्कामाला होती. या कंपनींत अवधूतबुवा यांचे बरोबरील यात्रेतील साथीदार रामभाऊ व गोपाळराव लेले यांचे धाकटे दोघे बंधू गणपतराव, व गोविंदराव होते. त्यावेळी दशहाराचा महिना होता. कीर्तनांत नाथांची नवीं आख्यानें अवधूतबुवा लावीत असल्यामुळें, कीर्तनांस गर्दी खूप जमूं लागली! समाप्तीचे रात्री प्रत्येक श्रोत्याने, त्यावेळीं आंब्यांची सुगी असल्यामुळें, अंब्याची एक करंडी आणि वर आरतीचे रुपये दिले. आंब्याचा ढीगचा ढीग सांठला! ' इतक्या अंब्याचें करायचें काय ' असा प्रश्न पडला! मग अवधूतबुवांनीं नाटक कंपनीचे सर्व लोक बोलाविले. गावांतीलहि बऱ्याच श्रोत्यांना बोलाविलें आणि सर्वांना आंबरस पुरीचा प्रसाद दिल्यामुळें सर्व खूष झाले!

## ' नाटकें बंद पाडणारा हरदास ' !

गोपीचंद आख्यान संपवून अवधूतबुवा मुक्काम हालविणार होते. पण गावांतील हें आख्यान न ऐकलेल्या लोकांनीं आग्रह करून बुवांना मुक्काम वाढवून गोपीचंदाचें आख्यान पुन्हा लावून संपेपर्यंत मलकापुरास ठेवून घेतलें! फिरून हें आख्यान ऐकण्यास मिळणार नाहीं हें जाणून लोकांचीं कीर्तन ऐकण्यास खूप गर्दी जमूं लागली व नाटकगृह ओस पडण्याचा प्रसंग आला! तिकीट विक्री कीर्तनाच्या पहिल्याच दिवशीं अवघी ७ रु. झाल्यामुळें तिकीटांचे तेवढे पैसे परत करून नाटक बंद ठेवावें लागलें! गावांतील कीर्तनामुळेंच हा प्रकार घडल्याचें लक्षांत येऊन लेले बंधू ( गोविंदराव व गणपतराव ) स्वतःच कीर्तनाचे जागीं आले! पण त्यांना कीर्तनाचे जागेंत प्रवेशच मिळेना, इतकी आंत-बाहेर गर्दी होती!

मग ' शेवट गोड करी ' हें कीर्तनाचें अखेर नमनाचें पद झाल्यावर त्यांनीं अवधूतबुवांची व आपल्या वडील बंधूंची गांठ घेऊन ते अवधूतबुवांना म्हणाले " मोरया, आतां मात्र तुम्ही कमाल केलीत! ' नाटकें बंद पाडणारा हरदास ' आम्ही आज प्रथमच पहात आहों ' ! हें ऐकून सभोंवार जमलेल्या मंडळींत खूपच हंशा पिकला!

पुढें भंडाऱ्यासहि अवधूत महाराजांचीं कीर्तनें महिनाभर होऊन प्राप्तीहि चांगली झाल्यामुळें अलाहाबादच्या मथुरादास पंड्याची कर्जाऊ २०० रु. ची रक्कम परत पाठविण्यांत आली! अशारीतीनें काशीयात्रेतील सर्व पेंचप्रसंगांतून श्रीपंत कृपेनें अवधूतबुवा बरोबर ११ महिन्यांनीं सर्व मंडळींसह कुरुंदवाडास येऊन पोचले.

## फिरून ८ दिवस भडगांवांत

भंडाऱ्याहून कुरुंदवाडास येण्यापूर्वींची एक घटना नमूद करण्यासारखी आहे. भंडाऱ्याहून अवधूतबुवा मंडळींसह फिरून भडगांवास येऊन आठ दिवस राहिले. काशीयात्रेस अवधूतबुवा जाण्यापूर्वी भडगांवास श्रीमती लक्ष्मीबाई केळकर व श्रीमती मथूबाई फासे यांनीं त्यांचा अनुग्रह घेतला होता. त्यांनी व बऱ्याच भडगांवकरांनी आग्रहाची विनंति केली होती कीं काशीयात्रेहून परत जातांना आठ दिवस तरी भडगांवला येऊन राहून जावे. त्याप्रमाणें येऊन श्री. लक्ष्मीबाई केळकर यांचे वाड्यातच राहिले, त्यावेळीं आणखी कांहीं स्त्री-पुरुषांनीं त्यांचा अनुग्रह घेतला.

## पंतबंधु न्यायाधीश वामनरावदादा

यावेळीं पंतबंधु वामनराव दादा एरंडोल पाचोऱ्यास जज्ज (न्यायाधीश) होते. त्यांच्या कानीं पूर्वं खानदेश जिल्यांत अवधूतबुवांची कीर्ति वाढत असल्याची वार्ता गेली आणि त्यांनीं अवधूतबुवांना बरोबरच्या मंडळींसह एरंडोल येथें बोलावून घेतलें. १५ दिवस ठेवून घेऊन ठिकठिकाणी अवधूतबुवांचीं कीर्तनें करवून स्वतःहि ऐकलीं. त्यावेळीं आपले परमपूज्य बंधु पंतमहाराज यांच्या अवधूत मार्गाचा प्रचार, मोठ्या प्रभावी वाण्यानें अवधूतबुवा करीत असलेला पाहून त्यांना धन्य धन्य वाटून आनंद झाला असणें स्वाभाविकच आहे. तेथें कीर्तनांत झालेल्या प्राप्तीमुळें श्री. वामनरावदादांचा आशीर्वाद घेऊन अवधूतबुवा सर्व मंडळीसह थेट कुरुंदवाडकडे परतले.

## आकड्यांचा चमत्कार

वर वर्णन केल्याप्रमाणें काशीयात्रा करीत करीत अवधूतबुवांसह अकरा मंडळी बरोबर अकरांच महिन्यांनीं कुरुंदवाडास १९०८ अखेर येऊन पोचलीं; आणि जातांना १० रु. कर्जाऊ काढले होते, तितकी नेमकीच रक्कम आल्यावर शिल्लक उरली! कर्जाऊ काढलेले १० रु. देण्यासाठी अवधूतबुवा श्री. रामभाऊ साठे यांचेकडे गेले त्यावेळी श्री. रामभाऊ साठे म्हणाले, "मोरबा, तुमची करामत अजब खरी! अवघ्या १० रुपयावर तुम्ही ११ जण काशीयात्रा करून आलात! इतर लोक यात्रेला गेले म्हणजे तब्येती खराब करून येतात, अन् तुम्ही सर्वजण चांगले तगडे तयार होऊन आलात!" अशाप्रकारें अवधूतबुवांचें कौतुक करून श्री. रामभाऊ साठ्यांनीं १० रु. न घेतां परत केले! ते म्हणाले, "या पवित्र यात्रेला ही माझी 'फूल नाहीं फुलाची पाकळी' या स्वरूपाची मदत असें समजा" मग तेच १० रु. खर्चून अवधूत महाराजांनीं श्री नरसोबा वाडीस श्री दत्ताची महापूजा करून पालखी काढली.

## मुंबईस कीर्तनाची पहिली फेरी

नंतर मुंबईस चातुर्मास कीर्तनें करण्याचें अवधूतबुवानीं ठरविले. आणि लगेच लेलेबंधू व इतर साथीदारांसह या कार्याची पूर्व तयारी सुरू झाली. १९०९ सालीं अवधूतबुवा कीर्तनासाठीं मुंबईस आले त्यावेळीं चौघडेवाल्याचे चाळीसमोरील चाळींतील दुसऱ्या मजल्यावर, कऱ्हाडकर यांचे शेजारीं मुगभाटांत जागा घेतली होती. पहिला सप्ताह मुंबईकरांना अवधूतबुवांच्या कीर्तन-पद्धतीचा परिचय होण्यात गेला.

## काळाराम मंदिरांतील कीर्तनाला अपूर्व गर्दी

मात्र दुसरा कीर्तन-सप्ताह काळाराम मंदिरांत सुरू झाल्यावर कीर्तनाला इतकी गर्दी होऊं लागली कीं, कीर्तन ऐकण्यासाठीं येणाऱ्या श्रोतृगणांनीं मंदिर गच्च भरून आजूबाजूच्या जागाहि पार भरून गेल्या. तेव्हां कांहीं लोक आसपासच्या झाडांवर चढून कीर्तन ऐकण्यास बसले! कीर्तनाला रात्री ९ वाजतां सुरवात होई तर ७ वाजल्यापासून लोक मंदिरांत जागा अडवून बसूं लागले!

## काशीयात्रेची अभिनव गंगाराधना!

या वेळेपासून मुंबईचे लोक अवधूतबुवांना ‘अवधूत महाराज’ म्हणूं लागले व तेंच नांव यापुढें सर्वांच्या सर्वत्र परिचयाचें झालें. या सप्ताहांत खूप कापड, धोतरजोड्या, साड्या, चांदीची भांडीं सोन्याच्या अंगठ्या वगैरे प्राप्ती झाली. या प्रसंगी एका प्रकारें अवधूत महाराजांनी आपल्या काशीयात्रेची अभिनव गंगाराधना केली! काशीयात्रेला जाऊं इच्छिणाऱ्या गोरगरीबांना व गोसावी बैरागी अशा १०० लोकांना, अवधूत महाराजांनीं स्वखर्चानें काशीचीं तिकीटें काढून दिलीं आणि प्रत्येकाला ५ रु. प्रवासांतील आहारासाठीं म्हणून दिले!

## कृतज्ञतेचें पहिलें कर्तव्य

पहिल्या फेरींतील मिळकतीने सात पेट्या भरल्या! त्या सर्व घेऊन अवधूत महाराज. कृतज्ञतेचें पहिलें कर्तव्य म्हणून कोल्हापूरास प्रिय भगिनी आऊताई व थोर आणि उदार चारित्र्याचे मेव्हणे श्री. त्रिंबकराव मामा यांचेकडे गेले. त्या उभयतांना मोरबांच्या मिळकतीचें वैभव पाहून अतीशय आनंद झाला! त्रिंबकराव मामा म्हणाले, “अगे धर्मपत्ने पहा तुझा मोरू आतां ‘अवधूत-महाराज’ झाला! एखाद्या मामलेदाराचे वर त्यानें कडी केली! मामलेदाराचे हाताखालीं थोडे कारकून असतात. पण या अवधूत महाराजांची स्वारी ८-१० साथीदार आणि अनेक लोकांना पोसण्यास समर्थ झाली आहे!

मग ते 'मोरबाना' तथा अवधूत महाराजांना म्हणाले, " आतां सर्व मिळकत आपल्या कुरुंदवाडास घेऊन जा, ती पाहून अप्पाकाकांना व मातुश्रींना धन्य-धन्य होईल ! पण सर्वांची ; उधळपट्टी न करतां कमीतकमी ५०० रु. बँकेंत टाकीत जा ! म्हणजे पुढें सर्व ठीक होईल. शाबास धन्य तुमची. "

## घराण्याचे उर्जितावस्थेस सुरवात

अशा रीतीनें १९०९ सालीं मुंबईस कीर्तनाची पहिली फेरी करून श्री अवधूत महाराज परत आले. अवधूत महाराजांचा पहिला मुलगा यावेळीं ५ वर्षांचा होता. शरीर कृश व रोगट असून ५ वर्षें झाली तरी नीट चालतां येत नव्हतें ! त्याचा जन्म चैत्र शुद्ध विनायकी शके १८२७ रोजीं झाल्यामुळें पाळण्यांतील नांव ! 'विनायक' ठेविलें होतें. पण लहानपणीं तो फार रडे म्हणून 'दत्त' नांव ठेविलें. 'तेव्हांपासून त्या मुलाचें रडणें थांबलें' असें वडील माणसें व अवधूत महाराज स्वतःच सांगत !

## १९११ सालची मुंबईची कीर्तन-फेरी

मात्र या पहिल्या मुलाचा 'पायगुण' म्हणा, त्याच्या जन्मापासून दातार कुटुंबीयांच्या उर्जीतावस्थेला निश्चितपणें सुरवात झाली ! मुंबईच्या पहिल्या फेरींतून कापड तांब्या पितळेची व चांदीची भांडी आणि सोन्याच्या आंगठ्या घरी आल्याचा उल्लेख वर आलाच आहे.

## मुंबईची १९११ सालची 'दरबार' फेरी

पंचमजार्ज बादशहांचे राज्यारोहणाचे वेळींच मुंबईस १९११ सालीं अवधूत महाराज आपल्या कीर्तनफेरीसाठीं आले ( या प्रसंगाचा उल्लेख करण्यासारखा आहे ) त्यावेळीं जलकर-बाग कामाठीपुरा या जागीं उतरले होते. याचवेळीं नूतन बादशहांच्या राज्यारोहणा निमित्त मुंबईस मोठा दरबार भरला होता. त्यासाठीं मुंबई इलाख्यांतील सर्व राजेरजवाडे आणि संस्थानिक मुंबईस आले होते.

शिवाय गांवोगावचे लोक पंचमजार्ज बादशहाची मिरवणूक पहाण्यासाठीं मुंबई शहरीं जमले होते. अवधूत महाराजांनीं याचवेळी आपल्या सांथी-दारासह शिष्य भक्तांचा दरबार मुंबई शहरीं वर उल्लेख केलेल्या जागेंत थाटला होता ! त्यांच्या या 'दत्त-दरबारांत' त्यावेळीं ३०-४० माणसें होतीं. मुंबई सारख्या शहरीं चार महिने या सर्व मंडळीचा चरितार्थ चाललेला रोज अवधूत-दत्तदरबारांत पहावयास मिळे ! मुंबईतील 'अशिक्षित' समजला

जाणारा समाज ' गुरु म्हणून त्यांचे विषयीं आपुलकीनें भक्तिपर वागे, याचें प्रत्यंतर त्या ' दत्तदरबारात जाणाऱ्यांना पहावयास मिळत असे.

त्यावेळीं अवधूत महाराजांचे विद्यार्थी असतांचे सहाध्यायी भाऊसाहेब कुरुंदवाडकर बादशाही दरबाराकरितां मुंबईस आले होते. एक दिवस श्रीमंत भाऊसाहेब अवधूत महाराजांना भेटण्यासाठी आले होते; ते अवधूत महाराजांना म्हणाले, " बादशाही दरबार संपला. आतां आम्ही कुरुंदवाडास जाणार " अवधूत महाराज म्हणाले, " आमचा मुक्काम कमींत कमी ४ महिने मुंबईत होणार आहे " त्यावर श्रीमंत भाऊसाहेब म्हणाले—" मग इतक्या सर्वांचा खर्च चालविण्याची काय व्यवस्था केली आहेस ? " अवधूत महाराज म्हणाले, " अनंत हातांनीं श्रीदत्त मला देतात. अवघ्या दोन हातानीं मी किती घेणार ? बोलून चालून आम्हीं भिक्षेकरी, फकिरी पत्करलेली माणसें ! पंत महाराजांनीं आम्हांला पावन करून घेतलें, दीक्षा दिली व आमचे गळ्यांत झोळी बांधली ! आम्ही श्री पंतमहाराजांना विचारले की, आम्ही आमचा योगक्षेम कसा चालवावा ? आमच्या मागें प्रपंच आहे. " श्रीपंत महाराजांनीं सांगितलें, " तूं माझा शिष्य झालास; तूं आपलें तन, मन, धन अर्पण केलें आहेस ना ? खुशाल जरूर पडेल तेव्हां भीक माग, तुला कांहीं कमी पडणार नाहीं. ' ब्राह्मणाची मुख्य दीक्षा मागीतली पाहिजे भिक्षा ' असें समर्थांचे सुभाषितच आहे. अर्थात् केवळ पोट जाळण्यासाठीं ही भिक्षा नव्हे ! ' ॐ भवति या पक्षा रक्षिलें पाहिजे ' बहुजन समाजाची अंतःकरणें तपासण्याचे काम या भिक्षेच्या मिषाने होत असते ! ' शोधावी सकलांचीं अंतःकरणें भिक्षेच्या मिषे ' असेहि समर्थांनीं याबरोबरच म्हणून ठेविलें आहे ! "

## विद्वान् सर्वत्र पूज्यते

अवधूत महाराजांचें सदरील संभाषण ऐकून श्रीमंत भाऊसाहेब म्हणाले :— " मोरबा, तुम्हीच हे करूं शकाल. आम्ही संस्थानिक खरे, आम्हाला फक्त आमच्या संस्थानच्या गांवातच मान मिळतो. आणि तुम्ही जाल तेथें तुम्हाला मान मिळतो. " विद्वान् सर्वत्र पूज्यते, हेंच खरे "

मुंबईच्या यानंतरच्या अवधूतमहाराजांच्या कीर्तन–फेऱ्याहि अशाच गर्दीच्या व वैभवाच्या ठरल्या. पंत महाराजांनीं स्वानंद-समाधि घेतांना अवधूत महाराजांना घातलेली कफनी आणि मुक्तकंठानें दिलेल्या आशिर्वादा-प्रमाणें, अवधूत मार्गाचा झेंडा, अवधूत महाराजांनी सर्वत्र फडकत ठेवून

चांगल्या रीतीने आशीर्वाद सफळ केला! याच अनुषंगानें श्री. कामत यांच्या गुरुचरित्रांतील ओव्यांचा उल्लेख करण्यासारखा आहे :—

पंतांनीं मोरबांना अनुग्रह दिल्याचे वर्णन करणाऱ्या अनेक ओव्या लिहिल्या नंतर 'पंतगुरुचरित्र' ग्रंथांत ५४३ पानावर पुढील ओव्या आहेत —

मोरबासि समोर पाहोन। प्रसाद देती जगज्जीवन। तत्काळ मुखीं घालोन। भक्षिता जाहला यावेळीं॥ ४८ मग श्रीपंत गुरु तयासी—आशीर्वाद देती ते समयासी 'म्हणती बोलपटूसी' ज्ञान घन जाणपा॥ ४९॥

श्रीपंत गुरुचरित्रातील ५४६ पानावरील ८० ते ८२ (मोरोबा विषयींच्या) ओव्या पुढील प्रमाणें आहेत :—

सहज स्थिति समाधि भोगीत। नित्य स्थिति राजयोग आचरित।
तुटलें बंधन समस्त। निजशांति नांदे अंतरीं॥ ८०॥

ब्रह्मानंदीं असे लीन झाल्यानंतर पंत मोरबाना सावध करून पुढें काय म्हणाले याचें वर्णन पुढील दोन ओव्यांत आहे :—

ऐसा ब्रह्मानंदीं लीन। निजभक्त देखोन।
श्रीपंत गुरु कृपाघन। सावध करिती तयासी॥ ८१॥
म्हणती आतां सावध होवोन सुखेवर्ते परिपूर्ण।
माझे नामाचा ध्वज जाण। उभविशी तूं त्रिलोकीं॥ ८२॥

यानंतर याच (५४६) पानावर आणि (५४७) पानावर एक अशा ४ ओव्या पंतगुरुचरित्रांत पुढीलप्रमाणें आहेत :—

ऐशापरी वर्तन। श्रीगुरुप्रसादें तयाप्रत।
कीर्तनस्फूर्तित्वरित। जाहली प्राप्त रसाळ॥ ८७॥
श्रीगुरुगुण-कीर्तन। रसाळवाणें करीत जाण।
श्रवण करितां भाविकजन। होती तल्लीन ते ठायीं॥ ८८॥
रसना रसाळवाणी होऊन, स्वात्मबोध सघन परिपूर्ण।
ओतप्रोत भरित जाण। आत्मानुभव ग्रंथ रचिला॥ ८९॥

अवधूत महाराजांच्या (गौरवांच्या) आणि कीर्तनाचा व 'आत्मानुभव' काव्याचा उल्लेख वरीलप्रमाणें केल्यानंतर या आत्मानुभवाची फलश्रुति पंत गुरुचरित्राच्या ५४७ पानावरील ९० व्या ओवींत पुढीलप्रमाणें वर्णिली आहे.

ते आत्मानुभवाचे श्लोक। वाचितां मूळ उद्धरे देख।
वर्णोनि श्रीगुरु-महिमा अनेक लाविले जन भक्तीसी॥ ९०॥

कित्येक गुरुपुत्रांना स्वतःच्या ज्ञानाचा अवास्तव गर्व असतो तर कित्येकांना द्रव्य संग्रहाची हाव असते. दोघेहि 'अधम' गुरुपुत्र असा शेरा मारून 'मोरोबा' (अवधूत महाराज) तसे नव्हते. या त्यांच्या गुणाचा गौरव करणाऱ्या पुढील ओव्या पंतगुरुचरित्राच्या ५० व्या अध्यायाचे अखेरीस पुढीलप्रमाणें आहेत. पान ५४७ ओव्या ९५ ते ९७

तैसा मोरोबा न होत। श्रीगुरूंचा एकनिष्ठ भक्त।
ज्यासि गुरुसेवा हा परमार्थ। जहाला असे अखंडित ॥ ९५ ॥
सुखदुःखांविरहित। श्रीपंतकृपे सहजस्थिति भोगित।
तारिले जन अमित। श्रीपंतनाम ध्वज फडकविला ॥ ९६ ॥

या चरित्र ग्रंथाला जोडलेल्या अनेक शिष्यभक्तांच्या आठवणीतून "अवधूत महाराजांनींच पंतांच्या अवधूत मार्गाचा ध्वज 'झेंडा' सर्वत्र प्रभावी प्रचारानें फडकाविला आणि तसें दुसऱ्या कोणाहि पंतभक्ताला साधलें नाहीं" अशी जी विधानें केली आहेत त्यांना श्रीपंत गुरुचरित्राच्या वर उल्लेख केलेल्या अनेक ओव्यांतून भक्कम आधार मिळत असल्यामुळेंच त्या सर्व ओव्यांचे उतारे वर दिले आहेत. यालाच आणखी दुजोरा देणाऱ्या आणि या आठवणीनें महत्त्वाची भर टाकणाऱ्या या चरित्रासोबत घेतां आल्या नाहींत.
कारण त्या आठवणी सांगणारे भक्त या आठवणी लिहून देण्याला हयात नाहींत.
श्री. कामत यांच्या पंतगुरु चरित्राच्या प्रस्तावनेंत श्री. दिवेकरांनींच लिहिलें आहे.

## पंतगुरुचरित्राची रचना कशी झाली

श्री. दत्तात्रय वामनपंत बाळेकुंद्री, पंतगुरुचरित्राचे लेखक श्री. वामन नरहर कामत यांच्या विषयीं लिहितात–'हे पंतांचे एक निष्ठावंत शिष्य होते. त्यांना सुमारें शके १८२१ मध्ये श्रीपंतांचा अनुग्रह झाल्याचा उल्लेख त्यांनीं पंतगुरुचरित्राच्या १३ व्या अध्यायात केला आहे. १८२१ नंतर अंदाजे ६ वर्षांनीं पंतांनीं देह ठेविला. वामनरावजींची घरची गरीबी असून शिक्षण मराठी तीन चार यत्ता पर्यंतच झाले होतें! एक दिवस......श्रीपंतांनी दृष्टांतांत त्याच्या तोंडांत विभूति घातली व 'श्रीपंत गुरुचरित्र' लिहिण्याचा आदेश दिला......काय लिहावे कसे लिहावें या संबंधीं कांहीच कल्पना त्याना करता न आल्यामुळे ते बेळगांवांतील पंतबंधूंच्या घरीं गेले. त्यांची जेवण्याची व राहण्याची व्यवस्था पंतबंधूंनीं केली. एक दिवस श्रीपंतांचा एक लेख त्यांच्या पाहण्यात आला. या मजकुराचा आधार घेऊन श्री. कामत

यांनीं शे दीडशे ओव्या लिहिल्या आणि माडीवर कोठें तरी आढ्याला ते कागद खोंचून ठेविले. एकदां पंतबंधु श्री. नरसिंहरावजींच्या हातीं ते कागद लागल्यावर त्यांनीं वाचून चौकशी केली तेव्हां त्यांना ते वामनराव कामत यांनीं लिहिल्याचें समजलें.

त्यांतील 'असामान्य सहज स्फूर्ति' व अलंकारिक प्रतिभापूर्ण भाषा वाचून नरसिंहरावजींना कौतुक वाटलें, आणि तेव्हांपासून त्यांनीं वामनरावांना लिहिण्याची सर्व सोय करून देऊन जरूर ती माहिती श्रीपंतशिष्यांच्या आठवणीसह त्यांना पुरविली. अशा रीतीने श्री. कामत यांनीं बावन अध्यायी श्रीपंतगुरुचरित्र ओवीबद्ध लिहून पुरें केलें" आणि त्याला अनुक्रमणिकेचा ५३ वा अध्याय जोडला.

## पंतांचें गद्य चरित्रकार सॉलिसिटर दिवेकर

सद्गुरु माहितीवरून दिसून येते कीं श्री. कामत यांनीं लिहिलेले हे 'पंत गुरुचरित्र' श्री पंतानीं स्वप्नांत दिलेल्या दृष्टांतरूप आशीर्वादाचे आधारें आणि पंतबंधूच्या सान्निध्यांतच त्यांनी पुरविलेल्या माहितीवरून लिहिलें. पंताचे गद्य चरित्र लिहिणारे श्री. केशवराव दिवेकर यांचेकडे चरित्र लिहिण्याकरितां पंतबंधूकडून जी संदर्भाचीं विपुल बाडें आलीं त्यांत हें चरित्रहि असणें साहजिकच आहे. कारण गद्य चरित्र लिहिणाऱ्याने ओवीबद्ध चरित्र संदर्भासह पाहणें अत्यावश्यक होते, हे ओवीबद्ध चरित्र १८४० ला लिहून तयार झालें आणि श्री. केशवराव दिवेकर सॉलिसिटर यांनी अश्विन शुद्ध १० शके १८५९ विजयादशमी दि. १४-१०-१९३७ रोजीं, गद्य चरित्र पुरें केल्याची नोंद प्रस्तावनेंत आहे.

अर्थात् ओवीबद्ध चरित्र शके १८४० मध्ये म्हणजे १९ वर्षें अगोदर पुरें झालेले त्यांच्या हातीं संदर्भासाठीं आलेंच असलें पाहिजे. इतका तपशील देण्याचें कारण हें कीं 'पंतगुचरित्रांत' आलेला मोरवांचा तथा अवधूत महाराजांचा उल्लेख 'पंतांच्या अवधूत मार्गाचा झेंडा (मोरवांनी) सर्वत्र फडकविल्याचा पंतबंधू आणि गद्यचरित्रलेखक श्री. केशवराव दिवेकर या सर्वांच्याच परिचयाचा असून त्यासाठीं पंतगुरुचरित्राचा सबंध ५० वा अध्याय श्री. कामत यांनीं लिहिला आहे, हेंहि श्रीपंताशीं जिव्हाळ्याचा संबंध असलेल्या सर्वांच्या विचारानेंच नोंदलें गेलें आहे!

प्रस्तुत चरित्रांत अनेक भक्तांनीं आपल्या आठवणीत 'अवधूत मार्गाचा झेंडा अवधूत महाराजांनीच सर्वत्र फडकाविला' या विधानाला पंतांनीं

स्वतःची कफनी मोरबांचे अंगावर घालून दिलेल्या अखेरच्या आदेशापासून तो पंतगुरुचरित्राच्या लेखन व प्रकाशनापर्यंत पुराव्याची नोंद आहे, हें वरील विस्तृत तपशिलावरून स्पष्ट झालें आहे.

अवधूत महाराजांच्या भक्तांपैकीं बरेच लोक आतां परलोकवासी झाले आहेत. बोलण्यातहि वरील विधानानां पुष्कळांकडून दुजोरा मिळे. खुद्द पंतबंधू गोविंददादा व पंतांच्या मातोश्री श्रीमती सीताबाई यांच्याकडून झालेल्या मोरबांचा तथा अवधूत महाराजांचा गौरव पुष्कळांनीं ऐकला तसा सांगितला त्याचा थोडा तपशील नमूद करण्यासारखा आहे.

## पंतबंधू व पंतमातुश्रींकडून अवधूत महाराजांचा गौरव

श्री. गोविंददादा म्हणत असत, " पंतांच्या अवधूत मार्गाचा प्रचार आणि ' प्रेम लहरी ' आबाल वृद्धांना प्रभावी भाषेंत बालबोध पद्धतीने समजून देण्याचे कार्य केले तें मोरबांनींच, इतर कोणाला ते साधले नाहीं ! " एका उत्सवाला मोरबा घरच्या कांहीं विशेष अडचणींमुळें येऊं शकले नाहींत. त्यावेळी पंतांच्या मातुश्री श्रीमती सीताबाई म्हणाल्या, " अहो, या उत्सवाला आमचा मोरू नसला कीं उत्सवाला रंग भरत नाहीं. " एकदां उत्सवांत कीर्तन व आत्मचर्चा ऐकल्यावर मातुश्री सीताबाई म्हणाल्या, इतका कां माझा दत्तू अध्यात्म बोधांत तरबेज होऊन अगदीं वरच्या पायरीला पोचला होता ? आज मोरूचें कीर्तन ऐकून मला खरी कल्पना आली ! " मोरबा तथा अवधूत महाराज म्हणाले, " अहो आई हें सर्व श्रीपंताच्या बोधाचा आणि आशिर्वादाचा प्रभाव ! माझ्या पदरचें काय ? श्रीपंत प्रेरणा करून बोलवितात तसा मी बोलतों " ' अवधूत मार्गाचा झेंडा सर्वत्र फडकत ठेवण्या इतकी अवधूत महाराजांची तयारी आतां पूर्ततेला गेली होती ' हे वरील तपशिलावरून वाचकांच्या आतां लक्षांत येण्यास हरकत नाहीं.

## चि. दत्तूला कीर्तनव्यवसायांत कां घातलें ?

आता मोरबांच्या स्वभावाचे वैशिष्ट्य कीर्तनाची त्यांची पद्धति, परमार्थ निरूपणाचे धोरण आणि त्यांच्या ठिकाणीं पूर्ततेला गेलेल्या अवधूत पंथाच्या तत्त्वज्ञानाचें मुख्य स्वरूप, यांची थोडक्यांत ओळख नमूद करून अवधूत महाराजांच्या या पुढील चरित्राकडे वळूं.

प्रत्यक्ष व्यवहारांतील त्यांच्या सहज स्वभावा विषयींची थोडीफार कल्पना वाचकांना येथपर्यंत आलीच असेल. लहान मुलांची त्यांना स्वाभाविक फार आवड होती. व्यवहारांतील कोणत्याहि प्रश्नांचा निर्णय ते त्वरित व अचूक ठरवीत. सर्वच मुलांविषयीं त्यांना फार प्रेम व आवड असे; मग स्वतःच्या मुलाविषयी असणें स्वाभाविकच होय. आपला पहिला मुलगा अशक्त व डोळ्यांनी अधू असल्याचें त्यांच्या लक्षांत आलें, तो लहानपणीं दुखण्यामुळें व अशक्तपणामुळें फार रडे, तेव्हां त्याचें पाळण्यांतील 'विनायक' या नावाऐवजीं त्यांनीं त्याला 'दत्त म्हणून लौकिक नांव ठेवल्याबरोबर तो रडायचा बंद झाला, याचा उल्लेख मागे आलाच आहे! चि. 'दत्तू'च्या तब्येतीचा विचार करून त्यांनीं मनाशीं त्वरित निर्णय ठरविला कीं या मुलाची शालेय-शिक्षणात प्रगति होणें संभवनीय नसल्यामुळें, आपल्या कीर्तन-व्यवसायांतच त्याला तरबेज करावयाचा. या मुलाला वागविण्यात त्याच्या लहानपणापासूनच, अवधूत महाराजांनीं हें धोरण ठेविलें होते. आई-वडिलांचा आणि वडिलधाऱ्या माणसांचा योग्य मान ठेवावयाचा ही शिकवण या मुलाला व पुढील दोन्हीहि मुलांना—महाराजांच्या स्वतःच्या वागण्यावरून मिळालीच; पण 'या पहिल्या मुलाला कीर्तन व्यवसायांतच चालावयाचा, असा महाराजांनी आपल्या मनाचा निश्चय त्वरित केला आणि तशी शिकवणहि लहांनपणापासून या मुलाला देण्यावर कटाक्ष ठेविला. चि. दत्तूला महाराजांनीं उभ्या आयुष्यांत फक्त दोनच वेळा मारलें अशी आठवण महाराजांचे वडील सुपुत्र सांगतात! एकदां आपल्या आईला वयाच्या ५ व्या वर्षी उलट उत्तर दिलेलें ऐकून त्याला चार चापट्यांचा प्रसाद महाराजांकडून मिळाला; त्यानंतर वयाच्या नवव्या वर्षी मुंबईच्या एका कीर्तन फेरीत, फणसवाडीत खत्तर गल्लीनजीक मारवाडी विद्यालयांत महाराजांचा मुक्काम असतांना, "दिवसा खेळून दमतो आणि रात्रीं कीर्तनाचे वेळीं कीर्तन ऐकावयास न बसतां झोंपतो" म्हणून एकदांच खरपूस प्रसाद दिला! त्यावेळीं साथीला असलेले श्री नामदेव दंडवते व आजोबा अप्पा काका यांनीं चि. दत्तूला सोडविले!

"त्यानंतर मी कीर्तन ऐकावयास कधीं चुकलों नाहीं आणि महाराजांनींहि मला हात उगारून कधी धाक देखील दाखविला नाहीं" असेंहि महाराजांचे वडील सुपुत्र श्री. दत्त महाराज उर्फ अण्णा सांगतात.

## मुलांची अत्यंत आवड

मुलांविषयीं अवधूत महाराजांना किती आवड व प्रेम होतें. या विषयीं नमूद केलेल्या आठवणींत महाराजांचे जामात श्री. द. कृ. देवधर म्हणतात, "अंदाजें

१९०४ साल असावे (प्लेगच्या सांथीचा कहर होता) कुरुंदवाडच्या सरकारी मळ्याशेजारीं आम्ही झोंपडीत रहात होतो. आमच्या शेजारींच महाराजांचे वडील श्री. अप्पाकाका दातार यांचीहि झोंपडी होती. एके दिवशी दोन प्रहरीं एक बैलगाडी या झोपड्यानजीक येऊन उभी राहिली. गाडींतून महाराज व त्यांच्या पत्नी सौ. कमलाबाई खालीं उतरल्याबरोबर बाहेर खेळत असलेल्या मुलांची गर्दी त्या दोघांभोंवतीं जमा झाली, त्यांत मीही होतों. दोघांचे मागून सर्व मुलें झोंपडींत शिरली व मी झोपडीच्या दरवाजाशींच उभा राहिलों. झोंपडींत महाराजांचे वडील श्री. अप्पाकाका व मातुश्री होत्या. यावेळीं महाराजांना मी प्रथम पाहिलें. हे कोणी मोठें गृहस्थ आहेत, असे वाटलें. उणीपुरी उंची, भव्य आकृति, भरदार मिशा गौर वर्ण, घारे डोळे, अशी आकृति माझ्या बालमनावर कोरली गेली! गडबड करणाऱ्या मुलांना दमदाटी करण्याचा आव त्यांनीं आणला, पण गालांतल्या गालांत ते हंसतच होते! त्यांना मुलें हवी होती पण त्यांचा दंगा नको होतासें दिसलें! इतक्यात महाराजांच्या पत्नि सौ. कमलाबाई यांनीं थोडा थोडा खाऊ मुलांचे हातावर ठेविला. मी सर्वांत लहान असल्यामुळें व झोंपडीच्या दरवाजाशीच उभा असल्यामुळें माझ्या हातावर कांहीं नाही, म्हणून थोडा हिरमुसलो होतो! हें पाहून महाराजांनीं खुणेनें सुचविल्यावर माझ्याहि हातावर खाऊ पडला! त्यावेळीं मी उड्या मारीतच बाहेर पडलों! "याच मुलाला १९१४ साली आपली मुलगी देणार आहों" अशी त्यावेळी महाराजांना काय कल्पना!

## महाराजांचे अंतःकरणांत लोकसंग्रह व विश्वबंधुत्वाचें बीज

वडील बंधु श्री. अण्णा देवघर यांनी अवधूत महाराजांविषयीं सांगितलेली आठवण श्री. द. कृ. देवघर यांनीं पुढीलप्रमाणें नमूद केली आहे. "अंदाजें १९०७ साल असावें. माझे बंधु श्री. अण्णाराव, श्री. घारपुरे यांचे घरीं सांगलींस शिक्षणासाठीं होते. महाराज घारपुरे यांचेकडे जात येत असत. एकादां महाराज आले त्यावेळीं घारपुरे यांचेकडे बरीच पाहुणे मंडळी जमली होती. त्यामुळें श्री. अण्णा देवघर यांची थोडी खाण्यापिण्याची आबाळ होत असलेली महाराजांचे लक्षांत आली. तेव्हां त्यांनीं माझ्या बंधूंच्या अडचणी दूर करण्याची आस्थापूर्वक व्यवस्था केली. गरजू मुलाला आस्थेने वागवून त्याच्याशीं आपुलकीनें वागावयाचें हा महाराजांचा तारुण्यातहि सहज स्वभाव होता. एकंदरींत लोकसंग्रह व विश्वबंधुत्वाचे बीज महाराजांचे अंतःकरणांत या वयातहि वाढीला लागले होते"

## जातिभेद निरपेक्ष अन्नदान : 'आधुनिक काळांतील यज्ञ'

कुरुंदवाडास लेलेबंधूचे घरीं होत असलेल्या दत्तंजन्मोत्सवापासून ते अडगांवस श्रीदत्तअवधू मठी स्थापन करून होत असलेल्या सर्व उत्सवांत जातिभेद निरपेक्ष अन्नप्रसाद संतर्पण करण्याची वहिवाट अवधूत महाराजांनीं सुरू केली व ती अद्यापि तितक्याच आस्थेनें त्यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज चालवीत आहेत !

लेले बंधूच्या घरी होत असलेल्या उत्सवांत अवधूत महाराजांची कीर्तनें होत. पालखीचा थाट तर औरच असे ! महाराज, श्रीमंत भाऊसाहेब मंहराजांचे सहाध्यायी असल्यामुळें, पालखीच्या मिरवणुकीकरता त्यांच्या कडून, हत्ती, घोडे, लगे-डंका यासह सर्व सरकारी लवाजमा श्रीमंत भाऊसाहेब मोठ्या आनंदानें देत असत. शेवटच्या दिवशीं भंडारा होई आणि तेव्हां जातिभेद निरपेक्ष मुक्त हस्तानें अन्नदान होई.

महाराज त्यावेळीं मत व्यक्त करीत कीं, असे उत्सव हेच आधुनिक काळांतील यज्ञ होत ! या उत्सवांत वेदोक्त कर्में व्हावींत विद्वान् ब्राह्मणांना यथाशक्ति दक्षिणा देऊन त्यांच्या विद्वत्तेला प्रोत्साहन द्यावें. आणि मुक्तहस्तानें अन्नदान करून भजनाचा जल्लोष करावा.

## अवधूत महाराजांच्या किर्तनाचा एक विशेष

अवधूत महाराजांच्या कीर्तनांत व्यक्ति विषयक टीका मुळींच नसे. कांही श्रोतृवर्गाला खूण करून हंसविण्यासाठीं प्रचलित चालीरीति स्त्रीशिक्षण व स्त्रियांच्या फॅशन्स व पेहेराव, राजकीय परिस्थिति, सामाजिक सुधारणा वगैरेंवर रसभरित टीकास्त्र कांहीं रहदास सोडतात ! पण अवधूत महाराजांच्या कीर्तनात असल्या टीका वर्ज असत. केवळ 'लोकांना आवडते' म्हणून अवधूत महाराजांनीं कधींहि विषयांतर करून अन्य विषयांवर टीका करीत नसत असें अनेकांनीं आपापल्या आठवणींत सांगितलें आहे. 'राष्ट्रीय कीर्तनकारांनीं त्या काळांतील आमदानीवरहि टीका करून त्या सरकारचा रोष ओढवून घेतला होता !' अवधूत महाराजांकडे एका भक्तानें हा विषय काढला त्यावेळीं श्रीअवधूत महाराज म्हणाले, "धार्मिक सामाजिक व राजकीय बाबींची कोणीहि गल्लत करूं नये" महाराज आपल्या कीर्तनांत कधींहि सामाजिक व राजकीय विषयांचे वादग्रस्त प्रश्न उपस्थित करीत नसत. त्यांनीं आपली कीर्तनाची सरळ पद्धति कधींहि सोडली नाहीं. ते म्हणत "आम्ही तत्त्वज्ञान विषयक वेदांताची पेठ उघडली आहे. कोणतेंहि सणंग उचललें तरी त्यांत वेदांतविषय असावयाचाच ! गिऱ्हाईकानें म्हणजे श्रोत्यानें, आपल्या आवडीप्रमाणें योग्यतेप्रमाणें आणि कोणताही सणंग

उचलावा. ज्ञान, कर्म, भक्ति, वैराग्य हे अस त्या कीर्तनरूपी पेटेंतील खणंग."

कांहीं पुराणमतवादी लोक अवधूतमहाराजांच्या कीर्तनावर टीका करून म्हणत, "त्यांच्या कीर्तनाला परंपरा नाहीं, रामायण, महाभारत वगैरेतील आख्यानें नाहींत. शास्त्रोक्त सगीत गाणीं नाहींत आणि नको त्या गोष्टी सांगतात! इतका उघडा वेदांत बहुजन समाजापुढें मांडूं नये" पुराण मतवादी लोकांची ही टीका व आरोप जुनाच आहे! सातशे वर्षांपूर्वी ज्ञानेश्वर महाराजांनीं महाभारतांतील भगवद्गीतेवर मराठी भाषेत ओवीबद्ध ग्रंथ लिहिला त्यावेळींहि काशीच्या व पैठणच्या शास्त्री पंडितानीं असेंच काहूर उठविलें होतें! नामदेव, तुकाराम व रामदास, यांचाहि प्राकृत भाषेत वेदांत प्रतिपादन केल्याबद्दल थोडाथोडका छळ झाला नाही! **नाथ–सांप्रदायांतील गुरुपरंपरेनें प्राप्त झालेला मराठी भाषेंतील ठेवा म्हणजेच ज्ञानेश्वरी.** ज्ञानेश्वरीनें हा ठेवा उघडा करून संस्कृत न कळणाऱ्यांकरितां ठेविला, असें ज्ञानेश्वर कंठरवानें आवर्जुन सांगतात! याच पंथांतील प्रमुख प्रमुख नाथांवर अवधूत महाराजांनीं आख्यानें रचलीं आणि ती कीर्तनांत गाईली. या कीर्तन शैलीनें बहुजन समाज रंगून जाई व त्यांचीं मनें कीर्तनांतील पूर्वरंग व उत्तर रंगाकडे खेंचलीं जात। बहुजनसमाजांत ही वाढती लोकप्रियता, अहंमन्य शास्त्री पंडितांना सहन होत नसे. अवधूत महाराजांच्या कीर्तनाला या लोकांनीं अनेक प्रकारांनी अडथळे केले! फार काय, मुंबई शहरांत महाराजांना मारून कीर्तन उधळून लावण्यासाठीं भाडोत्री मारेकरी घालण्यापर्यंतहि या लोकांच्या विरोधी व मत्सरी द्वेषाची मजल गेली होती! पण महाराजांच्या धीरोदात्त वर्तनामुळें हे मारेकरीच लाजून त्यांना शरण आल्याची आठवण मुंबईच्या एका सुशिक्षित भक्तानें सांगितली आहे! असा त्रास देऊन छळ करू पाहणाऱ्या दुष्ट लोकांवरहि महाराजांनीं कीर्तनांत कधीं टीका केली नाही. कीर्तनास येणाऱ्या स्त्रियांनाहि त्रास या लोकांनीं दिला! पण कांहीहि परिणाम न होतां अवधूत महाराजांची लोकप्रियता वाढतच गेली. आणि ते कीर्तन करीत होते तोंपर्यंत पुणे मुंबई शहरांत व आसपासच्या उपनगरांत ती लोकप्रियता कायम राहिली.

नवमतवादी हायस्कूल कॉलेजांतील तरुणांना अवधूत महाराजांची कीर्तनें आवडत असा कांही भक्तांच्या आठवणीत उल्लेख आहे.

## त्या वेळेची सामाजिक परिस्थिति

अवधूत महाराज नित्य व्यवहारांत सोंवळे ओवळे पाळीत नसत. स्पर्शास्पर्श वगैरे भेदाभेदहि पाळीत नसत. पूर्ण विचार करूनच त्यांनीं स्पर्शास्पर्श व्यवहार

भेदाला तिलांजली दिली होती. महात्मागांधीच्या कालापासून ज्या महार-चांभारादींना 'हरिजन' म्हणतात त्यांच्यापासून ब्राह्मणांपर्यंत महाराजांचे व्यवहारांत स्पर्शास्पर्श भेदाभेद नव्हता. मुंबईंत एकाकाळी चौरंगी पंचरंगी सामन्यांत गाजलेले क्रिकेटपटु बाळू, शिवराम, विठ्ठल हे तीघेहि हरिजनबंधु अवधूत महाराजांचे भक्त होते व त्यांच्या बैठकीवर समानभावनेनें येऊन बसत ! यामुळें अवधूत महाराजांवर त्या काळांतील 'सनातनी' म्हणवून घेणारे सोवळे ब्राह्मण टीका करीत असत !

म्हणूनच त्या काळांतील ब्राह्मण वर्गाची सामाजिक स्थिती कशी होती, या विषयीं थोडी माहिती नमूद करण्यासारखी आहे.

## त्या काळांतील ब्राह्मण वर्गाची सामाजिक स्थिति

त्या काळीं गणपती उत्सवासारख्या सार्वजनिक धार्मिक उत्सवांत थोडेसें स्पर्शास्पर्श मर्यादेचें उल्लंघन झाल्यास ब्राह्मण समाजांत मोठें काहूर उठे ! स्नान संध्यादि कर्मठपणाला ब्राह्मण समाजांत अजूनहि महत्व दिलें जाई. कर्मठ व कर्मनिष्ठ ब्राह्मणाला समाजांत मान मिळे, ब्राह्मण वर्गांतहि सुशिक्षितपणाची पातळी कमी होती. शहरांत शाळा होत्या. लहान वस्तीच्या गावांत प्राथमिक शाळा निघाल्या होत्या. उत्तम हस्ताक्षर व हिशेब ठेवण्या इतकें गणीत, इतपत शिक्षण पुरेसें समजलें जात असे ! रामायण, महाभारतावरील प्रवचनें, पुराणें, कथा, कीर्तनें ही बहुश्रुतपणाची साधने होतीं. वर्तमानपत्रें फार प्रचारांत नव्हती. अर्थात् मासिकें त्याहून कमी होतीं. लोकांना वर्तमानपत्रें व मासिकादि वाङ्मयाची गोडी उत्पन्न झालेली नव्हती. अर्थात् जागतिक राजकारण व समाजस्थिति याविषयीं आजकालसारखा बहुश्रुतणा त्यावेळीं नव्हता.

## अवधूत मार्गाची आगळी पद्धत

अवधूत महाराजांचे गुरु पंत बाळेकुंद्रीकर यांनीं महाराजांना 'माझ्या नावानें भीक माग' असा आदेश दिला होता, तो महाराजांनीं पाळला. गुरूची आज्ञा शिरसावंद्य मानून व त्यांच्या नाथ सांप्रदायांतील नाथ विभूतींवर आख्यानें रचून ती उत्तर रंगात वापरलीं आणि स्वतः रचलेलीं पदें व श्लोक आणि पंतवाङ्मयांतील पदें यांचा उपयोग करून भक्तिप्रेमपर अवधूत मार्गाचे कीर्तन करीत. त्यावरच त्यांचा योगक्षेम होऊं लागला. पूर्वरंगांत निर्मळ वेदांत विषयच सोप्या शब्दांनीं सांगत. बहुजन समाजाला समजेल असेंच पूर्व रंगांतील निरूपण साधें व

सुबोध असे. "पण आत्मज्ञानपर वेदांताचा उपदेश ब्राह्मणांशिवाय कोणालाही करूं नये" अशा दुराग्रही अभिमानाचे बरेच लोक पांढरपेशा वर्गांत त्यावेळीं असल्या-मुळें त्यांची टीका महाराजांच्या कीर्तनावर होत असे!

## सामान्य जनांच्या उद्धारासाठीं वेदांत प्रचार

वास्तविक भगवान् श्रीकृष्णांनी सर्वांकरितां आत्मज्ञान सोपें व सुलभ व्हावें म्हणून अर्जुनाला निमित्त करून गीता सांगितली, हें खालील श्लोकांवरून स्पष्ट होण्यासारखें आहे:—

मांहि पार्थ व्यपाश्रित्य येऽपिस्युः पापयोनयः।
स्त्रियो वैश्याः तथा शूद्राः तेऽपि यांति परांगतिम्॥

सदरील श्लोकाचा भावार्थ हा कीं, 'स्त्रिया, वैश्य, शूद्र व चांडाळ हेहि भक्तिपूर्वक परमेश्वराविषयीं श्रद्धा ठेवून वागतील तर, तर तेहि ब्राह्मण-क्षत्रिया-इतकीच परमश्रेष्ठ गति प्राप्त करून घेण्याला पात्र आहेत.' हा भगवद्गीतेंत श्रीकृष्ण परमात्म्यानीं सांगितलेला ठाम सिद्धान्त आहे.

अर्थात् पूर्वरंगांत श्री अवधूत महाराजांनीं सोप्या सुबोध भाषेंत सामान्य जनांना वेदांताचीं तत्त्वें ऐकविलीं, हें त्यांचे कार्य वैदिक धर्माला पूर्ण धरूनच होतें. वैदिक तत्त्वज्ञान, नीति व आचार हीं आपल्या धर्माचीं तीन अंगें आहेत. तत्त्वज्ञान व नीति आणि तिला अनुसरून आचरण ही हिंदूंच्या सर्वच जातीजमातींना आवश्यक आहेत, याविषयीं कोणाचाहि मतभेद असण्याचें कारण नाहीं. अवधूत महाराजांनी सनातनी सदाचारांबद्दल आग्रह कधींच धरला नाहीं. ज्यानें त्यानें आपापला कुलधर्म व इतर आचारधर्म आपल्या पेशाला अनुसरून आपापल्या कुवतीप्रमाणें पाळावा अशी त्यांची सर्वांनाच शिकवण असे.

महाराजांचे अनुग्रहीत जामात श्री. द. कृ. देवधरांचे वडील बंधू विनायकराव दादा पोस्ट खात्यांत नोकरीवर असतांना १९१२–१३ सालीं, सातारा जिल्ह्यांतील तासगावी होते. तेथें अवधूत-महाराजांची कीर्तनें चालू होती त्यावेळीं ते कीर्तन-श्रवणास जात. श्री. दादा देवधर यांचे दासबोध ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथाचें बरेंच वाचन आणि चिंतन-मनन असे. त्यांची व अवधूत महाराजांची कुरुंदवाडास पूर्वीच ओळख होती. महाराजांचें कीर्तन ऐकल्यावर श्री. दादा म्हणाले "अवधूत महाराजांचे कीर्तनांत मला बऱ्याच नवीन गोष्टी ऐकावयास मिळाल्या."

" महाराज एक आत्मसाक्षात्कारी पुरुष आहेत. त्यांचे पूर्वसुकृत खचित फार चांगलें असलें पाहिजे. योगभ्रष्ट पुरुष पवित्र आणि आध्यात्मिक दृष्टीच्या घराण्यांत पुनः जन्म घेतात व पूर्वजन्मीचा अर्धवट राहिलेला बुद्धियोग त्यांना प्राप्त होतो. महाराज राजयोगी होते. "

## वैभवशाली आध्यात्मिक दृष्टि

श्री. द. कृ. देवघर यांचे वडील बंधू श्री. विनायकराव देवघर हे ज्ञानेश्वरी, दासबोध इत्यादि आध्यात्मिक वाङ्मयाचे चांगले चिकत्सक अभ्यासू होते. आधुनिक इंग्रजी शिक्षणाचा कॉलेज शिक्षणापर्यंत संस्कार होऊनच त्यांनीं घरची परिस्थिति सुधारण्याकरितां पोस्टखात्यांत नोकरी धरली होती. अशा चिकित्सक आधुनिक दृष्टीच्या अभ्यासूनें अवधूत महाराजांचे कीर्तन श्रवण करून त्यांना ' राजयोगी ' का म्हटलें आणि त्यांची आध्यात्मिक दृष्टि वैभवशाली कशी, याविषयींचा एक अद्यावत् विचारप्रवाहाचा उल्लेख, या वर्णनाला अनुसरून करणें उचितच ठरेल. ऑक्टोबर-नोव्हेंबर १९६४ मध्ये वर्ध्यानजीक सर्वोदयी ग्रामसेवकांपुढें आचार्य विनोबा भावे, या महात्मा गांधींचे कार्य पुढें चालविणाऱ्या, थोर विभूतीनें ( त्यांच्याच शब्दांत सांगावयाचे तर ) ' स्वैर चिंतनपर ' भाषण केलें. महाराष्ट्र व ज्ञानेश्वरी यांची सांगड या भाषणांत घातली असून ज्ञानेश्वरांनीं :' अमृताचे कल्लोळ ' असें ' ब्रह्मविद्येचा सुकाळ ' करणाऱ्या या भाषेचें वर्णन केलें आहे—

इये मराठीचिये नगरी । ब्रह्मविद्येचा सुकाळ करी ॥
देणे घेणे सुखचि वरी । ही देईं या जगा ॥

नंतर ब्रह्मविद्येचा सुकाळ करणारा आणि ' विश्व होऊन विश्वामाजीं विचरणाऱ्या ' कीर्तनकाराचाहि उल्लेख या ' स्वैरचिंतनपर ' भाषणांत आहे तो असा—

विचरे विश्व होऊनी । विश्वामाजीं ॥

विश्वामध्यें विश्व बनून हिंडतों, असा कीर्तनकार निघावा. तो सर्व लोकांना रिझवीत चालला आहे. उज्ज्वल करीत चालला आहे. ( असा कीर्तनकार असावा. )

नाम घोष-गौरवें । धवळलें विश्व ॥

नामघोषानें विश्व उजळून टाकलें ! ज्ञानदेवांच्या भाषेंत विश्वापेक्षां कमी शब्द नाहीं. विश्वाचें आर्त माझ्या मनीं प्रकाशलें ॥ सबंध जगाचें दुःख माझ्या मनांत प्रगट झालें आहे. अशी शिकवण महाराष्ट्राला ( मराठी ) साहित्याच्या उगमस्थानीं

लाभली आहे. मराठी, भाषिकांना अगदीं लहानपणीं मिळालेलें हें बाळकडूच नव्हे तर बालामृत आहे !

'मराठी भाषेच्या या बालामृताविषयीं' आपल्या 'स्वैर चिंतनांत' आचार्य विनोबा भावे यांनीं जे भाषण केलें त्यांतील भाषा कीर्तन व विश्वबंधुत्व इत्यादि वर्णनें अवधूत महाराजाची सुबोध भाषा, कीर्तन पद्धति व विश्व-बंधुत्वाचें तत्त्वज्ञान (सर्वांभूति सम) यांना लागूं पडते यामुळे तीं अवधूत महाराजांच्या अनेक अनुग्रहीतांना व भक्तांना फार आवडल्यामुळें वारंवार वाचण्याचा मोह होतो. वाचक भक्तांनाहि असाच मोह होणें स्वाभाविक असल्यामुळें हे स्वैरविचार सर्वच्या सर्व यापुढें उद्धृत केलें आहेत :—

## महाराष्ट्राबरोबरच आचार्य विनोबांना ज्ञानेश्वर आठवतात

### आचार्य विनोबांनीं सर्वोदयी सेवकांपुढें १९६४ सालीं केलेल्या एका निवेदनांत—

महाराष्ट्राचें स्मरण झाल्याबरोबर मला पहिलें स्मरण ज्ञानदेव महाराजांचें होतें आणि त्यांनीं जो बोल काढला तो आठवतो—

माझा मऱ्हाठाचि बोल कौतुकें परि अमृतातेंही पैजा जिंकें ऐसी अक्षरें रसिकें मेळवीन ।

—मी मराठींत बोलणार आणि सहज बोलणार आणि तो बोल असा कीं तो अमृतालाहि जिंकणारा आहे ! ज्ञानदेवांनीं एके ठिकाणीं म्हटलें–'माधुर्य पायीं घाली !' साक्षात् माधुर्य सुद्धां लोटांगण घालील. त्यांच्या सबंध ग्रंथांत कटु शब्द नाहीं. आतां हा विशेष कांहीं महाराष्ट्रांचा किंवा मराठी भाषेचा म्हणतां येत नाहीं. तो ज्ञानदेव महाराजांचा विशेष आहे.

बोलावें कसें ! ज्ञानदेव महाराज म्हणतात—

साच आणि मवाळ मितले आणि रसाळ शब्द जैसे कल्लोळ अमृताचे ॥

त्यांना अमृताशिवाय लहान उपमा सुचतच नाहीं! मला पुष्कळदां वाटतें, ज्ञानदेवांची एवढी जरी शिकवण अंगीं मुरली तरी आपण जग जिंकू !

आणखी ज्ञानदेवांनीं उपमा दिली आहे–उपमा देण्यांत ते सम्राटच आहेत–जसें गंगेचें पाणी असतें. इतकें मऊ कीं बुडबुळाला देखील त्रास देत नाहीं. आणि असे असूनसुद्धां इतकें प्रखर कीं खडकहि भेदतें ! वाणीमध्यें खडकाला भेदणारें

सत्य प्रगट व्हावें आणि तें प्रगट करतांना इतक्या माधुर्यानें प्रगट व्हावें कीं ऐकणाऱ्याच्या हृदयाला शीतलता येईल.

तोडायाला संदेह जैसें तीक्ष्ण लोह आन्यत्वें तरी हें माधुर्य पायीं घाली

शब्द बुद्धीला झोंबावा, पण त्यानें हृदय रिझवावें, शब्द हृदयाला झोंबणारा नसावा. अशी मर्यादा ज्ञानदेवांनीं घालून दिली. जर ती पाळली तर जगांतील कितीतरी समस्या त्या मर्यादेनें सुटतील !

मग कर्तव्य काय ? ह्याबाबत बोलतांना म्हणतात—

इये मऱ्हाटीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळ करी

देणेंघेणें सुखचि वरी ही देईं या जगा

ह्या महाराष्ट्रांत ब्रह्मविद्या सार्वजनिक झाली पाहिजे. ब्रह्मविद्या कशी ? सुखच द्यावें आणि सुखच घ्यावें. सुखाची देवघेव करावी. हें ब्रह्मविद्येचें जीवनांतील स्वरूप होय अशी त्यांची शिकवण. ह्यांत कर्तव्यबोध हा दिला कीं, ब्रह्मविद्येचा प्रचार व्हावा.

## ज्ञानदेवांचा विश्वात्मभाव

चिंतन करतांना ज्ञानदेव विश्वापेक्षां कमी बोलतच नाहींत.

आतां विश्वात्मकें देवें येणें वाग्यज्ञें तोषावें

हा जो वाग्यज्ञ झाला त्यानें विश्वात्मक देव संतुष्ट होवो. आणि भक्ताचें लक्षण सांगितलें—

हें विश्वचि माझें घर । ऐसी मति जयाची स्थिर ॥

स्थितप्रज्ञाचा विहार वर्णन करतांना म्हणतात—

विचरे विश्व होऊनी । विश्वामाजी ॥

विश्वामध्यें विश्व बनून हिंडतो, असा कीर्तनकार निघावा. सर्व लोकांना रिझवीत चालला आहे. नाम-लावण्यानें विश्व उज्ज्वल करीत चालला आहे.

नामघोष गौरवें । धवळलें विश्व ॥

नामघोषानें गौरवें । धवळलें विश्व-ज्ञानदेवांच्या वाणींत विश्वापेक्षां कमी शब्द नाहीं.

विश्वाचें आर्त माझ्या । मनीं प्रकाशलें ॥

सबंध जगाचें दुःख माझ्या मनांत प्रगट झालें आहे. तेव्हां अशी शिकवण महाराष्ट्राला साहित्याच्या उगमस्थानीं लाभली आहे. म्हणजे हें आपल्याला सगळ्या मराठी भाषिकांना अगदीं लहानपणीं मिळालेलें बाळकडू नव्हे तर बालामृत आहे. महाराष्ट्राचा स्वभाव कसा आहे तें आपण जाणतों. तो कसा असावा हें ज्ञानदेवांनीं सांगितलें आहे कीं तो असावा.

## 'अणुप्रमाण भासला'

"विश्वाचें आर्त माझ्या मनीं प्रकाशलें !" मी सहज ह्या वचनाचा विचार करीत येथें येत होतों तेव्हां आजच्या सभेंत कांहीं विचार करून न येतां स्वैरचिंतन करीन असें ठरवून आलों. विश्वापेक्षां कमी बोलायचें नाहीं. ज्ञानदेवांना अणुयुग येणार ह्याची कल्पना आलेली दिसते !

'बापरखुमादेवीवरू । अणुप्रमाणें भासला'

मला भगवान् अणूप्रमाणें दिसूं लागले असें ज्ञानदेव म्हणाले. त्यांच्या प्रतिभेला अणूयुगाची कल्पना आलेली दिसते. ती आतां प्रगट झालेली अणुशक्ति हिंसक शक्ति नाहीं. ती संहारक शक्ति आहे. आणि ती सर्जक होऊं शकते. ती सर्जक तशी संहारक शक्ति आहे. ती हिंसक नाहीं. सर्जनांतहि हिंसा होते आणि संहारांत तर होतेच होते. ती होत असली तरी अणुशक्ति ही स्वयमेव हिंसाशक्ति नाहीं ती अक्षोभशक्ति, विज्ञानशक्ति आहे. आणि तिच्या संहाराची गंमत अशी कीं ती समानतेनें संहार करते. लढणारे, माणसें, जनावरें, हा कसलाच भेद ती करीत नाहीं. ज्या दोन राष्ट्रांचे युद्ध होईल त्यांच्यापुरताच संहार मर्यादित राहतो असेंहि नाहीं. बरेंवाईट हा देखील भेद तिच्याजवळ नाहीं. अगदीं सर्वांना साफच ती करते !

## अज्ञान खुलें होत आहे

अणुयुगांत ही संहारक शक्ति जशी हातात आली तशी सर्जक शक्तिहि हातांत आली आहे. आतां कांहीं दिवसांनीं एका माणसाचा अवयव दुसऱ्याला लावतां येईल. जनावराचा माणसाला लावतां येईल. जसे माणसाचे भाग लावतां येतील आणि स्वतंत्र रीतीनें माणूस प्रयोगशाळेंतहि निर्माण करतां येईल. मेलेले उठवतां येतील. आतां विमान नुकतेंच चंद्रावर जाऊन पोहोंचलें आहे. तेव्हां ज्ञानदेव जें विश्व म्हणतो तें अनुभवणें संभवनीय आहे. चंद्र आणि पृथ्वी ह्यांच्यांत व्यवहार चालणें शक्य आहे.

जेव्हां मी कल्पना करतों तेव्हा एका नवीन सृष्टीचें दर्शन उभें राहतें. पांच इंद्रियांचा मनुष्य आपल्याला माहीत आहे. त्यापेक्षां कमी, चार-तीन-दोन इंद्रियांचें प्राणी आपल्याला माहीत आहेत. तसे सहा सात इंद्रियांचे प्राणीसुद्धां इतर ग्रहांवर सांपडणें अशक्य नाहीं. पुढें काय होईल पाहूं लागलों कीं बुद्धि कुंठित होते! तें अज्ञात अज्ञातच असलें तरी बरेंच ज्ञात होत आहे. रेडियो ॲस्टॉनॉमी सांगतें कीं आज ब्रह्मांडाच्या एका टोंकाला लाखो चंद्र आणि कोट्यावधि सूर्य आहेत, असें विज्ञानानें क्षेत्र उघडलें आहे!!

"अनंतकोटि ब्रह्मांडनायका! माझे अपराध क्षमा कर!" ह्या अनंतकोटिब्रह्मांडाच्या पलीकडे शब्द नाहीं. अशी ही विशाल सृष्टि पूर्वी जी मनांत होती, ती आतां डोळ्यांत येऊं लागली आहे, पूर्वीं जी कामें दहा वर्षांत व्हावयाचीं तीं आतां दहा मिनिटांत होतात! हिमालया-सारखे मोठे डोंगर आणि पॅसिफिकसारखे महासमुद्राचे तळ माणसासमोर लहान झाले आहेत. अमेरिका आणि जपानमधील अंतर बारा हजार मैल होतें. आतां तें आतां 'फक्त बारा मैल' राहिलें आहे. तीं दोन शेजारी राष्ट्रें झालीं आहेत. एका देशांतील घटनेचा परिणाम दुसऱ्या देशावर होत असतो. म्हणून आतां कोठें भांडण झालें तर दहा हजार मैलांवरील राष्ट्रें त्यांत मध्यें पडतात. नाना फडणवीस हा त्या काळचा मुत्सद्दी खंडाळ्याच्या घाटापासून पुण्यापर्यंतच्या रस्त्याची चिंता करीत असे. आतांच्या मुत्सद्यांसमोर विश्वांगण असतें.

## भाव प्रधान, क्रिया गौण

आम्ही यापुढें जें काम करू त्याचें भावमूल्य विश्वाएवढें झालें पाहिजे. म्हणून मी म्हणत असतों कीं आतां जो सत्याग्रह होईल तो भावप्रधान राहील. क्रिया गौण होईल. होमीओपाथीत असतें ना? औषध कमी, साखर जास्त. पोटेन्सी वाढवायची तर साखर घालायची व घोटायचें. त्याची शक्ति वाढवायची. येथें औषध ही क्रिया आहे आणि साखर हा 'भाव' आहे. क्रिया जितकी कमी, भावशक्ति जितकी वाढवाल तितकी शक्ति अधिक वाढेल. ज्ञानदेवांनीं म्हटलें—'तयाची क्रिया ढाळेढाळे। गळती आहे' क्रिया कमी होत जाणार. ते दिवस आतां आले आहेत. आमच्या कार्यांत धांदल हालचाल ह्याचे महत्व कमी होईल आणि कार्यांत केवढी भावशक्ती ओतली ह्याचें महत्त्व असेल. म्हणून ह्यापुढील सत्याग्रह भावनेनें वाढेल आणि क्रियेनें कमी होईल. बघतां बघतां पूर्वींच्या शोधकांनीं शोधलेले शोध मागें पडले. साधनें गौण ठरलीं. नवीन साधनांची गरज निर्माण झाली.

'साम्यसूत्रांत लिहिलें आहे 'क्रियोपरम वीर्यवत्तरम। ' क्रियेचा जेवढा उपशम होईल तेवढें कार्य वीर्यवत्तर होईल. तेव्हां तुम्ही सेवकांनीं विचार करावा कीं, आमच्या कार्याचें भावमूल्य काय ? आम्ही ग्रामाभिमुख खादी, शांतिसेना ग्रामदान ह्यासंबंधी चर्चा करणार आहों. पण ह्या चर्चेला आधार भावशुद्धि ही पाहिजे. विश्वव्यापक भावना झाली तर आपण जेथें असू तेथें आपल्याला बळ मिळेल. आपण कमजोर नाहीं, बलवान आहों असे वाटेल.

आचार्य विनोबा भावे यांच्या सदरील विवेचनावरून अवधूत महाराजांच्या सुबोध दृष्टांतांनीं केलेल्या कीर्तन पद्धतीची थोरवी कोणालाहि पटेल !

## माणसाची पारख, गुरु मार्ग घेणारे व अनुग्रहाची भूमिका

कोणत्याहि माणसाची आणि व्यक्तीची पारख अचूक करणें आणि कोणत्याहि गोष्टींविषयीं अचूक निर्णय त्वरित घेणे, हे दोन गुण अवधूत महाराजांचे ठिकाणीं अभिजात स्वरूपाचे होते. महाराजांचे स्वतःचे ज्येष्ठ पुत्र श्री दत्तमहाराज उर्फ अंण्णा यांची शालेय प्रगति, त्यांच्या अशक्त व रोगट प्रकृतीमुळें, आणि डोळ्यांच्या अधूपणामुळें, होण्यासारखी नाहीं, हा निर्णय त्यांच्या लहानपणीच महाराजांनीं ठरविला आणि 'त्याला कीर्तनकार करावयाचा " असें ठरवून लहानपणापासूनच यांच्या आयुष्याला तसें वळण दिलें. याचा सुपरिणाम आज सर्वांना दिसत आहे. श्री दत्तमहाराज तथा श्री. अण्णा, अवधूत मार्गाचे उत्कृष्ट कीर्तनकार झाले असून त्या व्यवसायामुळें त्यांची तब्येत आतां उतारवयांतहि ठीक राहिली आहे ! अवधूत महाराजांचे नं. २ चे चिरंजीव श्री. तात्या व नं. ३ चे श्री. अनंतराव यांनाहि त्यांनीं दिलेल्या प्रोत्साहनानें किती फायदा झाला, याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. चौथें एक उदाहरण, अवधूत महाराजांच्या माणसाची पारख करण्याच्या आणि त्याचें भवितव्य त्वरित आणि अचूक ठरविण्याच्या, अभिजात गुणांविषयीं चौथें उदाहरण नमूद करण्यासारखेंच आहे. या अभिजात गुणांचे सुफल दिसूं लागल्यावरच आपण सामान्य माणसें त्याला 'शुभाशीर्वादाचे सुफल' असें म्हणत असतों ! महाराजांचे अत्यंत निकटवर्ती शिष्य व भक्त श्री. परशरामशेट वाणी यांचे ज्येष्ठ पुत्र लहानपणीं अवधूत महाराजांच्या मांडीवर बसून खेळण्या-इतके लहान असतांच, त्या मुलाची हुषारी आणि चुणचुणीत स्वभाव ध्यानीं घेऊन महाराजांनीं सांगितलें 'हा तुमचा मुलगा पुढें मोठा होईल. तशी त्याची काळजी घेऊन, त्याला योग्य संधि देत जा.' महाराजांनीं लहानपणींच वर्तविलेल्या या भविष्याप्रमाणें श्री. परशराम शेटचा ज्येष्ठ मुलगा चि. बाबुलाल परशरामशेट वाणी

हा शिक्षण मराठी पांच सहा इयत्तापर्यंत झाल्यावर व्यापारांत शिरला आणि भडगावचे परशरामशेटचे भुसार मालाचें दुकान त्यानें प्रथम उत्तम तऱ्हेनें चालविलें. पुढें त्याला जास्त उमेद येऊन त्यानें पाचोऱ्यास, ठोक भुसारमालाचें दुकान काढण्याचें ठरविलें. त्याला प्रथम वडिलांकडून व पाचोऱ्यांतील तोच व्यवसाय करणाऱ्या व्यापाऱ्यांकडून चांगलें प्रोत्साहन न मिळतां थोडे फार अडथळेहि झाले! परंतु असल्या अडथळ्यांना न जुमानतां चि. श्री. बाबुलाल धडाडीनें पुढें झाला आणि आज तो पाचोऱ्यांतील 'होलसेल' अगर ठोक धंदा करणाऱ्या व्यापाऱ्यांत अग्रगण्य गणला जात आहे! आजकाल श्री. बाबुलाल परशुराम शेट वाणी यांचे हातून या व्यापारांत हजारों रुपायांच्या उलाढाली होत असून, त्यांनीं आपल्या वडिलांची शेती आणि बागायत अंदाजें दीड लाखांवर मूल्य (व्हॅल्यूएशन) होईल, इतकी वाढविली आहे. या शेती व बागायतीच्या वाढीसाठीं त्यांनीं गिरणा नदीचे कांठीं इंजिन व पंप बसवून भरपूर पाणी पुरवण्याची सोयहि केली आहे! आणि ही सर्व उलाढाल ते हिशेबी मर्यादा पाळूनच करीत आहेत. त्यांत केवळ स्वार्थी फायद्याची दृष्टि त्यांनी ठेविलेली नाहीं.

## विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट

अवधूत महाराजांच्या शुभाशीर्वादांविषयीं कृतज्ञता बाळगून, त्यांच्या दोन नातवांना, म्हणजे श्री दत्तमहाराजांच्या दोन पुत्रांना, व्यापारक्षेत्रांत घालून तरबेज करण्याचीहि खटपट श्री. बाबुलाल परशरामशेट वाणी यांनी चालविली आहे आणि तीहि सुफलित होईल अशी उमेद महाराजांचे सर्व भक्तांना वाटत आहे. त्याचप्रमाणें महाराजांनीं स्थापन केलेल्या श्री दत्तमठीच्या अधिष्ठानाची उर्जितावस्था व भरभराट साधण्याला आपल्या प्रयत्नांचा हातभार लागलेला असावा, अशा कृतज्ञतेच्या कळकळीनें श्री. बाबुलाल परशरामशेट मठीच्या कार्याकडे लक्ष्य देत असतात व त्यांतहि त्यांना थोडेफार यश मिळत असल्याबद्दल महाराजांचे अनेक भक्त त्यांना धन्यवाद देतांना आढळतात! हें यश त्यांना उदंड लाभो, अशीहिं महाराजांच्या सर्व भक्तांची प्रार्थना प्रभु दत्ताकडे आहे.

## भक्त व भक्तांची उपदेश-अनुग्रह देण्याची भूमिका

कोणत्याहि साधु-पुरुषाचा अगर विभूतीचा उपदेश-अनुग्रह घेण्यासाठीं उद्युक्त होणाऱ्या भक्तांचे साधारणतः चार वर्ग असतात. हे चार प्रकार पुढीलप्रमाणें

(१) आर्तभक्त : जे आधि-व्याधींनीं गांजलेले आहेत, ज्यांना संसार-व्यवहार चालविण्यांत कष्ट पडत आहेत, किंवा व्यापार-व्यवसायांत भयंकर ठोकर

बसली आहे, किंवा घरगुती कुटुंबीय भानगडीं मुळें जे चिंतेनें पिचून जात आहेत; एकंदरीत जे शारिरीक अथवा मानसिक दुःखांनीं गांजले असून, अनेक उपाय करूनहि ज्यांचीं दुःखें निवारण झालीं नाहींत, अगर ज्यांची वंशवृद्धि व्हावी, अशी इच्छा असून ती पुरी झाली नाही, असे लोक अखेर गुरुमार्गाकडे धांव घेतात !

**(२ व ३) जिज्ञासु व अर्थार्थी :—** दुसरा वर्ग जिज्ञासु भक्तांचा–हे भक्त परमार्थाविषयीं अभ्यासू असतात. वाचन, चिंतन, मनन इत्यादि साधनांनीं परमार्थाचें ज्ञान वाढविण्याची खटपट ते करीत असतात. मात्र सद्गुरूकडून मार्गदर्शनाची त्यांना अपेक्षा असते. हे लोक भक्त या दृष्टीनें वरच्या दर्जाचे खरे. पण वरील सर्व साधनें करणारे भक्त ऐहिक ऐश्वर्य, भोग वगैरे सर्व गोष्टी केवळ गुरुकृपेनेंच प्राप्त व्हाव्या अशी वासना मात्र ज्या कांहींचे ठिकाणीं राहते, ते तिसऱ्या दर्जाचे अथार्थी भक्त होत ! ते परमार्थी दृष्टीनें हिणकस ठरतात.

**(४) ज्ञानी भक्त :—** ज्ञानी भक्त चौथ्या म्हणजे सर्वोच दर्जाच्या वर्गांत मोडतात. असे भक्त फारच क्वचित् 'मनुष्यांणाम् सहस्रेषु'. असें या भक्तांचें वर्णन भगवद्गीतेंत आढळतें. वाचन, श्रवण, मनन, निदिध्यास आणि तप यांचा अर्धवट अनुभव घेऊन थकलेले पारमार्थिक साधक गुरुमार्गाकडेहि वळतात.

## अवधूत महाराजांची उपदेश–पद्धति

सर्वांकडे समदृष्टीनें पाहून ज्याला, त्याला त्याच्या कुवतीप्रमाणें उपदेश–अनुग्रह देण्याची अवधूत महाराजांची पद्धति होती.

कालाच्या ओघाबरोबर सामाजिक विचारांत आणि विशेषतः आचारांत जे फेरफार होत त्याची जाणीव ठेवूनच अवधूत महाराज सर्वांशीं समतेनें वागण्याचाच शक्यतों प्रयत्न करीत. यामुळेंच आधुनिक सुधारणावादी लोक अवधूत–महाराजांशीं सहानुभूति पूर्ण सौजन्यानें वागत. दुराग्रही व 'सनातनी' पणाचा आव आणणाऱ्या लोकांप्रमाणे महाराजावर टीकेचा मारा करीत नसत !

कांही 'आधुनिक सुधारणावादी' लोक, देवदेव, कीर्तनें, क्षेत्रयात्रा वगैरे गोष्टीं विषयीं आस्था नसल्यामुळें स्वतःला 'नास्तिक व तर्कशुद्ध' 'विचार करणारे' म्हणवून घेण्यांत भूषण मानीत ! किंबहुना तसें 'नास्तिक' म्हणवून घेणें ही 'एक प्रकारची फॅशनच' पडूं लागली आहे ! शाळा कॉलेजांत शिकणारे व शिकविणारे अशाच फॅशनचें अनुकरण करीत ! ज्ञानदेव एकनाथ, तुकाराम, रामदास, इत्यादि संतांच्या काव्याचे उतारे शाळा–कॉलेजांत शिकवून आणि जाहीर सभेंतील

संभाषणांत या संत–काव्यांचा उल्लेख करून टाळ्या मिळविणारे शिक्षक व प्राध्यापक, याच संतांनीं शपथेवर, जीव तोडून सांगितलेलें 'परमेश्वरी साक्षात्कार' मात्र मानीत नसत! असें प्रस्तुत लेखकाच्या प्रत्यक्ष पाहण्यात आलें आहे! तसें केल्यास आपण "फॅशनबल होणाऱ्या" शाळा कॉलेजांतील लोकप्रियतेला व टाळ्यांना पारखे होऊं" अशी भीति त्यांना मनांतून कदाचित् वाटत असावी! 'चिकित्सक इतिहास संशोधक' इत्यादि बेगडी विशेषणें आजकालच्या भांडवलशाही साखळी पत्रांमार्फत प्रकाशित होणाऱ्या वृत्तपत्रांतून आपल्या नांवामागें लावून घेण्याचा मोह या तथाकथित 'प्राध्यापकांना, सुटत नसावा'! मात्र सोनोपंत दांडेकरांच्या-सारखा निर्मळ बुद्धीचा एखाद दुसरा प्राध्यापक असल्या बेगडी विशेषणांना न भुलता, आपलें लोकशिक्षणाचे कार्य शाळा कॉलेजांत वावरूनहि निर्मळ बुद्धीनें करीत असतो!

काळानुसार होणारे हे सामाजिक विकृतींचे व सुकृतीचेहि प्रकार अवधूत महाराजांच्या नजरेंतून सुटले नाहींत. आजकालच्या वृत्तपत्रीय इतिहासांतील खाचखळग्यांतून ठेंचा खाऊन त्यांची बुद्धि मामुली 'सु–शिक्षितांप्रमाणें भटक्या-प्रमाणें' इतस्ततः भरकटली नाही! 'सत्यं, शिवं, सुंदरम्' तें 'जुनें' म्हणून सोडावयाचें नाहीं आणि कितीहि वरवर चकाकले तरी नवें तें 'केवळ नवें' म्हणून घ्यावयाचें नाहीं, नव्यातील चांगलें तें मात्र अवश्य घ्यावयाचें, अशी अवधूत महाराजांची निवड करण्याची पद्धति होती.

## सर्व हयातींत निस्पृह वृत्ति

सर्व हयातींत अवधूत महाराजांची निस्पृह वृत्ति आणि त्याच बाण्यानें व्यवहारांत वागण्याची प्रचीति सर्वांना आली होती. त्यांनी प्राप्तींतील पैशांचा हिशोब कधीं ठेविला नाहीं. 'आलेली जमा व झालेला खर्च' हाच त्यांचा खाक्या! उद्यांची काळजी त्यांनीं कधींहि केली नाहीं, 'प्रपंचाची काळजी' अवधूत महाराजांनी श्री पंतमहाराजांना वाहिली होती! योगक्षेमाचीहि काळजी कधीं त्यांना चलबिचल करूं शकली नाहीं!

## त्या काळच्या शिक्षितांची सर्वसाधारण नास्तिक वृत्ति!

अवधूत महाराजांच्या काळांतील तथाकथित 'सुशिक्षित' सामान्यतः नास्तिक, कसे व कां बनत, याचाविचार नमूद करण्यासारखा आहे. "तीर्थक्षेत्रांतील क्षेत्रोपाध्ये व पुजारी (उदाहरणार्थ पंढरीचे बडवे, गयेचे गयेचे गयावळ, प्रयागचे

प्रयागवळ, काशीचे पंडये) यांच्या 'देवाचें दुकान' मांडल्याप्रमाणें वागण्याच्या विपरीत लोभी वागणुकीमुळें शिक्षित यात्रेकरूंच्या मनांवर विपरीत परिणाम झाला होता! सुव्यवस्थित धार्मिक शिक्षणाचा अभाव, गुरुशिष्य परंपरेविषयीं मासिकें व वृत्तपत्रें यांतून आजकालप्रमाणें येणारें निंदाप्रचुर लिखाण, इत्यादि कारणांमुळें आधुनिक शिक्षण-क्षेत्रांतील वावरणारे विद्यार्थी व शिक्षक साधारणतः 'नास्तिक' वृत्तीचे बनतात. प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय कशावरहि विश्वास ठेवावयाचा नाहीं, या योग्य व खऱ्या तत्वाला विपरीत ताण पडून विपरीत नास्तिक वृत्तीची पिढी निर्माण होते! महाभारत रामायणांतील 'अद्भुत कथा, मायावी राक्षस' 'अतिरंजित थोतांडें' वाटूं लागतात! आद्य शंकराचार्यांचे मठांतील गादीवर असलेले आधुनिक शंकराचार्य-मठाचे तंटे-बखेडे पाहून 'जगद्‌गुरु वृत्तीची' विटंबना करीत असतांना 'कुर्वन्तम् विश्वम् आर्यम्' या थोर प्रतिज्ञेची ती प्रतिज्ञा वापरणाऱ्यांचे वागणुकीनें कुचेष्टा होते! अशा प्रकारच्या

वातावरणांत 'कर्मकांडाचे बंड' मोडून काढणाऱ्या आणि बौद्धधर्माचें खंडन करून वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन करणाऱ्या, आद्य शंकराचार्यांची आठवण कोणाला होणार?

"आपली धर्मसंस्था मोडकळीस आली असून, धर्मबंधनें कोणी पाळतांना दिसत नाहींत आणि त्यामुळें कोणाचें वांकडे झालेलेंहि आठवत नाहीं. मग आपण तरी असलीं धर्मबंधनें कां पाळावींत?" ही विचारसरणी तथाकथित सुशिक्षित तरुणांत रूढ झालेली होती आणि त्यामुळें धर्मसंस्थांवरील विश्वास उडत चालला होता!"

१९१४ सालीं भारतांतील आणि विशेषतः महाराष्ट्रांतील धर्मसंस्थाविषयींच्या विचारांचें वातावरण वर वर्णन केल्याप्रमाणें होतें. भारतांत एक 'सुधारणावादी' पक्ष निर्माण होऊन सर्वत्र विखुरला होता. या पक्षाची धामधूम, चळवळ व व्याख्यानादींच्या रूपानें चालू होती. "गुरु-शिष्य, गुरु-परंपरा, गुरु-सांप्रदाय, इत्यादि गोष्टी सद्यः स्थितींत आपल्या देशाला उपकारक नाहींत. धर्म-विचार आणि धर्माचार 'ही एक प्रकारची अफूची गोळी' आहे, आणि ही 'अफूची गुंगी' सर्व समाजाची दिशाभूल करीत आहे! अर्थात् कीर्तनकार, प्रवचनकार, पुराणिक आणि भजनी मंडळें या सर्वांविषयीं 'सुशिक्षित' म्हणवून घेणाऱ्याचे मनांत एक प्रकारची अढी निर्माण झाली होती. गुरु या शब्दाला 'बाजी' ही उपाधी जोडून 'गुरुबाजी किंवा बुवाबाजी' हा शब्दप्रयोग वाङ्मयक्षेत्रांत निंदाप्रचुर शिवीसारखा

वापरला जात होता आणि आजहि तसाच वापरला जात आहे! यामुळें खरें खोटे कसोटीला लागून त्याचा योग्य निर्णय ठरण्याची परिस्थिती निर्माण झाली हें खरें. आजच्या राजकीय क्षेत्रांत आणि शिक्षणक्षेत्रांतहि 'बुवाबाजी' सारखी एक प्रकारची 'बाजीच' बोकाळल्याचें दृश्य विचारवंतांच्या लक्षांत येऊन चुकलें आहे!

## अवधूत महाराज वास्तववादी व तर्कशुद्ध

वरील प्रकारच्या गढूळ वातावरणांत अवधूत महाराजांचे तर्कशुद्ध विचार व्यावहारिक तारतम्याची वागणूक आणि वास्तववादी विचारसरणी यामुळें त्यांचे अनुग्रहीत जामात श्री. द. कृ. देवधर जसे आकर्षित झाले तसे अनेक सुशिक्षित तरुण' आकर्षित झाल्याचे दाखले आहेत. तसेंच ज्यांना कौटुंबिक चांगलें वळण पारंपरिक, दृष्टीनें मिळाले होते, त्यांनीं महाराजांच्या तारतम्यवृत्तीचा व्यवहार आणि वास्तववादी आचार-विचारांचा, महाराजांच्या सत्संगतीपासून, प्रेरणा घेऊन आपल्या भावी जीवनांत फायदा करून घेतला. सामान्य माणसांपेक्षां महाराजांच्या ठिकाणीं कांहीं विशेष अलौकिक गुण आहेत आणि त्यांनाच साधुत्वाचे गुण म्हणतात हें अनेक सुधारणावादी नवतरुणांना दिसून आलें. हें 'सांठविलेलें पाणी नसून जिवंत झरा' अशी खात्री महाराजांच्या जास्त परिचयांत आलेल्या नवतरुणांचीहि झाली. मौजीबंधनाचे वेळीं गायत्री मंत्राचा उपदेश प्रत्यक्ष पित्याकडून किंवा मौजीबंधनाचा अधिकार घेतलेल्या पितृसदृश व्यक्तीकडून होतो, हा एक प्रकारे गुरुमार्गाचा श्रीगणेशाच होय. यापुढें जें कांही धर्मज्ञान मिळवावयाचें तें आजच्या काळांत तरी, स्वकष्टानेंच मिळवावें लागतें. त्याकरितां वयपरत्वें सोपें अवघड धर्मग्रंथ वाचून (ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध, तुकारामाची गाथा यांसारखें संतवाङ्मय) परमार्थज्ञान चिंतन–मननानें मिळवावें लागतें. नंतर 'गुरुमार्ग अपरिहार्य आहे असें पटून असे जिज्ञासू व ज्ञानमार्गाचे भक्त तो मार्ग पसंत करून तो कां पत्करतात याचें स्वानुभवाचें मार्मिक वर्णन महाराजांचे अनुग्रहीत जामात श्री. द. कृ. देवधर यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे. :–"महाराजांनीं मला स्वतःला निराळें असें कांहींच सांगितलें नाहीं. कीर्तनें ऐकावींत व केव्हां केव्हां, वेदांत विषयावर इतर शिष्य मंडळीशीं महाराजांची चर्चा चाले. तीहि ऐकावी. मला ज्याअर्थी ते कांहीं सांगत नाहींत, त्या अर्थी या दत्तअवधूत सांप्रदायांत मला सांगण्यासारखें कांहीं नाहीं किंवा मी तरी लायक नाहीं, असें मला वाटे! याशिवाय महाराजांनीं मला विशेष कांहीं न सांगण्याचें कारण सांपडत नाहीं."

इदं ते नातपस्याय नाऽभक्ताय कथंच न। न चाऽशुश्रूसवें वाक्यं।
त च मां योऽभ्य सूयती॥

"हें गीताशास्त्र, कायिक, मानसिक तपाचरण न करणाऱ्या, मतिहीन अंतःकरणाच्या पुरुषाला, किंवा ज्याला हें श्रवण करण्याची इच्छाच नसेल, अशा माणसाला परमेश्वराविषयीं मत्सरी किंवा नास्तिक समजून कधींहि सांगू नये, ही भगवद्‌गीतेची शिकवण लक्षांत येऊन माझें शंका निरसन झालें !"

"शिष्यत्व पत्करल्याशिवाय प्रगति होत नाहीं, शिष्य होण्याला कमींत कमी इतके गुण लागतात व ते संपादन केलेच पाहिजेत, असें मला वाटूं लागलें. गुरू फक्त बीजारोपण करतात, त्या बीजाचा खतपाणी घालून इच्छित वृक्ष बनविणें आणि फलप्राप्ति करून घेणें, हे ज्या त्या शिष्याचें काम आहे." याप्रमाणें उत्कृष्ट शिष्यवृत्तीच्या विचारानें आचार करणारा साधक गुरुच्या सान्निध्यांत राहून आत्मप्रचीति करून घेतो."

अवधूत महाराजांच्या हयातींत त्यांना सर्व प्रकारचे शिष्य भेटले. त्यांनीं त्या त्या शिष्यांना अधिकारपरत्वें उपदेश देऊनहि जवळ केलें.

## विकृत विचारांचे व आचाराचे शिष्य

महाराजांच्या कांही शिष्यांपैकीं विकृत मार्गानें आचरण करणारेहि कांहीजण निघाले. कीर्तनांत पेटीची सांथ करणारे श्री. गोपाळ जमदग्नी यांनीं महाराजांची कीर्तनांची नकल करण्यास सुरवात केली! कीर्तनांतील कांहीं पदें बदलून 'ती आपलींच आहेत' असा आभासहि उत्पन्न करण्याचे प्रयत्न केले! पण ही नक्कल लवकरच उघडकीला आली व त्यांची कीर्तने त्यामुळें बंद पडली! पुढचें जीवन त्यांना फार हाल-अपेष्टांत काढावें लागलें!

कीर्तनांत झांजांची व एकतारीची वगैरे सांथ करणारे श्री. नामदेव दंडवते यांनींहि महाराजांचें सान्निध्य सोडून कीर्तनें करण्यास सुरवात केली. परंतु त्यांत चांगला अनुभव न आल्यामुळें त्यांनीं कीर्तनें सोडून ज्ञानेश्वरीचा चांगला अभ्यास केला व अवधूत महाराजांशीं ते कृतघ्न झाले नाहींत. गांवोगांवीं ज्ञानेश्वरीवर चांगली प्रवचनें करूनच चरितार्थ चालविला आणि थोडाफार लौकिकहि संपादन केला. ते अवधूत महाराजांशीं कृतघ्न झालें नाहींत हें त्यांची प्रत्यक्ष भेट झाल्यावर प्रस्तुत लेखकाच्या अनुभवास आलें आणि महाराजांचे जामात श्री. द. कृ. देवधर यांनींहि या विषयींचा अनुभव आपल्या आठवणींत पुढील प्रमाणें नमूद केला आहे:—
"श्री. नामदेव दंडवते यांनीं पुढें वारकरी सांप्रदाय घेतला व पुढें ज्ञानेश्वरीवर प्रवचनें करूं लागले. मी शिवपुरीस नोकरीवर असतांना, आमचे कँपमध्ये कांहीं

भजनी मंडळी आली होतीं. भजनाकरितां त्यांना सोयिस्कर अशी जागा मिळेना. त्यांतल्या त्यांत माझी जागा सोयीची वाटून त्या ठिकाणीं भजनाच्या बैठकीची व्यवस्था केली. या भजनी मंडळींतील श्री. नामदेवबुवा आमचे पुढें उभे राहिले. या योगायोगाचें आम्हां उभयतांनाहि आश्चर्य वाटलें!"

मग श्री. नामदेवबुवा बोलण्याचे रंगांत येऊन म्हणाले "मी हल्लीं ज्ञानेश्वरीवर प्रवचनें करतों, पण याचें सर्व श्रेय आपले सासरे श्री. अवधूत महाराज यांचेकडे आहे. त्यांनींच आमच्यांत अध्यात्माचें बीजारोपण केलें! त्यामुळें आमचा काळ सुखाचा गेला"! प्रस्तुत लेखकाला आणखी कांही दिवसांनीं मुंबईस श्री. नामदेव बुवा भेटले त्यावेळींहि त्यांनीं अवधूत महाराजांविषयीं याच प्रकारचे कृतज्ञतेचे उद्‌गार काढले!

श्री. अवधूत महाराजांचे कीर्तन, मराठी भाषेची साधारण तोंड ओळख (व्यवहारापुरती) झालेल्या मुसलमान, पारशी इत्यादि बंधूंनाहि किती आकर्षक वाटे व आवडे याविषयींची श्री. द. कृ. देवघर यांची एक आठवण याच ओघांत नमूद करून या चरित्राच्या पुढील महत्त्वाच्या भागाकडे वळूं :–श्री. द. कृ. देवघर लिहितात :–

"मी भिवपुरी कँपांत असतांना महाराज एका दिवाळींत अंदाजें १९–२० मंडळी घेऊन आले. त्यावेळीं मजकडे १५ दिवस महाराजांचा मुक्काम होता. आमचे क्लबामार्फत त्यांचे कीर्तन झालें. आमचा कँप अतिशय लहान, त्यांत सर्व वर्गाचे व जातीचे लोक असत. त्यामुळें कीर्तनाच्या त्या कार्यक्रमाला कितपत श्रोते जमतात, याविषयीं मी साशंक होतों. पण कँपमधील झाडून सर्व स्त्रीपुरुष व बालगोपाळ कीर्तन ऐकण्यासाठीं जमले होते. त्यांतील एक दोन मुसलमान गृहस्थ तर कीर्तनावर फारच खूष झाले! आमच्यांतील एक पारशी अधिकारी गृहस्थांना तर उत्तम मराठी येत होते. त्यांनीं कीर्तन संपल्यावर पुढें येऊन अवधूत महाराजांची चौकशी केली आणि महाराजांचें दुसरें कीर्तन कँपमधील क्लबामार्फत करवून ते सर्वांनीं मोठ्या हौसेनें ऐकलें!"

## अवधूत महाराजांची सुबोध कीर्तनपद्धति व तिचे आकर्षण

श्रीअवधूत महाराजांना लहानपणापासूनच सद्गुरू श्रीपंत महाराजांप्रमाणें गद्य-पद्य लिहून ठेवण्याचा व काव्य करण्याचा छंद नव्हता. त्यांनीं श्रीपंतांच्या अनुग्रहानंतर 'अवधूत हरिपाठ व ५२ मांत्रिकांची लावणी' हेंच 'काव्य' म्हणून लिहिलें.

स्वानंदवासापूर्वी श्रीपंत अंथरुणावर रुग्ण स्थितींत असतांना "ती लावणी श्रीपंतांनी श्री अवधूत महाराजांना म्हणावयास लावून ती ऐकली आणि खूष थेऊन अवधूत महाराजांची श्रीपंतांनी पाठ थोपटली व स्वतःची कफनी श्री अवधूत महाराजांचे अंगावर चढवून 'हिचा नीट सांभाळ कर' अशी आज्ञा दिली" याचा उल्लेख मागें आलाच आहे. श्री पंतांच्या स्वानंद समाधीनंतर अत्यंत वैराग्य होऊन श्रीअवधूत महाराज काशीयात्रा करून ८-९ महिन्यांनीं परतल्यानंतर त्यांनीं अध्यात्म निरूपणें कुरुंदवाडास श्री. लेले बंधूंचें निवासांत सुरूं केली आणि कीर्तनांची तयारी चालविली त्यावेळीं त्यांना दृष्टांत झाला त्या दृष्टांतांतील आज्ञेचा फिरून फिरून या ठिकाणी उल्लेख करणें आवश्यक आहे. महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तात्रय मोरेश्वर दातार यांनी लिहिलेलें आत्मवृत्त १९५६ च्या नोव्हेंबरमधील 'पुरुषार्थ' मासिकाच्या खास दिवाळी अंकांत प्रसिद्ध झालें असून, त्यांत ते म्हणतात (पान ८८) एक दिवस श्रीपंत स्वप्नांत (श्री अवधूत महाराजांना) दर्शन देऊन म्हणाले, "स्वस्थ काय बसलास ? एवढी 'प्रेमलहरी' कुणासाठीं केली ? तिचा उपयोग कर" (ही १९०७ सालची गोष्ट आहे.) दुसऱ्या काशीयात्रेहून परतल्यावर लेले गुरु-बंधूंच्या घरांत प्रेमलहरीच्या आधारें अवधूत महाराज भजन निरुपण करूं लागले. आणि कीर्तनासाठीं पूर्वरंग उत्तरंगाचीहि तयारी करूं लागले. त्यानंतर 'स्वप्नांत श्रीगुरूंनी केलेल्या आज्ञेप्रमाणें श्री अवधूत महाराजांनीं 'आत्मबोधाचे मनाचे श्लोक' केले. त्यांतील १०० वा श्लोक पुढीलप्रमाणें आहे—

मना केलि स्वप्नांत आज्ञा गुरुनें ।
शत श्लोक झाले तयाच्या कृपेनें ॥
देवोनि अभय शिरीं ठेवि पाणी ।
म्हणे मोरया हो गुरुचीच्चि वाणी ॥ १०० ॥

या श्लोकाचे अखेर मिती कार्तिक शुद्ध ५ रोज गुरुवार शके १८३४ असा उल्लेख आहे. यांत ७८ मिळविले म्हणजे सन १९१२ येतो. म्हणजे श्रीपंतांच्या स्वानंद समाधीनंतर ७-८ वर्षांनी आत्मबोधाचें श्लोक व नंतर सात वारांचें अभंग व पदें वगैरे तयार झाली व श्री अवधूत महाराज हें आपलें काव्य आणि श्रीपंतांच्या प्रेमलहरीतील पदें पूर्व व उत्तर रंगांत वापरून त्यांनीं लोकप्रिय कीर्तनें केली हें उघड आहे. 'म्हणे मोरया ही गुरुचीचि वाणी' असें शंभराव्या श्लोकांत म्हणून त्या काव्य कर्तृत्वाचा अभिमान न धरतां श्री अवधूत महाराजांनीं गुरुकृपेला त्याचें सर्व श्रेय दिलें आहे, ही वस्तुस्थिति ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

या वस्तुस्थितीचा फिरून तपशीलवार उल्लेख करण्याचें कारण असें कीं, श्री अवधूत महाराज, पंतमहाराजांच्या प्रेमलहरींतील पदें, आपल्या पूर्व व उत्तर रंगांत वापरीत तीं प्रामुख्यानें कोणतीं आणि त्यांना स्वतःच्या श्लोकांची, अभंगाची व पदांची जोड देऊन कीर्तन सुबोध कसें करीत, याचा यापुढें प्रामुख्यानें उल्लेख करावयाचा आहे. श्री अवधूत महाराजांची कीर्तनें सामान्य आबालवृद्ध स्त्री-पुरुषांना आकर्षक आणि गोड वाटत, याचें वर्म या निरहंकार वृत्तीत आणि निरूपणाचें सुबोध गोडव्यांत आहे, हें या तपशिलावरून वाचकांच्या ध्यानांत येण्यासारखें आहे.

## कीर्तनांतील पंतांचीं पदें

अवधूत महाराजांनीं स्वतःच्या कीर्तनांतील पूर्वरंगांत आणि उत्तर रंगाच्या आख्यानांत जीं श्रीपंत महाराजांची पदें वापरलीं, त्यांतील प्रमुख पदांचा उल्लेख यापुढें करण्यापूर्वीं श्री मोरया तथा अवधूत महाराज यांना अनुग्रह दिला त्यावेळीं श्री पंतांनीं जें पद रचिलें आणि श्री अवधूत महाराजांना सांगितलें, त्याचा उल्लेख करण्यासारखा आहे. 'मोरया हें पद तुला अनुग्रह दिला त्यावेळीं सहजस्फूर्तीनें रचलें, असें म्हणून त्यांनीं प्रिय शिष्य 'मोरया' यांना दाखविलें! या पदांत अनुग्रह घेणारे 'मोरया' यांच्याच भूमिकेवरून तें स्फुरलें हें पदांतील अर्थावरून लक्षांत येण्यासारखें आहे तें असे :—

### प्रेमलहरी १७०७

वाचामनासिं चोरूनी प्रेमामृत प्राशन केलें ॥ सहजानंदी अष्ट-सात्त्विक* भाव प्रगटले ॥ धृ० ॥ अनंत जन्मींचें संचित सुकृत फलोन्मुख झालें ॥ अनायासें दृष्टीं पडलीं सद्गुरु पाऊलें। तनुमनधनाशा टाकुनी दृढ चरण धरिले ॥ अभयकर मस्तकीं ठेवुनी सन्मुख बैसविलें ॥ १ ॥ मनोत्साह शुभ मुहूर्त पाहुनी निजगुज बोधियलें ॥ स्वयं प्रकाश आत्मस्वरूप नयनीं दाखविलें ॥ उन्मनि मंदिरीं नेऊनि मजला स्वरूपीं जागविले ॥ द्वैतभाव समूळ हरुनी कृतकृत्य केलें ॥ २ ॥ सच्चिदानंद तत्त्व अवधूत रूपें प्रगटलें ॥ जगदोद्धारा सगुण होउनी भक्तां भेटलें ॥ ब्रह्मात्मैक्य ज्ञान बोधुनी बहुजन तारियले ॥ ब्रह्मानंदें विश्व भरूनी दत्तहृदयीं वसलें ॥ ३ ॥

या पदांत अनुग्रह घेणारा 'मोरया' (श्री अवधूत महाराज) यांच्याच भूमिकेवरून स्फुरलेले विचार श्रीपंतांनी सदरील पदांत घातले आहेत. त्याचा आशय पुढील प्रमाणें :—" वाचेला व मनाला चोरून मी सद्गुरूंकडून आध्यात्मिक

प्रेमामृत प्राशन केलें. त्यामुळें सहज आनंदांत अष्ट-सात्त्विक भाव प्रगट झाले अनंत जन्मीची सांठवलेली पुण्याई जणु फळाला आली! सद्गुरूंची पाउलें आयास सायास न करतांच दृष्टीस पडलीं! (हाहि परमार्थांतील राजयोगच म्हणावयाचा!)

**टीप :**—अष्टसात्त्विक भाव–१ ॐ २ श्री ३ आदिमाया ४ मूलस्वरूप ५ सत्व. ६ रज ७ तम ८ भक्ति ज्ञान वैराग्य

त्यामुळें तन, मन, धनादींची आशा टाकून मी सद्गुरूचे चरण दृढ धरिले. तेव्हां सद्गुरूनीं माझ्या मस्तकावर 'अभय' कर ठेवून मला आपल्यासमोर बसविलें ॥ २ ॥ मनोत्साह शुभ-मुहूर्त पाहुनि (गुरुद्वादशीचे उत्सवांत रात्रीं १२ वाजतां, पण 'मनाचा उत्साह' हाच खरा शुभ-मुहूर्त' असेंहि—श्रीपंतांनीं या पदांत सूचित केलें आहे!) मला आध्यात्मिक अशा आपल्या गुपित विचारांचा बोध केला. स्वयंप्रकाशरूपी आत्मस्वरूप माझ्या ज्ञानचक्षूंना दाखविलें. नंतर उन्मनी अवस्था-रूपी मंदिरांत नेऊन मला स्वतःच्या आत्मस्वरूपाची जाग आणली, आणि द्वैतभाव नाहींसा करून मला कृतकृत्य केलें. ॥ ३ ॥ नंतर सत्, चित, आनंद यांतील तत्त्व अवधूतरूपानें माझ्यापुढें प्रगट झालें! जगाच्या उद्धारासाठीं सद्गुरुरूपी सगुण-रूप घेऊन तें भक्तांना भेटलें. ब्रह्म आणि आत्मा यांच्या ऐक्याचें ज्ञान समजून सांगून पुष्कळ लोकांना संसाररूपी सागरांतून सद्गुरूंनीं तारलें. आणि विश्व ब्रह्मानंदानें भरून दत्तहृदयीं (श्रीपंतरूपी गुरूच्या आणि सद्गुरुरूपीं समरस झालेल्या 'मोरया' सारख्या शिष्यांच्याहि हृदयांत वस्ती करून राहिलें!)

या पदाचा शब्दार्थ लेखकाच्या अल्प कुवतीप्रमाणें शक्यतों स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु स्वानुभवी शिष्यांनीं आणि भक्तांनीं त्या अर्थाचा आनंद अनुभवानेंच घ्यावयाचा आहे. कारण अध्यात्मज्ञान प्रत्यक्ष अनुभवानें पचनीं पडते. शब्दांनीं फक्त 'शाखा–चंद्र न्यायाने' दिग्दर्शन करणेंच शक्य असते.

श्रीपंतांचीं पदें शाब्दिक ज्ञानाच्या दृष्टीनें श्रीतुकाराम–रामदासादि साधुसंतांच्या पदांप्रमाणेंच सोप्या प्रासादिक भाषेंत असल्यामुळें वरील पदांतील गुरुशिष्यांचें एक-रूपत्त्व स्पष्ट करणारें आणखी एक पद उद्धृत करण्यासारखें असून त्याचाहि अर्थ अगदीं उघड व सोपा असल्यामुळें तो लिहून जागा अडवीत नाहीं. तें पद २६३१ वें प्रेमलहरींतीलच असून पुढीलप्रमाणें—

## प्रेमलहरी २६३१

गारुडी माझा दत्तावधूत ॥ अक्रिय खेळ दावि अनंत ॥ धृ० ॥ खेळ 'खेळिया' आपण होऊनि। खेळुनी सदा राहतो अलिप्त ॥ १ ॥ सद्गुरु शिष्यरूप घरनी

भजनीं पीतो प्रेमामृत ॥ २ ॥ प्रेमानंदे विश्वविलसतें । पाहुनी धुंद दत्तावधूत ॥ ३ ॥ थोडक्यांत या पदाचा भावार्थ सांगावयाचा तो असा :—माझा दत्तावधूत गारुडी बनून अनंत खेळ दाखवितो, 'खेळिया' होऊन स्वतः अलिप्त राहतो! सद्गुरु-शिष्य रूप स्वतःच धरून प्रेमामृत पितो. प्रेमानंदानें विश्व शोभलेलें पाहून धुंद होतो!

कलियुगांतील लोकांत जी जागृती करण्यासाठीं पंत आपल्या हयातींत सतत झटले आणि लोककल्याणासाठीं जी जागृती करण्याचें कार्य पुढें चालविण्यासाठीं श्रीपंतांनीं 'मोरयाला' (तथा अवधूत महाराजांना) मस्तकावर वरदहस्त ठेवून आदेश दिला, त्या 'जागृती' चा ध्यास स्वानंद-समाधीचेहि वेळीं घेऊन त्यांनीं त्यांनीं २६३२ वें पद लिहिलें आणि "त्या पदाचें पहिलें कडवे रुग्ण शय्येवर पडल्या पडल्याच स्वतः म्हटलें, आणि पुढलीं २ व ३ कडवीं जवळच्या भक्तां-कडून म्हणवून ते कांहीं दिवसांनीं स्वानंद समाधींत लीन झाले" असें वर्णन श्रीपंतांचें गद्य चरित्र लिहिणारे श्री. केशवराव दिवेकर यांनीं केलें आहे. (श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकर यांचें चरित्र पान ३३० च्या तळाशीं) तो दिवस १२-८-१९०५ होता, असाहि उल्लेख या वर्णनांत आहे. त्यानंतर पुढें एकहि पद न करतां श्रीपंत आश्विन वद्य ३ शके १८२७ रोजीं, म्हणजे सन १९०५ मधें थोड्याच दिवसांनी, 'समाधिस्थितींतच' स्वानंदवासी झाले!

## पंताचें शेवटचें पद २६५२ (प्रेमलहरी)

पुढीलप्रमाणें आहे :—

जागृती, जागृती, जागृती । दत्तजन्माची स्मृति ॥ धृ० ॥ श्रुति शास्त्रार्थ नेणुनी जन । विषयानंदीं ते रमती ॥ २ ॥ दत्तचरणीं शरण जातां । अखंड शांति भोगिती ॥ ३ ॥

अर्थात् ही 'अखंड शांति' भोगण्यासाठीं पंतांचा जीवात्मा शिवस्वरूपी लीन होऊन आणि 'जागृती' चा आदेश जगाला देण्याचें कार्य 'मोरया' सारख्या शिष्यांवर सोंपवून स्वानंदवासी झाला!

× × ×

या चरित्र ग्रंथांत श्रीपंत बाळेकुंद्रीकर यांची, श्रीअवधूत महाराज व त्यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री दत्तमहाराज (तथा श्री. अण्णा) पूर्व रंगांत आणि उत्तर रंगांत वापरीत असलेलीं निवडक पदें आणि श्री अवधूत महाराजांचें समग्र काव्य छापणे

सोयीचें नाहीं. दोन्हीहि काव्यें शब्दार्थं कळण्याला प्रासादिक व सोपीं आहेत. म्हणून आतां श्रीपंतांचें तत्वज्ञान त्यांच्या पदांचा उल्लेख करून व्यावहारिक साध्या दृष्टांतांनीं अवधूत महाराज श्रोत्यांकरितां आणखी सोपें करून कसें सांगत, इत्यादि तपशील नमूद करतांना सर्व अर्थ लिहून जागा न अडवितां पदांचा उल्लेख व तुलना यापुढें करण्यासाठीं यापुढें पंतांचीं पदें व त्यांना पूरक अशीं अवधूत महाराजांचीं पदें यांचा संदर्भ देऊन आणि वाचकांना दोन्ही पदांतील सारखेपणा दर्शवून पंतांच्या पदांतील अर्थ सोपा व स्पष्ट करण्याची अवधूत महाराजांची हातोटी सामान्य वाचकांचे लक्षांत आणून देण्याचें स्पष्टीकरण करणें वाचक-भक्तांच्या दृष्टीनें सोयीचें ठरेल. प्रत्यक्ष कीर्तनांत अवधूत महाराज हीं पदें सोप्या आणि आकर्षक पद्धतीनें गाऊन, श्रोत्यांचे अंतःकरणांवर, पदांतील आध्यात्मिक विचारांचें मर्म आपल्या सुबोध व गोड विवेचनानें रंगवीत असत.

सुरवातीला या प्रकरणांत पंतांच्या कांहीं आवडत्या पदांचा उल्लेख करण्यासारखा आहेः—

## प्रेमलहरी पद २२२

॥ 'जीवनची गुरुनाम' ॥

या पदाचें स्पष्टीकरण श्री. दिवेकर यांच्या पंतचरित्राचे ४०५ व ४०६ पानावर करण्यांत आलें आहे. नामस्मरण हें भजनाचें एक महत्वाचें अंग आहे. परमार्थप्राप्ती करून घेण्याचे कामीं नामस्मरणासारखें सुलभ साधन नाहीं. सर्व संतांचें याविषयीं एक मत आहे.

श्रीपंतांनींहि या पदांत आणि इतर अनेक पदांत नामस्मरणाचें महत्व गाइलें आहे. प्रेमलहरी २०८५ पदांतहि पंत म्हणतात 'भवभयनाशक' स्वरूप प्रकाशक, मनाचें कोड पुरविणारें, भ्रांतिहारक, संसृति तारक, निजपदाची जोड करून देणारें, अद्वय भक्ति व अखंड शांति यांचा लाभ करून देणारें असें हें नाम (गुरू नाम) आहे. सदरील २२२ पदांत तर पंत म्हणतात "गुरुनाम हेंच आपलें जीवन आहे, इतकेंच नव्हे तर तोच स्वधर्म, तोच आश्रम, तोच नित्यनेम, तोच वेदांत, तोच सिद्धांत, तोच कैवल्यधाम, तेंच रंजन, तेंच निरंजन व तेंच दत्तप्रेम"

श्रीपंतासारख्या अनुभव शिखरावर आरूढ झालेल्या सिद्धपुरुषानें नामस्मरणाचें जें इतकें महत्व वर्णिलें आहे, तें त्यांना स्वानुभवानें पटल्यामुळेंच त्यांत इतकें तेज व जोम आहे. निजानंद व परमानंद प्रगट झाल्याचाच हा अनुभवानंद होय.

प्रेम लहरींतील २८७ व्या पदांत "नामस्मरण प्रगट मिळाला निजानंद ठेवा ॥ बिंदुलें पडलें अहंभावा ॥ म्हणजे अंतःकरणांत 'निजानंद ठेवा' प्रगट झाल्याबरोबर, अहंभावावर बिंदुलें म्हणजे शून्य (हृदयांत नामस्मरणाच्या योगानें) पडलें, अर्थात् अहंभावाचें वाटोळेंच झालें! असा स्वानुभव श्रीपंतांनीं प्रे. ल. २८७ पदांत वर्णिला आहे!

प्रेमलहरींतील ८८ व्या पदांत 'गुरुनामामृत कंठीं धरितां प्रगटे परमानंद रे' असें स्वानुभवानें सांगून, प्रत्येकाच्या हृदयांत गुप्त असलेल्या परमानंदाच्या प्राप्तीचें सुलभ व सुकर साधन सुचविलें आहे!

श्री अवधूत महाराजांनीं ७७ ते ७९ या अभंगांत आणि ७–१७ व २१ या पदांत पंतांच्या प्रमाणेंच गुरूनामाचें महत्त्व प्रतिपादिलें आहे. उदाहरणार्थ ७७ व्या मनाचे श्लोकांत श्री अवधूत महाराज म्हणतात :—

मना त्वां धरावा गुरूनाम छंद । छंदेचि तरले जगीं साधु-वृंद ॥
मना नाम हें सर्व विकल्प मोडी । म्हणे मोरया नाम त्याचें न सोडी ॥

सदरील तीन्हीहि श्लोकांत गुरूनामाचें महत्व सोप्या भाषेंत श्रोत्यांना श्री अवधूत महाराजांनीं दाखवून दिलें आहे.

या शिवाय अवधूत हरिपाठांतील पान ४६ पद २१ मध्यें श्री अवधूत महाराजांनीं पुढील दोन ओळींनीं पदाची सुरवात केली आहे.

सद्गुरू स्वामी तुमच्या नामीं मन माझें रंगलें ।
मायामय हा प्रपंच भासे चरणीं मी रंगलें ॥

पान ४४ पद १७ पदांची सुरवात पुढीलप्रमाणें आहे :—

गुरुनाम धरावें कंठी ॥धृ॥ याचप्रमाणें पद १७ मध्येंहि भजन व गुरुनामाचे महत्व सोप्या भाषेंत वर्णिलें आहे.

हे चरित्र वाचणाऱ्या श्री अवधूत महाराजांच्या भक्तांना आणि चहात्यांना, पंतांच्या काव्यांतील पदांशीं ही केलेली तुलना महाराजांचीं कीर्तनें आणि विशेषतः पूर्वरंग, अध्यात्म विचारांनीं कसा रंगांत असेल, याची कल्पना येण्यास उपयोगी पडेल.

## गुरु मार्गाचें महत्त्व पटविणारीं पदें

प्रेमलहरींतील पंतांचे पद १९८ गुरु माझ्या जीवीचा जीवन यांतील गुरुमहात्म्य श्री अवधूत महाराजांनीं ३५, ५९ व ७० यांत सोप्या भार्षेत वर्णिलें आहे. पद ७० मध्यें महाराजांनीं पुढील दोन ओळी पदाचे शेवटीं घातल्या आहेत :—

म्हणोनि गुरूचे मना पाय जोडी। म्हणे मोरया हो अहंभाव सोडी ॥

याप्रमाणें मनाचें श्लोक ७७ वा आणि पदें ८६, ८८, ८९, ९०, ९३, ९४ व ९५ मध्येंहि गुरुमाहात्म्य सोप्या भार्षेत वर्णिलें आहे.

विशेषतः **गुरुमहात्म्य व गुरुनाम** यांची थोरवी वर्णन करण्यासाठीं रचलेल्या शंभर 'मनाच्या श्लोकां' विषयीं रचनेची प्रेरणा आपले सद्गुरू श्रीपंत यानीं स्वप्नांत येऊन केली आणि सद्गुरुंच्याच कृपेनें हे शंभर मनाचे श्लोक आपण पुरे रचूं शकलों, असें अवधूत महाराजांनीं आपल्या १०० मनाचे श्लोकांत सांगितलें आहे :–

मना केलि स्वप्नांत आज्ञा गुरूनें।
शत-श्लोक झाले तयाच्या कृपेनें॥
देवोनि अभय शिरीं ठेवी पाणी।
म्हणे मोरया हो गुरूचीच वाणी॥

मनाचे हे १०० श्लोक कार्तिक शु॥ ५ रोज गुरुवार शके १८३४ सन १९१२ मध्ये संपूर्ण झाले, अशीहि नोंद श्री अवधूत महाराजांनीं केली आहे म्हणजे श्रीपंत स्वानंदवासी झाल्यानंतर ७ वर्षांनीं हे मनाचे श्लोक श्रीपंतांच्याच प्रेरणेनें पूर्ण झालें !

## श्रीपंतांची आणखी कांहीं पदें

श्री अवधूत महाराजांना श्रीपंत सद्गुरुंचीं प्रेमलहरींतील पुढील पदें फार आवडत आणि त्यांचा वापर ते पूर्व रंगांत व आख्यानांतहि निरुपणांतील रंग वाढविण्यासाठीं करीत तीं—

२०३, १७३, ५०८, ३७, ३१, ३६, २०७, ३८९, २१, १८, २९ या पदांतील विचार श्री अवधूतमहाराजांनीं आपले मनाचे श्लोक अभंग व पदें यांतून अत्यंत सोप्या भार्षेत सुबोध प्रगट केला आहे, ही पुस्तकें (पंतांचें प्रेमलहरी आणि श्री. अवधूत महाराजांचा 'अवधूत हरिपाठ,') ज्या भक्तांजवळ आहेत, त्यांना तुलनात्मक अभ्यासाचे दृष्टीनें अभ्यासावयास मिळून त्या अभ्यासाचा त्यांना आनंदहि लाभेल.

सध्यां हीं पदें श्री दत्तमहाराज (श्री अवधूत महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र) आपल्या कीर्तनांत महाराजांच्याच प्रभावी पद्धतीनें म्हणून त्यांचें विवरण करीत असल्यानें त्यांचीं कीर्तनें ऐकणाऱ्या श्रोतृगणांनाहि हा आनंद सहज लुटतां येईल !

## श्री अवधूत महाराजांच्या काव्याचें विशेष स्वरूप

श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकर आणि श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांच्या काव्याचा तुलनात्मक अभ्यास करण्याची आणि त्यांतील ऐक्यस्वरूप ओळखण्याची एक विशिष्ट दृष्टिकोणाची पद्धति आतांपर्यंत थोडक्यात दिग्दर्शित करण्यात आली तिचा फायदा महाराजांचे शिष्य व भक्त यांनीं घेतेलाहि आहे, आणि यापुढेंहि घेणारे आढळतील.

आतां सामान्य वाचकांनीं असा अभ्यास करण्याचे दृष्टीनें एक विशेष सूचनात्मक इषारा ध्यानांत घेण्यासारखा आहे तो असा :—

श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकर यांना बालपणापासून चिकित्सक दृष्टी होती. त्यांचे मार्गदर्शक सद्गुरू श्री बालमुकुंद उर्फ बाळप्पा यांनीं या बालवयांतील तेजस्वी तरुणाचीच निवड आपला पंथ पुढें चालविणारा पट्टशिष्य म्हणून केली होती. अनुग्रह अगर गुरुपदेश देणाऱ्या 'गोसावड्या विषयीं' श्री पंतमहाराज उर्फ दत्तू याला तरुणपणापर्यंत तिटकारा होता, असें त्यांच्या चरित्र-परिचयावरून दिसून येते ! हें माहीत असूनहि सद्गुरू बालमुकुंद यांनीं या तेजस्वी तरुणाला एकप्रकारें चिडवून व डिवचून, तावून सुलाखून, आपल्या सामर्थ्यांचा प्रत्यक्ष अनुभव त्याला दिला आणि मगच पट्टशिष्य म्हणून हृदयाशीं धरलें ! हे सर्व अनुभव श्रीपंतमहाराजांनीं आपल्या गद्य-पद्य लिखाणांतून वारंवार सांगितले आहेत. एकनाथ महाराज ज्याप्रमाणें देवाशी व सद्गुरुंशीहि शिष्यांचे स्वरूपांत लडिवाळपणानें भांडले, त्याप्रमाणें श्री पंतमहाराजांनीं सद्गुरुंशीं लडिवाळपणाची आणि शिवराळपणाची लाडकी लगट केल्याचे विपुल दाखले त्यांच्या पदांतून आणि गद्य लिखाणांतून आढळतात ! थोडक्यांत वर्णन करावयाचें तर श्रीपंत महाराजांचें वाङ्मय, ही, एखाद्या कायदे शास्त्रात तरबेज झालेल्या सॉलिसिटरनें एखाद्या अवघड नाजूक खटल्याची बाजू संपूर्ण स्वरुपांत तयार करावी, तशी पंतवाङ्मयांत अध्यात्म स्वरूपाच्या अवधूत मार्गाची अवघड व नाजूक स्वरूपाची मांडणीच आहे, असें त्यांच्या गद्यपद्य वाङ्मयाचा सखोल अभ्यास करणाऱ्या भक्त व शिष्य यांना आढळून आलें आहे.

आतां श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचें अगदीं आटोपशीर असें पद्य-वाङ्मय आणि कीर्तन-प्रवचनांतील त्यांचें गद्य निरूपण, याचें स्वरूप, यांची पंत-महाराजांचें पद्य व गद्य यापेक्षां एका दृष्टीनें वेगळें कसें व कां आहे याचें विवेचन केल्यानें त्यांनीं आपल्या जीवनाचे अखेरीपर्यंत केलेल्या गुरु-सेवा स्वरूपीं आध्यात्मिक तपाचें महत्व वाचकांचे लक्षांत येण्यासारखें आहे. अव्वल दर्जाच्या सॉलिसिटरनें उत्कृष्ट प्रकारें तयार केलेल्या एखाद्या कायदेशीर प्रकरणाची तरफदारी अव्वल दर्जाच्या बॅरिस्टरनें कोर्टापुढें उत्कृष्ट प्रकारें करावी, तसाच श्रीपंतवाङ्मयांतील अवधूतपंथाचा प्रचार श्रीअवधूत महाराजांनीं आपल्या प्रवचनांतील आणि कीर्तनांतील बोधाचें वाङ्मयरूपांत शिष्य व भक्त यांचे करितां केला आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं. श्री अवधूत महाराजांच्या या कीर्तन-प्रवचनांतील आध्यात्मिक तपाच्या भक्तीमुळेंच, अवधूत मार्गाचा प्रचार काशीपासून रामेश्वरापर्यंत होऊं शकला, अशी अनेक भक्तांची साक्ष आहे.

## श्री अवधूत महाराजांचें वाङ्मय-तप

श्री अवधूत महाराजांच्या वाङ्मय तपाचें आध्यात्मिक स्वरूप पूर्ण प्रचारी स्वरूपाचें कसें होतें याचें वर्णन वर केलेंच आहे. आपल्या आत्मबोधांतील मनाचे श्लोक या प्रकरणाची सुरवात करतांना श्री अवधूत महाराज म्हणतात "माझे सद्‌गुरू (पंतमहाराज) अनंत रूपांनीं प्रगट होऊन निजभक्ताला आध्यात्मिक प्रेमानें पूर्ण करतात. त्याप्रमाणें मला सद्‌गुरुंनी गुरुद्वादशीला अनुग्रह देऊन माझ्या कायारूपी जीवनाचें शांति-समाधान स्वरूपांत पूर्ण सार्थक्य केलें. (मनाच्या श्लोकांची सुरवात श्लोक १ ला)

मनाचे श्लोक ११ ते १५ मध्यें सद्‌गुरूंच्या भजनानें सद्‌गुरूचा पंथ अगर मार्ग 'सुकर' होतो असें अवधूत महाराजांनीं आत्मविश्वासानें म्हटलें आहे. नंतर मनाचे श्लोक १५ ते २८ पर्यंत "सद्‌गुरूंच्या अनन्य भक्तीनें अनंत ब्रह्माचें भजन करण्याचें व त्या भजनानें आत्मानंदाचें फळ कसें मिळतें हें स्वानुभवानें सांगितलें आहे."

सद्‌गुरूच्या सगुण स्वरूपांतच अनंतब्रह्माचें स्मरण व सतत भजन केलें असतां, सद्‌गुरू मार्ग सोपा आणि सुकर होतो हें वर्म १५ ते २९ श्लोकांत वारंवार आवर्जून सांगितलें आहे. इतकी मनाची तयारी झाल्यावर तशाच भजनानंदांतून अद्वैत, ब्रह्मानंद आणि योग इत्यादि आत्मबोधाची परिभाषा अवधूत महाराजांनी सोप्या शब्दांनीं स्पष्ट विवरणाचे स्वरूपांत विशद करून सोप्या व आटपशीर शब्दांनी मांडली आहे.

सद्गुरूचें भक्तियुक्त अंतःकरणानें नित्य स्मरण, आणि त्या संतत स्मरणानें सद्गुरुनाम भजन, त्यामुळें जीवनांत–'राम', निर्माण होतो आणि त्यामुळें कामाच्या बंधनांतून जीवात्मा मुक्त होतो व आत्मानंद भोगण्यास समर्थ होतो, हेंच वारंवार हटयोग व भक्तियोग यांच्या परिभाषेंतील शब्द वापरूनच अवधूत महाराजांनी सांगितलें आहे. पण त्याचें पोषक स्वरूप कसें आहे हें सामान्य वाचकांनीं लक्षांत घेण्यासारखें आहे.

अनन्यवृत्तीनें गुरुस्मरण व गुरुभक्ति, गुरुनामस्मरण संतत करण्याचें तप आचरून, त्यांतून झालेल्या स्फूर्तीनें जीवनांतापर्यंत कीर्तनें व आत्मबोधस्वरूपांत गुरुमार्गाची महती सांगून तिचा प्रचार करीत राहण्याच्या तपश्चर्येचे सामर्थ्यामुळेंच अवधूत महाराज, अवधूत मार्गाचा झेंडा काशीपासून रामेश्वरापर्यंत सद्गुरूंच्या आशिर्वादाप्रमाणें फडकवूं शकलें हें उघड आहे. अवधूत महाराजांच्या या तपश्चर्येचें स्वरूप त्यांच्या 'आत्मबोधाचे श्लोक, अभंग व पदें' यांतून जागोजाग वाचकांना आढळून येते.

वेदांताची, हटयोगाची आणि वेदांतांतील प्रचलित परिभाषेची उजळणी अवधूत महाराजांनीं जणुं गुरुभक्तीच्या सूत्रांतच केली आहे, असें वाटतें. वानगी-दाखल आणखी कांहीं मनाच्या श्लोकांचा उल्लेख करण्यासारखा आहे.

अद्वैत आनंद बुद्धीस मिळतो। म्हणे मोरया सद्गुरूप्रेम पीतो ॥ ३० ॥

तसेंच श्लोक ३३, ३५, ३७, ५०, ५५, ५९, ६९, ७०, ७६, ९०, ९३, ९४, ९६ आणि १००

या श्लोकांचे दरम्यान वेदांताचा आचार, विचार आणि त्यांची परिभाषा सोप्या शब्दांत गोविली, तशीच ती अभंग पदें आणि ५२ मांत्रिकांची लावणी यांतहि साध्या आणि रामदासांच्या निस्पृह आणि स्पष्ट शब्दांत गोविली आहे. पण जागेच्या आणि वेळाच्या अभावीं 'अवधूत परिपाठ' या पुस्तकांत देतां येत नाहीं.

सामान्य लोकांना कळणाऱ्या सोप्या भाषेंत वेदांताचे विचार सोपे करून मांडण्याची अवधूत महाराजांची किमया पुढील श्लोकांत दिसून येण्यासारखी आहे.

गुरूनें मला दाविली प्रेम मुद्रा। प्रपंचामधें लागली योगनिद्रा ॥ ९० ॥
अनुभव ज्ञानें व्यतिरेक केला। म्हणे मोरया हो समरस झाला ॥

मना नाम-शब्दें तुटे काम बेडी। म्हणे मोरया नाम त्याचें न सोडी ॥ ९१ ॥

मना ग्राम्य-गीतास सोडोनि द्यावे। मना सद्गुरूगीत वाचें वदावे ॥
मना धन्य वाचा करी कीर्तनानें। म्हणे मोरया उद्धरी जग ज्ञानें ॥ ९४ ॥
मना छत्तिसाचा अरे पिंड झाला। मना श्लोकरूपें तया बोध केला ॥
विवेकें मना ध्यान त्याचें करावें। म्हणे मोरया सार त्यांनींच खावें ॥ ९७ ॥
मना श्लोक प्रेमें म्हणती प्रभातीं। मना छत्तिसाचे त्रेसष्ठ बनती ॥
मना विन्मुखाला सन्मूख करिती। म्हणे मोरया जीव ब्रह्मास मिळवी ॥ ९८ ॥
जियें नाम नाहीं तियें कामराही। मना काम नाहीं तियें राम पाहीं ॥

या श्लोकामुळें **सेनापती बापट** यांचा 'महाराष्ट्र मेला तरी राष्ट्र मेले' या गावगीताच्या श्लोकाची आठवण होते. या गीताचें भाषांतर "महाराष्ट्र वांचला तर कोण मरेल आणि महाराष्ट्र मेला तर कोण वांचेल" असें आचार्य अत्रे यांच्या दैनिक मराठ्याच्या अग्रलेखावर असते!]

हे मनाचे श्लोक श्रीरामदासांच्या ठळक, कडक व सुबोध पद्धतीनें केले ते सद्गुरुप्रेरणेनेंच केल्याचा उल्लेख अखेरच्या १०० व्या श्लोकांत केलाच आहे. यांत वेदांताची आणि हटयोगाची सर्व परिभाषा वापरून हृदयस्थ दत्ताची अनुभवानें ओळख पटवून घेणें आणि त्या योगेंच जन्माचें सार्थक्य साधणें, ही 'फलश्रुति' ९९ व्या श्लोकांतच सांगून टाकली आहे. आतां या विवेचनाचा जास्त विस्तार करण्यास जागेचा आणि वेळाचाहि अभाव असल्यामुळें, तो येथेंच आटोपता घेतो.

## स्वात्मानंद देणारी तुलना

आतां श्री अवधूत महाराज आपल्या कीर्तनाचे पूर्व रंगांत पंतांचीं कोणतीं पदें वापरीत त्या पदाचें, त्याच प्रमाणें श्री अवधूत महाराजांना श्रीपंतांचीं कोणती पदें विशेष आवडत आणि आपल्या आत्मबोध—प्रवचनांत कोणत्या पदाचा श्री अवधूत महाराज उल्लेख करीत, त्याच प्रमाणें नित्य भजनानंदांत कोणतीं पदें ते भक्तिपूर्वक रंगून म्हणत, याचा नुसते आंकडे देऊन उल्लेख करीत आहे.

यामुळें श्रीपंतांच्या प्रेमलहरींतील हीं पदें आणि श्री अवधूत महाराजांचे आत्मबोधाचे श्लोक अभंग व पदें यांचा अभ्यास करण्याची त्यांच्या भक्तांना व त्यांच्या चाहत्या वाचकांना प्रेरणा होईल व त्या अभ्यासा पासून स्वात्मानंद घेता येईल, असा आम्हांला विश्वास वाटतो.

## श्री पंतांच्या प्रेमलहरींतील श्री अवधूत महाराज कीर्तनाचे पूर्वरंगांत वापरीत तीं पदें

२३५, २३७, १९३, १३३' ११४, १९१, १६९, १९२, २८१, ४७३, १५६ व १८३ हीं आहेत.

शिवाय आपल्या स्वात्मानंद–भजनांत श्री अवधूत महाराज पुढील पदें नित्य म्हणत व आत्मबोधाचे विवरणरूपी विवेचनांतहि या पदांचा उपयोग करीत तीं प्रेमलहरींतील पदें :—

२२२, १९९, २०३, १७३, ५०८, ३७, ७१, ३६, २०७, ३८९, २१, १८, २९.

हीं पदें वर दिलेल्या क्रमानें म्हणत असें नाहीं. कीर्तनांत वा आत्मबोधांत संदर्भाच्या ओघांत जें पद येईल तें म्हणून श्री अवधूत महाराज त्याचें विवरण करीत.

आतां नित्य भजनाचा व प्रार्थनेचा शेवट अवधूत महाराज ज्या पदानें करीत तें पद खालीं दिलें आहे :—

दत्ता हा स्तवनहार अर्पितो तुला। अनुभव सह प्रेमभरें आजि गुंफिला ॥ धृ ॥

याचीं तिन्हीं कडवी ( अवधूत महाराजांच्या आत्मबोधाचे श्लोक व हरिपाठ पान ५५ )

सदरील सर्व पदें श्री अवधूत महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र ह. भ. प. श्री दत्त महाराज आपल्या कीर्तनाचे पूर्व व उत्तर रंगांत वापरून त्यांचें विवरण श्री अवधूत महाराजांप्रमाणेंच भक्तिरंगांत रंगून सुबोध करीत असल्यामुळें त्यांच्या गांवोगांवच्या श्रोत्यांना त्याचा फायदा व आनंद मिळतो.

श्री अवधूत महाराजांच्या 'आत्मबोध श्लोक अभंग व पदें' यांतील पान ५४ व ५५ वरील सर्व पदें, आरत्या व शेजारती महाराजांचे सर्व सुपुत्र आणि शिष्य व भक्त शक्यतों दररोज पण विशेषतः गुरुवारीं मोठ्या भक्तिपूर्ण पद्धतीनें म्हणत असतात व भाग्यवान् श्रोते तीं ऐकून स्वात्मानंदाचा आस्वाद घेतात. विशेषतः—

क्षणोक्षणीं विसरतो तुजला ॥
परि राखीशी निशिदिनी मजला ॥ धृ ॥

ही सदरील प्रार्थना म्हणतांना म्हणणारे भक्त आणि ऐकणारे श्रोते सद्गदित होतात व सर्वांची हृदये हेलावून जातात, हें लेखकानें प्रत्यक्ष पाहिलें व अनुभविलें आहे.

## राष्ट्रधर्म प्रचाराचें प्रभावी साधन

## भारताचा कीर्तन सांप्रदाय

आद्य महर्षी नारदांपासून, भारतांत धर्म प्रचाराचें एक प्रभावी साधन म्हणून कीर्तन सांप्रदाय, चालत आला असून तो अद्यापीहि अनेक आपत्तींशीं टक्कर देत टिकून राहिला आहे. अवधूतमार्गाचे प्रभावी प्रवर्तक श्रीपंतमहाराजांनीं या कीर्तनसांप्रदायाचें महत्त्व बरोबर ओळखलें होतें. आणि म्हणूनच त्यांनीं या कीर्तन-प्रचाराचे कार्यासाठीं श्री अवधूत महाराजांची निवड करून स्वतःची कफनी अवधूत महाराजांचे अंगावर चढविली. श्रीपंत महाराजांच्या या सक्रिय शुभाशीर्वादाच्या सामर्थ्याचे आधारानें श्री अवधूत महाराजांनीं अवधूत मार्गाचा तेजस्वी प्रचार 'काशीपासून रामेश्वरापर्यंत' कसा केला, याची ग्वाही श्रीपंतांचे बंधु पंतांच्या मातुश्री, आणि पंतांच्या व अवधूत महाराजांच्या अनेक भक्तांनीं केल्याची नोंद, प्रस्तुत चरित्रांतील आठवणींत आणि इतरत्र आहेच.

अगदीं अलीकडे 'राष्ट्र धर्म संमेलन, नांवाची संस्था धर्माच्या पुनरुज्जीवनासाठी स्थापन झालेली असून, या संस्थेच्या उद्देश-पत्रकांत धर्मप्रचारासाठीं, कीर्तन संस्थेचें महत्त्व किती व कसें आहे, याचें विस्तृत व सुंदर विवेचन केलें आहे. त्यातील कांहीं उतारे श्री अवधूत महाराजांच्या कीर्तन प्रचाराचे महत्त्व धर्मप्रचाराची आस्था बाळगणाऱ्या सर्व भक्तांना पटविणारें आहे. म्हणून त्या उद्देश-पत्रकांतील महत्वाचे उतारे पुढें दिले आहेत :—

"राष्ट्रधर्म जागृतीची आवश्यकता, त्यासाठीं कीर्तन-प्रवचनादि धर्मप्रचाराच्या साधनांची उपयुक्तता आणि राष्ट्रनिष्ठा आणि धर्मनिष्ठा परस्पर पूरक असून, एकंदर समाज आध्यात्मिक प्रेरणेनें भारला जाऊन राष्ट्रीय कर्तव्याविषयीं जागरूक बनेल अशी दक्षता, (समाजांत उत्पन्न करण्यावर) भर देणारी संमेलनाची भूमिका सर्वमान्य होईल यांत शंका नाहीं."

'संसार नेटका करण्यासाठींहि' परमार्थाची (त्याग वृत्तीची) भूमिकाच उपयुक्त ठरते असें श्रीसमर्थ रामदासांप्रमाणेंच श्रीपंत बाळेकुंद्रीकर व त्यांनी कीर्तन प्रचारासाठीं निवडलेले शिष्य श्री अवधूत महाराज यांना हीच संसाराच्या नेटकेपणाची भूमिका मान्य आहे हे त्यांच्या प्रवचना कीर्तनादि गद्यपद्य वाङ्मयावरूनहि स्पष्ट होत आहे. संसार म्हणजे व्यक्तीचा संसार नसून समष्टीचा म्हणजे 'सर्व समाजाचा संसार' ही व्यापक भूमिका सर्वच संतांना मान्य आहे, अर्थात् अवधूत महाराज व त्यांची गुरुपरंपरा यांनाहि मान्य आहे हें उघड आहे.

"धर्म प्रचारकांच्या भिन्न भिन्न प्रक्रियांचा विचार करून राष्ट्रधर्मांच्या उद्दिष्टांसाठीं त्यांचा मेळ कसा घालता येईल या विषयींचें मार्गदर्शन" करतांना 'राष्ट्रधर्म–संमेलनाच्या' पत्रिकेंत पुढील विवरण आहेः—

"कीर्तन, प्रवचन, आदि पद्धतीमध्यें, कांहीं कांहीं वैशिष्ट्यें आहेत आणि प्रचारकांमध्यें सांप्रदायिक, वैचारिक, आध्यात्मिक व नैतिक संस्कार देण्याचें महान् कार्य या मंडळींकडून होत आहे, हें कोणीहि विचारी मनुष्य मान्य करील. शिवाय अध्यात्म, भूतदया चारित्र्य–वर्धन, आदि जीवनमूल्यांबद्दल या सर्व (संत) मंडळींमध्यें एक वाक्यता आहे. म्हणून आत्मकल्याण व लोककल्याण, यांना पोषक असलेलीं ही समान भूमिका प्रमाण मानून सर्व सांप्रदायपद्धतींत तिचा समावेश करून घेऊन व (तसें करतांना) त्यांचें वैशिष्ट्य अबाधित राखून, आत्मोद्धार आणि लोकोद्धाराचें महान कार्य त्यांच्याकडून संघटित रीत्या व प्रभावीपणें व्हावें, याच उद्देशानें हें संमेलन प्रेरित झालें आहे."

राष्ट्रधर्म संमेलनाच्या सदरील उद्देशांत यापुढें

## राष्ट्र आणि धर्म

या शब्दांच्या आणि त्या शब्दांनीं अभिप्रेत होणाऱ्या सत्यवस्तूंचें विवरण पुढीलप्रमाणें केलें आहे—

"राष्ट्र व धर्म हे शब्द उचारले कीं **चैतन्य व मांगल्य** यांचा प्रादुर्भाव लोकमानसांत होतो. एक काळ तर असा होता कीं तेव्हां राजसत्ता अस्तित्वांत नव्हती.; केवळ धर्मांच्याच आधारें प्रजा आपला कारभार चालवीत असे.

न राजासीत्, न वा राज्यं न दंडो नच दांडिकः ।
धर्मेणैव प्रजाः सर्वाः रक्षंति स्म परस्परम् ॥

धर्मांचा जबरदस्त प्रभाव जनमनावर असला म्हणजे समाजाची घडी बसणें किती सुरळीत होते, याचें हें उदाहरण आहे. मानवाच्या ज्ञात–इतिहासांत टोळ्यांपासून राष्ट्रांपर्यंत समाज कसा उत्क्रांत झाला हें पहावयास सांपडतें.............. यांमधूनच समाज स्थैर्याची कल्पना विकसित होऊं लागली................यासाठीं केलेले कांहीं नियम व त्यानंतरची पायरी म्हणजे शासकीय राज्ययंत्रणा. त्या राज्यांतील जनतेच्या आशा आकांक्षांना संवादी होणारी राज्यपद्धती निर्माण झाली. त्यांतूनच राष्ट्रकल्पनेचा विकास व राष्ट्रांतील सर्व लोकांच्या कल्याणावर आधारलेली लोकशाही,; अशा रीतीनें समाजाचें राजकारण विकसित होत गेलें."

## धर्मांचें व राष्ट्राचें कार्य : समाजाची धारणा

वरीलप्रमाणें 'राष्ट्र' शब्दामागील आपल्या सांस्कृतिक कल्पनेची आधुनिक कल्पनेशी तुलना केल्यानंतर राष्ट्रधर्म संमेलनाच्या उद्देश पत्रिकेंत 'धर्म' या आपल्या संस्कृतींतील शब्द-कल्पनेचें विस्तृत विवरण केलें आहे. इंग्रजींतील 'रिलिजन' या शब्दामागील पाश्चात्य कल्पनेपेक्षां आपली 'धर्म' या शब्दामागील कल्पना खूपच व्यापक आणि विश्वव्यापी आहे, असा सदरील विवरणाचा थोडक्यांत स्पष्टार्थ आहे.

'धारणान् धर्ममित्याहुः' अशी धर्माची व्याख्या महाभारतांत आहे-धारणा म्हणजे समाजधारणा समाजधारणेसाठी म्हणजे "समाजाच्या आधिभौतिक व आध्यात्मिक प्रगतीसाठीं समाजांतील घटकांचा कर्तव्यधर्म निश्चित करून, त्या त्या धर्माच्या आधारें समाज सुप्रतिष्ठित व प्रगत व्हावा, हेंच धर्मांचें कार्य आहे" भारतीय संस्कृतीच्या धर्म-शब्दांत, "तत्वज्ञान, नीति व प्रत्येकाचे देशकाल परिस्थिती सापेक्ष कर्तव्य, वैयक्तिक व सामाजिक व्यवहार, आचार इत्यादि, जीवनाच्या सर्व अंगोपांगांचा समावेश होतो. म्हणूनच भारतीय संस्कृतीचा "धर्म" म्हणजे मानवी जीवनाचें दर्शन होय"

**सारांश** :—"क्षेत्रपरत्वें प्रत्येकाचे धर्म ठरत असतात, पितृधर्म, पुत्रधर्म (पतिधर्म) पत्नीधर्म, कौटुंबिक धर्म, अहिंसा, सत्य इत्यादि सामाजिक धर्म आणि सर्वत्र अद्वैताचा साक्षात्कार होऊन अनन्य भक्तीनें मुक्ति साधण्याचा आध्यात्मिकधर्म या सर्व गोष्टी मिळून मानवधर्म होतो. सारांश मानवाचे आधिभौतिक, सांस्कृतिक व आध्यात्मिक हित साधणारा मार्ग" म्हणजेच भारतीय संस्कृतीचा 'धर्म' होय.

समाजाची धारणा व कल्याण हाच भारतीय संस्कृतीला मान्य असलेल्या धर्मांचा उद्देश असल्यानें व तोच राष्ट्रधर्मालाहि पोषक असल्यानें राष्ट्र व धर्म हे एकमेकांना पोषकच ठरतात. इतकेंच नव्हे तर धर्म हा मानवी जीवनाचा साकल्यानें विचार करणारा असल्यानें अधिक व्यापक ठरतो. म्हणूनच धर्मांचा राष्ट्रकारणांत आविष्कार होण्यानें तो राष्ट्रधर्म ठरतो. राष्ट्रकारणाचें उद्दिष्ट म्हणजे राजकारणाचा लोककल्याणकारी व्यवहार, सदरील राष्ट्रधर्म व्यवस्थेनें सुकर चालूं शकेल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

लोककल्याणकारी राज्यकारभार जन्मदात्या पित्या पेक्षांहि प्रजाजनांना हितावह ठरतो. लोककल्याणाचें कंकण हातीं बांधलेल्या प्राचीन राजांचें वर्णन.

प्रजानां विनयाधानात् रक्षणात् भरणादपि ।
स पिता पितरः स्तासां केवलं जन्म हेतवः ॥

असें कालिदासप्रभृति प्राचीन कवींनीं केलें आहे. प्रजाजनांचा पिता केवळ जन्म देण्याला निमित्त, बाकी प्रजेच्या कल्याणाची सर्व काळजी असे लोककल्याणकारी ब्रीदाचे राजेच घेत. अशा राजांच्या राज्यकारभारालाच 'रामराज्य' म्हणत. भारतानें केलेली धर्माची व्याख्या साम्यतावादी कम्युनिझमच्या पुरस्कर्त्यांनाहि मान्य होण्यासारखी आहे !

× × × ×

ग्रीक, मुसलमान, इंग्रज वगैरे परकीयांच्या स्वाऱ्या भारतावर झाल्या, त्यामुळें समाजांतील कांहीं घटकांवर अन्याय झाला. यामुळें व आक्रमक स्वरूपाच्या अन्य कारणांमुळें, अद्वैत समता व मानवता यांचा पुरस्कार करणाऱ्या विचारांनाहि धक्के बसले ! आणि धर्माच्या व्यापक विचारांपेक्षां गौण विचारांना कांहीं काळ कांहीं लोकांनीं उचलून धरलें ! जाति विचारांचे गौण मुद्दे कांहीं लोकांच्या धर्माचारांत डोकावूं लागले ! असल्या कारणांनीं धर्म व समाज यांचें अनुसंधान कांहीं काळ तुटल्यासारखें झालें ! धर्माचाराला कांहीं धर्मप्रचारकांनीं वैयक्तिक असें आकुंचित स्वरूप दिलें !

परंतु वर वर्णन केलेल्या धर्माचार-विकृतीच्या या आपत्काळांतहि भारताच्या भाग्यामुळें भगवान् कृष्ण, भगवान् बुद्ध यांच्या परंपरेंतूनच रामकृष्ण, विवेकानंद यांचेंपासून तों थेट टिळक–गांधी–विनोबापर्यंत संतांची परंपरा समाजधर्माच्या धारणेसाठीं चालूच राहिली, आणि मध्यंतरी ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, रामदासादि संतांनीं समाजधर्माच्या श्रेष्ठ परंपरेची तेजस्वी वृत्ति कायम राखली. या सर्व संतांनीं बहुजनहित, लोकसंग्रह व आत्मकल्याण यांवर आपापल्या भक्तिमार्ग प्रचारानें भर दिला. श्रीरामदासांनीं 'पहिलें तें हरिभजन, दुसरें तें राजकारण, तिसरें तें सावधपण' असें म्हणून 'प्रपंच करावा नेटका' असा उपदेश केला तो देखील परमार्थाला पोषक म्हणूनच प्रतिपादिला. या संतमालिकेंतच श्री बालमुकुंद ( बाळप्पा ), श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकर आणि अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचा समावेश होतो. त्यांनींहि प्रपंच सोडून रानावनांत जाण्याचा निषेध केला

असून 'प्रपंचच परमार्थ रूपानें कसा करावा' असा उपदेश स्वतः आचरून त्यांनीं सर्वांना दाखविला आहे. समाजाच्या धारणेला हा प्रचार अत्यंत पोषक आहे, हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. श्री अवधूत महाराजांच्या कीर्तन-प्रवचन, प्रचारांत या गोष्टीला फार महत्व असे. म्हणूनच संसार परमार्थ रूपाने करणारे त्यांचे भक्त अशा धर्माचरणानें संसारांत राहूनच शांति-समाधान देणाऱ्या परमार्थ वृत्तीचा उपभोग घेऊन सुखी झाल्याची ग्वाही देत आहेत.

स्त्रीशूद्रादि बहुजनांना धर्मरहस्याचें तत्वज्ञान पटविण्यासाठीं पुराणें व त्यांतील रम्य कथा प्राचीन ऋषिमुनींनीं निर्माण केल्या आणि अशा रम्य कथा पुराण-कीर्तन प्रवचनांचे द्वारें प्रसारित केल्या. कलियुगा मध्यें तर वैयक्तिक आणि सामाजिक कल्याण करण्याचें साधन म्हणूनच "कलौ श्रीहरिकीर्तनम्" असा भारतीय वाङ्मयांत कीर्तन-प्रचाराचा गौरव केला आहे, याच साधनानें आत्मोद्धार व लोकोद्धार साधण्यावर थोर भारतीयांचा कटाक्ष होता.

संतांनी, कीर्तनकारांनीं आणि प्रवचनकारांनीं वर उल्लेख केल्याप्रमाणें लोकांना धर्मप्रवण करण्याची जी कामगिरी शेंकडों वर्षें केली तिला इतिहासांत तोड नाहीं, असा राष्ट्रधर्म संमेलनानें आपल्या उद्देश-पत्रकांत या कामगिरीचा गौरव केला आहे !

"देशांत राजकीय जीवन सुस्थिर नसतांना, राजे लोकांच्या परस्पर युद्धामध्यें सर्व समाजजीवन चिंताक्रांत असतांना आणि एकंदरीनें समाज मागासलेला व गरीब असतांना संतांनीं, भक्तांनीं, कीर्तनकारांनीं व प्रवचनकारांनीं, लोकोद्धाराच्या तळमळीनें प्रतिकूल परिस्थितीमध्ये समाजाला धर्म प्रवण करून त्यांच्या भयभीत जीवनांत निर्भयतेची, मर्त्य जीवनांत अमरत्वाची, फुटीर समाज जीवनांत एकतेची, आसक्त जीवनांत अनासक्तीची आणि विपन्न जीवनांत प्रसन्नतेची, जी दिव्यस्फूर्ति निर्माण केली. त्याबद्दल त्यांचा गौरव करण्यासाठीं शब्द पुरे पडणार नाहींत"

संतांनीं, भक्तांनीं व कीर्तनकारांनीं जें 'अमोलिक' असें धर्म प्रचाराचें कार्य शेंकडों वर्षें केलें त्यांना केवळ धर्म प्रचाराची निष्ठा होती, कसलेंहि प्रलोभन नव्हतें. 'धर्म-प्रचार हाच आपला धर्म' ही त्यांची निष्ठा या थोर कार्या मागें होती. चरितार्थ वृत्ती या मागें नसून परमार्थ वृत्ति होती. म्हणूनच धर्म-जागृतीची ही परंपरा हजारों वर्षें चांगल्या प्रकारें टिकून राहिली, अशीहि ग्वाही राष्ट्रधर्म संमेलनानें आपल्या उद्देश पत्रकांत दिली आहे.

'इथे मराठिये नगरीं ब्रह्मविद्येचा सुकाळू' ॥

'इहीं वैकुंठचि केलें आघवें' ॥

"व्यासासारखे प्रवचनकार, वाल्मीकीसारखे पुराणकार, नारदासारखें कीर्तनकार याच परंपरेचे प्रवर्तक आहेत. महाराष्ट्रांत तर संत, कीर्तनकार यांची परंपरा फारच गौरवपूर्ण व वैशिष्ट्यपूर्ण आहे." ज्ञानदेवें रचिला पाया" या उक्तीप्रमाणें, महाराष्ट्रांत ज्ञानेश्वरांनीं जें धर्मप्रवर्तन केलें, त्यामागील प्रमुख प्रेरणा 'लोकोद्धार' हीच होती. मराठींत ग्रंथरचना करण्यामागें सामान्य लोकांना, त्यांच्या उद्धाराच्या मार्गाचें आकलन व्हावें, हाच उद्देश होता. "मऱ्हाटीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळू करी" ही ज्ञानेश्वरांची आकांक्षा होती. अद्वैतज्ञान आणि भूतमात्र व्यापक भक्ति, यांचा सुरेख संगम महाराष्ट्र परंपरेंत झाला आहे. त्यामुळें सर्व ठिकाणीं ब्रह्म आहे, तेव्हां विश्व हेंहि ब्रह्मस्वरूप आहे, ('विश्व ब्रह्मचि केलें') असें मानून, सर्व प्राणिमात्राकडे ब्रह्मरूपानें पहावें यावर महाराष्ट्र-संतांचा कटाक्ष आहे.

"सर्वांभूतीं दया। साधु म्हणावें ऐसिया ॥ जग ब्रह्मरूप जाण।

हेंचि साधूंचें लक्षण"

हेंच महाराष्ट्र-दर्शनाचें सूत्र होय"

## समारोप

या धर्म संमेलनाच्या उद्देश-पत्रकाचा समारोप पुढीलप्रमाणें करण्यात आला आहे :—

"महाराष्ट्रांतील संतांनीं, भक्तांनी, कीर्तनकार कथाकारादींनीं, कवींनीं भाविकांनीं सदरील सूत्र प्रमाण मानून मराटी जीवन उजळलें आहे. विश्व आणि ब्रह्म यांचें अद्वैत ज्या महाराष्ट्र धर्मामध्यें अनुस्यूत आहे, त्या महाराष्ट्रांत राष्ट्र व धर्म यांचा पुरस्कार होऊन राष्ट्रधर्म जागृतीला विशेष चालना मिळेल हें सांगणें नको."

## श्री अवधूत मार्गाचा प्रचार आणि त्याचा व्यापक प्रभाव

श्रीपंतमहाराजांकडून प्रासादिक आशीर्वादाची कफनी घेतल्यानंतर, कीर्तन आणि बोध-प्रवचनादींचे द्वारा श्री अवधूत महाराजांनीं श्री अवधूतमार्गाचा प्रचार अखिल भारतांत कोठें कोठें केला आणि तो किती दूरवर व्यापक स्वरूपांत पसरला, याविषयींचा तपशील या प्रकरणांत शक्य तितक्या संक्षेपानें घ्यावयाचा आहे.

श्री अवधूत महाराजांच्या या जीवनचरित्राच्या अखेरच्या कालाचा वृत्तांत नमूद करण्यापूर्वी, अवधूत मार्गाच्या प्रचाराचा आणि चरित्र-वाचकांनाहि तो उद्बोधक वाटेल असा आम्हांला भरवंसा वाटतो.

सुविचारी सामान्य माणसाला आपलें जीवन सार्थकी लागून सुफलित व्हावें, अशी स्वाभाविक इच्छा असते. 'संसार परमार्थरूपानें करणें' हें अवधूत मार्गाच्या बोधतत्वाचें सूत्रवाक्य आहे. हा बोध ज्यांच्या आचार-विचारांत पचनीं पडेल, ते 'आम जनतेंतील' म्हणजे 'बहुजन समाजांतील' सर्व लोक आपापलीं जीवनें ऐहिक व पारमार्थिक दृष्टिनेंहि सुखी करूं शकतील, हा अवधूत मार्गाच्या तत्त्वज्ञानाचा गाभा आहे.

श्री अवधूत महाराज स्वानंदवासी झाल्यावर त्यांची २७ वी पुण्यतिथी ता. २३ मार्च १९६६ रोजीं संपून २८ व्या पुण्यतिथीच्या वर्षाला प्रारंभ झाला. या पुण्यतिथीचे सोहाळ्यासाठीं श्री अवधूत महाराजांचे अनेक शिष्य व भक्त भडगांवीं जमले होते. त्या निमित्तानें सर्वांकडून आणि महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. अण्णा तथा दत्त महाराजांकडून सदरील प्रचारकार्याविषयीं जो तपशील नव्यानें समजला त्याच्या आधारेंच हें प्रचारकार्याचें सदर तयार झालें आहे.

## उत्तर प्रदेश

श्री अवधूत महाराजांनीं चाळिसगांव–भडगांव या ठिकाणीं कीर्तनें व बोध-प्रचार केल्यामुळें आणि तो अत्यंत लोकप्रिय ठरून प्रातीहि बरी झाली त्यामुळें तेथे अनेक स्त्री–पुरुषांनीं अवधूत महाराजांचा अनुग्रह घेऊन काशीहून परत येतांना भडगांवास फिरून येण्याचा आग्रह केला. यापूर्वी महाराजांनीं शिरोळ, मिरज, सांगली, सातारा, तासगांव, कऱ्हाड, पुणें, मुंबई आणि कल्याण, ठाणे, वसई, आगाशी इत्यादि मुंबईच्या उपनगरांतहि अनेक शिष्य व भक्त या अवधूतमार्गाच्या तत्त्वांत भक्तिप्रेमानें भारून टाकलें होतें.

'संसार परमार्थरूपानें करण्यांत' या अवधूत मार्गाचें थोर रहस्य ज्यांना समजून घ्यावयाचे असेल त्यांनी महाभारताच्या अश्वमेघपर्वांतर्गत **'श्रीअवधूत गीता'** आणि **'नारदभक्ति-सूत्रांतील'** 'भक्तिप्रेम माहात्म्य' समजून घेणें उपकारक ठरण्यासारखें आहे. त्यांतील 'आत्मसमर्पण भक्ति' 'अवधूत मार्ग' समजून घेणाऱ्यांना फार उपयोगी पडेल.

उत्तर प्रदेशांत काशीयात्रेचे प्रसंगीं श्री अवधूत महाराजांनीं काशी–प्रयाग–गया या त्रिस्थळींत आणि तिच्या आसपासच्या लहानमोठ्या अनेक गांवांतून अवधूत मार्गाचा प्रचार अत्यंत प्रभावी पद्धतीनें केल्याची माहिती (त्यांचे गुरुबंधू) कै. गोपाळराव लेले यांनीं आपल्या आठवणींत सांगितली आहे. तेव्हां उत्तर

प्रदेशांतून या प्रभावी प्रचारकार्याला सुरवात झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. काशीला कांहीं प्रसंगांनीं ज्या मिरवणुकी निघत त्या मिरवणुकीचे पालखींत श्रीपंत-महाराजांचा फोटो ठेवण्यांत येत असे. त्याचप्रमाणें प्रयागांत म्हणजे अलाहाबादेंत गोसावी समाज हत्तीच्या अंबारींत श्रीपंत महाराजांचा फोटो ठेवून मिरवणूक काढीत-अशी माहिती हुबळीच्या सिद्धारूढ मठांत आलेल्या उत्तर प्रदेशांतील एका गोसाव्यानें श्री सिद्धारूढ स्वामींना सांगितल्याची माहितीहि आहे. हे सर्व मिरवणुकींचे समारंभ श्री अवधूत महाराजांनीं उत्तरप्रदेशांत केलेल्या प्रभावी प्रचारा-नंतरचेच आहेत. 'श्री अवधूत महाराजांनीं आपल्या प्रचारकार्यानें स्वतःचें व्यक्ति-माहात्म्य तेवढें वाढविलें' असा कुत्सित व मत्सरी आरोप करणाऱ्या अभक्तांना सदरील वस्तुस्थिति–दर्शक माहितीनेंच चोख उत्तर मिळत आहे! कारण श्री अवधूत मार्गांनी स्वतःचें वैयक्तिक महात्म्य न वाढवितां आपल्या सद्‌गुरूंचें माहात्म्य वाढविण्यावर आणि सद्‌गुरूच्या अवधूत मार्गाचा प्रभाव वाढविण्यावरच आपल्या प्रचाराची अवधूत महाराजांनीं तपश्चर्या केली हे सदरील माहितीवरून स्पष्ट होण्यासारखें आहे. ही माहिति पुरविणारे कै. श्री. गोपाळराव लेले हे श्री अवधूत महाराजांच्या या प्रचारी कीर्तनांत पेटी वाजवीत असत आणि कै. श्री. बंडू टाकवडे हे झांज वाजवीत असत. त्यामुळें या दोघांनीं पुरविलेली ही उत्तर प्रदेशांतील प्रचार-कार्यांची माहिति 'चक्षुर्वै सत्यं' या दृष्टीनें महत्त्वाची ठरते.

## महाराष्ट्रांत व कर्नाटकांत

आतां पुणें मुंबई शहरांत आणि मुंबईच्या कल्याण ठाणे, वसई, आगाशी इत्यादि उपनगरांत महाराजांच्या अवधूतमार्गी प्रचाराचा प्रभाव किती व कसा हें नमूद करण्यापूर्वी महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत अवधूत महाराजांनीं श्रीपंतांच्या आशीर्वादाप्रमाणें 'अवधूत मार्गाचा झेंडा कसा फडकाविला' याचा त्रोटक तपशील नमूद करण्यासारखा आहे.

## महाराष्ट्रांत

सांगली व मिरज या शहरातून व त्यानजीक तानंग बांबवडे, विटे, बाटेगांव, येलावी, रायबागेनजीक यलगी, औदुंबर इचलकरंजी, नंतर कोल्हापूर शहराजवळील, सदलगे, यासारख्या खेड्यापाड्यांतूनहि श्री अवधूत महाराजांनीं प्रभावी प्रचार केल्याची माहिति तिकडील भक्त आजही सांगतात. यांतील अनेक ठिकाणीं लोकांनीं आपापल्या घरीं आणि कांही सार्वजनिक ठिकाणींहि श्रीपंतांचा व श्री अवधूतमहा-राजांचा फोटो ठेवून दररोज आणि विशेषतः दर गुरुवारीं भजन–पूजनादींचा जल्लोष

चालविला असल्याचीं वर्णनें, तिकडील शिष्य व भक्त करतात. बांबवडे येथे श्री मेघःश्यामबुवांनीं, आणि तानंग येथील मुसलमान बंधु बोखारी यांनीं, या अवधूत-प्रचाराला जोराची चालना दिल्याची माहिती या चरित्रांतील आठवणींत नोंदलेलीच आहे. एका 'हिंदू अवलियाचा अनुग्रह घेणाऱ्या 'बोखारी बंधूंचें' हें वागणे मुसलमानी धर्माला, मारक आहे, अशा खोट्या समजुतीनें, कोल्हापुराहून एका मुसलमान धर्मप्रचार करणाऱ्या मुल्लाला आणवून बोखारी बंधूंना समज देण्याचे प्रयत्न विरोधी मुसलमानांनीं केले. या मुल्लांनीं श्री अवधूत महाराजांची भेट चाळेकुंद्रीस घेऊन व तीन चार दिवस श्री अवधूत महाराजांचीं कीर्तनें प्रत्यक्ष ऐकून त्यांच्याशीं विचार विनिमय स्वरूपाचा वाद-विवादहि केला.

मग त्यांची खात्री पटली कीं श्री अवधूत महाराजांच्या शिकवणींत मुसलमान धर्माला विरुद्ध असें कांहींच नसून उलट आपापला धर्म, प्रत्येकानें अवश्य पाळावा, राम व रहिम यांच्यांत भेद नाहीं, असें या शिकवणीचें स्वरूपहि त्यांना पटलें ! इतकेंच नव्हे तर कांहीं मुल्लांनीं अवधूत मार्गाचा उपदेश व अनुग्रह यांना स्वतःच्या उदाहरणांनीं मान्यताहि दिली, असें वर्णन 'बोखारी बंधु' च्या आठवणींत आहे.

कोल्हापुरांतील प्रचार कार्याची सुरवात कै. श्रीमती रंगूताई यज्ञोपवीत यांच्या प्रोत्साहानें झाली असें आढळते. श्री अंबाबाई-देवीच्या पुजाऱ्यांना सांगून श्रीमती रंगूताईनी श्री अवधूत महाराजांचे दोन कीर्तनसप्ताह गरुडमंडपांत करविले. त्या सप्ताहांत कोल्हापुरांतील श्रीपंतमहाराजांच्या भक्तांनीं 'चोरून हजर राहून' भाग घेतला ! 'चोरून हजर राहण्यात त्यांचा संशयी ग्रह असा होता कीं- 'हे श्री अवधूत महाराज स्वतःचें व्यक्तिमहात्म्य वाढविण्यासाठीं हा कीर्तन प्रचार करतात कीं काय ?' पण प्रत्यक्ष हजर राहून कीर्तन ऐकल्यामुळे या पंत भक्तांचीहि खात्री पटली कीं—'खरोखर आपले सद्‌गुरू पंतमहाराज यांच्याच अवधूतमार्गाचा प्रचार करून त्याचा व्यापकरीत्या प्रभाव व्हावा, याच निष्ठेनें श्री अवधूत महाराज कीर्तन करीत असतात !' अशी खात्री पटल्यामुळें या पंतभक्तांनीं स्थापन केलेल्या अधिष्ठानाचें जागीं कीर्तनसप्ताह करण्याची विनंति श्री अवधूत महाराजांना केली. श्री. अवधूत महाराजांनींहि सदरील विनंतीला मान देऊन श्रीपंतअधिष्ठानावर मोठ्या प्रेमभक्तिपूर्वक कीर्तनें केली. इतकेंच नव्हे तर यांपैकीं एका अधिष्ठानासमोर लावण्यासाठीं मुंबईहून महाराजांनीं एक चिकाचा सुंदर पडदा खरीदून या अधिष्ठानाला भेट म्हणून पाठविला अशी माहिती श्री. बळवंतराव यज्ञोपवीत

( कै. रंगूताई यज्ञोपवीत यांचे, महाराजांचा अनुग्रह घेतलेले चिरंजीव ) यांनी सांगितली आहे. स्वतः बळवंतराव यज्ञोपवीत यांनीं आपल्या निवासस्थानीं श्रीपंतांचे आणि श्रीअवधूत महाराजांच्या फोटोचें अधिष्ठान ठेविले असून, श्रीपंतजन्मोत्सवाप्रमाणेंच श्री अवधूतमहाराजांचाहि जन्मोत्सव त्यांनीं सर्वांचे अगोदर ( भडगांवांतील या उत्सवाचेहि अगोदर ) थाटानें सुरूं केला ! या उत्सवांत नामसप्ताह भजन पूजनादि सर्व कार्यक्रम उत्साहानें साजरे होत असतात. श्रीपंतभक्त विनायकराव नाटेकर यांनीं स्थापन केलेली श्रीपंतमठी पंचगंगा नदीचे कांठीं गुरांचे बाजारानजीक आहे; आणि पंतभक्त रामाबुवा यांनीं कोल्हापूर स्टेशननजीक शाहूपुरी या व्यापारी पेठेंत श्रीपंतमठी स्थापिली आहे. या दोन्हीहि पंतभक्तांकडून अनेक उत्सवाचे निमित्तांनीं कोल्हापूर शहरांत आणि आसपासच्या खेडोपाडीं अवधूत मार्गाचा प्रचार चालू आहे.

## कर्नाटक

आतां कर्नाटकांत अवधूत महाराजांनीं कोठें कोठें पंतांच्या अवधूत मार्गाचा प्रचार केला आणि त्याला कसकसें सहकार्य व प्रोत्साहन मिळालें याविषयीं त्रोटक माहिती नमूद करण्यासारखी आहे. प्रथम हें नमूद केलें पाहिजे कीं कर्नाटक हा बाळेकुंद्री व दड्डी लगतचा प्रदेश असल्यामुळें पंतांचे गुरु श्री बाळमुकुंद ऊर्फ बाळप्पा आणि पंतांचे प्रेमळ बंधू यांच्याकडून या प्रचारकार्याला सहकार्य व प्रोत्साहन मिळणें स्वाभाविकच होतें व तसें तसें तें मिळालेंहि. बेळगांव, खानापूर हल्याळ, नंदगड, कुंदगोळ, धारवाड, हुबळी आणि आसपासचीं अनेक खेडीं यांतून कीर्तन आणि प्रबोध द्वारां श्रीअवधूत महाराजांनीं श्री बाळमुकुंद व श्रीपंत यांच्या अवधूत मार्गाचा प्रचार धडाडीनें केला.

प्रस्तुत चरित्रांत प्रसिद्ध झालेल्या आठवणींत मुक्काम पोस्ट यलवर्गी येथील श्री. चिन्नापा आबाजी कलाल, ता. शिरगांव, जि. धारवाड या प्रेमळ भक्ताच्या आठवणीचा विशेष उल्लेख करण्यासारखा आहे. आठवणी भाग २ मध्यें ८२ ते ८५ पानाचे अखेरपर्यंत श्री. चिनाप्पा यांची आठवण छापलेली आहे, ती वाचकांनीं अवश्य वाचण्यासारखी आहे. यांचे आजोबा श्री. कल्लाप्पा हे सद्‌गुरू बाळमुकुंद महाराजांचे शिष्य होते आणि श्री. सद्‌गुरू बाळमुकुंद अखेरच्या श्रीशैल्य यात्रेस जाईपर्यंत ते त्यांच्या निकट सान्निध्यांत होते. त्यांच्या मार्फतच श्रीपंतांना

श्री बालमुकुंदांचा अखेरच्या शैल्य यात्रेचा आदेश समजला. यापुढें श्री. कल्लापा व श्रीपंत परस्परांना सद्‌गुरुस्वरूपीं मानूं लागले, असा श्रीपंतचरित्रांत आणि प्रेम-लहरींतील पद्यांतहि उल्लेख आहे.

श्री. चिन्नाप्पा हे ९ वर्षे वयाचे असतांनाच त्यांना श्रीपंतभेटीला घेऊन जाऊन त्यांना श्रीपंतांचा अनुग्रह देवविण्याचा प्रयत्न त्यांचे आजोबा कल्लापा यांनीं केला; पण पंतांनीं याविषयीं घाई न करण्याची सूचना श्री. कल्लाप्पा यांना दिली. श्रीपंत म्हणाले, "कल्लाप्पा हा तुझा नातू लहान आहे, याला उपदेश देण्याची गडबड इतक्यांतच करूं नको. या मुलाचा उद्धार योग्य वेळीं होईलच."

श्रीपंतांनीं श्री. कल्लापा यांना सुचविलेली ती 'योग्य वेळेची' संधि हुबळी-पासून कांही मैलांवरील सौंशी या गांवचे श्री. दुर्गाराम कट्टी यांचेमार्फत श्री चिन्नाप्पा यांना पुढील आयुष्यांत मिळाली! श्री. दुर्गाराम कट्टी हे श्री अवधूत महाराजांचे अनुग्रहीत होते. "बाळेकुन्द्रीच्या श्रीपंत महाराजांचे अधिकारी शिष्य" म्हणून त्यांना शरण जाण्याची आग्रही सूचना श्री. दुर्गाराम कट्टी यांनीं श्री. चिन्नाप्पा यांना केली. त्यांनीं लवकरच कुरुंदवाडास जाऊन श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. यापूर्वी हुबळीच्या श्रीसिद्धारूढ स्वामींचे अनेक शिष्य व गुरुबंधू यांच्याशीं अध्यात्मचर्चा केली होती, पण त्यामुळें त्यांचें समाधान झालें नव्हतें; पण श्री अवधूत महाराजांनीं अनुग्रहाची कृपा केल्यानंतर मात्र 'मला समाधान वाटलें' अशी ग्वाही श्री चिन्नापा यांनीं आपल्या आठवणींत भाग २ पान ८३ वर दिली आहे. ते या पानावरील 'अनुग्रह' या मथळ्याखालील दुसऱ्या परिच्छेदांत म्हणतात—

थोर पूर्वजांच्या पुण्याईनेंच मला श्री अवधूत महाराजांची भेट होऊन माझें आध्यात्मिक समाधान झालें, ही माझी श्रद्धा आहे. यामुळेंच मला धन्य धन्य वाटलें! पुढें याच मथळ्याखालील चौथ्या परिच्छेदांत श्री. चिन्नाप्पा म्हणतात, "माझी मायबोली कानडी असूनदेखील श्री अवधूत महाराजांची मोहक अध्यात्मचर्चा ऐकून मला आपोआप मराठी भाषा समजूं लागली! यामुळें त्यांच्या अध्यात्मचर्चेचा पूर्ण लाभ मला मिळूं लागला!"

श्री सिद्धारूढ स्वामींची व श्री अवधूत महाराजांची भेट आपल्या समक्ष कशी झाली व या भेटींतच श्री सिद्धारूढ स्वामी आणि श्रीपंत बंधु श्री गोविंदराव-दादा यांचेकडून एका विशेषप्रसंगीं श्री अवधूत महाराजांचा केवढा मोठा गौरव

झाला, इत्यादि महत्त्वाची व आकर्षक माहिती श्री. चिन्नापांच्या आठवणींतूनच (भाग २ पान ८४) वांचण्याची शिफारस वाचकांना करणें उचित ठरेल.

एका माळी भक्तानें श्रीसिद्धारूढ स्वामींना पुष्पहार घालण्यासाठीं आणला तो श्री. गोविंददादांना घालण्यास श्रीसिद्धारूढ स्वामींनीं सुचविलें; पण गोविंद दादांनीं तो हार श्री. अवधूत महाराजांना घालण्याची सूचना केली ! त्यावेळीं श्री अवधूत महाराजांनीं त्या माळी भक्ताला सुचविलें, "श्रीपंतांच्या फोटोलाच तो हार घाल; म्हणजे आम्हां सर्वांनाच हार घातल्याचें श्रेय तुला मिळेल !" आपले सद्गुरू श्रीपंतमहाराज यांचेवर अवधूत महाराजांची केवढी निष्ठा होती, हें या सहज वर्तनावरून सिद्ध झालें !

## श्री सिद्धारूढ स्वामींचे गौरवोद्गार

वर वर्णन केलेला सर्व प्रकार पाहून श्री सिद्धारूढ स्वामींनी आपले बसण्याचे व्याघ्रासन श्री अवधूत महाराजांना दिलें आणि म्हणाले, "तुम्ही खरे अवधूण मार्गी असून या गादीचे वारसच आहांत इतकेंच नव्हे तर श्रीपंत महाराजांसारख्या सिंहाचे छावे आहां. आपण येथें येऊन हुबळींतील अनेकांना भक्ति-प्रेमाचा छंद लाविज्ञात यांत शंका नाहीं." "कीर्तनांत हरिणासन कां वापरतां ?" व्याघ्रासन कां वापरीत नाहीं ?" असें सहज एकदां सिद्धारूढ स्वामींनीं अवधूत-महाराजांना विचारलें तेव्हां 'तुम्ही प्रसाद म्हणून दिलें तर व्याघ्रासनहि वापरूं' असें उत्तर श्री अवधूत महाराजांनी दिलें होतें. तें ध्यानांत ठेवून श्रीसिद्धारूढ स्वामींनीं आपण बसत असलेलें व्याघ्रासन अवधूत महाराचांना देण्याची ही संधि साधली !

श्री सिद्धारूढ मठींतील सिद्धारूढ स्वामींचे शिष्य श्री कबीर यांचे प्रश्नांना श्री अवधूत महाराजांनीं जी आध्यात्मिक दृष्टीची मार्मिक उत्तरें दिलीं तींहि श्री. चिन्नापा यांच्या आठवणींतून (भाग २ पान ८५) वांचण्यासारखीं आहेत. एकंदरीत कर्नाटकांतील श्री अवधूत महाराजांच्या अवधूतमार्गी प्रचारावर, हुबळी-तील श्री सिद्धारूढ महाराजांच्या प्रोत्साहनानें कळस चढला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्री अवधूत महाराजांचे कीर्तन शिकलेले ज्येष्ठ सुपुत्र श्री. अण्णा तथा दत्तमहाराज हे त्यावेळीं १३ वर्षांचे होते. ५–६ हजार लोकांपुढें त्यांचें कीर्तन श्री सिद्धारूढ स्वामींनीं करविलें. लोकांना हा बालकीर्तनकार दिसावा म्हणून त्यांना टेबलावर उभें करण्यांत आलें. सिद्धारूढ या बालहरिदासाला जवळ आपल्या आसनावर बसवून पाठ थोपटून त्याचें कौतुक करीत !

## मराठवाड्यांतील प्रभावी प्रचार

यानंतर मराठवाड्यांतील औरंगाबाद, पैठण, जालना, परभणी, नांदेड इत्यादि भागांत श्री अवधूत महाराजांनीं कीर्तन व अध्यात्मबोधांतील प्रचाराची जी फेरी काढली तीहि अत्यंत यशस्वी झाल्याची माहिती यावेळीं मिळाली आहे.

मराठवाड्यांत औरंगाबाद, पैठण, जालना, परभणी, नांदेड इतक्या प्रमुख शहरांत व आसपाच्या खेड्यांत श्री अवधूत महाराजानीं अवधूत मार्गाचा प्रभावी प्रचार केला. विशेषतः औरंगाबाद आणि पैठण या ठिकाणीं तर या प्रचारानें या भागांत उच्चांक गांठला. हिंदुंच्या देवळांत गर्दी होऊं लागल्यामुळें देवळाबाहेरील पटांगणांत श्री. अवधूत महाराजांची कीर्तनें होऊं लागलीं ती ऐकून मुसलमान लोकांनाहि त्यांतील तत्त्वबोध आणि विशेषतः कबीराचें काव्यमय आख्यान फार आवडल्या मुळें मशीदीपुढेंहि पटांगणांत कीर्तनाचें दोन सप्ताह मुसलमानांनी करविले. मुसलमानी बायकाहि चिकाचे पडदे लावून कीर्तन ऐकावयास बसत. 'मशीदीपुढें कीर्तन केल्यास विरोधी मुसलमान गडबड करून अपमान करतील' अशी भीति कांहींनीं बोलून दाखविल्यामुळें मुसलमानांनींच कीर्तनांत गडबड न व्हावी म्हणून मुसलमान स्वयंसेवकांचा खडा पाहरा दोन दिवस कीर्तनाचे आवाराभोंवतीं ठेविला! पण गडबड न करता सर्वच मुसलमान शांतपणें कीर्तन बोध ऐकून घेतात, असा अनुभव आल्यावर हा पहारा काढून घेण्यात आला!

कीर्तनांत दिव्यांचा उजेड पुरविण्याचें काम एका मुसलमान बत्तीवाल्यानेंच स्वयंस्फूर्तीनें औरंगाबाद शहरी व पैठण वैगरे इतर ठिकाणी पत्करले होतें. या वेळीं दीड महीना मुसलमानांच्या मशीदीपुढें श्री अवधूत महाराजांचीं कीर्तनें घडाक्यानें झाली. यावेळीं मुसलमानांनी महाराजांना जरीची कफनी जपासाठीं तेजस्वी रुद्राक्षांची माळ इत्यादि वस्तू अर्पण केल्या! काशीक्षेत्रीं श्री शांताराम स्वामीनीं, पंत महाराजांनी दिलेल्या प्रासादिक कफनीवर घालण्यासाठीं प्रासादिक सैली दिली औरंगाबाद मुसलमानांनीं दिलेली जरीची कफनी, व रुद्राक्षमाळा श्री सिद्धारूढ स्वामीकडून मिळालेले व्याघ्रासन जालना जवळील नदींत सांपडलेले करतल इत्यादि श्री अवधूत महाराजानीं वापरलेल्या वस्तूना आतां ऐतिहासिक महत्वच प्राप्त झालें! या पैकीं करतल वगळून बहुतेक सर्व उपकरणें श्री अण्णा तथा — श्री दत्त महाराजहि कीर्तनांत सद्गुरुदत्तप्रसाद म्हणून वापरतात. बाकीचीं उपकरणें श्री अवधूत महाराजांच्या समाधिस्थानीं ठेवली आहेत.

औरंगाबाद व पैठण येथील मुसलमान तर फुलाची कफनी फुलांचाच मुगुट व अट्टी इत्यादि कीर्तनांत वापरावयाच्या वस्तू मोठ्या हौसेनें व चढाओढीनें अवधूत महाराजांना कीर्तनप्रसंगीं वापरण्यास आग्रहानें भाग पाडीत! मामू बत्तीवाल्यानें तर कीर्तनांत बत्त्यांचा उजेड करण्याचें जणूं हौसेचें कंत्राटच घेतलें होतें! कबीराच्या आख्यानानें कीर्तन सप्ताहाचा शेवट करण्यावर तर सर्व मुसलमानांचा कटाक्षच असे.

## मराठवाड्यानंतर

मराठवाड्यांतील उत्साही हिंदु व मुसलमान भक्तांमध्ये अवधूत मार्गाचा परिणामकारक प्रचार केल्यानंतर, अवधूत महाराज अहमदनगराकडून वऱ्हाडांतील नागपूर, उमरावतीकडील शहरें व खेडी यांतून प्रचारासाठीं संचार करूं लागले. तेथून अवधूत महाराजांना बडोद्याकडे निमंत्रण आलें. बडोद्याकडे श्रीसयाजी महाराजांची कुटुंबीय मंडळीहि अवधूत महाराजांची कीर्तनें आवडीनें ऐकूं लागली. बडोद्याचे कांही भक्त आणि महाराजांचे शिष्य सांगतात की दसऱ्याचे शिलंगणांतील व इतर मिरवणुकींत पालखींत व हत्तीच्या अंबारींत श्री अवधूत महाराजांचा फोटो ठेवण्यात येत असे! या दौऱ्यांत बडोदा व आसपासच्या खेड्यांतून अवधूत मार्गाचा उत्साही प्रचार श्री अवधूत महाराजांनीं केला.

## बडोद्याहून इंदूर व देवास

बडोद्यास असतांनाच अवधूत महाराजांची कीर्ति मध्यप्रांतांतील इंदूर व देवासाकडे पसरली! तिकडील भक्तांचीं अवधूत महाराजांना कीर्तनाचीं आमंत्रणे आलीं. या शहरीं गेल्यावर महाराजांनीं श्रीराम, मुरलीधर व श्रीदत्त इत्यादि सार्वजनिक मंदिरांत कीर्तनें केली. संस्थानीं अधिकारी, राजे व राण्या इत्यादिकडून कीर्तनें ऐकण्याची इच्छा श्री अवधूत महाराजांचे कानांवर घालण्यात आली. पण मध्यस्थ वशिलेबाजांचें प्रस्थ आणि त्यांची खुशाली व कमिशनें यांचा अशा संस्थानांत फार सुळसुळाट असल्यामुळें "ज्या ज्या श्रीमंतांना कीर्तन ऐकावयांचें असेल त्यांनीं सार्वजनिक मंदिरांतून आपापली जरूर तेवढी व्यवस्था करवून कीर्तनें ऐकल्यास आमची हरकत नाहीं, इतकेंच नव्हे तर अशा समतेच्या वागण्यानें आम्हांला आनंदच होईल," असा निरोप अवधूत महाराजांनीं श्रीमंत संस्थानिकांना कळविला! बिदागीची आपण कांहीच अट घालीत नसतो, आरतीत श्रीमंत–गरीब जें कांहीं टाकतील, तीच आमची बिदागी!–श्रीमंतांकडील बिदागीहि आरतींत पडल्यास तिचा आम्हीं स्वीकार करूं. बिदागीच्या आकड्याची अट

आम्हीं कधींच घालत नाहीं." इंदूर, देवासकडील भक्त असें सांगतात कीं, "संस्थानिक राजे व राण्यांनीं सार्वजनिक मंदिरांतील कीर्तनें ऐकलींच, पण सरकारी वाड्यांत केवळ राजघराण्यांतील व्यक्तींसाठीं कीर्तनें करण्याची आग्रहाची विनंति अवधूत महाराजांना केली!" पण राजवाड्यांतील कीर्तन अवधूत महाराज दीड ते दोन तासांतच आटपूं लागले! 'कीर्तनाला पुरा रंग भरत नाहीं, पूर्वरंग व आख्यानहि अपुरें वाटतें,' असा निरोप महाराजांना आला! तेव्हां अवधूत महाराजांनीं त्यांना कळविलें कीं "श्रीमंतांच्या खाजगी कारभाऱ्यांकडून १॥ ते २ तासांत कीर्तन संपविण्याचा इषारा मला पहिल्या दिवसापासून मिळाल्यामुळें मला कीर्तन त्या मुदतींत आटोपतें घ्यावें लागतें!" श्रीमंतांनीं नंतर हा निर्बंध काढून टाकण्यास खाजगी कारभाऱ्यांस सांगितलें आणि कीर्तनांची बिदागीची रक्कम श्रीमंतांनीं स्वतःच महाराजांचे आरतींत घातल्यामुळें मध्यस्थ खाजगी कारभाऱ्यांची वशिलेबाजी आणि कमिशन यांना काट बसला! नाहींतर "श्रीमंतांनीं मंजूर करावी पांचशेची रक्कम आणि हरिभक्त कीर्तनकाराचे पदरी पडावे फक्त २००!" असा प्रकार बऱ्याच संस्थानांतून चालत असे! अवधूत महाराजांच्या या निस्पृह व निर्भय वागणुकीचा फायदा इतर कांहीं हरिदासांनाहि मिळाला असणें संभवनीय आहे!

## नव्या उत्साहानें फिरून महाराष्ट्र–पुणें ते मुंबई

मध्य प्रदेशांतील प्रभावी प्रचारानंतर. भडगांवांतील श्रीदत्त मंदिराच्या भावी बांधकामाच्या आंखणीसाठीं कांहीं काल भडगांवासच विश्रांतिसारखा घालविल्यानंतर १९२७ सालीं श्रीदत्तमंदिराचा बाहेरच्या मूर्तीचा दर्शनीय भाग आणि घुमटी यांची स्थापना व उत्सवाचा थाटाचा भंडारा झाल्यावर श्री अवधूत महाराजांनीं महाराष्ट्र, पुणे व मुंबई आणि वसईपर्यंत उपनगरें येथें प्रभावी प्रचार-दौरा काढला!

श्री अवधूत महाराजांच्या श्री अवधूत पंथ–प्रचाराच्या प्रभावी पद्धतीची पूर्णता मुंबईतील भक्तांना व शिष्यांना दीर्घकालपर्यंत अनुभवावयास मिळाली. मुंबईत या प्रचाराचें कोडकौतुक करून त्याला वारंवार यथाशक्ति हातभार लावण्याचें जें कार्य, अनेक भक्तांनीं आणि श्री अवधूत महाराजांच्या चाहत्यांनीं केलें, त्यांत श्री. सदाशिवराव सहानी यांचा उल्लेख प्रामुख्यानें करण्यासारखा आहे. म्हणूनच श्री. सदाशिवराव सहानी यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. खंडेराव सदाशिव

सहानी यांनीं या चरित्रासाठीं महत्त्वाच्या आठवणी लिहिल्या आहेत. (आठवणी भाग १ पानें ६१ ते ७५) या आठवणीचे आधारेंच या चरित्राचे भागांत श्री अवधूत महाराजांची कीर्तन पद्धति आणि त्याचे विशिष्ट परिणाम यांचा उल्लेख शक्य तितक्या संक्षेपानें करीत आहों.

[ जिज्ञासू वाचकांनीं या आठवणी मुळांतूनहि वांचण्यासारख्या आहेत. ]

## अवधूत महाराजांच्या कीर्तनाचे विशेष

कोल्हापूर, इचलकरंजी, मिरज, सांगली, सातारा ते पुणे ही प्रमुख शहरें व आसपासची खेडीं यांतून श्री अवधूत महाराज ठाणे—कल्याण या ठिकाणीं प्रचार करीत मुंबईस प्रथम आले त्यावेळीं त्यांनीं त्या काळापर्यंतच्या जुन्या कीर्तन पद्धतींत एकदम क्रांति केल्याचा अनुभव श्रोत्यांना व चाहत्यांना आला.

या पूर्वीचीं कीर्तनें ठराविक पोषाखांत, ठराविक कीर्तनकारांची आणि ठराविक दिवसांतच होत असत. त्या कीर्तनांत संस्कृतचा भरणा, संस्कृत सुभाषितें आणि गायन यांचाच मुख्यतः भरणा असे. अर्थात् त्या कीर्तनांचे श्रोतेहि ठराविक वृद्ध स्त्री–पुरुष असत. परंतु श्री अवधूत महाराजांनीं, कीर्तन प्रसंगीच्या पोषाखांत, आणि कीर्तनपद्धतींतच, आमूलाग्र क्रांति घडवून आणल्याचा अनुभव सर्वांना आला.

श्री अवधूत महाराज व्याघ्रचर्माचे आसनावर उभे राहून कीर्तन करीत. अंगावर भगवी कफनी, भगवा फेटा, शैली, शृंगी, पायांत चाळ आणि हातीं संगमरवरी दगडाचे सुंदर करतळ. कीर्तनांतील पदें रंगून म्हणतांना अवधूत महाराज हंसगतीनें नाचत आणि करतळांचा श्रुति-मनोहर नाद काढून, अवधूत महाराज आपल्या श्रोतृगणाला मुग्ध करुन सोडीत! कीर्तनांतील या वैशिष्ट्यामुळें अल्पावधींतच मुंबईतील कीर्तनक्षेत्र अवधूत महाराजांनीं आपलेसें केलें! अवधूत महाराजांची हीं कीर्तनें ऐकण्यास कीर्तनाचें आवार श्रोत्यांनीं भरगच्च भरल्यामुळें अनेक श्रोते, आसपासच्या वृक्षांवर आणि इमारतींच्या गॅलरींत बसूनहि कीर्तन ऐकत आणि कीर्तन सुरू झाल्यावर, कीर्तनाचे जागीं शिरकाव होण्याची नंतर येणाऱ्यांना मुष्किल होई, असें वर्णन या चरित्रांतील आठवणींत अनेकांनीं केलें आहे!

## कीर्तनपद्धतीचा थोडा तपशील

**पूर्वरंग :—** स्वतंत्र रचलेल्या नमनानें अवधूत महाराज कीर्तनाच्यां पुर्वरंगाला सुरवात करीत. मग श्री रामदासांचा एक श्लोक म्हणून प्रश्न विचारणाऱ्या शिष्याला

त्याचा स्पष्टार्थ करून सांगण्याप्रमाणें स्वतः रचलेला एक 'आत्मबोधाचा श्लोक' म्हणतां म्हणतां, श्रीपंतांच्या प्रेमलहरींतील एक पद म्हणून त्याच्या अनुसंधानांत श्रीतुकारामाचे अभंग, श्रीरामदासांचे श्लोक, गीतेंतील श्लोक आणि कबिराचा दोहरा म्हणून कीर्तनाच्या पूर्व रंगांत रंग भरीत.

उत्तररंगांत :—महाराज स्वतःच रचलेलीं रसभरित आख्यानें लावीत. हीं आख्यानें विशेषतः नवनाथांची असत. लोकांनीं अशीं आख्यानें पूर्वीं ऐकली नव्हतीं. शिवाय गोपीचंद, गोराकुंभार, संतसखू, मीराबाई हीं अवधूत महाराजांनीं उत्तर रंगांत लावलेली आख्यानेंहि अत्यंत लोकप्रिय ठरलीं.

## कॉलेज विद्यार्थी कीर्तनास हजर रहात

श्री अवधूत महाराजांच्या कीर्तनाचा आणखी एक विशेष हा कीं आध्यात्मिक विषय (Philosophy) पदवीसाठीं निवडणारे कांहीं कॉलेज विद्यार्थी, आपला विषय आपल्या भारतीय पद्धतीनें समजून घेण्यासाठीं श्री अवधूत महाराजांच्या कीर्तनास हजर रहात आणि कीर्तनांतील निरुपणानें समाधान झाल्या-मुळें आनंदानें परत जात !

## बहुविध श्रोत्यांची गर्दी

श्री अवधूत महाराजांची प्रासादिक रसाळ वाणी, त्यांनीं स्वतः रचलेलीं आकर्षक पदें व आख्यानें, सहज व सुबोध असें आध्यात्मिक निरूपण ऐकण्या-साठीं मुंबईच्या विविध समाजांतील श्रीमंत, गरीब, लहानथोर, बायकामुलें आणि शास्त्रीपंडितहि जमत.

यामुळें अवधूत महाराजांची कीर्तनें चातुर्मासांत ज्या मंदिरांत असत त्याखेरीज बाकीचीं मंदिरें ओस पडत !

## मत्सरी लोकांचे मारेकरी

श्री अवधूत महाराजांच्या कीर्तनांतील यशाचा मत्सर करणारे कांहीं महाभाग मुंबईंतहि होते ! त्यांनीं एका मंदिरांत 'महाराजांचा काटा काढण्यासाठीं' मारे-कऱ्यांचीहि योजना केली ! तेव्हां 'आज कीर्तनासाठी मंदिरांत जाऊं नका' अशी एका भक्तानें, सदरील बातमी समजल्यामुळें, महाराजांना कळकळीची विनंति केली. महाराजांनीं त्या भक्ताला उत्तर दिलें, "श्री पंतमहाराजांना माझी सेवा आवडत नसेल तरच मला मारेकऱ्यांकडून त्रास होईल ! एरवी मला कोणी कांहींहि करूं

शकणार नाहीं!" श्रीपंतांवरील अशा दृढ भक्तीमुळें अवधूत महाराज नित्याप्रमाणें त्या मंदिरांत कीर्तनास गेले. त्या दिवशीं कीर्तनाचा पूर्वरंग बोधाच्या दृष्टीनें अत्यंत प्रभावी ठरला. मारेकऱ्यांवरच या बोधाचा इतका सुपरिणाम झाला कीं कीर्तनाचे अखेरीस त्या मारेकऱ्यांनीच महाराजांच्या पायांवर दंडवत घालून ते म्हणाले, "आज आमच्या हातून एक अत्यंत वाईट कृत्य घडणार होतें, त्यांतून महाराज, आपणच आम्हांला वाचविलेत! याविषयीं आपले उपकार मानूं तितके थोडेच!"

## अनुग्रह देण्याची अवधूत महाराजांची पद्धत

पूर्वी कोणाकडून तरी अनुग्रह घेतलेले लोकहि श्री अवधूतमहाराजांकडे अनुग्रह घेण्यासाठीं आले, तर त्यांना तसें न करण्याचा उपदेश महाराज करीत "अहो, सर्व सत्पुरुष सारखेच-त्यांच्या फोटोची किंवा पादुकांची आपण पूजा करा. आणि फक्त माझ्या कीर्तनास येत जा. कीर्तनांतील श्रीपंतांचा बोध समजून घेतला तरीहि आपण आपल्या जीवनाचें समाधान व सार्थक्य साधूं शकाल!"

## श्री· मामा सहानी यांचेकडील गुरुपौर्णिमा

आषाढी पौर्णिमा हा 'गुरुपौर्णिमेचा शुभदिन' समजला जातो. मुंबईत गुरुमहात्म्याचा हा दिवस फार मोठ्या प्रमाणांत आणि विविध रूपांनीं साजरा होतो. मुंबईच्या आसपासच्या नगरांत व उपनगरांत या उत्सवाचा बराच प्रचार झालेला दिसतो. श्री अवधूत महाराज इ. स. १९१० पासून गुरुपौर्णिमेनिमित्त श्री सदाशिवराव ऊर्फ मामा सहानी यांचेकडे येत. सतत बारा वर्षें अधिकमासांत व दत्तजयंतीस मामा सहानी यांचेकडेच महाराजांचा मुक्काम असे. अर्थात् त्यांचीं कीर्तनेंहि याच ठिकाणीं होत. हीं कीर्तनें ऐकण्यासहि श्रोतृगणांची चिक्कार गर्दी होई. त्यानंतर मात्र श्री अवधूत महाराज सदरील प्रसंगीं अन्य ठिकाणीं उतरूं लागले. महाराजांचे पश्चात् श्री. ह. भ. प. दत्तुबुवा तथा दत्तात्रय मोरेश्वर दातार यांनीहि, याच पद्धतीनें हे उत्सव चालू ठेविले आहेत.

## प्रभावी प्रचाराविषयीं पंतबंधूकडून कौतुक

शके १९३४ (सन १९१२) श्री अवधूत महाराजांचा मुक्काम श्री मामा सहानी यांचेकडे असतां पंतबंधू श्री गोविंदराव दादा हे आले होते. सर्व तऱ्हेच्या मुंबईतील समाजांत श्री अवधूत महाराजांनीं श्रीपंतबोधाचा--अवधूत मार्गाचा-- अत्यंत प्रभावी फैलाव केला." हें पाहून पूज्य गोविंदराव दादांनीं फार कौतुक केलें! पुढें श्री नरसिंहअण्णा याहि पंतबंधूंनीं श्री अवधूत महाराजांचे

असेंच कौतुक केलें ! श्री अवधूत महाराजांना श्रीपंतबंधूंविषयीं अत्यंत प्रेम वाटे; आणि पंतबंधूहि श्री अवधूत महाराजांवर आपल्या भावांप्रमाणें प्रेम करीत.

## पंतमातुश्रींनाहि अवधूत महाराजांविषयीं आपुलकी

श्री अवधूत महाराजांनींच मुंबईचे श्री. मुकुंदराव राणे आणि त्यांची सर्व आप्तेष्ट मंडळी त्याचप्रमाणें पुण्याच्या व दूरदूरच्या ठिकाणच्या आपल्या भक्तांना, बाळेकुंद्रीस पंतनिवासाकडे आकर्षून आणले होतें, याची कौतुकास्पद जाणीव पंतांच्या मातुश्री श्रीमती सीताबाई यांनीं ठेविली होती—त्या अवधूत महाराजांना 'मोरू' या आपुलकीच्या नांवानेंच हांक मारीत !

एकदां श्रीपंतांच्या पुण्यतिथीचे उत्सवासाठीं सर्व मंडळी जमलीं; पण त्याच वेळीं श्री अवधूत महाराजांच्या मातुश्री आजारी झाल्यामुळें ते मात्र त्या उत्सवाला हजर राहूं शकले नाहींत. श्री अवधूत महाराज हजर नसलेले पाहून मातुश्री श्रीमती सीतामाई म्हणाल्या, " माझा मोरू नाहीं म्हणजे उत्सवाला शोभा नाहीं ! "

श्रीपंतांच्या स्वानंदवासानंतर एका उत्सवप्रसंगीं श्री अवधूत महाराजांचें कीर्तन श्रीपंतनिवासांतच झालें. प्रेमलहरींतील पंतांचें एक पद घेऊन त्यावर श्री अवधूत महाराजांनीं १॥ तासांवर सुबोध निरुपण रंगविलें ! नंतर कीर्तन संपल्या-वर श्री अवधूत महाराज नित्यनियमाप्रमाणें श्रीमती सीतामाईंना नमस्कार करण्यास गेले तेव्हां मातुश्री सीतामाई म्हणाल्या, " मोरू तूं फार सुंदर कीर्तन केलेंस, माझा 'दत्तू' ब्रह्मज्ञान बोधांत इतका परिपूर्ण तरबेज होता, हें मला तुझ्या निरूपणामुळें ठीक समजलें ! " त्यावर अवधूत महाराज लीनतेनें म्हणाले, " श्रीपंतांचीं अशीं तीन हजार पदें आहेत ! उभें आयुष्य त्या विवरणासाठीं आम्हांला पुरें पडणार नाहीं ! "

## श्री अवधूत महाराजांविषयीं श्रीपंत-घराण्यांत सर्वांनाच जिव्हाळा

एकंदरींत श्रीपंत घराण्यांतील सर्वांनाच श्री अवधूत महाराजांच्या प्रभावी प्रचारकार्याविषयीं जिव्हाळा वाटे.

" श्रीपंतांच्या अवधूत मार्गाचा ध्वज अवधूत महाराजांनीं भारतांत दूरवर गांवोगांवीं फडकावून पंतांनीं दिलेला आशीर्वाद सार्थकी लावला. " असें सर्वांनाच वाटणें स्वाभाविक होतें !

## श्री अवधूत महाराजांच्या यशाचें गमक

श्रीपंत महाराजांचा जो अवधूत सांप्रदाय, त्याला कोणत्याहि प्रकारची उणीव येऊंच नये, अशा शिस्तबद्ध रीतीनें, श्रीअवधूत महाराजांनीं चालविला, हेंच त्यांच्या-

यशाचें गमक होय. मुंबईत शेंकडों कीर्तनकार आले व गेले, पण सतत वाढत्या लौकिकानें कीर्तनाची कीर्ति, अवधूत महाराजांप्रमाणे क्वचितच कोणाची टिकली, असें दिसून येतें !

## भिक्षेच्या फेरीची शिस्त

ठाणे व वसई येथील मुक्कामांत, गुरुवार व शनिवारीं श्री अवधूत महाराज भिक्षेची फेरी करीत. "कोणाच्याहि घरीं जावयाचें नाहीं, रस्त्यावरच झोळींत कोणी भिक्षा आणून घातली तेवढीचा स्वीकार करीत. एकदां पुढें गेल्यावर कोणी मागें बोलाविलें तरी मागें फिरावयाचें नाहीं" ही शिस्त श्री अवधूत महाराजांनीं सर्वत्र पाळली आणि त्यांचे सुपुत्र श्री दत्त महाराजहि अद्याप तीच शिस्त पाळतात. याचना करावयाची नाहीं, बिदागीसाठीं कोणाची अडवणूक करावयाची नाहीं आणि मिळेल त्यांतच संतोष मानावयाचा" हाच खरा अवधूत बाणा !

पण 'न मागे तयाची रमा होय दासी' या न्यायानें श्री अवधूत महाराजांना विपुल धनलाभ झाला, पण त्याचाहि त्यांनी लोभ कधींच धरला नाहीं, याचे विपुल दाखले आठवणींचे दोन्ही भागांत आहेत.

## मिळालेल्या द्रव्याचा 'ईश्वरार्पण' बुद्धीनें व्यय !

श्रीपंतांचा परिचय वाढणशास अवधूत महाराजांना त्यांच्या प्रिय भगिनी सौ. आऊताई व त्यांचे उदारबुद्धीचे पति श्री. त्रिंबकराव मामा मराठे यांचा कसा उपयोग झाला या विषयींची श्री. खंडेराव सहानी यांच्या आठवणींतील माहितीची द्विरुक्ति न करतां, कीर्तनांत व इतरत्र मिळालेल्या धनाचा व्यय श्रीअवधूत महाराज सदा ईश्वरार्पणबुद्धीनें कसा करीत, हें मात्र नमूद करणें उचित होईल. कीर्तनांतील आरतींत तर भरपूर पैसा मिळेच पण अनेक भक्त त्या काळांत सोन्याचीं सलकडीं, आंगठ्या, चांदीचीं भांडीं, कापड वगैरे खूप मोलाच्या वस्तू महाराजांच्या निवासस्थानीं आणून देत. पण 'ईश्वरार्पण बुद्धीच्या' उदार स्वभावामुळें आपल्या सांथीतील मंडळींना आणि आध्यात्मिक बैठकींतील भक्तांनाहि महाराजांनीं या मोलाच्या वस्तू वांटून टाकल्याचे दाखले अनेक भक्तांनीं आपल्या आठवणींत नमूद केले आहेत ! "हें अलोट द्रव्य सांठवलें असतें तर अवधूत महाराजांची स्थावर-जंगम इस्टेट तीन पिढ्यांना पुरून उरली असती !" असे उद्गार कांहीं व्यवहारी भक्तांचे तोंडून प्रस्तुत लेखकानें ऐकले आहेत !

"अलोट द्रव्य न उरलें तरी अलोट गुरुभक्ति व ईश्वरनिष्ठा मात्र श्री अवधूत महाराजांच्या तीन पिढ्यांत पुरलेली आहे" असें अनेकांच्या अनुभवाला आलें आहे !

शिवाय मिळालेला सर्व पैसा कृष्णाकांठच्या आपल्या कुरुंदवाड गांवीं श्रीपंतांचें सुंदर अधिष्ठान स्थापन करण्यांत आणि पूर्व खानदेशांतील गिरणाकांठच्या भडगांवीं मठी स्थापन करून, गोकुळाष्टमीसारखे श्रीपंतजन्माचे व इतर उत्सव थाटानें करण्यांत महाराजांनीं खर्च केलेला आहे.

## अनुकरणीय उत्सव व्यवस्था

श्री अवधूत महाराजांनीं आपल्या हयातींत, पूर्व-खानदेशांतील आपल्या भडगांव श्रीदत्तमठींत (१) गोकुळाष्टमीस श्रीपंतजन्मोत्सव आणि (२) मार्गशीर्षांतील चंपाषष्ठी ते दत्तजन्मापर्यंतचा श्री दत्तजन्माचा उत्सव असे दोन उत्सव थाटानें सुरू करून सतत चालविले.

या उत्सवांत दररोज गांवोगांवची २०० ते ३०० माणसें मठींतच राहून दोन्ही वेळां चहापाणी व प्रसाद घेत. महाप्रसादादिवशीं भंडाऱ्याचें १२०० ते २५०० पान उठे. सर्वांची ठीक व्यवस्था ठेवण्यासाठीं श्री अवधूत महाराज स्वतःच झटत. ती चोख व्यवस्था पाहून सर्वांना नवल वाटे! महाप्रसादादिवशीं गरीब व अपंगांनाहि मोठी भाकरी व भाजी वाटली जाई.

## श्री दत्त महाराजांनींहि ती परंपरा कौतुकास्पद रीतीनें पुढें चालविली

वर उल्लेख केलेल्या दोन उत्सवाखेरीज श्री अवधूत महाराजांचे सुपुत्र श्रीदत्त महाराज यांनीं आणखी दोन उत्सव सुरू केले

(३) स्वानंदवासी अवधूत महाराजांचा जन्मदिन शके १७९९ भाद्रपद संकष्टी.

(४) स्वानंदवासी अवधूत महाराजांचा निर्याण दिन चैत्र शुद्ध प्रतिपदा (शके १८६१)

श्री अवधूत महाराजांचा निर्याण सोहाळा कै. लो. टिळकांच्या सोहाळ्यासारखा पूर्व खानदेशांत गाजला! त्यासाठीं गिरणा नदीच्या पात्रांतील खास जागेसाठीं सरकारी परवाना मिळाला! स्मशानयात्राहि अपूर्व झाली !

गिरणा नदीच्या पात्रांतील अवधूत महाराजांच्या स्मारकासाठीं दहनभूमीवर ३० फूट उंच सीमेंटक्रॉंकीटचा स्तंभ उभारला आहे. श्री अवधूत महाराजांच्या पुण्यतिथीचे शेवटीं या स्तंभावरील ध्वज मिरवणुकीनें नेऊन स्तंभावर लावतात आणि मग उत्सवाची सांगतां करतात.

श्रीअवधूत महाराजांच्या 'आत्मबोध अभंगाचे श्लोक' या पुस्तकाची आतां सहावी आवृत्ति छापून तयार झाली आहे.

## श्री अवधूत महाराजांच्या सुबोध व सुलभ बोधप्रभावाची प्रचीति

श्री अवधूत महाराजांच्या पूर्वरंगांतील बोधानें पंडित व शास्त्री लोकहि तल्लीन होत. १९३० मध्यें विले पारले येथें याची प्रचीति आली. या सालीं 'लोकमान्य सेवा संघांत' महाराजांचीं कीर्तनें झालीं. विलेपार्ले हें पुण्यासारखें जिज्ञासू आणि चिकित्सक विद्वान् शास्त्री-पंडितांचें ठिकाण समजलें जातें. एकदां कीर्तन झाल्या-नंतर पार्ल्याचे सर्व विद्वान् फिरुन अवधूत महाराजांच्या कीर्तनाची वारंवार चौकशी करूं लागले. परंतु पुढें त्यांची प्रकृति कीर्तन करण्याइतकी चांगली राहिली नाहीं. म्हणून लोकांच्या आग्रहामुळें अवधूत महाराजांनीं बसल्या बसल्या एक दोन बोधाचीं प्रवचनें करून लोकांची इच्छा अंशतः पुरी केली.

## विले पार्ले येथील श्री अवधूत महाराजांचे स्मारक!

श्री अवधूत महाराजांनीं इ. स. १९३० सालच्या आपल्या मुक्कामांत श्री. मामा सहानी यांचे निवासस्थानाचे आवारांत एक औदुंबर वृक्षाचें रोप लावलें. आज देखील विलेपार्लें येथील अनेक भाविक भक्तजन 'कल्पवृक्ष' समजून आतां वाढलेल्या या औदुम्बर वृक्षाची भक्ति भावानें 'पूजा करितात. 'त्यांच्या नवसांना हा वृक्ष पावतो' अशी आपली श्रद्धा हे भक्त लोक बोलूनहि दाखवितात! या औदुम्बर वृक्षांचे कट्ट्यावर नेहमीं त्रिकाळपूजा, लघुरुद्र, एकादशणी, गुरुचरित्र-पारायण इत्यादि धर्मकृत्यें नेहमीं होत असतात. एकंदरींत हें स्थान श्री अवधूत महाराजांचें एक स्मारकच होऊन राहिलें आहे!

\+ + + +

## श्री अवधूत महाराजांचे आणखी कांहीं थोर सद्गुण

परनिंदेविषयीं तिटकारा, निर्लोभ आणि अनासक्त वृत्ति, अनेक विविध स्वभावाच्या लोकांशीं गोड वागण्याची व्यवहारकुशलता, सर्वांविषयीं समदृष्टि त्यांच्या



भडगांव येथील गिरणा नदीवरील अवधूत महाराजाचे स्मारक
व तेथील पुण्यतिथीचे ध्वजारोहणाचे दृश्य



अवधूत महाराजांच्या पुण्यतिथीचेवेळीं अवधूत मठांतून बाहेर पडतांना होणारा भजन सोहाळा



पुण्यतिथी वेळेचा पालखी सोहळा

व्यवहारांत सहज दिसणारा समाजवादी दृष्टिकोन. श्री अवधूत महाराजांच्या सहज व्यवहारांत दिसून येई.

पुढें पुढें आयुष्याचे अखेर अखेर श्री अवधूत महाराज सदैव आत्मचिंतनांतच रंगलेले दिसत. कोणीहि त्यांचेकडे आलें तरी प्रापंचिक विषयाची चर्चा ते क्वचितच करीत! सहज चर्चेचा ओघ मोठ्या खुबीनें ते परमार्थ विषयाकडे वळवीत. एखादें श्रीपंताच्या प्रेमलहरींतील पद घेऊन त्यावरच बोलत रहाण्यांत ते स्वतः रंगून जात आणि श्रोत्यांनाहि त्यांत रंगवीत! त्यांना खुर्चीवर अगर कोठेंहि एका जाग्यावर बसून रहाणें आवडत तसे. श्री अवधूत महाराज नेहमीं फेऱ्या करीत रहावयाचे आणि त्यावेळीहि अध्यात्मचिंतनांत दंग रहावयाचे. त्यांची पदें श्री एकनाथाप्रमाणें देहावर अध्यात्मविचारांचीं असलीं तरी, घरगुती प्रसंगावरहि त्यांनीं रचलेलीं कांहीं पदें फार लोकप्रिय झालीं.

### देहावरील कांहीं आध्यात्मिक पदांचे नमुने

**धुणे धुण्याचा प्रसंगः—**

धुताच मोतीं जळीं हरपले, सखोल मोठें पाणी ।
सखोल मोठे पाणी, चला पाहूं, सहा चार अठरा जणी ॥

**वेणीफणी :—**

भक्ति ग वेणी माझि गुंफा गे साजणी ।
चित्त चतुष्टय चौघी बहिणी । एक चित्तें घाला वेणी ॥
त्रिगुण, त्रिपदां आवळा वेणी । माझि गुंफा गे साजणी ॥

कीर्तनाचे आख्यानांत तर अवधूत महाराजांनीं स्वतःच रचलेली पदे मुख्यतः असत, तीं श्रोत्यांना ऐकावयास फार आवडत.

### निरोपाचे पद म्हणते वेळीं, श्रोते ढळढळा रडत!

कीर्तन सप्ताहाचे अखेरीस श्री अवधूत महाराज, प्रेमलहरींतील पुढील पद म्हणत; तें ऐकतांना कीर्तनांतील श्रोते ढळढळा रडत. असें श्री. खंडेराव साहनी यांनीं आपल्या आठवणींत लिहिलें आहे, त्याला अनेक श्रोते दुजोरा देतात—

**प्रेमलहरींतील तें पद पुढील प्रमाणें :—**

झाली आमुची फेरी, आतां जातो माघारी ॥ धृ ॥
प्रेमळ संतीं सांभाळ केला, काय वर्णु थोरी ॥

पूर्ण लोभ तुमचा असुंद्या, या बाळावरी ॥
देह राहि तरि येऊनि भेटूं, गाऊं प्रेम–लहरी ॥

× × × ×

## हा कोणी सत्पुरुष कीं संस्थानिक राजा ?

श्री अवधूत महाराज मुंबईहून परत जातांना त्यांना अनेक भक्तजन पुष्पहार अर्पण करून आणि पाया पडून गर्दी करून सोडीत! फर्स्ट क्लास–सेकंड क्लास मधील बडे प्रवासी व यूरोपियन साहेब लोकहि चकित होऊन विचारीत " काय हो, हा कोण सत्पुरुष कीं संस्थानचा राजा ! "

श्री अवधूत महाराजांनी स्वतः नेटका प्रपंच केला आणि त्यांचा कित्ता गिरवून त्यांचे सर्व आप्तेष्टहि तसाच नेटका प्रपंच करीत असल्याचा तपशील अनेक भक्तांच्या आठवणींत वाचकांना वाचावयास मिळेल. पण 'नेटका प्रपंच' केला तरी तो परमार्थरूपीच आहे, हेंहि त्या बरोबर वाचकांना पटेल !

## अतीशय जिव्हाळयाच्या आठवणी

श्री अवधूत महाराजांच्या अत्यंत जवळच्या कांहीं व्यक्तींनीं आपल्या जिव्हाळ्याच्या आठवणी लिहून पाठविल्या त्यांचा आतां थोडक्यांत उल्लेख करणें आवश्यक असून तो औचित्याला धरून होईल.

## एकुलती एक प्रिय कन्या सौ. द्वारकाबाई. (सासरचें नांव सौ. अन्नपूर्णाबाई देवघर)

श्री अवधूत महाराजांनीं आपल्या मुलामुलींना व आप्तेष्टांना स्वतःच्या आचरणानें संसारपरमार्थ दृष्टीनें करण्याचें वळण लावल्याचा उल्लेख चरित्रांत प्रसिद्ध झालेल्या आठवणींच्या दोन्ही भागांत आहेच. पण लिहिण्याचा सराव आणि संवय नसलेल्यांना अत्यंत आग्रह केल्यावर त्यांनी लिहितां आल्या तशा आपल्या आठवणी लिहून पाठविल्या; त्याहि उल्लेख करण्यासारख्या आहेत.

## सौ. अन्नपूर्णाबाई देवघर

आपल्याला स्वप्नांत झालेली भयसूचक बाधा श्री अवधूत महाराजांच्या उपायानें कशी नाहींशी केली, हें त्यांच्या एकुलत्या एक प्रिय कन्या सौ. द्वारकाबाई यांनीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे. " १९२६–२७ चे दरम्यान मी

' बाहेरची ' होते. शेजारी जामित्र्यांच्या विहिरीचे बाजूला मी व माझ्या जाऊबाई झोपलों होतो, त्यावेळीं माझे पाय एकदम धरून कोणीतरी ओढत आहे, असें मला वाटून मी घाबरलें ! जाऊबाईनीं घरीं जाऊन लगेच सासूबाईना बोलवून आणलें. माझ्या वडिलांनां ( श्री अवधूत महाराजांना ) बोलाविण्यात आले. " मला अंगारा लावून वडिलांनीं " तुला काय पाहिजे ? " असें विचारलें मी म्हटलें— " मला थालीपीठ व फोडणीचा भात पाहिजे ! " वडिलांनीं माझ्या सासूबाईना सांगितलें " थालीपीठ व फोडणीचा भात तिच्यावरून ओवाळून टाका. त्याप्रमाणें सासूबाईनीं केल्यावर पुढें मला कसलीही बाधा झाली नाहीं. "

" मी बाळंतीण झाले त्याचे सहावे दिवशींहि रात्रीं बारा वाजतां वडिलांनीं मला अंगारा लावून निर्भय केलें. "

## भडगांवीं भक्तिपर वातावरणाचा आनंद

भडगांवीं श्रीदत्तजन्म व इतर उत्सवास मी जाई त्यावेळीं तेथील भक्तिपर भजनांचा आणि इतर कार्यक्रमाचा उत्साह पाहून माझ्या मनाला फार आनंद वाटे. परमपूज्य श्री अवधूत महाराजांचा आध्यात्मिक बोध ऐकण्यासाठीं त्यावेळीं त्यांच्या भक्तांची गर्दी जमे तशी आतां देखील जमते. मी उत्सवांत रमलें कीं मला घरची आठवणहि होत नाही ! उत्सवाचे सात आठ दिवस कसे जातात हें समजतहि नसे ! भडगांवच्या गिरणानदींत स्नान करून, श्री अवधूत महाराजांच्या समाधीचे. दर्शन घेऊन परत मठींत आल्यावर मठींतील भजन, गुरुचरित्रवाचन, पूजा, आरत्या इत्यादि कार्यक्रमांत माणसें रमलेलीं दिसत. भोजन-प्रसादाच्या पंक्ती उठत. या पंक्तींतूनहि अभंग, पदें म्हणून महाराजांचा व संतांचा जय जयकार ऐकतां ऐकतां पंक्तींतून वाढण्याचीहि मौज वाटे ! सूर्यास्तापर्यंत भोजनाच्या व चहाच्या पंक्ती उठल्या कीं रात्रीं भजन, पालखी प्रदक्षिणा व टिपऱ्या, फुगड्या इत्याहि मनोवेधक कार्यक्रम ऐकत व पहात बारा वाजून जात ! झोंप दोन तीन तासच मिळाली तरी थकवा वाटत नसे ! शेंवटच्या भंडाऱ्याचे दिवशीं तर खूप गडबड असावयाची ! भडगांवांतील गरीब दुबळ्या भिकाऱ्यांपर्यंत भाकरी, भाजी, खीर इत्यादींचा प्रसाद वाटला जाई व अद्यापहि श्री अण्णांचे कारकीर्दींत तोच कार्यक्रम विलक्षण उत्साह-पूर्वक चालू असतो, हीच अवधूत महाराजांची त्यांचे सद्गुरूंची आणि श्रीदत्त प्रभूंची कृपा ! गुरुचरित्रांत गरीब ब्राह्मणासाठी त्याच्या दोन तीन पानांच्या स्वयंपाकावर छाटी झांकून हजारों भक्तांना श्रीदत्तप्रभूंनीं प्रसाद पुरविला, तसाच प्रकार भडगांवच्या भंडाऱ्या दिवशीं होत असावा, असें वाटतें ! शेंकडों लोकांच्या

पंक्तीवर पंक्ती उठून गेल्या तरी शिजलेल्या प्रसादाचा पुरवठा कमी पडतच नाहीं! घरीं आल्यावर कित्येक दिवस उत्सवांतील या आनंदी घटनांची स्वप्नें पडतच असतात!"

## सौ. माई तथा सौ. मथुराबाई, श्री दत्त महाराजांच्या सहधर्मचारिणी– यांच्या महत्त्वाच्या आठवणी

+ + + +

### वडिलांचा ओढा दातार घराण्याकडे

बाळेकुंद्रीस श्रीपंत महाराजांचें दर्शन व अनुग्रह घेऊन आल्यापासून माझ्या वडिलांनीं श्री अवधूत महाराजांच्या दातार घराण्यांत मला द्यावयाची असें मनांत ठाम ठरविलें होतें! पण माझे चुलते आणि कांही दिवेकर आसेष्ट याला विरुद्ध होते! 'कीर्तनकार–टाळकऱ्यांचे घराण्यांत' आपल्या घराण्यांतील मुलगी देणें त्यांना कमीपणाचें वाटत असे!

मग वडिलांचा निर्धार पाहून माझे चुलते श्री. केशवराव आणि माझी आजी मुद्दाम कुरुंदवाडला श्री. दातार यांचे घरीं जाऊन आले. मग त्यांनींहि या स्थळाला रुकार दिला! मग माझ्या वडिलांनीं स्थळपसंती विषयीं कुरुंदवाडला पत्र टाकून उलट जबाब मागितला. अवधूत महाराजांनीं हुंडा मानपान वगैरे कसल्याहि अटी न घालतां माझ्या वडिलांना त्यांच्या सवडीप्रमाणें विवाह–समारंभ करण्याला मोकळीक दिली!

### रंगपंचमीला मुंबईस थाटाचा विवाह समारंभ

फाल्गुनी पौर्णिमेनंतर रंगपंचमीला मुंबईतील—ठाकुरद्वार नजिक श्रीदत्त-मंदिरांत आठ दिवस जागा घेतली होती. समारंभ मोठ्या थाटानें झाला. इतर लग्नांत होतात तसें रुसणें, फुगणें वगैरे प्रकार या लग्नात न होतां मोठ्या खेळीमेळीच्या वातावरणांत लग्न झालें. श्री अवधुत महाराजांचें सूत्र–चालन या आनंदी वातावरणाला स्फूर्तिदायक होतें!

### कुरुंदवाडीं संसाराला सुरवात

नंतर मी कुरुंदवाडला गेले व तेथें माझ्या संसाराला सुरवात झाली. दहा वर्षें कुरुंदवाडासच मी होते. त्या अवधींत दोन मुली झाल्या. पुढें आम्ही भडगांवीं मठींत आलों. माझ्या तिसऱ्या बाळंतपणाचे वेळीं भडगांवांतील कांहीं लोकांनीं शंका

काढली " निर्वंशांची जागा, येथें बाळंतपण नको ! " पण श्री अवधूत महाराजांनीं मला विचारल्यावर मी त्यांना म्हणलें " मला येथें चालेल " ! पुढें महाराजांच्या कृपेनें मला मठीच्या जागेंतच पहिला मुलगा झाला ! महाराजांच्या कृपाकटाक्षाच्या छायेत भडगांवच्या मठींत आमचा काळ आनंदांत चालला होता !

## श्री अवधूत महाराजांचा आजार

श्री गाणगापूर यात्रेंत खडतर तपश्चर्या करून आल्यापासून महाराजांना रक्तदाबाचा विकार (ब्लडप्रेशर) जडला. तीन वर्षांनीं हें दुखणें वाढलें महाराजांनी सर्व संसार व्यवहार सोडून ते बाल अवधूत वृत्तीत काळ घालवूं लागले.

## चैत्र पाडव्याची स्वानंदवासाची काळरात्र !

१९३९ मधील चैत्री पाडव्या दिवशीं थाटानें पालखी काढण्याची सूचना श्री अवधूत महाराजांनीं जवळच्या भक्तांना दिली. त्या दिवशीं पालखीपुढें पद म्हणून महाराज आंतील मंदिरांत सोप्यावर येऊन बसले. सर्वांना प्रसाद स्वतः वाटला आणि आपल्या शेज घरांतील पलंगावर येऊन आडवे झाले तोंच त्यांना जोराचा श्वास लागला ! माझे पतिराज—श्री दत्तमहाराज—महाराजांच्या अत्याग्रहामुळें चेंबूरकडे कीर्तन सप्ताहासाठी गेले होते. तीन्हीहि चिरंजीव मठीत नव्हते ! रात्रीं ११॥–१२ चे सुमारास महाराजांनीं देह ठेविला. भडगांवांत सर्वत्र हाहाकार झाला ! सगळीकडे तारा करून जरूर त्या सर्वांना कळवून बोलाविलें.

रात्र उलटून गेली. दुसरे दिवशीं सकाळीं माझें पोट दुखूं लागलें ! सुईण बोलावण्यांत आली ! परंतु मी सर्वांना विनविलें " **महाराजांच्या पाया पडण्यासाठीं मला घेऊन चला " ते मला फिरून कसे दिसणार ! "**

त्याप्रमाणें श्रीमती केळकरीणबाई मला घेऊन महाराजांचा पार्थिव देह ठेविला होता त्याजागीं गेल्या, तेव्हां मी महाराजांचे पायांवर डोकें ठेवून म्हटलें, " आणखी चार दिवस गेले असतें. तर बरें झालें असते " मी अशी प्रार्थनापूर्वक इच्छा बोलूनदाखविली आणि चमत्कार हा कीं त्या दिवशीं माझें पोट दुखणे थांबलें !

## ' श्री अवधूत पुन्हा आले ! '

नंतर चार दिवसांनीं मी बाळंत होऊन मुलगा झाला. तो थेट महाराजांसारखा सर्वांना वाटला ! त्यावेळीं श्रीदत्तमठींत श्री अवधूत महाराजांचे गुरुबंधु ' श्री शिवाप्पा ' आले होते. त्यांनीं मुलगा पाहून उद्‌गार काढले—

" हा मुलगा थेट अवधूत महाराजांसारखाच दिसतो. जणु श्री अवधूत महाराजच फिरून प्रगट झाले! या मुलाचें नांव ' अवधूतच ' ठेवां!

" तूं सर्व सांभाळशील ना? मग काळजी नको!"

श्री अवधूत महाराज स्वानंदवासी झाल्यावर श्री दत्तमठीची सर्व जबाबदारी आम्हां दोघांवर पडली! " ही जबाबदारी आपण कशी सांभाळणार, अशी नेहमीं काळजी वाटे! तेव्हां एकदां स्वप्नांत दर्शन देऊन श्री अवधूत महाराज मला म्हणाले, " तूं संभाळशील ना सर्व जबाबदारी? या प्रश्नाला मी धैर्यवरून ' होकार ' दिला! " मग काळजी करूं नको, सर्व कांहीं ठीक चालेल "! असा आशीर्वाद देऊन महाराज अदृश्य झाले!

महाराजांच्या या आशीर्वादाप्रमाणें आजपर्यंत मठीतील सर्व प्रकारची सेवा आम्ही आनंदोत्साहानें करीत आहों. ' आमचा संसार परमार्थ-रूपाने आनंदांत चालला आहे ' श्री अवधूत महाराजांचीच ही कृपा होय!

## श्री अमरेश्वरास अपुरी तपश्चर्या

श्री अवधूत महाराजांनीं, त्यांचे दुसऱ्या नंबरचें सुपुत्र श्री. पांडुरंग मोरेश्वर तथा पांडुतात्या यांचा विवाह थाटानें पार पाडल्यानंतर, (१९३४–३५) ते आपल्या मनानें संसाराच्या जबाबदाऱ्यांतून मुक्त होण्याची तयारी करूनच राहिले होते! श्री. मेघःश्याम बुवा यांच्या आठवणींत ४० ते ४६ पानांवर या प्रसंगाचें विस्तृत निवेदन आहे ' तें वाचण्यासारखें आहे.

श्री. पांडुतात्या यांचें लग्न थाटानें झाल्यावर श्री. दत्तमहाराज व मातुश्री सौ. कमलाबाई आणि सर्व मंडळी कुरुंदवाड सोडून भडगांवास कायम मुक्कामासाठीं गेल्यावर सर्व सामानाची निरवानिरव (म्हणजे गरजूंना बरेंच देऊन टाकणे) करतांना श्री अवधूत महाराजजांच्या सेवेसाठीं मुद्दाम श्री. दत्तमहाराजांनीं मागें ठेवलेल्या श्री. मेघःश्याम बुवांना म्हणाले :—

> " मेघःश्याम, पांडुरंगाचें लग्न झाल्यावर मी सर्व उपाधींतून मोकळा झालो. आतां चि. अनंताचें लग्न वगैरे सर्व जबाबदारी चि. दत्तूवरच राहील. तेव्हां (यापुढें) श्रीपंतांनीं जी निजस्थिती दिली आहे. तींतच यापुढें निमग्न राहणार! आतां जगांतील लौकिक व भीड यांची मला पर्वा नाहीं. "

आणि खरोखरच यापुढें श्री. अवधूत महाराज या निर्धाराप्रमाणें व्यवहारांत वागूं लागले!

त्या नंतर बरीच आवराआवर करून झाल्यावर श्री. अवधूत महाराजांनीं श्री. नरसोबावाडीतील श्रीदत्तमंदिरा नजीक. औरवाडांत अगर अंमरेश्वर येथील (गुरुचरित्रांत प्रसिद्ध असलेल्या) तपोभूमीवर कांहीं काळ जाऊन तप करण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्याप्रमाणें जरूर तें साहित्य घेऊन अमरेश्वराला पोचल्यावर श्री अवधूत महाराज श्री मेघःश्याम बुवांना म्हणाले "मी येथें एकतारी घेऊन "ॐ नमः शिवाय नमः हा तारक मंत्र जपत प्रदक्षिणा करणार. सात दिवस खाली बसणार नाहीं. अहोरात्र मंत्र–जागर करणार! तूं मला मध्ये कसलाहि व्यत्यय आणूं नको."

या प्रमाणें श्री अवधूत महाराजांनीं निर्धारपूर्वक तपश्चर्येला सुरवात केली. पण पुढें भयंकर वादळाचा आणि श्री मेघःश्याम बुवांच्या विरोधाचा असे अडथळे झाले आणि श्री अवधूत महाराजांची ही खडतर तपश्चर्या तडीस गेली नाहीं! केवळ मेघःश्याम बुवाच नव्हे जर निसर्ग देखील या वेळच्या श्री अवधूत महाराजांच्या खडतर तपश्चर्येला विरुद्ध होता, असें दिसून आलें! त्या प्रसंगाचें मोठें हृदय हालवून सोडणारें वर्णन श्री. मेघःश्याम बुवांनीं आपल्या आठवणींत (४१ ते ४५ पानापर्यंत) केलें आहे ते वाचकांनीं मुळांतूनच वाचण्यासारखें आहे!

श्री अवधूत महाराजांनीं पात्र यापुढें संसार-उपाधींतून अलिप्त राहण्याचा आणि अपुरी राहिलेली तपश्चर्या पुरी करण्याचा निर्धार आपल्या अंतःकरणांत कायम राखला होता. असें त्यांच्या या पुढील जीवन–चरित्रा वरून दिसून येते.

## श्री दत्त महाराजांवरील दृढ विश्वास व आदर

आपण आपले ज्येष्ठ सुपुत्र श्री दत्त महाराज तथा 'अण्णा' यांचेवर पुढील सर्व जबाबदारी टाकली ती बरोबरच आहे असा दृढ विश्वास, श्री अवधूत महाराज यांना पुढील आयुष्यांत श्री अण्णांच्या संसारांतील आणि परमार्थांतीलहि कर्तबगारी वरून वाटूं लागल्याचे अनेक प्रसंग आहेत. पण त्यांतील अगदीं निवडक थोड्या प्रसंगांचाच उल्लेख (जागेच्या मर्यादेमुळें) करतां येण्यासारखा आहे. बाकीचे अनेक प्रसंग वाचकांना आठवणी भाग १ व २ यांतून वाचावयास मिळतीलच.

खानदेशच्या भक्तमंडळींना घेऊन सर्व तीर्थक्षेत्रें करीत श्री अवधूत महाराज मुंबईतील 'खार' या उपनगरांत आले. श्री अण्णांनीं भडगांवास मोटारीची नवी मोठी बॉडी तयार केली होती. तबला, पेटी, बरोबर लागणारें सर्व सामान, कुटुं-

वीय व सांथीदार या सर्वांचा समावेश या मोटारीत होत होता. ही मोटार मडगांवाहून मुंबई उपनगर खार येथें प्रथमच आणली होती त्या मोटारीचे ड्रायव्हर

(श्री अण्णा स्वयंभू ड्रायव्हर आणि मोटार मेकॅनिक देखील स्वावलंवी खडतर शिक्षणानें बनले होते. आणि मेघःश्याम बुवा लिहितात 'मी घट्टा कट्टा (पाथाने पंगु! किन्नर उर्फ क्लीनर होतो'।) त्यावेळीं श्री. अण्णांचे मनांत आलें कीं, ही मोठी गाडी घेऊन अद्याप आपण कोणताच घाट चढलों उतरलो नाहीं. तेव्हां खंडाळा घाट चढण्या-उतरण्याचा अनुभव आतांच घ्यावा. दूरच्या प्रवासाला या अनुभवाचा उपयोग होईल")

श्री. अण्णांचे मनोदयाप्रमाणें श्री अवधूत महाराजांची अनुज्ञा घेऊन मेघःश्यामबुवा (किन्नर), श्री. उमाकांत नायक, श्री. बंडोपंत देशपांडे व बंधु श्री. अनंतराव यांच्यासह ही मोठी गाडी घेऊन श्री अण्णा या प्रायोगिक मोहिमेवर निघाले !

या गाडीसह सर्वजण घाटांतील अवघड वळणावर खड्डयांत पडून 'इतिश्री' होण्याचें संकट आले होतें! पण तें श्री अण्णांच्या प्रसंगावधानी पराक्रमामुळें सर्वजण या भयंकर संकटांतून कसे वांचले हें वर्णन श्री मेघःश्याम यांच्या आठवणींतून (भाग २ पान ६०-६१) वाचकांनीं वाचण्यासारखें आहे'

या संकटांतून पार पडल्यावर श्री. दत्तमहाराज तथा श्री. अण्णा म्हणाले :—

जिसको राखे राम। इसको मारे कौन ? ॥
उसपर दुनिया उलटी हुवे। तो प्रसंग बांका हो ॥

श्री. अणांच्या या उद्‌गारांत त्यांच्या हृदयांतील नितांत-ईश्वरनिष्ठा दिसून येते !

दुसरे दिवशीं श्री अवधूत, महाराजांना हा भयंकर अपघाती वृत्तांत समजल्यावर ते म्हणाले—"गाडी चालविणारा प्रत्यक्ष दत्तच होता, म्हणूनच तुम्हांवर आलेलें हें अरिष्ट टळलें।"

श्री अवधूत महाराजांच्या सदरील उद्‌गारांवरून त्यांची श्री दत्तप्रभूवर तशीच ज्येष्ठ सुपुत्र श्री दत्तमहाराज तथा अण्णा यांच्या कर्तबगारीवरहि पूर्ण निष्ठा अनुभवांनीं उत्पन्न झाली होती याची सर्वांनाच प्रचिति मिळाली !

गाणगापूर व वाळेकुंद्रीच्या यात्रेंत श्री मेघःश्याम बुवांच्या बांबवडे गांवीं यात्रेंतील कांहीं भक्त व शिष्य उतरले होते. त्यावेळीं महाराजांची अवधूत मठीची

गादी पुढें कोण चालविणार, असा कुत्सित प्रश्न कांहीं मत्सरी व अहंमन्य शिष्यांनीं उपस्थित केला होता! त्यावेळीं ..............................मेघःशाम बुवानीं या मत्सरी व उपद्व्यापी शिष्यब्रुवांची खडसून हजिरी घेतली! "अवधूत मठीची गादी पुढें चालविणारा वारस ठरविण्याचा अधिकार श्री अवधूत महाराजांचा आहे. त्यांच्या अधिकारांत तुमच्या सारख्यांनीं लुडबुड करणें अगदीं अप्रशस्त आहे" असे या 'लब्ध प्रतिष्ठितांना' मेघःशाम बुवांनीं खडसून बजावलें! या उपद्व्यापी लोकांना असा भ्रम होता कीं 'ब्राह्मण ब्राह्मणेतर' या सत्यसमाजिष्टी वातावरणात वाढलेले मेघःशाम बुवा आपल्या या कपटी कारस्थानांत सामील होवील व आपल्या कारवाईला बळकटी येईल! पण त्यांचा हा कपटी कयास सपशेल फसला! मेघःशाम बुवाहि महाराजांचे आवडते शिष्य असले तरी तें वेगडी खोटे नाणे नव्हतें. शंभर नंबरी कस लागलेलें अस्सल सुवर्ण होतें, हें त्यावेळीं सर्वांनाच कळून चुकलें!

सदरील यात्रेंतून परतल्यावर श्रीदत्तजयंतीचा उत्सव झाला, त्यावेळीं श्रीदत्त-जयंती दिवशीं उत्सवांतील कीर्तनांत बखेडा माजवून खोडसाळ लोकांनीं

'मठीच्या वारसाचा' वाद उत्पन्न केला त्यावेळीं 'आत्मावै पुत्र नामोऽसि' असें उत्तर सहज स्फूर्तीनें महाराज बोललें होतें. 'मुलगा जर योग्य मार्गानें आपलें कर्तव्य बजावीत असेल तर तो स्वाभाविकपणेंच वडिलांचा वारस ठरतो,–' असा या संस्कृत सुभाषिताचा स्पष्टार्थ आहे व तोच खरा ठरल्याचा अनुभव श्री दत्तमहाराजांच्या कर्तव्यनिष्ठेमुळें आणि त्यागीवृत्तीमुळें आजहि महाराजांच्या सर्व भक्तांना व शिष्यांना येत आहे.

या कटवाल्यांचें वादळ आतां थमलें असून ते सरळ मार्गानें वागण्याचा प्रयत्न करीत असल्याचें दिसतें. म्हणून आतां या प्रकरणावरच जास्त पानें खर्चीं घालण्यात औचित्य नाहीं.

## गाणगापूरच्या अत्यंत खडतर तपश्चर्येनंतर अखेरपर्यंत श्री अवधूत महाराजांची बाल-अवधूत वृत्ति

श्री. पांडुतात्यांचें लग्न १९३४–३५ चे दरम्यान थाटानें झाल्यानंतर सर्व वस्तूंची निरवानिरव करण्यासाठीं श्री अवधूत महाराज कुरुंदवाडास श्री मेघःशाम बुवांसह राहिले त्याप्रसंगीं आपण यापुढें पत्करणार असल्याची वैराग्यपूर्ण त्यागवृत्ति श्री अवधूत महाराजांनीं मेघःशामबुवांना पुढील शब्दांनीं सुचविली होती—

" मेघःश्याम पांडुरंगाचें लग्न झाल्यावर सर्व उपाधींतून मोकळा झालों. आतां चि. अनंताचें लग्न वगैरे सर्व जबाबदारी चि. दत्तूवरच राहील. तेव्हां मला पंतांनीं जी निजस्थिती दिली तींतच यापुढें मी निमग्न राहणार. आतां जगांतील लौकिक व भीड याची मला पर्वा नाहीं. " [ आठवणी भाग २ पान ४१ ]

या नंतर मेघःश्यामबुवांनीं आपल्या आठवणींतील ४२ व्या पानाचे तळापासून ४५ पानाचे प्रारंभापर्यंत ( मेघःश्यामबुवा आठवणी भाग २ पानें ४१ ते ४५ पहा ) ' निर्वाणीचा प्रसंग ' या मथळ्याखालीं, श्री मेघःशाबुवानीं वर्णन केलें आहे. त्या प्रसंगीं महाराजांचा सुरवातीला निर्धार झाला होता अंमरेश्वरच्या तपोभूमीवर " एक तारी घेऊन ' ॐ नमःशिवाय ' हा मंत्र म्हणत प्रदक्षिणा करणार. सात दिवस खालीं बसणार नाहीं. अहोरात्र मंत्रजागर करणार " असा निर्धार श्री अवधूत महाराजानीं मेघःश्यामबुवांना बोलून दाखवून तशा तपचर्येला सुरवात केली.

त्या प्रसंगीं मेघःश्यामबुवाना महाराज म्हणाले, " तूं मला मध्ये कसलाही व्यत्यय आणूं नको. फक्त तीनच वेळा चहा, कॉफी अगर दूध दे. बहिर्दिशेस जावें लागलें तर तुला खूण करीन तेव्हां माझ्या हातांतील एक तारी घेऊन मी येईपर्यंत मंत्र जपत रहा. इतर सर्व भाषण वर्ज्य ! " या तपश्चर्येच्या पहिल्याच रात्रीं भयंकर वादळ सुरूं झालें ! अमरेश्वर मंदिर उंचावर असल्यामुळें हवा अगदी थंड होऊन सोसाट्याचा वारा सुटला !

त्याप्रसंगीं मेघःश्यामबुवा लिहितात:—" महाराजांचे हाल मला पाहवेनात ! दुसऱ्या दिवशीं सकाळीं महाराजांचा आवाज अगदींच मंदावला. मग धिटाई करून ' नामस्मरण पुरे करा, अशी मी हातानें खूण केली आणि नमस्कारहि केला. पाया पडून रडूंहि लागलो " तेव्हां महराजांना दया येऊन त्यांनीं ही तपश्चर्या थांबविली !

निसर्गानें मेघःश्यामबुवांच्या विरोधाला साथ दिल्यामुळें ही तपश्चर्या या वेळीं थांबली !

पुढें अवधूत महाराज नदीचे संगमावर स्नान करण्यासाठीं खोल पाण्यांत शिरूं लागले त्यावेळींहि त्यांची छाटी धरून ठेवून खोल पाण्यांत न जाण्याची मेघःश्यामबुवांनीं रडून भेकून आरडा ओरड केली, तेव्हां महाराज खोल पाण्यांतून मागें फिरून तीरावर आले !

संगमावर स्नानाला व पूजेला जाण्यापूर्वीं श्री अवधूतमहाराज मेघःश्यामबुवांना म्हणाले—

" मी अनेक वेळां या संगमांतून गेलों आहे. आज या संगमाचें पूर्ण दर्शन घेऊन येथें मला अखंड ज्ञानदीप तेवत ठेवावयाचा आहे"

" श्री नरसिंहसरस्वतींनीं जलसमाधी घेतली, असें श्री गुरुचरित्रांत वर्णन आहे. तोच मार्ग गुरुमहाराज पत्करणार काय? अशी मला एकसारखी भीति वाटत होती " असें त्या प्रसंगाचें वर्णन श्री मेघःश्यामबुवांनीं केलें आहे "

पण मेघःश्यामबुवांना त्या प्रसंगीं निसर्गानेंहि सांथ दिल्यामुळें ती मेघःश्यामबुवांची भीति निवारण झाली !

## १९३६-३७ मधील गाणगापूरची खडतर तपश्चर्या

सदरील यात्रेचा काळ नांदेडचे श्री. नामदेव नेमाडे यांनीं आपल्या आठवणींत ( आठवणी भाग २ पान ९७-९८ ) पुढीलप्रमाणें वर्णन करून लिहिला आहे—

## गाणगापूर-यात्रा

चैत्र शु, ८ शके १८५८ ( इ. स. १९३६ ) या वर्षीं गुरुमहाराज गाणगापूर यात्रेस गेले होते. सोबत मी स्वतः, अकांतबुवा, श्री. तुकाराम काळे ( सहकुटुंब ), श्री. गंगा पाटील, श्रीमती गंगूबाई कहगांवकर, भागूबाई गटाले, माधवराव इत्यादि मंडळी होती. बरोबरच बरीचशी शिधासामुग्री घेतली होती.

गाणगापुरास मुख्यतः तीन कार्यक्रम झाले—

( १ ) सकाळीं प्रेमभेट वाचन व चर्चा ( २ ) दुपारी प्रेमतरंग वाचन व त्यावरील चर्चा. हे दोन्हीहि कार्यक्रम देवालयासमोरील झाडाच्या छायेंत चालत. ( ३ ) रात्रीं संगमावरील वाळवंटांत दिवसभर झालेल्या परमार्थ चर्चेचे विषयच स्पष्ट करण्यात येत. शुक्लपक्ष पौर्णिमेच्या आसपासचे ते दिवस असल्यानें रात्रीच्या चंद्रप्रकाशांत ही अध्यात्म चर्चा फारच रंगत असे ! भीमा-अमरजा संगमाचें तें पवित्र ठिकाण आणि विस्तीर्ण वाळवंट, यामुळें त्या चर्चेला आगळीच रंगत येई ! भक्ति-प्रेमाचा जणु कैफच सर्वांना चढे ! रात्र केव्हां उजडून जाई याचें भानच रहात नसे !

श्री अवधूत महाराजांना, गाणगापूरच्या या खडतर तपामुळें रक्तदाबाचा विकार जडला आणि नंतर अवघ्या तीनच वर्षांनीं, महाराजांनीं देहाच्या सर्व उपाधी जागरूक परमार्थ वृत्तीनें संपवून स्वानंद समाधि घेतली !

सदरील 'खडतर तपश्चर्येचें स्वरूप' श्री. नामदेव नेमाडे; श्री. तुकाराम काळे व श्री. धनजी पाटील, या त्या प्रसंगीच्या गाणगापूरचे यात्रेंत हजर असलेल्या भक्तांचे वर्णनावरून अगदीं स्पष्ट झालें आहे.

भीमा–अमरजा संगमाचे वाळवंटांत रात्रंदिवस प्रेमभेट प्रेम तरंग यांचें वाचन आणि बोध–प्रवचनांचे स्वरूपांत विवरण आणि रात्रीच्याहि चांदण्यांत रात्रसंपेपर्यंत त्याचेंच आत्मानुभवी स्पष्टीकरण श्रीअवधूत महाराज सतत सात दिवस करीत होतें ! एखादा प्रोफेसर अगर प्राध्यापक कॉलेज छायेंत पंख्याखालीं एक तास शिक्षणात्मक व्याख्यान देऊन आला कीं 'हुश्श' करून आराम खुर्चीत लेठतो, हें अनेकांनीं पाहिलें असेल. मग ६३ वर्षें वयाच्या श्री अवधूत महाराजांनीं भीमा–अमरजा संगमाचे वाळवंटांत (झाडाची छाया व पौर्णिमेच्या रात्रींचें चांदणें असलें तरी) सकाळीं दोन प्रहरीं आणि सर्व रात्रभर केलेल्या प्रवचनानें सर्व श्रोत्यांना जणु "भक्ति प्रेमाच जणु कैफ चढे आणि रात्र केव्हां उलटून जाई, याचें भानच रहात नसे !" असें वर्णन श्री. नामदेव नेमाडे यानीं आपल्या आठवणींत केलें आहे ! [आठवणी भाग २ पान ९८]

श्रोत्यांना 'भक्ति-प्रेमाचा कैफ चढविणारे' आणि 'रात्र उलटून जाण्याचें भान देखील न राहूं देणारे' श्री अवधूत महाराज यांना स्वतःला 'भक्तिप्रेमाचा कैफ' किती चढत असेल याची वाचकांनीं कल्पना करून पहावी !

भक्तिप्रेमाची ही तपश्चर्या अगदीं मनसोक्त पुरी करण्यासाठींच गाणगापूरच्या या यात्रेंत श्री अवधूत महाराजांनीं अमरापूरच्या तपश्चर्येंत अडवणूक करणारे श्री मेघःश्याम बुवा आणि त्यांची त्या कामीं मुद्दाम योजना करणारे श्री. अण्णा तथा महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री दत्त महाराज व सौ. कमला मातुश्री यांना मुद्दाम वगळलें आणि निवडक लाडक्या भक्तांबरोबरच "भक्तिप्रेमाचा कैफ" सतत सात दिवस अनुभवण्याचा अपूर्व योग श्री अवधूत महाराजांनीं या तपश्चर्येच्या रूपानें साधला असावा काय, असें वाटूं लागतें !

कांहींहिं असलें तरी या तपश्चर्येंतून १९३६ सालीं महाराज मुंबईला आले रक्तदाबाचा तो विकार घेऊनच ! महाराजांचा आत्मा स्वतंत्र व अमर असला

तरी देहाच्या उपाधींत गुरफटल्यामुळें देहाच्या नैसर्गिक व्यथा देहाचे बंदिखान्यांत असें पर्यंत जीवनन्मुक्ताला देखील कशा सुटणार ? असो—

## भविष्यकाळाच्या संकटाची सूचना
## एकतारीच्या खुंटीचा अपशकून !

गाणगापूरच्या यात्रेचे अखेरच्या खडतर तपश्चर्येंतून महाराज परतले त्यावेळच्या अपशकुनाचें वर्णन श्री नामदेव नेमाडे यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे—(आठवणी भाग २ पान ९८)

"आम्ही मोटारीनें परतलों, त्यावेळीं सुरक्षित रहावी म्हणून महाराजांनीं एकतारी माझ्या हातीं दिली आणि 'नीट सांभाळ' म्हणून बजावलें × × × × एकतारीची खुंटी बाहेर होती. उलट जाणाऱ्या मोटारीचा धक्का नेमका त्या खुंटीला लागला व ती मोडली ! महाराज लगेच मोठ्यानें म्हणाले "नामदेवा, झालें संपलें ! आतां कार्यभागहि संपला !" महाराजांचे ते शब्द पुढील दुःखद घटनेला सूचकच ठरले !

## मुंबईंत ब्लड-प्रेशरचा प्रादुर्भाव

श्री. नामदेव नेमाडे आपल्या आठवणींत (भाग २ पानें ९८-९९) पुढें म्हणतात—"गुरुमहाराज गाणगापुराहून मुंबईस पोचले पण त्यांची तब्येत तेथें एकदम बिघडली, असें मला मुंबईस गेल्यानंतर कळलें"!

"मुंबईस महाराजांच्या दुखण्यावर भरपूर डॉक्टरी इलाज झाले. डॉक्टर पथ्य सांगतांना म्हणाले "कांहीं दिवस तुम्हीं पूर्ण विश्रांति घेणेंच आवश्यक आहे. बोलणें मात्र अगदीं बंद करा ! महाराज लगेच म्हणाले "सर्व कांहीं बंद करतां येईल. पण बोलणें बंद कसेंहोणार ? माझा जीवन-व्यवसायचं मुळीं बोलण्याचा आहे" !

श्री नामदेव नेमाडे पुढें लिहितात "दीड वर्षानंतर महाराजांना थोडें बरें वाटलें, नंतर ते भडगांवीं आले. पण त्यांना फार बोलावें लागू नये म्हणून घरच्या मंडळींनीं त्यांची माडीवर निजण्या बसण्याची व्यवस्था केली. त्यांनीं कोणी भेटण्याचा योग जमला कीं ते भरपूर बोलून घेत"

## निजानंद अखंड स्थिति !

श्री. नामदेव नेमाडे या प्रकरणाचा शेंवट करतांना पान ९९ (आठवणी भाग २) वर लिहितात:—

" पुढें तर महाराज निजानंद अखंड स्थितींत रमूं लागले. मात्र त्यांच्या शरीरावरील कांति व तेज दिवसें दिवस जास्तच प्रभावी दिसूं लागलें ! "

याच ' तेजाचा ' उल्लेख करतांना आपल्या आठवणींत ( भाग २ पान ९८ ) श्री. नामदेव म्हणतात—

" नृसिंह सरस्वतीच्या पादुकांचें दर्शन घेतल्या पासून महाराज अत्यंत तेजःपुज दिसूं लागले ! या अफाट तेजामुळें ते देहभानावर नाहींत असें वाटूं लागलें ! "

( मेघशाम बुवांच्या आठवणींतील भाग २ पान ४४ वरील नरसिंह सरस्वतीच्या जलसमाधीचे भीतीचा या ठिकाणीं उल्लेख करावासा वाटतो ! )

× × × ×

आतां याच गाणगापूर तपश्चर्येच्या यात्रेंत श्री अवधूत महाराजांचे बरोबर असलेले श्री तुकाराम रंगो काळे आणि श्री. धनजी पाटील यांचे आठवणींतील कांहीं विशेष अनुभव नमूद करून हें प्रकरण आटोपतें घेऊं.

जळगांवचे श्री तुकाराम रंगो काळे गाणगापूरच्या या तपचर्येच्या यात्रेचें वर्णनांत लिहितात ( भाग १ पान २७२ )

" एकदां १०-१२ गुरुपुत्रांना घेऊन श्री क्षेत्र गाणगापूर येथें गुरुचरित्राचें पारायण करावयाचें महाराजांनीं ठरविलें हें १९३६ सालीं घडलें— "

श्री तुकाराम रंगो याच आठवणीचे ओघांत पुढें लिहितात ( भाग १ पान ७२ ) " गाणगापूर गांवाकडील ८ मैल प्रवास संपवून बैलगाडी आली त्यावेळीं, सद्‌गुरु म्हणाले " नरसिंह सरस्वतीचे मठांत जाऊन त्यांच्या पादुकांचें दर्शन अगोदर घेऊं " तेथील पुजारी प्रत्येकाकडून दर्शनासाठीं दहा रु. मागे ! पण महाराजांनीं त्याला ' बोध, सोटा ' दाखविल्यावर त्यानें प्रत्येकाला निमूटपणें पादुकांचें दर्शन घेऊं दिले !

## विलक्षण अनुभव !

आपल्या या आठवणींत गाणगापुरांतील विलक्षण अनुभव नमूद करतांना श्री. तुकाराम रंगो काळे लिहितात. ( भाग १ पान २७७ ) " संगमावरील कर्मठ ब्राह्मणांनीं महाराजांचा परमार्थ बोध ऐकून फारच नवल वाटलें. त्यांतील एका जाणत्या ब्राह्मणानें असे उद्‌गार काढलें कीं " हे तर प्रत्यक्ष दत्तमहाजजच आहेत ! कारण या ठिकाणीं तीन दिवासापेक्षां जास्त कोणीच

राहूं शकले नाहीत." गुरुमहाराज म्हणत " गाणगापूर ही भूमी पूर्ण वैराग्याची आहे ! "

## दत्तभक्तकुत्रा

" गाणगापूरच्या संगम स्थानावर एककुत्रा होता. आरतीला सुरवात झाली कीं तो संगमांत स्नान करून तेथील भस्माचे डोंगरावर भस्मांत लोळून येई आणि आरती संपेपर्यंत एक सारखा शंखनादासारखा नाद करीत राही ! महाराज म्हणाले—

" हा त्या दत्तभक्त कुत्र्याचा नित्यक्रमच आहे ! चोखामेळा, रोहिदास वगैरे संत, जातीचे अत्यंज असून, ब्राह्मणांनाहि वंद्य झाले—मग निस्सीम दत्तभक्ति करणारां कुत्राहि वंद्य कां न व्हावा ? " भडगांव श्रीदत्तमठींतहि असेच दोन कुत्रे आहेत !

## कानडी मराठीचा गोंधळ

धनजी पाटील गाणगापूरच्या या तीव्र तपश्चर्येच्या यात्रेचे स्वानुभव आपल्या आठवणींत सांगतांना लिहितात—

ता. ४ एप्रिल १९३६ रोजीं दुपारीं ४ वाजतां गाणगापूर क्षेत्राच्या संगमावर पोचलों. आम्हां सर्वांनाच महाराजांच्या सहवासाचा मोठाच योग लाभला ! बरोबर १०-१२ भक्त व बाया माणसे होती !

त्यावेळीं गोविंद व तुकाराम काळे शेजारच्या खेड्यांत मातीचीं ' भांडीं कुंडी ' आणण्यास गेले असतां ' भांडी कुंडी ' मागणाऱ्या या मराठी बोलणाऱ्यांना त्या कानडी लोकांनी रागावून हाकलून दिलें ! महाराजांकडे येऊन ( ही तक्रार ) दोघांनीं सांगितल्यावर महाराज हंसून म्हणाले—

" भांडीकुंडी या शब्दांचा अर्थ त्या कानडी लोकांना ' विपरीत ' वाटल्यामुळे ते रागावले असतील ! कशाला इतकी घाई करतां ? मिळून जातील भांडीकुंडी ! "

महाराजांचे हें बोलणें संपतें न संपतें तोंच ते ( कानडी ) लोक महाराजांकडे आले आणि पाहिजे असलेल्या सर्व वस्तू त्यांनीं दिल्या !

ते लोक कसे आले आणि आम्हांला हव्या त्या वस्तू त्यांना कशा समजल्या हें फक्त महाराजच जाणोत !

## वैराग्यभूमि !

श्री. धनाजी पाटील पुढें लिहितात—(आठवणी भाग १ पान २९३ चे अखेरीस ) "एका रात्रीं शुभ्र चांदण्यांत त्या स्थानाचे (वैराग्य भूमीचे) वर्णन करतांना महाराज म्हणाले—

"भीमानदीच्या कांठावर नरसिंह सरस्वतीचे स्थान असून पलीकडे अमरजा नदीचें काठीं औलियाचें स्थान आहे. दोघेहि या स्थानीं वारंवार भेटत. अर्थात् ही वैराग्य भूमी आहे" हा महिमा अत्यंत भक्तिभावानें महाराज सांगत होते. याच दिवसांत औलियाचा उत्सव असतो."

"तेथें जावें म्हणून आम्ही जाऊं लागलों, पण अमरजा नदीस मोठापूर आला असल्यामुळें परतलों ! तेव्हां महाराजांना हें सांगितल्यावर महाराज म्हणाले—

"चला आपण जाऊं !" महाराजांचे बरोबर जाऊन आम्ही नदीपार गेलों सर्वांचे कपडे कोरडेच राहिले ! कसे नदीपार झालों हें देखील समजलें नाहीं ! पलीकडील लोकांनीं पुरांतून आम्ही न भिजतां आलेले पाहून आश्चर्य व्यक्त केलें ! आम्ही म्हटलें "आलों खरें, पण कसे तें समजले नाहीं !"

"औलियाचा उत्सव पाहून परततांना महाराजांनीं दुसऱ्याच मार्गानें नदीपार करून आम्हाला ठिकाणावर आणलें ! "सद्गुरूंची करणी अगाध खरी !" असें सर्वांना वाटलें !"

## तपस्वी लोकांचा रहाण्याचा आग्रह व गहिंवर !

धनजी पाटील आपल्या आठवणींत पुढें लिहितात—

"गुरुवार ता. ९ एप्रिल १९३६ रोजीं बाळा भाऊ मुंबईकर, नेमाडचा चांदा आणि आणखी एक गृहस्थ या तीघांना (महाराजांनी) संगमावर अनुग्रह दिला. तेथील तपस्वी लोकांना महाराजांची सुबोध परमार्थ चर्चा ऐकून, त्यांचे विषयीं फार प्रेमादर वाटूं लागला. महाराज संगमावरून परतण्यापूर्वी ते तपस्वी म्हणाले—

"महाराज आणखी थोडे दिवस रहा. येथें तीन दिवसानंतर कोणी रहात नाहीं, हें खरें; पण आपण तर सात दिवस येथें राहून सप्ताह केला !"



श्री अवधूत महाराजांच्या समाधिस्थानासमोर नरसिंह सरस्वतीचे स्मारक म्हणून महाराजांनी स्वहस्ते लावलेला औदुंबर व औदुंबर कट्टा



मठीतील भजन मंदीरातील दत्त मुर्ती

त्या लोकांनीं महाराजांना आणखी रहाण्याची विनंति करतांना गहिवरून त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहूं लागल्या !"

## गाणगापुरांत भिक्षेची फेरी

"या जप-यात्रेंतील सर्वांना जानवीं घालून ब्राम्हण केल्याची आठवण सर्वांनींच सांगितली आहे. सर्वांबरोबर (मधुकरीची) भिक्षेच्या अन्नाची फेरी केल्यावर सर्वांबरोबर बसून महाराजांनीं भिक्षेचें अन्नच सेवन केलें. त्या वेळीं महाराजांच्या या प्रेमळ वागणुकीचें वर्णन करण्यास शब्दच अपुरे पडतात !"

"नंतर इतर यात्रिकांना दुर्लभ ठरलेलें नरसिंहसरस्वतींच्या पादुकांचें दर्शन, महाराजांच्याच कृपेनें सहज घडण्याचें भाग्यहि आम्हांला लाभलें"

## सद्गुरूंचे सर्वांवर सारखे प्रेम !

सदरील आठवणींत (भाग १ पान २९५ ची सुरवात) श्री घनजी पाटील पुढें लिहितात—

"आम्ही गाणगापूर गांवांतून संगमावर जाण्यास निघालों, तेव्हां आमच्या-पैकीं कांहीं जण मागें राहिले. "ते आमचे बरोबर येईतों आपण 'प्रेम भेट' आणि 'प्रेमतरंग' वांचूया" असें कांहीं भक्त म्हणाले.

तेव्हां गुरुमहाराज म्हणाले—"माझी कांहीं मुलें मागें राहिलीं असतां त्यांच्या शिवाय कसें वाचता ?"

महाराजांचें सर्व भक्तांवर सारखें प्रेम होतें, हें यावरून दिसून येतें !

## तेजोवलय व चार कुत्र्यांचा पहारा !

"गुरुमहाराज झोंपत असत तेव्हा त्यांच्या अंथरुणाच्या चार कोपऱ्यावर चार कुत्रे बसलेले दिसत ! महाराजांच्या चेहेऱ्या भोंवतीं सुदर्शन चक्राकार तेजोवलय दिसत असे !" [ घनाजी पाटील आठवणी भाग १ पान २९५ ]

घनजी पाटलांचा मुलगा माधव आपली आठवण सांगतांना म्हणाला, "महाराजांनीं संगमावर कांहीं विधि करून आम्हांला ब्राह्मण केलें."

## जागतिक क्रांतीचें स्वप्न आणि महाराजांचा भावी घटनेविषयीं इषारा !

"जगांत क्रांति होणार' असें तुकाराम रंगो काळे यांना गाणगापुरास असतांना स्वप्न पडलें. महाराजांना या स्वप्नाची हकीगत सांगितली तेव्हां

महाराज म्हणाले—"१९४० पासून जगांत मोठी क्रांति होईल व रक्ताचे पाट वाहतील!"

याप्रमाणें दुसरें महायुद्ध पेटून कोट्यवधि लोक मृत्युमुखी पडल्याची प्रत्यक्ष घडलेली घटना जगभर प्रसिद्धच आहे!

( धनजी पाटील आठवणी भाग १ पान २९५ ची अखेर )

## गाणगापूर येथील तीव्र तपश्चर्येनंतर

श्री अवधूत महाराजांना रक्तदाबाचा विकार जडला आणि 'संपूर्ण विश्रांती' घेण्याचा सल्ला तज्ज्ञ डॉक्टरनीं दिल्यावर त्यांना श्री अवधूत महाराजांनीं काय उत्तर दिलें याचा उल्लेख नुकताच येऊन गेला आहे. 'माझा जीवन-व्यवसायच मुळीं बोलण्याचा आहे, असें श्री. अवधूत महाराज म्हणाले खरे; पण प्रत्यक्ष व्यवहारांत त्यांच्या या जीवन-व्यवसायावर जवळच्या सर्व जिव्हाळ्याच्या माणसांनीं शक्य तितकें जास्त नियंत्रिण, अप्रत्यक्ष उपयांनीं ठेविलें; पण श्री अवधूत महाराजांनीं त्यांतील बंधनांतूनहि आपल्या 'जीवनव्यवसायांतील' अध्यात्म निरुपणाची हौस शक्य तितकी व शक्य तेव्हां भागवून घेतलीच!

श्री. अवधूत महाराज १९३६ नंतर श्रीपंतांनीं दिलेल्या निजवृत्तींत म्हणजे खऱ्या अवधूत-जीवनांत राहिले. 'अवधूत' या चार अक्षरामध्ये कोणता खोल अर्थ भरला आहे हें श्री अवधूत गीतेच्या आठव्या अध्यायांतील ४ ते ९ श्लोकांत स्पष्ट केलें आहे. त्याचा उल्लेख या या चरित्राचे अखेर करून त्याची औचित्यपूर्ण पूर्णता करणें उचित ठरेल, असें, जिव्हाळ्याच्या भक्तांनीं, सुचविल्यामुळें त्याप्रमाणें तसा उल्लेख करूनच श्री अवधूत महाराजांच्या या चरित्राची पूर्तता करीत आहों.

## एकांताची आवश्यकता

श्रीक्षेत्र गाणगापूरच्या तीव्र तपश्चर्येनंतर श्री अवधूतमहाराज थेट मुंबईतील श्री. का. म. ताम्हनकर यांच्या, केनेडीब्रिज वरील सोमण बिल्डिंग मधील बिऱ्हाडाकडे आले. तेथें त्यांच्या प्रियभगिनी श्रीमती आऊताई व लाडकी भाची ( सौ. शांताबाई ताम्हनकर ) होत्या, त्यामुळें आपल्याला एकांतवासाचा फायदा व विश्रांती मिळेल असे महाराजांना वाटलें असावें, तें खरें ठरलें. असें श्री. मेघःश्याम बुवांनी या प्रसंगींच्या आठवणी नुकत्याच सांगितल्या, त्यांवरून दिसून येते श्री. मेघःश्यामबुवा आपल्या आठवणींत सांगतातः—

" श्री अवधूत महाराजांना डॉक्टर लोकांनीं संपूर्ण विश्रांती घ्यावयास सांगून औषधोपचारांची योजना समजून सागितल्यानंतर त्यांना खार येथील निवासस्थानांत न्यावें असें, श्री. दत्तमहाराज उर्फ अण्णा, सौ. कमला मातुश्री आणि सौ. माई या सर्वांच्या मनांत आलें. त्याप्रमाणें मी स्वतः आणि श्री अण्णा यांनीं तसें महाराजांना सुचविलें तेव्हां ते म्हणाले :—

" माझी येथें औषधोपचारांची योजना झालीं आहे आणि ती करविणारे तज्ञ डॉक्टरहि जवळपासच आहेत. तेव्हां खारला येण्यापेक्षां येथेंच मला विश्रांति व औषधोपचार ठीक मिळेल. "

श्री अवधुत महाराजांचें म्हणणे वस्तुस्थितीला धरूनच होते. डॉ. भडकमकर, डॉ. द्रवीड वगैरे डॉक्टरांना वरचेवर येथें आणणें सुकर होते आणि महाराजाच्या ज्येष्ठ प्रिय भगिनी आऊताई व प्रिय भाची चि. सौ. शांताबाई महाराजांची शुश्रूषा व पथ्यपाणी अत्यंत दक्षतेनें करीतच होत्या. तसेंच विशेषतः एकांताच्या दृष्टीनें ही जागा अत्यंत सोयिस्कर होती. कारण खारला महाराजांच्या वरच्या मंडळीचें निवासस्थान असल्यामुळें भेटीस येणाऱ्या सर्व तऱ्हेच्या भक्तांची तेथें बरीच वर्दळ होणें स्वाभाविकच होतें. पण केनेडीपुलाजवळील हें निवासस्थान पुष्कळ भक्तांना माहितच नसल्यामुळें तेथें कांहीं दिवस तरी येणाऱ्या-जाणाऱ्या भक्तांची गर्दी होणें शक्य नव्हते.

## या पुढील महाराजांचा जीवनक्रम

रक्तदाबाच्या विकारानंतर डॉक्टर लोकांच्या सूचनांमुळें आणि आप्तस्वकीयांनीहि केलेल्या व्यवस्थेमुळें महाराजांनींहि स्वतःच्या हालचालींवरील निर्बंधांना थोडी फार मान्यता दिली. मात्र संधि मिळाली कीं ते परमार्थ बोध–विवरणाची आपली हौस भागवून घेत, असेच श्री नामदेव नेमाडे यांच्या आठवणींतील तपशिलावरून दिसून येते !

## अवधूत बाण्याला शोभणारी आत्मचिंतनपर वृत्ति

१९३६ ते १९३९ च्या खानंदवासापर्यंत श्री अवधूत महाराज आप्तेष्टांबरोबरील यात्रा-प्रवासांत असोत, किंवा भडगांवीं श्रीदत्तमठींत असोत, ते सदैव आपल्या अवधूत बाण्याला अनुसरूत आत्मचिंतनपर परमार्थ चर्चा–बोधाच्या वृत्तींतच रंगलेले असत.

त्यांचे खाणे, पिणे, स्नानादि व्यवहार आणि निद्रा इत्यादींची काळजी जवळचे जिव्हाळ्याचे आप्तेष्टच घेत. या व्यवहाराची महाराजांनीं स्वतः काळजी

घेण्याचें सोडूनच दिलें होतें! एका दृष्टीनें महाराज वानप्रस्थ व सन्यस्त वृत्तींतच होते!

## विभूति-महत्त्वाचें तेज

१९३६ सालच्या श्रीगाणगापूर येथील तीव्र तपःचर्येच्या यात्रेनंतर श्री पंतांनीं शिकविलेल्या निजस्थितींत राहाणाऱ्या श्री अवधूत महाराजांच्या चेहेऱ्यावर विलक्षण तेज दिसत होतें, हें नांदेडचे श्री. नामदेव नेमाडे यांचेसह जवळच्या अनेक भक्तांनीं वर्णन केलें आहे तें त्या त्या भक्तांच्या आठवणींतून वाचावयास मिळते.

## महाराजांच्या सहधर्मचारिणी सौ. कमला मातुश्री यांची कौतुकास्पद तपश्चर्या

श्री दत्तमहाराज तथा अण्णा यांचेसह, अडचणीच्या आपत्तींतूनहि सर्व मुलांनी काळजी घेणें आणि निवासस्थानीं येणाऱ्या सर्व भक्तांची योग्य ती सोय करून त्यांच्याशीं आपलेपणानें वागणें, या गोष्टी श्री अवधूत महाराजांच्या सहधर्मचारिणी सौ. कमलाबाई यांनीं अत्यंत दक्षतेनें केल्या; इतकेंच नव्हे तर आपले तीन मुलगे व एक मुलगी यांनाहि या विषयीचें उत्कृष्ट वळण लावलें, या विषयींचा तपशील श्री अवधूत महाराज यांचे (वरिष्ठ पोलीसऑफिसांतील) दुसऱ्या नंबरचे सुपुत्र श्री. पांडुतात्या आणि तीन नंबरचे सुपुत्र श्री. अनंतराव यांच्या आठवणींत वाचण्यासारखा आहे. विशेषतः श्री. अनंतराव यांच्या आठवणींत या विषयींचा तपशील लक्षांत घेण्यासारखा आहे.

आपल्या जीवनाच्या उत्तरार्धांत भडगांवांतील श्रीदत्तमठींत श्रीमती (त्यावेळीं सौभाग्यवती) कमलाबाई रहावयास आल्या तेव्हा, श्री अवधूत महाराजांच्या सर्व भक्तांना वाटू लागलें कीं 'आतां "अवधूत मठींत श्री अन्नपूर्णेचेंच वास्तव्य झाल्यामुळें सर्वांना अन्न-पाणी इत्यादि सोयीं विषयीं ददात राहिली नाहीं!" या विषयींचा गौरवास्पद उल्लेख अनेक भक्तांनीं आपापल्या आठवणींत केला असून मोठ्या कष्टानें चरित्राच्या आठवणी जमविणारे श्री. मेघःश्याम बुवा यांनी त्या सर्व वर्णनांना कृतज्ञता पूर्वक दुजोरा देऊन नुकत्याच झालेल्या भेटींत मातुश्री कमलाबाई यांचा कौतुकास्पद उल्लेख मुद्दाम करण्यास लेखकाला सुचविल्यामुळें या ठिकाणी सदरील वस्तुस्थितीचा उल्लेख मुद्दाम कटाक्षानें करण्यास लेखकाला धन्यता वाटते!

कुरुंदवाडास श्री अवधूत महाराजांच्या निवासस्थानीं येणाऱ्या अनेक भक्तांची, आणि चहात्यांची वडदास्त व्यवस्थित ठेवून त्यांची योग्य ती सोय व सेवा

मातुश्री सौ. कमलाबाई करीतच आणि मुलानांहि त्यांनीं तसेंच वळण लाविलें. त्या त्यांच्या कर्तबगारीचें कौतुक करावें तितकें थोडेंच ! कारण त्यावेळीं त्यांचे हातीं सेवेची पुरेशीं साधनें आणि आर्थिक स्थिती नव्हती. भडगांवला आल्यावर या उणीवा नाहीशा झाल्यामुळें मातुश्रीच्या कर्तबगारीचें विशेष तेज पडले, असेहि मेघःशामबुवा म्हणतात.

श्री अवधूत महाराजांच्या, १९३६ ते १९३९ या तीन वर्षांत ज्या हालचाली, देहाच्या परस्वाधीन वृत्तींत ब्लडप्रेशरच्या आजारांतच झाल्या, त्यांचा त्रोटक उल्लेख करून या जीवनवृत्ताचा उपसंहार करावयाचा आहे.

## महाराजांची कडगांवला पहिली व शेवटचीच भेट

### कांहीं उळक घटनांचा उल्लेख

श्री अवधूत महाराज श्री. नामदेव नेमाडे प्रभृति प्रेमळ भक्तांच्या अत्याग्रहामुळें नांदेड व जळगांव वगैरे ठिकाणीं अनेकदा कीर्तनसप्ताहाच्या फेरीसाठीं गेले परंतु १९३६ सालच्या गाणगापूर क्षेत्रांतील तीव्र तपचर्येंत कडगांवच्या प्रेमळ भक्तांशीं त्यांचा विशेष जिव्हाळा जमला; त्यामुळें कडगांवच्या चावदस पाटील रुपचद पाटील व त्यांचे सहकारी यांच्या अत्याग्रहानें श्री अवधून महाराजांनीं कडगांवास श्री. अण्णांचह एकदांच भेट दिली आणि तीच अखेरची ठरली ! या विषयींची विस्तृत माहिती भाग १ मधील नंबर ५४ पासून नं ६४ पर्यंतच्या आठवणींत आणि ( भाग १ पानें २५८ ते ३०४ ) मध्ये आणि भाग २ मधील श्री नामदेव नेमाडे यांच्या आठवणींत, विस्तारानें आलेली असल्यामुळें त्या तपशिलाची द्विरुक्ति न करतां वाचकांना त्या आठवणी वांचण्याची शिफारस करतो.

१९६६ सालच्या चैत्र पाडव्या दिवशीं श्री. अवधूत महाराजांची २७ वी पुण्यतिथी साजरी झाली. त्यानिमित्त कडगांवचे श्री. चावदस पाटील व श्री. रूपचंद पाटील व त्यांचे सहकारी भक्त यांनीं आपल्या ' विशेष आठवणी ' म्हणून बराच लेखी मजकूर श्री. मेघःशामबुवा यांचेकडे आणून दिला. पण भाग १ पानें २५८ ते ३०४, मध्यें त्यापैकीं बरीच माहिती आली असून ती छापूनहि झाल्याचें त्यांचे निदर्शनास आणण्यात आलें. पण त्यांनीं इतके परिश्रम करून आणून दिलेल्या मजकुरांतील विशेष अशा घटनांचा उल्लेख या ठिकाणीं करण्यासारखा आहे :—

### १९३७ सालीं कडगांवच्या भक्ताना अनुग्रह दिला

इ. स. १९३७ सालीं कडगांव गांवीं नांवाजलेले आणि त्या गांवीं बहुतांची मान्यता असलेले श्री. चावदस पाटील व श्री. रूपचंद पाटील कै. दशरथ रामजी

पाटील आणि कै. सद्‌गोना पाटील यांच्या प्रेरणेनें पांच सहा कडगांवकर भक्तांसह मार्गशीर्ष शुद्ध १२ ला भडगांवास श्री अवधूत महाराजांचें दर्शन घेण्यासाठीं आणि त्यांना कडगांवास कीर्तन सप्ताहासाठीं प्रेमाचें आग्रही निमंत्रण देण्यासाठीं आले.

सतत तीन दिवस दिवसा बोध आणि रात्रीं कीर्तन ऐकून कडगांवच्या या सर्व भक्तांचें ' पूर्ण समाधान ' झालें. त्यावेळीं अवधूत महाराज म्हणाले " अरे रुपचंदा, मी कित्येक दिवसांपासून तुमचीच वाट पहात होतों. "

हे भक्त आपल्या लेखी सुदीर्घ निवेदनांत म्हणतात—" खरोखर, कोणत्याहि जातीचा अभिमान (दुराभिमान) न धरतां व उच्चनीचपणा न ठेवतां, सर्वांना सारखाच आत्मबोध, वेदांचे सिद्धांत, दृष्टांत सहज,—सुलभतेनें सांगणारा या काळांतील हाच दिव्यपुरुष होय. आपण यांनाच शरण जावें, त्यांचाच अनुग्रह घ्यावा; म्हणजे आपल्या जीवाचें कोटी-कल्याण होईल; असें नक्की ठरलें व दत्तजयंतीच्या दिवशीं गुरुवारीं दुपारी आम्ही महाराजांचा अनुग्रह घेतला "

## कडगांवास प्रेमा-ग्रहाचें निमंत्रण

हे कडगांवचे भक्त पुढें लिहितात :—

" भंडाऱ्याच्या दिवशीं, महाराजांना आपल्या कडगांवीं न्यावें व आपली भूमि त्यांच्या चरण-स्पर्शानें पावन करावी, या हेतूनें त्यांना कडगांवी येणेबद्दल निमंत्रण देणेचें ठरलें. "

याप्रमाणें श्री. अवधूत महाराजांना कडगांवकर भक्तांनीं कडगांवास येण्यासाठीं श्री. रुपचंद पाटिलांमार्फत निमंत्रण दिलें. त्यावेळीं श्री अवधूत महाराज म्हणाले :—

" अरे रूपचंदा, फार दिवसांपासून मला कडगांवीं येण्याची इच्छा आहे. मी याच घटनेची वाट पहात होतो, ती आज प्रत्यक्ष घडत आहे. मी कडगांवीं जरूर येतो व तसें तुला पाकिटानें कळवितों. "

या उद्‌गारांवरून श्री अवधूत महाराजांना कडगांवला जाण्याची तीव्र इच्छा होती, हें स्पष्ट झालें आहे.

याप्रमाणें महाराजांनीं कडगांवकरास आपल्या येण्याचा नक्की दिवस पत्रानें कळविला तेव्हा कडगांवकर भक्तांना अत्यानंद झाला ! याचे वर्णन कडगांवकरांचे पुढाऱ्यांनीं आपल्या लिखाणांत पुढीलप्रमाणें केलें आहे.

## अत्यंत प्रेमाचें स्वागत

" ठरलेल्या दिवशीं महाराजांची मोटार कडगांवकडे आली. गांवचे बाहेर अर्ध्या मैलावर त्यांचे स्वागता करितां, गांवातील प्रमुख तीनशे मंडळी हजर होती."

महाराजांचा दिव्यबोध कडगांवची जनता ऐकूं लागलीं त्यावेळीं महाराज स्वतः कीर्तन करीत नव्हते. माडीवर आसनीं बसूनच × × × ते बोध वर्षाव करीत. त्यांच्या दर्शनास गांवांतील स्त्री-पुरुषांची रीघ लागलेली होती. त्यांच्या मुखांवर तळपणारें दिव्य ब्रह्मतेज पाहून तर...जनता अगदींच थक्क झाली ! आजूबाजूच्या गांवातून दररोज असंख्य गाड्या येत......असा तेजस्वी सत्पुरुष...ब्रह्मज्ञानाचे सिद्धांत रोखठोक सांगणारा हा खरोखरच एक मोठा योगी आहे, अशी वाक्यें प्रत्येकाच्या तोंडून ऐकावयास मिळू लागली. " ।

## क्षेत्रांपेक्षांहि क्षेत्र ठरलें !

" त्यांचेकडून अनुग्रह घ्यावा व आपण धन्य व्हावे, या हेतूनें असंख्य स्त्री-पुरुष त्यावेळीं महाराजांचें अनुग्रहीत झाले याचवेळीं श्री. चावदास पाटील ( तुळशीराम तुकाराम पाटील ) यांनीं अनुग्रह घेतला ( चावदस, नांव चतुर्दशी दिवशीं जन्म झाला म्हणून पडलें म्हणतात ! )

" रात्रीं गांवाचे बाहेर मोठ्या पटांगणांत परमपूज्य अण्णा तथा दत्तमहाराज यांचें कीर्तन होत असे. "

" हजारों लोक कीर्तनास जमत. दिवसा महाराजांचा बोध व .........रात्रीं श्री दत्तमहाराजांच्या कीर्तनातील उत्कृष्ट ज्ञानविषय ऐकून तर..........जनतेचे कर्ण तृप्त झाले. त्या सात दिवसांत कडगाव.........गुरुमाउलीच्या वास्तव्यानें क्षेत्रापेक्षांहि क्षेत्र बनलें ! ............भाविक जनतेस परमार्थ मार्गाचें उत्कृष्ट मार्गदर्शन झालें ! "

पण ' गांव तिथें घाण असावयाचीच ' या न्यायानें सत्याचा व संताचा मत्सर करणाऱ्या या गावांतील कांहीं लोकांनीं अशी फंडी उठविली कीं, " अवधूत महाराज, हे खरे ब्राह्मण नसून भारून टाकणारा कोणी परदेशी अवलिया आहे ! " यांतील कांहीं मत्सरी विघ्न संतोषी लोक अवधूत महाराजांचे ' सत्व हरण ' करण्याच्या मस्तीने आले ! पण त्यांसें प्रत्यक्ष दर्शन होऊन बोध ऐकावयास मिळाल्या नंतर स्तुति सुमनांचा वर्षाव महाराजांवर करीत परत गेले ! इंग्रजीमध्ये एक म्हण आहे कीं He came to slander but rmained to praise " निंदानालस्ती कराव-

यास आले पण स्तुति सुमनांचा वर्षाव करीत राहिले!" असा प्रकार झाला! यामुळें मत्सरी व निंदक यांचीच उलट फजीति झाली!

कडगांवच्या या 'पहिल्या व शेवटच्याच' भेटींत महाराजांनीं अनेक 'चमत्कार' दाखविल्याची विस्तृत नोंद श्री. चावदस पाटील व श्री. रूपचंद पाटील इत्यादि कडगांवच्या नाणावलेल्या भक्तांचे ताज्या आठवणींत विस्तारानें आली आहे. पण या तपशिलाचा उल्लेख भाग १ मधील अनेकांचे आठवणींत छापलेला असल्यामुळें त्याची द्विरुक्ति करून जागा अडविणें उचित ठरण्यासारखें नाहीं! शिवाय 'चमत्कार करून नमस्कार' मिळविण्याचा प्रकार स्वतः श्री अवधूत महाराज व त्यांचे परमपूज्य गुरू श्रीपंत महाराज, या उभयतांनाहि पसंत नसल्यामुळें या चमत्कारांचा नुसतां नामनिर्देश करूनच पुढील महत्त्वाचा समारोप करणें उचित ठरण्यासारखें आहे.

## कांहीं चमत्कारांचा नामनिर्देश

(१) कडगांवांतील श्रीराम मंदिरांतील मूर्ति १४ वर्षें वनवासांत असल्या सारख्या पडून होत्या! या मूर्ति घडविणारा कारागीर तमोगुणी होता! त्या तमोगुणांची कृष्णछाया त्या मूर्तींवरहि पडली असल्यामुळें त्यांची स्थापना करूं नये, असें अवधूत महाराजांनीं सुचविलें व अनुभवहि तसाच आल्यामुळें त्यांची स्थापना न होतां सत्वगुणी मूर्तींची स्थापना करावयाचें सर्वांनीं ठरविलें.

(२) एके दिवशीं अवधूत महाराज कोणालाहि न सांगतां खाड खाड जिना उतरून एकटेच चालले! श्री रूपचंद पाटील व श्री चावदस पाटील वगैरे भक्त त्यांचे मागोमाग गेले.

\+ \+ \+ \+

महाराज नदीच्या रस्त्यानें जाऊन चिंचेचे झाडांजवळ उभे राहिले... महाराज म्हणाले "खरोखर, हा गांव धन्य होय! येथें पूर्वीपार पासून ऋषि—मुनींची वस्ति होती. येथें जवळच गोमुख होतें औदुंबराचीं झाडें होतीं. आजहि येथें वाघुर नदी कांठी मोठें सुयार आहे व त्यांत प्रत्यक्ष ऋषी आहेत. तसेंच महादेव व पार्वती यांची मोठीं देवालयें आहेत मी जर प्रथम ह्या गांवीं आलों असतो तर (अवधूत) मठी येथेंच स्थापन केली असती!

अवधूत महाराजांनी दिलेली माहिती ऐकून कडगांवचे प्रमुख भक्तांना अत्यंत नवल वाटलें!

पुढें कांही दिवसांनीं या भक्तांनीं महाराजांनीं सुचविलेली जागा खोदली, त्या ठिकाणीं उत्कृष्ट गोमुख व मोठें कुंड सांपडलें! तेव्हां त्यांना गुरुमाऊलीच्या वचनांची सत्यता पटली!

कडगांवला सप्ताह झाल्यानंतर त्या सप्ताहाचा लाभ घेणाऱ्या शेंकडों कडगांवकरांची व आसपासच्या गांवांतील भक्तांची हृदयें महाराजांच्या वियोग-दुःखानें भरून आलीं. या प्रसंगीं सर्वांचा प्रेमानें निरोप घेतांना श्री अवधूत महाराज म्हणाले.

"रूपचंदादि भक्तांनो, या भूमीवर मी अवधूत-मार्गाचें रोपटें लावलें आहे. तुम्ही गुरुबंधू. भक्ति-प्रेमाच्या जलसिंचनानें त्याचें संगोपन करा. त्या गांवांत या रोपट्याचा मोठा वृक्ष पहावयास मिळेलच मिळेल.!"

"अवधूत महाराजांची ही भेट प्रथमची तशी शेंवटचीच ठरली! पुढें महाराज अनेक प्रयत्न आम्ही केलें तरी या गांवीं येण्याचा योग पुन्हा आलाच नाहीं. १९३८ ला निकटच्या आप्तासह बाळेकुंद्रीकडे जाऊन दिवाळींत मुंबईंत परत आल्यावर महाराज स्वतःच बोलले कीं "आतां बाळेकुंद्रीस जाण्याचा योग फिरून नाही, इतकी शरीरांत अशक्ततेची जाणीव उत्पन्न झालेली आहे!"

१९३६ च्या गाणगापुर यात्रेंत, तीव्र तपश्चर्येंचे कामी कडगावकर भक्तांचें प्रोत्साहन व सहकार्य मिळाल्यामुळें, त्यांचे विषयीं महाराजांना फार जिव्हाळा वाटूं लागला होता. कडगांवकरांबरोबर आणखी एकवार काशीयात्रा करण्याची मनीषाहि महाराजांनीं त्यांना बोलून दाखविली होती! पण विधि-घटना अशी होती कीं त्यानंतर कडगांवकर भक्तांना महाराजांचा सहवासाचाहि लाभ फार मिळाला नाहीं!

× × × ×

श्री. रूपचंद व श्री. चावदस पाटील आपल्या ताज्या आठवणींत पुढें म्हणतात :—

"आमचा लेवा-पाटीदार समाज पूर्वीपासून देवीचा उपासक खरा, परंतु महाराजांच्या बोधानंतर आज त्या समाजांतील बहुसंख्य लोक गुरुमार्गी झाले आहेत! 'अनादि सिद्ध अवधूत सांप्रदाय हजारों भक्तांच्या पदरीं पाडून ते आनंदही भोगीत आहेत,.......याला कारण गुरुबंधु चावदस पाटील व त्यांचे (निकटवर्ती) गुरुबंधु यांची निस्सीम गुरुभक्ति व गुरुबंधु प्रीतीच होय. येथील गुरुभक्तांचा एकोपा सद्गुरूंच्यां आज्ञेनुसार वागण्याची

पद्धत, तसेंच गुरुश्रेष्ठता टिकविण्याची निर्धारीं प्रतिज्ञा आणि एकमेकांनीं एकमेकांजवळ आपलें शुद्धांतःकरण मोकळें करून बोलण्याची पद्धतच या अपूर्व संघटनेला कारणीभूत झालेली आहे."

कडगांवच्या या एकनिष्ठ भक्तांचा मत्सर व हेवा करणाऱ्यांनीं या भक्तांचा छळ व उपहास करण्याच्या अनेक कारवाया केल्या. पण त्यांत विरोधकांची प्रत्येक प्रसंगी फजीतींच झाली! आणि श्री अवधूत महाराजांचे भक्त त्यांचा जयजयकार करीत पुढें सरसावले!

## आणखी कांहीं चमत्कारांचा उल्लेख

(३) 'गांव तेथें उकिरडा' या नात्यानें श्री अवधूत महाराजांच्या भक्तांचा छळ व उपहास करणाऱ्या काहीं मत्सरी टवाळांविषयीं या पूर्वीं लिहिलेंच आहे. अशा टवाळांनीं चावदस पाटील प्रभृति भक्तांची टवाळी करण्याचे अनेक निष्फळ प्रयत्न केले. रात्रीं अपरात्रीं चावदस पाटलांच्या शेताचे नुकसान करण्याचे या लोकांचे प्रयत्न फसले! त्या नंतर चावदस पाटलांचा छळ करण्याची त्यांनीं एक नवीन कारवाई केली!

चावदास पाटलांच्या शेतांतील पाणी सरकारी रस्त्यावर काढण्यात आलें होतें. विरोधी लोकांनीं आसपासच्या खेड्यांतील लोक व पाटील यांचेकडे चहाड्या करून आणि त्यांना चिथावून खूप सह्यांचा एक तक्रार-अर्ज मामलेदारांकडे चावदस पाटलां-विरुद्ध पाठविला. या तक्रारीमुळें मामलेदार चावदस पाटलांना निदान १०० रु. दंड करून समज देतील, अशी या उपद्व्यापी विरोधकांची अटकळ होती! तशी चिथावणी, ह्या अनेकांमार्फत त्यांनीं मामलेदार साहेबांकडे दिली होती; हे लोक आनंदानें नाचत होते!

पण ऐनवेळीं चावदस पाटील व त्यांचे स्नेही यांनीं मामलेदार साहेबांपुढें आपली खरी बाजू नम्र शब्दांनीं मांडल्यावर मामलेदारसाहेबांनीं त्यांना दंड न करतां नुसतें सुचविलें कीं "जा तूं केलंस हें योग्यच आहे. मात्र सरकारी रस्त्यांत चिखल होणार नाहीं, अशी यापुढें दक्षता घे." हा निकाल ऐकून 'चावदस पाटलाला दंड होणारच' म्हणून नाचणारांची तोंडे काळी ठिक्कर पडली! त्यांची समजूतदार लोकांना कींव आली!

(४) या शिवाय कडगांवचे भक्त जळगांवकडे महाराजांच्या भेटीसाठीं जात असतां त्यांचा अपघातांतून बचाव, ऐनवेळीं त्यांचेकरितां पाण्याचे माठाची व्यवस्था

आणि काड्याच्या पेटीची शेंकोटी करतां गरज भागणे, तसेंच चावदस पाटलांचा हात निखळल्यासारखा झाला असतां तो साध्या उपायांनीं दुरुस्त होणें आणि चावदस पाटलांचा ग्रामपंचायतीच्या निवडणुकीत विजय होण्याचीं आगाऊ जागृति देणें 'हे चमत्कार' श्री अवधूत महाराजांच्याच कृपेने घडले, असें कडगांवकर भक्तांच्या आठवणींत भक्ति भावानें लिहिलेलें आहे. त्याचा उल्लेख आठवणी भाग १ मध्ये आलाच आहे.

सदरील 'चमत्कारांचा' उल्लेख करून श्री. रूपचंद व चावदस पाटील या आपल्या ताज्या आठवणींचे समारोपांत लिहितात—

गुरुभक्तांचें गुरुकृपेच्या योगानें रक्षण होण्याचीं असंख्य उदाहरणें घडूं लागलीं, गुरुभक्तींच्या कृपा-प्रसादानें सर्व कांहीं चांगलेच होत आहे"

"आम्हां गुरुबंधूमध्ये फूट पडावी म्हणून फारच फार प्रयत्न विरोधकांनीं केले. ते सर्व गुरुमाऊलीच्या कृपेनें निष्फळ ठरले! आज रूपचंद व चावदस पाटील प्रभृति महाराजांचे भक्त शरीरानें निराळे दिसत असले तरी मनांनीं पूर्ण एक आहेत. अशी गांवांतील लोकांची (आणि विरोधकांचीहि) खात्रीं झालेली आहे!"

"आज असा गुरुभक्तांचा मेळावा, जमवून सद्गुरुमातेच्या कृपाछात्राखाली या कडगांवात आज आनंदानें भक्तिप्रेमाचे खेळ गुरुमाउलीचे भक्त करीत आहेत, आणि गुरुकृपेची व प्रेमाची प्रचिति पहात आहेत! ही भक्तिप्रेम–योगाची संघटना अशीच कायम रहावी एवढीच आमची श्री अवधूतचरणीं प्रार्थना आहे. पुनःपुन्हा अशी प्रार्थना आम्ही सद्गुरुभक्त त्रिवार करीत आहो"!

"जय गुरु मोरेश्वर महाराज कीं जय"

\+ \+ \+ \+

श्री अवधूत महाराजांविषयीं, त्यांच्या जीवनयात्रेचे अखेरीस, १९३६ च्या गाणगापूरच्या तपश्चर्या–तृतीयात्रेमुळे किती जिव्हाळा कडगांवकर भक्तांत उत्पन्न झाला आहे, याची प्रचीति या भक्तांच्या ताज्या लिखाणांतील वरील उल्लेखांवरून येण्यासारखीच आहे. कडगावकर भक्तांच्या हृदयांतील ही अवधूत मार्गाची जिव्हाळ्याची वृत्ति श्री अवधूत महाराजांचे सुपुत्र श्री. दत्तमहाराज तथा श्री. अण्णा यांना वारंवार कडगांवास निमंत्रून व त्यांचे अनेक कीर्तन सप्ताह वारंवार करवून या भक्तांनीं वाढीस लावली आहे! कडगांवकरांच्या या जिव्हाळ्याच्या प्रेमभक्तीला श्री दत्तमहाराजांनींहि उत्कृष्ट सांथ दिली आहे, असें आढळून आलें आहे.

## सहृदय वाचकांनीं क्षमा करावी

आतां पंतमहाराज या सद्गुरूंनीं निजगूज म्हणून उपदेशिलेल्या निजवृत्तीचे आत्मानंद सुखांत जीवनाचे अखेर तीन वर्षें श्री अवधूत महाराज कसे राहिले आणि किती अद्भूत जागृती राखून त्यांनीं स्वानंदवास पत्करून आपली जीवन यात्रा किती अपूर्वाईच्या तेजानें संपविली, हें अखेरचें प्रकरण लिहून ही चरित्र लेखनाची सेवा समाप्त करण्या पूर्वीं आम्ही सहृदय वाचकांची क्षमा मागतो व ती कां मागतो याचा खुल्या अंतःकरणानें (खालील प्रमाणें) खुलासा करणें आम्हाला आवश्यक वाटते.

## लेखकानें मानलेले आभार

हें चरित्र तयार करण्यासाठीं श्री. मेघःशामबुवा यांनीं श्री अवधूत महाराजांचे पट्टशिष्यत्वाची तीव्र जाणीव राखून सतत दोन वर्षें अनेक ठिकाणीं (पायाने व शरीराने अधू असूनहि) पायपीट करून श्री. दत्त महाराजांच्या प्रेरणेनें श्री अवधूत महाराजांच्या चरित्र विषयक अमोलिक आठवणी जमा करून त्या लेखकाच्या हवाली केल्या या आठवणींच्या सहाय्यानें आणि श्री. दत्तमहाराज व श्री. मेघःशाम-बुवा आणि त्यांचे निवडक सहृदयभक्त यांचे सहकार्यामुळेंच लेखकाला परिश्रमपूर्वक हा आठवणींचा व चरित्राचा संभार पेलता आला; आणि शक्य त्या कसोशीनें त्याचा चरित्राकरितां योग्य तो उपयोग करण्याची संधि लेखकाला या सर्वांनीं दिली, तीबद्दल लेखक या सर्वांचाच आभारी आहे.

## वाचकांनीं क्षमा करावी

आतां चरित्र–वाचकांचीं क्षमा मागणे उचित कां आहे याचा खुलासा होणें आवश्यक आहे.

आठवणी लिहिणाऱ्या सज्जन भक्तांनीं, त्या जमा करणारे श्री. मेघःशामबुवा यांनीं आणि त्यांची प्रेरणा करणारे श्री. दत्तमहाराज या सर्वांनीं चरित्र–ग्रंथांतील मजकूर अत्यंत संयम राखून पण खरेपणाला मान देऊन लेखकानें लिहिला आहे. असें करतांना कोणाहि वाचकांची मतें दुखावली जाऊ नयेत, या विषयीं वर उल्लेख केलेल्या प्रत्येकानें शक्य ती काळजी आणि खबरदारीहि घेतली आहे !

वस्तुस्थिति सदरील प्रमाणें असली तरी सदरील चरित्र-लिखाणांतील तपशील वाचतांना कांहीं वाचकांना न पटण्याचाहि संभव आहे !

(१) उदाहरणार्थ कांहीं प्रसंगाचा उल्लेख करण्यासारखा आहे. अवधूत महाराजांच्या वडिलांच्या वडिलापार्जित जमिनी आणि नोकरीचा पेशा, यांची

दुर्दैवानें ' विषम वाटणी झाली ' हा प्रसंग प्रत्यक्ष पहाणारांनीं सांगितला असला तरी त्या वाटणीशी संबंध आलेल्यांच्या वंशजांना तो सर्वस्वी मान्य होऊन पसंत पडेलच असें नाहीं!

(२) तसेच 'श्री. दत्तमहाराजांचा दिवेकर घराण्यांतील वधूशी विवाह संबंध घडून आला तो कांहीं मातब्बर दिवेकर बंधूंना आवडला नाहीं, " हें सत्यही दिवेकर बंधूंच्या संबंधितांना आवडेलच, असें नाहीं! पण सत्यघटनेची खात्री करून घेतल्यानंतर तिचा उल्लेख करणें हे लेखकांच्या प्रामाणिक वृत्तीलाहि उचितच होय.

(३) कांही विरोधी भक्तांचाहि उल्लेख आठवणींत आला आहे. आठवणी लिहिणारांनीं त्यांच्याविषयी 'कटूपण सत्य' अशा घटनांचाहि तपशील दिला आहे. पण असे करतांना विरोधकांनाहि अन्याय न व्हावा अशी काळजी घेतली आहे. उदाहरणार्थ श्री. बंडू लोहार, व श्री. फकीरा गणपत दुणाखे तथा ' सुखानंदबुवा नांदेडकर ' या विरोधी भक्तांच्या आठवणींचा योग्य तो गौरव करून आणि त्यांतील कांहीं विपर्यस्त विधाने सत्य घटनेला मिळती जुळती अशी दुरूस्त करून या विरोधी भक्तांना ते दुरुस्त लिखाण दाखवून त्यांची संमति मिळविल्यानंतरच योग्य गौरवपूर्वक त्यांच्या आठवणीहि छापण्यात आल्या आहेत.

इतका तपशील सर्वच वाचकांची क्षमा मागण्यासाठीं पुरेसा आहे, असें सर्व संबंधित सज्जनांच्या संमतीनें नमूद करीत आहों.

× × × ×

## श्री अवधूत महाराजांच्या जीवन–यात्रेची पूर्वता अपूर्वाईचें तेजं व लोकमान्यता

१९३६ च्या गाणगापूरच्या तीव्र तपश्चेच्या यात्रेनंतरच श्री अवधूत महाराजांना रक्तदाबाचा विकार जडला, नंतर सतत तीन वर्षे ते आप्तेष्टांच्या व आस्थेवाईक भक्तांच्या संरक्षणाखालीं बाळेकुंद्री कोल्हापूर–कुरुंदवाड वगैरे ठिकाणीं यात्रा करून आले. आपल्या आवडत्या भक्ताना आपल्या सद्गुरु-स्थानाची ओळख पटवावी आणि त्यांना सद्गुरूच्या अवधूत मार्गांतील सद्भक्त करावे. अशी अवधूत महाराजांना अखेरपर्यंत तळमळ होती. १९३८ सालीं दिवाळीत श्री अवधूत महाराज मुंबईस आले त्यावेळीं आपल्या खालावलेल्या शरीरप्रकृतीच्या जाणीवेनें ते म्हणाले—

"हीच आमची बाळेकुंद्रीची अखेरची यात्रा !" महाराज शरीरानें अगदीं परतंत्र झाले नसले तरी आपण आरंभिलेल्या सत्कार्याचा शेवट नजीक आला असें त्यांच्या दूरदृष्टीला दिसून आले असावे ! आतांपर्यंत मुंबई व पुणे मध्यप्रदेश ग्वाल्हेर, इंदूर आणि खानदेशांतील अनेक भक्तांना आपल्या बरोबर नेऊन बाळे-कुंद्रीतील पत महाराजांच्या अवधूत मार्गाचा महिमा वाढविण्याची कष्टपूर्वक आणि त्यागपूर्वक दक्षतः घेतली असल्यामुळें, अवधूतमहाराजांच्या वरील उद्‌गारां-तील आवेग सहृदय भक्तांच्या लक्षांत येण्यासारखा आहे.

## निजस्थितीची तेजस्वी जागृति ।

१९३८ सालीं दिवाळींत वरील उद्‌गार काढल्यानंतर आपल्या स्वानंदवासा विषयीं श्री अवधूत महाराजांनीं पूर्ण तेजस्वी जागृति राखली असें दिसून येतें. खाणें पिणें स्नान व विश्रांति याचीं काळजी व ठीक व्यवस्था श्री दत्तमहाराज व श्री. मेघःश्याम यांनीं सौ. कमला मातुश्री व श्री. अण्णांच्या धर्मपत्नी सौ. माई श्री श्रीपादकाका आणि निकटभक्त श्री परशराम वाणी आदि भक्त यांच्या सहकार्यानें राखली असल्यामुळें त्याची काळजी श्री अवधूत महाराजांनीं कधींच केली नाहीं ! पंत महाराजासारख्या सद्‌गुरूचे शिकवणींतील निजानंद–आत्मानंदाच्या स्थितीत महाराज सतत जागृत रहात असल्यामुळे त्यांच्या मुखावरील तेज सर्वांना थक्क करून त्यांच्या पुढें नमावयास लावी !

श्री. अवधूत महाराजांनीं सतत निजानंदाची जी जागृति सदैव तेजस्वी स्थितीत राखली होती तीवर त्यांच्या स्वानंदवासाचे प्रसंगींच्या हालचालीमुळें स्पष्ट प्रकाश पडतो.

स्वानंदवासाचा प्रसंग त्यांनी जुळवून आणला व त्याची आगाऊ कल्पना कोणाहि निकटवर्ती स्वकीयाना दिली नाहीं. हे लक्षांत घेण्यासारखें आहे. आतां पर्यंतच्या स्वानुभवावरून महाराजांचे लक्षांत आले असावें कीं आपण इहलोक सोडून—स्वानंदवास पत्करतांना आपल्याविषयीं जिव्हाळा वाटणारे सर्व निकटवर्ती स्वकीय अत्यंत दुःखी होऊन आपल्यादेहाला वांचविण्यासाठीं पराकाष्ठेची धांवपळ करतील व त्यामुळें ते स्वतःकष्टी झाडेले पाहून शरीराचे पिंजऱ्यांत सांपडलेला आपला जीवात्माहि विचलित व कष्टीं होईल !

सदरील हृदय हालविणारा प्रसंग टाळण्यासाठीं श्री. अवधूत महाराजांनीं काय साधलें तेहि लक्षांत घेण्यासारखें आहे. आपल्या ज्येष्ठ सुपुत्रासह तीन्हीहि सुपुत्र मठीत गैरहजर असण्याचा १९३९ चा चैत्र पाडवा हा दिवस होता ! निकटवर्ती

जी स्वकीय माणसें होती त्यांना ऐनवेळीं विलक्षण धांवपळ करण्याची संधीच त्यांनी दिली नाहीं!

१९३९ च्या चैत्र पाडव्या दिवशीं सकाळपासून श्री अवधूत महाराजांची हालचाल विलक्षण उत्साही होती! नित्य प्रातर्विधी उत्साहांत आटपल्यानंतर "या चैत्र पाडव्याला पालखी काढावयाची" अशी सूचना त्यांनी सर्व संबंधित निकटवर्ती भक्तांना दिली!

या पाडव्या दिवशीं अवधूत महाराज अतिशय उत्साहांत असलेले सर्व आप्तेष्टांना व भक्तांना दिसले. त्यांच्या हालचालींत इतकी तडफ व आनंदोत्साह अलीकडे कित्येक वर्षांत या सर्वांनी पाहिला नव्हता असें सांगतात!

महाराजांच्या सूचनेप्रमाणें भक्तांनीं प्रदक्षिणेची पालखी सजवून तयार केल्या-नंतर पंत–भजन–मंदिरांतील–झोपाळा खालील कीर्तन–भजन–मंदिरांत आणून टांगण्यास महाराजांनीं सांगितलें. यापूर्वीं पाडव्या दिवशीं पालखी काढण्याचा प्रघात नसल्यामुळें हा नवीन उत्साह पाहून सर्व आप्तेष्ट व निकटवर्ती भक्त आश्चर्य-चकितच झाले!

१९३९ च्या चैत्र पाडव्या दिवशीं महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. अण्णा श्री. मेघःशामबुवा यांचेसह रामनवमीच्या उत्सवासाठी श्री अवधूत महा-राजांच्या आज्ञेवरून आणि तुर्भ्याचे श्री. त्रिभुवनशेट यांच्या आग्रहावरून चेंबूर नजीक तुर्भ्याकडे गेले होते. (चेंबूर हें मुंबईचे एक उपनगर आहे) श्री. पांडुरंग मोरेश्वर उर्फ ताल्या हें दुसऱ्या नंबरचे सुपुत्र मुंबईंत वरिष्ठ पोलीस–खात्यांत असून यांना रजा मिळणें अवघड होते. तिसरे सुपुत्र श्री. अनंत मोरेश्वर हे मुंबईच्या एका प्रसिद्ध गिरणीत असिस्टंट वीव्हिंग मास्तर या हुद्यावर असून त्यांनाहि रजा मिळणे अवघडच होतें.

सायंकाळीं प्रदक्षिणेची पालखी सजल्यावर महाराजांनीं उत्साहपूर्वक प्रदक्षिणेंत भाग घेतला आणि पालखीपुढें स्वतःहि एक भजनीपद म्हटलें! जमलेले सर्वजण आश्चर्याने पहातच राहिलें! गेल्या वर्षांत पाहिला नाहीं! असा विलक्षण उत्साह श्री अवधूत महाराजांच्या या प्रसंगीच्या हालचालींत दिसत होता आणि तोंडावरहि विलक्षण तेज होतें, असें त्या प्रसंगीं हजर असलेले सर्व भक्त सांगतात!

## पालखीपुढें पद म्हटल्यानंतर शेवटचा स्वहस्तें प्रसाद!

तळमजल्यावरील भजन-कीर्तन-मंदिरांतील श्री दत्तप्रभूंपुढें टांगलेल्या झोपाळ्यावर महाराज येऊन बसले आणि "सर्व भक्तांनीं स्वतःच्या हातांनीं

आपण दिलेला प्रसादघेऊन जाण्याची " इच्छा त्यांनीं सर्वांना कळविण्यास सूचना दिली. याप्रमाणें पालखीचा कार्यक्रम आटोपल्यावर सर्व भक्तांना मोठ्या प्रेमाने महाराजांनी स्वतः प्रसाद वाटला. 'हा माझ्या हस्तें अखेरचा प्रसाद' असेंहि मधून मधून ते बोलत होते असें म्हणतात!

प्रसाद वाटून झाल्यावर श्री अवधूत महाराजांनीं आवडते निजभक्त श्री श्रीपादराव पराडकर (काका) यांना बोलाविलें आणि म्हणाले, "आज श्री. दत्तप्रभूची शेजारती करूं नका' असें आवडते निजभक्त सर्वांचे नंतर प्रसाद घेण्यास आले तेव्हां महाराज म्हणाले—

### गोड प्रसाद गोड आशीर्वाद!

" श्रीपाद या ठिकाणीं कोणत्याहि भावनेचा भक्त असो, अथवा अभक्त असो, येणाऱ्या सर्वांना गोड प्रसाद देऊन त्यांचीं तोंडें गोड कर. तुला प्रसादाची जरूरीच नाहीं. तू मूळचाच गोड आहेस असाच गोड रहा, हा माझा तुला शेंवटचा आशीर्वाद. तरीपण हा प्रसाद घे म्हणजे तुझे अंतरीं अधिकच गोडी निर्माण होईल!" असें म्हणून महाराजांनी श्री. श्रीपादरावांना प्रसाद दिला.

चैत्र पाडव्याचे अगोदर चार दिवस श्री. अवधूत महाराज आपले आवडते निजभक्त श्रीपादकाका यांना म्हणाले " तू मठीतून कोठें दूर जाऊं नकोस. तू येथून जें कांहीं साध्य केलेस ते इतरांचे हातून घडलें नाहीं, तुझी सर्व कांहीं जबाबदारी श्री अवधूतावर आहे. त्याला अखंड स्मरत जा."

वर उल्लेख केल्याप्रमाणें श्रीपादरावांना आठवण देऊन श्रीअवधूत महाराजांनीं त्यांना प्रसाद दिला. श्रीपादकाकांनीं महाराजांना प्रणाम केला आणि महाराजांच्या झोपण्याचे खोलींत पलंगावर गादी टाकून ते स्वयंपाकघरांत आवर सावर करण्यास गेले.

११॥ चे सुमारास अवधूत महाराज दत्तमंदिराचे सोप्यावरून येऊन आपल्या शेजघरांत जाऊन पलंगावर आडवे झाले.

श्री पादकाका आपल्या अंथरुणावर जाऊन आडवे होतात तोंच मातुश्री सौ. कमलामाईंनी यांना घाबऱ्या घाबऱ्या हांक मारली! महाराज पलंगावर होते व त्यांना घोर लागल्यासारखा आवाज येत होता. श्री पादकाकांनीं त्यांना सावध करण्याचा प्रयत्न केला. पण उपयोग झाला नाहीं. मग त्यांनीं सौ. माईंना (श्री. अण्यांच्या सद्धर्म चारिणीला) हा प्रकार सांगून त्याहि महाराजांच्या जवळ

आल्या. महाराजांना गरम पाण्याच्या पिशवीनें शेकण्याचा प्रयत्न केला; पण कांहींहि उपयोग झाला नाहीं! मग भिमजीला डॉक्टरना बोलावण्यास पाठविलें डॉक्टरनी तपासल्यावर "सर्व आटोपल्याचें" 'बाहेर येऊन कष्टी आवाजांत सांगितलें! श्री अवधूत महाराज थोड्या वेळानें डोळे उघडून सावध झाले पण इकडे तिकडे पाहून श्रीपादकाकांच्या मांडीवर डोकें ठेवून अगदी शांत झाले! त्यांची हालचाल संपली! सर्वांना काय वाटलें याचें वर्णन 'शब्दांनीं करवतच नाहीं" असें निजभक्त श्रीपाद पराडकर लिहितात!

× × ×

श्री अवधूत महाराजांचे आवडते भक्त आपल्या आठवणीचे अखेरीस लिहितात—

"एकंदरीत गुरुप्रेम ही तेजस्वी घटना आहे अरण्यांत वा रानावनांत न जातां 'ठायींच बैसोनि' परमार्थ कसा साधता येतो, हें थोर तत्त्व श्री सद्गुरु अवधूत महाराजांनी स्वतः आचरून दाखविलें! त्याचा कित्ता कोणत्याहिं अवघड परिस्थितीशीं धैर्यशौर्यानें झगडत श्रीदत्तमहाराजहि सोदाहरणानें आचरणांत आणीत असलेलें पाहून, भक्तांना धन्यता वाटून सर्व-जण श्री अण्णानाहि धन्यवाद देत आहेत."

## निजभक्त श्रीपादराव पराडकर याचा जीवनांतील स्वधर्म

आपल्या आठवणीचे अखेर श्री. अवधूत महाराजांचे आवडते निजभक्त श्रीपादराव म्हणतात :—

"श्री अवधूत महाराजांचे पश्चात् श्री. दत्तमहाराज व सौ. माई यांनीं माझ्या विषयीं परकीपणा बिलकुल ठेविला नाहीं. आतां पर्यंतच्या सर्व भक्तांना याचा प्रत्यक्ष अनुभव येत आहे. श्री. दत्तमठीच्या या चालकांची सर्व मुलें देखील आपल्या वडील मातुश्रीचे अनुकरण करून मला 'काका' या खऱ्या आपुलकीच्या भावनेनें वागवितात. श्री. दत्तमठीच्या अधिष्ठाना विषयीं सर्वांच्याच अंतःकरणांत अपार आपुलकी प्रचीतीस येते"! शेवटीं श्रीपादराव लिहितात :—

"श्री. सद्गुरु मोरेश्वर महाराजांनीं माझ्या सारख्या सामान्य मूढ भक्ताला आपुलकीनें जवळ करून आशीर्वाद दिला. त्यांच्या चरणीं मी पडलो, त्यांच्या आशीर्वादानेंच जन्माचें सार्थक्य झालें. त्यांच्या मजवरील उपकारांना सीमाच

नाहीं ! लीन होऊन चरणीं पडून सेवा करतां करतां भक्ति प्रेमामृत पीत रहावें हाच माझा उर्वरित जीवनांतील स्वधर्म झाला आहे !"

## अपूर्व गर्दीची अंत्ययात्रा

भडगावांत पहाटे २–३ चे दरम्यान ही भक्तांना अत्यंत दुःखाचे धक्के देणारी बातमी वणव्या प्रमाणें सर्वत्र पसरली. भक्तांच्या झुंडीच्या झुंडी मठीकडे लोटूं लागल्या. महाराजांच्या देहाचें अंत्यदर्शन घेण्यास उत्सुक असलेल्या भक्तांना आवरून धरण्यासाठीं मठींतील भक्तांना स्वयंसेवकांची व्यवस्था करावी लागली. दादा सहस्रबुद्धे यांनीं श्री. अण्णासह तीन्ही मुलांना व निकटवर्ती आप्तेष्टांना अंत्यदर्शनासाठीं तारा करून बोलाविलें. तरीहि चेंबूर मुंबै येथून भडगांवी येऊन पोचण्यास ज्येष्ठ सुपुत्र अण्णा व तिसरे सुपुत्र अनंतराव यांना अंदाजे ३६ तास लागले ! दोन नंबरचे सुपुत्र श्री. पांडुरंग मोरेश्वर उर्फ तात्या यांना वरिष्ठ पोलिस खात्याकडून तावडतोब रजा मिळूं शकली नाहीं. पण श्री. अण्णा भडगांवीं आल्यावर दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं स्वानंदवासी अवधूत महाराजांच्या देहावशेषाची अंत्ययात्रा काढण्यांत आली. खुर्चीवर बसविण्यांत आलेला श्री अवधूत महाराजांचा देह आणि चेहरा यांवरून तेजाचें वलय पसरलें होतें. तें पाहून हजारों भक्त आश्चर्य व्यक्त करीत होते. भडगांवांत सर्व दुकानदारांनीं स्वयंस्फूर्त हरताळ पाळला ! मुसलमान बोहरी देखील या हरताळांत हिरीरीनें सामील झाले. चंदनाची लांकडे भरलेल्या गाड्या महाराजांच्या और्ध्वदेहिकासाठीं वापरण्यास देण्याची भीड त्या चंदनावर मालकी सांगणाऱ्या बोहऱ्याला त्याच्या भाईबंदांनीं घातली. सर्व चंदन महाराजांच्या देहाला अग्नी देण्यासाठीं वापरण्यांत आलें ! सर्व दुकानदारांनीं पाठविलेल्या सुवासिक उदबत्त्या व कापूर यांचे गिरणानदीच्या कांठीं ढीग पडले ! गिरणानदी कांठीं महादेवाचें मंदिरानजीक श्री अवधूत महाराजांना अग्नी देऊन तेथें स्मारक–स्तंभ बांधण्याची परवानगी खास सचिवालयाकडून तारेनें मिळविण्यांत एका अधिकारी भक्तानें यश मिळविलें !

मुंबईस कै. लोकमान्य टिळकांच्या देहावशेषाला चौपाटीवर अग्नी देण्याचा खास परवाना जसा मिळाला आणि चौपाटीवर लो. टिळकांचा स्मारक स्तंभ व पुतळा झाला तोच प्रकार भडगांवास स्वानंदवासी श्री अवधूत महाराजांच्या देहावशेषाविषयीं झाला ! " लोकमान्य टिळकांच्या अंत्ययात्रेला जशी लोकांची अफाट गर्दी पाहिली तशीच गांवोगावच्या लोकांची गर्दी भडगांवांतील स्वानंदवासी अवधूत महाराजांच्या अंत्ययात्रेसाठीं जमली

होती." असें वर्णन अनेक भक्तांनी आपापल्या आठवणींत केलें आहे. या अंत्ययात्रेला हजर असलेल्या भक्तांच्या आठवणी त्यांच्या लिखाणांतूनच वाचकांनीं वाचाव्या अशी वाचकांना स्थलाभावीं 'शिफारस करणें' प्राप्त आहे !

श्री अवधूत महाराजांच्या या स्वानंदवास–प्रसंगाविषयीं एक विशेष नमूद करण्यासारखा आहे.

"या आपल्यावर अत्यंत प्रेम करणाऱ्या तीन्ही मुलांपैकीं एक जरी जवळ असला तरी, तो ऐहिक देहाचा बचाव करण्यासाठीं डॉक्टरी औषधें इंजेक्शन्स वगैरे अनेक खटपटींची धडपड करून स्वतःला आणि जवळच्या सर्व निकटर्ती आप्तेष्टांना स्वतःसह अत्यंत दुःखात लोटील आणि स्वानंदवास पत्करूं पहाणाऱ्या आपल्याहि आत्म्याचा कोंडमारा होईल" असें श्री अवधूत महाराजांना वाटलें असावें काय ? म्हणूनच तीन्हीहि सुपुत्र जवळ नसावे, असा योग श्री अवधूत महाराजांनीं जमवून आणला म्हणा, किंवा त्यांच्या तपश्चर्येमुळें त्यांना हा योग लाभला म्हणा ! जवळ असलेले निजभक्त, श्री. श्रीपादकाका पराडकर, सौ. कमला मातुश्री व सौ. माई यांनीं डॉक्टरना तावडतोब बोलाविलें; पण डॉक्टर येण्यापूर्वींच श्री अवधूत महाराजांचा आत्मा, देह सोडून स्वानंदवासी झाला होता ! एकंदरींत आत्मानंदाची निजस्थिति अखेर पर्यंत जागृत राहून श्री. अवधूत महाराजांच्या आत्म्यानें साधली आणि 'अखेर जिंकली' असें दिसून आलें ! १९३६ च्या आत्मतृप्तीच्या खडतर तदश्चर्यें नंतर १९३९ च्या पाडव्या पर्यंतचे रात्रीं पर्यंत श्री. अवधूत महाराजांनी ही आत्मानंदाची तेजस्वी स्थिती जागृत ठेवण्याची शर्थ करून तीवर अखेरच्या स्वानंदवासाचा कळस चढविला, असें सर्व तपशिलावरून दिसून आलें !

धन्य या साधूचें तप । व धन्य त्यांचा स्वानंदवास

* * *

## अ व धू त या चार अक्षरांची आध्यात्मिक थोरवी

## श्री अवधूत महाराजांची अवधूतवृत्तीची थोर तपश्चर्या !

अत्यंत भगवद्भक्त, वेदवर्णार्थ जाणणारे, आणि वेदान्तवादी, या सर्वांनीं श्री दत्तकृत अवधूत गीतेंतील अवधूत लक्षणें ठीक समजून घ्यावीं, असें श्रीदत्त–

अवधूत गीतेंतील स्वामी कार्तिक संवादांतील ' स्वात्म संवित्युपदेशांतील ' आठव्या अध्यायांत म्हटलें आहे.

' अष्टाध्यायी श्री अवधूत गीतेंतील श्लोकांत वर उल्लेख केलेली सूचना अवधूत मार्गाची तपश्चर्या करणाऱ्या भक्तांना केल्यानंतर :—

' अ '

सहाव्या श्लोकांत ' अवधूत ' या चार अक्षरांपैकीं ' अ ' या अक्षराचें लक्षण पुढीलप्रमाणें सांगितलें आहे :—

आशा पाश विनिमुक्तः । आदि मध्यान्त निर्मलः ॥
आनन्दे वर्तते नित्यम्, । ' अ ' कारम् तस्य लक्षणम् ॥ ६ ॥

याचा अर्थ सोपा व स्पष्ट आहे :—

सांसारिक आशा-पाशांपासून मुक्त झालेला, प्रारंभ मध्य व शेवट या स्थितींत निर्मळ असणारा, नित्य आनंदांत ( आत्मानंदांत ) राहणारा ( रंगलेला ! ) हें ' अवधूत ' च्या ' अ ' काराचें लक्षण होय.

—:x:—

' व '

सातव्या श्लोकांत ' व ' अक्षराचे लक्षण :—

वासना वर्जिता येन, । वक्तव्यंच निरामयम् ।
वर्तमानेषु वर्तेत ' व ' कारम् तस्य लक्षणम् ॥ ६ ॥

याचाहि अर्थ सोपा व स्पष्ट आहे :—

ज्यानें सर्व वासना सोडली आहे, ज्याच्या भाषेला रोगटपणाचा वासहि नाहीं, जो सदा वर्तमानकाळांत ( वर्तमान काळाचें स्वरुप ओळखून ) वागतो, हेंच ' अवधूत 'च्या ' व ' काराचें लक्षण होय.

—:x:—

' धू '

आठव्या श्लोकांत ' धू ' ' अक्षराचे ' लक्षण :—

धूलिधूसर गात्राणि, । धूतचित्तो निरामयः
धारणाध्यान निर्मुक्तो । ' धू ' कारः तस्य लक्षणम् ॥ ८ ॥

याचा अर्थहि स्पष्टच आहे :—ज्याचीं गात्रें (कर्मेंद्रियें-ज्ञानेंद्रियें) धूलिधूसर (त्यागाच्या राखेनें विभूषित झालेलीं), ज्याचे अंतःकरण मलिन-विषयांपासून अलिप्त, धुतलेलें आणि जो सदैव भव–रोगांपासून मुक्त या स्वरूपांत 'निरोगी आहे. हेंच अवधूत मधील 'धू' कारांचें लक्षण होय.

—:०:—

'त'

नवव्या श्लोकांत 'त' अक्षराचें लक्षण

तत्त्वचिंता धृता येन । चिंता च्येष्टा विवर्जिता ॥
तमोऽहंकार निर्मुक्तः । 'त' कारः रत्तस्य लक्षणम् ॥ ९ ॥

याचा स्पष्टार्थ पुढील प्रमाणें—

ज्याला फक्त आत्मज्ञान-तत्त्वाचीच 'चिंता' आहे; संसाराची सर्व चिंता व चेष्टा ज्यानें सोडून दिली आहे, जो अज्ञानाच्या अंधारामधून (तमोऽहंकार निर्मुक्त) बाहेर पडला आहे. हेंच अवधूत मधील 'त' काराचें लक्षण होय.

\+ + + +

'अवधूत' या अक्षरांचीं वरील लक्षणें १९३६–३९ सालांत श्री अवधूत महाराजांचे अखेरच्या जीवनात किती मुरलेली दिसत होती आणि त्यामुळें त्यांच्या देहावर आणि चेहऱ्यावर किती तेज दिसत होतें, त्यांचे तपशीलवार वर्णन आठवणी १ व २ भागामधील आठवणींतून अनेकांनीं केले आहे, ते वाचण्यासारखें आहे.

थोडक्यांत लिहावयाचें तर श्री अवधूत महाराजांचें अखेरचें जीवन म्हणजे अवधूत मार्गानें जीवन जगणाऱ्याचें तेजस्वी प्रात्यक्षिकच होतें. यामुळेंच श्री अवधूत महाराजांचा अखेर अभूतपूर्व जयजयकार झाला!

॥ ॐ नमः शिवाय ॥

—×—

## श्री अवधूत मार्गाचे प्रचारावर कळस हीच चरित्राची पुरवणी

## श्री दत्तमहाराजांकडून घडलेली थोर तपाची पूर्तता व सांगता!

खुद्द भडगांवास म्हणजे श्री अवधुत महाराजांनी स्थापन केलेल्या श्रीदत्त मठीतच त्यानीं, चातुर्मास कीर्तनें करून श्री अवधूत सांप्रदायाचीं तेथील भक्-

श्रोत्यांना ओळख करून द्यावी आणि अखेर **अन्नकोट व अन्नदान** या श्री अवधूत महाराजांना प्रिय अशा सत्कार्यांनें या चातुर्मास-तपाची सांगता करावी, असा सत्संकल्प श्री दत्त महाराज यांच्या हृदयांत १९५०–५२ पासून सतत बारा वर्षे स्फुरत होता. (साहजिकच हा सत्संकल्प श्री अवधूत महाराजांच्या पावन-तपश्चर्येतून निर्माण झाला असणें स्वाभाविकच आहे.)

श्री दत्तमहाराजांच्या हृदयांत सतत एक तपावर जागृत राहणारा हा सत् संकल्प पूर्ततेला पोचण्याचा योग १९६४ सालच्या चातुर्मासांत आला. रविवार दि. १९-७-६४ (आषाढ शुद्ध दशमी) शके १८८६ रोजीं चातुर्मासाकरितां भडगांवांत श्रीदत्त महाराजांचीं कीर्तनें सुरूं झाली आणि या चातुर्मासांतील कीर्तनांची समाप्ती दि. १७–११–६४ रोजीं झाली. कीर्तनें रात्रीं ८॥–९ चे सुमारास सुरूं होत आणि ११॥ १२ चे सुमारास पुरी होत. भडगांवांतील ३००–४०० वर आबालवृद्ध स्त्रीपुरुष भक्त या कीर्तनांत रंगून जात आणि मठींतील आवार कीर्तनप्रेमी श्रोतृवर्गांनीं भरगच्च भरून जाई !

या कीर्तनांत श्री. दत्तमहाराजांनीं श्री अवधूत महाराजांचें चरित्र क्रमवार सांगून स्वोदाहरणानें श्री अवधूत महाराजांनीं प्रचार केलेल्या अवधूत मार्गाची परंपरा निवेदून त्यांच्या, अभंग ५२ मात्रिकाची लावणी इत्यादि पद्य वाङ्मयांचें हृदयंगम स्पष्टीकरण केलें; त्यांत आबालवृद्ध श्रोतेहि रंगत होते.

× × × ×

चरित्रासाठीं आलेल्या भक्तांच्या आठवणी छापण्याजोग्या स्वरूपांत लिहून काढण्यासाठीं श्री. अवधूत महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज व श्री. मेघःश्यामबुवा यांनीं मुंबई सोडून चातुर्मासांत भडगांवास येण्याची प्रस्तुत लेखकावर सक्ति केली ! यामुळें १९६४ च्या या चातुर्मासांतील कीर्तनें, दर गुरुवारीं गांवांतून होणारी भिक्षेची फेरी आणि चातुर्मासाच्या पूर्तीचा अन्नकोटाचा सोहाळा समारंभ, त्याचप्रमाणे भडगांवांतील जातिधर्मनिरपेक्ष पद्धतीनें—तीन हजारांवर कुटुंबांना अन्नकोटाचा प्रसाद पुरविण्याचा

खटाटोप या सर्व हालचाली प्रत्यक्ष पाहण्याची संधि प्रस्तुत लेखकाला लाभली!

वर उल्लेख केलेली कीर्तनें ऐकून आणि सर्व हालचाली प्रत्यक्ष पाहून या सर्वांचा मिळून होणारा परिणाम लेखकाच्या मनावर असा झाला कीं या चातुर्मास–तपाची हकीगत या चरित्रांत येणे आवश्यक आहे. त्या वांचून श्री अवधूत महाराजांच्या अवधूत मार्गाच्या चरित्राची सांगता होण्यासारखी नाहीं. हा मजकूर चरित्रांतून वगळल्यास चरित्र अपुरेंच राहील! लेखका-प्रमाणे या चातुर्मासाच्या कीर्तनांत ज्या भक्तांनीं नियमित भाग घेतला आणि जे अन्नकोटाच्या सोहाळ्यांस सहभागी झाले, त्या सर्वांचा, लेखकाच्या या मताला हार्दिक दुजोरा मिळाला. महाराजांचे सुपुत्र श्री. पांडुरंग मोरेश्वर आणि श्री. अनंत मोरेश्वर या दोघांनींहि चरित्रांत हा मजकूर घालण्याला हार्दिक संमति दिली म्हणून हें प्रकरण श्री अवधूत महाराजांच्या चरित्राचे शेंवटीं पुरवणी म्हणून प्रकाशित होत आहे. 'आत्मस्तुति नको' या श्री दत्तमहाराजांचा विरोधहि या सर्वांच्या रास्त आग्रही मतांत लुप्त होऊन गेला आहे!!

वास्तविक चातुर्मासाचीं कीर्तनें व ११२ वर खाद्यपदार्थांचा अन्नकोट आणि तीन हजारांवर गांवकरांना बरोबर अन्नकोटांतील अन्नाचें प्रसादवाटप, हें श्री अवधूत महाराजांच्या अवधूत मार्गाच्या तपश्चर्येनें व पुण्याईनें श्री दत्तमहा-राजांच्या हातून घडलेलें थोर सत्कार्य होय. हें सत्कार्य घडण्यास श्री. दत्त-महाराज केवळ निमित्तमात्र झाले! 'या सत्कार्याचें वर्णन प्रकाशित झालें तर ती आत्मस्तुति होते' असें श्री. दत्तमहाराजांना अतिरंजित विनयामुळें वाटलें असावें! पण ती आत्मस्तुति नसून श्री. अवधूत महाराजांनीं स्वतः आचरून दाखवि-लेल्या अवधूत मार्गाच्या तपश्चर्येची प्रचिति आहे आणि तिच्या सांगतेची फलश्रुति आहे. या फलश्रुतीचा मोठा गोड उल्लेख श्रीमान् बाबुलाल रामकृष्ण झिपरू शेट वाणी यांनीं आपल्या आठवणीचे अखेरीस ( भाग १ पान ८२ ) केला आहे! तसाच कै. गंगूबाई गोडबोले यांनीहि आपल्या आठवणींत (भाग १ पान १५४) आठवणीचे अखेरीस मोठ्या कृतज्ञतेच्या भावनेनें केला आहे. या दोन्हीहि आठवणी लिहिणारे चातुर्मासांतील कीर्तनांना अन्नकोट सोहळ्याला सतत हजर होते. अर्थात् त्यांचा हा फलश्रुतीचा अभिप्राय प्रत्यक्ष अनुभवानंतर त्यांच्या हृदयांतून स्वयंस्फूर्तीनें बाहेर पडला आहे.

या चातुर्मास कीर्तनांना व अन्नकोट सोहाळ्याला अखंड हजर रहाणारे सद्भक्त महादेव बुवाजी महाजन, श्री परशुरामशेट

वाणी, रामदास गुरव श्री. सोनूदादा तिवारी श्री. बाबुलालशेट वाणी, श्री. राजाराम नारायण देशमुख इत्यादींनीं सदरील अभिप्रायाला हार्दिक दुजोरा दिल्याचें प्रस्तुत लेखकानें प्रत्यक्ष पाहिलें व ऐकलें आहे. सर्वांचें निरपवाद मत असें आहे कीं हा मजकूर श्री अवधूत महाराजांच्या चरित्रांत आलाच पाहिजे. चरित्रांची पूर्तता हा मजकूर वगळल्यास अपुरी ठरेल!

आतां या मजकुराची व वर्णनाची द्विरुक्ति न करतां आणि जागेच्या मर्यादेचें उल्लंघन न करतां या सर्व भक्तांच्या आठवणी वाचण्याची फिरून शिफारस करून आणि अखेरचें आभार मानून हें पुरवणी वजा 'गोड प्रकरण' आटोपतें घेतों.

॥ ॐ नमःशिवाय ॥





श्री. अवधूत महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र

**ह. भ. प. दत्तात्रय मोरेश्वर दातार**



## श्री अवधूत महाराजांची कुटुंबीय मंडळी

**खालीं बसलेले :—**श्रीपाद काका पराडकर   श्री. मेघःशामबुवा संकपाल

**मध्यें बसलेल्या रांगेंत :—**महाराजांच्या एकमेव कन्या सौ. अन्नपूर्णाबाई दत्तात्रय देवधर, अवधूत महाराजांचे जावई श्री. द. कृ. देवधर रिटायर्ड इलेक्ट्रिक इंजिनियर (टाटा कंपनी), अवधूत महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. ह. भ. प. द. मो. दातार; श्री. द. मो. दातार यांच्या सहधर्मचारिणी सौ. आनंदीबाई दातार.

**वर उभे असलेले तिसरी रांग :-**सौ. प्रमिला अनंत दातार, श्री. अनंत मोरेश्वर दातार, वीव्हिंग मास्तर मधुसूदन मिल्स; श्री. पांडुरंग मोरेश्वर दातार असिस्टंट कमिशनर ऑफ पोलीस व त्यांच्या पत्नी सौ. सुधा पांडुरंग दातार. महाराजांची लाडकी भाची सौ. शांता काशिनाथ ताम्हनकर; महाराजांचे भाचे जावई श्री. का. म. ताम्हनकर.

# हरिभक्तिपरायण श्री. मोरेश्वर केशव दातार
## तथा
# श्री अवधूतमहाराज कुरुंदवाडकर यांचें
# चरित्र

---

## आप्तेष्टांच्या व भक्तांच्या आठवणी

[ महाराजांचे ज्येष्ठ पुत्र ह. भ. प. दत्तात्रय मोरेश्वर दातार ]

### वेडे वाकुडे गाईन । परि तुझा म्हणवीन ।।

'कीर्तनकार हरिदास' म्हणून जर मला लोकांत थोडी फार मान्यता मिळत असेल तर ती माझ्या थोर वडिलांच्या व आजोबांच्या पुण्याईचें फल म्हणूनच मिळते, अशी माझी श्रद्धा आहे.

### पूर्वजांविषयीं

आमच्या दातार घराण्याचे पूर्वज हरणई मुरूड मुक्कामीं रहाणारे. तेथील नवदुर्गेचें पुजारीपण त्यांचेंकडे असे, कै. अण्णासाहेब किर्लोस्करांच्या काळांत साहित्य, संगीत, कला वगैरे आवडीबद्दल त्यावेळीं सुप्रसिद्ध असलेले कुरुंदवाडचे अधिपति कै. बापूसाहेब कुरुंदवाडकर (थोरली पाती), एकदां त्यांचें जें दैवत पुळ्याचा गणपति, तेथें आले असतां त्यांची व आमच्या पूर्वजांची गांठ पडली. त्यावेळी आपल्या पदरीं विद्वान् वैदिक ब्राह्मण असावे, असा त्यांना छंद असल्यामुळें त्यांनीं आमच्या पूर्वजांकडून कुरुंदवाडास वैदिक शाळा काढविली. गरीब विद्यार्थी मधुकरी मागून दोन प्रहरचा उदरनिर्वाह करितात, पण रात्रीं अशा विद्यार्थ्यांना ताक–पोहे किंवा लाह्यांचें पीठ तरी देतां यावें, म्हणून श्रीमंत बापूसाहेबांनीं आमच्या पूर्वजांना एक जमीन दिली होती. ती बेळगांवनजीक माधवपूर वडगांव येथें आहे. आमच्या घराण्याला कुलस्वामिनी नवदुर्गेची जोड मिळाली. पुढें माझे आजोबा आपल्या वांटणीच्या जमिनींत विहीर खणीत असतां "मी येथें आहें मला काढ." असा दृष्टांत झाल्यामुळें, दृष्टांतांत निर्दशित केलेल्या जागीं, त्यांना नागासह वाळवेच्या श्री. दत्तपादुका लाभल्या; म्हणून आमच्या घरीं श्री दत्तोपासनेलाहि सुरवात झाली.

आमचे वडील मोरेश्वर व आई श्रीमती कमळाबाई, आजे केशव व आजी बयाबाई आणि पणजे नारायण व पणजी रमाबाई. कुरुंदवाडाचे गोपाळभट देवधर यांची बहीण हीच आमची आजी बयाबाई. कुरुंदवाड नजीक गणेशवाडी गांवांतील श्री. बळवंत हरी दिवेकर यांची मुलगी अंबूताई, याच माझ्या मातुश्री कमळाबाई.

## ‘ देव माणूस ’ आजोबा व दारिद्र्यावस्था

कुरुंदवाड संस्थानांत आल्यावरच आमच्या घराण्याची स्थिति सुधारली, पण आमच्या आजोबांच्या पिढीपासून आमच्या कुटुंबियांना दारिद्र्यांत दिवस काढावे लागले. आमचे आजोबा अतिशय भोळे ! ‘ देवमाणूस ’ म्हणाना ! कारण त्यांच्या वेळीं त्यांच्यासह तीन भावांत इस्टेटीचें वाटप झालें, “ मला वांटणीबाबत कांहीं हाव नाहीं, तुम्हीं द्याल त्यांतच मी संतोषानें राहीन ! ” त्यांच्या या भोळेपणाचा गैरफायदा दुसऱ्या दोन भावांनीं घेऊन गांवांतील कामें तसेंच चांगलीं रहातीं घरें व चांगल्या सुपीक जमिनी त्या दोघांनीं घेऊन गांवांतील एक पडकें घर आणि शिरोळ गांवाजवळील चिपरी खेड्यानजीकची एक पडीक जमीन आमच्या आजोबांच्या वांट्याला दिली ! पण आमच्या आजोबांनीं स्वतः मेहनत करून या पडीक जमीनींत दोन विहिरी खोदल्या. एकीला पाणीच लागलें नाहीं, पण दुसरीला पाणी लागलें. याच विहीरी खणीत असतां त्यांना दृष्टांत होऊन श्री. दत्ताच्या वाळूच्या पादुका नागासह सांपडल्या !

पण माझ्या जन्मापर्यंत म्हणजे ९ एप्रिल १९०५ पर्यंत माझे वडील व आजोबा यांना दारिद्र्यावस्थेंतच कसे बसे दिवस कंठावे लागले. आजोबांची प्राप्ती अगदींच तुटपुंजी आणि घरीं मंडळी १४–१५ ! यामुळें संसाराची फार ओढघस्त होई ! तरीहि सत्य, शील आणि शांति–समाधानयुक्त धैर्य, माझ्या आजोबांनीं कधींहि सोडलें नाहीं. आजोबा चिमडपंथ सांप्रदायी व गुरुमार्गी होते.

## दत्तोपासनेचा बालवयापासून छंद

माझ्या वडिलांना बालवयापासूनच श्री दत्तोपासनेचा छंद होता. बरोबरीचीं मुलें जमवून ते दत्तजयंतीचा बालोत्सव करीत. वयाच्या पांचव्या वर्षापासूनच त्यांचा हा छंद सुरू झाला व पुढें वाढत गेला. दत्तोपासनेला पोषक असा आपल्याला कोणी गुरु भेटावा असें त्यांना विद्यार्थीदशेंतच वाटूं लागलें. याच नादानें त्यांनीं इंग्रजी सहावींत असतांच शिक्षण सोडलें. कांहीं नोकरी पत्करून संसाराला हातभार लावण्याची इच्छा आजोबांनीं बोलून दाखविली; पण माझ्या वडिलांनीं तें मनावर न घेतल्यामुळें आजोबा निराश झाले ! इंग्रजी शिक्षण चालू असतांच पूजा, वैश्वदेव, त्रिसुपर्ण, अथर्वशीर्ष, पुरुषसूक्त, विष्णुसहस्रनाम, महिम्नस्तोत्र, रुद्र,

पवमान, अमरकोश वगैरेंचें पाठांतर घरच्या वळणामुळें माझ्या वडिलांचें झालें होतें; पण नोकरी धरण्याचा आग्रह सर्वच वडीलधारी माणसें करूं लागल्यामुळें कंटाळून व उदास होऊन ते मिरज संस्थानचे कै. अप्पासाहेब पटवर्धन यांनीं काढलेल्या नाटक कंपनींत थोड्या उदासीन वृत्तीनेंच दाखल झाले. त्यांचे बालमित्र श्री. रामभाऊ लेले हेहि या कंपनींतच होते. कांहीं भूमिका त्यांनीं उत्कृष्ट वठविल्यामुळें रंगभूमीवर ते लोकप्रिय होऊं लागले, एकदां कुरुंदवाडला श्रीगणपतीचे उत्सवांत वेणीसंहार नाटकांत अश्वत्थामा-कर्ण यांच्या वीररसात्मक संवादांत माझ्या वडिलांनीं कर्णाची भूमिका फारच उत्कृष्ट केल्यामुळें कै. बाळासाहेब कुरुंदवाडकर (थोरली पाती) यांनीं खूष होऊन आपल्या हातांतील सोन्याची सलकडी स्टेजवर बक्षीस म्हणून फेंकल्याची आठवण तें नाटक पाहिलेले त्यावेळचे लोक सांगतात! कंपनीच्या मालकांची यामुळें माझ्या वडिलांवर बहाल मर्जी बसली!

## पंतांची प्रथम भेट

सदरील कंपनींत कांहीं दिवस काढल्यानंतर रामभाऊ व माझे वडील यांनीं कंपनीच्या मालकांकडून कांहीं दिवस रजा काढली व ते कुरुंदवाडास आले. नाटक कंपनींतून घरीं परत आले या मुळें माझे आजोबा व आजी यांना स्वाभाविकच आनंद झाला. थोड्याच दिवसांनीं गुरुद्वादशीच्या उत्सवासाठीं बेळगांवास एका संताच्या भेटीस जाण्याची कल्पना रामभाऊंच्या मनांत आली व त्यांनीं माझ्या वडिलांनाहि स्वतः खर्च करून बेळगांवास नेलें.

सायंकाळीं ५-५॥ चे सुमारास हे दोघेहि श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकर यांच्या निवासस्थानीं पोचले. त्यावेळीं पंतमहाराज बेळगांवच्या मिशन स्कूलमध्यें इंग्रजी चौथीवर शिक्षक होते. ते नुकतेच घरीं परतले होते. त्यावेळीं माझ्या वडिलांना तेथेंच दारांत सोडलें आणि 'थोडे खाजगी काम आटपून परत येतों' असें म्हणून श्री. रामभाऊ लेले बाहेर गेले. शाळेंतून आलेल्या पंतानीं विचारलें, 'तुम्ही कोठून आलांत?' माझ्या वडिलांनीं उत्तर दिलें, "मी व माझे मित्र रामभाऊ लेले असे दोघे येथें पंतमहाराज बाळकुंद्रीकर म्हणून सत्पुरुष रहातात, त्यांच्या भेटीला आलों आहों. पंतमहाराज कोठें भेटतील?" पंत म्हणाले, 'ते बाहेर गेले आहेत. तुम्ही बसा. थोड्या वेळांतच येतील!'

असें म्हणून पंत आंत गेले. बूट स्टॉकिंग, पर्शियन कॉलरचा लॉंग कोट वगैरे पोषाख उतरला. हातपाय धुतले आणि धोतर नेसून उपरणें पांघरून बाहेर मांडलेल्या आसनापाशीं येऊन नमस्कार करून बसले. इतक्यांत बाहेरून एकेक मनुष्य येऊन नमस्कार करून त्यांचे पुढें बसूं लागला. वडील मनांत म्हणाले,

'हेच पंत महाराज दिसतात!' यांनाच मी 'पंत महाराज कोठें भेटतील? म्हणून मघाशीं विचारलें! असा विचार मनांत येऊन वडील थोडेसे खजिल झाले! इतक्यांत रामभाऊ लेलेहि आले व नमस्कार करून बसले. त्यांना पंत म्हणाले, "काय राम ठीक चाललें आहे ना? रंगभूमीवर जय मिळतो ना?" रामभाऊंनीं उत्तर दिलें, "आपणच आशीर्वाद दिलात, मग जय कां नाहीं मिळणार? नाहींतर आपला आशीर्वाद खोटा ठरेल ना?"

यावर हंसत पंत म्हणाले, "अरे राम, आपण सर्वचजण जगाच्या रंगभूमीवरील नटच आहोंत. आपापल्या सोंगाला अनुरूप अशी कामगिरी बजावण्याचा प्रयत्न करतों आहोंत. नटाच्या भूमिकेप्रमाणें कामें करावीं, पण सोंगाचें विर्सजन करावयाचें आहे, ही खूण लक्षांत ठेवली पाहिजे. घेतलेलें–सोंग म्हणजेच मी, अशा अभिमानांत मनुष्य सांपडतो म्हणून फसतो! सोंगाचें विर्सजन करून मूळ स्वरूपावर येण्यास शिकणें हाच परमार्थ, असें संत शिकवितात."

एवढा संवाद ऐकल्यावर माझे वडील चटकन् उठले आणि त्यांनीं पंतांच्या चरणीं मस्तक ठेविलें!

पंतानीं मग वडिलांना विचारलें, "कांहो, तुम्हांला पंत भेटले कां?" वडील म्हणाले, "हो भेटले!"

पंत त्यावर म्हणाले, "मघां मीं मिशनस्कूलचा मास्तर होतों; आतां तुम्हांला दिसतों तसा आहें. तें सोंग आणि हेंहि सोंगच! मूळचा मी निराळाच आहें!"

संध्याकाळीं पंत भजनाला बसत, त्यावेळीं रोज ७–८ पदें नवीन रचत. त्यादिवशीं भजनाचे वेळीं 'तबला वाजविणारा कोणी आहे कां?' म्हणून पंतानीं रामभाऊ लेल्यांना विचारलें. त्यानीं माझ्या वडिलांचें नांव सुचविलें, तेव्हां तेच तबल्यावर बसले. इतक्यांत एका गृहस्थांनीं येऊन पंतांच्या हातीं एक बत्तासा दिला, तो त्यांनीं माझ्या वडिलांचें तोंडांत घातला! त्यावेळीं श्री रामभाऊ लेले हळूंच वडिलांच्या कानांत कुजबुजले 'मोरबा, तुमचें काम झालेंच असें समजा!'

## अनुग्रह व गुरुकृपेचा वरदहस्त

दुसऱ्या वर्षीं गुरुद्वादशीच्या उत्सवाकरितां वडील बेळगांवास पंतांचेकडे गेले. गुरुवारी गुरुद्वादशी दिवशीं रात्रीं १२ वाजतां पंतानीं माझ्या वडिलांना अनुग्रह देऊन पूर्णकृपेचा वरदहस्त त्यांचे मस्तकीं ठेविला.

घरीं परत येतांना वडिलांनीं पंतांना विचारले, 'नोकरी करूं कां?' पंत म्हणाले, "मला देह अर्पण केलास, आतां नोकरी कुणाची करणार? एकच जमीन किती

जणांकडे गहाण टाकणार ? ” यावर कांहीं उत्तर न देतां वडील कुरुंदवाडास परत आले. मात्र पंतांच्या बोधामृताची चटक लागल्यामुळें पंतांचा सहवास वारंवार घडावा असें त्यांना वाटूं लागलें; पण वरचेवर बेळगांवास जायच्या खर्चाचें काय करावें, ही चिंता त्यांना वाटू लागली !

त्यांच्या मनांत कल्पना आली कीं, बहिणीकडून मदत घ्यावी. त्यांची बहीण आऊताई कोल्हापुरास होत्या. मेहुणे श्री. त्रिंबकराव मराठे हे कोल्हापुर दरबारीं हुजूर चिटणिसाच्या हुद्यावर होते आणि ‘ खरा ब्राह्मण ’ म्हणून शाहूमहाराज त्यांना मानीत. दरबारांत त्यांना ‘ मामासाहेब मराठे ’ या नांवानें ओळखीत. आऊताई व माझे वडील, यांच्यांत बहिण-भाऊ या नात्याचें विशेष प्रेम असे. तेव्हां मनांत आलेली खर्चाची अडचण बहिणीच्या मदतीनें सहज दूर झाली व माझे वडील बेळगांवास वारंवार जाऊन पंतांच्या सहवासाचा लाभ घेऊं लागले. बहिणीच्या या मदतीची माझ्या वडिलांनीं जन्मभर कृतज्ञतेनें आठवण ठेविली आणि तिची शक्य तितकी कृतज्ञतेनें फेडहि केली.

## भक्तिपर काव्य-रचना

पंतांशीं सहवास घडल्याच्या या काळांत माझ्या वडिलांनीं ‘ अवधूत हरिपाठ ’ व ‘ बावन मांत्रिकाची लावणी ’ अशी परमार्थपर काव्यरचनाहि केली. पंतांना हें समजल्यावर पंतांनीं वडिलांकडून ती म्हणवून ऐकली. या लावणीची सुरवात पुढीलप्रमाणें आहे—

**निरंजनीं सद्‌गुरु खेळतो। निशिदिनीं जाउनि शरण त्याला॥**
**सच्चा गुरुचा चेला असेल तो। सांगेल माझ्या प्रश्नाला॥**

लावणी ऐकण्यास बसलेल्या कांहीं शिष्यांनीं पंतांना विचारलें, “ सच्चा गुरुचा चेला ’ म्हणून यांत टोमणा मारलाय ! आम्ही काय कच्च्या गुरुचे चेले कीं काय ? ”

पंतांनीं उत्तर दिलें, “ अरे, तुम्ही पुढे विचारलेल्या सवालांना बरोबर उत्तर दिलेत तर सच्च्या गुरुचे चेले ठराल, नाहींतर कच्चेच ! ”

वरील प्रकारें पोवाडा-गायन व चर्चा झाल्यावर पंतांनीं स्वतः कफनी घातली होती ती काढून ती माझ्या वडिलांच्या अंगावर घातली व म्हणाले, “ हिचा ठीक सांभाळ कर ! ”

## पंत स्वानंदवासी झाले

पंतांच्या सहवासांत अशा प्रकारें आनंदानें कालक्रमणा चाललेली असतां १९०५ सालीं आश्विन वद्य तृतीयेस पंत इहलोक सोडून स्वानंदवासी झाले ! त्यावेळीं

त्यांच्या सर्व शिष्यांना व भक्तांना दुःख-सागरांत बुडाल्याप्रमाणें वाटलें. माझ्या वडिलांनाहि फार वाईट वाटलें. मी यावेळीं सहा महिन्यांचा होतों.

पंत विरह-दुःखाच्या व वैराग्याचे भरांत माझे वडील एकदम काशीयात्रेला निघाले. अंगावर पंतांनीं घातलेली कफनी व एक पीतांबर एवढेच कपडे आणि सोबतीला नरसोबाचे वाडीस असलेला रामू हलवाई. असे दोघेच! कांहींहि जवळ नसतांना पायींपायींच काशीयात्रेला निघाले. मिळेल तेथें व मिळेल तेवढें खावें, मिळेल तसल्या जागीं झोंपावें आणि पुढें जावें, हाच त्यांचा काशीयात्रेचा कार्यक्रम व शिघोरी!

## साधूंचीं दर्शनें

जातां जातां पळसाचे धोंडीबुवा, नारायण महाराज, शिरडीचे साईबाबा, शेवगांवचे गजानन महाराज, राकस पहाडावरील नागपंथी तपस्वी शीलनाथ महाराज, अशा संतांचीं दर्शनें व गांठीभेटी घेत दोघे चालले. शेवगांवचे महाराज गांजा ओढीत असत. पांचतोळे गांजा राहील एवढी त्यांची चिलीम मोठी होती. ती सारखी भरलेली असे! ते आपली चिलीम कोणालाहि देत नसत. वडिलांचे जवळ एकतारी व चिपळ्या होत्या. त्यांनीं थोडा वेळ भजन केलें. तेव्हां गजानन महाराजांनीं आपली चिलीम वडिलांचे पुढें केली; पण वडील गांजा ओढीत नसल्यामुळें त्यांनीं घेतली नाहीं. फिरून एकदां पुढें केली तरीहि वडिलांनीं ती घेतली नाहीं. तेव्हां महाराजांचा शिष्य म्हणाला— " चिलिम नाकारूं नको. मी यांच्या सेवेला आज जवळ जवळ ३० वर्षें आहें, तरी आपली चिलीम त्यांनीं कोणालाहि दिलेली मी पाहिली नाहीं; फार काय माझ्यासारख्या शिष्यालाहि दिली नाहीं! तुमचें थोर भाग्य म्हणूनच तुम्हाला देतात. नाहीं म्हणूं नको. " त्याचें हें बोलणें संपतें न संपतें तोंच महाराजांनीं फिरून चिलीम माझ्या वडिलांपुढें केली. वडिलांनीं ओढून परत दिली. महाराजांनीं ओढून परत वडिलांच्या हातीं चिलीम देऊन म्हटलें, " और जोरसे खेंचो! " तसें केल्यावर महाराज वडिलांना म्हणाले—" तुझ्या जिभेवर सरस्वती नाचेल! बृहस्पतीसारखा बोलशील! "

नंतर काशीक्षेत्रीं पोचल्यावर तेथें सन्यास घेतलेले शांताश्रय स्वामी यांच्या सहवासाचा लाभ वडिलांना झाला. काशीस कांहीं दिवस राहून परत येतांना अनेक संत-साधूंचें दर्शन घेत घेत १९०७ सालीं कुरुंदवाडास येऊन पोचले. एक दिवस पंत स्वप्नांत दर्शन देऊन वडिलांना म्हणाले, " स्वस्थ काय बसलास? एवढी ' प्रेमलहरी ' कुणा करतां केली? तिचा उपयोग कर. " तेव्हां १९०७ च्या चातुर्मासांत रामभाऊ लेले व गोपाळराव लेले या गुरुबंधूंच्या नाक्यावर असलेल्या

घरांतच महाराजांनीं ' प्रेमलहरी 'च्या आधारें भजन–निरूपण करण्यास सुरवात केली. गांवांतील खूपच मंडळी भजन निरूपणाला जमूं लागली व हा पहिला चातुर्मास मोठ्या उत्साहांत पार पडला. पेटी, तबला, एकतारी वगैरेंची साथ गुरुबंधूंनीं चांगलीच जमविली.

चातुर्मास सोहळा झाल्यावर कीर्तनासाठीं नवनाथांचीं आख्यानें बसविलीं.

## प्लेगचा कहर व चोरांनीं घर साफ केलें !

याच सुमारास कुरुंदवाडास प्लेगची साथ आली. माझे वडील व सर्व गुरुबंधू यांनीं या प्रसंगीं घरोघर जाऊन गांवच्या दुःखितांना सर्व प्रकारांनीं शक्य ती मदत केली. इकडे फक्त अंथरायाचेंच घेऊन सर्व मंडळी झोंपडींत रहायला गेलेली पाहून चोरांनीं घर साफ लुटलें !

## कीर्तनें करीत काशी यात्रा

माझे वडील आजोबांना धीर देत म्हणाले, " कांहीं हरकत नाहीं. आपण कीर्तन करीत व भिक्षावृत्तीनें काशीयात्रा करूं. " आजोबा म्हणाले, " बाबा रे, वीष खाऊन मरायला देखील पैसा जवळ नाहीं अन् यात्रा कशी करणार ? " ' तें आपण पाहूं. ' असें म्हणून **आजोबा आजी व वडील** आणि कांहीं गुरुबंधू मिळून अकराजणांनीं काशी-यात्रेला जाण्याचा निश्चय तर केलाच ! सुरवातीच्या खर्चासाठीं फक्त दहा रुपये श्री. रामभाऊ साठे यांच्याकडून कर्जाऊ म्हणून घेतले. साथीदार गुरुबंधूंनीं पगार वगैरे अगाऊ कांहीं घ्यावयाचा नाहीं, मिळेल त्यांत सर्वांनीं भाडें व अन्न खर्च करून ठिकठिकाणीं मुक्काम करीत पुढें जावयाचें असें ठरलें. गांवांतील मंडळींनीं यांना वेडे ठरवून टिंगल टवाळी केली ! पण त्याकडे लक्ष न देतां मंडळी निघाली. पहिला मुक्काम शिरोळला करून नंतर मिरज, सांगली, बुधगांव, तासगांव, विटे, वाटेगांव, कऱ्हाड, वाई, सातारा, पुणें, नगर असे मुक्काम करीत करीत पूर्व खानदेशमधील **चाळीसगांवांतील** रामाच्या देवळापर्यंत मंडळी पोचली. कीर्तन-सप्ताहांत देवळांत कीर्तनाच्या आरतींत फक्त २॥ रु. जमले ! पुजाऱ्यांनीं सांगितलें कीं येथें प्रत्येकाच्या घरोघर जावें तेव्हां संभावना होते ! पण घरोघर भिक्षेला जाणें वडिलांना पसंत नव्हते. ते म्हणाले, कोणाच्या घरांत न जातां गांवांत भिक्षेची फेरी करूं. त्याप्रमाणें फेरी केली. त्या पहिल्याच दिवशीं २५० रु. ची भिक्षा जमली !

नंतर गांवांत कांहीं कीर्तनें झालीं. त्यांत रोख १०० रु. व धान्यहि बरेंच मिळालें. गांवांत पुढे कांहीं वर्षांनीं भडगांवास ' अवधूत मठी ' म्हणून वडिलांनीं अधिष्ठान मांडलें. भडगांवास श्री. राजारामभाऊ सहस्रबुद्धे वकील त्यांनीं रामनवमीच्या कीर्तनासाठी वडिलांना बोलावून घेतले. आणखीहि कांहीं कीर्तनें गांवांत झालीं व

एकूण बिदागी ५०० रु. जमली ! मग पाचोरा स्टेशनवरून अकराहि जणांची एकदम काशीची तिकीटें काढलीं. काशीस एक महिना मुक्काम श्री. भय्या दामळे यांचेकडे झाला. यावेळींहि फिरून शांताश्रम स्वामीच्या सहवासाचा योग वडिलांना लाभला. रोजच्या बैठकींत एक दिवस शांताश्रम स्वामींनीं विचारलें, " तुम्ही कीर्तनांत नाथांची आख्यानें लावतां, मग सैली कां घालीत नाहीं ? " वडिलांनीं उत्तर दिलें, " पंतांचा प्रसाद म्हणून कफनी घालतों. " यावर शांताश्रम स्वामी म्हणाले, " आम्ही श्रीविश्वेश्वराचा प्रसाद म्हणून सैली दिली तर घालाल कीं नाहीं ? " वडिलांनीं ' हो ' म्हटलें.

## काशीस सैलीचा प्रसाद

काशीस रोज रात्रीं १२ वाजतां चिताभस्मासह श्री विश्वनाथाची पूजा होत असते; त्यावेळीं काशींतील सर्व विद्वान् व अधिकारी मंडळी जमतात. त्यावेळीं स्वामीजींनीं वडिलांना बोलावून पूजाविधिनंतर प्रसाद म्हणून माझ्या वडिलांना सैली अर्पण केली; तेव्हांपासून ते कफनीवर सैलीहि घालूं लागले.

## नाटक बंद पाडणारा हरदास !

नंतर काशीचा मुक्काम संपवून मंडळी मलकापूर भंडारामार्गें परतली. मलकापुरास श्री करुणेश्व प्रासादिक नाटक मंडळी होती. याच कंपनींत माझ्या वडिलांचे गुरुबंधु श्री. रामभाऊ व गोपाळराव त्याचप्रमाणें त्यांचे धाकटे बंधु गणपतराव व गोविंदराव होते. वडिलांची कीर्तनें मलकापुरांत सुरूं झालीं त्या वेळीं महिना दशहार होता; आणि कीर्तनांत नाथाचीं नवीं आख्यानें लावीत असल्यामुळें कीर्तनांना खूप गर्दी जमूं लागली.

अखेर गोपीचंद आख्यान संपवून मंडळी पुढें जाणार होती. नाटक कंपनीचा मुक्काम आहेच, पण हे बुवा पुढें गेले कीं गोपीचंद आख्यान ऐकावयास मिळणार नाहीं, अशा हेतूनें गांवांतील लोक नाटकांना न जातां कीर्तनालाच गर्दी करूं लागले. तिकीट विक्री त्या दिवशीं अवघी ७ च रु. झाल्यामुळें तिकीटांचे पैसे परत करून नाटक बंद ठेवावें लागलें ! गांवांत कोणीतरी कीर्तनकारबुवा आल्यामुळें हा प्रकार घडल्याचें समजल्यावर नाटक कंपनीचे चालक मालक लेले बंधु ( वडिलांचे गुरुबंधूच ) " आमचें नाटकहि बंद पाडणारे हे कीर्तनकार बुवा कोण ? " हें पहाण्यासाठीं स्वतःच कीर्तनाला आले. पण गर्दीमुळें त्यांना आंत जातां आलें नाहीं. कीर्तनाचें शेवट ' गोड करी ' झाल्यावर वडिल व लेलेबंधू यांची गांठ पडल्यानंतर ते वडिलांना म्हणाले—" मोरबा, आतां मात्र तुम्ही कमाल केलीत ! नाटकेंहि बंद पाडणारा हरिदास आम्ही प्रथमच पहात आहों ! " हें ऐकून जमलेल्या मंडळींत खूपच हंशा पिकला !

## आंकड्यांचा चमत्कार

अशा रीतीनें काशीयात्रा करीत ११ मंडळी ११ महिन्यांनीं कुरुंदवाड मूळ मुक्कामीं परत आली आणि जातांना यात्रेसाठीं १० रु. कर्जाऊ काढले होते, नेमकी तितकीच रक्कम जवळ शिल्लक उरली! कर्जाऊ १० रु. देण्यासाठीं वडील श्री. रामभाऊ साठे यांचेकडे गेले. त्यावेळीं ते म्हणाले, "मोरबा, तुमची करामत अजब खरी! दहा रुपयावर तुम्ही ११ जण काशीयात्रा करून आला हं! इतर लोक यात्रेला गेले म्हणजे तब्येती खराब करून घेऊन येतात अन् तुम्ही सर्व लोक चांगले तगडे तयार होऊन आलांत!" अशा प्रकारचें कौतुक करून रामभाऊ साठे यांनी १० रु. परत घेतले नाहींत. तेव्हां तेच दहा रुपये खर्चून श्री नरसोबाचे वाडीस श्रीदत्ताची महापूजा करून पालखी काढली.

## मुंबईची पहिली फेरी

१९०९ सालीं माझे वडील प्रथम मुंबईस कीर्तनासाठी आले. त्यावेळीं चौघडेवाल्याच्या चाळीसमोरील चाळींत दुसऱ्या मजल्यावर कऱ्हाडकर यांच्या शेजारीं जागा घेतली. पहिला सप्ताह मुंबईकर मंडळींना वडिलांच्या कीर्तनाचा परिचय होण्यांतच गेला.

मात्र दुसरा सप्ताह काळा राम मंदिरांत चालू झाला त्यावेळीं इतकी गर्दी होऊं लागली कीं, मंदिर गच्च भरून आजुबाजूच्या जागाहि चिकार भरल्या, तेव्हां कांहीं लोक आसपासच्या झाडांवर चढून कीर्तन ऐकण्यास बसले! कीर्तनाला ९ वाजतां सुरवात होई तर सात वाजल्यापासून लोक जागा आडवून बसत. मुंबईचे लोक त्यावेळेपासून वडिलांना 'अवधूत महाराज' म्हणूं लागले व तेंच नांव पुढें रूढ झाले. या सप्ताहांत खूप कपडा, पैसा वगैरे मिळाला. त्यावेळीं काशीला जाऊं इच्छिणाऱ्या निर्धन यात्रेकरूंपैकीं १०० लोकांना काशीचीं तिकिटें अवधूत महाजांनी स्वतःच्या खर्चानें काढून दिलीं आणि अशा रूपानें गंगाराधना केली! अनेक गरीबगुरीबांना कपडेहि वाटले.

## ऊर्जितावस्थेस सुरवात

अशा रीतीनें १९०९ सालापासून आमच्या घराण्याच्या ऊर्जितावस्थेला फिरून सुरवात झाली. मी यावेळीं पांच वर्षांचा होतों. शरीर कृश व रोगीट होतें. पांच वर्षांपर्यंत चालत बोलतहि नव्हतों. चैत्र शुद्ध विनायकी शके १८२७ रोजीं माझा जन्म झाला. पाळण्यांतील नांव 'विनायक' पण लहानपणीं फार रडे म्हणून वडिलांनीं 'दत्त' नांव ठेविलें, तेव्हांपासून माझे रडणें बंद झालें असें वडील माणसें सांगतात!

काशीस जातांना पूर्वखानदेशांतील भडगांवांत प्रथम जम बसला व वळण पडलें. तेव्हां रामनवमीच्या उत्सवासाठी व इतर निमित्तांनीं वडील भडगांवास वारंवार जाऊं लागले व तेथील भक्तसमुदायहि वाढत जाऊन त्याचें पर्यवसान १९२१ सालीं भडगांवास श्रीअवधूत मठीची स्थापना होण्यांत झालें. रामनवमीच्या सुमुहूर्तावरच या मठीची स्थापना झाली. पुढें हें वळण वाढत गेल्यामुळें १९३५ सालीं आम्ही सर्वच मंडळी कुरुंदवाड सोडून भडगांवासच स्थाईक झालों.

१९०५ पासून १९०९ पर्यंत लहान प्रमाणांत व पुढें १९२४ पर्यंत मोठ्या प्रमाणांत कुरुंदवाडास गोकुळाष्टमीचा उत्सव वडिलांनीं केला. पंतांचा जन्म गोकुळाष्टमीचा म्हणून कृष्णजन्म व पंतजन्म तसेंच पंतांचे गुरु बालमुकुंद यांचाहि जन्म हे सर्व उत्सव एकाच वेळीं साधणें हा या उत्सवामागील हेतु होता. पुढें १९२४ पासून हा उत्सव भडगांवास अवधूत मठींत होऊं लागला. नंतर १९२७ मधील मार्गशीर्ष चंपाषष्ठीला अवधूतमठींत श्रीदत्तमूर्तीची व पादुकांची स्थापना करण्यांत आली. तेव्हांपासून भडगांवास दत्तजयंतीच्याहि उत्सवास सुरवात झाली. पंतांनीं दिलेली ही कीर्तन–भजन सेवा पुढेंहि चालली पाहिजे अशी वडिलांची इच्छा होती.

## माझा जन्म व बालपण

या इच्छापूर्तीसाठीं माझीच योजना व्हावी, असा ईश्वरी योगायोग असावा. जन्मतःच रवीची पीडा म्हणून डोळे खराब होते. ११ व्या वर्षींच डोळ्यांत फूल पडलें. शाळेचा अभ्यास होईना म्हणून शाळेंतून चौथ्या इयत्तेंत असतांच नांव काढलें. त्यावेळीं गोकुळाष्टमीच्या उत्सवांत एक ज्योतिषी घरीं आले. त्यांनीं वडिलांना सांगितलें कीं, "तुम्ही पूर्व खानदेशांत एक देऊळ बांधाल, तुम्हांला वऱ्हाडांत काळ्या दगडाची मुगुट खुडलेली कृष्णाची मूर्ति मिळेल. आतां मुंबईस जाल त्यावेळीं हातांतील सोन्याचें घड्याळ मिळेल" याप्रमाणें १९१६ सालीं मुंबईंत सोन्याचें घड्याळ मिळालें, १९२१ सालीं भडगांवास मठीची स्थापना झाली आणि १९२२ सालीं वऱ्हाडांत कृष्णाची मूर्ति मिळाली. याच सुमारास माझ्या वयाच्या ११ व्या वर्षीं या ज्योतिषानें सांगितलें कीं हा मुलगा कीर्तनच करील दुसरें कांहीं करणार नाहीं. यामुळें वयाच्या १२ वर्षापासून मी वडिलांचे बरोबरच हिंडूं लागलों. बारावें वर्ष पुरें होण्यापूर्वींच वडिलांनीं माझ्याकडून एक आख्यान व एक पूर्वरंग बसवून घेतला. पहिलें कीर्तन कुरुंदवाडांतील लोकांपुढें करविलें आणि मग सांगितलें कीं यापुढें मी सांगणार नाहीं. तुझें तूंच ऐकून वाढविलें पाहिजेस. चार वर्षें मी वडिलांचे मागें उभे राहून झांज वाजविली, नंतर पेटीची सांथ करूं लागलों. वडील कीर्तनासाठीं कोणत्याहि गांवीं जाऊन

सप्ताह झाला कीं अखेर एक कीर्तन मला करावयास सांगत. यामुळें सभाधीटपणा व प्रसंगावधान वाढूं लागलें. हुबळीस तम्मणाशास्त्री यांच्या मठांत व्यासपीठावर उभा राहून ५ हजार लोकांपुढें कीर्तन केलें. नंतर श्रीसिद्धारूढ स्वामींच्या मठांत १६–१७ हजारांच्या जमावापुढेंहि असेंच व्यासपीठावर उभा राहून कीर्तन केलें. शाळा सोडून कीर्तनाचे मार्गे लागल्यावर आप्तेष्टांनीं निर्भत्सना व हेटाळणी केली, पण तें सर्व मुकाट्यानें सहन केलें. लग्नाच्या गोष्टी निघाल्या कीं आप्तेष्टांनीं म्हणावें याला ' मुलगी देणार कोण ? शिक्षण पुरेसें नाहीं. हरदासाला लागणारी विद्या देखील नाहीं ! '

## विवाह

पण माझा योग असा कीं, वडिलांचे गुरुबंधु वे. शा. सं. महादेवभट दिवेकर व त्यांचे धाकटे बंधु सुप्रसिद्ध सॉलिसिटर केशवराव दिवेकर या दोघां बंधूंनीं माझ्या वडिलांना विनंति केली कीं, तुमच्या मुलाला आमची मुलगी करून घेऊन गुरुबंधूचें नातें आणखी दृढ करावें. आमचे वडील म्हणाले, ' आम्ही कीर्तन–भिक्षा करीत झोळी घेऊन फिरणार ! उद्यां ' भिक्षेकरी जांवई ' म्हणून लोक तुम्हांला नांवें ठेवितील व तुमच्या मनावर त्याचा परिणाम होईल ! ' पण या दोघांहि बंधूंनीं सांगितलें कीं, ' आम्ही या सर्व गोष्टींचा विचार केला आहे, तेव्हां या सोयरीकीनें तुमचें आमचें गुरुबंधूचें नातें बळकट व्हावें हीच आमची दृढ इच्छा आहे ' अखेर आठ दिवसांतच लग्न निश्चय होऊन १९२५ सालीं मार्च महिन्यांत मुंबईतच विवाहाचा सोहाळा झाला. लग्नसमारंभ थाटांत झाला. याचेंहि आमच्या कांहीं आप्तेष्टांना सखेदाश्चर्य वाटलें ! असो.

## विषमज्वरांतील चमत्कार !

माझी जीवनयात्रा ' हरिदास कीर्तनकार ' पेशानें चालू झाली. १९३० सालीं वडील थंडीतापानें आजारी झाल्यामुळें पौष महिन्यांत औरंगाबादेस कीर्तनासाठीं मला एकट्यालाच जावें लागलें. तेथील श्रीदत्तमंदिराचे पुजारी श्री. रंगराव यांच्या शेजारीं रहाणें ठेविलें. त्यांचा मुलगा चि. बाबू हा माझा गुरुबंधु. तेथें कीर्तनास सुरवात झाल्यावर मला ताप आला व तो विषमज्वर असल्याचें निदान डॉक्टरांनीं सांगितलें ! आठ दिवस होऊन गेले तरी ताप कमी होईना. रंगराव म्हणाले, वडिलांना तार करून बोलावितों. ' मी म्हटलें, ' वडील कांहीं कामासाठीं कुरुंदवाडास गेले असल्यामुळें त्यांना बोलवूं नका. मरण यायचेंच असलें तर येथें येईल तसें तेथेंहि येईल ! '

तापाच्या १२ व्या दिवशीं रात्रीं १२ चे सुमारास मी अर्धवट गुंगींत असतां मला असें दृश्य दिसलें कीं, मी निजलेल्या द्वाराभोंवतीं ४ काळपुरुष खूप उंच व काळेकभिन्न एका खड्डयासमोर उभे असून येणारा जाणाऱ्याला आंत टाकीत. नंतर त्यानीं मलाहि घरांतून बाहेर नेऊन खड्डयांत टाकलें. मी वर येऊन त्यांना खड्डयांत टाकलें. त्यांनीं मला व मी त्यांना खड्डयांत टाकण्याची झटापट चालूं झाली. इतक्यांत वडिलांचे मार्गदर्शक गुरु श्रीपंतमहाराज त्या जागीं आले. डोकीला केस मोकळे सोडलेले, दाढी व हातीं एक काठी, असा त्यांचा वेष होता. पंतमहाराज काळपुरुषांना दरडावून म्हणाले, 'या पोराच्या वाटेला जाऊं नका म्हणून बजावलें तरी त्याला तुम्ही त्रास दिला, मग आपल्याबरोबर आणलेल्या आठ काल–पुरुषांना त्यांनीं हुकूम केला, 'या चौघांना तुम्ही पकडून घेऊन जा.' मग माझ्याकडे वळून पंत म्हणाले,–'तूं येथें राहूं नको, येथून जा.' मी रंगरावांना उत्तर दिलें तेंच पंतांना दिलें. तेव्हां ते म्हणाले, "तूं पुष्कळ मरशील! पण जबाबदारी माझेवर आहे. तूं येथून जा. तुला आठ तासांची सवड देतों." असें सांगून पंत निघूच गेले! पण पहांटे ३–४ च्या सुमारास चार काळ पुरुष हातीं जंबिये घेऊन पलंगाच्या चारी बाजूंनीं मजवर चाल करून येत असलेले दिसले! तेव्हां मी विचार केला कीं, आतां ऐवीतेंवीं मरणारच तर ॐ नमः शिवाय हा आपला तारक मंत्र मनांत जपत स्वस्थ पडावें. ते काळपुरुष सुरा अगदीं माझ्या छातींत खुपसणार इतक्यांत पंत आठ पुरुषांसह फिरून दिसलें व त्यांनीं त्या आठांकडून त्या चौघा काळपुरुषांना पकडून घालविलें. मग पंत फिरून मला म्हणाले, 'तूं ताबडतोब येथून जाण्याची तयारी कर. तुला गेलेंच पाहिजे.' असें म्हणून मला हात पुढें करावयास लावून हातावर काठी मारली. मीहि 'बरं तर मी जातों' म्हणून कबुली दिली! सकाळीं मी, बाबू व त्याचे वडील रंगराव पुजारी यांना हा प्रकार न सांगतां म्हटलें, 'माझें हें दुखणें साधें नाहीं. मला मुंबईला पोंचवा. तेथे माझा चुलतभाऊ डॉक्टर आहे तो सर्व व्यवस्था ठीक करील. सेकंड क्लास तिकिट काढून मला मनमाडपर्यंत पोचवा व मग तेथून मी सेकंड क्लासनें मुम्बईस एकटा जाईन.' तेथील वैद्यांनींहि संमति दिली. रात्रीचा हा प्रकार या सर्वांना सांगितला नाहीं. कारण मरणापूर्वीं माणसाला अशीं दृश्यें दिसतात असें वाटून ते घाबरून सर्व आप्तेष्टांना तारा करतील! पुजाऱ्याच्या वडील भावानें मला मनमाडपर्यंत पोचविलें. संध्याकाळीं ७॥ चे सुमारास तिघांनीं मला उचलून टांग्यांत बसविलें. औरंगाबादेस सेकंडक्लासचीं तिकिटें काढून तो मोठा भाऊ मजबरोबर मनमाडला आला. मनमाड जवळ येऊं लागलें तसतसा अंगांतील ताप उतरत गेला, हुषारीहि वाटू लागली! मनमाड स्टेशनवर मी स्वतःच्या पायांनीं स्टेशनांत उतरलों. बरोबर आलेल्या इसमास सांगितलें कीं, 'मुंबईच्या गाडींत सेकंड

क्लास तिकिट काढून मला बसवा व तुम्ही परत जा. मला आतां एकटा जाईन इतकी हुषारी वाटत आहे. काळजी करूं नका. '

मौज अशी कीं बोरीबंदरवर येईतों माझा ताप साफ उतरला व मी गाडी करून मुगभाटांतील नामदेव कोरडे यांच्या घरांत दोन जिने चढून श्री. काशिनाथ विश्वनाथ मेंगळे यांचें बिऱ्हाडीं येऊन सुखरूप पोंचलों! पुन्हां ताप वगैरे न येतां मी खडखडीत बरा झालों!

× × × ×

माझा मधला बंधु पांडुरंग याचें लग्न झाल्यावर आम्ही कुरुंदवाड सोडून कायमचेच भडगांवमठींत रहावयास आलों.

## वडिलांचें दुःखद देहावसान !

१८३८–३९ चे सुमारास वडिलांना रक्तदाबाचा विकार होऊन १९३९ चैत्र शु. प्रतिपदेला वडिलांनी देह ठेविला. त्यावेळीं मी ठाण्याचे त्रिभुवन नगरशेट यांचेंकडे तुरंब्यास रामनवमीच्या उत्सवास गेलो होतों. शेटजींना मी तीन वेळां नकार दिला होता. त्यांनी वडिलांना पत्र पाठवून त्यांचेकडून होकार मिळविल्यामुळें मला जाणें भाग पडलें! वडिलांनी भडगांवास इहलोकची यात्रा संपविली त्यावेळीं मी तुरंब्यास कीर्तन करीत होतों! श्री. ताम्हनकराचेंकडे तार आली तेव्हां मध्यरात्रीं ते टॅक्सीनें शोध करीत तुरंब्यास आले. मग मी भडगांवास गेलों. दरम्यान ३२ तास गेले। मी, माझा धाकटा बंधू अनंत व गुरुबंधु श्री. बंडोपंत देशपांडे, असे तिघे जण इतक्या अवधीनंतर भडगांवास पोचलों, तोंपर्यंत वडिलांचें शव ठेवावें लागलें. त्या दिवशीं भडगांवांत स्वयंस्फूर्त हरताळ पडला होता; दहनविधी होईतों माझे मधील बन्धू (पोलीस इन्स्पेक्टर) श्री पांडुरंग येऊं शकले नाहींत.

## माझ्या जीवनांतील घनिष्ट संबंध

माझी वडील बहीण सौ. द्वारकाताई व तिचे पति इलेक्ट्रिकल इंजिनीयर श्री. दत्तात्रय कृष्ण देवधर आणि त्यांचें खालोखाल माझी आते बहीण सौ. संतुताई व तिचे पति श्री. का. म. ताम्हनकर यांच्याशीं माझ्या जीवन व्यवहारांचा घनिष्ट संबंध आला.

वडिलांसह मुंबईस कीर्तनासाठीं आम्ही आलों कीं अंदाजें १२ वर्षांत मुक्काम बहुधा श्री. ताम्हनकरांचेकडे असे. आमच्या परस्परांशीं वागण्यांत नातें किंवा मानापमानाच्या भावनांऐवजीं खुलीं अंतःकरणें आणि परस्परांविषयीं सात्विक प्रेम वाढत गेलें. लोक मला व श्री. ताम्हनकरांना ' भाऊ भाऊ ' समजतात. याच प्रेमाच्या नात्याचे जोरावर त्यांनीं मला ही आठवण लिहिण्यास भाग पाडलें,

आतां माझे सख्खे मेहुणे श्री. द कृ. देवधर यांच्याहि उदार व प्रेमळ वागणुकींचा कृतज्ञतेनें उल्लेख करणें आवश्यक आहे. वडिलांनीं देह ठेविला त्यावेळीं ५ हजार रु. कर्जाचा बोजा होता! अर्थात् तें आम्हां बंधूंचीं लग्नें व गृहप्रपंच या निमित्तेंच झालें होतें. ही सर्व कर्जाची रक्कम वडील बहिणीचे पति श्री. द. कृ. देवधर यांनींच दिली होती. वडिलांनीं देह ठेवेंतो आमचे अंगावर त्यांचा कांहींहि खर्च नव्हता. मुंबईचे श्री. मुकुंदराव दादाजी राणे हे त्यांना १२ वर्षें देह ठेवीतों द. म. ५० रु. देत असत.

पण वर ज्या कर्जाचा उल्लेख केला त्या कर्जाबद्दल वडील असतांना व माझ्याकडूनहि कर्ज फिटेतों श्री. देवधर यांनीं व्याज वगैरे कांहीं घेतलें नाहीं. उलटपक्षीं 'तूं कर्जाची काळजी करूं नको मनाला लावून घेऊं नकोस. माझी रक्कम सुरक्षित बँकेंत आहे, असें मी समजतों,' असें म्हणून श्री. देवधर मला वारंवार धीरच देत असत.

मला सध्यां ५ मुलगे व ३ मुली आहेत. ही संसार-नौका कशी चालते व श्रीदत्तप्रभूची सेवा कशी यापुढें घडते, हेंच पहाणें आहे. यापुढील काळच खरा कसोटीचा आहे. सध्यां भडगांव श्रीदत्तअवधूत-मठींत श्रीदत्तजयंतीचा उत्सव १०-११ दिवस मोठ्या प्रमाणांत होत असतो. चंपाषष्ठीं ते पौर्णिमेपर्यंत, शिवाय चैत्रपाडव्यापासून वडिलांच्या पुण्यतिथीचा उत्सव ४ दिवस होतो. दोन्हीहि उत्सवास ४-५ शें मंडळी जमतात. सर्वांचें जेवण चहापाणी वगैरे व्यवस्था आम्हीच ठेवितों. शिवाय गोकुळ अष्टमी, पंतांचा जन्मकाळ आणि यांचे गुरु श्रीबालमुकुंद यांचाहि जन्मोत्सव आणि भाद्रपद संकष्टी वडिलांचा जन्मकाळ हेहि सर्व उत्सव लहान प्रमाणांत होतात. या लहान उत्सवांत स्थानिक मंडळीच भाग घेतात. सर्व व्यवहार अयाचित वृत्तीनें चालवावें असें ब्रीद अद्याप तरी राखूं शकलों आहे. माझ्यानंतर ही श्रीदत्तसेवा व मठीची परंपरा कोण चालवितों हा प्रश्न आहे. हें अधिष्ठान ज्याला शक्ति बुद्धि देईल तो चालवील अशी माझी श्रद्धा आहे.

[याशिवाय श्री. ह. भ. प. श्री दत्तात्रय मोरेश्वर दातार यांनीं कांहीं आठवणी तोंडीं सांगितल्या त्यांचा समावेश चरित्रलेखनांतच केला आहे. —चरित्रलेखक.]

* * *

# श्री अवधूत महाराजांचे पूर्वज

[ महाराजांच्या एकुलत्या एक मुलीचे ( सौ. द्वारकाताई दातार ) पति श्री. **दत्तात्रय कृष्णा देवघर** सेवानिवृत्त इलेक्ट्रिक ऑपरेटर व शिफ्टइंजिनीयर टाटा पॉवर हाऊस भिवपुरी यांच्या आठवणी ]

स्वराज्य मिळाल्यानंतर काँग्रेस—राज्यांत विलीन झालेल्या सर्व लहान मोठ्या पटवर्धन संस्थानांचा इतिहास जवळ जवळ २०० वर्षांचा आहे. मिरजेचा किल्ला हा सर्वांत जुना असून तेथूनच सर्व पटवर्धन सरदारांची हालचाल होत असे. पण कालांतरानें सर्व पटवर्धन सरदारांमध्यें वाटण्या झाल्या व त्यापैकीं एक घराणे कुरुंदवाडला आले, व त्याठिकाणीं किल्ला बांधून राहिलें व तेथेच स्थायिक झाले. त्यावेळी कोकणांतून उदर निर्वाहा करितां जी कांही चित्तपावन मंडळी कुरुंदवाडला आली त्यापैकीं देवघरांकडे देवपूजा व देखरेख करण्याचें काम दातार घराण्याकडे आले. १/२ पिढ्यांनंतर कुरुंदवाड संस्थानांत २ वांटण्या झाल्या. त्यामुळें दातार घराण्यांत एकाला थोरल्या पातीकडे काम मिळाले व दुसऱ्याला घराण्याकडे धाकट्या पातीचे काम मिळाले. स्वानंदवासी महाराज ( अवधूत महाराज यांचे आजे ) कुरुंदवाड धाकट्या पातीचे मालकाकडे पूजाअर्चा व घराची देखमाल करून आपला चरितार्थ चालवीत. या शिवाय उरलेल्या वेळांत वेद पठण करीत. जुजवी आयुर्वेदीय औषधे देऊन मिळेल त्या मोबदल्याचा संसाराला हातभर लावीत. वेद पठण करणारे ब्राह्मण म्हणून यांना संस्थानिकांकडे मानाने वागवीत. त्याचप्रमाणे गावांत ही यांना मान मान्यता होती. दातार घराणे कुरुंदवाडास आले त्याच सुमारास आमचे देवघर घराणे कुरुंदवाडास स्थायिक झाले. आमचे वडील कृष्णाजी गणेश यांचे पणजोबा महादेव भट हे कुरुंदवाड येथील एक सुखवस्तु गृहस्थ श्री. लेले यांचे आश्रयाने रहात असत. वेद पठण हा मुख्य व्यवसाय होता. पोटापुरती भिक्षुकी व या शिवाय त्यांना चारितार्थाचे दुसरे साधन नव्हते. त्यांनी एक वेद–पाठशाळा चालविली होती. विद्वान व तरतरीत तरुण असे हे महादेव भट होते. नारायण भटांनी हेरून ठेवले कीं हा तरुण आपल्या बहिणीला योग्य वर आहे. नारायण भटांनी श्री. लेले यांचे मार्फत हा विवाह जुळवून आणला. हा असा दातार व देवघर घरण्याचा संबंध आहे. अप्पा भट दातार यांची आत्या ही आमचे वडिल कृष्णाजी गणेश यांची पणजी. या पणजी बाईंनी जवळ जवळ शंभरी गाठली

होती. त्यांचे हयाती पर्यंत दोन्ही घराण्यांचे घनिष्ट संबंध होते. कृष्णाजींचे आजे बाळंभट यांचे हयातींत स्वानंदवासी अवधूत महाराज व त्यांच्या वडिल भगिनी श्री आऊताई आमचे घरीं कारण परत्वें येत असल्याचें आमचे मातोश्रीं सांगत. १९०४ साल असावे. गांवांत प्लेगने कहर केला होता. श्रीमंत कुरुंदवाडकरांचे मळया-शेजारी आम्हीं झोपडींत रहात होतो. आमची व दातारांची झोपडी शेजारी होती. एके दिवशीं दुपारीं झोपड्यांतील सर्व मुलें रस्त्यावर खेळत असताना रस्त्यावर एक बैलगाडी झोपड्यां जवळ येऊन उभी राहिली. गाडीतून सौ. कमलाबाई दातार उतरल्या. सर्व मुलांनी त्यांचे भोवती फेर धरला होता. त्यातच मी पण होतो. सर्व मुलें त्यांचे बरोबर त्यांचे झोपडींत गेली. सर्व मुले आंत बाहेर अशी सारखी वावरत होती. त्यावेळी मी अवधूत महाराजांना प्रथम पाहिलें. झोपडींत त्यांचे मातापिता बसलेले होते. त्यावेळीं माझे बालमनावर महाराजांचे व्यक्तिमत्व कोरलें गेलें होतें. हे कोणीतरी मोठे गृहस्थ आहेत असे वाटले. उणी पुरी उंची' भव्य आकृती, भरदार मिशा, गौरवर्ण, घारे डोळे यामुळे मला जरा भीतीच वाटली. त्यानीं सर्व मुलांना दमदाटी केली पण मिस्किलपणें ते हसत होते. त्यांना मुले हवी होती पण त्यांचा दंगा नको होता ! सौ. कमलाबाईंनीं सर्व मुलांचे हातावर थोडा खाऊ ठेविला. मी सर्वांत लहान होतो, व अगदी झोपडीचे दरवाज्यापाशीं उभा होतो. हातावर कांहीच पडले नाही, म्हणून मी हिरमुसला झालो होतो. महाराज आपल्या पत्नीला म्हणाले, 'या मुलाला कांही मिळाले नाही' ! माझे हातावर खाऊ पडला त्या सरशीं उड्या मारीत झोपडीचे बाहेर आलो. त्यावेळी त्याना काय कल्पना असणार की खाऊ मिळाल्याबरोबर उड्या मारीत बाहेर पळत जाणाऱ्या मुलाला १९१४ सालीं आपली मुलगी देण्याचा प्रसंग येणार आहे !

## अवधूत महाराजांचें 'राजयोगी' शिक्षण

श्रीमंत भाऊसाहेब हे महाराजांचे सहाध्यायी होते. श्रीमंत भाऊसाहेब संस्कृत शिकत असतांना त्यांना सहाध्यायी म्हणोन स्वा. अवधूत महाराजांना ठेवून घेतले होते. आपले मुलाचा सहाध्यायी व उपाध्याचा मुलगा म्हणोन श्री. भाऊसाहेब यांच्या व्रतबंध विधीबरोबर महाराजांचा व्रतबंध विधी झाला. संस्कृत शिवाय स्तोत्रे व भिक्षुकीस लागणारे अवश्य तेवढे अध्ययन झाले होते. पण त्या काळांत भिक्षुकीपेक्षां इंग्रजी शिक्षणामुळे जास्त प्राप्ती होते म्हणून बहुतेक वेद पठण करणाऱ्या घराण्यांत इंग्रजी शिकून कारकुनी करण्याकडें कल दिसूं लागला. यामुळे महाराजांनीं मुलकी परिक्षा देऊन वकिलीचा अभ्यास केला व कोल्हापूरला संस्थानांत वकिलीची सनद मिळविली. त्याकाळीं साक्षर असलेल्या ब्राह्मण वर्गांत हल्लीच्या मानानें तुलना केल्यास शैक्षणिक पातळी कमी दर्जाची होती. हल्ली



श्री. अवधूत महाराज व त्यांच्या सहधर्मचारिणी सौ. कमलाबाई



ग. मा. दिवेकर सॉलिसिटर, मुंबई हायकोर्ट



अवधूत महाराजांची अखेरपर्यंत सेवा करणारे (श्रीपादराव) अवधूत मठीच्या स्थापनेचे वेळेपासून पूजाअर्चा करणारे व अजूनही तितक्याच भक्तीभावाने सेवा करीत असलले त्यांचे प्रेमळ निजशिष्य श्रीपादराव दत्तात्रय पराडकर

पदवीधर मुलगा व कमीत कमी एस. एस. सी. पास मुलगी यांना लग्नाच्या बाजारांत भाव चांगला आहे. त्यावेळची परिस्थिती फार निराळी होती. १६–१८ वर्षांचा मुलगा व ८–१२ वर्षांची मुलगी यांचे सर्रास विवाह होत असत. मुलीच्या शिक्षणाची कोणी चौकशी देखील करीत नसत! मुलांचे शिक्षणाबद्दलही फारसे कुतुहल नव्हते. उत्तम मोडी व बालबोध अक्षर जमाखर्च लिहिणे इतपत गणिताचे ज्ञान एवढ्यावर भागत असे. नृसिंहवाडी आमचे गांवापासून १ मैलावर असल्यामुळें त्या ठिकाणीं होणारे दत्तजयंती वगैरे उत्सव आमचे गांवांतील दत्त मंदिरांत होत. त्या उत्सवामधून महाराज बालपणापासोन मोठ्या हिरीरीनें भाग घेत. तो एक त्यांना छंद जडला होता. देवळांतील उत्सव संपले नंतर स्वतःचे घरी ४ बालगोपाळ मंडळी जमवून त्या उत्सवाची सहीनसही नक्कल करून वेळ काढीत. देवे, आरत्या वगैरे कार्यक्रम करीत. नंतर पालखीची मिरवणूक, असे कार्यक्रम असत. त्यामुळे विद्याभ्यासांत व्यत्यय येऊं लागला व त्यामुळे वडील मातोश्रींकडून बोलणी खावी लागत.

## दैवी कोप व पहिली काशीयात्रा

त्या कालांतील शिमगा सणाचें वर्णन न केलेलें बरें! मोठीं माणसें. लहान मुलें सर्वजण भाग घेत. होळीचे दुसरे दिवशीं बहुतेक करून सर्व मुलें पंचगंगा नदीवर स्नानास जात. त्यांत महाराजांचे एक प्रेमळ बंधु भालचंद्र (भल्या म्हणत!) स्नानास गेले असतांना पाण्यांत बुडून मेले. दुसरे बंधु लग्न झाले नंतर १|२ वर्षांतच प्लेगला बळी पडले. त्याचप्रमाणें महाराजांचे धाकटे बंधु इचलकरंजीस श्री. भिडे यांचेकडे दत्तक गेले होते. तेही लग्नाचे नंतर १ वर्षांचे आंत प्लेगला बळी पडले! अशा वेळीं सर्व मंडळी झोंपड्यांत रहात असल्यामुळें घरीं चोरी झाली. चोरांनीं सर्व घर धुवून नेलें व वृद्ध मातापित्यांनीं अंथरुण धरलें. घरची परिस्थिती बिघडून गेली. व महाराज किंकर्तव्यमूढ झाले. डोळयांत अश्रू आणून वृद्ध माता–पिता म्हणाले, "अरे बाबा तीन मुलगे गेले आतां तूं एकटा राहिलास. आम्ही वृद्ध झालों. आम्हांला सोडून कोठें जाऊं नकोस. तुझ्या पोटापुरते तुला आहे. श्री. कुरुंदवाडकरांकडे असलेली वडिलार्जित पूजेची नोकरी करून उदर निर्वाह कर, गांव सोडूं नको." आम्हाला सोडून कोठें जाऊं नकोस. वडील मातोश्रींना अतिशय शोक झाला. कांही केल्या त्यांना शांती मिळेना. दिवसेंदिवस प्रकृति ढासळत चालली. त्यांना शांती मिळावी म्हणून महाराजांनीं काशीयात्रेस जाण्याचा विचार केला. कुरुंदवाडहून मंडळी निघाली. त्यावेळीं त्यांचेजवळ पैसा, अडका

फारसा नव्हता. आमचे गांवापासोन ३ मैलावर असलेल्या शिरोळ गांवी मुक्काम करून कीर्तनावर मिळालेल्या बिदागीवर सांगलीस गेले असे करीत करीत काशी यात्रा करून ६ महिन्यांनीं सर्व मंडळी सुखरुपपणें परत आली.

## महाराजांची विनोदबुद्धि

कुरुंदवाड संस्थान लहान असले तरी तेथें गुणीजनांना आश्रय मिळालेला होता. गावांत एकदा उत्तम शास्त्री, पुराणिक, वैदिक गवई, तबलजी, पेटीवाले पेलवान असे गृहस्थ त्यांचे आश्रयाने असतां श्रीमंतांचे प्रोत्साहनाने व या वरील गुणी जनांचे सहकार्यानें गावांत कारण परत्वे गद्यपद्य नाटके होत. अशा नाटकांत महाराज कामे करीत. मला आठवते कीं बाणासूर नाटकांत त्यांनी काम केले होते. भगवान महादेवाचे पार्श्वरक्षक शृंगी भृंगी या जोडीचा उपयोग नाटककारानें हास्यरस उत्पादनाकरितां विनोदी पात्रें म्हणून केला होता. त्यापैकीं एक भूमिका महाराजानी केली होती. प्रेक्षकांत हंशा पसरला. क्वचित् प्रसंगीं टाळ्या पडल्या. महाराजांनीं विनोदी पात्राचे काम केले. ते स्वतः अभिजात विनोदी होते. श्लील-अश्लील याची पर्वा न करितां शब्दांचे विश्लेषण करून शाब्दिक कोट्या करून हास्याचे फवारे उडवीत! ते कोणाचे वर्म काढीत नसत. ऐकणाऱ्याला गुदगुल्या होत. विषय प्रापंचिकच असे. त्याच विषयांत सर्वांची मनें गुंतवून ठेवित, व एकदम त्याच शाब्दिक वातावरणांतून तत्वज्ञानांत शिरत व जवळ बसलेल्या लोकांना बोधामृत पाजीत, श्रोते थक्क होत व एकदम ट्रॅन्स्फरसीन झाल्यासारखे वाटे!

१९०६ साल असावे. माझे माता पिता मी व माझी बहीण काशी यात्रेस गेलो होतो. आमचा मुक्काम ब्रह्मघाटी आंग्रे यांचे वाड्यांत होता. काशीस आमचा मुक्काम जवळ जवळ १ महिना होता. आम्ही कुरुंदवाड सोडले त्यावेळीं महाराजांचे वडील अप्पाकाका आमचे घरीं आले व आमचे वडिलांना डोळ्यांत अश्रू आणून म्हणाले कीं "माझा मोरू घर सोडून एकवस्त्रानिशीं परागंदा झाला आहे. तुम्ही त्रिस्थळी यात्रा करणार आहात. क्षेत्राचे ठिकाणीं माझा मुलगा भेटला तर त्याची अवश्य विचारपूस करून मला कळवा." काशीक्षेत्रीं एके दिवशीं सायंकाळी आमचे वडील श्री विश्वेश्वराचे दर्शन करून घरी आले व माझे मातोश्रीस म्हणाले, 'अग, मला आज मोरू भेटला होता.' आमच्या मातोश्री म्हणाल्या, "अहो, कोण कोठला मोरू काढलात? बया बाईचा मुलगा काय? भेटला कां तुम्हाला? काय म्हणाला? येथे काय करतो" वगैरे. वडील म्हणाले, "अग, तोच तो अप्पा भटजींचा मुलगा. मी त्याला पहिल्याने मुळीच ओळखला

नाहीं. अगदीं बैराग्यासारखा दिसतो. ते एकटे नाहीत. त्रयमूर्ति आहेत! त्यांचे बरोबर आणखी दोन बैरागी आहेत. त्या तिघांना मी उद्यां घरीं भोजनाचे आमंत्रण देऊन आलो आहे व त्या तिघांनी अवश्य येऊं म्हणून आश्वासन दिले आहे." ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं १२ चे सुमारास आमचे दारांत त्रयमूर्ति दत्त म्हणून उभ्या राहिल्या! तिघांचे वेष बैराग्याचे होते. महाराजांचे अंगांत कफनी होती. व दाढी वाढविलेली होती. त्या तीन बैराग्यांपैकीं दोघे बाहेर बसले व महाराज मात्र स्वैपाकघरांत जेथे मातोश्री स्वयंपाक करीत होत्या व वडील देवपूजा करीत होते तेथे त्यांचे शेजारी घरगुती गप्पा करीत होते. जेवणखाण करून आलेली पाहुणे मंडळी परत गेली.

## लोकसंग्रही विश्वबंधुत्वाची वृत्ति
## गरजू विद्यार्थ्यांविषयीं आस्थेचें वागणें

१९०७ साल असावे. सांगलीस आमचे बंधु ती. रा. रा. अण्णाराव श्री. घारपुरे यांचें घरीं शिक्षणाकरितां रहात होते. त्यांचेकडे महाराजांचे जाणें येणें होते. घरीं बरीच पाहुणे मंडळी जमली होती. त्यामुळें आमचे बंधुंकडे कुणाचेच लक्ष नव्हते व त्यांची जरा आबाळ होत होती. ही गोष्ट महाराजांचे लक्षांत आली. त्यामुळें माझे बंधुकडे महाराज विशेष लक्ष देऊं लागले. त्यांच्या अडचणी दूर केल्या. वास्तविक त्यावेळीं माझे बंधूचा व त्यांचा काय संबंध! महाराज श्री घारपुरे यांचें अतिथि व माझे बंधू घारपुरे यांचेकडे आश्रयाला एक विद्यार्थी. कशाचा कांहीं संबंध नाहीं! असे असतांना एका गरजू मुलाला आस्थेनें वागवावयाचें. त्याच्या अडचणी दूर करावयाच्या. थोडक्यांत त्याला आपले म्हणावयाचे, यांतच लोकसंग्रह व विश्वबंधुत्वाच्या वृत्तीचे बीज त्यांचे ठिकाणीं होते हें सिद्ध होत नाहींत काय? आजतागायत जुन्या आठवणी निघाल्या कीं माझे बंधूचा महाराजांचे ठिकाणीं असलेला आदर त्यांचें बोलण्यांत दिसून येतो.

## उत्सवांतील पालखीचा थाट व जातिभेद न मानतां
## मुक्त हस्तानें अन्नदान

१९०८ ते १० या सालांत कुरुंदवाड मुक्कामीं दत्त जयंती उत्सव महाराजांनीं मोठ्या थाटांत साजरे केले. श्री. लेले यांचे घरांत श्रीची स्थापना होत असे व रोज त्यांची किर्तनें होत. पालखीचा थाट कांहीं औरच असे. कुरुंदवाड ज्युनियर धाकट्या पातीचें अधिपती श्री भाऊसाहेब महाराजाचे सहाध्यायी असलेमुळें पालखीचे मिरवणुकीकरितां हत्ती, घोडे, लगेडकासह सर्व सरकारी लवाजमा मोठ्या आनंदानें

देत असत. शेवटचे दिवशीं भंडारा होई व त्यावेळीं जातिभेद–निरपेक्ष मुक्तहस्तानें अन्नदान होत असे. त्यांचें स्वतःचे मत असें होतें कीं हे उत्सव म्हणजे आधुनिक काळांतील यज्ञ आहेत व अशावेळीं वेदोक्त कर्में व्हावीत. विद्वान ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी व मुक्तहस्तानें अन्नदान करावें; व भजनाचा जल्लोष करावा. उत्सवमूर्तिपुढें झालेली महाराजांची किर्तने मी स्वतः ऐकलेली आहेत. त्यांचे किर्तनांत व्यक्ति-विषयक टींका मुळींच नसे. स्त्रीवर्गाविषयीं ते कांहीं टीकात्मक बोलत नसत. इतर किर्तनकार प्रचलित चालिरीति, स्त्रीशिक्षण, नवीन नवीन फॅशन, सामाजिक सुधारणा, राजकीय परिस्थिती वगैरे विषयावर रसभरित वर्णनें करून श्रोतृवर्गांत खसखस पिकवीत! पण महाराजांनीं कीर्तनांत लोकांना आवडते म्हणोन कधींहि विषयांतर केले नाहीं व कोणावर कसलीहि टीका केली नाहीं. त्या कालांत राष्ट्रीय कीर्तनकारांचे भरघोस पीक आले होते! सरकारावर टीका करून त्या कीर्तन-कारांनीं सरकारचा रोष ओढवून घेतला होता.

## अवधूत महाराजांची कीर्तन–पद्धति व वाढती लोकप्रियता

मागील गतगोष्टी बद्दल मी महाराजांचेकडे हा विषय काढला होता. त्या बाबत त्यांचे म्हणणे असे कीं धार्मिक बाबतींत सामाजिक व राजकीय बाबींची गल्लत करू नये. त्यांनी आपला मार्ग सोडला नाही, त्यांनी तत्वज्ञान युक्त वेदांताची पेठ उघडली होती. कोठलेही सणंग काढले तरी त्यांत वेदांत विषय असावयाचाच. गिऱ्हाईकानें आपले योग्यतेप्रमाणें कोठलाहीं सणंग उचलावा. ज्ञान, कर्म, भक्ति, वैराग्य. या कारणामुळे नवीन मतवादी तरुण मंडळींनीं त्यांची किर्तनें आवडत. त्याच प्रमाणे एक पुराणमतवादी पक्ष होता. त्याचे म्हणणे असे कीं "यांचे कीर्तनाला परंपरा नाहीं. रामायण, महाभारत वगैरे पुराणांतील आख्याने नाहींत. गाणे नाही व नको त्या गोष्टी मात्र सांगतात. इतका उघडा वेदांत बहुमान समाजा-पुढें मांडू नये." हा आरोप फार जुना आहे! सातशे वर्षां पूर्वीं श्री ज्ञानेश्वर महाराजानीं महाभारतांतील भगवद्गीतेवर मराठी भाषेंत ग्रंथ लिहिला त्या वेळीं काशी, पैठण वगैरे ठिकाणचे पंडितांनी मोठे काहूर उठविले होते! नामदेव तुकाराम व रामदास यांनाः ही तोच अनुभव आला. "श्री ज्ञानेश्वरी म्हणजे नाथ सांप्रदायांतील गुरु परंपरा प्राप्त समाधि–साधनाचा जगा करितां उघडा करून ठेवलेला मराठी भाषेंतील ठेवा," असे श्री ज्ञानेश्वर महाराज कंठरवानें सांगतात. त्याच नाथ पंथांतील प्रमुख व्यक्तींवर व्याख्याने रचून महाराज कीर्तने करीत व बहुजन समाजाची मनें खेचून घेत. बहुजन समाजाची वाढती लोकप्रियता पंडितांना सहन होत नव्हती. या अहंमन्य पंडितब्रुवानी महाराजाना उघड, प्रच्छन्न' अनुल्लेख

वगैरे साधनांनी अडथळे करणेचा प्रयत्न केला पण महाराजांनीं त्यांचे कडे ढुंकूनही पाहिले नाहीं! किंवा अशा दुष्ट लोकांकडून त्रास होतो म्हणून त्यांनीं आपले कीर्तनांत अशा दुष्ट लोकांवर कधीं टीकाहि केली नाही. तथाकथित दुष्ट लोकांनी कीर्तनास येणाऱ्या स्त्रीश्रोतृवर्गाला त्रास देण्यापर्यंत मजल मारली होती. पण 'कालाय तस्मै नमः!' असे दुष्ट लोक होते तेथेच राहिले, व महाराजांची लोकप्रियता वाढतच गेली.

## अनंत हातांनीं परमेश्वर देतो!

१९११ साल-सातवे एडवर्ड बादशहा नंतर पंचम जॉर्ज, गादीवर बसले त्या सालीं मुंबईस मोठा दरबार भरला होता. मुंबई राज्यांतील सर्व राजे रजवाडे मुंबईस जमले होते. मुंबई इलाख्यांतील पुष्कळ लोक पंचम जॉर्ज बादशहाची मिरवणुक पहाण्या करितां जमले होते. अशा वेळीं मुंबईत मारवाडी विद्यालयांत महाराजांनीं 'दत्त दरबार' थाटला होता. त्यावेळी त्यांचे 'दत्त दरबारांत' अदमासे ३०-४० माणसे होती. मुंबई सारख्या ठिकाणी ४ महिने या सर्व मंडळीचा चरितार्थ रोज मिळणाऱ्या शिध्यावर चालत असे! गुरु शिष्याचे नाते कसे असते, मुंबईतील अशिक्षित समजले जाणारे समाज गुरु म्हणून कसे मानतात त्याचे प्रत्यंतर त्यावेळीं अनेकांना आले आहे. त्यावेळीं महारजांचे सहाध्यायी श्री भाऊसाहेब कुरुंदवाडकर महाराज सरकारी दरबाराकरितां मुंबईस होते. एकेदिवशीं श्री भाऊसाहेब त्याना भेटावयास गेले व म्हणाले कीं "सरकारी दरबार संपला. आम्ही परत कुरुंदवाडला जाणार." महाराज म्हणाले कीं, आमचा मुक्काम कमीत कमी ४ महिने होणार आहे. भाऊसाहेब महाराज म्हणाले, "अरे, मुंबईच्या खर्चाला मी आत्ताच कंटाळलो आहे आणि तूं म्हणतोस कीं आम्ही आणखी ४ महिने राहणार. खर्चाची काय व्यवस्था लेली आहेस." महाराज म्हणाले "अनेक हातानें दत्त महाराज मला देतात. दोन हातांनीं मी किती घेवूं?" पुढें म्हणाले, "बोलून चालून भिक्षेकरी, आम्ही फकिरी घेतलेली माणसे. श्रीपंतमहाराज यांनी आम्हाला पावन करून घेतले. दीक्षा दिली, व आमचे गळ्यांत झोळी बांधली. आम्ही श्री पंतमहाराजांना विचारले कीं आम्ही आमचा योगक्षेम कसा चालवावा. आमचे मागे प्रपंच आहे. श्रीपंत महाराज म्हणाले, तू माझा शिष्य झालास. मला तू आपलें तन, मन धन अर्पण केले आहेस. माझ्या नांवाने खुशाल भीक माग. तुला कांहीं कमी पडणार नाही. 'ब्राह्मणाची मुख्य दीक्षा मागितली पाहिजे. भिक्षा ओम् भवति या पक्षा राखिले पाहिजे."

श्रीमंत भाऊसाहेब महाराजांनीं सर्व बोलणे ऐकून घेतले व महाराजांना म्हणाले "मोरोबा, तुम्हीच हे करू शकाल. आम्ही संस्थानिक खरे, पण आम्हांला मान मिळतो आमच्या गांवी.' 'तुमचा मान सर्वत्र !" विद्वान सर्वत्र पूज्यते हे खरें. तुम्ही कोठेही गेलात तरी या थाटांत राहू शकाल." महाराजांचे पाशीं सोवळे ओवळे फारसे नसे. त्यांनीं पूर्ण विचार करून स्पर्शास्पर्श असा भेदाभेद ठेविला नव्हता, स्पर्शास्पर्शाला तिलांजली दिली होती !

## त्या काळांतील समाजाची ठेवण

त्या काळीं सार्वजनिक गणपत्युत्सव अगर इतर सार्वजनिक उत्सवांत जरासे स्पर्शास्पर्श मर्यादेचें उल्लंघन झाले तर समाजांत मोठे काहूर उठत असे! ब्राह्मण वर्गात स्नान संध्या इत्यादि ब्रह्मकर्माला फार महत्व असे. कर्मनिष्ठ ब्राह्मणाला समाजांत मान मिळत असे. त्यावेळीं ब्राह्मण वर्गाची सुशिक्षितपणाची पातळी हल्लीपेक्षा कमी दर्जाची होती. शहरांत शाळा होत्या. उत्तम हस्ताक्षर व हिशेब ठेवणे इतपत गणिताचे ज्ञान असे. रामायण, महाभारत, यावरील प्रवचने पुराणे, कथा, किर्तने, हेच काय ते बहुश्रुतपणाचे साधन होते. वर्तमानपत्रें फारशी नव्हती. मासिके फारशी नव्हती. या दोन्हीबद्दल लोकांमध्यें फारशी आस्था नव्हती. वर्तमानपत्रावरून मिळणारा जागतिक बहुश्रुतपणा मुळीच नव्हता. बहुजन समाजामध्यें साक्षरतेचे प्रमाण फारच कमी होतें. अशा समाजाला अध्यात्म–जीवनाची तहान भागविणेचें साधन म्हणजे ज्ञानेश्वरी, तुकाराम, नामदेव, दासबोध, यावरील भजने ही होत. या वाङ्मयाचा अभ्यास करून वेदांत विषयाची तहान भागवीत. महाराजांचे गुरु पंत बाळेकुंद्रीकर यांनीं महाराजांना सांगितलें कीं माझ्या नांवाने भीक माग. महाराजांनीं तेंच केलें. गुरूची आज्ञा शिरसावंद्य मानून त्यांनीं नाथ संप्रदायांतील व्यक्तींवर आख्याने रचून व स्वतः रचलेली पद्ये व मुख्यतः पंतवाङ्मयाचा उपयोग करून भक्तीमार्गी कीर्तन करून योगक्षेम चालवूं लागले. पूर्वरंगांत निर्भेळ वेदांत विषय सांगत, त्यामुळें बहुजनसमाजावर त्यांची छाप पडत असे. हेंच कांहीं सुशिक्षित वर्गाला आवडत नसे. आपण कांहीं करावयाचे नाही व दुसऱ्यांनी कांही चांगले केलें तर त्यावर कुत्सित टीका करावयाची ! ब्रह्मोपदेश ब्राह्मणाशिवाय कोणालाही करूं नये, अशी त्या अहंमन्य लोकांची समजूत होती.

"मां हि पार्थ व्यपाश्रित्य ये पि स्युः पापयोनयः ॥
"स्त्रियो वैश्याः तथा शूद्रास्तेऽपि यांति पराम् गतिम् ॥

स्त्रिया, वैश्य, शूद्र चांडाळ कोणीही असो ते परमेश्वराचा आश्रय करतील तर त्यांना परमश्रेष्ठ गति मिळालीच पाहिजे, असा ठाम सिद्धांत भगवान श्रीकृष्णांनीं आपल्या गीतेंत सांगितला आहे. म्हणून महाराजांनी आपल्या कीर्तनांत सांगितले ते पूर्णपणें वैदिक धर्माला अनुसरून होते. शिष्यवर्गाला धार्मिक शिक्षण देत. त्यांत वैदिक तत्त्वज्ञान, नीति व आचार ही तीन धर्मांची अंगें आहेत. तत्त्वज्ञान व नीति याबद्दल मतभेद होणेंचें कांहीं कारण नाहीं कारण ती सर्व आबालवृद्ध समाजाला सारखीच आहेत. आचाराबद्दल त्यांनीं आग्रह धरला नाहीं. ज्याने त्याने आपला कुलधर्म व इतर आचारधर्म आपले पेशाप्रमाणें आचरणांत आणावा, अशी त्यांची शिकवण असे.

## राजयोगी आत्मसाक्षात्कारी अधिकारी पुरुष

१९१२–१३ सालीं महाराजांची कीर्तनें तासगांवी झाली. त्यावेळी आमचे थोरले बंधु तासगांवी होते. ते त्यांची कीर्तने ऐकण्यास जात असत. आमचे बंधु दासबोध व ज्ञानेश्वरीचे अभ्यासू होते. महाराजांची व आमचे बंधूंची पूर्वीची ओळख होती. आमचे बंधु म्हणाले "यांचे कीर्तनांत आम्हांला बऱ्याच नवीन गोष्टी ऐकावयास मिळाल्या. महाराज एक आत्मसाक्षात्कारी अधिकारी पुरुष आहेत. त्यांचे पूर्वसुकृत व संचित फार चांगले असले पाहिजे. योगभ्रष्ट पुरुष पवित्र आणि आध्यात्मिकदृष्ट्या वैभवशाली घराण्यांत पुनः जन्म घेतात व पूर्वजन्मीचा अर्धवट राहिलेला बुद्धियोग त्यांना प्राप्त होतो. महाराज राज्ययोगी होते."

## जावयाची निवड

१९१३–१४ कुरुंदवाडचे गोपाळराव लेले यांचे एक नात्यांतील गृहस्थ श्री. नरहर भावे यांचे श्री गोपाळरावांचेकडे येणें जाणे असे. मुलगा हुषार व चुणचुणीत म्हणोन महाराजांनी श्री गोपाळरावांचें सल्ल्यानें सदरहु मुलाला आपले मुलीकरतां वर योजना करून ठेविली होती. श्री नरहर भावे वऱ्हाडमध्यें हरीकिशोर पत्राचे संपादक मंडळींत होते. पण कांहीं राजद्रोहाचे खटल्यांत ते अडकले. त्यांना शिक्षा झाली व सुटकेनंतर ते जर्मनीला निघोन गेले. १९१४ चे १ ऑगस्टलाच पहिले महायुद्ध सुरू झाले. आतां ते लवकर परत येणे शक्य नाहीं म्हणोन त्या वराचे ठिकाणीं माझी योजना झाली! एके दिवशीं सकाळीं ९–१० चे सुमारास महाराज आमचे घरीं आले. वडील देवपूजेला बसले होते. वडील म्हणाले, "कायहो मोरबा, आज कोणीकडे वाट चुकलांत?" इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी झाल्यानंतर सहज बोलतां बोलतां महाराज म्हणाले, "माझी मुलगी लग्नाची आहे.

आपला मुलगा लग्नाचा आहे व श्री. लेले यानीं मला हें स्थळ सुचविलें आहे. " वडील म्हणाले, " आलें लक्षांत. तुम्ही आमचेकडे पागोटे आणले आहेत, पण डोक्याला घालण्यापूर्वी गुडघ्याला घालून बघतो, बसते कां तें ! बसले तर पुढील गोष्टी. " वडिलांनीं पत्रिका पाहिली नाहीं. फक्त एकदां मुलीला पाहिली व ४ दिवसानीं उत्तर देतो म्हणाले. " समपिढ्या नाहींत. आमचे पणजीपासोन मुलाची ५ वी पिढी व त्याच पणजीचे माहेरची ४ थ्या पिढींतील आपली मुलगी आहे. तेव्हां लग्न जमणेस हरकत नाही. " एवढा खुलासा झाला. याद्या केल्या नाहींत. काय देणें घेणें वगैरे सर्व व्यवहार तोंडीं ठरून मुहूर्त निश्चय करून ठेविला. आमचें विशेष परिचयाचे एक गृहस्थ कट्टर सनातनी होते. ते म्हणाले, " अशा बुवाची मुलगी का करतोस ? " वडील म्हणाले, " माझी पणजी दातार घराण्यांतील आहे. गेल्या ४ पिढ्यांतील त्यांची माहिती मला आहे. अशी चालून आलेली मुलगी मी नाकारू इच्छित नाहीं. महाराजांच्या नात्यांतील एक गृहस्थ म्हणाले, " देवधरांचे घरांत आहे काय ? शेती, घर, दागदागिणे असे विशेष कांहींच नाहीं. तुमचे मानानें ते दरिद्री आहेत ! मुंबईसारख्या ठिकाणीं आपल्या बऱ्याच ओळखी आहेत. एवढी घाई का करतां ? " महाराजांनी उत्तर दिले, " मी पूर्ण विचार करून निर्णय घेतला आहे व मी दिलेला शब्द मागे घेऊं इच्छित नाहीं. " अशा अर्थाचे उत्तर आमचे वडिलांनीं दुसरे एका गृहस्थास दिले होते. अशा लोकांना काय कल्पना असणार की महाराजांची कृपा असल्यावर अन्न, वस्त्र व निवारा याची कमतरता पडत नाहीं ! १९१४ डिसेंबर ता. १४ ला माझे लग्न झालें.

## माझी नास्तिकतेकडे झुकणारी भूमिका

त्यानंतर ५-६ वर्षें मी शिक्षणाकरितां पुणें मुक्कामीं असल्यामुळें महाराजांची व माझी क्वचित गांठ पडे. आम्ही दोघेही एकाच गांवचे असल्यामुळे कांहीं कुटाळ कंपूकडून कांहीं कंड्या माझे कानावर आल्या. त्या मी स्वतः फक्त ऐकून घेतल्या. कारण वडील माणसे जे काय करतात ते आपल्या हिताचेच करतात. त्यांनी केले तेच बरोबर असा माझा माझे माता पितरावर ठाम विश्वास होता, व पत्नीचे माता पिता हे देखील स्वतःचे आई वडिलांइतकेंच वंदनीय आहेत अशीच आम्हांला लहानपणापासोन शिकवण होती. १९२० सालानंतर मी नोकरी निमित्त बहुत करून कुलाबा जिल्ह्यांत होतो व मुंबई जवळ असल्यामुळे वर्षांतून १-२ वेळां ४-८ दिवस त्यांचे सान्निध्यांत राहणेचा योग येत असे. पण घरगुती वातावरण, मान अपमान, प्रापंचिक विचार या गोष्टींत माझे मन रमत नसे. माझे लक्ष असे

तें महाराजांमध्यें साधुत्वाची लक्षणें आहेत काय ? वर्षांनुवर्षें निरिक्षण केल्यानंतर मला दिसोन आले कीं त्यांना मनुष्य स्वभावाची पारख अचूक असे. कोठल्याही गोष्टीचा अचूक निर्णय घेत. कालाचे ओघांत समाजांत जी स्थित्यंतरे होतात त्याचेशीं समरस होत. जुने सोडावयाचे नाही व नवे घेतल्याशिवाय रहावयाचे नाही. सर्व ह्यातींत त्यांनी कधीही पैशाचा हिशोब ठेविला नाही. ! योगक्षेमाची काळजी श्रीपंत महाराजांचेवर ! प्रपंचाची काळजी कधीच केली नाही. जांवई म्हणून विशेष कौतुक त्यांचेपाशीं कांहीं नव्हते. चार शिष्य मंडळीं भोवतीं बसत त्यातच मी असे. माझे बालपणीं मला बऱ्याच तीर्थक्षेत्रांत जाणेचा प्रसंग आला. क्षेत्रोपाध्ये यांचे वागणूकीमुळे माझे मनावर विपरीत परिणाम झाला. त्याचप्रमाणे इंग्रजी शिक्षणाबरोबर धार्मिक शिक्षणाचा अभाव व वर्तमानपत्रे व मासिक पुस्तकें यामधील गुरुशिष्य गुरु परंपरा याविषयी येणारे लिखाण, या सर्वांमुळे मी थोडासा नास्तिकवादी झालो होतो व माझे स्वभावाची अशी ठेवण झाली होती कीं प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय कोठलेही गोष्टीवर विश्वास ठेवावयाचा नाहीं. माझे लहान वयामध्ये आमचे शेजाऱ्याकडे चातुर्मासांत महाभारत रामायण वाचून दाखविणचा प्रसंग येत असे. त्यांतील अद्‌भुत कथा मायावी राक्षस या सर्व भाकड-कथा आहेत म्हणून पुराणावरचा विश्वास उडाला ! त्याचप्रमाणें आद्य शंकराचार्य ज्याना प्रत्यक्ष शंकराचा अवतार समजतात, ज्यांनी कर्मकांडाचे बंड मोडून काढलें व बौद्ध धर्माचे खंडन करून वैदिक धर्माची रचना केली, त्या आद्य शंकराचार्यांचे नांवे जे मठ चालू प्रचलित आहेत त्यांचे अधिपती ज्यांना 'जगद्‌गुरु' असे संबोधण्यांत येते असे संन्याशीं ज्यांनी सर्वसंग परित्याग केलेला असतो, ते मठाचे इस्टेटी करतां इंग्रजी कोर्टांत भांडतात हे जेव्हां मला समजले त्यावेळीं अशा संस्थेविषयीं मनांत शंका उत्पन्न होऊं लागल्या व आपली धर्म संस्था अत्यंत मोडकळीस आलेली आहे. धर्म बंधने कोणी पाळीत नाहींत. व त्यामुळे त्यांचे कांहींच वाकडे झालेले दिसत नाही, मग आपण तरी अशी धर्म–बंधने कां पाळावीत असे विचार मनांत वरचे वर येत ! माझा धर्मावरचा विश्वास उडाला तरी नीति व आचार धर्मांतर्गत प्रामाणिकपणा, सत्य, अहिंसा, आस्तिक्य, अतिथि सत्कार वगैरे गोष्टींचे शिक्षण आम्हांला वडीलभातोश्रींकडून मिळाले असल्यामुळे ते मात्र आमचे आचरणांत येऊं लागले. लोकांचे सांगणेवरून किंवा लोकापवादावर विश्वास ठेवून कोणाबद्दल कधीही गैरसमज करून घेऊं नये, ही शिकवण आम्हांला घरीच मिळाली. माझे लग्न १९१४ सालीं झाले त्यावेळी मी धार्मिक बाबीबद्दल वर वर्णन केलेल्या परिस्थितींत होतो. देशांत एक सुधारणा-

वादी पक्ष होता. त्याची चळवळ चालू होती. व्याख्याने होत होती. मी ती अभ्यासत होतो. त्या सर्वांचा परिणाम काय झाला तर गुरु शिष्य, 'गुरु संप्रदाय या सर्व गोष्टी आमचे देशाला सद्यःस्थितींत मुळींच उपयोगी पडणार नाहींत. धर्म ही एक अफूची गोळी आहे व त्या अफूचे गुंगीत सर्व समाज आहे. त्यामुळे कीर्तनकार, प्रवचनकार, भजनी मंडळें या सर्वांविषयीं मनामध्यें एक तऱ्हेची अढी निर्माण झाली!' 'गुरु' या शब्दाला 'बाजी' हा शब्द जोडून वाङ्मय क्षेत्रांत हा नवीन शब्द शिवी-वजा वापरला जात होता! हे एक तऱ्हेने बरेच झाले. त्यामुळे खऱ्या खोट्याचा निर्णय झाला. महाराजांचे तर्क शुद्ध विचार व्यावहारिक तारतम्य, वास्तववादी विचार सरणी यामुळे मी त्यांचेकडे आकर्षला गेलो. माझे दृष्टीने मी त्यांचे निरिक्षण करीत होतो. त्यांचे ठिकाणी मला साधुत्वाची लक्षणें दिसू लागलीं व कालांतरानें त्यांचे विषयीं मनांत आदर उत्पन्न झाला व सामान्य माणसापेक्षां याचेपाशीं कांहीं-तरी विशेष आहे हे सांठविलेले पाणी नाही, लहानसा कां होईना हा जीवंत झरा आहे, असे मला वाटूं लागले! मुंजी बंधनाचे वेळीं बटूला जो गायत्री मंत्राचा उपदेश पित्याकडून होतो त्याचे शिवाय धार्मिक बाबत आम्हाला इतर गुरु करणेची गरज नाहीं. जे कांही धर्मज्ञान मिळवावयाचे ते स्वकष्टाने मिळविले पाहिजे व त्या करतां वय-परत्वें सोपे, अवघड ग्रंथ वाचले पाहिजेत हे मनाला पटू लागले. महाराजांनीं मला स्वतः निराळे असे कांहींच सांगितले नाहीं. कीर्तने ऐकावीत व केव्हां केव्हां वेदांत विषयावर इतर शिष्य मंडळीं बरोबर चर्चा चाले ती ऐकावी. मला ज्या अर्थी ते कांहींच सांगत नाहींत त्या अर्थी या दत्त सांप्रदायांत मला सांगण्याजोगे कांहीं नाही, अगर मी स्वतः नालायक आहे, याशिवाय दुसरे उत्तर सापडत नाही! पण मला थोडासा श्री मद्‌भगवतगीता वाचणेचा नाद असल्यामुळे माझे वाचनांत अ. १ श्लोक ६७ आला, "इदं ते नातपस्काय ना भक्ताय कदाचन॥ नचाशुश्रुषवे वाच्यं न च मां योऽभ्य सूयति॥ हें गीताशास्त्र कायिक, वाचिक, मानसिक तपाचरण न करणाऱ्याला भक्तिहीन अंतःकरणाच्या पुरुषाला व ज्याला हे श्रवण करण्याची इच्छा नाही त्याला व जो माणूस परमेश्वराचा मत्सर करतो अशा नास्तिकाला कधीही सांगू नये. या गीतोपदेशानें माझ्या शंकेचें निरसन झाले. 'शिष्यत्व पत्करल्या' शिवाय प्रगति होत नाही शिष्य होण्याला कमीत कमी इतके गुण लागतात तें संपादन केले पाहिजेत असे वाटू लागले. गुरू हे फक्त बीजारोपण करीत असतात. त्याला खतपाणी घालणे, हे ज्याचे त्याचे काम आहे. मागे सांगितल्याप्रमाणें 'गुरुबाजी' ही शिवी ज्याला फिट बसते अशा विषयीं आम्हांला काही सांगावयाचे

कारण नाही ! त्या लोकांचा अनुल्लेख सर्वांत उत्तम ! बाकीचे उरले ते सद्गुरु होत. अशा गुरुकडे चार प्रकारचे लोक येतात.

## गुरुकडे येणाऱ्या लोकांचे चार प्रकार

१. **पहिला आर्त**—ज्यांना आधिव्याधींनी गांजले आहे. ज्यांना व्यवहारांत कष्ट झाले आहेत. व्यापार धंद्यांत नुकसान सोसावे लागले आहे. घरगुती भानगडी आहेत. शारिरीक मानसिक दुःखे आहेत व प्रयत्न करून यश मिळत नाही. वंशवृद्धि होत नाहीं. स्वतः कळत नाहीं. मार्ग सापडत नाही असे लोक मग 'निदान गुरुकडे जाऊं' असे म्हणतात. पण अशा भक्तांची श्रेणी खालच्या दर्जाची समजली जाते. पण गुरु मात्र सर्वांशीं समबुद्धि ठेवतात. २. **दुसरा वर्ग जिज्ञासू**—असे अभ्यासू लोक असतात. वाचनाने ज्ञान वाढवीत असतात. व गुरू त्यांना योग्य मार्गदर्शन करतात. ३. **अर्थार्थी**—ऐश्वर्य, भोग वगैरे सर्व गोष्टी गुरुकृपेने मिळाव्यात अशी यांची प्रामाणिक अपेक्षा असते. ४. **चौथा ज्ञानी**—असे लोक फारच थोडे. जवळ जवळ नाहींतच ! हे सद्गुरुपाशीं जातात. त्यांचेकडून स्वरुपानुभव प्राप्त करून घेतात. श्रवण, मनन निदिध्यास करून करून गुरुच्या सानिध्यांत राहून आत्मप्रचिती करून घेतात. महाराजांचे हयातींत त्यांना सर्व प्रकारचे शिष्य भेटले. व शिष्यांचे अधिकारपरत्वें त्यांनीं उपदेश देऊन महाराजांनीं त्यांना जवळ केलें.

## शिष्यांचीं व भक्तांचीं कांहीं उदाहरणें

१९१४ ते १९२० या सालांत महाराजांकडे श्री. नामदेव, व गोपाळभट असे दोघे झांज व पेटीवाले म्हणोन होते. सतत या सानिध्यामुळें त्यांनीं बरींच आख्यानें तोंडपाठ केलीं. महाराजांचा सहवास सोडून स्वतंत्र रीतीनें कीर्तनें करूं लागले. ती फक्त नकल आहे असें लोकांना समजलें ! त्यामुळें पुढें त्यांचीं कीर्तनें बंद पडूं लागली. श्री नामदेव यांनी दत्त-संप्रदाय सोडून वारकरी सांप्रदाय घेतला व पुढें पुढे ते ज्ञानेश्वरीवर प्रवचनें करीत. मी सिवपुरीस नोकरीवर असतांना आमचे कॅंपमध्यें कांहीं भजनी मंडळी आली होती. भजनाकरितां त्यांना सोयिस्कर अशी जागा मिळेना. त्यातल्या त्यांत माझी जागा सोयीची वाटून त्या ठिकाणीं बैठकीची व्यवस्था केली होती. मी घरीं आलो तो आश्चर्यचकित झालो ! मला सर्व हकिकत समजली. पण भजनी मंडळी कोण कुठली याचा कांहीं पत्ता लागेना. पण आणखी एक आश्चर्याचा धक्का बसला. भजनी मंडळीसह श्री नामदेवबुवा आमचे पुढे उभे राहिले ! या योगायोगाबद्दल दोघांना फार समाधान झालें. बोलणीं रंगतां

आलीं. बुवा म्हणाले कीं " मी हल्लीं ज्ञानेश्वरीवर प्रवचनें करतों पण याचें सर्व श्रेय आपले सासरे अवधूत महाराज यांचेकडे आहे. त्यांनीं आमचे ठिकाणी अध्यात्माचे बीजारोपण केलें आहे. त्यांचे सान्निध्यांत आमचा काळ सुखाचा गेला. व हल्लीं ज्ञानेश्वरीवरील प्रवचनें करणें हेंच माझें ऐहिक योगक्षेमाचे एकमेव साधन आहे. "
मी भिवपुरीस असतांना महाराज एका दिवाळींत मजकडे जवळ जवळ १५।२० मंडळी घेऊन आले होते. मजकडे १५ दिवस मुक्काम होता. त्यावेळीं आमचे क्लब मार्फत त्यांचें कीर्तन ठरलें. आमचा कँप अतिशय लहान व त्यांत सर्व धर्मांचे व जातीचे लोक असलेमुळें कार्यक्रमाला श्रोतृवर्ग कसा काय जमतो या बद्दल मी जरासा साशंक होतो. पण आमचे कॅम्पमधील झाडून सर्व स्त्रीपुरुष कीर्तनाला आले होते व १।२ मुसलमान गृहस्थ अगदीं खुष झाले. आमचे एक पारशी अधिकारी, ज्यांना उत्तम मराठी येत होतं असे गृहस्थ, कीर्तन संपल्यानंतर जातीनें पुढें येऊन त्यांनीं महाराजांची चौकशी केली व त्यांनीं दुसरें कीर्तन ठरविलें.

## समारोप

देवधर व दातार घराण्याचे संबंध पूर्वापार आहेत. महाराजांचे हयातींत त्यांचे प्रापंचिक जीवनाविषयीं मी लहान असलेमुळें विशेष लक्ष दिले नाहीं. पण हल्लींचे मठाधिपती ह. भ. प. अण्णाबुवा सर्व कारभार पाहूं लागले त्यावेळीं महाराजांची आर्थिक परिस्थिती फारशी स्पृहणीय नव्हती. एवढेच नव्हे तर त्यांना थोडे कर्ज होतें. पण महाराजांना त्याबद्दल कांहीं वाटत नसे. ते पूर्णपणें बेफेकीर होते. पण अण्णाबुवांना हे खटकत होतें. आण्णाबुवांना मी सांगितले कीं आजपर्यंत तुमचे प्रपंचांत मी लक्ष घातले नाहीं. पण यावेळीं मी तुम्हांला एवढे आश्वासन देतों कीं, " माझा उपयोग तुम्हीं एक हुकमी पत्ता म्हणोन करूं शकतां. मी तुमच्या पाठीशीं उभा आहे. कांहीं काळजी करूं नये. महाराजांचे कृपेनें तुमची इहलोकीची यात्रा सुखानें पार पडेल. " सांगण्यास आनंद वाटतो कीं, महाराज स्वानंदवासी झालेनंतर आजतागायत आमचे संबंध सलोख्याचे व ' एकमेकां सहाय्य करूं ' अशा स्वरूपाचे आहेत.



## भाग १ ला

# आठवण नं. ३

[ लेखक :—श्री. पांडुरंग मोरेश्वर दातार, महाराजांचे नं. २ चे सुपुत्र ॲसिस्टंट कमिशनर ऑफ पोलीस, मुंबई ]

### वयाच्या ८ व्या वर्षी

आमच्या घरी वडील मातुश्रींच्या धार्मिक वृत्तीमुळें, भजन-पूजन वगैरे नियमित चालू असे. त्यामुळें वयाच्या ८ व्या वर्षापासून, ईश्वरनिष्ठा व धर्मश्रद्धा यांचे संस्कार मनावर झाले होते आणि जाणिवेच्या या वयापासून या विषयींची हौस व आवडहि उत्पन्न झाली होती. वडिलांविषयीं आदरयुक्त भीति वाटत असल्यामुळें आम्ही त्यांनीं बोलाविल्याशिवाय, त्यांचेपुढें जात नसूं! आम्हाला काय पाहिजे असेल तें आमच्या आईमार्फत वडिलांचे कानांवर जाऊन आम्हांला त्वरित मिळत असे! वडिलांचा मित–भाषणीपणाचा उदार स्वभावच त्यांच्या विषयींच्या आम्हा मुलांच्या आदराचे भावनेत भर टाकी. एकदां शिमग्यांत गांवांतील वहिवाटीप्रमाणें वर्गणी मागण्यास गल्लीतील मुलें आमचे घरीं आलीं असतां त्यांना वडिलांनीं एकदम ५ रु. काढून दिले! गांवात २५–३० घरीं जाऊन वर्गणीचे ४ रु. देखील जमले नव्हते! सरकारी वाड्यांत देखील १ रुपया मिळे! एक श्रीमंत पण सावकारी वृत्तीचा चिकट मनुष्य स्वतः कांहींहि न देतां मुलांना पैशाचा हिशोब मात्र विचारी! माझ्या वडिलानी चटकन् ५ रु. देऊनहि हिशोब विचारला नाहीं! त्यामुळें सर्व मुलांना आमचेप्रमाणेंच माझ्या वडिलांविषयीं आदर व पूज्यभावना वाटावी, यांत काय नवल!

### आमच्या घराण्याचीं दैवतें

आमच्या घराण्याचें मूळ दैवत देवी, पण आजोबांना शेतांत विहीर खणतांना स्वयंभू दत्तपादुका, दृष्टांत होऊन, लाभल्या आणि आमच्या घराण्याचे आश्रयदाते कुरुंदवाडचे संस्थानिक पटवर्धन हे गणपतिभक्त असल्यामुळें श्रीदत्तोपासना व श्रीगणपतीचीहि उपासना आमच्या घराण्यांत आली! आम्हा मुलांना या तीन्हीही

दैवतांचे पूजन भजन अंगवळणी पडले. विशेषत: वडिलांचा ओढा श्री दत्तभक्तीकडे असल्यानें आम्हावरहि श्री दत्ताविषयींच्या भक्तीचे संस्कार मोठ्या प्रमाणात झाले. श्री दत्तभक्तीप्रमाणेंच दत्तभक्त पंतमहाराज बाळेकुंद्रीकर, यांनाहि माझे वडील गुरुस्थानीं मानूं लागल्यामुळें पंतभक्तीसह श्री दत्तभक्तीच आमच्या बालमनांवर दृढ संस्कार करून राहिली! यामुळे प्रत्येक कार्याचे आरंभी श्रीपंतांचें व दत्ताचे स्मरण करावे आणि दर गुरुवारीं भजने व आरती म्हणण्यांत भाग घ्यावा, असें वळण तारुण्यातच आम्हा तीघांहि भावांना लागलें!

माझे वडील बंधू श्री. दत्तात्रय मोरेश्वर दातार तथा श्री अण्णा यांचे डोळे अधू झाल्यामुळें वयाचे ८ वर्षापासूनच त्यांना भक्तिप्रेमाचा पुरस्कार करणाऱ्या आपल्या अवधूत पंथांत घेऊन कीर्तनव्यवसायांत तरबेज करण्याचा निर्णय आमच्या वडिलांनीं--श्री अवधूत महाजांनी--मनाशीं घेतला आणि त्यामुळें तीन इयत्ता पूर्ण झाल्यावर शाळेंतून काढून अण्णांना बरोबर घेऊन वडील कीर्तनाचे फेरीस अण्णांच्या वयाचे १२ पासून जाऊं लागले. ह्या दृष्टीनें या व्यवसायासाठीं आवश्यक अशी पेटी, तबलादि वाद्यें वाजविण्याचेंहि शिक्षण घरींच अण्णांना देण्यांत आलें. १२-१३ वर्षा-पासूनच अण्णांना लहान वय असल्यामुळें सर्वांना दिसण्यासाठीं टेबलावर उभे राहून कीर्तन करावें लागे! एकदां हुबळीच्या सिद्धारुढस्वामींचें मठांत हजारों श्रोत्यांपुढें टेबलावर ऊभे राहून अण्णांनीं कीर्तन केलें त्यावेळीं या बाळ-हरिदासाचें श्री सिद्धारुढ स्वामींनीं कौतुक करून पाठ थोपटली, असें म्हणतात!

### उत्सव भडगांवी होऊं लागल्यावर

त्या काळांत—१९ व्या शतकाचे अखेरीस व विसाव्या शतकाचे प्रारंभीं प्लेगच्या सांथी येऊं लागल्या. अशा एका सांथीत सरकारी मळ्यानजीक आमच्या घरची सर्वच मंडळी झोपडींत रहावयास गेलीं असतां चोरांनीं धान्य, वस्त्रें व भांडीं साफ लुटून नेलीं! फक्त अंगावरील वस्त्रें तेवढीं राहिलीं! दुसऱ्या दिवशीं पुरुषांना धोतरें व अंगरखें आणि स्त्रियांना लुगडीं चोळ्या बदलण्यापुरतीं स्नेह्यांकडून मागून घ्यावीं लागली! आजोबा व आजी फार प्रेमळ व परोपकारी असल्यामुळें स्नेह्यांनीं त्यांच्या गरजा खुषीनें भागविल्या! याच सुमारास १९०५ चे मध्यावर पंतमहाराज हे वडिलांना अनुग्रह देणारे गुरु, स्वानंदवासी झाले होते. यामुळें आणि घरच्या या विलक्षण आपत्तीमुळेंहि माझ्या वडिलांना तीव्र वैराग्य उत्पन्न होऊन, फक्त समानशील अशा दोन सहकाऱ्यांसह अंगावरील कपडे व एकतारी घेऊन ते काशीयात्रेस गेले! जवळ पैसा नसल्यामुळें मिळेल त्यावर उदरनिर्वाह आणि मिळेल तशा सवडीनें प्रवास करीत २-३ महिन्यांनी ते काशीस पोचले! वाटेंत अनेक अधिकारी

सत्पुरुषाच्या भेटी व आशीर्वाद घेत ते काशीक्षेत्रापर्यंत पोचले. ( या विषयींचा विशेष तपशील श्री. अण्णांच्या श्री अवधूत महाराजांच्या आठवणींत आहे तो पहावा. ) १९०६ चे मध्यांवर माझे वडील या खडतर काशीयात्रेहून परत गांवीं आले. मग चातुर्मास भजन कीर्तन व पंताचा जन्मोत्सव आणि पुण्यतिथीचा उत्सव श्री. लेले यांचे वाड्यांतील सोप्यावर अधिष्ठान मांडून केला. १९०७–०८ मध्यें श्री अवधूत महाराजांनीं आपल्या मातुश्रीना घेऊन ( माझे आजोबा व आजी ) आणि बरोबर कीर्तनाला आवश्यक असें साथीदार वाद्यांसह घेऊन काशीयात्रा केली. सुरवातीस बरोबर फक्त १० रु. उसने काढून घेतलें. खर्ची संपेपर्यंत प्रवास करावा. खर्ची संपेल त्याठिकाणीं कीर्तनें करावीं. त्या उत्पन्नांतून पुढील शक्य ती मजल मारावी फिरून मुक्कामाचे गांवीं कीर्तन, अशा क्रमानें ते खानदेशांत चाळिसगांवपर्यंत पोचलें. चाळीसगांवचे श्री सहस्रबुद्धे वकील यांना श्री. अवधूत महाराजांच्या कीर्तनांतील विवेचन शैली, आणि वेदांत सुलभ करून सांगण्याची हातोटी फारच आवडल्यामुळें त्यांच्या मार्गदर्शनानें चालणाऱ्या भडगांवांतील रामनवमीच्या उत्सवांत महाराजांची कीर्तनें जास्तच लोकप्रिय झाल्यामुळें त्यांना ५०० रुपये पर्यंत प्राप्ती झाली व तेथून थेट सर्वांचीं काशीचीं तिकिटें काढून महाराज काशीस पोंचले. श्री क्षेत्र काशीतहि श्री काशी विश्वेश्वराच्या प्रसादानें त्यांना कफनीवर शैली प्रसाद म्हणून मिळाली व तेव्हां पासून ते कीर्तनातहि कफनीवर शैली वापरूं लागले. भडगांवच्या लोकांनीं आग्रहानें दुसऱ्या वर्षीं रामनवमीस बोलावल्यामुळें महाराज तिकडे गेले. पूर्वखानदेशांत अनुग्रहीत भक्तांचीं संख्या बरीच वाढल्यानें तिकडे श्रीदत्तमठीचें अधिष्ठान निर्माण करण्याचा आग्रह फार होऊं लागला ! तेव्हां महाराजांनीं भडगांवींच जागा घेऊन दत्तपीठ निर्माण करण्याची योजना तयार करून एक जागाही खरीदली आणि तिथें मठी तयार झाल्यावर १९२३ सालापासून तिकडे कुरुंदवाडास होणारे सर्व उत्सव सुरूं झाले. यावेळी मी अंदाजे १२ वर्षांचा असून इंग्रजी शिकूं लागलों होतों. कुरुंदवाडचे उत्सव बंद झाल्यामुळें मनाला उदास वाटूं लागलें ! एका रात्रीं श्रीपंतमहाराज स्वप्नांत येऊन मला म्हणाले " उदास कशाला होतोस मुला, मी येथेंहि आहेच." यामुळें उत्साह वाटला आणि कांहीं मित्रांचें सहकार्य घेऊन जन्माष्टीचा व इतर उत्सव कुरुंदवाडास आम्ही घरींच लहान प्रमाणांत करूं लागलों. त्यावेळीं माझा धाकटा भाऊ चि. अनंता नुकताच शाळेंत जाऊं लागला होता. मी या वयांत पोहणे, फुटबॉल लॉंग जंप व हाय जंप वगैरे शारीरिक कसरतीच्या व्यायामांत तरबेज होऊन बक्षिसें मिळवूं लागलों ! शाळा व संस्था यांच्यामार्फत होणाऱ्या सामन्यांत बक्षिसें मिळविणाऱ्यांची वर्णनें नांवासह सांगलीच्या एका

साप्ताहिकांत प्रसिद्ध होऊं लागलीं. कृष्णा पंचगंगा नद्यांच्या पुरांत पोहोण्याचे धाडसी विक्रमांविषयीची वर्णनें त्या साप्ताहिकांत एका भक्तानें वाचून त्यांतील माझें नांव मुंबईच्या एका भक्तानें महाराजांना कौतुकानें सांगितलें. तेव्हां 'पुरांत पोहोण्याचें धाडस करूं नको' असा कडक इषारा मला पाठविलेल्या पत्रांत वडिलांनीं दिला ! तेव्हांपासून पोहोण्याचे विक्रम बंद झाले ! कारण माझा एक तरुण व हुषार चुलता अपघातानें पंचगंगेच्या डोहांत बुडून त्याचा हृदयद्रावकरीत्या अंत झाला होता, तें चित्र माझ्या वडिलांचे स्मृतींत अगदीं ठळक होतें !

भडगांवी उत्सव सुरूं झाल्यानंतर हायस्कुलांत, कॉलेजांत किंवा नोकरीवर असतांना मी भडगांवी मधून मधून जाऊं लागलों. त्यावेळीं अध्यात्म-चर्चा ऐकण्याची संधि मिळून परमार्थाची स्वभावांत असलेली आवड वाढत गेली. सांगली कॉलेजांत प्रीव्हियसचे पहिले वर्ष काढल्यानंतर कसरतीच्या सामन्यांत भाग घेऊन—शरीर बऱ्यापैकीं कमाविलें असल्यामुळें माझ्या मनांत लष्करांत नोकरी करण्याची महत्त्वाकांक्षा निर्माण झाली होती. परंतु ब्राह्मणाला लष्करांत नोकरी मिळणें अशक्यप्राय ठरण्याचा तो काल होता व तशा अडचणी मलाहि आल्या; अखेर खूप प्रयत्नानतर नाशिक पोलीस ट्रेनिंग स्कूल मध्यें जाण्याची संधि मिळून तो कोर्स मी चांगल्या रीतीनें पुरा केला. येथेंहि ब्राह्मणाला प्रवेश मिळणें कठिणच होतें ! नंतर पोलीस खात्यांत नोकरीसाठीं अर्ज टाकून कोठे तरी नेमणूक होणार हें नक्की झाल्यानंतर १९३४ डिसेंबरला मी भडगांवीं जाऊन यूनिफॉर्म घालून वडिलांना–महाराजांना–नमस्कार केला (या वेळेपर्यंत वडिलांच्या ठिकाणीं दैवी गुण असल्याची श्रद्धा अंतःकरणांत उत्पन्न झाली होती. यामुळें यापुढील आठवणींत 'महाराज' या संबोधनानेंच मी वडिलांचा उल्लेख केला आहे) त्यांच्याच शुभाशीर्वादानें माझी सातारा जिल्ह्यांत पोलिस सबइन्स्पेक्टरचे अधिकारावर नेमणूकही झाली !

मी सातारा जिल्ह्यांतील पोलीस अधिकारी असतांना मेढे या तालुक्याचे गांवीं महाराज प्रवासाकरितां माझे वडील बंधू श्री. अण्णा यांनीं तयार केलेल्या मोटार लॉरीतून अण्णासह व कांहीं भक्तांसह आले. तेथें मामलेदार असलेले भडगांवचे श्री. चौधरी यांच्या आग्रहानें जाहीर कीर्तन झालें. तें कीर्तन ऐकल्यावर महाराजांना त्यांचे भक्त 'दैवी अवतार' कां म्हणत याची जाणीव मलाहि पटली !

सातारा जिल्ह्यातील वडूज तालुक्यांत दरूज दरजाई या गांवीं एक बेरड रामोशांची टोळी होती, या टोळीचा दरारा आसपासच्या सर्व गावांना होता ! वाटेल त्यांचे घर लुटून फस्त करणें, खून, जाळपोळ करणें आणि तरुण बायकांना

पळवून त्यांना शीलभ्रष्ट करणें, यामुळें लोकांचा थरकांप होत असे! ह्या टापूंतील पोलीस अधिकारी डॉक्टर व वकील यांनाहि या दरोडेखोरांनीं लांचलुचपतीनें आपलेसे केल्यामुळें त्यांचा कोर्टामार्फत बंदोबस्त करणेंहि अशक्यप्राय झाले होतें! या वेरडांच्या टोळीचा बंदोबस्त करण्याची नाजूक जोखमीची आणि भयंकर धोक्याची जबाबदारी माझेकडे आली असतां ती मी पत्करली! त्यावेळीं सातारा जिल्ह्याचे एक वजनदार अधिकारी गृहस्थ श्री. सोनटक्के यांच्या घोड्याचे कान भर दिवसा कापण्यापर्यंत या बेरड दरोडेखोरांच्या धाष्टर्यांची मजल गेली होती! यावरून या भयंकर धोक्याच्या जबाबदारीची कोणालाहि कल्पना येईल!

## जिवावरच्या प्रसंगांतून वांचलों!

भयंकर धोका पत्करल्यावर सदरील दरोडेखोर बेरडांनीं नुकत्याच केलेल्या अत्याचारांची चौकशी व बंदोबस्त करण्यासाठीं मी माझ्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या संमतीनें ही कामगिरी पार पाडण्यासाठीं असा बंदोबस्त करून घेतला होता कीं माझी सूचना होईल त्याप्रमाणें सांगितलेल्या वेळी व ठरविलेल्या स्थळीं आगाऊ समजून दिलेली खूण केल्याबरोबर २५ पोलीस बंदुका रोखण्यास सुसज्ज पाहिजेत!

दरोडेखोर बेरड रामोशी असलेल्या जागीं त्यांना मी त्यांच्या वगीच्या माणसा-बरोबर असा निरोप पाठविला कीं तुमच्या आरोपात मला विशेष तथ्य दिसत नसल्यामुळें तुमची औपचारिक जबानी अमूक दिवशीं अमूक वेळीं मी निःशस्त्र दोन तीन पोलिस बरोबर घेऊन येऊन घेणार आहे, तेव्हां तुम्ही त्यावेळी त्या ठिकाणीं हजर रहा. असा निरोप पाठवून मी वरकरणी २–३ निःशस्त्र पोलीस घेऊन निघालों. (संकेता प्रमाणे या जागी 'इषारा झाला कीं बंदुका रोखण्यासाठीं २५ पोलिसांची तुकडी थोड्याच अंतरावर गुप्त रीतीनें सुसज्ज ठेवलीच होती!') त्या गांवाकडे आम्ही निघालों असतां अर्ध्या वाटेवरच आम्हांला या वेरड रामोशांच्या जुलमामुळें त्रस्त झालेल्या कुटुंबातील एक तरुण मुलगा भेटून म्हणाला, "तुम्ही पुढें जाऊं नका! तुमच्या जिवाला भयंकर धोका आहे! कारण वरून संभावितांचा पेहेराव करून जबानीला येणाऱ्या वेरड रामोशांनीं तुम्हांला ठार मारण्याचा कट रचला असून सभ्य पोषाखाखालीं प्राणघातक शस्त्रें घेऊनच ते येणार आहेत!" "आम्हांला सावध केलेंस हें ठीक, पण आम्ही त्याचाहि बंदोबस्त करून आलों असल्यामुळें जबान्या घेण्याचे जागीं आम्ही जाणारच" असें उत्तर देऊन आम्ही पुढें गेलों! तो बेरड रामोशांचा भयंकर पुढारी आपल्या दोन तीन दोस्तांसह जबानीच्या जागीं आला. इषारा देणाऱ्या मुलानें सांगितल्याप्रमाणें वरकरणी सभ्य दिसणाऱ्या वेषांत तो व त्याचे अनुयायी दिसले. दोन तीन जुजबी प्रश्नोत्तरें झाल्यानंतर मी म्हटलें

"तुम्ही सांगता तशी परिस्थिती असेलहि, पण संशय घेण्यासारखा ताजा पुरावा आमचे हातीं आल्यामुळें तुम्हांला तूर्त अटक करण्याचा आम्हांला हुकूम आहे" माझ्या तोंडचे हे शब्द पुरे होतात न होतात तोंच त्या रामोशांनीं वरचा पोषाख काढून टाकून आपली शस्त्रें परजली! मीहि ठराविक खूण केल्याबरोबर थोड्याच अंतरावर छपून असलेल्या २५ सुसज्ज पोलिसांनीं आपल्या प्राणघातक बंदुका दरोडेखोरांच्या छाताडांशीं भिडवल्या! यामुळें निमूटपणें आपले सुरे खालीं ठेवून आणि हात वर करून पुढाऱ्यांसह सर्व वेरड शरण आले! पुढें साक्षीपुरावा जय्यत तयार असल्यामुळें त्या भयंकर वेरड रामोशाला त्याच्या साथीदारांसह १० वर्षें तुरुंगांत पाठविण्यांत आलें! त्या गांवचे व आसपासच्या गांवचे लोकहि हा बंदोबस्त झाल्यामुळें निश्चिंत होऊन हा बंदोबस्त करण्याबद्दल पोलिसखात्याला सर्वांनी धन्यवाद दिले. कारण अनेक धनिकांना या भयंकर दरोडेखोरांनीं लुटून दरिद्री बनविलें होतें, अनेक निरपराधी लोकांचे खून पाडले होते. त्यांच्या जाळपोळी-सारख्या अत्याचारांना सुमारच नव्हता. रंगूबाई व तिची सून या सारख्या अनेक स्त्रियांची भरदिवसा इज्जत घेऊन त्यांना 'नको जीव' केला होता! या सर्वांचा दुवा घेण्यासारखी कामगिरी पार पाडण्या इतका सावधपणा आणि धैर्य मला महाराजांच्या कृपाशीर्वादानें लाभलें असा माझा श्रद्धायुक्त प्रत्यक्ष अनुभव आहे!

## सर्वांत वडील मुलगा चि. बाबू याचा जन्म

सातारा जिल्ह्यांतील दहिंवडी या गांवी नोकरी निमित्ताने रहात असता माझा सर्वांत मोठा मुलगा चि. बाबू (उर्फ केशव) याचा जन्म झाला. झालेल्या अंतःप्रेरणेनें त्याला आमच्या आजोबांचें नांव ठेवण्यांत आलें. "तो अण्णा काकांच्या सारखा (आमच्या आजोबांसारखा) दिसतो" असें त्याला पाहून महाराज म्हणाले! आम्हीं मुलें त्यांना भिऊन त्यांचेपुढें जात नव्हतों. पण नातवंडांना महाराज स्वतःजवळ घेऊन त्यांचें कौतुक करीत, असा अनुभव आम्हांला आला.

नंतर माझ्या वाईच्या मुक्कामांत चैत्र पाडव्याचे दिवशीं मार्च १९४१ सालीं माझा दुसरा मुलगा चि. वसंत याचा (महाराजांच्या पुण्यतिथीच्याच दिवशीं म्हणजे चैत्र पाडव्याचे रात्रीं १०-११ चे सुमारास) जन्म झाला. कौतुकाची गोष्ट ही की महाराजांच्या ठिकाणीं जे सहज स्वाभाविक औदार्य होतें ते या मुलाच्या सहज स्वभावांत दिसून आलें. मी मॅट्रिक झालों त्यावेळीं महाराजांना एक सोन्या-चाच छडा असलेलें एक सोन्याचें घड्याळ एका श्रीमान् भक्तानें दिलें होतें.

त्यावेळीं नुकताच मी मॅट्रिक झालों होतों, तेव्हां कॉलेजांत जातांना हातावर रिस्टवॉच असावें अशी इच्छा माझ्या मनांत होती. पण महाराजांनीं त्याना भेट म्हणून आलेलें तें घड्याळ, मागण्याची धिटाई करणारे माझे एक जवळचे आणि महाराजांकडेच लहानाचे मोठे झालेले नातेवाईक, श्री. रामभाऊ पंचनदीकर जोशी यांना देऊन टाकलें! चि. वसंतनेंहि आपल्यासाठीं घेतलेला एक ४००-५०० रु. किंमतीचा ट्रॅन्झिस्टर रेडिओ आमच्या प्रामाणिक आणि झटून कामें करणाऱ्या ड्रायव्हरला बक्षीस दिला. तसेंच एक भारी किंमतीचा सुंदर जर्सी आपल्या काकांना चि. अनंतला--आवडलेला दिसल्याबरोबर त्यांना दिला. त्याच्या या सहज स्वभावांत, त्याच्या आजोबांचें, महाराजांचें, औदार्य, स्पष्ट दिसून आल्यामुळें आम्हां तिघाहि भावांना कौतुक वाटलें!

महाराजांच्या कृपेचा आणि शुभाशीर्वादांचा वाढता अनुभव येऊं लागल्या-मुळें महाराजाविषयीं आणि त्यांच्याच प्रेरणेनें अंतःकरणांत वाढत गेलेल्या दत्तभक्ती विषयीची श्रद्धेची भावना वाढीस लागली आणि नित्य थोडें थोडें गुरुचरित्र वाचावयाचे आणि वर्षांतून एकदां गुरुचरित्र सप्ताह करावयाचा असे मी ठरविलें आणि त्याप्रमाणें आजतागायत करीत आलों. १९३५ सालीं मी भडगांवी श्री दत्तमठींतील औदुंबराखालीं बसून गुरुचरित्राचा सप्ताह केला. विवाह झालेल्या दिवशी रात्रींच मी महाराजांचा अनुग्रह घेतला होता.

× × × ×

## महाराजांनीं अनेक दृष्टांतांनी मला धीर दिला!

१९३९ साली महाराज चैत्रपाडव्याचे रात्रीं एकाएकीं स्वानंदवासी झाले! तार आल्याबरोबर श्री. अण्णा व चि. अनंत हे दोघे दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं भडगांवीं पोचलें, पण तोपर्यंत निकटच्या भक्तांनीं महाराजांचा पार्थिव देह ठेविल्यामुळें त्या दोघांना, महाराजाचें अंत्यदर्शन तरी झालें; पण माझ्या नोकरींतील विलक्षण अडचणीमुळें महाराजांच्या अस्थीविसर्जन समारंभादिवशीं मी भडगांवास पोचूं शकलो. महाराजांचे अंत्यदर्शन न झाल्यामुळे मला अवर्णनीय दुःख झाले; पण श्री अवधूत महाराजानी यावेळीं आणि यानंतरहि मी संकटांत असल्यावेळींहि स्वप्नांत येऊन धीर दिला या विषयीं धन्यता नमूद करावी तितकी अपुरीच ठरेल!

पुणे कॅंटोनमेंट मध्ये १९४९-५० चे दरम्यान इन्स्पेक्टरचे नोकरीवर असतांना शिपायाने केलेल्या एका गंभीर स्वरूपाच्या गुन्ह्याकडे दुर्लक्ष केल्याचा आरोप माझेवर ठेवून वरिष्ठांनीं माझेवर खटला भरला होता, त्यामुळें मी कितीतरी दिवस

मोठ्या फिकीरींत होतों. त्या प्रसंगी एका रात्रीं महाराजांनीं स्वप्नांत धीर देऊन सांगितलें " भिऊं नकोस तूं या किटाळांतून सहीसलामत निर्दोषी ठरून बाहेर पडशील. " स्वप्नांतील या दृष्टांताप्रमाणे मी कांहीं दिवसानीं कोर्टांत निर्दोषी ठरून मी चिंतामुक्त झालों. इतकेंच नव्हे तर लवकरच माझी नाशीकला बदलली होऊन वरिष्ठ अधिकाऱ्याचे वक्रदृष्टींतून मी दूर झालों !

नाशीकला जाण्यापूर्वीं मी गाणगापूरला जाऊन त्या पवित्र श्रीदत्त स्थानाचें दर्शन घेऊन आलों. नाशीकला मी २॥ वर्षें नोकरी केली. माझी पहिली प्रेमळ व कर्तव्यदक्ष हुषार पत्नी पुण्याचे मुक्कामांत व त्या पुढें कांहीं वर्षें कॅन्सर सारख्या अगदीं दुष्ट आजारानें त्रस्त झाली होती ! माझ्या या पत्नीची सहा वेळां, कॅन्सर रोगावर इलाज म्हणून, ऑपरेशन्स करावी लागली ! प्रत्येक वेळीं मोठीच चिंता वाटे. प्रत्येक वेळीं महाराज स्वप्नांत येऊन धीर देत; त्यामुळें मला तर धीर वाटेच पण माझ्याहिपेक्षां विलक्षण धैर्यानें माझ्या त्या पत्नीनें शस्त्रक्रिया सहन केली ! पण अखेरीस त्या दुष्ट दुखण्यानें बिचारीचा बळी घेतलाच ! त्यावेळीं मला व तिच्या पांच मुलांनाच ( ३ मुलगे व २ मुली) नव्हे, तर आम्हां सर्वंच कुटुंबियांना आणि जवळच्या आप्तांना झालेल्या तीव्र दुःखांचा उल्लेख करीत नाही ! मात्र महाराजांनीं याहि प्रसंगीं स्वप्नांत येऊन सांत्वन केलें आणि धीर दिला ! हा अतिशय दुःखाचा प्रसंग १९५३ सालीं घडला !

## भक्ति, श्रद्धा व उपासना दृढ होत गेली

महाराजांच्या कृपेनेंच माझा दुसरा विवाह १९५५ सालीं झाला. ही माझी पत्नीदेखील मला व मुलांना अत्यंत प्रेमानें व मोकळ्या अंतःकरणानें वागवून सांसारिक कर्तव्यें आनंदी वृत्तीनें व सुगृहिणीला शोभेल अशीं करीत आहे, ही देखील महाराजांचीच कृपा !

महाराजांच्या, मला धीर देऊन सावध रहाण्याविषयींच्या अनेक दृष्टांतामुळें, मी परमार्थमार्गांत विशेष लक्ष घालूं लागलों. आतां माझे निवासस्थानीं, श्रीदत्त, पंत महाराज व अवधूत महाराज यांची एकत्र काढलेली रंगीत तसबीर, पूजेंत आहे. उठून नित्याचे उद्योगाला लागण्यापूर्वीं या अधिष्ठानाला माझ्या कुटुंबांतील सर्व माझ्याप्रमाणेंच वंदन करतात. दोन्ही वेळां जेवणापूर्वीं वंदन व स्मरण करून जेवावयास बसतात. आपापल्या उद्योगासाठीं बाहेर पडतांना वंदन करून जातात; रात्रीं ८–८॥ पर्यंत माझी वाट पाहून सर्वजण जमून आरती, नित्य भजनाचीं पदें म्हणून मग जेवावयास बसतों. दर गुरुवारीं मी रात्रीच्या आरतीला शक्य ती सवड

काढून हजर रहातोच. एकंदरींत माझ्या कुटुंबांतील लहानथोर सर्वांनाच श्रीदत्त-भक्ति व गुरुभक्ति यांचें स्वाभाविक वळण लागलेलें पाहून मनाला समाधान वाटतें.

## एक कोटी जपाचा संकल्प

अनेक अनुभवांनीं प्रौढ वयांत नाम-महिम्याचें महत्त्व पटलें. प्रौढ वयांत महाराजांची फक्त दोनच कीर्तनें लक्षपूर्वक ऐकण्याचा योग अपूर्वाईनें मला आला. त्यामुळें तारकमंत्रानें माझ्या हृदयाचा ठाव घेतला! या दोन्ही कीर्तनांत महाराजांनी तारकमंत्राची ( ॐनमः शिवाय ) उत्कृष्ट मांडणी आणि स्पष्टीकरण केलें होते. १९५७ सालीं या तारक मंत्राचा कमीत कमी १ कोटी जप करण्याचा संकल्प मनाशी करून तशी सुरवातहि केली. मन एकाग्र करून बसल्यावर अगर अंथरुणावर पडल्या पडल्या, दररोज ३००० ते ३३०० जप तारकमंत्राचा करावयाचा व तेवढीच संख्या जमेस धरावयाची. ऑफीसला मोटारींतून जातांना व केव्हां केव्हां मन रिकामें असेल त्यावेळीहि मंत्रजप करण्याची मी संवय जडवून घेतली आहे. पण अशारीतीने जपलेली मंत्रसंख्या मी मोजीत नाही आणि जमेसहि धरीत नाही. अंतःशुद्धि साधणे आणि शरीराचें अंतःपावित्र्य राखणें, हाच या जप करण्यामागील हेतू आहे. त्यामागें कसल्याहि कामनेचा संकल्प नाहीं. मात्र अनुभव प्रत्यक्ष येतो तो असा की, हाती घेतलेल्या खाजगी अगर नोकरीच्या कामात कितीहि अडथळे आले तरी अखेर यशच मिळते! वरील पद्धतीने मोजलेला जप आतांपर्यंत ९० लाख झाला आहे. १ कोटी जपसंख्या पुरी झाली कीं कांहींतरी समारंभानें त्याची सांगता करणार आहे. अर्थात् त्याची कांहीं संख्येने मर्यादा ठरविण्याचा नवा संकल्प आज तरी केलेला नाहीं.

मी वर्षातून एकदां सत्यनारायण करतो परंतु तो कांहीं कामना मनांत धरून करीत नाहीं. सत्यनारायणासारखीं व्रते बहुतेक लोक कामनेनें करतात, त्याचें परमार्थदृष्टीनें मूल्य व महत्व असें नाहीं. असें महाराजांनी एके ठिकाणीं म्हटलें आहे.

तात्पर्य परमार्थाच्या दृष्टीनें कामनेने केलेलीं व्रतें अज्ञानमूलक आहेत. वास्तविक गुरुकृपेने परमेश्वरदर्शन घेणाऱ्याला उणीव पडून भीक मागण्याचें काय कारण ? ...... म्हटलें आहेः—

राजयाची कांता काय भीक मागे! .........

प्रौढवयांत जाणतेपणीं महाराजांची कीर्तनें एकाग्र मनानें ऐकण्याचा योग दोनदाच आला.

## आणखी कांहीं अविस्मरणीय आठवणी

१९३१ सालीं मेघःश्याम बुवांचेमुळें त्यांच्या बांबवडे गांवीं महाराजांचा कीर्तन सप्ताह झाला त्यावेळीं कांही विरोधक उपद्व्यापी लोकांनी कट करून महाराजांच्या कीर्तनाचे जागे लगतच्या जागेंत दुसऱ्या एका हरदासांचें कीर्तन करविले आणि गडबड गोंधळ उडवून महाराजांची कीर्तनें बंद पाडण्याच्या कारवाया केल्या! पण प्रकार असा झाला कीं त्या दुसऱ्या हरदासांचे कीर्तनांतील बहुतेक श्रोते श्री अवधूत महाराजांचें कीर्तन ऐकण्यासाठीं त्यांच्या कीर्तनाचे पटांगणांत येऊन बसले. मूठभर विरोधक व त्यांचे सहकारीच त्या बुवांचे कीर्तन ऐकण्यास शिल्लक राहिले! यामुळें त्याच हरदासांनीं आपलीं कीर्तनें बंद केली!

## औदुंबराचे ढापीनें अपघाताचा इषारा!

१९४१ सालीं दिवाळीच्या रजेत, मी माझे सख्खे मेहुणे श्री. दत्तात्रय कृष्ण देवघर, इलेक्ट्रिक ऑपरेटर, मिवपुरी पावर हाऊस, यांचे मिवपुरी कँपांत गेलों असतां, कँपांतील बडे छोटे नोकरांचा फुटबॉलच्या सामन्याचा खेळ झाला. त्यांत मीहि भाग घेतला पण गोल करण्याचे धामधुमीत एका हातावर भार पडून माझा हात मोडला! त्या दिवशीं त्याच वेळीं भडगांवीं मठीतील बागेंत लावलेल्या औदुंबराची एक ढापी एकाएकीं मोडली! त्या वेळीं मनाला धक्का बसून माझे वडील बंधु श्री. अण्णा म्हणाले, "अगदीं जवळच्या व निकटच्या कोणालातरी अपघात झाल्याचा हा इषारा आहे." मठीत घडलेल्या अशा प्रकारांनीं अनेकदां असे इषारे सावध रहाण्यासाठीं आम्हा कुटुंबीयांना मिळालेले आहेत!

• • •

## भाग १ ला

# आठवण नं. ४

[ लेखक : श्री **अनंतराव मोरेश्वर दातार,** श्री अवधूत महारांचे तृतीय चिरंजीव, वीव्हिंग मास्तर श्री मधुसूदन मिल्स मुंबई. ]

माझे वडील–परमपूज्य दादा–हे परमपूज्य श्रीमंत महाराज बाळेकुंद्रीकर यांचे अनुग्रहीत होते. श्री पंतमहाराजांच्या आज्ञेवरूनच माझ्या परमपूज्य दादांनी कीर्तन व्यवसाय पत्करला. ‘ प्रपंच साधून परमार्थहि कसा साधावा ’ हें स्वतःच्या प्रत्यक्ष आदर्श आचरणानेंच त्यांनी जगाला दाखविलें ! आपल्या भक्त मंडळींना दोघांनींहि स्वोदाहरणांनीं आदर्श देऊन तसा उपदेशहि केला.

पंतमहारांच्या आज्ञेनुसार माझ्या परमपूज्य दादांनीं आपलें मूळगांव कुरुंदवाड येथेंच चातुर्मासाचें चार महिने कीर्तन केलें, नंतर गांव सोडून बाहेर गांवी कीर्तनास जाऊं लागले. सद्‌गुरु महिमा, गुरुभक्ति, गुरुशिष्य ऐक्यभाव व बंधुप्रीति यांचा महिमा दोघांहि सत्पुरुषानीं आपल्या भक्तमंडळीपुढें आम जनतेच्या हितासाठीं प्रतिपादन केला.

### श्री अवधूत महाराजांची निस्सीम गुरुभक्ति

यापुढें मी ‘ माझे परमपूज्य दादा ’ याऐवजीं ‘ श्री अवधूत महाराज ’ असाच उल्लेख करीत आहे.

माझे वडील परमपूज्य श्री अवधूत महाराज यांच्या नजरेसमोर सदैव श्रीपंत सद्‌गुरु यांचें ध्यान आणि हृदयांत त्यांचा आध्यात्मिक ज्ञानबोध सदैव जागृत असे.

आपल्या सद्‌गुरूंचा आध्यात्मिक बोध सर्वत्र व्हावा हाच कीर्तनपेशा पत्करण्यांत श्री अवधूत महाराजांचा हेतु होता. त्यांनी मोठमोठ्या शहरांत जाऊन आपल्या सद्‌गुरूंच्या कीर्तींत भर घातली. गुरुभक्ति कशी करावी, कोणत्या उपायांनी ती आत्मसात् करावी, गुरुभक्तीनेंच मानवी जीव, मुक्ती कशी साध्य

करूं शकेल, इत्यादि विवरण अगदीं सोप्या भाषेंत करून श्री अवधूत महाराज गुरुभक्तीला अनुसरूनच उत्तर रंगाचें आख्यान लावीत. ज्या ज्या शहरच्या मंदिरांत त्यांचे कीर्तन होई तेथें तेथें कीर्तन ऐकण्यासाठीं श्रोत्यांची अलोट गर्दी जमूं लागली होती. माझे वडील 'श्री अवधूत महाराज' कीर्तनानिमित्त ७-८ महिने मोठमोठ्या शहरांतून फिरती करीत मग विश्रांति-साठी मूळ गांव कुरुंदवाड येथें येत. माझें वय त्यावेळीं अंदाजें ९-१० असावें. लहानपणीं वडिलांचें समोर जाण्यास भीति वाटे. मला कांहीं पाहिजे असल्यास मी माझ्या आईच्या मागें टुमणें लावी! मग आईमार्फत माझें मागणें वडिलांचे कानांवर जाई. लहान्‌पणापासून माझें कोडकौतुक फार झाले. घरीं पूजाअर्चा भजन वगैरे कार्यक्रम वारंवार होत. वडिलांचें उदाहरण माझे समोर असल्यामुळें त्या धार्मिक व आध्यात्मिक कार्यांचे संस्कार माझ्या मनावर चांगले ठसत.

## मातेकडून मार्गदर्शन

श्रीकृष्णजन्म, श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांचा जन्मकाळ व श्रीदत्तजयंती हे उत्सव त्यावेळीं आमच्या घरीं थाटानें साजरे होत. त्यासाठीं दूर दूरची भक्त-मंडळी आमचे घरीं येत. त्या प्रेमळ भक्तमंडळीचा मला सहजच सहवास होत गेला. या भक्तांना माझे वडील श्रीअवधूत महाराज किती प्रेमानें व आपुलकीनें वागवितात याचाहि अनुभव मला येऊं लागला. या भक्त मंडळीशीं कसें वागावें, त्यांची बडदास्त कशी राखावी, याचें मार्गदर्शन माझ्या आईकडूनहि मिळे. माझे वडील कीर्तनानिमित्त बाहेरगांवीं फिरतीवर असतांना देखील आल्या गेल्यांची व्यवस्था माझ्या सौ. मातुश्रीनाच पहावीं लागे. बाजारहाट करणें, नित्यनैमित्तिक धार्मिक समारंभ, पूजा, आरती वगैरे व्यवहार मी व माझे मधले बंधु श्री. पांडुग-तात्या-यांचेकडून आई करवून घेई. आमच्या खाण्यापिण्याची व तब्येतीची व्यवस्थाहि आई चांगल्या प्रकारें ठेवीत असे. 'पुढें तुम्ही कुठेहि गेलांत तरी तुम्हांला त्रास होऊं नये' असें याच वयांत वागावयास शिकलें पाहिजे, असें आमची आई म्हणे. आईकडून मिळालेली ही सन्मार्गाची व्यावहारिक शिकवण आम्हांला फार उपयुक्त ठरली. खरोखर मातुश्रींचे हे आम्हांवर अमोलिक उपकार आहेत. मागें उल्लेख केल्याप्रमाणें घरीं होत असलेल्या उत्सवसमारंभातहि आईच्या मार्गदर्शनापासून आम्हांला फार शिकावयास मिळे आणि दिवसहि आनंदांत जात.

## गिरणेकांठीं अधिष्ठान

उत्सवाला दरसाल गर्दी वाढूं लागल्यामुळें आणि कुरुंदवाडास वाढविलेल्या जागेची सोयहि अपुरी पडूं लागल्यामुळें, वडील मातुश्रींसह माझ्या वडिलांनीं केलेल्या काशींयात्रेंतील इष्ट अशा अनुभवानंतर पूर्व खानदेशांतील पाचोऱ्या नजीक गिरणानदीचे कांठीं आपले परमपूज्य सद्‌गुरु पंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांचें एक कायमचें अधिष्ठान बांधण्यासाठीं जागा घेतली. हा योग कसा आला हें थोडक्यांत नमूद करतोंः—

माझे वडील श्री अवधूत महाराज आपल्या आईवडिलांना, म्हणजे माझ्या आजोबा-आजींना काशीयात्रेस घेऊन गेले त्यावेळीं पूर्व खानदेश भागांतून कीर्तन करीत करीत निघाले होते. त्या टापूंत आसपास त्यांना कोठें श्री दत्तमंदिर दिसलें नाहीं. कीर्तनांत मिळालेल्या सहानुभूतीवरून भडगांवांतच श्री पंतमहाजांचें एक स्वरुपाचें अधिष्ठान ठेवावें असे विचार त्यांचे मनांत बळावले आणि त्या विचारांना तिकडील भक्त-श्रोतृ वर्गाची मोठी सहानुभूतीहि लाभली. या सहानुभूतीच्या आधारावर स्वावलंबी प्रयत्नांनीं श्री अवधूत महाराजानीं भडगांवास अधिष्ठान व मठी बांधून तेथें श्रीदत्तमूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली. आणि तेथेंच कुरुंदवाडास होणारे सर्व उत्सव थाटानें साजरे होऊं लागले.

## मला अनुग्रह दिला

मार्गशीर्ष चंपाषष्ठी दिवशीं (इ. स. १९२७ सालांत) भडगांव श्री दत्तमठींत श्री दत्तमूर्तीची स्थापना झाली. ह्या उत्सवासाठीं माझ्या मातुश्रींसह मी भडगांवास गेलों होतों. तेथें आम्ही १५ दिवस राहिलों. त्या मुक्कामांतच श्रीदत्तजयंतीच्या दिवशीं रात्रीं १२ वाजतां माझे वडील श्री अवधूत महाराज यांनीं मला 'ॐ नमःशिवाय' या तारकमंत्रासह अनुग्रह दिला. मी त्यावेळीं अंदाजे १२ वर्षांचा होतों. तो उत्साह–सोहाळा पाहून माझ्या बालमनाला फार आनंद झाला.

नंतर वडिलांनीं मला श्री. अनंतराव जोशी या आमच्या नातेवाईकाकडे भुसावळ येथें पाठविलें. इंग्रजी पहिली (म्हणजे आतां ८ वी) साठीं मी तेथें एक वर्ष होतों. नंतर कुरुंदवाडास आलों. घरीं आलों तरी भडगांवच्या उत्सवाचा सोहाळा सारखा डोळ्यांपुढें दिसे. पण पुढील शिक्षणासाठीं मी कुरुंदवाडास रहावें असें ठरलें. घरीं मी, माझे मधले बंधू प्रिय तात्या, श्री. पांडुरंग मोरेश्वर आणि मातुश्री असे तिघेच होतो. आमचे वडील कीर्तनाचा दौरा आटोपून कुरुंदवाडला विश्रांतीला आले कीं साहजिकच आम्हांला आनंद होई. घरीं 'पंत-भजन मंदिराचें दालन'

तयार करण्यांत आलें होतें; या ठिकाणीं पंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांचा फोटो ठेवून अधिष्ठान मांडलें होतें. या अधिष्ठानापुढें मी व माझे मधले बंधु तात्या दर गुरुवार-शनिवारीं भजन व आरत्या म्हणत असूं. १९३२ सालीं तात्या मॅट्रिक झाले आणि त्यांना कॉलेज शिक्षणासाठीं सांगलीस जावें लागलें. त्यानंतर मात्र मी व माझ्या मातुश्री या दोघांनाच कुरुंदवाडास रहाणेचा प्रसंग होता.

## राजयोगी सत्पुरुष

नोकरी वगैरे कांहीं नसतां माझे वडील, श्री अवधूत महाराज, उत्सवाचा व घरचा येवढा मोठा खर्च कसा चालवितात याचें मला नवल वाटत असे! अर्थात् श्री अवधूत महाराज ही साधी व्यक्ति नसून ते एक 'राजयोगी सत्पुरुष' असें भक्त म्हणतात तेंच खरें असावें, असें वाटूं लागलें. राजासारखी त्यांची राहणी असून आपलें घरहि त्यांनीं आपल्या योग्यतेला साजेसें बांधलें होतें. आम्हांलाहि कोणत्याही तऱ्हेची उणीव पडूं दिली नाहीं. त्यांचा तो राजयोगी बाणा पाहून मनांत एकप्रकारचा आदर वाटे, पण त्यांच्यापुढें उभें राहण्याचें धैर्य नव्हते. समजूं लागलें तसा त्यांच्या विषयींचा आदर आदरयुक्त, पूज्यभाव मात्र वाढत गेला.

## १९२७ ते १९३५ पर्यंतचा काळ

कुरुंदवाड मुक्कामी वरील प्रमाणें आनंदांत काळ गेला. १९३५ सालीं माझे बंधु श्री. तात्या यांची साताऱ्यास फौजदार म्हणून नेमणूक झाल्यावर मी त्यांच्याकडेच पुढील शिक्षणासाठीं जाऊन राहिलों आणि माझ्या मातुश्री भडगांवासच राहण्यासाठीं गेल्या. मॅट्रिक पर्यंत माझे शिक्षण साताऱ्यास झाल्यावर मी मुंबईस कांहीं तरी नोकरी करण्यासाठीं आलों.

## महाराजांच्या कीर्तनांत तबल्याची सांथ करण्याची मला संधि

कुरुंदवाडास असतांना 'सुप्रसिद्ध तबलापटू' नानासाहेब पानशे यांचे शिष्य, सुप्रसिद्ध तबलाकार आणि सुप्रसिद्ध गवई रहिमतखाँ यांचे नित्याचे साथीदार रामजीबुवा गुरव, यांचे जवळ मी तबला वाजविणेस शिकलों होतों. त्याचा फायदा मला मुंबईस श्री अवधूत महाराजांचे कीर्तनांत तबल्याची सांथ करावयास मिळून झाला.

मी मुंबईस आल्यावर, वडील श्री अवधूतमहाराज खार येथें त्यांचे अनुग्रहीत श्री. मुकुंदराव राणे यांच्या बंगल्यांत उतरले होते, तेथेंच मुक्कामाला गेलों. यावेळीं श्री अवधूत महाराज, माझ्या मातुश्री सौ. कमलाबाई, थोरले प्रियबंधु ह. भ. प.

श्री अण्णा व थोरल्या वहिनी सौ. मथुराबाई अशी घरचीच मंडळी होती. या सर्वांच्या सहवासांत मला एक वर्ष मुंबईस रहावयास मिळालें.

वडील श्री अवधुत महाराज यांच्या दर्शन भेटीस येथेंहि बऱ्याच मंडळीची गर्दी होई. त्यावेळीं आध्यात्मिक विषयावर पुष्कळ वेळ चर्चा चाले; ती ऐकण्याची मला वाढती गोडी लागली. याचवेळी वडील बंधु ह. भ. प. श्री अण्णा यांच्या कीर्तनांत तबल्याची सांथ करण्याची उत्तम संधि मला लाभली आणि तबला शिकल्याचें सार्थक्य झालेसें वाटलें ! श्री अण्णांच्या कीर्तनांत गुरुभक्तीचा महिमा ऐकावयास मिळे. या वेळीं 'दादा हे आपले वडील' या भावनेची जागा 'ते आपले तारक सद्‌गुरूच' आहेत असें मनांत ठाम ठसलें ! तेव्हां पासूनच मी त्यांना 'परमपूज्य महाराज' असेंच संबोधूं लागलों.

## 'हार जळाला म्हणून मी कां जळालों ?'

माझे वडील श्रीअवधूत महाराज हे 'तारक सत्पुरुष-सद्‌गुरु' असल्याची प्रचीति पुढें मला अनेकदां आली. खारला असतांना एकदां वडिलांचे फोटोस हार घालून उदबत्ती लावीत असतां रेशमी गोंड्याच्या त्या हाराला उदबत्ती लागून तो पेटला व एकदम जळाला ! तें पाहून पोटांत धस्स झालें आणि मी मोठमोठ्यानें रडूं लागलों ! श्रीअवधुत महाराजांना हें समजल्यावर ते धांवतच जवळ आले आणि माझ्या पाठीवर सांत्वनपर हात फिरवून म्हणाले, "अन्ता, वेड्या, फोटोवरील हार जळाला म्हणून कां तूं रडतोस ? हार जळाला म्हणून मी कां जळालों ? मी आहे तसाच आहे ! तूं मनाला इतकें वाईट वाटून कां घेतोस ?" ते बोधप्रद प्रेमळ शब्द अद्याप माझ्या हृदयांत आहेत.

खारच्या मुक्कामांत श्रीअवधूत महाराजांचें दर्शनास खूपच मंडळी येत आणि आध्यात्मिक चर्चा अनेक तास चाले. त्या बोधश्रवणाचा लाभ मला चांगलाच झाला. माझ्या मनांत उत्पन्न होणाऱ्या शंकांचें उत्तर या चर्चेंतच मिळून माझें शंकानिरसन होई ! महाराजांची बोध-शैली अवर्णनीय होती !

महाराज आपल्या बोध-निरुपणांत सांगत—

"जगांत लीनतेनें वागा; 'लीन होई संता । तेणे कोंडिलें भगवंता ॥'" भक्तिपूर्वक केलेल्या भजनपूजनादि भक्तीनें सद्‌गुरुशींहि सख्य जडतें.

**भजनें लीनता घडे । भजनें विकल्प मोडे ।**
**आणि भजनें सद्‌गुरुशीं सख्य जोडे ॥**

अशा सद्‌गुरूच्या सहवासांत एक वर्ष केव्हांच निघून गेलें !

× × × ×

## गुरुकृपेचीं कांहीं उदाहरणें

१९३६ सालीं पोर्टट्रस्ट रेल्वेमध्यें अप्रेंटिसशिपसाठीं मी पुष्कळ खटपट केली पण तिकडे कांहीं जमले नाहीं. नंतर मी माझ्या मनानें कापड-गिरणीचें काम शिकण्याचें ठरविलें. १९३७ सालीं 'मुरारजी मिल' च्या कपडाखात्यांत कपडा विणण्याचें शिक्षण घेण्याचे प्रयत्नांत मी होतों. पण ओळखीच्या अभावीं आंत शिरकाव होत नव्हता. तीन चार दिवस गिरणीच्या दरवाजाशीं उभा राही पण आंत जाण्यास मनाई होई ! एके दिवशीं योगायोगानें मला एक अनोळखी गृहस्थ भेटले आणि म्हणाले, "असा तूं किती दिवस दरवाजाशींच उभा राहणार ? आतां तुला एक युक्ती सांगतो तसें कर. उद्यां येतांना एक लहानसा जेवणाचा डबा घेऊन ये आणि गिरणींतल्या मजुरांचे जेवणाचे डबे घेऊन लोक आंत जातात त्यांचेबरोबरच आंत जा, म्हणजे तुला कोणी अडविणार नाहीं ! आंत गेल्यावर तेथेंच उभा रहा. मी १ वाजतां गिरणींत येईन. मग पुढें पाहूं काय करायचें तें !"

दुसऱ्या दिवशीं त्या अनोळखी गृहस्थांनी सांगितलेली युक्ति वापरून मी गिरणीच्या आवारांत तर शिरकाव करून घेतलाच ! आंत जे गृहस्थ भेटले त्यांनी मला विचारलें, "काय काम आहे तुझें ?" मी सांगितलें, "मला वीव्हिंगमास्तर श्री. जोशी साहेब यांना भेटावयाचें आहे." त्या गृहस्थांनी २॥ वाजतां श्री. जोशी मास्तरांची भेट करवून दिली !

श्री अवधूत महाराजांच्या कांहीं वचनांची त्यावेळीं मला आठवण झाली. माझें काम करण्याची प्रेरणा या गृहस्थांना महाराजांनींच केली असावी काय ? जोशी मास्तरना मी माझी सर्व हकीगत सांगितली. ती ऐकल्यावर बरेच आढेवेढे घेऊन ते म्हणाले, "तुझें पुढें काय ध्येय आहे ?" मी म्हणालो, "मला स्वतःला एखादी लहानशी कापड-गिरणी चालविण्याइतकें शिक्षण या गिरणींत घेण्याची इच्छा आहे." श्री. जोशी मास्तर म्हणाले, "बाळ, ही फार त्रासाची लाइन आहे. ब्राह्मण-मुलांना सहसा ही लाइन झेंपत नाहीं !" मी उत्तर दिलें, "तुम्ही फिकीर करूं नका ! मी ब्राह्मण मुलगा असलों तरी कृष्णाकांठचा आहे ! मला कापड गिरणीच्या कामाची फार आवड आहे. तुम्हांला शंका वाटत असेल तर मी दोन वर्षांचे 'ॲग्रीमेंट' (करारपत्र) लिहून देतो" मग श्री. जोशी साहेब कबूल झाले आणि दुसरे दिवशीं गिरणींत येण्यासाठीं त्यांनी मला पास दिला.

दुसऱ्या दिवशीं मला वार्पिंग खात्यांत 'क्लीनबॉय' म्हणून क्लीनबॉय नसलेल्या जागीं बदली म्हणून ठेविला. बॉबिन लावण्यासाठीं मी ज्या वॉर्पिंग-मशीनवर गेलों त्या वार्परने विचारलें, "तुम्हीं इकडे कुठें?" मी उत्तर देण्याची उडवाउडवी करतांना तो पुढें आपुलकीच्या शब्दांत म्हणाला, "तुम्हांला मी कुठें तरी पाहिलें आहे. हां, 'कामाठी पुऱ्यांत श्री अवधूत महाराजां'चें कीर्तनांत तबला वाजवितांना मी पाहिलें आहे. मी अवधूत महाराजांचा अनुग्रहीत शिष्य आहे. त्यांच्या कीर्तनास मी नेहमीं जातो." मी म्हटले, "मी अवधूत महारांजांचा धाकटा मुलगा; अर्थात तुमचा गुरुबंधूच"!

## वार्पिंगचें काम २–३ महिन्यांत शिकलों

ओळख पटल्यावर आम्हां दोघांना झालेल्या आनंदाचें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं! ते गृहस्थ आंध्र मधील पदमशाली समाजाचे होते त्यांचें नांव श्री. पेदण्णा. त्या दिवसा पासून मला भावांप्रमाणें वागवून २–३ महिन्यांत वार्पिंग मशीनची चांगलीच माहिती त्यांनीं दिली. ही अद्‌भुत घटना सद्‌गुरु कृपेचीच घातक होय.

## सायजिंग कामाचें शिक्षण

नंतर साइझिंगचे काम शिकण्याचें ठरविलें तेथेंहि बुवा कुलकर्णी नांवाच्या त्या खात्यांतील हुषार गृहस्थांचे हाताखालीं श्री. जोशी मास्तरनीं दिलें. पूर्वींची ओळख पाळख वगैरे कांहींहि नसता श्री. जोशी मास्तर यांनीं आपुलकीनें जवळ करून वार्पिंगचे मागोमाग साइजिंगच्या शिक्षणाचीहि व्यवस्था केली. साइजिंगमध्ये ज्यांचे हाताखाली शिकूं लागलों. ते बुवा कुलकर्णीहि भक्ति मार्गीच होते. त्यांना वार्पर श्री. पेदण्णा यांनी सांगितलें "श्री. अनंतराव हे आमच्या गुरुमहाराजांचे धाकटे चिरंजीव, त्यांना तुम्ही साइझिंगमध्येहि चांगले तयार करा."

अंदाजें १॥ ते २ वर्षें मी साइझिंग खात्यांत शिकत होतों. त्यावेळीं श्री अवधूत महाराजांचा मुक्काम बनाम हॉल लेनमध्यें होता. माझ्या मातुश्री, थोरले बंधु प्रिय अण्णा व सौ. वहिनी या सर्वांच्या प्रेमळ वातावरणांत मी होतो. त्यावेळीं महाराज मला म्हणत, "आतां लाईन धरलीस तीच पुरी कर, त्यांतच तुझें कल्याण आहे. धरसोड नको–याच लाइनींत तुला एखादी अधिकाराची जागा मिळेल." 'मुरारजी मिल' मध्यें असतांना मी माझीं पत्रें श्री. जोशी यांच्याच पत्त्यावर मागवीत असे. एकदां माझ्या नांवचें पोर्टट्रस्ट रेल्वेचें पत्र त्यांचेकडे आलें. माझी अप्रेंटिसशिपकरितां निवड झाल्याचा मजकूर त्या पत्रांत होता. तें पत्र मला वाचून

दाखवून जोशीसाहेब म्हणाले, "मुला, तूं पोर्टट्रस्ट रेल्वेंत शिक्षण घेण्यास जा, तुझें त्यांत कल्याण आहे. पुढें मागें तुला तेथें मोठी हुद्याची जागा मिळेल."

मी जोशीसाहेबांना म्हणालों, "साहेब, मी दोन वर्षांच्या करारानें बांधला गेलों आहे. तें वचन पुरें केल्यावर पोर्टट्रस्ट रेल्वेची अप्रेंटिसशिपची जागा रिकामी राहिलीच तर मग पुढें पाहीन." श्रीसद्‌गुरु अवधूत महाराजांच्या शब्दांवर मी विश्वास ठेविला असल्यामुळें मी जोशी साहेबांची सूचना न ऐकतां, गिरणीच्या कामाचेंच शिक्षण पुरें करण्याचें ठरविलें.

॥ वचनाचा अनुभव घेईन पदरीं ।
निश्चित लोळेन सद्‌गुरु–द्वारीं ॥

या सद्‌गुरु बोधाची आठवण ठेवून मी गिरणीच्या कामांतच शक्य तितकें पुढें सरकण्याचें ठरविलें. पुढें माझ्या कामांत आलेल्या अडथळ्याविषयीं माझे प्रेमळ गुरुबंधु **मेघःशाम पांडुरंग संकपाळ** यांना विचारून त्यांच्या सल्ल्याप्रमाणें पुढें मार्ग काढीत असे.

## मुरारजी मिल कां सुटली ?

'मुरारजी मिल' सोडल्यानंतर 'बॉम्बे टेक्स्टाइल मिल' मध्यें गुरुबंधु मेघःशाम यांच्याच वतीनें कपडा खात्यांत पुढील शिक्षणासाठीं शिरकाव करून घेतला. या गिरणींत ५–६ महिने शिक्षण झाल्यावर १९३८ मध्यें २–३ महिन्याकरतां श्रीसद्‌गुरु अवधूत महाराज व वडीलबंधु ह. भ. प. अण्णा कीर्तनासाठीं गेले. गुरुबंधु मेघःशाम त्यांचेबरोबरच होते. गिरणीला सुटी मिळाली कीं मीहि वसईस जात असे. त्यावेळीं 'मिल लाईन' मध्यें म्हणजे गिरणीच्या व्यवसायांत पुढें कसें यावें, 'असिस्टंट वीव्हिंग मास्तर' च्या जागेपर्यंत कशी मजल मारावी, या विषयीं माझे आणि प्रिय गुरुबंधु मेघःशाम याचे नेहमीं खलबत चाले.

## अवधूत महाराजांची क्षमाशील व उदार वागणूक

वसईच्या. मुक्कामांत मी गेलों कीं कीर्तनांत तबला वाजविणेस जात असे. एक दिवस तबला वाजवितांना मी हातांतील अंगठी कोटाचे खिशांत काढून ठेविली होती. कीर्तन संपल्यावर खिशांत पहातों तों अंगठी नाहीं! घरीं गेल्यावर मला रडूंच कोसळलें! श्री अवधूतमहाराज मजजवळ येऊन सांत्वनपर शब्दांत म्हणाले, "अरे तूं रडतोस काय म्हणून?" प्रियबंधु अण्णांनी सांगितलें कीं "त्यांची अंगठी कीर्तनांत हरवली अवधूतमहाराजांनीं दुसरे दिवशीं आपल्या बोटांतील अंगठी काढून ती माझ्या बोटांत घातली. ते त्यापूर्वीं म्हणाले "अरे

रहून कां अंगठी परत येईल ! " महाराज माझे बोटांत अंगठी घालीत असतां मी म्हणालों, " महाराज एखादेवेळीं हीहि अंगठी पुन्हां हरवेल " महाराज म्हणाले, " पुन्हां हरवलीच तर पहातां येईल ! " त्यांचे ते प्रेमळ शब्द व क्षमाशील उदार वागणूक अर्जूनंहि मला आठवते ! त्या मुक्कामांतहि गुरुमहाराजांचे मुखांतून पुष्कळ ज्ञानबोध ऐकावयास मिळाला.

मलाच काय पण पुष्कळांना श्री अवधूत महाराज सढळ हातानें मदत करीत. स्वार्थी वृत्तीचा त्यांना स्पर्शहि कधीं झाला नाहीं. त्यांनीं कोणाकडे याचना केली नाहीं. त्यांना मिळालेला पैसा सांठवून ठेविला असता तर आम्हां तिघांहि बंधूंना नोकरी धंदा व कसलीहि दगदग करण्याची जरूर पडली नसती ! ते आम्हांला म्हणत " मी असे पर्यंत तुम्हांला काय शिकायचें तें शिकून घ्या. कोणतीहि उणीव वाटण्याचें कारण नाहीं. "

नंतर मी मुंबईस माझी आतेबहिण सौ. संतुताई ( श्री. का. म. ताम्हनकर यांची सौभाग्यवती ) यांचेकडे राहूं लागलों. त्यांचा मला चांगला आधार होता. खाण्या-पिण्याची व रहाण्याची व्यवस्था त्यांचेकडे अगदीं घरच्या सारखी होती जॉबर कामाची माहिती त्यांच्याकडें असतानांच झाली. गुरुबंधु मेघःशाम मला येऊन भेटले व म्हणाले " आपले एक गुरुबंधु श्री. बाळकृष्ण मास्तर—हेड जॉबर माहितीचे आहेत त्यांची गांठ घालून देतों " त्याप्रमाणें केल्यावर श्री. मेघशाम श्री. बाळकृष्ण मास्तरना म्हणाले " हे आपल्या सद्‌गुरु अवधूत महाराजांचे चिरंजीव अंनतराव. यांना कपडा खात्यांत घेऊन त्यांना जॉब कामाची चांगली माहिती द्या " त्यांनी मला अंदाजे १॥ वर्षांत जॉबर कामांत तरबेज केलें. नंतर मी सासून मिलमध्ये जॉबरची नोकरी धरली.

## ॲसिस्टंट वीव्हींग मास्तर

तेथील वीव्हिंग मास्तर श्री. यशवंतराव काटे हेहि गुरुबंधु, श्री. गुरुबंधु मेघःशाम यांचे चांगले परिचित होते. त्यांनींहि ॲसिस्टंट वीव्हिंग मास्तरच्या लाइनींत वर येण्याची चांगली संधि मला कामांत तरबेज करून दिली.

हीं सर्व प्रगतिपर घटनांची परंपरा म्हणजे श्रीसद्‌गुरु अवधूत महाराज यांची कृपाच होय अशी मंला प्रचीति येत गेली !

नंतर कांहीं दिवसांनीं सासून मिल कामगार संपावर गेले. संप २–३ महिने चालू होता. यावेळीं घरीं रिकामा बसण्या ऐवजीं वडील बंधु अण्णा यांचें कीर्तन माहिम येथें भागोजी कीर यांचे श्रीदत्तमंदिरांत चालू होतें. त्या कीर्तनांत तबला वाजविण्यास श्री. अण्णांच्या परवानगीनें जाऊं लागलों.

## प्रगतीचा अकल्पित योग !

एक दिवस कीर्तन संपल्यावर आम्ही सर्व मंडळी लोकल ट्रेननें चर्नी रोडला येत होतो. एक सद्‌गृहस्थ दादर बी. बी. स्टेशनवर आम्ही असलेल्या डब्यांत चढले व माझ्या शेजारींच येऊन बसले. मी तपकीर ओढीत असतां सहज तपकिरीची डबी त्यांचे पुढें केली. 'सॉरी' म्हणून त्यांनी ती नाकारली. मग मी त्यांना सहज म्हटलें "साहेब, तुम्ही एखाद्या कापड-गिरणींत ऑफिसर आहां काय ?" ते गुजराथी अनोळखी गृहस्थ चकित होऊन त्यांनीं आश्चर्य व्यक्त केलें ! चर्नीरोड स्टेशनमधून बाहेर पडत असतां त्यांनीं आमचा आंबेवाडींतील रहाणेचा पत्ता विचारून घेतला आणि मी 'पारशांच्या लग्नमंडपानजीक तारादेंपल लेनमध्ये रहातो तेथें दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं पांच वाजतां भेटण्याचें' निमंत्रण देऊन आपल्या नांवाचें आणि पत्त्याचें कार्डहि माझ्या हातीं दिलें. हे गृहस्थ एका मोठ्या गिरणींत ॲसिस्टंट मॅनेजर असल्याचें प्रत्यक्ष परिचयानंतर समजलें !

त्या गृहस्थांच्या रहात्याजागीं त्यांनी विचारल्या नंतर मी म्हणालों, 'ज्योतिष वगैरे मी जाणत नाही मी वडीलबंधूंच्या कीर्तनांत तबला वाजवून आलों, पण तुमच्या पोषाखावरून आणि रुबाबावरून मी अंदाजानें तो प्रश्न केला होता. मी कापड गिरणींत काम केलें असल्यामुळें मला तसा अंदाज करतां आला.'

मुलाखतीनंतर त्या गृहस्थांचें नांव व पदवी समजली ती पुढीलप्रमाणेंः— श्री. एच. पी. पटेल, "टेक्स्टाइल एक्स्पर्ट टेक्स्टाइल टेक्नॉलॉजिस्ट—लंडन जर्मनी"

या गृहस्थांनी मजजवळ तबला शिकणेची तयारी दाखविली, फीहि विचारली. मी म्हटलें, 'सध्यां मी मोकळा आहे तोंपर्यंत तबला तर शिकून घ्या, फीचें मागून पाहूं !" या गृहस्थांना माझा स्वभाव एकंदरींत फार आवडलासें दिसलें. लोकांशीं कसें वागावें याचें शिक्षण लहानपणीं मातुश्रीकडून मिळाले आणि पुढें श्री अवधूत महाराजांच्या प्रत्यक्ष वागण्यावरूनच मिळत गेलें. माझ्या वागण्यामुळें खूप आपुलकी वाटून आणि दाट स्नेहभाव उत्पन्न होऊन एक दिवस पटेलसाहेब मला म्हणाले, "अनंतू (ते मला अशीच हांक मारीत) तूं आमच्या सक्सेरिया मिलमध्ये कामाला राहशील कां ?" मी होकार दिल्यावर दुसऱ्याच दिवशीं त्यांनीं मला त्या गिरणींत "घडी खात्यांत-जिलेटिनचे कागद गुंडाळण्याचें व त्यावर लेबल चिकटवण्याचें काम दिलें.

## वीव्हिंग सुपरवायझरचा चान्स

८–१० दिवस हें काम ठीक केल्यावर त्यांनीं मजवर "कापड खात्यांत" सांचेवाल्याची साफसफाई व मशीनला तेलपाणी बरोबर आहे कीं नाहीं, ही सुपरवायझरची कामगिरी पहाण्याची कामगिरी सोंपविली. हा तर माझ्या आवडीचा विषय होता! या खात्यांत काम करतांना मला मागें या खात्यांत केलेल्या कामाचा आणि अनुभवाचा छान फायदा मिळून त्या खात्यांतील वरिष्ठांनी माझ्या कामाविषयीं कौतुक व आदर व्यक्त केला. श्री. पटेल साहेबांनींहि माझी खास शिफारस करून माझी 'विव्हिंग सुपरव्हायझर' म्हणून नेमणूक केली. श्री. एच. पी. पटेल साहेब हे तेथें असिस्टंट मॅनेजर म्हणून होतेच. ५–६ महिन्यांनीं पटेलसाहेब ह्यांनीं नोकरी सोडून जातांना मला एक उत्कृष्ट 'सर्टिफिकेट' (शिफारसपत्र) दिलें. '**असिस्टंट विव्हिंग मास्तर**'च्या माझ्या दर्जाविषयीं हें सर्टिफिकेट होतें! वरच्या जागेच्या नोकऱ्या मिळण्यास मला इतर गिरण्यांतून देखील या 'सर्टिफिकेट्'चा फार उपयोग झाला!

## सद्गुरूंच्या कृपेचें सामर्थ्य

या गृहस्थांची एका रात्रीं रेल्वेंत सहज भेट होते काय, त्यांचा माझा दाट स्नेह जमतो काय, आणि नंतर गिरणीच्या धंद्यांत वर वर जाण्याच्या अनेक संधि व कामाचा प्रत्यक्ष अनुभव देऊन ते मला वर वर चढण्याचें कायमचें भरीव शिफारस पत्र देतात काय, या आपल्याला प्रगतिपर व इष्ट अशा घटना श्री सद्गुरू अवधूत महाराजच घडवून आणतात, आपल्याच प्रेरणेनें इतरांमार्फत हें करवितात, असें हें सद्गुरुशक्तीचे सामर्थ्य आयुष्यांत वेळोवेळीं माझ्या प्रचीतीस येत गेलें! माझ्या मस्तकावर हात ठेवून 'या लाइनींत चिकाटीनें रहा, तुला कांहीं कमी न पडतां तूं चांगला नांवलौकिक संपादन करशील' याचा प्रत्यक्ष अनुभव जसा मला आला तसाच अनेक सद्गुरु-पुत्रांना येऊन त्यांचें कल्याणच झालें, असें मी पाहिलें आहे.

## सद्गुरुचरणीं प्रार्थना

अनेक गुरुबंधूंना याच प्रकारचा अनुभव आल्यामुळें, ते महाराजांच्या भडगांव श्री दत्त मठींतील उत्सव-समारंभास येतात, गुरुबंधूंच्या प्रखर प्रेमभक्तींत भर घालतात :आणि सद्गुरु–माऊलीच्या अधिष्ठानाला उर्जितावस्थेला आणण्याचे प्रयत्नांत असतात. या गुरुबंधूंच्या सत्कार्याबद्दल गुरुमहाराजांचे आम्ही तीन्हीहि

पुत्र 'गुरुबंधू या नात्यानें' आभारी आहोंतच. सर्व 'गुरुबंधूनीं असेंच गुरुभक्तिप्रेम आणि सद्गुरूंच्या अधिष्ठानाची उर्जितावस्था साधण्याचे कार्य चालू ठेवावे अशी बुद्धि त्यांना श्रीसद्गुरूंनीं द्यावी' हीच सद्गुरुचरणीं प्रार्थना.

'मी गिरणीची लाइन घेतली तेव्हांपासून आपलें शिक्षण बेताचें असल्यामुळें कसें होईल?' अशी काळजी वाटे! पण श्री सद्गुरू अवधूत महाराजांनीं मुद्दाम जवळ घेऊन या लाइनींतच प्रगतीचा आशीर्वाद दिल्या पासून त्यांच्या आशीर्वादानेंच मी आजचे चांगले दिवस पहात आहे. येवढेंच नव्हे तर जगातील मानसन्मानासहि पात्र झालों आहे. १९४६ पासून १९६४ पर्यंत मी सद्गुरूंच्या कृपाशीर्वादाची प्रचीति व अनुभव घेत आहे. मला श्री सद्गुरू अवधूत महाराजांच्या कृपाछत्राखालीं कोणत्याहि प्रकारची कमतरता पडली नाहीं. ही गुरुमाऊलीची कृपाच होय.

× × × ×

## सद्गुरुकृपा-चमत्काराचे आणखी अनुभव

अंदाजे २५ वर्षे मी सद्गुरु अवधूत महाराजांच्या पुण्यतिथी उत्सवास नियमित जातों. त्याप्रमाणें १९६३ च्या चैत्र पाडव्याचे दिवशीं मी मुंबईहून भडगांवास मोटारसायकलनें (स्कूटरनें) जाण्याचें ठरविलें. सकाळीं ६ वाजतां मी मुंबईहून निघालों. नाशीक, मालेगांव, धुळे, पारोळे या मार्गानें प्रवास केला. संध्याकाळीं ६ वाजतां पारोळ्यास पोचलों. पारोळ्यास चहा, विश्रांति घेऊन निघालों तेथून भडगांव अवघ्या २२ मैलावर होतें. पारोळ्या नंतर तरसईपासून भडगांवास जाण्याचा एक फांटा निघतो. तो रस्ता निर्मनुष्य जंगलांतून आहे. संध्याकाळीं ७-१५ वाजले होते. माझ्यामागून एक मालट्रक येत होती तिला वाट देण्यासाठीं मी माझी स्कूटर रस्त्याच्या जरा डाव्या बाजूस घेतली, रस्ता फार अरुंद होता. मालट्रकचे ड्रायव्हर बेदरकार गाडी चालवितात, हें मी जाणून होतों. पण भरपूर रस्ता असूनहि त्या ट्रकवाल्यानें माझ्या मोटारसायकलीस धडक दिलीच! मी माझ्या वाहनासह डाव्या बाजूचे खड्यांत जाणार, असें स्पष्ट लक्षांत आल्यामुळें मी माझ्या मोटारसायकलीचें स्टिअरींग जोरानें उजवीकडे वळविलें! तसें केलें नसतें तर माझ्या वाहनासह खड्ड्यांत पडून भडगांवच्या दर्शनाची आशाच नाहींशी झाली असती! पण उजवीकडे माझी गाडी

जोरानें वळवीत असतां ती वॅाबल होऊं लागली ( थरथरूं लागली!) व माझा स्टिअरिंगचा कंट्रोल सुटून मी उजवीकडील रस्त्यावर माझ्या वाहनासह पडलों! २०-२५ मिनिटें मला शुद्ध नव्हती! सावध होऊन उठून पहातों तों सर्वत्र काळोख पसरलेला या वेळीं मी सद्गुरू अवधूत महाराजांचें अंतःकरणपूर्वक ध्यान केलें.

॥ **पाहिले हे दिवस। सद्गुरु होती तुझी कृपा** ॥ यामुळें प्रत्यक्ष मृत्यूच्या संकटांतून मी वाचलों! मग पडलेली गाडी उभी करून विचार करूं लागलों. माझ्या मोटारसायकलचा पुढला दिवा (हेडलॅंप) लागत नाहीं. असें आढळून आलें! इतक्यांत मागून आणखी एक मालट्रक येत होता, त्याला थांबविण्याचा प्रयत्न केला पण तो न थांबतांच पुढें गेला! रात्रीचें अंदाजे आठ वाजले होते. मनांत आलें "आज २५ वर्षें कधीं महाराजांची पालखी अंतरली नाहीं ती आज अंतरणार. रात्रीं १० वाजतां पालखी निघणार तेव्हां आतां पालखीसेवाहि न घडतां त्या आनंदसोहळ्याला मुकणार! असा विचार करतांना जवळच एक बॅटरी लॅंप होता त्याच्या मदतीनें उरलेल्या अवध्या ८ मैलांचा प्रवास करण्याच्या प्रयत्नाला लागलों. जेमतेम मैलांचा प्रवास या बॅटरी दिव्याचे सहाय्यानें केला यापुढें ती चालेना! मग मात्र यापुढें अंधारांत प्रवास करणें बरें नाहीं, असें मनाशीं ठरवून वळून जरा बाजूला पाहिलें तों एक अंधुक दिवा होता. :त्या हॅाटेलवाल्याजवळ मी एक दिवा भडगांवपर्यंत जाण्यासाठीं मागितला. 'आपल्याजवळ देण्याजोगा दिवा नाहीं' असें तो हॅाटेलवाला म्हणत असतांनाच एक गृहस्थ पुढें येऊन त्यानें मला विचारलें "तुम्ही अण्णांचे बंधू कां? तुम्हांला भडगांवास श्रीअवधूत मठींत जावयाचें आहे ना? तुमचे कपडे रक्तानें माखलेले दिसतात. डोळ्यांजवळ खोकहि पडली आहे! तेव्हां मोटार सायकलनें जाऊं नका. आतांच थोड्यावेळानें ९ वाजतां भडगांवाकडे जाणारी एस. टी. येईल. तिनें मी तुम्हांला घरीं पोचवितों. मुळींच काळजी करूं नका" याहि घटनेवरून दिसून येते कीं, सद्गुरुमाऊली आपलें वेळोवेळीं रक्षण करून योगक्षेम चालवीत असते!

माझी भडगांवांत पोचण्याची अशी व्यवस्था होत असतां भडगांव श्रीदत्त-मठींत माझे दोन्ही बंधू आणि घरची मंडळी चिंतातुर होऊन काळजी करीत होती! माझ्या शोधासाठीं कोणी तरी पाठविण्याच्याहि गोष्टी चालू होत्या! इतक्यांत मी रात्रीं ९ चे सुमारास मठींत जाऊन पोचलों! त्यावेळीं मठींत घरच्या मंडळींसह सर्वांना जो आनंद झाला त्याचें शब्दांनीं वर्णन करतां येण्यासारखें नाहीं!

## प्रचीतीचा बोध

' तारक सद्गुरु माउली ' आपल्याला मृत्यूच्या जबड्यांतूनहि वांचविते, असा बोध अशा अनेक प्रसंगीं वरून घ्यावयास मिळतो !

म्हणून मला नमूद करावेसें वाटतें कीं सद्गुरु वचनावर पूर्ण विश्वास ठेवून आपण त्याचे आज्ञेप्रमाणें वागत राहिलों तर अशा सद्गुरु-भक्ताला जगांत ' तारक सद्गुरु ' कसलीहि उणीव राहूं देत नाहीं. श्री अवधूत महाराजांच्या कृपेच्या प्रत्यक्ष स्वानुभवावरूनच मी हें लिहीत आहे.

●●●

भाग १ ला

# आठवण नं. ५

[ लेखक : श्रीमान् मुकुंदराव राणे, मुंबई ७. ]

## घराण्याची मोठी कीर्ति आणि थोर व्याप

आमचें मूळ घराणें सोरटी-सोमनाथ नजीक पट्टण या गांवचें. मूळ पुरुष मुंबईस १९१२ मध्ये येऊन स्थाईक झाले. पुढे घराण्याचा बराच विस्तार झाला. त्याबरोबर मुंबईसारख्या विस्तृत शहरांत आमच्या पूर्वजांनीं स्थावर इस्टेट बरीच वाढविली. उदाहरणार्थ 'भाऊचा धक्का' व बाजूचें कांहीं क्षेत्र आमच्या घराण्यांतील अजिंक्य उपनांवाच्या घराण्याकडे होतें. तसेंच क्राफर्ड मार्केट व लोहारचाळ हा टापू देखील आमच्या घराण्यांतील पुरुषांकडे होता. हल्लीं ज्याला 'प्रिन्सेस स्ट्रीट' म्हणतात, तो भाग हनुमान गल्ली आणि काळबादेवी रस्त्यावरील मोठमोठ्या वाड्या आमच्या पूर्वजांच्या मालकीच्याच होत्या. यावरून या घराण्यानें स्थावर इस्टेटीचा व्याप मुंबई शहरांत किती वाढविला होता, याची कल्पना कोणालाहि येईल. या घराण्यांतील लोक सुशिक्षित व उद्योगी होते. बरेचजण ब्रिटिश आमदानांतील मोठमोठ्या सरकारी हुद्याच्या जागांवर होते. उदाहरणार्थ हायकोर्ट जज्जाच्या जागांवर आणि पोलीस खात्यांतील मोठ्या अधिकारांच्या जागांवर आमच्या घराण्यांतील लोक होते. त्यावेळीं 'राणे' घराण्यांतील बऱ्याच जणानीं बऱ्याच हुद्यांवर मोठा लौकिक संपादन केला होता.

## घराण्याचें वैशिष्ट्य

आमच्या घराण्यांतील लोक खूप श्रीमान् आणि संपत्तिवान् झाले. पण त्या बरोबरच त्यांची ईश्वरभक्ति आणि आस्तिकतेचा बाणाहि वाढत गेला. थोर विद्वानहि झाले पण आजकालच्या विद्वानांप्रमाणें ते नास्तिक झाले नाहींत! आजहि त्यांच्या देवभक्तीच्या आणि आस्तिक्यवृत्तीच्या साक्षी पटतात!

माझे आजे रावबहादुर धाकजी काशिनाथ हे म्युनिसिपल कमिशनर होते. त्यांनीं मुंबईत देवाचीं अनेक मंदिरें बांधलीं. इतकेंच नव्हे तर या मंदिरांचे नित्यक्रम

व्यवस्थित चालावे म्हणून निधीहि करून ठेविले ! त्याप्रमाणें सर्व मंदिराचे नित्यक्रम व्यवस्थित चालू आहेत. उदाहरणार्थ काळबादेवीचें देऊळ, मुंबादेवीचें मुख्य देऊळ, नजीकचीं लहान देवळें आणि श्रीशंकराचें देऊळ व तेथील तलाव, भुलेश्वर येथील श्रीशंकराचें आणि श्रीगणपतीचें मंदिर व पंचमुखी मारुती इत्यादि पवित्र मंदिरें बांधून त्यांच्या नित्यक्रमांची व्यवस्थाहि आमच्या पूर्वजांनीं करून ठेविली.

## ईश्वर आणि साधुसंत यांचेविषयीं वडील मातुश्रींची आदराची भावना

माझा जन्म श्रीमान दादाजी धाकजी आणि परमपूज्य मातुश्री. सौ. पुतळाबाई (ऊर्फ दादीबाई) यांचे उदरीं झाला. माझ्या मातुश्रीचे माहेर मुंबईतील श्रीमान् हरिश्चंद्र तळपदे यांच्यांकडे होतें. त्या अंतःकरणाच्या उदार असल्यामुळें गोरगरिबांना विपुल दानधर्म करीत. ईश्वरभक्ति हा तर त्यांचा सहज स्वभावच होता. पतिवचनाविषयीं अत्यंत आदर बाळगून त्यांच्या कलानें वागण्याचा त्यांचा बाणा होता. यामुळें माझ्या मातेच्या कर्तव्यांत कसलीहि उणीव भासत नसे. येवढी मोठी श्रीमंती असूनहि त्यांच्या अंतःकरणांत अहंकाराचा लवलेशहि नव्हता ! लीनता हेंहि त्यांच्या वागण्याचें एक वैशिष्टय होतें. साधुसंतांचीं चरित्रें वाचावीं आणि कीर्तन-प्रवचनांतून ऐकावीं, आणि अतिथि अभ्यागतांना घरीं आणवून त्यांचें आनंदानें आदरातिथ्य करावे, याची त्यांना फारच हौस असे. कथाकीर्तनें आणि प्रवचन पुराण-श्रवणें यामुळें एखाद्या सद्‌गुरूस शरण जाऊन आपल्या जन्माचें सार्थक्य करून घ्यावे अशी तळमळ माझ्या मातुश्रींच्या ठिकाणीं उत्पन्न झाली होती. पण त्या अत्यंत चतुर चाणाक्ष असल्यामुळें वाटेल त्या भल्याबुऱ्या 'साधु' म्हणवून घेणाऱ्यांपुढें त्यांनीं आपलें शीर केव्हांहि नमविलें नाहीं !

## सद्‌गुरू श्री अवधूत महाराजांच्या भेटीचा योग

परमपूज्य श्रीसद्‌गुरू अवधूत महाराज मुंबईस येऊन त्यावेळीं श्री सदाशिवराव सहानी यांचेकडे उतरत असत. प्रथम सुतार गल्लींतील श्री. सहानी यांचे बिऱ्हाडींच कीर्तन-प्रवचनादिद्वारां भाविकांना सन्मार्ग दाखविण्याचा श्री अवधूत महाराजांचा क्रम चालू होता. त्यावेळीं अनादिसिद्ध श्री अवधूत सांप्रदायाची दीक्षा अनेक लोकांनीं घेतली. त्यावेळीं श्रीयुत खंडेराव सहानी यांच्या मातुश्री आमचेकडे येत-जात असल्यामुळें, त्यांनीच श्री सद्‌गुरु अवधूत महाराज यांची थोरवी आमच्या मातुश्रींचे कानांवर घातली.

## मातुश्रींच्या थोर शिकवणीचें फळ

इ. स. १९०८ सालीं माझे वडील श्रीमान् दादाजी धाकजी राणे हे स्वर्गवासी झाल्यामुळें माझ्या मातुश्री शोकमग्नावस्थेंत होत्या. परंतु सुविचार व सन्मार्ग हा त्यांचा बाणा असल्यामुळें त्यांनी मन खंबीर ठेवून आम्हां दोन भावंडांची आणि तीन बहिणींची जबाबदारी अंगावर पडली असतां ती पूर्ण ओळखून त्यांनी आमचा विद्याभ्यास पूर्ण करविला आणि अनेक बऱ्यावाईट प्रसंगांना टक्कर देऊन आम्हांला व्यवहारदक्ष केलें. मातुश्रींच्या या थोर शिकवणीचें आणि तपश्चर्येचें फळ आज आम्ही वैभवांत भोगीत आहों, हें उघडच आहे !

आमचे थोर वडील परलोकवासी झाले त्यावेळीं मातुश्रींच्या अंतःकरणांत किती औदासिन्याचा काळोख पसरला आणि त्यांना श्री सद्गुरु भेटीची तळमळ कशी लागली याचा उल्लेख मागे केलाच आहे. त्यावेळीं श्री. खंडेराव सहानी यांच्या मातुश्री सौ. लक्ष्मीबाई यांनींच आमच्या मातुश्रींना सद्गुरू श्री अवधूत महाराज यांचेकडे नेले आणि इ. स. १९०९ मध्ये पोपटवाडींत माझ्या मातुश्रींनी श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. नंतर मातुश्रींच्या इच्छेप्रमाणें आम्ही सर्व भावंडानीहि महाराजांचा अनुग्रह १९०९ सालीच घेतला. माझ्या मातुश्रींचा या पुढील काल श्री गुरुभक्तीत गेला. या श्रेष्ठ अवधूत पंथाचा लाभ आम्हां सर्वांना पूर्वपुण्याईनेंच लाभला असें प्रत्यक्ष अनुभवाने म्हणावेसे वाटतें.

## श्री अवधूत महाराजांच्या सूचनांप्रमाणें पंतमठींतील सेवा

परमपूज्य श्री अवधूत महाराज यांनींच आमच्या मातुश्रींस बाळेकुंद्रीचें पवित्र क्षेत्र दाखविलें. मातुश्रींचे बरोबर मी पण होतो. त्या वर्षी पावसानें भयंकर झोड उठविल्यामुळें भक्तमंडळींची फार गैरसोय झालेली दिसली; तेव्हां तेथें सभामंडप बांधण्याविषयीं सद्गुरु अवधूत महाराजांनीं सुचविलें. तेव्हां श्री. पंताचे भाचे श्री. शंकर विरूपाक्ष पत्तीहाळ इंजिनियर उर्फ अण्णा यांचेमार्फत मुंबईच्या रिचर्डसन् अँड क्रुडास कंपनी मार्फत काम पूर्ण केलें. त्याकरितां अंदाजें २० हजार रु. खर्च आला. औदुंबर कट्ट्यापासून कांहीं अंतरावर आंब्याच्या झाडाखालीं घुमी होती ती पंतबंधूंच्या सूचनेवरून अंदाजें पांच हजार रुपये खर्च करून दुसरीकडे बांधली. हल्लीं ह्या जागेवर सीताराम मंदिर आहे. पुढें पहिली घुमीची जागा बदलून गोपाळ कट्ट्यानजीक पंधराशें रुपये खर्चून घुमीची जागा कायम केली.

याविषयीं हें नमूद करावेंसें वाटतें की, श्री सद्‌गुरु अवधूत महाराज यांचे आज्ञेनुसार, मी वरील स्वरूपाची जी कांहीं सेवा वाळेकुंद्री क्षेत्रांत केली, तिचें जास्त वर्णन करणें ही अवास्तव आत्मस्तुति ठरेल, म्हणून हा तपशील वाढवीत नाहीं. अशीच माझे हातून यापुढेंहि सत्‌धर्मकार्यात सेवा घडावी, 'हीच सद्‌गुरुकडे मागणी आहे. इतकेंच लिहून हा मजकूर वेळेच्या अभावीं पुरा करीत आहे. याकामीं गुरुबंधु मेघःशाम यांनीं आपला अमोलिक वेळ खर्च करून व मला वारंवार भेटण्याची दगदगहि सोसून या आठवणी लिहिण्याची जाणीव मला करून दिली, याबद्दल त्यांना धन्यवाद !

● ● ●

भाग १ ला

# आठवण नं. ६

लेखक : श्री. मल्हारराव कीर्तीकर, खार बंगला, मुंबई ५२.

माझे प्रेमळ गुरुबंधू श्री. मेघःशाम यांच्या आग्रहावरून श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर, यांच्याशी माझा कसा संबंध आला, आणि मी त्यांचेकडून अनुग्रह केव्हां घेतला, या विषयींची थोडक्यांत माहिती देत आहे.—

सन १९१५ मध्ये मॅट्रिकची परीक्षा पास न झाल्यामुळें आणि घरची परिस्थिति ठीक नसल्यामुळें मला शाळा सोडावी लागली. कायम नोकरी न मिळाल्यामुळें अनेकदां स्वस्थ बसावे लागले. त्याचवर्षी मे महिन्यांत आतां स्वानंदवासी असलेल्या श्री अवधूत महाराजांचा मुक्काम 'श्री पुरुषोत्तम मासा' निमित्त मारवाडी विद्यालयांत होता. त्यावेळीं महाराजांची कीर्तनें एक महिनाभर झालीं. मीहि माझ्या नातेवाइकांबरोबर महाराजांची कीर्तनें ऐकावयास जात असे. तीं कीर्तनें ऐकून माझ्या मनावर फार परिणाम झाला. 'मनुष्याला सद्गुरुकृपा संपादन केल्याखेरीज तरणोपाय नाहीं' हें मनाला पटलें. माझ्याबरोबर येणाऱ्या नातेवाईकांनी यापूर्वीच महाराजांचा अनुग्रह घेतला होता. कारण १९१५ पूर्वी महाराज पुष्कळ वेळां मुंबईत आले होते. ठिकठिकाणी परमार्थ सोप्या भाषेत स्पष्ट करणारीं कीर्तनेंहि होत. परंतु त्यावेळीं मला ती कीर्तनें ऐकण्याचा योग आला नव्हता. १९१५ च्या मे महिन्यांत महाराजांची कीर्तनें ऐकावयास मिळाल्यावर, मधून मधून मी रिकामा असे त्यावेळीं श्री महाराजांचे जवळच्या हस्तलिखित वह्यांतील श्रीपंत महराजांच्या व महाराजांच्या पदांच्या हस्तलिखित वह्यांच्या नकला करण्याची संधि मिळाली. (या वह्यांत श्री सद्गुरुपंत महाराज बाळेकुंद्रीकर यांचे गद्यनिबंध व प्रेमभेट, प्रेमतरंग व बोधानंद गुटिका वगैरे मजकूर होता.) अशा प्रकारच्या मजकुराच्या दोन-दोन तीन-तीन नकला स्वहस्तें लिहून काढल्यामुळें, त्यांतील श्रीपंत महाराजांच्या बोधप्रद वाणीचा प्रभाव मनावर होऊन महाराजांकडून अनुग्रह घेण्याची इच्छा मी माझ्या नातलगाजवळ प्रदर्शित केली. त्यांनी माझ्या पूज्य मातुश्रींचें त्यासाठीं अनुमोदन घेण्यास सांगितले. मातुश्रींची लहानपणापासूनच परमार्थाकडे ओढ होती. माझ्या मातुश्रींनी लगेच अनुमोदन दिलें. कारण मातुश्रींच्या मातुश्री व माझें मातुलघराणें, विजापूरचे प. पूज्य श्री. रामचंद्र तिकोटेकर (विजापुरास यांची समाधी आहे) या योगिपुरुषाचे अनुग्रहणानें पुनीत झालें होतें. माझी मातुश्री त्यावेळीं लहान असल्यामुळें तिला या अनुग्रहाचा लाभ मिळाला नव्हता. तरीपण प. पूज्य तिकोटेकर महाराज मुंबईस येत त्या त्या वेळीं

आमच्या आजीबरोबर माझी मातुश्रीहि त्यांचे दर्शनास जात असे. आणि श्री रामचंद्रबुवांचा हात तिच्या मस्तकावर पडत असे. या सिद्ध व महायोगिपुरुषानें केलेल्या अद्भुत योग-प्रयोगाच्या आठवणी माझ्या मातुश्री मला सांगत असत. ज्यांना संतसमागम होऊन गुरुकृपा लाभते त्यांच्या वडील मातुश्रींचीं घराणीं संत सत्पुरुषाच्या कृपेनें बहुशः पुनीत झालेली असतात, त्याचें प्रत्यंतर आमच्या घराण्यांत आलें ! मला श्री अवधूत महाराजांकडून जो पंत महाराजांचा अवधूत गुरु-मार्ग मिळाला त्यामागें मातुश्रींच्या घराण्याचीच पुण्याई होती, असें मला वाटतें.

माझ्या आजीकडील मंडळी मुंबईंत पालवरोड (ठाकुरद्वार) येथें रहात असत. परमपूज्य मौनीनाथ महाराज ( यांची समाधी विद्यारामभाई वाडींतील श्री राममंदिरांत आहे ) व प. पूज्य आत्माराम बुवा ( यांची समाधी आत्माराम बुवांच्या राममंदिरांत आहे ) तसेंच प. पूज्य हरिभाऊ ( यांची समाधी घसवाडींतील श्रीराम मंदिरांत आहे. ) इत्यादि सत्पुरुषांच्या दर्शनसंगतीचाहि लाभ प. पूज्य मातुश्रींना झाला असल्या-मुळेंच माझ्या मातुश्री व मी स्वतः अशा उभयतांना परमपूज्य सद्गुरु अवधूत महाराज यांचा अनुग्रह घेण्याचा योग १९१५ मध्यें लाभला.

## अनुग्रह घेतल्यानंतर

आम्ही अनुग्रह घेतल्यानंतर ज्या ज्या वेळीं महाराज मुंबईस येत त्या त्यावेळीं त्यांच्या निवासस्थानीं, त्यांच्या भोंवतीं २०–२५ मंडळी बसलेली दिसत व त्यांच्यांत आत्मज्ञान विषयक चर्चा चालू असे. मला त्यांत विशेष कळत नसल्यामुळें मी नुसतें श्रवण करी पण शंका कुशंका विचारीत नसे. कानीं पडेल तें ऐकून मनन मात्र करीत असे. मात्र श्री अवधूत महाराजांच्या तोंडून उमटणारी भाषा परमार्थाला पोषक, असें ज्ञाते म्हणत तें मला पटलें. "यज्ञामध्ये अग्निकुंड प्रदीप्त ठेवण्या-साठीं इंधनाची जरूरी असते, तसेंच आत्मज्ञानाची चर्चा सद्गुरुंकडून चालू असतां, आपापल्या शंका प्रांजलपणानें बोलून दाखविणें याच समिधा. सद्गुरूंनीं अशा शंकांचें समाधान करण्याची भाषा वापरणें म्हणजेच आत्मज्ञानाचा अग्नि प्रदीप्त ठेवणें होय" असे श्री अवधूत महाराज म्हणत. ज्या ज्या वेळेला मी श्री महाराजांच्या दर्शनासाठीं त्यांच्या निवासस्थानीं जाई त्या त्या वेळीं महाराजांची हास्यमुद्रा दृष्टीस पडावयाची ती दृष्टी व तें हास्य यांचें चित्र अजूनहि माझ्या स्मरणरूपी आरशांत दिसतें ! मग कांहीं बोलणें झालें कीं मला त्यांचा निरोप घ्यावा लागे. कारण कचेरीकडे जाण्याचा लकडा मांझे मागें असे !

रविवार खेरीज करून इतर दिवशीं महाराजांशीं बोलत बसण्यापुरता वेळच मिळत नसे. महाराजांनीं चमत्कार केलेले माझ्या नजरेस आले नाहींत. श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकरांनाहि चमत्कार वगैरे करणें आवडत नसे. त्यांच्या छापलेल्या

वाङ्मयावरून हे वाचकांचे लक्षांत येईल. अर्थात् पंतमहाराजांचे पट्टशिष्य श्री अवधूत महाराजांनाही चमत्काराचें स्तोम माजविलेलें आवडत नसे !

मी आणि माझ्या मातुश्री या उभयतांनीं श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतल्यानंतर त्यांना प्रश्न केला कीं 'श्रीसांप्रदायाप्रमाणें आम्ही संसारांत कसें रहावें ?'

यावर महाराज म्हणाले "अनुग्रहाचे वेळीं सांगितल्याप्रमाणें अखंड नामस्मरण करणं हें संसारांत वागण्याचें मुख्य सूत्र. त्याला अनुसरूनच संसार परमार्थ दृष्टीनें करण्याचें वळण आपोआपच आपल्या राहणीला लागत जाईल," मग महाराजांनीं आपला एक व श्रीपंतांचा एक असे दोन फोटो मला दिले; ते दोन्हीं फोटो माझ्या देवपूजनांत आहेत.

## आध्यात्मिक तीन तत्त्वांचा बोध

श्रीपंत महाराजांनी त्यांच्या शिष्यांना महत्त्वाच्या अशा तीन गोष्टी सांगितल्या-'बंधुप्रीति', 'आत्मशांति' व सद्‌गुरुभक्ति' व त्याप्रमाणें त्यांच्या शिष्यवर्गानीं संसारांत राहून ह्या तीन मुख्य गोष्टीचे अवलंबन केलें. प. पू. ती. अवधूत महाराजांची बंधुप्रीति किती जाज्वल्य होती ह्याचे एकच उदाहरण येथें थोडक्यांत देतो. श्री. शिवराम लक्ष्मण सत्पाळ, राहणार गोहे (कुलाबा जिल्हा) ह्यांना लहानपणींच म्हणजे १९०५ मध्यें श्री पंतमहाराजांचा कृपाप्रसाद (अनुग्रह) मिळाला होता. त्यावेळीं प. पू. ती. अवधूत महाराज, बेळगांवीं हजर होते. कारण त्यावेळीं ते कुरुंदवाडास राहात असत व श्री पंतमहाराज जास्त आजारी असल्यामुळें त्यांचे बरेच शिष्यवर्ग बेळगांवीं येऊन त्यांची भेट घेऊन जात.

## अवधूत महाराजांचे आवडते गुरुबंधु

ह्याच सुमारास वरील श्री. शिवराम लक्ष्मण सत्पाळ ह्यांनासुद्धां मुंबईहून त्यांच्या एका नातेवाईकानें बेळगांवीं श्रींचा अनुग्रह देण्यास श्रींच्या घरच्या मंडळीनें, 'श्रींना त्रास होऊं नये ह्याकरितां' पुष्कळ आढेवेढे घेतले; परंतु श्री. सत्पाळ ह्यांचा फारच मोठा योगायोग असल्यामुळें, श्रीपंतमहाराजांसारख्यांच्या हातून यथाविधि अनुग्रह उरकण्यांत आला व त्यामुळेंच जी काहीं भक्तमंडळी बेळगांवीं श्री. सत्पाळांच्या वेळीं हजर होती त्यावेळीं आमचे महाराज (प. पू. अवधूतबुवा) हजर होते.

श्री. सत्पाळ यांना श्रीपंतांनीं आपल्याजवळ केलें ह्याचे प. पू. श्री अवधूत महाराजांना मोठें कौतुक वाटलें व त्याचवेळीं श्री सत्पाळ ह्यांच्यावर परम पूज्य श्री अवधूत महाराजांची मर्जी बसली ती इतकी कीं प. पू. श्री अवधूत महाराज ज्या ज्या वेळेस कुरुंदवाडच्या बाहेर श्री हरीकीर्तनें करण्याकरितां जात असत त्या त्या वेळीं श्री. सत्पाळ यांना बरोबर घेऊन जात असत व त्यामुळें श्री. सत्पाळ व परम पूज्य श्री अवधूत महाराज ह्यांचा बंधुप्रेमा दुणावला तो शेवटपर्यंत. म्हणजे असें

झाले कीं श्री. सत्पाळ हे मूळचे गोहे (तालुका पेण आतां खालापूर व जिल्हा कुलाबा) येथें राहणारे, परंतु कांही वर्षें मुंबईमध्यें राहिल्यानंतर त्यानीं श्रीपंतमहाराजांचे मंदीर गोहे गांवी बांधलें व तेथें वास्तव्य करावयास लागले. एका फाल्गुन महिन्यामध्यें श्री. सत्पाळांच्या गोहे गांवी भयंकर आग लागली त्यामुळें श्री. सत्पाळांच्या मंदिराचा भाग देखील बराचसा नादुरुस्त झाला. परंतु श्री कृपेनें श्रींच्या पादुका स्थापन केलेल्या जागीं अगर श्रींचा प्रेमध्वज उभारलेल्या ठिकाणी श्री अग्नीनारायणानें स्पर्श देखील केला नाही! तथापी तेव्हां ही बातमी भडगांव येथें श्री अवधूत महाराजांच्या कानीं आली त्यावेळेस श्री. सत्पाळ ह्यांच्या देहालासुद्धां धक्का लागला असें जाणूनच की काय प. पू. श्रीअवधूत महाराज चैत्र शुद्ध प्रतिपदेदिवशीं आपण स्वतः श्रीपंत स्वरूपी लीन झाले! त्यानंतर जेव्हां खरी बातमी गोहे गांवाहून आली त्यावेळेस कळलें कीं श्री. सत्पाळांच्या मंदिराला जरी आगीचा तडाखा बसला तरी ते व त्यांचे कुटुंब हे सुरक्षित आहेत. परंतु ही बातमी श्रीअवधूत महाराजांनी देह ठेविल्यानंतर भडगांवास कळली! ह्यावरून बंधुप्रेमाची अंतर्ज्ञानी वृत्ती श्री अवधूत महाराजांमध्यें किती जाज्वल्य होती ह्याचे उदाहरण स्पष्ट होते!

## भडगावांतील श्रींची मठी व टापटीप

परम पूज्य श्री अवधूत महाराजांनी भडगांवी श्रींची एक मठी बांधली होती. तेथील व्यवस्था इतकी टापटीपची होती की त्यांच्यापासून दुसऱ्या संस्थानाने उदाहरणें घ्यावी! असो. श्री पंतमहाराजांचा संप्रदाय व श्री घराणें त्यांच्याशीं माझा व माझ्या कुटुंबाचा जो संबध आला त्याला कारण म्हणजे आमचे प. पू. श्री अवधूत महाराजच होत. श्री कृपेनें आमच्या कुटुंबातील मंडळीनी श्रीपंतमहाराज व प. पू. श्री. वामनराव काका पंत बाळेकुंद्रीकर खेरीज करून सर्व मंडळीशी परिचय श्री अवधूत महाराजांच्यामुळें झाला. वर लिहिल्या-प्रमाणें मला व माझ्या प. पू. मातोश्रींना, प. पू. अवधूत महाराजांनीं १९१५ मध्यें पुनीत केले होतें; तथापी श्री क्षेत्र बाळेकुंद्री येथें श्रींच्या समाधीचे दर्शन घेण्याचा योग १९२० पर्यंत आला नव्हता. सन १९२० पासून आजतागायत श्रीघराण्याशी, विशेषतः प. पू. प्रेमळ भाऊसाहेब ह्यांच्याशी आमचा घरोब्याचा संबंध आला व आम्ही प. पू. प्रेमळ श्री. कै. भाऊसाहेबांबरोबर जो अध्यात्माचा प्रेमा भोगला तो अवर्णनीय आहे. इतकेच वाटतें कीं आम्हीं कमनशिबी म्हणून प. पू. प्रेमळ श्री कै. भाऊसाहेब १९६२ मध्यें श्री चरणी लीन झाले. नाहींतर आम्हांला त्या अद्वितीय प्रेमसोहळ्याचा अजून कित्येक वर्षें उपभोग घेता आला असता.

पुनः एकवार प्रेमळ बंधु मेघश्याम ह्यांच्या प्रोत्साहानें हे लिहिले गेले त्यांना एकवार धन्यवाद देऊन मी वाचकांची रजा घेतो. ● ● ●

भाग १ ला

# आठवण नं. ७

## लेखक : श्री. खंडेराव सदाशिवराव सहानी

स्वानंदवासी श्री मोरेश्वर केशव दातार हे 'अवधूत बुवा' किंवा 'अवधूत महाराज' म्हणून प्रसिद्ध होते. श्रीपंत महाराजांचे ते एकनिष्ठ शिष्य व भक्त म्हणूनहि त्यांची ख्याति होती.

### पंताचे पहिलें दर्शन

कुरुंदवाडास श्री वेंकटराव दड्डीकर हे न्यायाधीश पंतभक्त होते. त्यांच्याकडे श्रीपंत सांप्रदायांतील भजन टिपऱ्या होत. एका प्रसंगी त्यांचेकडे श्री पंतांचें आगमन झालें. श्री अवधूत बुवांचें तेथें जाणें असल्यामुळें तेथें श्री अवधूतबुवांना श्रीपंतांचें पहिलें दर्शन व भेट झाली. नंतर कुरुंदवाड येथील पंतांचे शिष्य लेलेबंधुपैकीं सर्वांत वडील श्री. रामभाऊ यांचेबरोबर श्री अवधूतबुवा बेळगांवीं गेले. तेथें गुरुद्वादशीचे सुमंगल प्रसंगीं त्यांना श्रीपंतांचा अनुग्रह झाला. त्यावेळीं श्री अवधूत बुवांना श्रीपंतांनीं आशिर्वाद दिला "तूं माझ्या नामाचा ध्वज विश्वांत सर्वत्र उभारशील!" अंतःकरणपूर्वक श्रीपंतांनीं दिलेला हा शुभाशीर्वाद खरा ठरला! अनुग्रहानंतर श्रीपंतांच्या निर्याणापर्यंत श्री अवधूत महाराजांचें बेळगांवीं जाणें येणें होतें. श्री पंतांच्या निर्याणानंतर ते गुरुवियोग दुःखानें फक्त दोन मित्रांसह पायीं काशीस गेले. दुसऱ्या एका संकटकाळीं वडील मातुश्रींनाहि त्यांनीं नेलें होतें.

### प्रथम मुंबईस आले तेव्हां

श्री अवधूत महाराज १९०९ मध्यें प्रथमच मुंबईस आले त्यावेळीं मुगभाटांत, स्वतंत्र भाड्यानें घेतलेल्या जागेंत त्यांचा चार महिने मुक्काम होता. अवधूत महाराज मुंबईस येण्यापूर्वीं मुंबईत फक्त चातुर्मासांत कीर्तनें होत. हीं कीर्तनें ठराविक पोषाखांत, ठराविक कीर्तनकारांची, ठराविक दिवसांत होत असत—या कीर्तनांत संस्कृत सुभाषितें व गायन यांचा भरणा असे. या कीर्तनांचे श्रोतेहि ठराविक वृद्ध स्त्रीपुरुष असत.

## कीर्तनांतील क्रांति !

अवधूत महाराजांनीं मुंबईत आल्यावर कीर्तनक्षेत्रांत पोषाखांत आणि कीर्तनपद्धतींतच आमूलाग्र क्रांति केली ! ते दिसण्यांत तेजस्वी होते आणि कीर्तनांतील व गायनांतील त्यांची पद्धतहि एकदम आकर्षक होती.

श्री अवधूत महाराज कीर्तनाचे वेळीं व्याघ्रचर्माच्या आसनावर उभे रहात. अंगावर भगवी कफनी, फेटा, शैली, शृंगी, पायांत चाळ आणि हातीं संगमरवरी दगडाच्या पातळ चिपा; या चिपळ्यांचा करतळाप्रमाणें ते सुंदर नाद काढून श्रोत्यांना नादमुग्ध करीत ! **हें केवळ अवधूत महाराजांचेंच कीर्तनांतील वैशिष्ठ्य होतें !** कीर्तनाचे सप्ताह करण्याची एक नवीनच पद्धत त्यांनीं मुंबई शहरांत सुरू केली.

श्री अवधूत महाराज स्वतःच रचलेल्या नमनानें आपल्या कीर्तनास सुरवात करीत. मग श्रीरामदासांचा एक श्लोक म्हणून ते स्वतः रचलेला एखादा आत्मबोधाचा श्लोक म्हणता म्हणता त्यांत श्रीपंतांच्या प्रेमलहरींतील एखादें पद घेऊन, त्याच्या अनुसंधानांत संत श्री तुकारामाचे अभंग, श्री रामदासांचे श्लोक, श्री गीतेंतील श्लोक किंवा कबीराचा दोहरा घेऊन आपल्या पूर्वरंगाला रंग भरीत. नामस्मरणाचा गजर करवून श्री अवधूत महाराज उत्तररंगाला सुरवात करीत. उत्तररंगांत ते स्वतः रचलेलीं आख्यानेंच लावीत. विशेषतः नवनाथांचीच हीं आख्यानें असत. ही आख्यानें त्यावेळीं लोकांनीं पूर्वीं ऐकलेलीं नव्हतीं. गोपीचंद, गोराकुंभार, संतसखू, मीराबाई हीं श्री अवधूतमहाराजांचीं आख्यानें अत्यंत लोकप्रिय ठरलीं.

## कीर्तनाचा विशेष

श्री अवधूत महाराजांच्या कीर्तनांचा विशेष हा कीं, आध्यात्मिक विषय उच्च शिक्षणासाठीं निवडणारे कांहीं कॉलेज-विद्यार्थि आपले अवघड प्रश्न समजून घेण्यासाठीं श्री अवधूत महाराजांच्या कीर्तनास हजर रहात ! आणि कीर्तनांतील निरूपणानें त्यांचे पूर्ण समाधान होऊन ते आनंदानें परत जात.

श्री अवधूत महाराजांची प्रासादिक रसाळवाणी, त्यांनी स्वतःच रचलेली आकर्षक पदें व आख्यानें, सहज व सुबोध असें आध्यात्मिक निरूपण, ऐकण्यासाठीं मुंबईच्या समाजांतील श्रीमंत, गरीब शास्त्री-पंडित वगैरे श्रोते जमत. अवधूत महाराजांचीं कीर्तनें चातुर्मासांत असल्यास बाकीची देवळें ओस पडत !

## मत्सरी लोकांचे मारेकरीहि शरण आले !

श्री अवधूत महाराजांच्या सदरील यशाचा मत्सर करणारे कांहीं महाभाग निर्माण झाले व त्यांनीं महाराजांचा 'कांटा काढण्यासाठीं' म्हणून एका देवळांत मारेकऱ्यांचीहि योजना केली ! ही बातमी श्री अवधूत महाराजांच्या एका शिष्यास लागली ! 'आज कीर्तनास जाऊं नका' अशी त्यांनी महाराजांना कळकळीची विनंति केली ! तेव्हां श्री अवधूत महाराज म्हणाले—"जर श्रीपंत महाराजांना माझी सेवा आवडत नसेल तर मला मारेकऱ्यांपासून त्रास होईल ! एरवीं मला कोणी कांहींहि करूं शकणार नाहीं !" अखेर श्रीपंतांवरील दृढ भक्तीनें श्री अवधूत महाराज कीर्तनास गेलेच ! त्यांनी त्यादिवशीं कीर्तनाच्या पूर्वरंगांत जो बोध केला तो केवळ अपूर्व तेजस्वी वृत्तीचा होता ! प्रत्यक्ष मारेकऱ्यांवरच या बोधाचा इतका सुपरिणाम झाला कीं, कीर्तन संपल्यावर सर्व मारेकऱ्यांनीं महाराजांच्या चरणांवर साष्टांग दंडवत घातले ! इतकेंच नव्हे तर 'आज आमच्या हातून अत्यंत वाईट कृत्य घडणार होते ! त्यांतून महाराज, आपणच आम्हांला वांचविले याबद्दल आपले उपकार मानावे तिकके थोडेच" असे दिलगिरीचे उद्गारहि सर्वांनी काढले !

## अनुग्रह देण्याची पद्धत

पूर्वीं कोणाकडूनतरी अनुग्रह घेतलेली मंडळीहि फिरून अनुग्रह घेण्याकरितां श्री अवधूत महाराजांकडे येत ! त्यांना तसें न करण्याबद्दल महाराज उपदेश करीत. ते म्हणत "सत्पुरुष सर्व सारखेच. त्याकरितां त्यांनी दिलेल्या फोटोची वा पादुकांची आपण पूजाअर्चा करा व आपण फक्त कीर्तनास येत जा. श्रीपंत-बोधाचें श्रवण करून आपण आपल्या जीवनाचें समाधान व सार्थक्य साधून घ्या."

## मामा सहानी यांचेकडील कीर्तनें

आषाढ शुद्ध पौर्णिमेचा शुभदिन गुरुपौर्णिमा, म्हणून मुंबईत व आजुबाजूस फारच मोठ्या प्रमाणांत साजरा होतो. श्री अवधूत महाराज इ. स. १९१० पासून श्री गुरुपौर्णिमेकरितां मुंबईतील श्री. सदाशिवराव सहानी (उर्फ मामा सहानी) यांचेकडे येत. नंतर सतत बारा वर्षांत व त्या मुदतींत येणाऱ्या अधिक मासांत व दत्तजयंतीससुद्धां श्री. मामा सहानी यांचेकडेच महाराज उतरत असत. या निमित्तानें श्री अवधूत महाराजांची कीर्तनेंहि श्री. मामा सहानीकडेच होत. हीं कीर्तनें ऐकण्यास शेंकडों मंडळी जमत.

त्यानंतर हा दिवस निरनिराळ्या ठिकाणीं साजरा झाला. श्री अवधूत महाराजांच्या पश्चात् हा उत्सव त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव ह. भ. प. श्री. दत्तुबुवा, तथा श्री दत्तात्रय मोरेश्वर दातार, यांनीं ह्याच पद्धतीनें व उत्साहानें चालविला आहे. या उत्सवासाठींदेखील नित्य मुंबईचे शेंकडों भक्त हजर असतात.

## पंतबंधूंकडून कौतुक

'श्रीपंत नामानें मुग्ध झालेला मुंबईचा समाज श्रीपंत बंधुनीं येऊन स्वतः पहावा,' अशी श्री अवधूत महाराजांची व श्री. सदाशिवराव सहानी यांची देखील फार उत्कट इच्छा होती. शके १८३४ मध्ये श्री अवधूत महाराजांचा मुक्काम श्री. सदाशिवराव सहानी यांचेकडे असतां, रविवार मार्गशीर्ष शु. १२ शके १८३४ रोजीं त्यांचेकडे परमपूज्य श्री. गोविंददादा हे आले होते. त्यावेळीं श्री. दादांनीं **"सर्व तऱ्हेच्या मुंबईतील समाजांत श्री अवधूत महाराजांनीं श्रीपंत-बोधाचा इतका फैलाव केला."** याबद्दल त्यांचें फारच कौतुक केलें! त्याचप्रमाणें परमपूज्य नरसिंह अण्णादेखील आपल्या मुंबईच्या मुक्कामांत बऱ्याच वेळां श्री अवधूत महाराजांना भेटले आणि त्यांनीहि त्यांच्या या प्रचारकार्याबद्दल फार कौतुक केलें. श्री अवधूत महाराजांना श्रीपंत बंधूविषयीं अत्यंत आदर व प्रेम वाटे आणि सर्व पंत बंधू श्री अवधूत महाराजांवर स्वतःच्या बंधूप्रमाणेंच प्रेम करीत.

## पंत मातुश्रीहि अवधूत महाराजांचें कौतुक करीत

परमपूज्य पंतमातुश्री गं. भा. सीताबाई तर श्री अवधूत महाराजांचें फारच कोडकौतुक करीत. त्यांना त्या 'मोरू' म्हणून हांक मारीत! **कारण अवधूत महाराजांनीं श्री मुकुंदराव व त्यांची सर्व मडळी त्याचप्रमाणें मुंबई पुण्यासारख्या दूर दूरच्या मंडळींना पंत निवासाकडे आकर्षून आणलें होतें.**

एकदां सर्व मंडळी पंतांच्या पुण्यतिथीचे उत्सवास हजर असतां, अवधूत महाराजांच्या मातुश्री आजारी असल्यामुळें ते मात्र हजर राहूं शकले नाहींत. त्याबद्दल श्रीपंत मातुश्रींनीं चौकशी केल्यावर त्यांना अवधूत महाराजांच्या गैर-हजिरीचें कारण समजलें तेव्हां त्या उद्गारल्या **"माझामोरू नाहीं म्हणजे उत्सवास शोभा नाहीं!"**

श्रीपंतांच्या निर्याणानंतर एकावेळीं श्री अवधूतमहाराज बेळगांवीं असतां त्यांचें कीर्तन श्रीपंतनिवासांतच झालें. त्या कीर्तनांत श्री दत्तप्रेमलहरींतील एक पद घेऊन श्री अवधूत महाराजांनीं त्यावर १-१॥ तास निरूपण केलें. कीर्तन संपल्यावर

ते श्रीपंतमातुश्रींना नमस्कार करावयास गेले तेव्हां श्रीपंतमातुश्री म्हणाल्या "मोरू तूं फार सुंदर कीर्तन केलेंस"! तेव्हां अवधूत महाराज म्हणाले, "पंतांचीं अशीं तीन हजार पदें आहेत, त्यावर आम्ही उभ्या आयुष्यभर विवरण केलें तरी आयुष्य पुरणार नाहीं!"

## श्रीपंत-घराण्यांतील सर्वांना अवधूत महाराजांविषयीं जिव्हाळा

एकंदरींत पंत घराण्याला श्री अवधूत महाराजांविषयीं फारच जिव्हाळा वाटे. "श्रीपंतनामाचा ध्वज श्री अवधूत महाराजांनीं गांवोंगांवीं फडकावून पंतांचा आशीर्वाद सार्थ केला" असें सर्वजण म्हणत.

## श्री अवधूत महाराजांच्या यशाचें गमक

श्री अवधूत महाराजांनीं श्रीपंत महाराजांचा सांप्रदाय कोणत्याहि प्रकारचा उणेपणा येणार नाहीं अशा शिस्तबद्ध रीतीनें चालविला, हेंच त्यांच्या यशाचे गमक होय.

श्री अवधूत महाराजांचीं कीर्तनें मोठमोठ्या प्रसिद्ध मंदिरांत व मैदानांतहि होत. हजारों श्रोते त्यांच्या कीर्तनास जमत. मुंबईंत पुष्कळ कीर्तनकार आले व गेले, पण श्री अवधूत महाराजांसारखे सतत २५ वर्षें, वाढत्या लौकिकानें टिकून राहिले नाहींत!

## भिक्षेच्या फेरीची पद्धत

ठाणे व वसई येथें मुक्काम असतांना श्री अवधूत महाराज गुरुवार व शनिवारीं भिक्षेकरितां फेरी करीत. भिक्षेच्या फेरीची पद्धत अशीः—"कोणाच्या घरीं जावयाचें नाहीं. रस्त्यावर झोळींत भिक्षा कोणीं आणून टाकतील ती घ्यावयाची. एकदां पुढें गेल्यावर परत कोणी मागें बोलाविलें तरी जावयाचें नाहीं." फेरीची ही शिस्त त्यांनीं केव्हांहि मोडली नाहीं!

श्री अवधूत महाराजांनीं आपल्या सर्व आयुष्यांत कोणाकडे कसलीहि याचना केली नाहीं. कीर्तनाची बिदागीहि त्यांनीं कधीं ठरविली नाहीं. मिळेल त्यांत संतोष! न मिळालें तरीहि संतुष्टच असत!

## पंतपरिचय वाढण्यास वडील भगिनीची मदत

श्री अवधूत महाराजांना पंत महाराजांचा वारंवार विशेष परिचय घडण्यास त्यांच्या प्रिय भगिनी, (त्यावेळच्या सौ. आऊताई त्रिंबक मराठे) या विशेषतः कारणीभूत झाल्या. सौ. आऊताईंना कोल्हापुरासच पंत महाराजांचा अनुग्रह

झाला, अवधूत महाराजांबरोबर त्या पंतांच्या दर्शनास गेल्या असतां अनुग्रह झाला. त्यानंतर ज्या ज्यावेळीं अवधूत महाराजांना बेळगांवास अगर बाळेकुंद्रीस व दड्डीस पंतांच्या दर्शनास जाण्याची गरज वाटे त्या त्या वेळीं प्रवासाचा खर्च सौ. आऊताई मराठेच देत असत. मुंबईस ते कीर्तनासाठीं प्रथम आले त्यावेळींहि प्रवासखर्च देण्याचा क्रम या भगिनींनी चालू ठेविला होता.

## सक्रीय सहानुभूतीचें वैशिष्ट्य

अवधूत महाराजांच्या भगिनीच्या या सक्रीय सहानुभूतीचा विशेष हा कीं त्यांना या कामीं त्यांचे थोर मनाचे धर्मनिष्ठ पति श्री. त्रिंबकराव मामा मराठे यांची पूर्ण सहानुभूति होती. श्री. त्रिंबकराव मराठे यांच्यावर शाहू महाराजांची फार भक्ति आणि श्रद्धा होती. त्यांनाच ते 'खरा ब्राह्मण' समजून नमस्कार करीत ! ते हुजूर चिटणिशीच्या हुद्यापर्यंत वाढले. त्यांची कचेरी जुन्या राजवाड्यांत नगारखान्याचे उजव्या बाजूस होती. श्री. त्रिंबकराव मराठे यांचे चिरंजीव बी. ए. एल एल. बी. होऊन कांहीं दिवस इचलकरंजीस मुन्सफीचे हुद्यावर होते. नंतर कोल्हापुरास व पुण्यास जाऊन वकिली करूं लागले व १९५३ सालीं दिवंगत झाले. श्री. त्रिंबकराव मामासाहेबांची एक कन्या (भगिनी सौ. आऊताईंची मुलगी) सौ. शांता काशिनाथ ताम्हनकर सध्या मुंबईस असून पंतांच्या कृपेनें व अवधूत महाराजांच्या आशीर्वादानें संसार परमार्थ रूपानें करीत आहे.

## कीर्तनें निरपेक्ष

फक्त १। रु. बिदागी देणाऱ्या लोकांनीहि कीर्तनाला बोलाविले तरीहि अवधूत महाराज त्यांचेकडे कीर्तनाला जात ! असेंअसलें तरी श्री अवधूत महाराजांना अनेकांनी कीर्तनांत अलोट पैसा दिला. शिवाय बिन्हाडी येऊन अनेक भक्तांनीं सोन्याचीं सलकडीं, आंगठ्या, चांदीची भांडीं वगैरे खूप वस्तू दिल्या. पण अंतःकरणाच्या औदार्यामुळें त्यांनी आपल्या साथींतील मंडळीला सोन्याची सलकडीं, आंगठ्या, उंची कापड वगैरे वस्तू दिल्याचें ज्यांनी पाहिलें अशा कित्येकांनीं त्यांच्या औदार्याचें कौतुकानें वर्णन केल्याचें प्रस्तुत लेखकानें ऐकलें आहे ! श्री अवधूत महाराजांनीं द्रव्याचा, दागिन्यांचा किंवा कपड्यांचा संग्रह असा केलाच नाहीं. तसा केला असता तर यांची स्थावर जंगम इस्टेट खूपच झाली असती !

## द्रव्याचा ईश्वरार्पण बुध्दीनें उपयोग !

मिळालेला सर्व पैसा श्री अवधूत महाराजांनी कुरुंदवाडास श्रीपंतांचे सुंदर अधिष्ठान थाटण्यांत आणि श्री गोकुळाष्टमीसारखे श्रीपंतजन्माचे उत्सव थाटानें करण्यांत खर्च केला. शिवाय पूर्व खानदेशांतील भडगांव येथें श्री अवधूत मठी बांधण्यासाठींहि खूप खर्च केला.

(१) आतां भडगांव-मठींत श्रीपंतजन्मोत्सव गोकुळाष्टमीस होतो.

(२) श्री दत्तजयंतीचा उत्सव, चंपाषष्ठी ते श्री दत्तजयंतीपर्यंत मोठ्या उत्साहानें चालतो.

सदरील उत्सव मोठ्या प्रमाणांत होतात. दररोज २०० ते ३०० माणसें मठींत जेवतात. शिवाय महाप्रसादादिवशीं १२०० ते १५०० पान उठतें ! मुंबईहून आलेलीं शेंकडों मंडळी मठींतच उतरत व त्या सर्वांची दोन वेळां चहा व फराळ आणि जेवण वगैरे सर्व व्यवस्था मठींतच होई याचें सर्वांना नवल वाटे ! कुरुंदवाडांतील आणि भडगांवातील महाप्रसादादिवशीं गांव भोजनाचे प्रसंगी गरीब आणि अपंग यांना प्रत्येकीं एक मोठी भाकरी व वर भाजी दिली जाई.

## अनुकरणीय उत्सव व्यवस्था

श्री अवधूत महाराजांच्या पश्चात् त्यांचे चिरंजीव श्री. अण्णा तथा श्री. ह. भ. प. दत्तात्रय मोरेश्वर दातार, यांनीं याच पद्धतीनें मोठ्या उत्साहांत व थाटानें उत्सव चालविला आहे. श्री. दत्तात्रय महाराजहि आपल्या वडिलांप्रमाणेंच आपली सर्व कमाई या उत्सवाप्रीत्यर्थ अव्याहत खर्च करीत आहेत. अद्यापहि हे उत्सव फार मोठ्या प्रमाणांत साजरे होत आहेत. एखाद्या यंत्रासारखी या उत्सवाची व्यवस्था चालू असते, ती पाहून, जमणाऱ्या सर्व पाहुण्यांना सकौतुक आश्चर्य वाटे. असले उत्सव करणाऱ्या सर्व संस्थांनीं याचें अनुकरण करण्यासारखें आहे.

श्री अवधूत महाराजांच्या पश्चात् श्री दत्तमहाराजांनीं आणखी दोन उत्सव भडगांव मठींत सुरूं केले आहेत.

(१) स्वानंदवासी अवधूतमहाराजांचा जन्मदिन

शके १७९५ भाद्रपद संकष्टी.

(२) स्वा. वा. अवधूत महाराजांचा निर्याण दिन (२१-३-१९३९)

चैत्र शुद्ध प्रतिपदा, (शके १८६१)

श्री अवधूत महाराजांचा निर्याण समारंभ लो. टिळकांप्रमाणें झाला ! गिरणा नदीच्या पात्रांतील खास जागेची सरकारी परवानगी काढण्यांत आली. हजारों शिष्यमंडळी अत्यंत शोकमग्नावस्थेंत या प्रसंगीं गिरणा नदीच्या त्या स्थानीं हजर होतीं. यासाठीं दहनभूमीवर ३० फूट उंच सीमेंट–कॉंक्रीटचा स्तंभ उभारला आहे. श्री अवधूत महाराजांच्या पुण्यतिथीचे दिवशीं या स्तंभावरील ध्वज मिरवणुकीनें नेऊन स्तंभावर लावतात व उत्सव-सांगता करतात.

## आत्मबोध अभंगाचे श्लोक

श्री अवधूत महाराजांच्या स्वतःच्या 'आत्मबोध अभंग' श्लोकांचें एक पुस्तक छापून प्रसिद्ध झालें आहे. त्याच्या आतांपर्यंत पांच आवृत्त्या निघाल्या असून आतां सहावी आवृत्ति छापली आहे.

## महाराजांचे जांवई

श्री. दत्तोपंत कृष्णाजी देवधर हे टाटा कंपनीचे रिटायर्ड इलेक्ट्रिक इंजिनियर आहेत. श्री अवधूत महाराजांच्या एकुलत्या एक कन्या सौ. द्वारकाताई द. देवधर दोन्ही घराण्यांच्या शुभाशीर्वादानें सुखाचा ऐहिक पारमार्थिक संसार करीत आहेत. त्यांना दोघे सुपुत्र असून ज्येष्ठ पुत्र श्री. बापूसाहेब हे आर्मीमेजरचे हुद्यावर आहेत आणि दुसरे सुपुत्र श्री. मधुसूदन दत्तात्रय हे बी. एस. सी. असून अलेम्बिक केमिकल कंपनीचे प्रतिनिधी म्हणून जबाबदारीचे प्रचारकार्य करतात. श्री. दत्तोपंत देवधर यांची एकुलती एक कन्या चि. सौ. लीलाताई या दुर्गापुरास असतात, त्यांचे पति श्री. जोशी हे या कारखान्यांत बी. ई. इंजिनियर म्हणून महत्त्वाच्या हुद्यावर आहेत.

एकंदरींत श्री अवधूत महाराजांचा प्रापंचिक आणि पारमार्थिक आयुष्य-क्रम अत्यंत यशस्वी ठरला, हें महाराजांच्या धर्मप्रवणतेचें आणि श्रीपंतांच्या शुभाशीर्वादाचें फळ होय.

## सर्व कुटुंबीय भक्तिमार्गी

श्री. दत्तात्रय मोरेश्वर तथा श्री दत्ता महाराज यांना ५ मुलगे व ३ मुली अशीं अपत्यें असून वडील चिरंजीव एका वजनदार औद्योगिक कारखान्यांतील सुस्थिर अशा चांगल्या नोकरींत आहेत. दुसरे चिरंजीव आतां घराण्याचा कीर्तनाचा पेशा पत्करीत असून त्यांचीहि त्या कामीं योग्य प्रगति आहे. एकंदरींत आठहि मुलें पंतांच्या कृपेनें व महाराजांच्या आशीर्वादानें आपापली कर्तव्यें यशस्वी करण्याचे

मार्गांवर आहेत. सर्वांचा मुख्य बाणा भक्ति-मार्गांचाच असून श्री. दत्त महाराज व त्यांच्या सुशील पत्नी सौ. आनंदीबाई यांचें सर्वांना योग्य वळण व प्रोत्साहन आहे.

श्री दत्तमहाराजांचे पोलीस खात्यांतील मोठ्या हुद्यावर असलेले बंधु श्री. पांडुरंग मोरेश्वर दातार यांनाहि ३ मुलगे व दोन मुली अशीं अपत्यें असून तीहि वरील प्रमाणेंच भक्ति मार्गांच्या बाण्याचीं आहेत. श्री. पांडुरंग मोरेश्वर यांचा सर्वांत मोठा मुलगा एका प्रसिद्ध औद्योगिक कारखान्यांत असून या कारखान्याच्याच खर्चानें तो लंडनला राहून आपल्या कामाचा विशेष अनुभव घेऊन आला आहे. दुसरा मुलगा मालाची वाहतूक करणाऱ्या बोटीवर सरकारी शिक्षण व हुद्दा घेऊन मरीन इंजिनियरचे हुद्यावर असून लंडन, अमेरिका व जपान या ठिकाणीं त्यांच्या बोटींची वाहतुक सुरूं आहे. तिसरा मुलगाहि त्याच क्षेत्रांत तरबेज होण्यासाठीं डफरीन बोटीवर शिक्षण घेऊन तयार झाला आहे. मोठी मुलगी बी. एस. सी. असून तिच्या खालची कॉलेजच्या फर्स्ट इंटरमध्यें आहे. इतकें शिक्षण घेऊनहि सर्व मुलें माता पित्यांच्या आज्ञेनें भक्ति मार्गांचा बाणा बाळगून आहेत.

श्री. दत्तमहाराजांचें धाकटे बंधू श्री. अनंतराव हे एका नामवंत गिरणीचे वीव्हिंग मास्तर म्हणून सुस्थिर झालेले असून त्यांचे दोन मुलगे व एक मुलगी देखील लहानपणापासून या कुटुंबांच्या परंपरेला शोभेशा भक्तिमार्गी बाण्यांचेच आहेत व त्यांना त्यांच्या मातापित्यांचें ठीक वळण आणि प्रोत्साहन आहे.

## अवधूत महाराजांच्या चरित्रांतील ठळक घटना

अवधूत महाराज हे श्रीक्षेत्र पंत बाळेकुंद्री बेळगांव येथील श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकर ह्यांचे सत्‌शिष्य व त्यांना श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकरांचा

**'तूं वाक्पटु होऊन माझ्या नांवाचा ध्वज सर्वत्र फडकवशील' असा आशीर्वाद !**

**सुबोध व सुलभ आकलन करतां येण्यासारखा बोध :–** त्यांचा बोध एका विशिष्ट पद्धतीनें केला जात असे. कीर्तनांत प्रथमतः त्यांच्या स्वतः रचलेल्या नामस्मरणानें सुरवात होऊन नंतर एखादा श्रीसमर्थांचा किंवा स्वतः रचलेला श्लोक श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर ह्यांच्या प्रेमलहरींतील एखादे पद घेऊन त्याच्या आधारें निरनिराळे श्री संत तुकाराम, एकनाथ, नामदेव, वगैरे संतांच्या अभंगाची जोड देऊन व ती सहज पटावी म्हणून नेहमीच्या व्यवहारांतील प्रसंग घेऊन ते सर्व अश मूढजनास सुद्धां सहज समजेल अशा तऱ्हेनें अत्यंत सोप्या अशा भाषेंत समजावून देत असत. त्याचप्रमाणें उत्तर रंगांतील आख्याने सुद्धां

अगदीं नवीन धर्तीची असत. त्यांत संतसखू, मिराबाई, दामाजी, कबीर, राजा गोपीचंद त्याप्रमाणें नवनाथांची आख्यानें मुंबईकरांस अगदीं अपरिचित अशी अत्यंत रसाळ अशा त्यांच्या वाणीनें लोकांस ऐकण्यास मिळत असत व ती सर्व लोकांची अत्यंत आवडीची अशी झाली होती. ह्याचे कारण ती त्यांनी स्वतःच रचलेल्या अत्यत मधुर व गोड अशा पदाने व हकीकतीने भरगच भरलेली असत. हा त्यांचा रसाळ बोध व आख्याने ऐकण्याकरितां दूरदूरचे लोक नेहमी हजर असत. त्यांचा हा अवीट बोध निदान २–२॥ तप पर्यंत म्हणजे ३० वर्षें लोकांनीं सतत ऐकला तरी तो त्यांच्या निरनिराळ्या नव्या नव्या पद्धतीनें सांगण्यामुळें तो नेहमीच नवाच वाटावा व नेहमीच ऐकावा असे वाटत असे, अशा पद्धतीनें अवधूत महाराजांनीं पंतनामाचा ध्वज सर्वत्र फडकाविला !

## विलेपारले येथील प्रचीति

त्यांच्या कीर्तनांतील पूर्वरंगाच्या बोधानें पंडीत शास्त्री सुद्धां तल्लीन होत असत ह्याची प्रचिती विलेपारले येथें १९३० मध्यें त्यांची ‘ लोकमान्य सेवा संघ ’ या संस्थेंतील कीर्तनाने अनुभवास आली. विलेपारले म्हणजे पुण्यासारखे जिज्ञासु व चिकित्सक विद्वान शास्त्रीपंडितांचें एक ठिकाण समजले जाते व तेथील ही मंडळी त्यांच्या कीर्तनानें इतकी भारावून गेली होती कीं ती मंडळी नेहमी अवधूत महाराज पुन्हा केव्हां येणार व बोध करणार म्हणून चौकशी करीत. परंतु त्यानंतर त्यांची प्रकृती तितकीशी चांगली नसल्यामुळें ते पुन्हां नेहमींप्रमाणें उभ्यानें कीर्तन करणें शक्य नव्हते तरी पारलेकर मंडळीच्या अत्यंत आग्रहाने त्यांनी बसूनच त्यांना एकदां दोन तास बोध करून त्यांची इच्छा थोड्या फार प्रमाणांत तृप्त केली. विलेपारले येथील त्यांच्या १९३० सालच्या मुक्कामांत ते श्री. सदाशिवराव पु. साहानी यांच्याकडे रहात होते.

## विलेंपारलें येथील अवधूत महाराजांचें स्मारक

महाराजांनीं श्री. मामा सहानी यांच्या आवारांत एक औदुंबराचे रोप लावलें. त्याची भाविक भक्तजन ‘ कल्पवृक्ष ’ म्हणून पूजा करतात. त्यामुळें आपापल्या मनकामना पूर्ण होतात, अशी भाविक भक्तांची श्रद्धा आहे ! त्रिकाळपूजा, लघुरुद्र, एकादष्णी, गुरुचरित्र-पारायण इत्यादि धर्मकृत्यें या औदुंबर-कट्टयावर नेहमीं होत असतात. एकंदरींत हें स्थान श्री अवधूत महाराजांचें एक स्मारकच होऊन राहिलें आहे !

## अनुग्रह देण्याची पद्धत

हीसुद्धां एक विशिष्ट तऱ्हेची असे. एखादा इसम त्यांचेकडे आला व 'महाराज मला आपला अनुग्रह द्या' असें म्हणाल्याबरोबर दिला जात नसे! त्यानें कांहीं दिवस कीर्तनास किंवा पंचपदीस ( कीर्तन नसतांना सायंकाळीं होणारे भजन ) येऊन त्याने बोधश्रवण करावा व नंतर अशा तऱ्हेनें त्याच्या मनावर परिणाम झाल्यावर एखाद्या परिचित इसमाच्या प्रशिस्तीने त्यास अनुग्रह दिला जात असे! श्रीपंत महाराजांचा असा आदेश होता कीं दान करतांना जसे सत्पात्री करावें तसा अनुग्रह करतांना तो सत्पात्रीं म्हणजे ज्यास त्याची गोडी व महत्त्व असेल अशांनाच करावा. स्त्रीस अनुग्रह द्यावयाचे वेळीं तिच्या पतीसमक्ष तो दिला जाई. त्याचप्रमाणें वयांतील मुलांस त्यांच्या वडिलांच्या समक्ष दिला जाई. अनुग्रह देतांना तेथील वातावरण अगदीं शांत व पवित्र असे. अनुग्रह दिल्यानंतर मंत्राचे व मंत्रग्रहणाचे महत्त्व व त्याचे पावित्र्य ह्यावर अत्यंत सुलभ व समजण्यास सोपा असा बोध केला जाई व तो अत्यंत शांत चित्ताने ग्रहण केला जाई.

## परनिंदेबद्दल तिटकारा

महाराजांना दुसऱ्याची निंदा केलेली खपत नसे. एकदां त्यांचा मुक्काम सुतारगल्लींत श्री. सदाशिवराव साहानी ह्याच्याकडे असतांना त्यांच्यासमोरच एका ठिकाणीं एक महाराज आले होते. ते पुण्याहून शेणमार होऊन तेथे पळून आले होते! ही गोष्ट अवधूत महाराजांस त्यांच्या शिष्य मंडळीने सांगतांच ( त्यांना त्याबद्दल माहिती होतीच ) त्यांनी त्या शिष्यांना असे सांगितले की " तुम्ही अशी निंदा करून आपली जीभ विटाळूं नका. जो तो आपल्या कर्मांचे फळ चाखील तुम्हांस त्यांची निंदा करून काय मिळणार! आपण मात्र अशा उदाहरणानें बोध घेऊन आपली वागणूक आपला दर्जा व पेशा लक्षांत ठेवून दोषास पात्र होणार नाहीं ह्याबद्दल दक्षता घ्यावी म्हणजे झाले. "

## निर्लोभ व अनासक्ति

त्यांचा कीर्तन करण्याचाच पेशा असल्यामुळें तेच त्यांचे उत्पन्न; परंतु तरीसुद्धां त्यांनीं केव्हांही कीर्तनाबद्दल अमुक बिदागी द्यावी लागेल, असे कोणासही केव्हांही सांगितले नाहीं. इतकेच नव्हे तर कीर्तनानंतर रु. १। ( सव्वा रुपया ) बिदागी दिली असतांना पुन्हां त्यांनी बोलावले असतांना त्यांच्याकडे पुन्हा जाऊन कीर्तन केले व ह्यावेळी सुद्धां त्याने रु. १। दिला तरी ते कांहीच बोलले नाहीत! आपण जाणतोच कीं कीर्तनकार रु. २५ बिदागीच्यापेक्षां

कमी बिदागींत कीर्तन करीत नाहीत व अशा तऱ्हेने कमी बिदागींत कीर्तन करणे म्हणजे कीर्तनाची व कीर्तनकाराची प्रतिष्ठा कमी करणे असे मानले जाते. परंतु अवधूत महाराजांचा दृष्टिकोन अगदीं निराळा होता. ते असे म्हणत की, "केवळ पैशाच्या अभावामुळें एखाद्या गरीब परंतु भावीक इसमाची घरीं कीर्तन करण्याची इच्छा अतृप्त राहूं नये व म्हणून अशा तऱ्हेने कीर्तन करण्यास कांहींच हरकत नसावी."

## व्यावहारिक दृष्टी

आपण कीर्तनास जाणारी मंडळी पहात असतोच कीं कीर्तन सुरू होऊन त्यांतील पहिला बहुतेक वेळ गाण्यांत जातो व नंतर कीर्तन किती वेळ चालेल त्याला बंधन नसते! परंतु अवधूत महाराज ह्याबाबतींत फारच दक्ष असत. त्यांची कीर्तने बरोबर ९ च्या ठोक्याला सुरू होऊन बरोबर ११ वाजता संपत असत. त्यांची कीर्तने सतत कांहीं आठवडे व महिने चालत असत व त्याकरितां दूरदूरचे लोक येत असत त्यांतील बरीचशी मंडळी उद्योगधंदे व नोकरी करणारे असत व म्हणून जर अनियमीत वेळ कीर्तन केले तर त्यांना व्यवसाय करण्यांत अडचण येईल व प्रकृतीवर सुद्धां परिणाम होईल म्हणून त्याचे कीर्तन फक्त दोन तासच नियमीत होत असे.

## समदृष्टी

त्यांच्याकडे गरीब श्रीमंत हा भेदभाव नव्हता ते सर्वांकडे समभावाने पहात असत व सर्वांची विचारपूस सारखी करीत असत. उलट त्यांना गरीब इसमाबद्दल अत्यंत प्रेम वाटत असे व तोही त्यांच्या वागणुकीनें भारून जात असे व आपणास भाग्यवान समजत असे.

## समाजवाद

ज्याला आपण समाजवाद म्हणतो तो त्यांच्या वागण्यांत नेहमीं प्रत्यक्ष दिसण्यांत येत असे. त्यांना परमेश्वर कृपेनें केव्हांच कमी पडले नाही. परंतु त्यांना जे मिळत असे ते सर्व त्यांचेच एकट्याचे आहे असे ते मानत नसत हे त्यांच्या पुढील उदाहरणांवरून दिसून येत आहे.

## समभावनेच्या औदार्याची कांहीं उदाहरणें

त्यावेळीं सोने चांदी स्वस्त होती. तेव्हां त्यांना सोन्याच्या आंगठ्या सळकडी वगैरे मुंबईत शिष्य मंडळी देत असत, परंतु त्यापैकीं त्यांनीं आपल्या बरोबरच्या मंडळीस सुद्धां दिलेली आहेत. त्यांचप्रमाणें त्याच्या स्मश्रू करणाऱ्यास ते मूठ भरून

खुर्दा (त्याच्या कीर्तनांत आर्तीत जमा झालेले पैसे) त्याच्या कामगिरीबद्दल देत असत! त्यावेळीं एखाद्या इसमानें महाराज आपण असें काय करतां म्हणून विचारलें तर ते म्हणत "अरे बाबा मला जे कांहीं मिळते त्यावर माझा एकट्या-चाच हक्क नाहीं त्याचा सुद्धां हक्क आहे असे मला वाटते." त्यांनी पुष्कळ पैसा अडका मिळविला कारण तो सुबत्तेचा काळ होता परंतु संग्रह केला नाहीं. त्यांनीं त्याचा विनियोग कुरुंदवाड येथें श्रीपंतमठी त्याचप्रमाणें भडगांव येथें दत्तमंदीर व अवधूत मठी बांधण्यांत केला. त्यानी जर संग्रह केला असता तर त्यांच्या मुलांबाळां-करितां बरीचशी मिळकत ठेवतां आली असती; परंतु तसे कांही त्यांनी केले नाही. इतकेंच नव्हे तर त्यांच्या सुपुत्रांनी त्यांच्या देवस्थानाचा सुद्धां आतां ट्रस्ट केला आहे.

## आत्मचिंतन

त्यांच्या बोधाचा ओघ अव्याहत चालू असे. कोणी आल्यावर त्याबरोबर प्रापंचिक विषयाची चर्चा न करता एखादे श्रीरंताचे पद घेऊन त्यावरच बोलत रहाणे ते पसंत करीत व अशा तऱ्हेने आपले स्वतःचे व त्या इसमाचे समाधान करीत. त्यांना खुर्चीवर किंवा इतर ठिकाणी बसून रहाणे आवडत नसे ते नेहमी फेऱ्या करीत रहावयाचे व त्यावेळांत दररोज कीर्तनाकरितां नवीन नवीन पद रचावयाचे. हीं अध्यात्मिक व देहावर जरी असली तरी त्याकरितां नेहमीच्या घरगुती प्रसंगावर सुद्धां असावयाची.

## देहावरील आध्यात्मिक पदांचे नमुने

**धुणे धुण्याचा प्रसंग :** धुतांच मोती जळीं हरपलें सखोल मोठे पाणी
सखोल मोठे पाणी चल्ला पाहूं सहा चार अठराजणी.

**वेणीफणी :** भक्ति ग वेणी माझी गुंफा गे सहाजणी
चित्त चतुःष्टय चौघी बहिणी
एक चित्ते घाला वेणी
त्रिगुण त्रिपदा आवळा वेणी
माझी गुंफा गे सहाजणी.

अशा तऱ्हेने त्यांनी स्वतः रचलेली पुष्कळ रसाळ पदे आहेत. कीर्तनाचे आख्यानांत तर त्यांनी स्वतःच रचलेल्या पदांचा साठा असावयाचा व तो ऐकणा-ऱ्यास अत्यंत आल्हाद व्हावयाचा, त्यांचे "आत्म बोधाचे श्लोक" व इतर त्याची कांही पदें पुस्तक रुपाने प्रसिद्ध केली आहेत त्याच्या आवृत्त्या संपल्या असून

आतां त्यापैकी कांही शिल्लक नाहीत. आतां ६ वी आवृत्ती प्रसिद्ध करण्याचा त्याचे सुपुत्र गुरुबंधु दत्तात्रय अण्णा ह्यांचा विचार आहे, कारण त्याला भक्त मंडळींची फार मागणी आहे.

## लोकप्रियता

मुंबईत पुष्कळशी निरनिराळ्या संप्रदायाची व गुरुमार्गांची मंडळी होऊन गेली परंतु अवधूत महाराज ह्यांची लोकप्रीयता व अखंडत्व हे जसे प्रत्ययास येते तसे ह्यां इतरांच्या वाट्यांस आले नाही. अवधूत महाराजांची लोकप्रीयताही त्यांच्या आगमनाच्या दिवसासारखीच अखेर पर्यंत कायम होती इतकेच नव्हे तर ती वाढतच राहिली! आज त्यांच्या देहत्यागास २५ वर्षें होऊन गेली तरी त्यांच्या बद्दलचा पूज्य भाव आज सुद्धां दृष्टोत्पत्तीस येत आहे ह्याचे कारण त्याचे सुपुत्र गुरुबंधु दत्तात्रय तथा अण्णा ह्यानी त्यांच्या वडिलांच्या मागे त्यांचा मार्ग सारख्याच निर्दोषरीतीने चालविला आहे.

## अवधुत बुवांच्या लोकप्रीयतेची प्रचिती

त्यांच्या शेवटच्या मुक्कामांत कीर्तनाचे वेळीं अनुभवास येत असे. जेव्हां ते श्री दत्त प्रेमलहरींतील पुढील पद म्हणत असत.

झाली आमुची फेरी आतां जातो माघारी ॥ धृ ॥
प्रेमळ संती सांभाळ केला काय वर्णू थोरी ॥
पूर्णलोभ हा तुमचा असूंद्या या बाळावरी ॥
देह राही तरी येऊन भेटूं गाऊं प्रेम लहरी ॥

हें पद म्हणत असतां कीर्तनांतील मंडळी ढळढळा रडत असत. कारण महाराजांचा वियोग व त्यांचा रसाळबोध पुन्हां ते येईपर्यंत ऐकण्यास न मिळण्याचे दुर्भाग्य त्यास रडावयास लावी!

ते परत जातांना त्यांना अत्यंत भव्य प्रमाणांत थाटाचा निरोप दिला जाई तो एखाद्या संस्थानिकासारखा असे! निरोप द्यावयास बोरीबंदर स्टेशनवर त्यांची शिष्य व भक्तमंडळी स्वतःच्या गाडींत त्यांच्या मुक्कामापासून त्यांच्या बरोबर मोठ्या संख्येनें जात असत. अवधूत महाराज कीर्तनांत जरी कफनी, शैली, शृंगी धारण करीत असत तरी इतर वेळीं ते राजयोग्यासारखे रहात असत. त्यांचा पेहराव गरम कापडाचा डगला, रेशमी कांठी धोतर, कोषा (फेटा) किंवा वाघाच्या चर्माची टोपी, मखमलचे जोडे असा असावयाचा. ते दिसण्यांत सुरेख व

त्यांच्या चेहऱ्यावर सात्विक तेज झळकत असल्यामुळें त्यांना पहातांना आपल्या मनांत पूज्य भावना निर्माण होत असे. बोरीबंदर स्टेशनवर त्यांना निरोप द्यावयास आलेली निरनिराळी मंडळी वगैरे पाहून त्याचप्रमाणें तेथील तो त्यांचा प्रेमळ भक्तांचा मेळावा पाहून इतर प्रवाशी हा कोण ' सत्पुरुष आहे किंवा संस्थानिक आहे ' अशी चौकशी करीत !

## नेटका प्रपंच

समर्थांच्या प्रपंच करावा नेटका या उक्तीप्रमाणें त्यांचा प्रपंच सुद्धां फारच सुंदर असा झाला आहे. त्यांचे वडील चिरंजीव गु. भ. प. दत्तात्रय तथा अण्णा त्यांचा संप्रदाय पुढे उत्तम तऱ्हेने चालवीत आहेत. दुसरे चिरंजीव श्री. पांडुरंग हे डे. कमिशनर ऑफ पोलीस आहेत. तिसरे चि. अनंता हे मिलमध्यें मोठ्या हुद्यावर आहेत, चिरंजीवी सौ. द्वारकाताई ह्यांचे यजमान रिटायर्ड इंजिनीअर आहेत, त्याचप्रमाणे त्यांचे नातू सुद्धां मिलीटरींत नेव्हींत, व्यवसायांत मोठ्या हुद्यावर असून मोठ्या चिरंजीवाचा एक मुलगा आपल्या वडिलांचाच मार्ग पुढे चालविण्याची तयारी करीत आहे. अवधूत महाराजांची एकच बहीण प. पू. आऊताई त्यांचा मुलगा मुन्सफच्या हुद्यापर्यंत गेला होता व मुलगी सौ. संतुताई हिचे पति श्री. काशिनाथपंत ताम्हनकर साहित्यिक व देशभक्त, हेच या चरित्रनायकाच्या चरित्राचे संपादक आहेत.

अवधूत महाराजांसारखे संसार व परमार्थ दोनही सुंदर तऱ्हेनें चालविण्याचे भाग्य विरळाच लाभते.

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. ८

लेखक : श्रीमान् शेठ रामकृष्ण झिपरू वाणी (श्री. बाबुलाल शेठ)
राहणार मु. पो. भडगांव, ता. पाचोरा जि. पूर्व खानदेश.

### प्रास्ताविक

श्री सद्‌गुरु मोरेश्वर महाराज तथा श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर हे प्रथम १९०८ सालीं भडगांवीं आल्याचें समजलें. त्यावेळीं 'पंचायतन मंदिरांत' उतरले होते. भडगांवाहून ते थेट काशीयात्रेस गेले. फिरून महाराज भडगांवीं आले त्यावेळीं श्रीमती केळकरबाईंचे वाड्यांत उतरले होते. त्यानंतर महाराजांनीं केळकरवाड्यानजीकची रहाळकरांची पडकी जागा खरीदून, श्री सद्‌गुरु पंत महाराजांचें अधिष्ठान मांडलें, मी तेव्हांपासून या अधिष्ठानाच्या व महाराजांच्या दर्शनास जाऊं लागलों. महाराज कांहीं काळ भडगांवचे श्री दत्तमठींत असत आणि कांहीं काळ मुंबई-पुणे इत्यादि ठिकाणीं फिरतीवर जात असत. महाराज फिरतीवर असले कीं त्यांच्या दर्शनाचा योग नसे.

### श्री दगडूबुवा वाणी

महाराज फिरतीवर असतांना, अधिष्ठानाचे जागीं, आमच्या जातीचे श्री. दगडूबुवा वाणी मठींतील सेवेला व भजनाला असत. प्रत्येक गुरुवारीं ते गांवांत भिक्षेची फेरी करीत. रहाळकरांच्या जागेनंतर आजूबाजूच्याहि कांहीं जागा महाराजांनीं खरीदल्या आणि श्री दत्ताचें अधिष्ठान स्थापन करण्याची योजना आंखली. बाहेर बांधावयाच्या श्री दत्त अधिष्ठानाचे जागेंतील कांहीं भाग आमचे वडील कै. झिपरू पुंजूशेठ वाणी यांच्या मालकीची होती. ती जागा आमच्या जातींतीलच एका गृहस्थाला विकण्याचें रीतसर बोलणेंहि झालें होतें. परंतु ती जागा श्री दत्त अधिष्ठानाकरितां वापरावयाची महाराजांची योजना समजल्यावर, ठरलेलीं बोलणीं रहित करून माझे वडील झिपरूशेठ यांनीं त्या जागेबद्दल कांहींहि न घेतां ती श्री दत्त अधिष्ठानासाठीं तशीच दिली, याविषयीं माझ्या मनास फार समाधान वाटतें.

श्री दत्तमूर्तीचें भजन-मंदिरांतील अधिष्ठान आणि बाहेरच्या घुमटींतील अधिष्ठान अशा दोहोंचीहि बांधणी १९२७ पर्यंत मोठ्या प्रमाणांत होऊन पूर्णतेला काम आल्यावर, होम हवनादि धर्मकृत्यांनीं मूर्तीची अर्चा याज्ञिक ब्राह्मणाकडून वेदोक्त विधींनी करण्यांत आली. मग त्यासाठीं मिष्टान्नाचें गांव-भोजनहि झालें. **असा मोठा अन्नदान समारंभ आजपावेतों दुसरा कोणताहि झालेला मला आठवत नाहीं!**

## श्री दत्तमठींतील उत्सव

'श्री दत्तमठी' हें नामाभिदान प्राप्त झालेल्या जागेंत, मार्गशीर्ष महिन्यात महाराजांनीं ९ दिवस श्री दत्तजन्म सोहळा मोठ्या थाटांत करण्यास सुरवात केली. अधिष्ठानाच्या स्थापनेचा दिवस, सर्व भक्तगणांना पक्वान्न भोजनाचा प्रसाद देऊन साजरा करण्यांत आला. कितीहि अडचणी आल्या तरी उत्सव यथासांग थाटानें समाप्त होऊन अखेर भंडाऱ्याचा प्रसाद होई. या भंडाऱ्याच्या 'आमटी भात प्रसादाला' भडगांव गांवांतील सर्व लोक यावयाचे. महाराजांनीं बऱ्याच वेळां भिकार भोजनाचेंहि अन्न-संतर्पण केलें. तसेच कार्यक्रम हल्लींदेखील श्री सद्गुरू अण्णा महाराज चालवीत आहेत! **प्रभु श्री दत्तकृपा व श्रीपतकृपा यांमुळेंच खरोखर येवढे मोठे कार्यक्रम आज तागायत पार पडत आहेत, असा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे.**

## उत्सवाचा कांहीं तपशील

नऊ दिवसांच्या श्री दत्तजन्म सोहाळ्यांत महाराज स्वतः कीर्तन करीत. कीर्तनापूर्वीं टिपऱ्यांचा कार्यक्रम होत असे. श्री दत्तसांप्रदायाचीं श्रीपंतांचीं पदें व स्वतः रचलेलीं ५२ मात्रिकांचीं लावणी, मनाचे श्लोक व अभंग महाराज कीर्तनांत अत्यंत सुबोध, सुरेल व आकर्षक पद्धतीनें म्हणत.

श्री. **अण्णा महाराजांनीहि** यंदा (१९६४ सालीं) भडगांवास चातुर्मास कीर्तनें करून त्या कीर्तनांत ५२ मात्रिकांची लावणी आणि महाराजांचें व पंतांचें प्रासादिक वाङ्मय यांची सुरेख व सुरेल उजळणी करून भक्तजनांना प्रेमामृत वाटण्याचा अपूर्व कार्यक्रम चालविला. याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच ठरेल. हें प्रासादिक वाङ्मय श्रवण करण्यास भक्तजनांची चारीहि महिने गर्दी होत असे.

## कीर्तनाची प्रेमळ हातोटी

सद्गुरु मोरेश्वर महाराज गौरवर्णाचे, अत्यंत तेजस्वी व्यक्तिमत्वाचे आणि भरपूर उंचीचे होते. परंतु स्वभावानें अत्यंत प्रेमळ. कीर्तनांत कोणी गैरवर्तन करूं

लागल्यास, महाराज त्याचेकडे तोंड फिरवून फक्त आपल्या तेजस्वी दृष्टीनें पहातांक्षणीं लगेच गडबड बंद होऊन सर्वत्र शांतता होई! त्यांच्या नेत्रांतील तेजांत विलक्षण शक्ति होती. ते कोणाशीहि कांहीं जास्त बोलत नसत. तरीपण कोणीहि 'शहाणा' मुद्दाम वादंग माजविण्यास आला तर तो महाराजांच्या तीक्ष्ण चर्चेपुढें टिकत नसे! महाराज कीर्तनांतील मधुर पदें म्हणतांना त्या तालावर मधून मधून हंसगतीनें नाचत त्यामुळें श्रोतृगणांत आनंद पसरे. श्री. अण्णा महाराजांनीहि ती हातोटी चांगली साधली आहे.

भगवा फेटा, भगवी कफनी हातीं गारेचे करतल, असा त्यांचा कीर्तनाचा पेहेराव असे. करतल वाजविण्यांत महाराज अत्यंत कुशल होते. इतकें सुमधुर कौशल्य अद्याप तरी माझ्या पहाण्यांत कोठेंहि आलें नाहीं! कीर्तनाची महाराजांची हातोटी मात्र श्री. अण्णामहाराजांनींहि उचलली आहे. कोणीहि इतर हरिदास कीर्तनांत या पद्धतीने रंग भरतांना आढळत नाहींत!

## माझे प्रत्यक्ष अनुभव

माझेवर कांहीं संकटें आलीं असतां, महाराजांचे दर्शनास गेलों असतां त्या संकटाविषयींची चिंता आपोआप नाहींशी होई आणि त्यांतून सुटण्याचा संकल्प खरा ठरून प्रत्यक्ष व्यवहारांत अनुभवास येई, असा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे! माझ्या लहानपणापासून या अधिष्ठानावर मोठे महाराज असतांना आणि आतां श्री. अण्णामहाराज असतांनाहि, अत्यंत श्रद्धाभक्तियुक्त नितांत प्रेम मी या अधिष्ठानाविषयीं हृदयांत बाळगीत आहे. तें श्रद्धाभक्तीचें प्रेम तसेंच कायम राहो आणि माझे वंशजहि या अधिष्ठानाविषयींचे श्रद्धाभक्तिप्रेम कायम ठेवून वाढीला लावोत, हीच सद्गुरुचरणीं माझी प्रार्थना आहे.

## महाराजांचें भक्ति-प्रेमपर पद्यवाङ्मय

सद्गुरु मोरेश्वर महाराजांनीं स्वतःच थोडें पद्यवाङ्मय तयार केलें असून तें फार प्रासादिक, सुरेल व गोड प्रेमभक्तीनें ओथंबलेलं आहे! त्यांत मनाचे श्लोक, अभंग पदें, ५२ मात्रिका, इत्यादींचा समावेश होतो. या पद्यवाङ्मयाचें छोटें पुस्तक छापलें असून त्याच्या अनेक आवृत्त्या संपल्या आहेत. पंतांच्या प्रेमलहरींतील पदें कै. महाराज श्री. अण्णामहाराज आणि त्यांचे सर्व चिरंजीव तितक्याच भक्तिप्रेमरूप गोड गळ्यानें गातात, तसें फारच थोडे लोक क्वचितच गातात! आम्हीं लहानपणीं गुरुवारीं हीं पदें म्हणत असूं. हल्लीं कीर्तनांत श्री. अण्णा महाराज हीं पदें म्हणतात तंव्हां लहानपणीं आम्हीं म्हणत असलेल्या त्या पदांची आठवण होते.

## महाराजांचा कृपाप्रसाद

महाराजांच्या कृपाप्रसादानें मला दोन मुलगे आहेत व दोन मुलीहि आहेत. सर्वांचीं विवाहकार्यें झालीं असून लहान मुलाचा परिवार महाराजांच्याच कृपाप्रसादानें वंशवृद्धी होऊन झाला आहे. महाराजांच्याच कृपेनें वडील मुलाचाहि परिवार देवदयेनें होईल, अशी मला पूर्ण आशा आहे.

## महाराजांची स्वानंदवासी समाधि

महाराज रक्तदाबाच्या विकारामुळें भडगांवीं स्थिर राहूं लागले. त्यावेळीं ते दिगंबर बालवृत्तीनेंच पुष्कळ वेळ आत्मचिंतनांत मग्न असत. एका प्रसंगीं सौ. आईसाहेब व कांहीं नातवंडेंच त्यांच्याजवळ मठींत होतीं. श्री. अण्णामहाराज महाराजांच्या आग्रही आज्ञेवरून चेंबूरला रामनवमीच्या सप्ताहासाठीं गेले होते. अशा प्रसंगीं शके १८३९ च्या चैत्र शुद्ध प्रतिपदे दिवशीं—पाडव्याचें रात्रीं—महाराज, मुद्दाम पालखीचा समारंभ करवून, पालखीपुढें पदें म्हणून आणि सर्व भक्तांना आपल्या हातानें प्रसाद वाटून रात्रीं १२ वाजल्यानंतर एकाएकीं स्वानंदवासी झाले. !

या प्रसंगीं श्री. अण्णामहाराज चेंबूरला आणि दुसरे दोघे चिरंजीव मुंबईस आपल्या नोकरीवर असल्यामुळें तिघां चिरंजीवांपैकीं कोणीच जाग्यावर नव्हते ! परंतु भडगांवांतील प्रमुख भक्तांनीं अर्जेंट तारा करून तीन्हीहि चिरंजीवांना बोलावून घेतले. त्यांपैकीं श्री. अण्णामहाराज व धाकटे चिरंजीव २४ तासानंतर (गाडी चुकल्यामुळें) भडगांवीं आले आणि मधल्या चिरंजीवांना नोकरीच्या जबाबदारीमुळें वेळेवर येतां आलें नाहीं.

## पंढरपूरच्या यात्रेच्या गर्दीची आठवण !

ही महाराजांच्या स्वानंदवासाची बातमी पहाटेपासून गांवभर पसरली आणि गांवांतील व आसपासच्या खेड्यांतील लोकांची महाराजांच्या अखेरच्या दर्शनासाठीं इतकी विलक्षण गर्दी झाली कीं महाराजांच्या पार्थिव देहाचें दर्शन होणेंहि असंख्य लोकांना अशक्य झालें ! पंढरपूरच्या आषाढी कार्तिकी यात्रेखेरीज इतकी गर्दी अद्याप मी कोठेंहि पाहिली नाहीं !

नंतर महाराजांचा पार्थिव देह आरामखुर्चीवर बसविण्यांत आला आणि पुष्पहारादींनीं सजविण्यांत आला. नंतर लोकांच्या गर्दीतून भडगांवभर महाराजांच्या या पार्थिव देहाची अंत्ययात्रा काढण्यांत आली. महाराजांच्या या पार्थिव

देहावरील (जणूं काय सजीव असून सर्वत्र पहात आहेत!) विलक्षण तेज पाहून पाहाणारे चकितच होत होते!

महाराजांच्या पार्थिव देहाची मिरवणूक मोठ्या थाटानें गांवभर फिरवून गिरणानदीवरील श्री शंकराचे देवळापर्यंत गेली. आणि तेथील नदीतीरी विद्वान् पंडित ब्राह्मणांकडून शास्त्रोक्त वेदविधि करवून या थोर संत विभूतीच्या पार्थिव देहाला, चंदनकाष्ठें व कापूर यांच्या ढिगांत अग्निसंस्कार करण्यांत आला. त्यावेळीं हजारों भक्तांचे डोळ्यांतून अश्रु वहात असलेलें दृश्य अजूनहि माझ्या डोळ्यांपुढें येतें आणि हा मजकूर लिहीत असतांना त्या आठवणीनें माझेहि डोळे अश्रूंनीं भरून आले!

## महाराजांचा स्मारक-स्तंभ

महाराजांच्या पार्थिव देहाला अग्निसंस्कार झालेल्या जागेवर दुसऱ्या वर्षी भक्तजनांच्या सहकार्यानें श्री. अण्णा महाराजांनीं सीमेंट कॉंक्रीटचा चौकोनी स्तंभ उभारून त्याचे अग्रभागीं त्रिशूळ बसविण्याची व्यवस्था केली. त्याचप्रमाणें तेथेंच स्तंभावर टाइल्सची श्री दत्तमूर्ति बसविण्यांत आली आहे. मोरेश्वर महाराजांच्या या अपूर्व स्मारकाचें भाविक भक्त लोक अद्यापहि दर्शन घेऊन प्रदक्षिणा घालतांना दिसतात!

## स्मारक स्तंभाचा दरसालचा सोहाळा

स्मारक स्तंभाचा पहिल्या वर्षीं मोठ्या थाटांत सोहाळा झाला. तो तीन दिवस चालू होता. पहिल्या दिवशीं महाराजांचे स्मारक स्तंभाजवळच अधिष्ठान मांडून तीन दिवस भजन कीर्तनादि कार्यक्रम झाले. स्तंभाशींच अधिष्ठान मांडण्यात आलें होतें. स्तंभावरील त्रिशूळ ॐकार अक्षरांसह गनमेटलनें पक्का करण्यांत आला आहे. दरसाल पाडव्याला ध्वजच तेवढा दुसऱ्या वर्षापासून उतरवून मठींत आणण्यांत येतो आणि तीन दिवस उत्सवासाठीं असतो. तिसऱ्या दिवशीं रात्रीं तो जागच्या जागीं स्तंभावर बसविल्यावर उत्सव समाप्त होते.

स्मारक-स्तंभावरून ध्वज उतरविण्याचें काम फार धोक्याचें असून तें पूर्वी लोखंडी शिडीवरून चढून श्री. भीमजी पाटील (मठीतील एक सेवक) करीत असे; आतां श्री. दगडू पाटील (श्री. भीमजींचे भाऊ) करतात. संत-पुरुषांचे म्हणजे महाराजाचे कृपेनेंच अशा गोष्टी साध्य होतात. अनेक भक्तांना महाराजांच्या पुण्यतिथीचाहि भोजन-प्रसाद अद्याप मिळतो.

या पुण्यतिथीच्या उत्सवासाठींहि बाहेर गांवचे असंख्य भक्त भक्तिप्रेमानें हजर राहतांत आणि उत्सव थाटानें साजरा करण्यास सहकार्य देतात.

× × × ×

## महाराजांचे सुपुत्र

महाराजांचे दुसऱ्या नंबरचे सुपुत्र श्री. **पांडुरंग मोरेश्वर दातार** हे सध्यां महाराजांच्याच कृपेनें व दत्त कृपेनेंहि मुंबईस पोलीस खात्यांतील फार वरच्या हुद्यावर आहेत. आणि **तिसऱ्या नंबरचे चिरंजीव श्री अनंत मोरेश्वर दातार** कापड गिरणींतील मोठ्या हुद्यावरच आहेत. दोघांचेंहि सर्व दृष्टींनीं ठीक चाललें आहे.

महाराजांचे सर्वांत वडील सुपुत्र श्री दत्त महाराज तथा अण्णा महाराज हेहि श्री महाराजांच्या, श्री दत्ताच्या व श्रीपंतांच्या कृपेनें गुरुसांप्रदाय अत्यंत उत्साहांत करीत असून महाराजांप्रमाणेंच कीर्तनकाराच्या नारदीय गादीचाहि पेशा सुंदर रीतीनें चालवीत आहेत. त्यांच्या कार्याची व सांप्रदायाची प्रगति मी स्वतः अनेक वर्षें स्वतःच्या डोळ्यांनीं पाहून अनुभवीत आहे. पूर्वीपेक्षांहि हा श्री अवधूत दत्त सांप्रदाय उत्तरोत्तर वाढीस लागला आहे.

## श्री दत्तमठीचा विस्तार व श्री. मुकुंदराव राणे

महाराजांच्या मुंबईतील थोर शिष्य मंडळींपैकीं श्रीमान् मुकुंदराव राणे यांनीं मंदिराचे बाजूस असलेल्या मोठ्या बखळींत मंदिर विस्तारासाठीं भक्तांच्या सक्रिय सहकार्यानें बांधकाम करण्याचा संकल्प केला असून त्याप्रमाणें खोदकाम होऊन शुभ मुहुर्तावर त्याचेच हस्ते कोनशिलेचा दगडहि बसविण्यांत आला. श्रीपंत व दत्तकृपेनें आणि महाराजांच्या शुभेच्छेप्रमाणें हें काम लवकरच पूर्ण होईल आणि श्री दत्तमठीच्या या विस्तृत इमारतींत श्री सद्गुरूंचा उत्सव पाहण्याचा योग ईशकृपेनें लवकरच येईल व येवो, अशी श्री दत्तचरणीं माझी हार्दिक नम्र प्रार्थना आहे.

## सर्वांच्याच उन्नतीचा काळ

महाराजांचे घराण्याचा उत्कर्ष श्री दत्तप्रभूंच्या व पंतांच्या कृपेनें होत आहे तसाच सर्व भक्तगणांचाहि उत्कर्ष त्यांच्याच कृपेनें झाल्याशिवाय राहणार नाहीं. अशी माझी पूर्ण श्रद्धा आहे.

माझ्या प्रेमभक्तीनें या माझ्या आठवणी लिहिल्या त्या वेड्यावाकड्या असल्या तरी श्री प्रभुदत्तानें गोड करून मला पदरीं घ्यावें. मी श्री अवधूत महाराजांच्या

६

कीर्तनाच्या विशिष्ट व आकर्षक पद्धतीचा उल्लेख केला आहे त्यालाच अनुसरून आणि महाराजांच्या व श्री. अण्णांच्याहि विशिष्ट पारमार्थिक बोधाचा उल्लेख करून या आठवणींना समारोपाची पूर्तता करण्याची मला आवश्यकता वाटते.

भडगांवांत दीर्घकाल राहाणारा एक रहिवासी अगर नागरिक या नात्यानें मला नमूद केल्यावांचून रहावत नाहीं कीं या आत्मबोधानें, स्वानंदवासी महाराजांनीं आणि त्यांचीच प्रेरणा घेऊन पुढें श्री. अण्णा तथा श्री दत्त महाराज यांनींहि, भडगांवच्या लोकांवर, भक्तिप्रेमाच्या गोडीनें संसार परमार्थरूपानें करण्याचा अपूर्व बोधवर्षाव करून, महान उपकार केले आहेत. त्या बोधाप्रमाणें वागण्यानें प्रत्येकाचें सांसारिक व पारमार्थिक कल्याण तर होईलच; पण मिळालेल्या बोधाचेंहि सामाजिक सार्थक्य करून श्री सद्गुरूंचे उतराई होण्याची संधि साधणार आहे. भडगांवकरांना तशी सुबुद्धि होवो, हीच श्री सद्गुरुचरणीं प्रार्थना आहे.

१९६४ मधील **चातुर्मास कीर्तनांचा समाप्ती सोहाळा आणि अन्न-कोटाची एकाकी** (कुटुंबीय सहकार्यानें व मदतीनें केलेली) अपूर्व मांडणी आणि सर्व गांवकरांना (जातिभेद न ठेवतां) अन्नकोटाच्या प्रसादाची वांटणी, या ताज्या गोष्टींनीं श्री. दत्तमहाराजांनीं भडगांवकरांना ताजी व तेजस्वी जागृति बोधामृताविषयीं दिली आहे, तिचेंहि योग्य चीज भडगांवकरांनीं करावें आणि अंशतः तरी सद्गुरुकृपेचें उतराई व्हावें, अशी माझी सर्व भडगांवकरांना नम्र विनंति आहे.

श्री अवधूत महाराजांच्या दिव्य चरित्राची ओळख करून देणारा चरित्रग्रंथ श्री. का. म. ताम्हनकर यांनीं संपादिला असून तो लवकरच प्रसिद्धीची वाट चालत आहे. त्याचेंहि योग्य स्वागत आत्मकल्याणाकरितांच भडगांवकर करतील अशी मला उमेद आहे.

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. ९

लेखक : श्री. गोपाळराव लेले कुरुंदवाड, जि. कोल्हापूर.

[ या आठवणी १९५३ सालीं श्री. गोपाळराव लेले ह्यात असतांना व त्यांचें वय अंदाजें ७८ पर्यंत असतांना त्यांनीं आठवल्या तशा लिहून दिल्या. १८९६ पासून ते १९१४ पर्यंतच्याच त्यांच्या आठवणी आहेत. तरीहि ते महाराजांचे गुरुबंधु आणि कीर्तनांतीलहि साथीदार असल्यामुळें या आठवणींना विशेष महत्व आहे. ]

### लहानपणापासूनची श्री दत्तभक्ति

श्री 'मोरोबा' हे लहानपणापासून दत्ताची भक्ति करीत. त्यांचे मित्र 'पंडित विष्णु दिगंबर पलुस्कर, अप्पाजी धोंडदेव टाकवडे, दत्तोपंत कब्राडे, रामभाऊ लेले, रामभाऊ वज्रमुष्टी, अण्णाराव छत्रे व बाळाराम कपडेकर हे सर्वच प्रेमळ दत्तभक्त होते, शिवाय शाळेंतील वर्गमित्रहि होते. सर्वजण सुरपाटाचा खेळ खेळण्यांत प्रवीण होते. शिवाय गणपती, मारुती, श्री दत्त वगैरे देवतांचे उत्सवहि हे सर्वजण मोठ्या हौसेनें व शक्य त्या थाटानें करीत. या उत्सवांतून शेवटच्या दिवशीं सोंगें घेऊन लळीतहि साजरें करीत. रामभाऊ लेले यांचे घरी मागील अंगणांत श्री दत्तपादुका स्थापन करून तेथें लहानसें विटेचें मंदिर बांधून तेथें श्री दत्त जन्मोत्सव करीत.

यांतील कांहींजण व्यवसायानिमित्त बाहेर गांवीं गेले आणि गांवांतच व्यवसाय असलेले मोरोबा, रामभाऊ लेले, छत्रे, बंडोबा टाकवडे आणि कपडेकर येवढीच मंडळी जुटीनें कुरुंदवाडास राहिली. मोरोबा त्यावेळीं घरीं राहिले. त्यावेळीं वेदांचे व संस्कृत-अमरकोश वगैरे अध्ययन करीत. मोरोबासह चार बंधु. त्यापैकीं (१) गणपतराव चिपरीच्या मळ्याचें काम पहाण्यासाठीं जाऊन येऊन असत. (२ ३) वडिलबंधु व सर्वांत धाकटा भाऊ प्लेगनें वारले. (४) मधील भाऊ चि. भालचंद्र उर्फ भल्या धुळवडी दिवशीं पंचगंगेंत पोहावयास जाऊन बुडून वारला.

## दादा पाटलांची ओळख व वकीली व्यवसायाची संधि

नंतर मोरोबांनाहि चिपरीच्या मळ्यांचे देखरेखीसाठीं खेपा कराव्या लागल्या. त्यामुळें चिपरीचे 'दादा पाटील' यांच्याशीं त्याचा स्नेह जमला. मोरबांच्या विनोदी व आनंदी स्वभावामुळें या स्नेहाचें दाट मैत्रींत रूपांतर झालें. दादा पाटलांच्या वडील बंधूंचा व कोल्हापूरच्या शाहू छत्रपतींचा चांगला लोभ असल्यामुळें दादा पाटलांना छत्रपतींकडून, गडइंग्लज तालुका व शिरोळ पेटा यांपुरती वकिली करावयाची सनद मिळाली. दादा पाटलांनीं आपले निकटचे स्नेही मोरबा दातार यांना आपल्या वकिली व्यवसायांत 'हुषार सहकारी भागीदार' म्हणून घेतलें. या व्यवसायांत उभयतांनाहि चांगलें यश आलें.

## वकिलींतून नाटकांकडे

कांहीं दिवसांनीं प्लेगचा कोल्हापूर ते कुरुंदवाड टापूंत कहर उडाल्यामुळें परिस्थितींत धंदा मंदावून एकदम पालट झाला! शिवाय मोरबांनीं वकीलीचा नाद सोडून नाटकांकडे स्वतःचें मन वळविलें! थोडक्याच दिवसांत नाटकाचे व्यवसायांतहि मोरबांनीं चांगलेंच नांव कमावलें! १८९३ चे सुमारास मिरजेचे श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन यांच्या 'ॲमॅच्यूर नाट्यक्लबांत' मोरबा नटाचीं कामें करूं लागले. प्रेक्षकांचें चित्त स्वतःकडे खेंचून घेण्याची मोरबांना ईश्वरी देणगीच होती! या क्लबांत श्री. रामभाऊ लेले आणि गोपाळरावांसह (माझ्यासह) आमचे चार भाऊ (गणू, गोविंदा) व बंडोपंत टाकवडे असे मोरोबासह आम्ही सहा नट होतों. गोव्यांत जाऊन या क्लबातर्फें आम्ही संगीत नाटकें केलीं. पावसाळा सुरूं झाल्यावर आम्ही मिरजेकडे परतलों. पावसाळा संपल्यावर फिरून या क्लबातर्फें आम्ही सर्वजणांनीं, गुलबर्गा, औरंगाबाद, हैदराबाद, रायचूर शिकंदराबाद इत्यादि ठिकाणींहि संगीत नाटकें करून नांवलौकिक संपादन केला. इतक्यांत आमचे (आम्हां लेले बंधूंचे) वडील प्लेगनें अस्वस्थ–आजारी झाल्याची तार आली. ती मोरबांनीं वाचल्यावर (तेच एकटे इंग्रजी जाणणारे होते आमच्यांत) तावडतोब त्या रात्रींचा प्रयोग बंद असल्याचें जाहीर करून आम्ही कुरुंदवाडास आलों. आमचे वडील देवाघरीं गेले आणि आम्ही कंपनी सोडली! मोरबा दातारहि आमच्या बरोबरच कंपनी सोडून कुरुंदवाडास आले. नाटकांचा नाद सोडून ते मग घरींच राहूं लागले.

## भजनाचा व परमार्थाचा नाद

मोरबांचें शालेय शिक्षण श्रीमंत भाऊसाहेबांबरोबर झालें असल्यामुळें कुरुंदवाडास आले कीं त्यांचें जेवण भाऊसाहेबांचे पंक्तींत आणि बैठकीलाहि वाड्यांतच

असे! तेथेंच भजन आणि वेदांत-प्रवचन चाले. पंचीकरणासह परमार्थ-बोधानें मोरबा सर्वांना चांगलेंच रंगवीत! रामभाऊ लेले व बिडोबा गोखले हे पंतभक्त त्या भजनादींत सामील होत. भजन साधें पण प्रेमळपणानें गाण्यांत मोरबा आणि हे पंतभक्त यांची 'भजनानंदी टाळी' लागे!

## बेळगांवीं श्रीपतांचा अनुग्रह व पहिली काशीयात्रा

सन १८९४ मध्यें सर्वश्री रामभाऊ लेले व बिडोबा गोखले यांचेबरोबर श्री. मोरोबा दातार बेळगांवास श्रीसमर्थ पंत महाराज यांचेकडे गेले व तेथून अनुग्रह घेऊन आले. त्यावेळेपासून त्यांची वृत्ति भक्तिप्रेमाच्या आनंदांत असे. पंतांच्या स्वानंदवासानंतर नंतर थोड्याच दिवसांनीं मोरोबा दोनच सोबत्यांसह काशीयात्रेला जाऊन आले!

## अवधूत पंथाचा प्रचार-पंतांचा आशीर्वाद

१९०५ सालीं पहिली काशीयात्रा करून आल्यावर रामभाऊ लेल्यांचे सोप्यावर पंत महाराजांच्या प्रेमलहरींतील पदांवर मोरबांनीं प्रवचन-निरूपणाचा क्रम चालविला. प्रवचन ऐकण्यासाठीं लोकांची गर्दी होई. भक्तिप्रेमात रंगून मोरबा निरूपण करीत. बेळगांवास श्रीपंतांचेकडे गुरुप्रतिपदा, गुरुद्वादशी, दत्तजयंती, गोकुळाष्टमी वगैरे उत्सव होत तिकडेहि मोरोबा जाऊन येत. **अवधूत पंथाची गोडी लोकांत उत्पन्न करण्याचें काम या काळांत मोरबांनीं धडाक्यानें केलें!** एकदा श्रीपंत महाराज आजारी असतांना मोरबा भेटावयास गेले असतां **श्रीपंतांनी मोरबांना भक्तिप्रेमाचा आशीर्वाद देऊन भजनास बसविले. आणि 'लुटारे लुटारे आनंद लुटारे' हे भक्तिप्रेमपर पद भजनात म्हणावयास सांगून आरती करून सर्व भक्तांना निरोप दिला.** थोड्याच दिवसांनंतर श्रीपंत स्वानंद-समाधींत विलीन झाले. त्याच सालापासून पंतजन्माचा व पंतसमाधीचा उत्सव मोरबा करूं लागले. हे उत्सव थाटाने करण्यांत मोरबांचे एक स्नेही दाजी पाटील फार हौसेनें भाग घेत आणि भक्तिप्रेमाने खूप कष्ट करीत. रोज निरूपण, नाथचरित्रवाचन वगैरे कार्यक्रम चालूच होते. बंडोपंत टाकवडे हे मोरबांशी सहकार्य व भजनांत साथ मोठ्या भक्तिप्रेमानें करीत. यावेळीं नवनाथांचीं आख्यानें लावून कीर्तनांत श्रोत्यांना मोरबा डोलूं लागण्या इतके रंगवीत!

## वडीलमातुश्रीसह दुसरी काशीयात्रा

नंतर वडील मातुश्रीसह मोरबांनीं दुसरी काशीयात्रा करण्याचे ठरविलें. कीर्तनें करीत ठिकठिकाणीं होणाऱ्या कीर्तनांचे प्राप्तीचे खर्चानेच ही काशीयात्रा करावयाची, अशी योजना त्यांनी ठरविली. बरोबर वडील मातुश्री आणि बिडोबा

टाकवडेकर, झांजवाला, तबलजी, पेटीवाला जयराम सिंगण आणि गोपाळ लेले (मी) पेटीवाला (जोड म्हणून) आणि दोन एकतारीवाले इतके जण साथीदार होतो. इतक्या माणसांसह केवळ कीर्तनातील प्राप्तीच्या आधारें काशीयात्रा करावयास निघणें हें मोठेंच धाडस होते! पण धाडसांची आपल्या आयुष्यांत मोरबांनीं कसलीहि पर्वा केली नाहीं आणि तरी त्यांतून सहिसलामत पार पडले, हाच त्यांच्या 'राजयोगाचा' विशेष! यावेळीं पहिल्या मुक्कामाचे खर्चांकरितां फक्त दहा रुपये उसने घेतले होते आणि परत कुरुंदवाडास आल्यावर तेवढेच परत करण्याइतकीं त्यांचे जवळ शिल्लक होती!

## यात्रेचा तपशील

कुरुंदवाडपासून ३-४ मैलांवर **शिरोळ** हा पेव्याचा गांव, तेथील श्री अन्नपूर्णा दत्त मंदिरांत पहिला मुक्काम झाला. सात दिवस कीर्तन झालें. शेवटच्या दिवशीं आरतींत १५० रु. जमले! प्रवासाच्या सुरवातीला तर शुभशकून झाला. तेथून आम्हीं सर्व त्या रकमेचा भाड्याकरितां खर्च करून **साताऱ्यास गेलों.** तेथेंहि आरतींत दोनशें रुपये जमले. तेथें तीघेजण स्वतःचा खर्च करून आमचे बरोबर काशीयात्रेस निघालीं. साताऱ्याहून थेट **नाशीकला** गेलों. नाशीकला दीड महिना मुक्काम केला तेथें प्राप्ती कमी झाली. पण कीर्ती वाढली! खर्चाला पैसे फार न उरल्यामुळें नाशीकहून चाळीसगांवास जाण्याचें ठरलें. स्टेशनवर येऊन शिल्लक तपासली तेव्हां भाड्याला पैसे पुरेसे नव्हते, असें दिसून आलें. 'पुढें काय करावें' अशा विचारांत असतांच, **नाशीकच्या स्टेशन मास्तरनीं** चौकशी केली. तेव्हां त्यांना हकीगत सांगितली. स्टेशन मास्तर म्हणाले, "नाशीकच्या लोकांकडून 'अवधूतबुवा' म्हणून तुमची कीर्ती ऐकली पण 'कीर्तन' मात्र इच्छा असून ऐकणें जमलें नाहीं. आमचे घरीं चला, सर्व मंडळी जेवण करा, मग आम्हां स्टेशनच्या मंडळींना कीर्तन ऐकण्याचा लाभ द्या. पहाटे चाळीसगांवकडे जाणारी गाडी आहे त्या गाडीनें सर्वांना चाळीसगांवास पाठविण्याची आम्हीं हमी घेतों" स्टेशनवरील मास्तरांचेसह सर्व मंडळींनीं आरतींत दहा रुपये घातले आणि वचन दिल्याप्रमाणें पहाटेच्या गाडींत हमालाकडून सामानसुमान चढवून देऊन आमची रवानगी **मास्तरनीं चाळीसगांवाकडे केली.** चाळीसगांव स्टेशनांत गाडी येतांच तेथील स्टेशनमास्तरहि 'अवधूत बुवांची' चौकशी करीत आम्ही बसलेल्या डब्याशीं आले. (त्यांना नाशीकच्या स्टेशनमास्तरनीं तारेनें कळविलें असावें!) आमचें सामान हमालांकडून उतरवून घेऊन आणि गाड्या करून व हमाल गाडी

बरोबर देऊन या स्टेशनमास्तरनीहि चाळीसगांवच्या राममंदिरांत आमची उतरण्याची व्यवस्था केली होती तिकडे आमची रवानगी केली.

चाळीसगांवच्या राममंदिरांत अवधूत बुवांची कीर्तनें सुरू झाल्यावर आरतींत रोज ५–६ रुपये जमूं लागले. सातवे दिवशीं मात्र कांहींच मिळालें नाहीं! राममंदिराचे पुजारी मोरबांना म्हणाले, "बुवा तुम्हांला पैसे मिळतील. या गांवीं बुवांनीं घरोघर जाऊन आरती करावयाची अशी वहिवाट आहे. मी तुमचेबरोबर येतो." पुजारी तीन दिवस हाच सल्ला देत, तो न पटल्यामुळें मोरबांनीं मुक्काम हलविण्याची तयारी केली. स्टेशनवर जाऊन पुढच्या स्टेशनची चौकशी आम्ही करीत होतों, इतक्यांत रेल्वे–ओव्हरसीअरची नोकरी करणारे तासगांवचे विनायकराव करंदीकर हे भेटले त्यांनीं सर्व हकीगत ऐकली. कुरुंदवाडच्या नारायणराव कोल्हटकरांची बहीण त्यांना दिली असल्याची ओळख पटली. त्यांनीं हमालाबरोबर चिठी पाठवून आम्हां सर्वांना टांगे करवून सामानासह राममंदिरांतून आपल्या स्टेशनवरील बंगल्यांत आणलें. रात्रीं त्यांचे बंगल्यांतच कीर्तन झालें. स्टेशनवरील नोकर मंडळीकरतां सात दिवस कीर्तनें झालीं. पन्नास रुपये रोख व आरतीचे वेगळे अशी चांगली प्राप्ती झाली.

## भडगांवचें आमंत्रण

वर वर्णन केल्याप्रमाणें चाळीसगांव स्टेशनवर कीर्तनें चालू असतांच १०० रु. भाड्याची रक्कम आगाऊ देऊन आम्हांला भडगांवच्या रामनवमीचे उत्सवाकरितां बोलावणें आलें. (श्री. सहस्रबुद्धे वकील यांचे मार्फत) भडगांवास गेल्यावर पंचायतन राममंदिरांत ! कीर्तन आणि दिवसा आम्ही फेरी करीत असूं. फेरींत शिधा खूप मिळे. कीर्तनाची प्राप्तीहि थेट काशीचीं तिकीटें काढण्याइतकी भरपूर झाली. उत्सवाचे शेवटीं आम्ही सत्यनारायणाची पूजा केली आणि गोरगरिबांकरितां खीरभात–भंडाऱ्याचा प्रसाद वाटला! श्री अवधूतबुवांची या खानदेशच्या टापूंत खूपच कीर्ति वाढली!

## थेट काशीस प्रयाण

भडगांवाहून आम्ही थेट काशीस जाऊन पोहोंचलों. काशींत दोन महिने राहिलों. तेथून अलाहाबादला–प्रयागला–आलों. तेथें मथुरानाथ पंडा यानें २०० रु. कर्ज दिलें आणि "मिळतील तेव्हां परत करा" अशी सवलतहि दिली! ते पुढें परत फेडण्यांत आलेहि. पंतमहाराजांच्या कृपेनें मोरबांनीं वडील मातुश्रीसह आम्हां सर्वांची यात्रा पूर्ण केली आणि भक्तिप्रेमानें धरलेल्या अवधूत पंथाचा

प्रचारहि पुष्कळ केला. वाटेंतील सर्व पेंचप्रसंगांतून सुटका झाली. काशी सोडून कीर्तनाची आम्ही सर्व मंडळी भंडाऱ्यास गेलों. तेथें १ महिना कीर्तनें होउन प्राप्ती चांगली झाली. येथूनच प्रयागच्या पंड्याचे पैसे चुकते केले. नंतर मलकापूरला कीर्तनें करून फिरून भडगांवीं येऊन आठ दिवस राहिलों. यावेळीं पंतबंधु वामनराव दादा एरंडोल-पाचोऱ्यास जज्ज (न्यायाधीश) होते. त्यांनीं मोरबांना बोलावून मोरबासह आम्हां सर्वांना महिनाभर ठेवून घेतलें. त्यांनींच आम्हां सर्वांना कुरुंदवाडास पोचविण्याची व्यवस्था केली. श्रीपंत कृपेनें जवळ पैसे नसतांना ९ महिन्यांची यात्रा करून भक्तिप्रेमाची लूट करून मोरबा आम्हां सर्वांसह घरी आले ! घरीं आल्यावर उसने काढलेले १० रु. परत करण्याइतकीच शिल्लक जवळ होती !

## मुंबईंत कीर्तनें व कीर्ति

नंतर मुंबईस चातुर्मास कीर्तनें करण्याचे ठरवून त्या तयारीला आम्ही सर्वजण लागलों. मुंबईस खूप प्राप्ती होऊन अवधूतबुवाची कीर्तीहि वाढूं लागली. पंतांचा अवधूत पंथ पुष्कळ लोकांना पटूं लागला. मुंबई शहरभर अवधूतबुवांचें नांव अनेक लोकांच्या परिचयाचें झालें. सर्वांशी समान भक्तिप्रेमानें वागण्याचा अवधूतबुवांचा बाणा लोकप्रिय ठरला आणि भक्ति-प्रेमाची लूट होऊं लागली ! बाळेकुंद्रीस अवधूतबुवांच्या मार्गदर्शनानें पुष्कळ बांधकाम झालें आणि तेथील उत्सवासाठीं अवधूतबुवांचे अनुग्रहीत असंख्य भक्तगण जमतात, अवधूतबुवांनीं पंतभक्तीचा झेंडा प्रभावी व्यापकतेनें सर्व महाराष्ट्रांत कसा फडकविला, याची साक्ष देतात. शिवाय गोविंददादा, पंतांच्या मातुश्री इत्यादि पंतांच्या प्रेमळ आप्तांनींहि या प्रभावी प्रचाराबद्दल अवधूतबुवांना दिलेले धन्यवाद अनेक अनुग्रहीतांच्या व भक्तांच्या आठवणींतून नोंदलेले प्रसिद्ध आहेत.

## भडगांवास श्रीदत्त मंदिराची स्थापना

पुढें वर्षांतून दोन महिने अवधूतबुवा भडगांवास जात. तेथे त्यांचे अनुग्रहीत शिष्य व भक्तमंडळी पुष्कळच होती. यामुळें भक्तमंडळीच्या इच्छेप्रमाणें तेथें अवधूतबुवांनीं श्रीदत्त मंदिर स्थापन केलें आणि नंतर तिकडेच कायमचे स्थायिक झाले. वडील मातुश्री स्वानंदवासी झाल्यावर, अवधूतबुवांच्या घरचीं सर्व मंडळी व बिऱ्हाड भडगांवासच नेण्यांत आलें. भडगांवच्या श्री दत्तमठीचें कार्य फार जोरांत चालून खानदेश जिल्हाभर अवधूतबुवांचे शिष्य व भक्त असंख्य लोक झाले.

## दिगंबरवृत्ति : राजयोग

प्रथमपासूनच अवधूतबुवांचें लक्ष्य प्रपंचांत नव्हतें. नाटक कंपनी नागपुरास होती त्यावेळी सुद्धां ते बेणीगिरी मठांत जात आणि तेथून कंपनीचे बिऱ्हाडी आले तरी अनेकवेळां 'दिगंबर वृत्तींत' असत. अशा मनुष्यालाच 'राजयोगी' म्हणतात. त्यांनी श्रीपंत महाराजांची पूर्ण कृपा संपादन करून, पंतांच्या प्रेरणेप्रमाणें 'अवधूत पंथाचा झेंडा' सर्वत्र फडकाविला त्यांनीं जितके पंतांच्या अवधूत मार्गाचें प्रचारकार्य केलें तितकें दुसऱ्या कोणाकडूनहि झालें नाहीं, हीच त्यांच्यावरील गुरुकृपेची स्पष्ट खूण होय. नऊ महिन्यांच्या काशीयात्रेंतील अनेक पेंच-प्रसंग आले व गेले त्यावेळींहि हीच प्रचीति झाली! अवधूत महाराजांनीं 'प्रेमास्तव हा जन्म घेतला' हें श्रीपंतांचे बोल आचरणांत आणून प्रेमळ पंतभक्तांना प्रेमाची खूण प्रेमानेंच पटवून दिली! प्रेमभक्तीचा अवधूत मार्गाचा झेंडा भडगांवांत अवधूत महाराजांनीं श्रीपंत कृपेनें फडकत ठेविला आहे. उर्वरित आयुष्यहि अवधूत महाराजांनीं भक्तिप्रेमाच्या वृत्तींत घालविलें.

मी अवधूतबुवापेक्षां वयानें लहान असूनहि त्यांनीं आम्हाला यात्रेंत व फेरींत गुरुबंधूच्या आपुलकीनें आणि प्रेमानें वागविलें. मला या वयांत स्मरण झालें तितकें लिहिलें. स्मरणांतील सत्य तेवढें तुम्हांपुढें ठेविलें आहे. मोरबांचे तीन मुलगे व एक मुलगी हे सर्व सुस्थितींत असून त्यांचा प्रपंच-परमार्थ थाटानें चालल्याचें ऐकून मला आनंद वाटला.

• • •

भाग १ ला

# आठवण नं. १०

लेखक : श्री. परशराम तानीराम वाणी, भडगांव, पूर्व खानदेश.

मी भडगांवचा रहाणारा. जातीनें लाडसक्केवाणी. परंपरागत चालत आलेला आमचा धंदा किराणा व भुसारी मालाचा. वडिलोपार्जित जमीन आहे. त्यांतील कांहीं घरीं करतों व कांहीं भाडेपट्ट्यानें देतों.

माझी परमपूज्य मातुश्री माझ्या वयाच्या तिसऱ्या वर्षीच परलोकवासी झाली. माझे वडिलहि मी सहा वर्षांचा होईं तों देवा घरीं गेले. वडिल मातुश्री दोघेहि ईश्वरभक्त. जुन्या घराशेजारीं विठ्ठल मंदिर असल्यामुळें रोज दर्शनास जाणेचा छंद मला लागला. आतां त्याचें रुपांतर भजनांत, दर्शनांत व संतसेवा करण्यांत झालें. मला आत्तां म्हणजे वयाचे ७० पावेतों हा छंद आहेच. माझ्या वडील बंधूनाच माझा विद्याभ्यास पूर्ण करावा लागला. माझी फायनलची परीक्षा होईं-पर्यंत मी व वडील बंधु एकत्र होतों. किराणा मालाचें दुकान चालवून थोडा कापसाचा व्यापारहि आम्ही करीत असूं. फायनल झाल्यावर मीपण रीतसर व्यापारांत शिरलों. (१९१३) एक दोन वर्षें दोघेहि बंधु एकत्र राहून घरप्रपंच आणि धंदा चालविला. धंदा म्हटलें कीं लाभहानी आलीच. कपाशीच्या धंद्यांत एकदां मोठीच खोट लागली! तेव्हां सर्वच इस्टेट बरखास्त झाली! वडील दोन्ही बंधु रातोरात वेगळे झाले. एका बंधूचीं मुलें धुळ्यांत मोठें दुकान चालवून चांगली धनिक झालीं आणि दुसरी मुलें मोठ्या अधिकारावर आहेत. हाहि गुरु-माऊलीचा प्रसाद होय अशी माझी श्रद्धा आहे. माझ्या वांटणीचे स्थावर जमिनीचें क्षेत्र विकून नुकसानीची भरपाई केली. मग आम्ही बंधू विभक्त झालों. घरीं स्तब्ध राहून पदरमोड करून कांहीं दिवस काढले! त्यावेळीं याच गांवांतील श्री. वासुदेवराव केळकर, बी. ए. एल एल. बी. वकील यांच्या पत्नी श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांनी पुत्रवात्सल्याप्रमाणें आश्रय दिला. त्यांचे घरींच येत असलेल्या अवधूत महाराजांची भेट करवून त्यांचेकडून अनुग्रहहि देवविला. हीच गुरुकृपा आजपर्यंतच्या कर्तव्याची व संसारप्रगतीची आधारस्तंभ ठरली!

## श्री गुरूंच्या भेटीचा योग

श्री गुरुमहाराजांच्या भेटीचा योग केव्हां व कसा आला याची हकीगत सांगतों :—श्री अवधूत महाराज काशीयात्रेच्या दुसऱ्या खेपेस आपल्या वडील मातुश्रींना घेऊन त्याचप्रमाणें कीर्तनांतील सांथीदारांनाहि बरोबर घेऊन गांवोगांव कीर्तन करीत करीत निघाले. सर्वश्री रामभाऊ लेले, गोपाळराव लेले, बंडू टाकवडे, जयरामसिंगन, शिवाप्पा, दत्तू भोपे, दाजी पाटील व बाळा आचारी ही मंडळी बरोबर होती. एका गांवीं कीर्तन करून मिळालेल्या पैशांत शक्य तितकाच पुढच्या गांवचा प्रवास रेल्वेनें करावयाचा, असा हा प्रवासाचा कार्यक्रम होता. अशा रीतीनें प्रवास करीत ही मंडळी चाळीसगांवास आली. बरोबरील मंडळींसह श्री दत्तमंदिरांत मुक्काम केला. तेथेंच कीर्तनहि सुरू केलें. कीर्तनाला गांवांतील भाविकांची गर्दी होऊं लागली. मंदिराशेजारींच रहाणारे श्री. राजाभाऊ सहस्त्रबुद्धे वकील यांना श्री अवधूत महाराजांची कीर्ति समजल्यावर तेहि दुसऱ्या दिवसापासून कीर्तनाला येऊं लागले. या तेजःपुंज सिद्ध पुरुषाची प्रासादिक वाणी आणि सोप्या शब्दांत पारमार्थिक व आध्यात्मिक विषयांची मांडणी करणारें निरूपण ऐकल्यावर श्री. राजाभाऊ सहस्त्रबुद्धे यांच्या मनांत श्री अवधूत महाराजांना आपली जन्मभूमी जी भडगांव, तेथें कीर्तनसप्ताहासाठीं न्यावें असें आलें. भडगांवास श्रीरामनवमीचा उत्सव होत असे व अजूनहि होतो. गांवांतील उत्सवाचे चालक कोणीतरी हरदासाला बोलावून दहा दिवस उत्सवाचें कीर्तन करवीत असत. त्यावेळीं रामनवमीचा उत्सव नजिकच आला होता. तेव्हां श्री अवधूतमहाराजांची योग्यता उत्सव चालकांना पटवून देऊन, त्यांच्याकरवीच त्या वर्षीच्या रामजन्मीचा उत्सव करावयाचा असें श्री. सहस्त्रबुद्धे वकील यांनीं मनाशीं ठरविलें. श्री अवधूत महाराजांना श्री. सहस्त्रबुद्धे यांनीं उत्सवाची व्यवस्था ठरवून निमंत्रण दिल्यावर त्यांनीं मोठ्या आनंदानें तें मान्य केलें. श्री. सहस्त्रबुद्धे यांनीं 'कीर्तनाची बिदागी' विचारल्यावर महाराज म्हणाले, "मी बिदागी ठरवून कीर्तन करीत नसतों ! कोणी जें कांहीं देतील त्याचा आनंदानें स्वीकार करतों."

चाळीसगांवचीं कीर्तनें संपल्यावर श्री. सहस्त्रबुद्धे यांच्याकडे निमंत्रणाप्रमाणें फलाहार घेऊन महाराज व बरोबरीची मंडळी श्री. सहस्त्रबुद्धे वकील यांचेबरोबर भडगांवच्या 'पंचायतन मंदिरांत' आली. त्यांनीं महाराज व बरोबरीच्या मंडळीची उतरण्याची सोय केली होती. कुरुंदवाडचे नामांकित साधुपुरुष व कीर्तनकार श्री अवधूत महाराज आल्याची वार्ता गांवांत हां हां म्हणतां पसरली आणि गांवांतील लहानथोर मंडळीची महाराजांच्या दर्शनाकरितां गर्दी जमूं लागली.

ठरल्याप्रमाणें महाराजांचीं कीर्तनें श्रीराममंदिरांत सुरू झालीं. कीर्तनाला हजारों श्रोते जमले आणि त्यांनीं शांतचित्तानें कीर्तनांतील बोध ऐकला. अशा गर्दीच्या थाटांत रामजन्माचीं कीर्तनें झालीं. सर्व लोकांना रामजन्माचा प्रसाद देऊन महाराज पंचायत मंदिरांत आले. अवधूत महाराजांच्या कीर्तनाचे वेळीं करतल आणि चिपळ्यांचा सुंदर आवाज व ठेका, तसेंच पंतांची गोड आवाजांत म्हटलेलीं पदें ऐकून मंडळी फार जमून कीर्तनांत दंग रहात! तें भक्तिप्रेम पाहून मला गहिंवर आला! आणि प्रेमाचा उमाळाहि आला! ध्यानीं, मनीं, स्वप्नीं कीर्तनरंग भरून आणि त्यानंतर दृढनिष्ठेनें सेवा करणेची संधि मिळत गेली! तिचा आनंद आज भोगीत आहे!

## श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांनीं अनुग्रह घेतला

भडगांवच्या श्री. लक्ष्मीबाई केळकर यांचे यजमान नुकतेच दुर्दैवानें परलोकवासी झाल्यामुळें त्या दुःखद घटनेमुळें त्या कोठें बाहेर पडत नसत. पण महाराजांची कीर्ति त्यांचे कानावर घालून लोकांनीं कीर्तनाला येण्याचा अतिशय आग्रह केल्यामुळें दुसऱ्या दिवशींपासून त्याहि कीर्तनश्रवणाला येऊं लागल्या. कीर्तनांतील बोध पटल्यामुळें महाराजांचा त्यांनीं त्यानंतर अनुग्रह देखील घेतला.

पहिल्याच खेपेंत भडगांवीं श्री अवधूत महाराजांनीं बोधवृक्षाचें बीजारोपण केलें. गांवांतील लोकांना ते भक्ति-प्रेमाची गोडी लावून गेले. काशीस जातांना बरोबरच्या मंडळीसह पंचायतन मंदिरांत गांवांतील भक्तांचा निरोप घेऊन काशीच्या प्रवासाला महाराज गेले.

भडगांवांतील लोकांना महाराजांच्या कीर्तन-श्रवणाची व बोधामृत पद्धतीची इतकी गोडी लागली कीं त्यांना भडगांवास दरसाल उत्सवासाठीं निमंत्रण द्यावें अशी चर्चा श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांचे वाड्यांत होऊं लागली. दोन वर्षें महाराजांशीं या संबंधींचा पत्रव्यवहार होऊं लागला. लोकांच्या आणि भक्तांच्या आग्रही निमंत्रणाला मान देऊन महाराज दोन वर्षांनीं फिरून भडगांवास आले त्यावेळीं त्यांची उतरण्याची व रहाण्याची सोय श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांच्या वाड्यांतच करण्यांत आली. या ठिकाणीं भडगांवच्या त्यांच्या भक्तांना फिरून ब्रह्मचर्चेचा सुबोध भाषेंतील बोध ऐकण्याची संधि मिळाली. त्यामुळें आणखी बरेच लोक अनुग्रहीत झाले. पुढें दरसालीं श्रीमती केळकरबाई महाराजांचा जन्मोत्सव करीत व भक्तांना प्रसादरूपी जेवण देत असत. महाराज भडगांवास उत्सवासाठीं येऊं लागले. असा कार्यक्रम बाईंचे हयातींत होत असल्यामुळें त्यांचेवरील दृढ अशी भक्तीची भावना बळावली.

गुरुमहाराजांकडून १९१३ सालीं मला अनुग्रह देवविल्यानंतर श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांनीं मला सांगितले, "श्री गुरुमहाराजांचा कृपांकित झालास आतां संसार-व्यवहारांतहि तूं निश्चित रहावेस अशी कांहीं व्यवस्था लावण्याचे माझ्या मनांत आहे." बाईंनी पुढें अशी व्यवस्था लावलीहि हें कृतज्ञतापूर्वक नमूद करतों. त्या विषयींचा सविस्तर तपशील नमूद करण्यास या मर्यादित जागेच्या आठवणींत औचित्यहि नाहीं.

## श्रीदत्तमंदिर योजना

कोठें तरी एक मंदिर-मठी बांधावी आणि त्याठिकाणीं सर्व भक्तांनीं एकत्र जमून अखंड प्रेमभक्तीचा सोहाळा करावा, असें भक्तांची गर्दी केळकरांचे वाड्यांत होऊं लागल्यामुळें महाराजांना वाटूं लागलें !

असा योग सहजासहजीं घडून येण्याचा काळ दूर नव्हता ! महाराजांनीं केळकरवाड्यांत गर्दीनें जमणाऱ्या भक्तांशीं आणि गांवांतील प्रतिष्ठित मंडळीशीं सल्लामसलत करून केळकर वाड्यानजिकच थोडीशी जागा खरेदी करण्याचें निश्चित केलें. त्यासाठीं पुरेशी रक्कमहि महाराजांचेजवळ त्यावेळीं नव्हती ! मुंबईहून महाराजांचे परमभक्त श्री. सदाशिवराव सहानी व त्यांचे स्नेही यांचे मार्फत कर्जाऊ रक्कम आणवूनच खरेदीचा व्यवहार पुरा करण्यांत आला. महाराजांनीं उत्सवांत टिपऱ्या खेळण्यासाठीं तरुणांना तयार केलें. परशरामवाणी, गोविंदा शिंपी, गणपतवाणी, विनायक पंडीत, सदाशिव पंडीत, सोनू तिवारी, चिन्दा न्हावी व रामवाणी इत्यादि तरुण उत्सवांत भक्तिनें नाचून टिपऱ्या खेळण्यांत तरबेज झाले ! श्री. परशराम वाणी याच्या मार्गदर्शनानें गांवांतील आणि आस-पासच्या गांवांतील अनेकानीं येऊन महाराजांचा अनुग्रह घेतला. नंतर नांदेड, पाचोरा, धुळे जळगांव, नेरी वाघळी, अंमळनेर वगैरे अनेक गांवीं कीर्तनें व फेऱ्या करून महाराजांनीं भक्तीप्रेमाचें वेड लोकांना लावलें.

## १९०९ ते १९२७ या कालावधींत

केवळ खानदेशांतच नव्हे तर पुणे, सातारा, कोल्हापूर, सोलापूर, बेळगांव, मुंबई, ठाणा-वसई इत्यादि ठिकाणींहि महाराजांनीं अवधूत-सांप्रदाय कीर्तन-रुपानें प्रगट केला. आणि भक्ति-प्रेमाची गोडी असंख्यांना लावली !

× × ×

## श्रीदत्तमंदिर मठीची योजना

भडगांवांत महाराज नसले कीं गांवांत पंतांचीं पदें म्हणत फेरीला हिंडण्याचा प्रघात दगडूवाणी यांनीं पाडला. मीहि त्यांचे बरोबर मधून मधून जाई. महाराज भडगांवांत असतांना तेहि केव्हां केव्हां गांवांतून पंतांचीं पदें म्हणून फेरीची जागृति करीत. त्यावेळीं गांवांतील लोक त्यांचे भोंवतीं गर्दी करून त्यांची तेजस्वी मूर्ति पाहण्यांत आणि पंतांच्या पदांचा तेजस्वी बोध ऐकण्यांत तल्लीन होत असत! हा देखावा महाराजांच्या बरोबरच फेरीला जात असल्यामुळें मी प्रत्यक्ष पाहिला व ऐकला त्याचें वर्णन करण्यांत माझे शब्द अपुरे पडतात!

महाराजांची जन्मभूमि कुरुंदवाड येथें पंतांचा उत्सव होत होता तो आतां भडगांवास होऊं लागला. नवीन घेतलेल्या जागेंत श्रीदत्त जन्मोत्सव करण्यासहि सुरवात झाली. ही जागाहि अपुरी पडूं लागल्यामुळें **१९२७ सालीं** आसपासची आणखी जागा घेऊन **श्री दत्तमंदिर मठीचा आराखडा तयार झाला.**

मध्यंतरी श्रीमती लक्ष्मीबाईनीं मला आणि पितृ-छत्र गमावलेलें श्री. विनायकराव पंडित यांना भांडवल देऊन भागीदारीनें दुकान चालविण्याची संधी दिली. भागीदारी नंतर तें दुकान आम्ही दोघांनीं २०–२५ वर्षें चालविलें. गुरुभक्ति प्रेमाचा मला गुरुमाऊलीचे कृपेनें चांगला अनुभव आला. एक वर्षानंतर मी माझें स्वतंत्र दुकान काढूं शकलों. नातलगांनींहि भांडवलाची मदत केली. चि. बाबूच्या नांवानें स्वतःच्या भांडवलानें स्वतंत्र दुकान थाटलें तें आतां सद्गुरूंच्या कृपेनें ठीक चाललें आहे. महाराज त्या प्रसंगीं मला म्हणाले, "परशराम, तुझ्या निस्सीम गुरुभक्तीचें हें फळ होय; तूं जें कांहीं करशील त्यांत यश ठरलेलें आहे!"

## माझ्या सेवेचा कांहीं तपशील

गुरुमहाराजांच्या आज्ञेवरून माझे हातून जी दत्तसेवा घडली तिचा तपशील थोडक्यांत नमूद करतों :—माझ्या गरिबीच्या स्थितींतच मला "श्री दत्तमूर्तीला एक चांदीची छत्री करून दे" अशी आज्ञा गुरुमहाराजांनीं दिली. मी ही आज्ञा मानून, कुरुंदवाडाहून २५ तोळ्यांची चांदीची छत्री करवून आणून श्री दत्तमूर्तीसाठीं अर्पण केली. त्यासाठीं ११ रु. जास्त खर्च आला तोहि मी दिला. महाराजांच्या निजणेचे वेळीं त्यांचे अंथरुण स्वच्छ झाडून घालून देऊन, त्यांची पिकदाणीहि मीच साफ करून ठेवावी. माझ्या या विशेष सेवेमुळें कांहीं वर्षांनीं माझ्या अंगावरील कोड अजिबात गेले! कोठेंहि राहिले नाहीं! ही सद्गुरूंची कृपाच म्हणतों.

माझ्यावरील या सद्गुरुकृपेचा दाखला पटून, माझ्या घरांतील लहानापासून थोरांपर्यंत सर्वांनी आणि महाराजानंतर मुलांनीं अण्णा महाराजांचा अनुग्रह घेतला. आणि सर्वंजण यथाशक्ति श्री अवधूत मठीची सेवा करीत आहेत.

\+ \+ \+ \+

## माझी पारमार्थिक उन्नति साधणारें निजधन

गुरुमहाराजांनीं वेळोवेळीं माझ्या सेवेला प्रोत्साहन दिलें. माझी सेवाभक्ति अनेकदां कसोटीला लागली, कित्येक वेळां मला दूर ठेवूनहि माझी परीक्षा पाहिली! पण कोणत्याहि परिस्थितींत गुरुमातेवरील माझी निष्ठा मी ढळूं दिली नाहीं. माझी गुरुनिष्ठा हेंच माझी पारमार्थिक उन्नति साधणारें निजधन ठरलें. माझेकडून महाराजांनीं 'प्रेममेट', 'प्रेमतरंग' हीं .पंतांचीं पदें आणि कीर्तनांतील पदेंहि सुवाच्य मोठ्या अक्षरांत लिहून घेतलीं आणि तें सर्व हस्तलिखित स्वतःजवळ ठेविलें. या सेवेच्या निमित्तानेंच शिक्षकाच्या नोकरीचा राजीनामा देऊन मी श्री दत्तसेवेसाठीं मोकळा झालों! महाराजांनीं सांगितलेली सेवा मन लावून त्वरित करण्यांतच मला आनंद वाटे. लहानपणापासून जडलेली दत्तभक्ति गुरुनिष्ठेंत कळसाला पोंचून तिचें तिनें मला सुफल दिलें! धंदा-व्यवहारांत आलेल्या अनेक अडचणींतून गुरुनिष्ठेच्या बळानें पार पडलों.

\+ \+ \+ \+

## महाराज स्वानंदवासी झाल्यानंतरची सेवा

महाराज स्वानंदवासी झाल्यावर त्यांच्या समाधीजवळ नंदादीप सतत ठेवण्याची इच्छा, सुपुत्र श्री. अण्णा महाराजांनीं व्यक्त केली. त्यावेळीं २५० रु. खर्च करून मी एक चुन्याची घाणी बांधली आणि त्या घाणींतून निघणाऱ्या चुन्याचे उत्पन्नांतूनच महाराजांच्या समाधीजवळ सतत नंदादीप ठेवण्याची व्यवस्था केली. या सद्गुरु-निष्ठेचीं फळें अद्यापहि मला मिळत आहेत. रेशनिंगच्या काळांत खडीसाखरेवर नियंत्रण होते. पांच तोळे साखर देखील दुकानांत ठेवण्याची मनाई होती! मी माझ्या दुकानांत पक्के २६ शेर साखर विक्रीला ठेविली होती. गांवांतील लोकांत ही गोष्ट हां हां म्हणतां पसरली! प्रत्येकाला गांवांत विरोधक असतात, तसे मलाहि होते व आहेत! अधिकाऱ्यांकडे माझ्या दुकानांतील 'बेकायदा' साखरेची बातमी पोचवून पुढील तयारीनिशीं त्यांना माझ्या दुकानापुढें दत्त म्हणून उभें करण्यांत आलें! त्यांनीं 'बेकायदा' मालाचा पंचनामा करून चाळीसगांव कोर्टाकडे काम पाठविलें! श्री सद्गुरुंचे चिंतन करून 'या खटल्यांतून' सुटण्यासाठीं

चाळीसगांवला जाऊन वकील दिला आणि मठींत येऊन अधिष्ठानास वंदन करून घरीं गेलों. या अवधींतच गुरुचरित्राचे ७ दिवस पारायण केलें य रोज पंतप्रेमलहरीचे पदांचे भजन करीत होतों. त्या समयालाच दुष्काळाची परिस्थिति पाहून मिकार भोजन करणेची त्यांनीं स्फूर्ति दिली, त्यावेळीं मोठे मोठे लोकही येऊन भोजन करून गेले. गरीबांचा दुवा व पंतांनीं भक्तीची परीक्षा पाहिली! मात्र केसच्या निकालाचे आधीच अन्नदान करणेची स्फूर्ती दिली या कृपेनेच केसचा निकाल माझे बाजूने लागला म्हणजे निर्दोष झालों तर हाच सेवेचा कृपाप्रसाद समजलों. अखेर 'हा खटला' दोन वर्षे चालून मी अखेर श्री सद्‌गुरुकृपेनें निर्दोषी ठरलों.

## श्री सद्‌गुरु महाराजांच्या कृपेच्या आणखी थोड्या आठवणी

माझ्या मनांत महाराजांचेबरोबर बाळेकुंद्रीस जाण्याचे फार दिवसांपासून होतें पण त्यांना विनंति करण्याचें धाडस होत नव्हतें! गुरुमहाराजांनीं हें ओळखलें असावें. कारण १९३८ च्या मध्ये गुरुमाउली रक्तदाबांनी आजारी होते. तें औषधपाणीचे काम कोण करील म्हणून आईसाहेबांनी माझे नांव सांगितले. 'तो येत असेल तरच तुम्ही जावे' अशी इच्छा त्यांनी दर्शविली म्हणून मला विचारलेवरून दास येणेस तयार आहे म्हणून योग समागमाचा आला त्यावेळीं जी नव्हे ती सेवा करणेची मला संधी मिळाली व ती सेवा आनंदानें केली म्हणून हा काल मला प्राप्त झाला. आश्विनमासीं महाराजांनीं मला मठींत बोलावून विचारलें, "तूं बाळेकुंद्रीचे अधिष्ठान पाहिलें नाहींस तेव्हां या खेपेस मजबरोबर बाळेकुंद्रीस येतोस कां?" अर्थात् मी आनंदानें चटकन् रुकार दिला. महाराजांनी घरच्या मंडळीची परवानगी घेऊन निघण्याचे तयारींत रहाण्यास मला जरा इंसूनच सांगितलें!

चालिसगांव स्टेशनला येऊन कल्याणमार्गें पुण्याची तिकिटें काढून गाडींत बसलों. कल्याणला सामान घेऊन उतरल्यावर पहातों तों महाराजांची ट्रंक व पैशाची पिशवी गाडींतच राहून गाडी पुढें निघून गेली! कल्याण-स्टेशनमास्तरना कळविल्यावर त्यांनीं लगेच दादर स्टेशनला फोन केला. 'पेटी व पिशवी नेण्यास महाराजांच्या माणसास लगेच पाठवा!' असें दादर-स्टेशनमास्तरनीं सांगितलें. तेव्हां महाराज कल्याणला राहून त्यांनीं मला दादरला पिशवी व पेटी आणण्यास पाठविलें. सर्व वस्तू होत्या तशा मला परत मिळाल्या! महाराज म्हणाले, "श्री पंतांनींच माझी पेटी सुरक्षित राखून परत मला दिली; नाहीं तर पुढें कसे गेलो असतो!"

वाळेकुंद्रीचा उत्सव आटोपल्यावर परत येतांना, कोल्हापूर कऱ्हाड, सांगली इत्यादि ठिकाणच्या भक्तमंडळीच्या भेटी घेऊन आम्ही मुंबईस आलो. मुंबईत ४ दिवस मुक्काम केल्यावर मी एकटाच भडगांवीं आलों आणि गुरुमहाराज मुंबईतच राहिले.

## ' हरी हरी महाराज '

१९१८ सालीं अध्यात्मशास्त्राची शास्त्रीय चर्चा करण्याची हौस असलेले एक पंडित महाराजांकडे येऊन त्यांना शास्त्रीय प्रश्न विचारीत. त्यांचे समर्पक उत्तर महाराजांनीं दिलें कीं खूष होऊन त्या अत्यानंदांत मांडीवर हात मारून ते ' हरी हरी ' म्हणत. यामुळें लोक त्यांना पुढें ' हरी हरी बुवा ' म्हणूं लागले !

## गुरुचरित्र समाप्तीचें अन्नसंतर्पण

माझ्यावर ' बेकायदा खडीसाखरेचा खटला ' चाळीसगांवांस चालू असतां त्या विषयींच्या चिंतानिवारणासाठीं मी गुरुचरित्राचा सप्ताह करण्याचे ठरविलें. अन्नधान्याची अडचण असली तरीही गुरुचरित्राची समाप्ति अन्नदानानें करावी असेंहि मनानें घेतलें ! हें ' भिकार-भोजन ' स्वरूपाचेंहि अन्नदान गुरुकृपेनें व्यवस्थित रीतीनें पार पडले. गुरुकृपेचे ऋण अंशतः तरी फेडण्याचा हा योग होता ! यांत कसलीहि संकटें आली नाहीत. **वास्तविक त्यावेळी रेशनच्या निर्बंधामुळें अन्नधान्याचा तुटवडाच होता.** सद्‌गुरु प्रेरणेने मी हरभऱ्यांची ३ पोती म्हणजे ७॥ मण हरभरे आणलें आणि मसाल्याची उसळ उत्तम प्रकारची करून प्रसादाला आरंभ तर केला. त्याच प्रसादांत गरीबगुरीब, मध्यम व तालेवार श्रीमंत लोक देखील प्रसाद खाऊन गेले ! प्रसाद दोन अडीच हजारावर लोकांनीं खाल्ला असावा ! संध्याकाळीं आणखी महार, चांभार, मुसलमान इ. लोक आले आणि त्यांनाहि प्रसाद खाऊं घातला ! तेहि समाधानानें प्रसाद खाऊन गेले. शिल्लक राहिलेला सद्‌गुरूंचा प्रसाद दुसऱ्या दिवशीं वाटून टाकला ! मला सद्‌गुरूंच्या कृपेचा अनुभव आला मी आनंदानें सद्‌गुरूंची आराधना केली व म्हटलें—

**काय मौज पहासी दिनानाथा ।** हें पंतांचें पद पूर्ण म्हणून सद्‌गदित झालों. नंतर माझ्यावरील खटल्याचा निकाल लागून मी निर्दोषी ठरून सुटलों !

७

## लग्नाला अडथळा आणणारा रोग सद्गुरुकृपेनें नाहींसा झाला !

लहानपणापासून माझे अंगावर पांढरें कोड होते. त्यासाठीं लहानपणीं श्री दत्त–पूजन व औदुंबरपूजा करीत असें; आणि तीर्थ अंगाराहि लावीत असे तरीपण या दुष्ट रोगाचा अवशेष थोड्या प्रमाणानें शिल्लक असल्यामुळें, मुलीचे पालक 'वर' म्हणून माझ्या विषयीं नापसंतीच व्यक्त करीत.

**पुढें सद्गुरु सहवासानें अणि विभूति-चर्चेनें हळू हळू हा रोग पार नाहीसा झाला !** आणि नंतर माझा विवाह ठरून विवाह समारंभ यथासांग पार पडला ! श्री सद्गुरुच्या कृपेनें असाध्य वाटणारे दुष्ट रोगहि नाहींसे होतात असा मला स्वतःला अनुभव येऊन सद्गुरूंवरील श्रद्धा व विश्वास दृढ झाला.

### सद्गुरुकृपेचे वाढते अनुभव

भडगांवास माझें आणि पाचोऱ्यास मोठ्या मुलाचें दुकान आतां छान चालले आहे. पाचोऱ्यास ५० हजारांचे दोन मोठे वाडे आणि गोडाऊन्स ( धान्यादि सांठे ठेवण्यासाठीं कोठारें ) खरेदी केली असून मोठा मुलगा व घरचीं कांहीं मंडळी पाचोऱ्यासच राहतात. शिवाय सध्यां मी १२ हजारांची शेतीहि करीत आहे.

### मंदिराच्या दुरुस्तीची सेवा

भडगांवांतील श्री देवीच्या मंदिराचा जीर्णोद्धार ८॥ हजार रुपये खर्चून मी करूं शकलो. ही सर्व वैभवाची शक्ति मला सद्गुरूंच्या कृपेनेंच लाभली अशी माझी श्रद्धा आहे. शिवाय एक घर बदली देऊन गुरुमहाराजांच्या स्मारक मंदिरासाठीं खरेदी केलें आहे. मंदिर बांधून देण्याचाहि मनानें संकल्प केला होता; पण आतां मंदिर बांधणीचें काम दुसऱ्या कांहीं मार्गानें होणार असल्याचें समजल्यावरून सध्यां मी माझा बांधकामाविषयींचा संकल्प स्थगित केला आहे. आणि माझ्या वांट्याला जी दुसरी कांहीं सेवा येईल ती सद्गुरुचीच सेवा म्हणून करण्याचें ठरविलें आहे. आमच्या सर्व घराण्यावरच सद्गुरुकृपेचें छत्र आहे. घराण्यांतील सर्वांनाच सद्गुरु-चरणीं वाहिलें आहे. सर्वांकडून अखंड सेवा घेऊन, सद्गुरूंच्या कृपाछत्राखालींच सर्वांची वाढ होईल व सर्व सुमार्गाला लागतील आणि उन्नतिपदावर चढतील असा भरंवसा आहे. **महाराजांचे ऐहिक व पारमार्थिक वारस श्री अण्णा महाराज** यांनीं आम्हां सर्वांना प्रोत्साहन देऊन कृपादृष्टि ठेवून प्रेमामृत अखंड पाजावें हेंच त्यांचेकडे नम्रतेनें मागणें आहे.

## वेळोवेळीं सेवा सांगून महाराजांनीं माझें कल्याण कसें केलें ?

इंदूरच्या कीर्तनफेरीचे वेळीं गुरुमाउलीनें मला कीर्तनांत टाळ वाजविणेची सांथ करणेची सेवा सांगितली. त्यावेळी श्री दत्तमहाराज तथा श्री. आण्णा, दगडू वाणी, बाबू औरंगाबादकर आणि मी इतकेजण महाराज बरोबर होतो. त्यावेळी प्रेमलहरीतील पदांचा सुबोध खुलासा महाराज आम्हांला ठीक समजावून सांगत. नदीकाठीं श्री दत्तमंदिरांत उघड्या जागेंत महाराजांचीं कीर्तनें होत. कीर्तलाला गर्दी चिकार होई. नंतर गोपाळ मदिरांतहि कीर्तन सप्ताह झाल्यावर राजवाड्यांतहि महाराजांचीं कीर्तनें झालीं.

इंदूरहून महाराजांची कीर्तन फेरी उज्जैनला गेली. तेथेहि १५ दिवस कीर्तनें झालीं. तेथेहि टाळ वाजविण्याची सेवा मजकडून महाराजांनीं घेतली. तेथून थेट भडगांवीं आम्ही आलों. नंतर वाईस आणि मुंबईकडील फेरीतहि महाराजांनीं टाळ वाजविणेची सेवा मला सांगितली. या सेवेमुळें मला सुबोध आध्यात्मिक विवेचन भरपूर ऐकावयास मिळून आध्यात्मिक आचार–विचारांत त्याचा फार उपयोग झाला !

× × × ×

नंतर तीन महिने कुरुंदवाडला महाराजांचे निवासस्थांनीं मला नेऊन मोठीच सेवेची संधि गुरुमाऊलीनें मला दिली. तेथें मी झाड लोट करणें, पाणी भरणें, इत्यादि सेवा मनःपूर्वक केली. नंतर तेथील उत्सव समारंभ आटपल्यावर मला भडगांवीं घरीं जाण्यास महाराजांनीं अनुज्ञा दिली. या मुदतींत एकदां महाराज सहज बोलले "परशराम तुझ्या डोकीला टक्कल दिसतें तर 'खल्वाटो निर्धनः क्वचित्' या सदुक्तीप्रमाणें तूं भाग्यवान् आणि धनवान् होशील" गुरु-माउलीचा हा शुभाशीर्वाद माझ्या भावी जीवनांत खरा ठरण्याचा अनुभव मी प्रत्यक्षच घेत आहे !

माझ्या पडत्या काळांत महाराजांनीं मला अनेक प्रकारें चांगलीच मदत केली. स्वतःच्या अंगातील कोट व उपरणें इत्याजि वस्त्रें महाराज मला वारंवार देत. मी हे कपडे गुरुप्रसाद म्हणून जपूत ठेवी आणि विशेष समारंभाचे प्रसंगीं वापरीत असे. माझीं मुलें बाबू, नारायण व एकनाथ यांनाहि मठीतून वेळोवेळीं कपड्यांची मदत करीत. या मदतीचा माझ्या गरीब स्थितींत फारच उपयोग झाला हें कृतज्ञतापूर्वक नमूद करतों. या प्रसादामुळें माझी मुलें आणि सर्वच कुटुंबीय मंडळी तन मन धनानें

आणि मोठ्या हौसेनें अंतःकरणपूर्वक महाराजांच्या श्रीदत्तमठीची सेवा अद्यापहि करीत असततात व तें पाहून मला धन्यता वाटते ! माझ्या गुरुमाउलीकडून प्रेरणा व स्फूर्ती मिळून माझ्या पश्चातहि सर्व कुटुंबीयांकडून महाराजांच्या श्रीदत्तमठीची अशीच सेवा घडत रहावी आणि या सर्वांना माझे प्रिय व थोर गुरुबंधु श्री. अण्णा तथा श्रीदत्त महाराज यांचेकडून प्रोत्साहन व बोधामृत मिळत जावें आणि सर्वांनाच याकामी सुबुद्धि लाभावी अशी सद्गुरु माउलीचें चरणी आणि श्रीदत्त महाराजाचे चरणीं प्रार्थना करतों.

* * *

## भाग पहिला

# आठवण नं. ११

(लेखक : श्री. बाबुलाल वाणी, श्री. परशुराम वाणी यांचे ज्येष्ठ सुपुत्र)
(राहणार मु. पो. भडगांव, ता. पाचोरा जि. पूर्व खानदेश.)

आमचे घराण्यांत आईवडीलांना दत्तउपासनेची आवड होती. वडीलांनी समर्थ मोरेश्वर महाराज उर्फ अवधूत महाराज यांचा अनुग्रह घेतलेला आहे व नेहमी गुरुमहाराजांचे सहवासांत असायचे. त्यामुळे लहानपणापासूनच आम्हांस पण भडगांव येथील महाराजांनीं बांधलेल्या दत्तमठींत नेहमी येण्याजाण्याची गोडी लागली होती. आमचे वडीलांनी मानलेली आई म्हणून श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांचे वाड्यांतच आम्हीं रहात असल्यामुळें आम्हांस लक्ष्मीबाई केळकर ह्यांचे सहवासांत चांगले प्रकारे वळण लागलें. त्यांनी आम्हांस मुलांनी कसे वागावे ह्याचे बाळकडूच दिले होते. रोज रात्रीं रामायणाच्या, महाभारताच्या, श्रीदत्ताच्या आणि नवनाथाच्या गोष्टी सांगत. ह्याच अनुरोधाने त्यांचे गुरु अवधूत महाराज यांच्या विषयींहि गोष्टी सांगत ह्यामुळे आमचे मनावर देवभक्तीविषयी आदर उत्पन्न होत असे. लहानपणीं वडीलासमोर जाणेची हिंमत होत नव्हती. श्रीमती लक्ष्मीबाई केळकर, विनायक त्र्यंबक पंडित व आमचे वडील अशा तिघांनीं मिळून भागीदारीत किराणा भुसारचें दुकान काढले होते. त्यामुळे वडील मुलांचे बाबतीत कडक शिस्तीने वागत असत. म्हणून आम्हांस वडीलांचा लळा नव्हता. ह्या वागणुकीमुळे आम्हांस एकप्रकारे उत्तम वळण लागले. वयाचे ७ वर्षांपासून शाळेत जाणेस लागलो. पुढें शाळेत उनाड मुलांचे संगतीने वाईट खोडी लागून उनाडकी करणेस मन प्रवृत्त झालों. जेमतेम मराठीं ५ वी पर्यंतच शिक्षण केले पण ते सुद्धां शेवटले नंबराने पास होऊन झालें! आमचे वडीलांचे मित्र जहागिदार मास्तर मराठी ६ वी वर असतांना त्यांनी आमचे वडीलांस येऊन सांगितले कीं; तुझे मुलांस शाळेतून काढून घेऊन दुकानदारीत हुषार करावे. असे त्यांचे मत आमचे वडीलाजवळ त्यांनी व्यक्त केले.

## इष्टापत्ति !

वडीलांनी लगेच मला बोलावणे पाठवून मास्तरासमोर विचारले, "तूं अभ्यास करीत नाहींस. उनाडकी करतोस असे मास्तर सांगतात हे खरे आहे कां ?" त्यावेळेस त्यांना मी अभ्यास चांगला करतो उनाडकी करीत नाही म्हणून सांगितले. मग मास्तरांनी मला प्रश्न विचारला तो प्रश्न 'माझे आयुष्यांतला ठेवा' म्हणून हृदयांत अद्याप वास करीत आहे ! तो प्रश्न म्हणजे १८ × ७ अठरा साते किती ? त्यांचे उत्तर मी देऊं शकलो नाहीं ! त्यावेळीं माझे समक्ष वडीलांनी मास्तरांना सांगितले की "उद्या ह्याचे नांव शाळेंतून काढून टाका. उद्यापासून ह्याला घरीच ठेवतो" तो दिवस म्हणजे १९३६ सालांतला शुभ दिन ! पुढे वडीलांनी त्यांचे भागीदारांचे संमतीने दुकानावर बसणेस सांगितले. शुक्रवारी बाजार असतो त्या दिवशीं बाजारांत आगपेट्या विकणेस पाठवीत असत. अशी थोडी काळक्रमणा ३-४ वर्षेंच चालली. पुढें आमचे आईला त्यांचे माहेरचे बाबा व आजी यांना मुलगा नसलेमुळे त्यांचेकडून थोडी फार अशी रक्कम मिळाली. त्यावर मी गांवातील व्यापारी ह्यांचेमध्ये ज्वारीचा व्यापार भागीदारींत केला. ३-४ वर्षें धान्याचा व्यापार चालला त्यामध्यें थोडी भांडवलाची भर पडली, नंतर सरकारी नियंत्रणामुळें धान्याचा व्यापार बंद झाला म्हणून शेंगाचा व्यापार मोठ्या प्रमाणांत केला. त्या धंद्यामध्ये भरपूर नफा मिळाला ! ज्या व्यापाऱ्यांचे भागीनें धान्य व शेंगा यांचा व्यापार केला त्यांचे भागीदारीत राहून **सत्य मार्गानेच** नफा तेजीमुळे मिळवून त्यांचे **चांगले गुण घेतले व वाईट गुण टाकून दिले.** पुढे वडीलांचे भागीदारी दुकान बंद झालेमुळे वडीलांनी मी करीत असलेल्या व्यवहारांत लक्ष घातले. त्यांची भागीदारी सुमारे ३० वर्षें टिकली. तीघांचा एकमेकांवर विश्वास असलेने व महाराजांच्या मार्गदर्शनामुळें अत्यंत प्रेमळ वृत्तीने वागत असत. भागीदारी तुटल्याने लक्ष्मीबाई ह्यांचे वाड्यांतून आम्हांस बाहेर पडावे लागले. त्यावेळी अत्यंत वाईट वाटून रडूं कोसळले होते ! पण व्यवहारदृष्टीने बाहेर पडणे भाग होते. तरी आम्ही दुसरीकडे राहणेस गेलो.

## महाराजांची मजवरील विशेष कृपा

श्रीमती लक्ष्मीबाईंचे बाबतींत आम्हांस आदर होता. त्यामुळे रोज संध्याकाळी त्यांचे घरी जायचे. त्यांचेबरोबर दत्तमठींत जाऊन महाराजांचे दर्शन घेणेचा कार्यक्रम चालू होता. तसेच दत्तमंदिरांत लहानपणापासूनच जात येत असल्यामुळे मोठे महाराज मला पुष्कळ वेळां उचलून कडेवर घेत असत. एकदा मी १० वर्षांचा असतांना

वाड्यांतून मठीत पळत येत असतां महाराजांनी पाळलेला पांढराशुभ्र लाल ठिपकें असलेला मोठ्या कुत्रा माझे अंगावर धावून आला, त्यामुळें मी जोरात रडत ओरडलो! ते ऐकून महाराज बाहेर आले व मला त्यांनी कडेवर घेऊन कान फुंकून 'भिऊ नकोस' म्हणून सांगितले! त्यावेळेस महाराज म्हणाले, "**तूं वडिलांचे नांव चांगले प्रकारे काढशील**" त्याची आठवण मला सारखी येत असते! त्या आशीर्वादाचे अनुभव मला प्रत्यक्ष भोगावयास मिळत आहेत. त्या दिवसांपासून मला महाराजांनी 'रोज संध्याकाळी आरतीचें वेळीस येत जा' म्हणून सांगितले. महाराजांजवळ शेतजमीन होती ती गांवातील शेतकरी रामचंद्र घासतेल्या म्हणून होता, तो महाराजांची जमीन निमेनिम वांट्यानें करीत होता. शाळा सोडलेमुळें महाराजांनी शेतीवर देखरेख करणेचे सांगितलें असता ती मी नीटपणे करीत असे. व शेताची मजुरी बाजाराचे दिवशी मला चुकविणेस सांगत. त्याचे खोलीत कपाटांमध्ये काचेच्या भांड्यात पैसे ठेवीत असत तेथून काढून आणून मजुरी नेऊन दे म्हणून सांगत तर मी भीत भीत सांगितलें 'तुम्ही मला कपाटातून काढून द्या.' त्यावेळेस महाराज मला म्हणाले, "माझा सर्व कारभार उघडा आहे. त्यातून तूं परशरामाचा मुलगा असलेमुळें तुला एवढे घाबरणेचे कारण काय? जा घेऊन ये" असें सांगितलें. नंतर निमुटपणें कपाटातून पैसे आणून मजुरी चुकविली. त्यांची शेती असे-पर्यंत शेतीची देखरेख मी करीत असे. मला महाराजांची शिकवण फार थोडी म्हणजे ३–४ वर्षेंच लाभली. नंतर १९३९ सालीं ते पालखींची फेरी संपवून स्वानंदवासी झाले ही बातमी मला सकाळीं ५ वाजतां कळल्याबरोबर मी दत्तमठींत गेलों व त्यांचे शयनगृहांत प्रवेश केला. तो त्यांची ती तेजस्वी मूर्ति पाहून मला वाटले की महाराज झोपलेलेच आहेत! त्यांचे जवळ त्यांचे सत्‌शिष्य श्रीपादराव व त्यांचे कुटुंब ही मंडळी बसलेली होती. तेथेंच मी एक तास बसलो. त्यांचे अंगाला तूप व अत्तर लावणेस आईसाहेबानीं मला सांगितलें. तेवढी एक सेवा करणेस मला मिळाली. त्यावेळेस अण्णा महाराजांची दोन मुलें भडगावीं होतीं. त्यांना तेथुन बाहेर कुठेंतरी तू घेऊन जा म्हणून मला सौ. आईनीं सांगितलें, त्यावेळेस मिराबाई व बालमुकुंद या दोघांनाहि मी माझे घरीं वाड्यात घेऊन गेलों व तेथें त्यांना खेळवीत बसलों. त्यांना खेळावयला लावावे व पुन्हां मठीत महाराजांचे खोलीत जाऊन त्यांचेकडे नजर भरून पुन्हा पुन्हा पहावे असा प्रकार चालला होता.

यावेळीं माझें वय अवघे १४–१५ वर्षाचे असताना मला भक्तीप्रेमाची आवड ऊत्पन्न झाली. त्यांचे देहास गंगेच्या काठावर अग्नी सस्कार होईपर्यंत मला

झोप नव्हती ! कारण माझेजवळ दोन्हीं मुलें झोपविल्यामुळे अडकून पडलों होतों. मुलें झोपल्यावर संस्काराचे ठिकाणी जाऊन शेवटले दर्शन घेतले. त्या वेळेस दत्त मंदिर सुने सुने वाटत होते ! महाराजांचे दर्शन घेणेसाठीं सकाळपासून भक्तगणांची व इतर भावीक लोकांची रीघ लागली होती. १५ दिवस मला सारखे मठींत रहाणेचा योग आला.

## मोठे महाराज 'अवधूत' रुपानें फिरून आले !

आमचे गुरुमहाराज उर्फ अण्णा महाराज यांना मुलगा झाला. पहा योग कसा तो ! सौ. माई ह्या महाराज जिवंत असतानाच बाळंतपणाचें दिवस भरले होते; परंतु महाराजांचा समाधी काळ जवळ आला त्याचमुळे कीं काय तें लांबले ! महाराज समाधिस्त झाल्यानंतर त्यांचा आत्मा चार पांच दिवसांनीं सौ. माईच्या हृदयांत शिरून त्यांनीच पुन्हा माईचे पोटीं अवतार घेतला असें वाटतें ! कारण मुलगा अगदीं हुबेहुब महाराजांसारखा दिसतो. बारावे दिवशीं आजीनें मुलाचें नांव 'अवधूत' ठेवणेस सांगितलें. खरोखरच मोठे महाराजांची शैली, वागणूक चेहरा उंची वगैरे खुणा चि. अवधूतमध्यें आम्हांला दिसतात ! यामुळें चि. अवधूतच्या रूपानें मोठे महाराज अवधूतपंथाचा प्रचार करण्यासाठीं तिसऱ्या पिढींत फिरून अवतरले असे आम्हांला वाटलें ! ही हकीकत आम्हांला शांता आत्याबाई ताम्हनकर यांनीं सौ. माईच्या व श्रीमती आईच्या बोलण्यःवरून आम्हाला सांगितली. एकंदरीन श्री दत्तमठीची सेवा करावी तितकी थोडीच असें आम्हांला स्वानंदवासी महाराज व श्रीगुरु दत्तमहाराज यांच्या भक्तिप्रेमामुळें वाटतें !

●●●

### भाग पहिला

# आठवण नं. १२

(लेखक : श्री. रामदास रावजी गुरव, भडगांव.)

कै. गुरुबंधु नीलकंठवाणी यांनीं श्री अवधूत महाराजांशीं माझा परिचय करून दिला. भडगावांस महाराज आले तेव्हांपासूनची हकीगत सांगून महाराजांनीं सहजानंदांत रचलेल्या भजनावलीचें पुस्तक त्यांनी मला वाचावयास दिलें.

## अनुग्रह आणि सेवेची संधि

१९२४ सालीं गोकुळाष्टमीचा उत्सव झाल्यावर सोमवारीं मला महाराजांनी अनुग्रह दिला. महाराजांचें कीर्तन ऐकण्याचा सुयोग श्रीदत्त जयंतीच्या उत्सवांत आला. महाराजांची कीर्तनांतील निरूपणाची हातोटी आणि अध्यात्म विषयाचें सुबोध विवरण ऐकून थक्क झालो! त्या पूर्वीं पुष्कळ हरिदासांचीं कीर्तनें ऐकली होतीं, पण महाराजांचीं अज्ञ श्रोत्यांनाहि अवघड विषय पटवून देणारी अद्वैत विषयाची मांडणी ऐकून धन्य धन्य वाटलें! महाराजांची सेवा करण्याचा निश्चय मनानें केला. अहोरात्र त्यांच्या संगतींत राहून त्यांच्या मुखानें बोधवाणी ऐकावी अशा ध्यास लागला. पण प्रापंचिक अडचणीमुळें ४-५ वर्षें मला तशी संधि लाभली नाहीं! मन उदास झाल्यामुळें एके दिवशीं सायंकाळीं महाराजांचें दर्शन घेऊन घरीं चाललों असतां, गुरुबंधूंपैकीं बंडू लोहार यास माझ्या मनांतील इच्छा सांगितली. त्याकाळीं तो महाराजांच्या भक्तींत व सेवेंत रात्रंदिवस होता. त्यामुळें महाराजांना सांगून मला सेवेची संधि देण्यास तो कारणीभूत झाला. सेवेची संधि लाभल्यामुळें मला फार आनंद झाला. महाराजांचे सहवासांत सतत सेवा करण्याची अपूर्व संधि मला लाभली. महाराज आपणहून कोणालाहि सेवेचीं कामें सांगत नसत. पण न सांगता समजून त्यांची कामें मी करूं लागलों.

## श्री सेवापरायण श्री. श्रीपतराव यांचा मठींत प्रवेश

दररोज दोन प्रहरीं १-२ चे सुमार ही महाराजांची विश्रांतीची वेळ होती. १९३० सालीं तीन प्रहरीं ३-४ चे सुमारास एक गरीब ब्राह्मण महाराजांचा शोध

करीत आला. त्यांची व महाराजांची मुलाखत करविल्यावर त्यांची नेमणूक श्री दत्ताच्या पूजेसाठीं झाली. महाराजांच्या कृपेनें आज ते श्री दत्त मठीचे आजन्म सेवापरायण होऊन महाराजांचीं पूर्ण कृपा संपादून मठींतील परंपरा ठीक चालविणाऱ्या, श्री अण्णा महाराजांचा, मठींतील सेवाकार्याचा मुख्य आधार ठरले आहेत! श्री अवधूत मठींत मुंबई, जळगांव, नांदेड, इत्यादि ठिकाणची भक्तमंडळी सारखी येत असत.

## अकांत धनाजी चौधरीला अनुग्रहाचे दोन पाठ!

जळगांवकर मंडळीबरोबर एकदां अकांत धनाजी चौधरी नांवाचा अनुग्रहीत शिष्य-भक्त होता. जेवण झाल्यावर जळगांवचे सर्व भक्त पाचोऱ्यास गेले. पण अकांत धनाजी स्टेशनवरून दोन प्रहरी १ चे सुमारास परत आला. तीन प्रहरीं महाराज विश्रांतिस्थानांतून बाहेर आल्यावर अकांत आल्याचें मी सांगितलें. महाराजांनीं त्याला जवळ बोलावलें तो म्हणाला, "मला मुद्राबरोबर लागली नाहीं तरीं पुन्हां दाखवावी!" नंतर दोन तास खर्चून महाराजांनीं त्याला मुद्राविषय ठीक समजावून सांगितल्यावर तो संतुष्ट होऊन परत गेला.

## १०-१२ कन्नड गोसाव्यांना मठींत पाहुणचार

परगावाहून मठींत येणाऱ्या पाहुण्यांची बडदास्त राखण्याचें काम माझ्याकडे होते. एकदां नगर देवळे येथील संभुबावाच्या मार्गदर्शनानें १०-१२ नंगे कन्नड गोसावी महाराजांचा अनुग्रह घेण्यासाठीं भडगांव मठीकडे आले. त्यावेळीं मठींत कोणीच अधिकारी व्यक्ती नसल्यानें त्यांचा स्वयंपाक व जेवणाची व्यवस्था मलाच करावी लागली! श्री. श्रीपादकाकाहि त्यावेळी बहिणीला भेटण्यासाठीं कोकणांत गेले होते.

## पांच पिंपळे मारुतिस्थानीं महाराजांचीं कीर्तनें

पुढें कांही दिवसानीं नांदेड येथें तापी नदीतीरीं पांचपिंपळे येथें मारुतिस्थान आहे. तिकडे महाराजाबरोबर कीर्तनास जाण्याचा योग मला आला! तेथें माघ व. ७ ला नाम सप्ताहास सुरवात झाली. रात्रीं कीर्तन व दिवसा भजन असा कार्यक्रम होता.

## बंडू लोहाराला कुबुध्दी व शिस्त-भंगाचें वर्तन

दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं बंडु लोहार महाराजांना म्हणाला, 'महाराज मला करमत नाहीं, नदीपलिकडे खेड्यांवर मी भिक्षेस जातों. परवानगी असावी" महाराज म्हणाले 'भिक्षेची जरूरी नाहीं, तूं जाऊं नको' परंतु बंडू आपला हट्ट

सोडीना! मग महाराजांनीं थोड्या रागानेंच परवानगी दिली! तो म्हणाला 'मला अंगावर कफनी पाहिजे.' तेव्हां महाराज म्हणाले "माझी जुनी कफनी घे' त्यानें आपल्याच हातानें कफनी घेऊन घातली. आणि ललिताच्या वेळेचा भगवा फेटा बांधला. पण शैली, शृंगी, कंथा, झोळी इत्यादि फेरीची आभरणें कोठून आणणार? पण असें असलें तरी 'महाराजांनींच मला भगवे दिलें' अशी खोटीच बढाई तो ठिकठिकाणीं सांगूं लागला! येथेंच वंडू लोहाराचा पारमार्थिक अधःपात सुरूं झाला! त्याची यापुढें सारखी अवनतीच होत गेली! महाराजांचें वचन न ऐकतां त्यांचे अपरोक्ष, कडगांव, जळगांव तळई वगैरे गांवीं जाऊन भिक्षा मागूं लागला! त्याच्या या ढोंगी व कपटी संसर्गानें कांहीं भक्त अभक्त बनू लागले! महाराजांनीं सुविचार सांगून पाहिले; पण असल्या अभक्तांना एकदम मोठे होण्याची' हांव सुटलेली, तेव्हां शिष्यत्वाची पायरी एकदम ओलांडून ते स्वतःच 'गुरु' बनले आणि मठींत येईनासे झाले! 'गुरू' तर बनले नाहींतच, पण शिष्यत्वहि सोडून बसले! 'तेल गेले तूपहि गेले आणि फक्त धुपाटणें हातीं घेऊन राहिले!' मत्सर व द्वेष इत्यादि दुष्ट दुर्गुणामुळें भक्तसमाजांत त्याना काहींच किंमत उरली नाहीं!

**अलीकडे श्री. वंडू लोहार यांच्या वृत्तींत सुधारणा झाली. त्यांनीं आठवणी दिल्या त्या अन्यत्र छापल्या आहेत.**

## मूळ धंद्यांतच बरकत!

एक परीट स्वतःचा धंदा सोडून 'फिटर'ची नोकरी करूं लागला. घरीं बायको व दोन मुलें होतीं. दरमहा १५० रु. नोकरींत मिळत असूनहि त्याची स्थिति हलाखीचीच होती! तो एकदां आजारी झाला आणि मग तर नोकरीवरहि संकट आल्यामुळें 'पुढें काय?' अशा संकटांत पडला! त्याला महाराजाकडे आणून आणि त्याच्यावरील संकटाची माहिती सांगून त्याला अनुग्रह देऊन "परतन्त्र नोकरी सोडून स्वतःचा मूळ धंदा कर. त्यातच तुझी भरभराट होईल," असें सांगितलें. त्यानें महाराजांच्या उपदेशाप्रमाणें स्वतःचा धंदा सुरू केला आणि त्याची स्थिति सुधारत गेली. आतां तो घरदार, शेती, मुलगे मुली याच्यासह आनंदानें ठीक संसार करीत आहे! असाच अनुभव अनेक सद्भक्ताच्या संसारातूनहि आला. ज्याच्यावर महाराजांची कृपा झाली त्यांना काहींच कमी पडलें नाही.

× × × ×

## मी अपघात होऊनहि सुखरूप राहिलो!

मी एकदां उत्सवाकरितां मांडव घालीत असता, मांडवाची आधाराची लोखंडी बल्ली मोडली! वरच्या पट्टीच्या घसटीमुळें अंदाजे एक रुपया इतक्या जागेचे माझ्या

डोक्यावरील केस, वस्तऱ्यानें अजिबात साफ केल्यासारखे गेले! परंतु महाराजांच्या कृपेनें कसलीच दुखापत झाली नाहीं! अगदीं अलगत उतरावें तसा मी खालीं आलों!

## माझी नित्यसेवा : महाराजांबरोबर प्रवासाची संधि

उत्सवासाठीं आलेल्या भक्तांना चहा-पाणी, जेवण, अंथरुण-पांघरुण वगैरे ठीक आहे ना, हें पहाण्याची व त्यांच्या सोयी ठीक करून देण्याची कामगिरी मठींत माझेकडे होती. गांवांतील भक्तांना जेवणाचीं आमंत्रणें देण्याचेंहि काम मी करीत असे. भाजीपाला, दूध वगैरे आणण्याचीहि कामगिरी १९४५ पर्यंत मी करीत होतों.

पुढें एकदां कडगांव येथे नामसप्ताहासाठीं महाराज निघाले, त्यांची तयारीचीं कामें करून लगेच मोटारींतून मीहि महाराजांबरोबर कडगांवास गेलों. तेथें महाराजांचा अनुग्रह घेतलेल्या नव्याच भक्तांशीं माझा परिचय झाला.

## पुण्यक्षेत्रीं जाण्याची संधि

पुढें १९३७ सालीं बाळेकुंद्री, पारसवाड वगैरे पुण्यक्षेत्रींहि महाराजांच्या बरोबर जाण्याची लाभदायक संधि मला लाभली! तिकडे कुरुंदवाड जुनीयरचे श्रीमंत बापूसाहेब व राणीसाहेब महाराजांच्या भेटीस आले आणि त्यांनी बेळगांव-नजीक वडगांवच्या आपल्या जहागिरीच्या गांवीं येण्याचा महाराजांना आग्रह केला. तेथेहि महाराजांबरोबर मी गेलों. नंतर कोल्हापुरास श्री अंबाबाईचें दर्शन घेऊन परत आलों. पुण्यांत श्रीमती धारुताई यांचे बंधू रिसबूड यांचे बोलावण्यावरून पुण्यास त्यांचेकडे गेलों. तेथें महाराजांची तब्येत थोडी बिघडल्यामुळें, महाराजांच्याच सूचनेवरून मी व श्री. अण्णा कुरुंदवाडचें कांहीं सामान आणण्यासाठीं गेलों, पण महाराजांची तब्येत जास्तच बिघडल्याची तार आल्यामुळें सामान कसेंबसें मोटारींत टाकून आम्हीं परत पुण्यास आलों. दोन चार दिवसांत महाराजांची तब्येत पूर्ववत् झाली.

## महाराजांनी डोकीवर वरदहस्त ठेवून कल्याणप्रद आशीर्वाद दिला!

त्यानंतरच्या श्री दत्तजयंतीच्या उत्सवांत श्री. दत्तुबुवांचें तथा श्री. अण्णा महाराजांचें कीर्तन पुढील मांडवांत चालू असतां मला हांक मारून महाराज म्हणाले,

" **दत्तू आतां कीर्तन चांगलेंच करायला लागला.**" मग मला जवळ बोलावून माझे डोकीवर वरदहस्त ठेवून आशीर्वाद देतांना म्हणाले, "**तुझे कल्याण होईल, तुला कांहीं एक कमी पडणार नाहीं !**" मी माझ्या आयुष्यांत जी थोडी महाराजांची व श्री दत्ताची सेवा केली असेल तिचें फळ म्हणजेच हा शुभाशीर्वाद होय. महाराजांचे असे आशीर्वाद अनेकांचे बाबतींत दीर्घकालपर्यंत सुफलित झाल्याचे अनुभव आहेत !

## महाराजांची निस्पृहता, औदार्य व परमार्थाची रंगत

महाराजांच्या वृत्तींत लोभाचा मागमूसही नव्हता. त्यांचे टेबलावर नोटांचा ढीग आणि हिऱ्याच्या व सोन्याच्या आंगठ्या अनेकदां पडलेल्या असत–परंतु त्यांच्या तेजस्वी व कडक स्वभावामुळें त्या मूल्यवान जिनसाला हात लावण्याची जवळच्या मंडळीचीहि हिंमत नसे. पण मनांत आलें कीं कोणचीहि मूल्यवान जिन्नस पेटी तबलेवाल्याला किंवा भाविक भक्ताला सहज औदार्याने त्यांनीं देऊन टाकलेली मी पाहिली आहे !

महाराज अनेकदां धुमीशीं बसून अध्यात्म चर्चा करीत. ती ऐकणारे श्रोते ब्रह्मानंदांत डोलूं लागत ! 'जेवण तयार आहे' असे अनेकदां निरोप आले तरी महाराजांची ज्ञानचर्चा सुरूंच असे आणि उठण्याचें भान कोणालाही नसे !

## अस्थि-स्थापनेची व्यवस्था श्रीगुरूंनीं स्वतःच सांगितली

एकदां अध्यात्म चर्चेच्या प्रसंगीं, गुरुमहाराजांनीं आपल्या स्वानंदवासानंतर अस्थिची व्यवस्था कशी करावयाची, हे स्वतःच सांगितलें ! ते म्हणाले "आमच्या अस्थि काशीला न्यावयाच्या नाहींत. गाडग्यांत घालून याच धुमीखालीं व्यवस्थित पुरून ठेवा" महाराजांच्या या आज्ञेप्रमाणें त्यांच्या अस्थि धुमीच्या जागेवरच समाधी बांधून आंत ठेविल्या आहेत. साधु पुरुषाच्या आंगीं असावयास पाहिजेत, असे सर्व गुण, गुरुमहाराजांच्या ठिकाणीं होते, विशेषतः शांति, क्षमा, दया आणि भक्ति-प्रेम हे सद्‌गुण तर महाराजांचे ठिकाणीं उत्कर्षानें होते.

## महाराजांचा दिनक्रम व गुणविशेष

रोज पहाटे चार वाजतां उठून व शुचिर्भुत होऊन एकतारी करतलांच्या तालांत भजन करण्याचा कार्यक्रम महाराज सहसा चुकत नसत. उत्सवांत परगांवची मंडळी कितीहि येवोत त्या सर्वांची आणि गांवांतील मंडळींची जेवणाखाणाची व्यवस्था चोख ठेवण्यावर महाराजांचा कटाक्ष असे. दुष्टादुष्ट होई त्याला आपलासा करण्याचें आकर्षक सामर्थ्य महाराजांचे ठिकाणीं होतें. एकदां प्रांत ऑफिसर

महाराजांना भेटण्यास आले असतां आम्हीं दोन खुर्च्या ठेविल्या. पण ते ऑफिसर महाराजांचे समोर खुर्चीवर बसेनात ! महाराजांनीं त्यांना खुर्चीवर बसण्याचा आग्रह केला तरी ते बसेनात ! उलट महाराजांनाच त्यांनीं आग्रहपूर्वक खुर्चीवर बसविलें !

मला ( रामदास गुरवला ) महाराज विनोदानें 'काळा मारोती' म्हणत ! महाराजांचे शिष्य असंख्य असून महाराष्ट्र, मध्यप्रदेश व सौराष्ट्र इत्यादि ठिकाणीं पसरलेले आहेत. त्यांत जातपातीचा भेद महाराजांकडे नाहीं. भक्तिप्रेमाने येणाऱ्या प्रत्येकाला ते अनुग्रह देत असत. श्रीदत्तअवधूत मठी महाराजांनीं **स्वतःच्या हिंमतीवर स्वावलबी बाण्यानें बांधली.** त्या कामीं सर्व प्रकारचे अडथळे आले परंतु कसल्याहि प्रकारच्या अडथळ्यांनीं नाउमेद न होतां श्री दत्त अवधूत मठीचें बांधकाम त्यावेळेपुरते महाराजांनीं निश्चयानें तडीस नेलें.

* * * *

## गुरुमहाराजांचे कीर्तनकार व कर्तबगार शिष्य

**मनसारामबुवा जळगांवकर** हे मराठी शाळेचे हेडमास्तर होते. त्यांनीं नोकरी सोडून अवधूत सांप्रदाय घेतला आणि खानदेशभर कीर्तनें करून अवधूत-नामाचा झेंडा फडकाविला. **जळगांवचे अकांतबुवा** मनसारामबुवांचे प्रतिस्पर्धी बनले ! एकदां ते रात्रीच्या गाडीनें महाराजांना गुपचूप जळगांवला घेऊन आपल्या घरीं गेले. कोणासच हें कळूं दिलें नाहीं ! पण महाराजांना **एकलकोंडेपणा पसंत नसल्यामुळें,** उजाडतांच अकांतबुवांना सांगून ते आपल्या नेहमीं उतरण्याचें जागीं म्हणजे 'भावसार मठींत' गेले ! त्या मठींत जळगांवच्या सर्व भक्तांना महाराजांनीं दर्शन दिलें. अकांतबुवांनीं महाराजांना आपल्या घरीं नेऊन फारच आदरसत्कार केला. त्यांनीं कीर्तनें करून अवधूत सांप्रदायाचा चांगला प्रचार केला. जळगांवचे **फकीरासेठ सोनार** हेहि महाराजांचे कीर्तनकार, शिष्य आणि चांगल्यापैकीं प्रचारक होते. **नांदेडचे गुरुबंधू नामदेव नेमाडे** यांना भक्तिप्रेमाचें अत्यंत आकर्षण असल्यामुळें त्यांनीं घरदार, लेकी, सुना सुद्धां सर्वांना महाराजांचा अनुग्रह घेण्याची संधि त्यांनीं दिली आहे !

**कडगांवकर भक्त मंडळींत** पीतांबर पाटील, चावदस पाटील, रूपचंद पाटील, कै. पुरुषोत्तमशेट व कुलकर्णी इत्यादि चांगलीं कार्यें करणारे भक्त झाले. या सर्व ठिकाणची भक्त मंडळी प्रत्येक उत्सवास येऊन सेवाकार्याची पराकाष्ठा करतात ! लहानमोठ्या उत्सवास, महाराजांनीं ठरवून दिल्याप्रमाणें पालखी, टिपऱ्या, भजन, आरती, धुपारती इत्यादि सर्व प्रकारच्या कार्यक्रमांत उत्साहानें भाग घेऊन

सर्वच भक्त मंडळी सेवा करीत असतात. जुबिलीचा भाद्रपद संकष्टीचा उत्सव साजरा झाला तोंपर्यंत मठींत बाया माणसें रहाण्याचा शिरस्ता नव्हता. केव्हां केव्हां महाराजांच्या वडील सूनबाई सौ. माई ( श्री. अण्णा महाराजांच्या सहधर्मचारिणी ) मठींत रहात. जुबिलीच्या वर्षी आम्हां सर्व भक्तांच्या आग्रहावरून महाराजांच्या पत्नी सौ. कमलाबाई आईसाहेब प्रथमच कुरुंदवाडहून भडगांवास आल्या. नंतर मात्र सौ. आईसाहेब व सौ. माई मठींत कायमच्या राहूं लागल्या. अशा रीतीनें मठीच्या उत्सवसमारंभांत अन्नपूर्णेची भर पडून उत्सवांना फारच चांगलें वळण लागलें आणि स्त्री-भक्तांची विशेष सोय होऊं लागली.

## उत्सवांतील कार्यक्रमांची महाराजांनीं केलेली व्यवस्था

प्रत्येक उत्सवांतील व नेहमींचे कार्यक्रम महाराजांनीं ठरवून दिले होते. आंतील आणि बाहेरील श्री दत्ता समोर आरती, पालखी काढण्याचे दिवस, दर गुरुवारीं म्हणावयाचे अभंग व पदें, अष्टकें, शेजारती महाराजांनीं ठरवून दिलेल्या शिस्तीनें अजूनहि चालतात. महाराजांनीं सुरू केलेले उत्सवहि तसेच चालू ठेवण्यांत आले आहेत. इतकेंच नव्हे तर हे उत्सव पूर्वीपेक्षाहि मोठ्या प्रमाणानें आणि उत्साहानें पार पडतात. महाराजांच्या योजनेप्रमाणें सर्व उत्सव थाटानें चालू ठेवण्याचें श्रेय श्री. अण्णा महाराजांना आहे.

महाराजांचे वेदांता विषयींचें ज्ञान आणि ते सोपें करून सांगण्याची हातोटी खरोखर अलौकिक होती. "काम, क्रोध, लोभ या तीन्हीहि शत्रूंना जिंका मग जगांत कोठेंहि तुम्हांला धोका नाहीं." असें ते शिष्यांना सांगत. श्री. परशराम मास्तर व श्रीमती लक्ष्मीबाई केळकर अशा काहीं थोड्या जाणकारांखेरीज महाराजांचे बहुसंख्य भक्त व शिष्य अजाण होते. तरी देखील भक्त व शिष्य परिपूर्ण होते व आहेत. महाराजांच्या बोधामृताचीं मुळें सर्वव्यापी ठरून भक्तांच्या अंतःकरणांत शिरलीं. आणि सर्वांचेंच कल्याण झाल्याचें दाखले सर्वत्र दिसतात!

उत्सवप्रसंगी पालखी काढून शृंगारण्याची कामगिरी माझेकडे होती. श्री दत्त जयंतीच्या उत्सवांत चंपाषष्टी ते मार्गशीर्ष वद्य प्रतिपदेपर्यंत तसेंच आश्विन शुद्ध १० ( दसरा ) या दिवशीं गावांबाहेर सीमोल्लंघनास देवाची पालखी नेण्यांत येते. गुरुप्रतिपदा, गुरुद्वादशी व गुरुपौर्णिमा या दिवशींहि पालखी निघण्याचा प्रघात आहे. या समारंभासाठीं अनेक भक्त अनेक ठिकाणाहून येतात.

## नांदेडच्या चौधरी वकीलांना अनुग्रह

एका उत्सवप्रसंगीं नांदेडचे प्रख्यात चौधरी वकील यांनीं महाराजांशीं अध्यात्म विषयावर तीन दिवस चर्चा केली आणि अखेर महाराजांना म्हणाले, "मला तुमचा अनुग्रह द्या, अनुग्रहास काय सामान लागते?" महाराजांनीं उत्तर दिलें "अनुग्रह घ्यावयास तयार झालेला एक भक्त लागतो! सामान वगैरे कांहीं लागत नाहीं!" श्री. चौधरी वकिलांच्या सर्व शंकांचें निरसन झाल्यावरच त्यांनीं अनुग्रह घेतला.

## महाराजांना फळांच्या भेटी

महाराजांच्या दर्शनासाठीं व भेटीसाठीं मुंबईहून दर पंधरा दिवसांनीं अनेक भक्त भेटीस येत. रक्तदाबाचा विकार जडल्यामुळें ६० वर्षांच्या समारंभानंतर महाराज मुख्यतः फलाहारावरच भूक भागवीत. अखेरच्या दिवसांत महाराज दिगंबर दीक्षेनें राहूं लागले. मठींत सगळीकडे पडदे लावण्यांत आले. धुमी-शिवाय कोठेंहि दुसऱ्या जागीं महाराज बसत नसत. त्यावेळीं मला जाणीव झाली कीं 'महाराजांची ही दिगंबर दीक्षा आहे.' परगांवीं जावें लागलें तर प्रवासांत ते वरून फक्त कफनी धारण करीत. मठींत आल्यावर फिरून दिगंबर वृत्तीनें असत. आहार पुढें अजिबात बंद झाला. दिवसां फक्त २–३ फळांवरच रहात. मात्र रात्रं-दिवस आलेल्या भक्तांशीं ज्ञानचर्चा करीत.

## महाराजांबरोबर प्रवासयात्रा

१९३८ सालीं सेप्टेंबर ऑक्टोबरचे सुमारास महाराज भडगांवहून स्वतःचे मोटारीनें पंढरपूरकडे निघाले. बरोबर श्री. अण्णा महाराज, सौ. आईसाहेब, सौ. माईसाहेब, सौ. दातार (डी. एस. पी. पांडुरंग मो. दातार–तात्या–यांच्या प्रथम पत्नी), अण्णांचा वडील मुलगा चि. बालमुकुंद (बाळ) आणि रामदास गुरव (मी स्वतः) इतकी मंडळी होतों. पंढरपुराहून आम्हीं शिंगणापूरचे महादेवास गेलों, तेथून श्री. पांडुतात्यांचे फौजदारी नोकरीचे गांवीं दहिवडे मुक्कामीं दिवाळीचे अगोदर पोचलों, तेथें ४–५ दिवस राहून तेथून मिरज, सांगली, कुरुंदवाड करून बेळगांव बाळेकुंद्रीकडे गेलों. नंतर बाळेकुन्द्रीचा उत्सव साधून पारसवाड (सद्गुरु बालमुकुंदाचा गाव) येथें गेलों. इतकी यात्रा केल्यावर महाराजांचे जांवई श्री. द. कृ. देवधर यांचेकडे आग्रा व्हॅली पॉवर पैकीं मिवपुरीस सर्व मंडळी गेली.

## महाराजांची शेवटची तीर्थस्थान-यात्रा, बरोबर संभाळण्यास श्री. परशरामशेट वाणी

१९३८ ची तीर्थयात्रा श्री. परशरामशेट वाणी यांच्याबरोबर महाराजांची शेवटची पुण्यक्षेत्र-यात्रा झाली. परशरामशेट यावेळी महाराजांची सर्व तऱ्हांनीं सेवा करीत. त्यांना रोज स्नान घालणें, त्यांची बैठकीची व शेजेची जागा साफ करणें, बिछाना टाकून त्यांना झोंपविणें, त्यांची पिकदाणी साफ करणे इत्यादि सर्व सेवा परशरामशेट उत्तम प्रकारें करीत. या सेवापरायणतेचें फळहि परशरामशेटना उत्तम प्रकारें मिळाल्याचा अनुभव आहे. या सालची दिवाळी मुंबईस श्री नावलकर यांचेकडे झाली.

## महाराजांचें सत्कार्य

महाराजांनीं मुख्यतः कीर्तनांत मिळालेली बहुतेक सर्व मिळकत श्री अवधूत मठी उभारण्यांत खर्च केली. उत्सवाचा खर्चहि महाराज स्वतःच करीत. मठी बांधण्यांत स्वतः मेहनत फार घेतली. इतरांचें सहाय्य बेताचेंच असे. सद्गुरु पंत महाराज बाळेकुंद्रीकर यांचेवर श्री अवधूत महाराजांची आत्यंतिक निष्ठा होती तशी क्वचितच इतरांची आढळून येते ! प्रत्येक गोष्टीचा महाराज बारकाईनें विचार करीत.

## पैशाचे व्यवहारांत महाराज बेफिकीर !

पैशाचे व्यवहारांत गुरुमहाराज स्वभावानेंच बेफिकीर होते. त्यांना खर्चाचें भान रहात नसे ! एकदां एका गुरुपुत्राला, शेतांत भुईमुगाची बी पेरणी करण्याकरितां, माझ्या सांगण्यावरून महाराजांनीं दहा रुपये दिले. पीक काढल्यावर त्या शिष्यभक्तानें दहा रुपये परत आणले. आम्ही दोघेजण महाराजांना ते दहा रुपये देण्यास गेलों. पण महाराज ते रुपये घेईनात ! ते म्हणाले "मी पैसे दिल्याचें आठवत नसल्यामुळें मीं हे रुपये घेणार नाहीं !" पण मी पैसे या शिष्याला दिल्याचें पाहिलें असें आग्रहपूर्वक सांगितल्यावर माझ्या आग्रहावरून महाराजांनीं ते १० रु. हातीं घेतले आणि श्री. मेघःश्याम बांबवडेकर यांना बोलावून ते १० रु. परत त्या शिष्याचे घरीं पोचते करून निरोप पाठविला "मी हे पैसे परत घेण्यासाठीं तुला दिले नसून तूंच ठेव आणि यापुढें तुला संसार–परमार्थात कांहीं कमी पडणार नाहीं !" ही हकीगत मला नंतर समजली ! खरोखरच त्याचा संसार–परमार्थ आतां ठीक चालला आहे.

अखेर अखेर महाराजांचें जीवन आत्मज्ञान विचारांनींच भारलेलें व भरलेलें असे. अखेर ऐहिक व्यवहाराचें स्मरणहि त्यांना राहिनासें झालें !

८

## महाराजांचें चरित्र प्रसिद्ध करण्याचा ध्यास श्री. मेघःशाम बुवांनीं अत्यत कष्ट केले !

सातारा जिल्ह्यातील श्री. मेघःशामबुवा बांनवडेकर यांनीं महाराजांच्या आग्रहावरून भगवे घेतलें व ते कीर्तनेंहि करूं लागले. त्यांनीं महाराजांच्याविषयीं चरित्राकरितां आठवणी देण्यासाठीं अनेक शिष्यांना जोराची जागृति देऊन आग्रहहि केला. सातारा जिल्हा, बेळगांव आणि खानदेश जिल्हा या ठिकाणच्या सर्व भक्तांकडे व शिष्यांकडे जाऊन मेघःशाम बुवांनीं अनेक प्रकारचे कष्ट व विरोधहि सोसून आठवणी लिहून चरित्राचे संपादक श्री. ताम्हनकर याचेकडे दिल्या आणि महाराजांच्या चरित्रासाठीं भरपूर माहितीचा पुरवठा केला यांचें मोठेंच श्रेय त्यांना आहे.

## बाळेकुंद्री संस्थानतर्फे अवधूत महाराजांना धन्यवाद !

बळेकुंद्री संस्थानचे श्री. भाऊसाहेब यानीं पंतबधूंच्या वतीनें—अवधूत महाराज—तथा मोरेश्वर कशव दातार—यांच्या विषयीं पुढील आशयाचे उद्गार काढल्याचें प्रस्तुत आठवणी देणाऱ्यानें (मी) स्वतःच्या कानांनीं ऐकले ते पुढाल प्रमाणेः—"श्रीपत महाराज बाळेकुंद्रीकर याच्या शिष्य वर्गापैकीं श्री. मोरेश्वर केशव दातार ऊर्फ अवधूतमहाराज यांनीं कीर्तनें करून सर्वत्र पंतांच्या अवधूत पंथाचा थोर प्रचार केला आणि श्रीपंत महाराजांचें नांव असंख्य भक्तांच्या परिचयाचे केलें ! असें अ-तिम प्रचारकार्य फक्त मोरोबाच करूं जाणे !"

## महाराजांना विश्रांतीसाठीं दादाजी धाकजींकडून मदत श्री. अण्णा महाराजावर मठाच्या कार्याचा जबाबदारी

महाराज उतारवयांत अत्यंत थकलेले पाहून दादाजी धाकजी कंपनीचे चालक-मालक श्रीमत मुकुंदराव राणे यानीं महाराजाना विश्रांतीचा आग्रह करून त्याकरितां दरमहा ५० रुपये देण्याचे ठरविलें. महाराजांनी भडगांवी मठींत विश्रांतीसाठीं रहावें आणि त्यांचे चिरंजीव श्री अण्णा महाराज यांनीं भडगांव श्री दत्तमंदिराचा सर्व प्रकारचा भार आपल्या शिरावर घ्यावा, असें त्यांनीं ठरविलें. श्री मुकुंदराव राणे याची ही दरमहाची ५० रु. ची मदत महाराजांना समाधि घेतली तेथ पर्यंत चालू राहिली.

## श्री अण्णा महाराजांना अनुग्रह देण्याची आज्ञा

अखेर साधक भक्ताना अनुग्रह देण्याची आग्रहाची आज्ञा महाराजांनीं श्री अण्णा महाराजांना केली. महाराजानीं अखेरपर्यंत नित्य भजन व नामस्मरण सतत चालू ठेविलें होते. अखेर अखेर महाराजांचे रक्तदाबाचें दुखणें बळावलें होतें.

## समाधीच्या रात्रींपर्यंत जागृति

१९३९ सालच्या चैत्र पाडव्याचा दिवस उजाडला. महाराज सकाळीं मला म्हणाले " अरे आज वर्ष प्रतिपदा, आज पालखी काढून सजव बरं. मी त्याप्रमाणें केलें. वर्ष प्रतिपदे दिवशीं पालखी काढण्याचा तोंपर्यंत शिरस्ता नव्हता! तीन प्रहरीं १–३ पर्यंत महाराजांच्या आज्ञेप्रमाणें पालखी सजवून तयार केली. त्यांच्याच सूचनेप्रमाणें गांवांतील सर्व भक्त व शिष्य मंडळींना रात्रीं ८–९ चे दरम्यान पालखीसाठीं हजर राहण्याचें निमंत्रणहि देऊन आलों. रात्रीं महाराजांच्याच सूचनेप्रमाणें गोंडे वगैरे लावून पालखीची सजावट पूर्ण केली. मग महाराज मला म्हणाले, " पंत महालांत माझा बसायचा झोपाळा आहे तो खालीं आणून देवाच्या अधिष्ठानासमोर लावून ठेव " त्याप्रमाणें सर्व व्यवस्था मी केली. पालखी चालू झाल्यावर महाराजांनीं पालखीपुढें आम्हां भक्त मंडळींत येऊन एक पदहि म्हटलें! मग ते झोपाळयावर जाऊन बसले. १२॥ चे सुमारास पालखीचा कार्यक्रम आटोपल्यावर जमलेल्या सर्व भक्तांना महाराजांनीं आपल्या हातानें प्रसाद देऊन सांगितलें, " आतां सर्वजण आपापल्या घरीं जाऊन झोंपा. यावेळीं श्री. परशराम (वाणी) मास्तर यांचेकडून निजण्याचे जागी महाराजांनीं कंबर पाय ठीक चेपून देण्याची अखेर सेवा करवून घेऊन निरोप दिला. महाराजांच्या आज्ञेप्रमाणें सर्व भक्तमंडळी घरोघर गेल्यानतर अर्ध्याच तासानें 'महाराज समाधिस्थ झाले;' अशी सर्वांना दुःखाचा धक्का देणारी दुष्ट बातमी गांवभर पसरली! मठींतील तो तेजस्वी ज्ञानदीप अशा प्रकारें अकस्मात् मावळला! आम्हां सर्व भक्ताची प्रेमळ माऊली आम्हाला सोडून गेली! त्याचप्रसंगी श्री. अण्णा महाराज भडगांव मठीपासून मुंबई उपनगर चेंबूर येथें रामजन्म कीर्तनासाठीं गेले होते!

श्री. अण्णामहाराजांना तावडतोब भडगांवीं येण्यासाठीं तार केली त्याचप्रमाणे श्री. तात्या, अनंतकाका, यांनाहि कळविलें. मुंबई जळगांव, नांदेड, पुणें इत्यादि सर्व ठिकाणच्या भक्तांनाहि तारा करून कळविलें. गावांतील सर्व जमातीचे स्त्री-पुरुष महाराजांच्या अंत्य दर्शनासाठीं जमा झाले. श्री. अण्णा, अनंतराव भडगांवास दुसऱ्या दिवशीं रात्रीं येऊन पोंचले. श्री. सहस्रबुद्धे दादांनीं सर्वांना स्टेशनवरून भडगावीं आणलें. दुसरे दिवशीं सकाळपर्यंत ठिकठिकाणची भक्तमंडळीहि जमली.

## अंत्ययात्रेची मिरवणूक : गिरणा नदीतीरावरील मंत्राग्नि

मठींतून महाराजांच्या पार्थिव देहाची मिरवणूक गांवांतून काढून गिरणा नदीच्या तीराकाठीं महादेवाचे मंदिरानजिक नेण्यांत आली. मिरवणुकी बरोबर

भजनी मंडळीच्या टाळ मृदंगादींचा गजर व महाराजांचा जयजयकार चालू होता ! अखेर चंदनाची चिता रचून तीवर महाराजांचा पार्थिव देह ठेवून मंत्राग्नि देण्यात आला. आत्मज्ञानाचा खजिना आणि भाविक भक्तांची कामधेनु ठरलेला एक सत्पुरुष स्वरूपी हिरा पार्थिव देहरूपानें हरपला !

## समाधीनंतरचे महाराजांचे साक्षात्कार !

महाराजांच्या साक्षात्कारांचे अनुभव अनेकांना दृष्टांतानें आल्याचे दाखले आहेत. महाराजांचे सर्व भक्त व शिष्य सुखानें संसार परमार्थरूपानें त्यांच्याच शिकवणीप्रमाणे चालवीत आहेत. उत्सवांना भक्तांची गर्दी वाढतच आहे. महाराज अद्याप मठींतच आहेत, अशीं सर्व भाविक भक्तांची भावना आहे ! मठींतील सर्व कार्यक्रम महाराजांचे हयातींत चालत तसेच आतांहि चालू आहेत. हीच महाराजांच्या साक्षात्काराची खूण होय. रेशनिंगच्या जमान्यांत साखर, गहू, गूळ इत्यादि अत्यावश्यक पदार्थांवर नियंत्रण असूनहि मठींतील उत्सव पूर्वींच्यापेक्षांहि जास्त आस्थेनें व उत्साहानें चालू आहेत. गुरुपुत्र कितीहि संख्यांनीं आले तरी केव्हांहि तुटवडा भासत नाहीं ! सद्‌गुरूंच्या साक्षात्काराची आणखी कसली खूण पाहिजे ! अन्नपूर्णेचा श्री दत्त भडगांव मठीवर जणु वरदहस्तच आहे, असें वाटतें ! ज्या गुरुमाउलीनें आम्हां अजाण भाविकांना पावन केलें त्या सद्‌गुरूंचे गुणानुवाद गाण्यासाठीं शब्दच अपुरे पडतात !

म्हणून परमेश्वराकडे माझी एकच मागणी ही कीं :—

‘ जन्मोजन्मीं ऐसा सद्‌गुरु मिळावा ’

येवढीच मागणी मागून या आठवणी पूर्ण करतों.

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. १३

लेखक : श्री. श्रीपाद दत्तात्रय पराडकर, मुक्काम भडगांव अवधूत मठी.
(श्री सद्गुरूंचा आवडता निजभक्त.)

### स्वतःविषयीं प्रास्ताविक माहिती

माझा जन्म इ. स. १९०० माघ शु. नवमीस रत्नागिरी जिल्हा, तालुका राजापूर येथें झाला. वयाच्या १२ व्या वर्षीच वडील देवाघरीं गेले. माझें प्राथमिक शिक्षण ६ वी पर्यंत व इंग्लिश शिक्षणहि सहावी पर्यंत झालें. (म्हणजे आतांची दहावी) वडील लहानपणींच गेल्यामुळें देवरूखचे कै. जगन्नाथ दत्तात्रय कुळकर्णी यांच्या आश्रयानेंच इथपर्यंत शिक्षण होऊं शकलें. ते राजापूर हायस्कूलचे हेडमास्तर असल्यामुळें आणि अंतःकरणाचे उदार असल्यामुळें 'होतकरू गरीब मुलगा' हें जाणूनच त्यांनीं माझ्या शिक्षणाचा भार उचलला. माझे पिताजी दत्तात्रय महादेव पराडकर हे देवभक्त व वेदशास्त्रसंपन्न होते. माझ्या मातुश्रीहि पतीच्या या धर्मवृत्तींत सहधर्मिणी होत्या. यामुळें उभयतांचा संसार गरीबीतहि शांति-समाधानाचा होता. श्री. ज. द. कुळकर्णी हेडमास्तर यांना या समाधानी गरीब कुटुंबाला स्नेह लाभल्यामुळेंच त्यांनी माझ्या शिक्षणाचा भार स्वयंस्फूर्तीनें उचलला होता. त्यांनीं मुंबईनजीक माझ्या शिक्षणाची गरीबीच्या मानानें उत्तम सोय लावून दिली होती. पनवेलकरांच्या दवाखान्याचे मॅनेजर जगन्नाथपंत घुगरे यांचेकडे कंपाउंडर म्हणून काम करून रात्रींच्या इंग्रजी शाळेंत शिकावें, अशी ही व्यवस्था होती. पण ८ महिने असे शिक्षण चालल्यानंतर लौकरच श्री. घुगरे हेहि देवाघरीं गेले! दुर्दैवानें आधार तुटल्यामुळें मला मुंबईस 'किंग अँड किंग' कंपनींत क्लॉर्क म्हणून नोकरी धरावी लागली. पण तब्येतीला मुंबईची हवा मानवत नसल्यामुळें धरसोड करीत कशीबशी ही नोकरी चालविली. अखेर १९२१ मध्यें नोकरींतून मुक्त झालों. 'आतां पुढें काय?' हा विचार पुढें उभा राहिला! घरीं मातुश्रीला उदरनिर्वाहाकरितां कांहीं तरी कसे पाठविणार?

## सद्‌गुरुची भेट

अशा चिंताग्रस्त मनस्थितीतच वडील-मातुश्रींच्या पुण्याईनेंच भावी सद्‌गुरुंची भेट होण्याचा योग आला! याच सुमारास श्रीगुरु श्रीअवधूत महाराज कुरुदवाडकर यांचा मुक्काम मुंबईत कांदेवाडीत होता. या कीर्तन-श्रवणाच्या नादानेंच श्रीसद्‌गुरुमाउलीची भेट झाली.

कीर्तन श्रवण-शास्त्राध्ययन व दत्तभक्तीची वंशपरंपरेनें आवड असल्यामुळें मी परमेश्वराला वारंवार विनवी कीं 'देवा, मला कल्याण मार्गदर्शक गुरुची भेट घडेव' अनेक साधुसंताच्या गांठीभेटी घेऊन व प्रश्नोत्तरें ऐकूनहि समाधान झालें नव्हतें.

एका रात्रीं ८ चे सुमारास रहात्या जागेंतून बाहेर पडून ठाकुद्वारच्या काळा-राम मंदिराजवळ लोकांची खूपच गर्दी देवळाच्या आंत-बाहेर दिसली. चौकशी अंतीं समजलें कीं मंदिरांत कुरुदवाडचे ह. भ. प. श्री मोरेश्वर केशव दातार उर्फ नामांकित अवधूत महाराज याचें कीर्तन चालू आहे.

कीर्तन प्रेमी लोकांची खूपच गर्दी असल्यामुळें आंत जाऊन महाराजांचें दर्शन घेतां आलें नाहीं. दुरूनच चार शब्द ऐकून रहात्या जागीं गेलों. दुसऱ्या दिवशी मात्र कीर्तनाला सुरवात होण्याचे अगोदरच आंत जाऊन बसलों! दीड तास कीर्तन झालें. बोध ऐकून फार आनंद झाला. याच ठिकाणी महाराजांच्या सहवासांतील दगडूवाणी याचेकडून महाराजांचें उतरण्याचे ठिकाण अनुग्रह देतात का? वगैरे माहिती विचारुन घेतली. त्याने सांगितलेल्या माहिती प्रमाणें ठरलेल्या वेळीं कांदेवाडींतील बिऱ्हाडी जाऊन मी महाराजांना भेटलो व त्यांना मनोगत सांगितलें. महाराजानी मजवर पूर्ण कृपा करून मला आपला 'अनादिसिद्ध' अवधूत संप्रदाय दिला व माझ्या जन्माचें सार्थक्य झालेसें मला वाटलें. त्या स्थितीचे वर्णन शब्दांनी करता येण्यासारखें नाहीं. माझा मी पणा नष्ट होऊन आपणच सर्वत्र भरून उरलो अशी भावना झाली!

## पुजारी म्हणून श्री दत्तमंदिरांत रहाण्याची सूचना

नंतर महाराजांनीं दिलेल्या तारक मंत्राचा जप करीत मी रहात्या जागीं गेलों. मग दररोज महाराजांचे जागीं जाऊन ब्रह्मचर्चा ऐकण्याचा क्रम चालू ठेविला. परंतु तेवढ्यानें समाधान होईना. जन्माचें सार्थक्य करणाऱ्या गुरुमातेची कांहींना-कांहीं सेवा घडावी असें मनात सतत विचार येत. त्याचेकडे जाणे व चर्चा ऐकणे मात्र सतत चालू ठेविलें. एक दिवस महाराजानी माझी नावगांवासह चौकशी

करून परिस्थिति समजून घेतली. तेव्हां महाराजांनीं मला सांगितले कीं, " मीं श्रीदत्त मंदिर बांधण्यासाठीं जागा घेतली आहे. मंदिरांतील मूर्तीच्या नित्य पूजे-अर्चें करतां व उत्सवांतील विशेष कार्यक्रमासाठीं आम्हांला एक ब्राह्मण ठेवावयाचा आहे. तुझी हें काम करण्याची इच्छा असल्यास विचार करून सांग. तुझ्या मातुश्रींना घेऊन तेथें आलास तरी चालेल ! "

मी लगेच उत्तर दिलें " मी भडगांवला देव पूजेस रहाण्यास तयार आहे. तन–मन–धन आपल्या चरणीं अर्पून आपणा रहित झालों आहे. आपण काल कीर्तनांत म्हणालांत ॥ "गुरु प्रेमास्तव राहूं आतां। ध्यानीं धरूं गुरु बालावधूता॥ माझी तशीच स्थिती झाली आहे ! आपल्यावाचून या जगांत मला कोणीहि नाहीं.

" तूंचि माझी माता। तूंचि माझा पिता। तूंचि निवारिता। जाऊं कोठें ! " असें म्हणून मी गुरु माउलीचे पाय धरिले. तेव्हां माझ्या पाठीवरून हात फिरवून माझी गुरुमाऊली म्हणाली " श्रपाद उठून बैस, तूं माझाच आहेस व मीहि तुझा आहे. "

त्या दिवशीं मला गुरुमाऊलीनें आपल्या जागींच ठेवून घेतले. मीहि मिळेल ती सेवा करीत तेथें राहिलों. दोन दिवसांनीं महाराज म्हणाले " श्रपाद तूं आमचे बरोबर भडगांवला येणार म्हणतोस, पण तो खेडेगाव, तुझ्या नात्यागोत्याचे आसपासे कोणी नाहीं. करमणुकीचीं साधनें नाहीत या सर्व गोष्टींचा आधीच विचार केला पाहिजे. आमचे बरोबरील दगडूला उद्यां भडगांवास पाठविणार आहे. त्याचेबरोबर जाऊन तूं सर्व परिस्थिति पहा आणि तुला सर्व पसंत असल्यास मग मातुश्रीला घेऊन ये. " 'ही माझी परिक्षेची वेळ' असें समजून मी दगडूबरोबर जाण्यास कबूल झालों. दुसरें दिवशींच मी व दगडू मुंबई सोडून भडगांवला आलों. तेथील वातावरण पाहून मला फार आनंद झाला. सुखरूप पोचल्याचें महाराजांना लगेच पत्र पाठविलें. सकाळी उठून झाडलोट, स्नान, पंतमहाराजांच्या फोटोची पूजा व स्वतः स्वयंपाक करून जेवणें, अशा कार्यक्रमांत १५ दिवस जलद गेले. नंतर महाराजांना पत्र लिहिलें " मला सर्व पसंत आहे, मी कोकणांत जाऊन मातुश्रींना घेऊन येतों " माझ्या पत्राचे उत्तरांत महाराजांनीं लिहिलें " मुंबईस येऊन मला भेट आणि मग पुढें मातुश्रींना आणण्यास जा " नंतर मुंबईस महाराजांना भेटून एक दिवस मुक्काम करून मी दुसऱ्याच दिवशीं मातुश्रींना घेऊन येण्यास निघालों. आईला माझ्या भेटीने आनंद झाला. मी तिला नेण्यास कां आलों, हें समजल्यावर

तीं अतिशय आनंदीत झाली! येण्याचें कारण सांगितल्यावर तिने होकार तर दिलाच व म्हणाली, "मलाहि दत्तभक्तिप्रेमाची आवड आहे. तुझ्या बोलण्यावरून तुझ्या जन्माचें सार्थक्य झालेसें मला वाटतें. माझ्याहि जन्माचें तसेंच सार्थक्य व्हावे अशी इच्छा आहे."

## कर्मणा गहनो गतिः

नंतर ४–५ दिवस गांवी राहून थेट भडगांवला आलो. त्यावेळीं महाराज कुरुंदवाडास गेले होते. भडगांवास आम्ही सुखरूप पोचल्याचें महाराजांना पत्र पाठविलें. पण 'कर्मणा गहनो गतिः' म्हणतात तशी स्थिति झाली! वैशाखांतील कडक-उन्हाळ्यामुळें आम्हां उभयतांच्या तब्येती बिघडल्या! भडगांवांतील लोक मठींत येऊन आम्हांला वेडेवांकडे बोलले, तेव्हां फार वाईट वाटलें! गुरुमहाराज केव्हां येतात असें एकसारखें वाटूं लागलें! अखेर महाराज येणार असल्याचा दिवस समजला. गांवाबाहेरच त्यांना भेटून मीं आमची स्थिति त्यांना सांगितली. मठींत आल्यावर महाराजांनीं जवळ येऊन आमच्या तब्येतींची विचारपूस केली. गांवचे निंदक मध्येंच तोंड घालून निंदा करूं लागले! 'ही ब्याद् आतांचे आतांच घालवून द्या!' असेंहि कांहींनीं सुचविलें. हें निमूटपणे ऐकून घेणेंच माझ्या त्यावेळीं नशीबी होतें! पण गुरुमहाराजांनीं या लोकांच्या निंदेकडे लक्ष न देतां आंत जाऊन विभुती आणली व माझ्या आणि आईच्या कपाळास लावली. मग वरदहस्त होऊन म्हणाले, "श्रीपाद घाबरू नकोस तुला व तुझ्या आईला आतां बरें वाटेल.' त्यामुळें मनाला हुशारी वाटून लोकनिंदेचा विसर पडला! नंतर महाराज म्हणाले, 'तुम्हां दोघांना इकडील उन्हाळा बाधला आहे. तरी भिऊं नको. थोडे दिवस थंड हवेंत रहाणेस जा मग उभयतां परत या.' त्याप्रमाणें परत गांवीं जाणेचे ठरविलें. जातांना महाराजांनीं आपला फोटो पूजेस दिला.

## नरसोबावाडीस कांहीं दिवस

मग महाराजांची आज्ञा घेऊन आम्हीं गांवीं जाण्यास निघालों. वाटेंत आई म्हणाली, "आतां थोडें बरें वाटत असल्यामुळें जातांना नरसोबावाडीस श्रीदत्त दर्शन घेऊन जाऊं" वाडीस गेल्यावर भटजींना भेटून देवाला अभिषेक करण्याची तयारी केली. नदींत स्नान करून ओला पिळा नेसून तपेली भरून देवदर्शनास व देवाला पाणी घालण्यास जाण्याची चाल तेथें आहे. आई स्नान करून वर गेल्यावर मीहि स्नानास गुडघाभर पाण्यांत उतरलों. पण बुचकळी मारतांना पाण्याच्या अफाट ओहटीमुळें मी खालीं वहात चाललों! कांहीं लोकांनीं हें पाहिल्यावर

अनेकांनीं पुरांत उड्या घेऊन मला वर काढले! मी तोंडांनी महाराजांचा 'तारक-मंत्र' म्हणत होतो, त्या प्रभावानेंच मी वाचलों असें वाटलें. देवाला पाणी घालणेची लोटी हातीं घट्ट धरलीच होती. लोकांची गर्दी माझ्या भोंवती जमलेली पाहून आई घाबरून रडूं लागली! मी तिचे समाधान करून म्हटलें, 'गुरुमहाराज माझी परिक्षा घेत आहेत त्यांतलाच आजचा अनुभव आहे!' भटजींनीं अभिषेक करून देवपूजा करून आम्हां दोघांना तीर्थप्रसाद दिला.

## आईसह राजापुरास

नंतर आम्ही दोघे देवदर्शन प्रसाद घेतल्यावर आमचे स्नेही श्री. दत्तोपंत कुळकर्णी यांचेकडे उतरलों. त्यांनीं माझी विचारपूस केल्यावर म्हणाले, "येथून कोठें जाऊं नकोस. माझी मोठी जमीन येथें आहे तीवर तूं देखरेख कर. तुम्हां दोघांना मी कांहीं कमी पडूं देणार नाहीं. माझ्या प्रामाणिकपणावर यांचा विश्वास होता. मी त्यांच्या म्हणण्याप्रमाणें कांहीं दिवस त्यांचेकडे राहिलों. पण कांहीं दिवसा-नंतर त्यांना वाटलें कीं, आतां आपलें वय झालें असल्यामुळें आपल्या पश्चात् या दोघांचे कसें होणार! म्हणून आईला घेऊन गांवीं जाण्याविषयीं त्यांनीं मला सुचविलें. त्याप्रमाणें आईला घेऊन माझ्या मूळ गावीं राजापुरास मी गेलों. गांवचे लोक मला आग्रहानें उपदेश करूं लागलें, "तूं नोकरी मिळवण्याइतपत शिकला आहेस, तेव्हां आतां वणवण फिरूं नकोस. जवळच नोकरी करून लग्न कर व आईस सांभाळून गांवांतच रहा" लोकांचा हा उपदेश व्यवहारी जगाच्या दृष्टीनें ठीक होता. पण 'चांगली तब्येत झाली की भडगांवला ये' ही गुरुमहाराजांची सूचना सदैव माझ्या हृदयांत होती. लोकांना हें सांगून काय उपयोग! थोडे दिवस गांवांत राहून मग गुरुमहाराजांकडे जावें असें ठरविलें. गांवांतील एका वकिलाचे हाता-खाली कारकून म्हणून ६ महिने नोकरीहि केली. गुरुमहाराजांचा फोटो देवांचे जागीं ठेवून पूजा व भजन चालू ठेविले. गावांत दर गुरुवारी देवळांतील भजनांतहि भाग घेत असे. घरीं पोंचल्यावर दुसऱ्याच दिवसापासून गुरुचरित्रहि दररोज वाचण्याचा क्रम ठेविला होता. पण तब्येत उत्तम झाल्यामुळें गुरुमहाराजांकडे जाण्याची तळमळ लागलीच होती! आईकडे जाण्याची आज्ञा मागतांच तिनें आनंदानें परवानगी दिली. जगांतील खऱ्या खोट्याचा अनुभव चार वर्षें घेण्यासाठींच जणु गुरुमहाराजांनीं मला इकडे ठेविलें.

## फिरून भडगांव

जाण्याचें ठरलें खरें पण भाड्याच्या खर्चाची तजवीज कशी करणार! माझ्यासारख्या 'खुळा' ठरलेल्याला गावांत कर्ज कोण देणार व मी तरी तें कसें

मागूं ! पण अखेर तोड अशी सुचली कीं देवाच्या पूजेची भांडी विकून भडगांव-पर्यंतच्या त्यावेळच्या भाड्याचे १० रु. उभे करावे. त्याप्रमाणें करून मी आईचा आशीर्वाद घेऊन भडगांवचा मार्ग धरला आणि तेथें जाऊन सुखरूप पोहोंचलोंहि. या ४ वर्षांत भडगांवांत बराच बदल झाला होता. पूर्वी पंतांच्या फोटोचें अधिष्ठान ठेवून त्यांचा जन्मकाळ होत असे. आतां भडगांव मठीचे बांधकाम होऊन श्रीदत्तमूर्तीची स्थापनाहि झाली होती ! आजूबाजूचें वैभव पाहून माझ्या मनाला फार आनंद झाला. परंतु यावेळीं महाराज भडगांवीं नव्हते, मुंबईस होते. यामुळें थोडें चुकल्या चुकल्यासारखें वाटलें ! ४ दिवसांनी महाराज भडगांवीं आले त्यावेळीं मी जवळ जाऊन दर्शन घेतलें. 'श्रीपाद, आलास बरें झालें ' असें बोलून ते लगेच उत्सवाच्या तयारीला लागले. चंपाषष्ठीपासून बाहेरील भक्तमंडळी उत्सवास येऊं लागली. श्रीदत्त जन्मोत्सव मोठ्या थाटांत पार पडला. उत्सव संपल्यावर मंडळी गांवोगांव जाऊं लागली तेव्हां उत्सवांत मला झालेल्या मोठ्या आनंदावर विरजण पडूं लागलेसें वाटलें ! सर्व मंडळी महाराजांचा निरोप घेऊन गेलीं तसेंच मीहि केलें पाहिजे काय, असें वाटूं लागलें. परतीच्या भाडे-खर्चाची चिंता डोक्यांत होतीच ! येताच्या भाडेखर्चापैकीं फक्त ८ आणेच जवळ होते ! मग 'उद्यांक मी पण गांवीं जातों' असें भीत भीत गुरुमहाराजांच्या जवळ जाऊन म्हटले ! 'कांहीं हरकत नाहीं' असें महाराजहि झटकन् बोलून गेले ! भाडे-खर्चाची चिंता इकूंच बोलल्यावर 'मी देईन तुला भाडे ' असेंहि म्हणाले ! पण दुसऱ्याच दिवशीं मला जवळ बोलावून महाराज बोलले, "श्रीपाद सध्यां तरी तूं येथेंच रहा. मी मुंबईस जाऊन येणार आहे. मी परत आल्यावर मग तुझ्या जाण्याचा विचार करू" मला तरी हेंच हवें होतें ! महाराज फिरतीला गेल्यावर, सकाळीं लवकर उठून स्नानसंध्यादि उरकल्यावर देवपूजा आरती वगैरे नित्यक्रम चालू ठेविला.

परत आल्यावर माझा व्यवस्थित कार्यक्रम पाहून महाराज म्हणाले, "श्रीपाद, तू आतां येथेंच रहा, मला सोडून जाऊं नको. तुझ्या मातोश्रीस खर्चास पाठवीत जा " मातोश्रीचे पत्र आलेलें पाहून महाराजांनीं तिच्या खर्चासाठीहि पैसे पाठविणेंस मजजवळ दिलें !

× × × ×

## स्वानंदवासाचे अगोदर चार दिवस महाराजांचा उपदेश

मध्यंतरी मी कोंकणांत गेलों होतों तो महाराजांच्या स्वानंदवासाचे वेळीं त्यांच्या पत्राप्रमाणें भडगावला येऊन गुरुमहाराजाना भेटलों. त्यावेळी त्यानी मला इतकेंच सांगितले कीं श्रीपाद 'तू आतां येथेंच राहून पुजेची वगैरे सर्व

जबाबदारी सांभाळावीस.' अशा अनेक प्रेमाच्या गोष्टी सांगत असता माझे-बद्दल गैरसमज करून गुरुमहाराज यांना हवे तें सांगणारे लोक त्यावेळीं हजर होते. त्यांनी केलेली आज्ञा व माझेविषयी असलेले प्रेम पाहून खिन्न मुद्रेने मान खाली घालून ते निमूटपणे निघून गेले.

माझेवर परम पूज्य गुरुमहाराजांचे किती प्रेम आहे, हें सर्वांचे लक्षांत आले. गुरुमहाराज शेवटचा आदेश देत असलेचे माझे मुळीच लक्षांत आले नाहीं! जाणचे चार दिवस अगोदरच मला आपले खोलींत बोलावून इतकेच सांगितलें, "तू इथून कोठें जाऊं नकोस. तूं इथून जें कांहीं साध्य केलेंस तें इतरांचे हातून घडलें नाहीं. तुझी सर्व कांहीं जबाबदारी श्री अवधूतावर आहे. त्याला अखंड स्मरत जा."

## पाडव्याचें दिवशीं

अशाप्रकारे चार दिवस बोलत होते. पाडव्याचे दिवशी सकाळी ८ वाजतां मला जवळ बोलावून महाराजांनी १२ वार कापड दिले. "हें कापड घेऊन यांचे सदरे शिवून आजच घालावेस" असें म्हणाले, त्याप्रमाणे मी तें कापड घेतले व ४ सदरें संध्याकाळी पांच वाजतां आणले. लगेच त्यांतील एक सदरा घालणेस सांगतांच मी एक सदरा अंगात घालून व त्यांना नमस्कार करून त्यांचेपुढें उभा राहिलों. त्यावेळीं मोठ्या प्रेमानें माझेकडे पहात हंसलेचे आठवतें! नंतर मी भजन आरती करुन सद्गुरूंच्या आज्ञेप्रमाणें पाडवा म्हणून पालखी काढणेच्या तयारीला लागलों. त्याप्रमाणें भजन, आरती झालेनंतर नियमित वेळेस महाराज याचेसह आमचे जेवण आटोपलें. रात्रीं ९ वाजलेनंतर पालखीचे सेवेकरी मंदिरांत येऊ लागले. सर्व सेवेकरी आलेनंतर पालखी मोठ्या थाटानें काढली! महाराज पालखीचे पुढे कधींहि उभे रहात नसत; परंतु त्या दिवशीं पालखीपुढें हात जोडून प्रदक्षिणा काढून आरती झाले-नंतर पुढील मंडपांत बैठकीवर येऊन बसले व भक्त मंडळींना सांगितलें कीं आज शेजारती करू नये. इतकें बोलून सर्व भक्तमंडळांना प्रसाद देतांच हळुहळू सर्वजण त्यांना वंदन करून निघून गेले.

## गोड प्रसाद! गोड आशीर्वाद!!

सर्वांचे मागून मी प्रसाद घेणेस गेलों. त्यावेळीं म्हणाले, "श्रीपाद, या ठिकाणीं कोणत्याहि भावनेचा भक्त असो अथवा अभक्त असो,

येऊन गेलेत त्यांना गोड प्रसाद देऊन त्यांचे तोंड गोड कर. तुला प्रसादाची जरूरीच नाहीं. तूं मूळचाच गोड आहेस. असाच गोड रहा. हा माझा तुला शेवटचा आशिर्वाद. तरीपण हा प्रसाद घे म्हणजे तुझे अंतरीं अधिकच गोडी निर्माण होईल." इतके बोलून महाराजांनीं मला प्रसाद दिला! त्यांना त्याचवेळीं शेवटचा प्रणाम करून ते ज्या खोलीमध्यें झोपत असत तेथे जाऊन पलंगावर गादी टाकून त्या खोलींतून स्वैपाकघरांतील आवरणेस गेलों. तेव्हां ११॥ चे सुमारास महाराज बाहेरून येऊन खोलीमध्यें जाऊन पलंगावर आडवे झालेचे पाहून माझे झोपणेचें तयारीस लागलों. गादी टाकून झोपलोंहि. थोड्याच वेळांत मातोश्रीनी मला हांक मारतांच मी महाराजांचे खोलींत गेलों. महाराज पलंगावर झोंपून मोठ्यानें घोरत होते! मी त्यांना सावध करण्याचा प्रयत्न करूं लागलों, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं! तेव्हां सौ. माईना उठवून सर्व सांगितलें. त्याहि बाईनें तेथें हजर झाल्या. नंतर सौ. माईच्या व मातुश्रींच्या सूचनेंप्रमाणें मी महाराजांच्या पलंगावर बसून त्यांना गरम पाण्याचे पिशवीनें शेकण्याचा प्रयत्न केला. आम्ही डॉक्टरना बोलवण्यास भीमजीस पाठवून दिलें.

थोड्याच वेळानें महाराज चटकन् उठून पलंगावर बसले आणि पूर्ण सावधपणें इकडे तिकडे पाहून, माझे मांडीवर सावकाश डोकें ठेवून शांत झाले! या प्रसंगी परमपूज्य मातुश्री, सौ. माई व मी त्यांचेजवळ होतो. त्या प्रसंगाचें शब्दांनीं वर्णन मला करवत नाहीं!

अत्यंत दुःखी अंतःकरणांनीं परमपूज्य अण्णा, तात्या, अनंतराव आणि बाबा देवधर व ताई यांना श्री. सहस्रबुद्धे यांनीं तारा केल्या असल्यामुळें वाट पहात बसलों.

२४ तासानंतर श्री. तात्या खेरीज सर्व जण आले आणि पुढें जें जें अपूर्व घडलें त्याचेंहि वर्णन मला करवत नाहीं. मी आतां महाराजांच्या आदेशाप्रमाणें मठीच्या सेवेंत अखंड रमलों असून निजानंद भोगीत आहे.

पुढें कांहीं दिवसांनीं पूज्य अण्णांनीं गुरुमाउलीच्या अखेरच्या आदेशाची आठवण देऊन मला शांत केलें. मी आतां महाराजांच्या आदेशाप्रमाणें मठीच्या सेवेंतच अखंड रमलों असून निजानंद भोगीत आहे!

आतां श्रीसद्गुरु श्री अवधूत महाराज यांच्या प्रेम भक्तीपूर्ण आपुलकीनें मला त्यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री दत्तमहाराज तथा श्री अण्णामहाराज त्यांच्या अंतःकरणाच्या आनंदानें सहधर्मचारणीचा योग्य पत्नीधर्म आचरणाऱ्या, सौ. आनंदीबाई उर्फ सौ. माई, आपल्या नांवा प्रमाणें आनंदानें श्री अवधूत मठीच्या अवधूत धर्माचाराच्या आधारस्तंभाला मुख्य आधार देत आहेत. यामुळें माझें पुढील सेवेचें आयुष्यहि सद्गुरुंच्या आशीर्वादाप्रमाणें भक्तिप्रेमाच्या समाधानांत व आनंदांत जात आहे.

श्री दत्तमठीचे आजचे चालक श्री दत्तमहाराज व सौ. माई यांनी माझ्याविषयीं परकीपणा बिलकुल ठेविला नाहीं. मठींत आतांपर्यंत आलेल्या व येणाऱ्या भक्तांना याचा प्रत्यक्ष अनुभव मिळत आहे. श्री दत्तमठीच्या चालकांची सर्व मुले देखील आपल्या वडील मातुश्रींचें अनुकरण करून मला 'काका' या नात्यानें खऱ्या आपुलकीनें वागवितात. श्री दत्तमठीच्या अधिष्ठानाविषयीं त्यांच्या अंतःकरणांत अपार आपुलकी प्रचीतीस येते !

एकंदरींत 'गुरुप्रेम' ही तेजस्वी घटना आहे. अरण्यांत किंवा रानावनांत न जातां संसारांत 'ठायींच बैसोनी' परमार्थ कसा साधतां येतो, हें थोर तत्व श्री सद्गुरु अवधूत महाराजांनीं स्वतः आचरून दाखविलें ! त्याचा कित्ता कोणत्याहि अवघड परिस्थितीशी, धैर्य-शौर्यानें झगडत श्री दत्तमहाराजहि सोदाहरणानें आचरणांत आणीत असलेले पाहून, भक्तांना धन्यता वाटून सर्वजण त्यांनाहि धन्यवाद देत आहेत !

श्री सद्गुरु मोरेश्वर महाराजांनीं माझ्यासारख्या 'सामान्य मूढ भक्ताला' आपुलकीनें जवळ करून आशीर्वाद दिला. त्यांच्या चरणीं मी पडलों, त्यांच्या आशीर्वादानेंच जन्माचें सार्थक झालें. त्यांच्या मजवरील उपकारांना सीमाच नाहीं ! लीन होऊन चरणीं पडून सेवा करितां करितां भक्ति प्रेमामृत पीत रहावें हाच माझा उर्वरित जीवनांतील स्वधर्म झाला आहे.

● ● ●

## भाग १ ला

# आठवण नं. १४

### ( लेखक : सोनू लक्ष्मण तिवारी, भडगांव )

### श्री सद्गुरूंची भेट : अनुग्रह

१९१४ सालीं मी मराठी प्राथमिक शाळेंत जात असतां दुसऱ्या इयत्तेंत श्री. परशराम तानीराम वाणी हे होते. ते केळकरांचे वाड्यांत रहात. त्याचेकडे अभ्यासालाही जात असे. एकदां शिमग्याचे सणांत श्री सद्गुरु अवधून महाराज श्रीमती गं. लक्ष्मीबाई केळकर याचेकडे आले होते. मी त्यावेळीं ११ वर्षें वयाचा होतो. मी केळकराचे वाड्यांत गेलों. त्यावेळीं श्री अवधून महाराजांची तेजःपुंज मूर्ती खिडकीजवळ चौकाच्या खुर्चीवर बसलेली होती. अंगात केसरी रंगाची कफनी होती. त्यांना पाहून माझें मन आनंदानें व आदरानें पुलकित झालें.! कांहीं विचारावें तर मी वयाने लहान! आसपास जमलेल्या भक्तांकडून समजलें कीं हे बाईचें व अनेक साधक भक्तांचे गुरुमहाराज आहेत. त्यावेळीं महाराजांचे कुलाबा जिल्हांतील गुरुबंधु श्री. शिवाप्पा त्याचे बरोबर होते. भडगांवचे श्री. हरी शेंदुर्णीकर नावाचे वयोवृद्ध गृहस्थ महाराजांकडे ज्ञानचर्चेकरितां येत असत. महाराज, श्री. शेंदुर्णीकर व श्री. शिवाप्पा यांच्यांत ज्ञानचर्चा चाले, मला मधून मधून ती चर्चा ऐकावयास मिळे, पण मी लहान असल्यामुळें मला त्यांत विशेष समजत नसे. मात्र या ज्ञानचर्चेची त्या वयांपासून मला गोडी लागली आणि पुढें आपणहि महाराजांचा अनुग्रह घ्यावा, ही इच्छा मनांत प्रबळ होत गेली! मी माझी इच्छा श्री. परशराम मास्तर यांना बोलून दाखविली. मी 'एक सुशील विद्यार्थी' असा मास्तरांचा माझेविषयी समज असल्यामुळें मी त्यांना फार आवडे! २–३ वर्षां पूर्वींच श्री. परशराम मास्तर यांनी महाराजांचा अनुग्रह घेतला होता. म्हणून बोलण्यानें आपलें काम साधेल असें मला वाटलें.

### बालपणापासून परमार्थाची आवड वाढत गेली!

बालवयांत असतानाच मी परशराम मास्तरांचेकडे अभ्यासाला जात असे. कारण माझ्या चौथ्या वर्षीच माझी आई देवाघरी गेली! घरीं मी, वडील, दीड

वर्षांचा भाऊ होतों आणि जवळच चाकटे चुलते रहात असत, त्यांचेकडे माझी आजी होती. प्रथम आजीनें, पुढें ११ वर्षांपर्यंत काकूनें आम्हां भावांचा सांभाळ केला. ११ वर्षांपासून स्वतंत्र राहून घरीं स्वयंपाक करून मी शाळेंत जाई आणि माझ्या आतेकडे झोपावयास जाई. समोरच दुसरी आत्या आपल्या ४ मुलांसह रहात असे. या मुलांनीं महाराजांचा फोटो ठेवून अधिष्ठान सजविलें होतें.

× × × ×

दर गुरुवारी माझ्या गं. आत्याचे गुरुबंधू दगडूबुवा फेरीसाठीं येत. त्यांचे अंगावर भगवी कफनी, डोकीस भगवा फेटा, पायांत चाळ, शिवाय शैली, शृंगी, झोळी आणि हातीं एकतारी असा फेरीचा थाट असे! त्यांचेबरोबर फेरीसाठीं गुरुबंधू परशराम मास्तरहि त्याच थाटांत येत. दोघेहि उभ्यानें नाचून श्री. पंतांची दोन पदें म्हणावयाचे. फेरी करणाऱ्या ह्या दोघांभोंवतीं आम्ही मुलें कुतुहलानें जमत असूं. या घटनांमुळें लहानपणींच मनावर परमार्थाचा संस्कार व त्याची आवड वाढत गेली! दगडूबुवा, केळकर वाड्यांतच रहात होते. त्यांची भावजय सरूबाई देखील फारच प्रेमळ भक्त होती. तिचा सहवास घडला.

## श्रीसद्गुरूंची पूर्ण कृपा

लवकरच भाद्रपद संकष्टीस श्री. सद्गुरु महाराजांच्या जन्म दिवसाचा सोहाळा झाला. त्यांत भजन, टिपऱ्या, लळीत वगैरे कार्यक्रमांत मी हौसेनें भाग घेऊं लागलों. श्री परशराम मास्तराचे जवळ दर्शविलेल्या इच्छेप्रमाणें श्री. सद्गुरु अवधूत महाराजांनीं पूर्ण कृपा करून, कोणत्याहि प्रकारची बंधनें न घालतां मला अनुग्रह दिला.

## माझी एक चूक

माझे वडील घरांत असतांना त्यांची परवानगी न घेतां मी अनुग्रह घेतला ही चूक झाली खरी! कारण माझी प्रेमपूर्वक काळजी वाहणाऱ्या माझ्या वडिलांनीं, लहानपणींच माझी आई देवाघरीं गेली असतां माझें ठीक रक्षण व्हावें म्हणून कित्ती जणांनीं आग्रह केला तरीहि दुसरें लग्न केलें नाहीं! यामुळें त्यांची परवानगी न विचारतां मी अनुग्रह घेतल्यामुळें वडिलांना राग येणें स्वाभाविकच होते! महाराजांना हें समजल्यावर एके दिवशीं मी दर्शनास गेलों असतां महाराज म्हणाले, "कायरे तुझे वडील तुझ्यावर रागावले म्हणे" त्यावेळीं महाराजांचे गुरुबंधू शिवाप्पा त्यांना म्हणाले, "यांच्या घरांत अवधूत भूत शिरलें ते आतां घरांतील सर्वांना पछाडणार! संत सखूने म्हटलेंच आहे—'अवघेचि कूळ करीन विष्णुदास' तसेंच यांच्या

घरांत होणार ! " नंतर वडीलहि थोड्याच दिवसांनीं वाड्यांत श्री अवधूत महाराजांचे भेटीस आले, दोघांची दृष्टादृष्ट होतांच उभयतांना परस्परांविषयीं अत्यंत प्रेम वाटूं लागले ! एखाद दिवशीं माझे वडील भेटीस न आल्यास महाराज विचारीत, "सोनूचे वडील आज कां आले नाहींत ?" महाराजांचा मुक्काम भडगांवीं असेपर्यंत रोज संध्याकाळीं माझे वडिलांबरोबर श्री. सदाशिव वामन इंदूरकर, श्री. वाघिमकरबुवा वगैरे सद्‌गृहस्थहि महाराजांचे दर्शनास येत असत. या सर्वांची हंसत खेळत मोठ्या गोडीने ज्ञानचर्चा चाले. त्या गोड ज्ञानचर्चेचा गोडवा शब्दांनीं सांगणे कठीण !

## आठवणी नमूद करण्याची संधि व आभार

माझे प्रेमळ गुरुबंधु व श्री गुरुस्थानीं असलेले परमपूज्य श्री. दत्तुबुवा ( तथा ' अण्णा महाराज ' ) ३–४ वर्षें मला सारखे सांगत आले ' सोनू, महाराजां-विषयीं तुझे अनुभव व आठवणी लिहून काढ. ' चार वर्षें हां हां म्हणता निघून गेली ! अखेर सातारा जिल्ह्यांतील ' बांबवडे ' गांवचे माझे गुरुबंधु श्री. मेघःशाम यांच्या आग्रहामुळें हा मजकूर लिहीत आहे. वास्तविक श्रीगुरुस्थानीं असलेले अण्णा महाराज व गुरुबंधू मेघःशाम यांच्या आग्रहानेंच मला अनुभव लिहिण्याची संधि मिळाली यामुळें त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच ठरतील !

## माझ्या आठवणीची यथाशक्ति नोंद

मला अनुग्रह झाल्यानंतर मी मराठी ३ ऱ्या इयत्तेंत गेलों. यापुढें माझे शिक्षक श्री. परशरामभाऊ यांनी शिक्षकाच्या नोकरीचा राजीनामा दिला. दर गुरुवारीं आम्ही कांहीं मुलें मिळून आळीपाळीनें प्रत्येकाचे घरीं भजन करूं लागलीं. दरवर्षी श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांचे वाड्यांत गुरुमहाराज संकष्टीच्या उत्सवास बहुतेक येत. त्या उत्सवांत भजन, टिपऱ्या, लळीत इत्यादि कार्यक्रमांत आम्ही मुलें भाग घेत असूं. श्री सद्‌गुरु महाराज भडगांवास प्रथम आले त्यावेळी श्री पंचायतन मंदिरांत उतरले होते. तेथे माझी आत्या मथूबाई तिवारी, मथूबाई निशाणदार व श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांनीं अनुग्रह घेतला. त्यापूर्वी महाराज चाळिसगांवीं उतरले होते व तेथें कीर्तन सप्ताह केला होता. त्या कीर्तन-सप्ताहांत येणाऱ्या पोपट नावाच्या मुलावर महाराजांचा अनुग्रह झाला. त्यावेळीं श्री. राजाभाऊ सहस्त्रबुद्धे चाळिस गांवींच राहून वकिली करीत होते. तेच भडगांवीं रामनवमीचा उत्सव, त्यांच्याकडे रामाची ठेव असल्यामुळें, चालवीत असत. रामनवमीच्या त्यावर्षीच्या उत्सवांतील कीर्तनसप्ताहासाठी श्री. रामभाऊ सहस्त्रबुद्धे यांनीं अवधूत महाराजांना आमंत्रण देऊन बोलाविलें. त्यावर्षी भडगांवीं

श्री रामचंद्राच्या रथाचें काम सुरू झालें. गुरुमहाराजांचा त्या रामजन्मांतच पहिला कीर्तन सप्ताह झाला. भडगांवचे व आसपासचे बरेच लोक त्यावेळीं अनुग्रहीत झालें.

केळकर वाड्यांतील संकष्टीचे उत्सवांत कै. श्री. शंकर पाटील, सर्वश्री राजाराम देशमुख, दगडू बोवा, बंडू पटवर्धन, सोनू पटवर्धन, शाम परदेशी, चिन्दाभाऊ न्हावी, केशव पेंढारकर, विनायक पंडित ( भय्या ) श्री. सरुबाई वगैरे मंडळी मोठ्या उत्साहानें भाग घेत. केळकर वाड्याचे विनायक भय्याचे वडील श्री. त्र्यंबककाका भोळया शंकराचा अवतारच ! त्यांच्या आई पार्वतीकाकू, चुलती जानकीबाई इत्यादि मंडळी फारच प्रेमळ होती. उत्सवांतील रुद्राभिषेकाला सर्वश्री दशपुत्रे गुरुजी, तात्यापटवर्धन, बापूराव पटवर्धन वगैरे वैदिक असत.

\+ + + +

## ' अवधूत मठी ' निर्माण केली

१९२१ च्या चैत्र शुद्ध प्रतिपदेला, भक्तमंडळीचें वाढतें प्रमाण पाहून महाराजांनीं मोठी जागा खरीदण्याचा विचार केला. ते ज्या केळकर वाड्यांत उत्सवासाठीं येत त्या वाड्यानजीकच त्याच गल्लींतील श्री. रहाळकर यांची जागा खरेदी केली. आणि तेथें अधिष्ठान तयार करून ' अवधूतमठी ' असें नांव दिलें. श्री पंताष्टमी ( गोकुळाष्टमी ), श्री दत्तजयंती आणि भाद्रपद संकष्टी ( सद्‌गुरुंचा जन्मोत्सव ) हे उत्सव याच जागीं होऊं लागले. या उत्सवांत झाडलोट, सडा रांगोळी करण्याची सेवा सद्‌गुरुंनीं मला सांगितली. ती आंतापर्यंत यथाशक्ति मी करीत आहे. शिवाय ' रोज दोनपदें ' कां होईना म्हणावयाची, भजन सेवाहि, करण्याची आज्ञा सद्‌गुरुंनीं केली तीहि अखंड १२ वर्षें केली. दसऱ्याच्या सीमोल्लंघना सारख्याहि उत्सवांत आणखी पालखीच्या सोहळ्यांतहि माझी हजिरी असते. बागेंत जाईचीं फुलें काढून व ती मोजून श्री दत्ताला हार घालण्याचेंहि काम श्री सद्‌गुरुंनीं मला सांगितलें. ३१–३२ हजापर्यंत फुलें काढून श्री दत्ताला हार अर्पण करण्याचा कार्यक्रम कांहीं वर्षें यथाशक्ति पार पडला. पुढें प्लेगच्या सांथीमुळें तो कार्यक्रम बंद झाला.

## शिक्षकाची नोकरी सोडून किराणा–मिठाईचें दुकान थाटलें

मला वऱ्हाडांतील अकोल्याच्या शाळेंत शिक्षकाची नोकरी सांगून आली होती. पण गांवांतच सद्‌गुरूंनीं अधिष्ठान स्थापन केल्यामुळें भडगांव सोडून बाहेर गेल्यास परस्वाधीन होऊन सेवेंत अंतर पडेल आणि वेळीं रजाहि मिळणें कठीण

पडेल, असें वाटलें, तसेंच वडिलांचाहि नोकरी पेशाला विरोध होता. म्हणून भडगांवांतच किराणा–मिठाईचें दुकान थाटलें. आजतागायत या दुकानावर नोकरी पेशांहि निर्वाहादि कालक्रमणा उत्तम चालू आहे.

## १९२७ सालीं श्रीदत्त स्थापनेची वेळीं घडलेली सेवा

भडगांवीं १९२७ सालीं श्रीदत्त स्थापनेचा उत्सव झाला. त्यावेळीं पाकसाहित्य आणण्याची श्री सद्‌गुरुंनी आज्ञा केली. सध्या गुरुस्थानीं असलेले श्री. अण्णा महाराज यांचेबरोबर पाचोऱ्यास जाऊन तुपाचे डबे, साखरेचे पोतें वगैरे सामान एका कच्छी व्यापाऱ्याकडे खरीदलें. चंपाषष्ठी ते वद्य प्रतिपदेपर्यंत उत्सव चालला. भडगांवांतील हजारो लोकांनीं उत्सवांत अन्न प्रसाद घेतला.

या प्रसंगीं इंदूर, पुणे, सातारा, कुरुंदवाड, सांगली, गणेशवाडी, इचलकरंजी बेळगांव, वसई, ठाणे, कोकण, नागपूर, उमरावती, नाशीक, पूर्व-पश्चिम खानदेश वगैरे ठिकाणची भक्त मंडळी अर्चेच्या उत्सवासाठीं जमलीं होती. गुरुमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे १६ ते २० मणापर्यंत...लाडू उत्सवांसाठीं पक्वान्न म्हणून बांधण्यांत आले ! माझ्या मदतीला गणू शिंदे व धोंडू शेंदुर्णीकर होते. समर्थाज्ञेनुसार ही सेवेची संधि लाभली.

## गुरु-मंत्रजपाची एक वर्ष सेवा

अर्चेच्या उत्सवानंतर एक तास गुरुमंत्राचा जप एकतारी व चिपळ्या घेऊन करण्याची सेवा श्री गुरूंनीं सांगितली. हें मंत्रभजन चालू असतां केव्हां केव्हां श्री. अण्णा महाराजांची ज्येष्ठ कन्या कृष्णाबाई बालवयांत होती ती रडूं लागलीं की अण्णांच्या सहधर्मचारिणी सौ. माई तिला मजकडे आणून देत. तिला जवळ घेतलें कीं तीहि भजनानंदामुळें उगी राही !

## १९३० सालीं पहिल्या कुटुंबाचा स्वानंदवास

१९३० सालीं श्रावण वद्य शनिवार म्हणजे श्री गोकुळाष्टमीच्या उत्सवाचे सुरवातीला माझें पहिले कुटुंब स्वानंदवासी झालें. आदल्या दिवशींच तिला दुखण्याचे सायास होऊं नयेत व शांति समाधान लाभावें म्हणून गुरुमहाराजांनीं श्री. दत्तुबुवांबरोबर तीर्थ पाठविलें होतें. रात्रभर माझ्या या धर्मपत्नीनें ' ॐ शिवाय नमः ' जप चालू ठेविला होता. सकाळीं तिच्या या संसारदुःखाची समाप्ति झाली– ती स्वानंदवासी झाली !

## दुसरें लग्न व पुत्रप्राप्ति

माझा दुसरा विवाह १९३२ सालीं माघ शुद्ध पंचमीला झाला. १९३६ सालीं चैत्र शुद्ध अष्टमीला मला पुत्रप्राप्ति झाली; मुलाचें नांव 'गौरीशंकर' ठेविलें. १९३७ सालीं हा मुलगा आंकडीच्या दुखण्यानें अत्यवस्थ झाला! (फिटस फॅफरें) आम्ही हतबुद्ध झालों. काय करावें तें सुचेना! शोक-भय-मृत्यू या सर्वांपासून सद्गुरूच रक्षण करतात हें संतवचन आठवलें. पण पूर्वसुकृतामुळें 'कुसंगे मति भ्रमली' अशा पंतांच्या उक्तीची आठवण झाली. कारण कांहीं थोड्या दिवसांपूर्वीं पासून श्रीसद्गुरु दर्शनास दुरावलों होतों! परंतु सद्गुरु माय दयाळू आहे. 'बाळ रुसलें तरी माय रुसत नाहीं!' याहि पंतांच्या वचनाचा विश्वास वाटला. पण मुलगा 'घटकेचा सोबती' अशी त्याची स्थिति! यामुळें त्याचे जवळून हालतां येईना! पण जवळच वयोवृद्ध श्री. त्र्यंबकराव जोशी नाना होते, ते 'मी महाराजांना घेऊन येतो' म्हणाले. लगेच उघड्या अंगानेंच मठींत बाबा गेले. बाबांना पहातांच गुरु महाराज म्हणाले, 'काय गडबड आहे हो!' बाबा म्हणाले, "सोनूचा मुलगा अत्यवस्थ आहे आणि आपण यावे अशी त्याची इच्छा आहे" त्यावर गुरु महाराज कांहीहि न बोलता आपल्या खोलीत गेले आणि तीर्थ अंगारा आणून त्यांनी जोशी बाबांच्या हाती दिला व म्हणाले, "सोनूला सांगा जेथें तीर्थ अंगारा तेथें मीहि आहे! घाबरूं नको, सर्व कांहीं बरेंच होईल" सायंकाळीं ५-६ चे सुमारास महाराजांनीं दिलेला अंगारा लावून मुलाला तीर्थ पाजल्यावर रात्री १२ ला काळसर घाण असा जुलाब मुलाला झाला आणि तो शुद्धीवर आला! असे महाराजांनीं वेळोवेळीं माझें रक्षण केलें.

## शेंदुरांच्या पेढ्यांची बाधा टळली!

एकदां माझ्या वाईटावर असलेल्या गुरुबंधूनें मला 'सप्तशृंगीचा प्रसाद' म्हणून शेंदूर घातलेले पेढे खावयास दिले! पण वांतिरुपानें तात्बडतोब शेंदूर पडून गेला आणि त्याची बाधा आवाजाला बाधली नाहीं!

## मुदतीच्या ज्वराचें संकटातूनहि निभावलों!

१९५८ सालच्या श्रावण महिन्यांत मला मुदतीच्या तीव्र ज्वरानें पछाडलें! श्रावण अमावास्येच्या सुमारास घरची मंडळी माझ्या अत्यवस्थेमुळें हताश झाली! माझी स्थिति 'केव्हां शुद्धि तर केव्हां गैरशुद्धि' अशी होती! शुद्ध गेल्यावर मला दृश्य दिसलें :—माझ्या उशा-पायथ्याला दिंड्या-पताका घेऊन, शुभ्र वस्त्र

शिरोभागीं व कमरेला धारण करून, टिळेमुद्रा लावलेली एक संतमूर्ति बसली आहे. त्याच प्रसंगीं श्रीगुरुची मूर्ति दिसली. ते त्या मंडळीला रागानें म्हणाले, "अरे अद्याप पुष्कळच अवकाश आहे. गर्दी कां करतां" हे रागाचे शब्द ऐकून टाळविणेधारी वारकरी मंडळी निघून गेली! श्री सद्गुरु समाधिस्थ होण्यापूर्वी मधून मधून बोलत, "मी नेहमीं मठींत शांतिचौकांत आहेच. परंतु कांहीं दिवस 'गिरनार' पर्वतावर तर कांहीं दिवस गाणगापुरी, केव्हां केव्हां कोल्हापुरांत तर केव्हां मणकर्णिका घाटावर (काशी क्षेत्रीं) असा मी अनेक ठिकाणीं संचार करतों. कोणी माझी आठवण काढली कीं त्यांच्या आणीबाणीच्या प्रसंगीं मला तिकडे जावें लागतें."

## महाराज समाधिस्थ होण्यापूर्वीचा एक दृष्टांत

महाराज समाधिस्थ होण्यापूर्वी १५ दिवस मला स्वप्नांत पुढील दृश्य दिसलें— मी संध्याकाळीं मठींतील बगीच्यांतून शांतिचौकांतील धुमीदर्शनास जात होतों. श्री गुरु बनारसी भरजरी करवतकांठीं पांढरे शुभ्र धोतर नेसलेले, अंगांत पांढरी कफनी, कानांत रुद्राक्ष-कुंडलें, गळ्यांत टपोऱ्या स्फटिक मण्यांची माळ अशा थाटांत इकडे तिकडे फिरत होते. महाराज मला पाहतांच जवळ आले आणि मला पोटाशीं धरून म्हणाले, "सांभाळा, आतां संपलें!" मी लगेच डोळे उघडून पाहिलें! मनाला अत्यंत हुरहूर लागली! आणि अस्वस्थ झालों! सकाळीं उठून दाराशीं हिरमुसल्यासारखा बसलों. त्याचवेळीं गुरुबंधु रामदास गुरव शिवमंदिर झाडून परत चालले होते. मला चिंतातुर पाहून ते म्हणाले, "दादा, आज सकाळींच असे सचिंत का? मी मग त्यांना माझ्या स्वप्नांतील दृश्याचे वर्णन सांगितलें. रामदास म्हणाले, "दादा, तुम्ही वेडे तर नाहीं? अशा स्वप्नांच्या नादीं लागून महाराजांचे दर्शन मात्र दुरावेल. दिवा मालवतांना मोठा होतो तशी महाराजांची तेजस्वी मूर्ति तेजःपुंज झाली आहे! हें वेड झटकून टाकून महाराजांचें अगोदर दर्शन घ्या."

'लडवा दादा सुळावर' या न्यायानें, मुख्यतः माझे बरोबर मठींत नेहमीं येणाऱ्या दोन 'गुरुद्रोही' मित्रांनीं आपल्या गुरुद्रोही कुटिल कारस्थानांत मलाहि गोंविलें होतें.

## अखेरचा प्रसंग!

गुरुबंधूंच्या मित्रांनाहि दृष्टांताचें स्वप्न सांगिलें. पण त्यांच्याच संमतीनें गुढी पाडव्यादिवशीं संध्याकाळीं दर्शनास जावयाचें ठरलें. गुरुबंधूंची वाट पाहिली.

पण गुढी पाडव्यादिवशीं ठरल्यावेळीं गुरुबंधु-मित्र संध्याकाळीं आले नाहींत! तसाच अंथरुणावर जाऊन पडलों. रात्रभर तळमळून झोंप आली नाहीं! सकाळीं उठून नित्य क्रमांच्या कामाला लागलों आणि मिठाईसाठी भट्टी पेटविली. इतक्यांत सूर्योदयापूर्वींच जयनारायण मारवाडी यांच्या दुकानावरील किसनसिंग शिपाई बाजारांतून आला व म्हणाला "सोनू महाराज, तुम्हारे मठियेके महाराज गये" मी विचारलें 'कहाँ गये?' तेव्हां त्यानें वर हात करून आकाशाकडे बोट केलें! माझ्या हृदयावर वज्राघातच झाला! मी दुःख समुद्रांत किती बुडालों असेन याची वाचकांनींच कल्पना करावी!

## सद्गुरुच्या आणखी कांहीं ठळक आठवणी

श्री गुरुंचा षष्ठ्यब्धि पूर्ति समारंभ (साठावें वर्ष पुरे झाल्याचा समारंभ) झाला. त्यावेळी हजार मोदकाचें हवन होऊन मोदकांचा प्रसाद भक्तांना वाटला. भंडाराहि झाला. त्यां करितां गांवोगावची भक्तमंडळी जमली होती.

## माझ्या थोरल्या मुलीला अनुग्रह : नंतर देहावसान

माझी थोरली मुलगी चि. सुमन ९ वर्षांची असतांना श्री गुरुंनीं आश्विन शुद्ध अष्टमीला तिला जरीकांठी चोळी व परकर नेसवून पूजा केली आणि नंतर तीर्थ प्रसाद देऊन तिला अनुग्रह दिला. १९४३ साली कार्तिक शुद्ध नवमीला सुमनच्या आत्म्यानें इहलोक सोडला. अगदी अखेर पर्यंत ती 'ॐ शिवाय नमः' हा मंत्र जपत होती. 'काय दिसतें' म्हणून विचारल्यावर ती सांगे "मला गुरु महाराज दिसतात"!

## सद्गुरुंच्या समाधी नंतरचा स्वप्न-दृष्टांत।

सद्गुरुच्या समाधीनंतर १५ व्या दिवशी मोठा भंडारा झाला. दोनप्रहरीं सद्गुरूंच्या अस्थी एका घटांत घालून आणि घटास भगवी कफनी, शैली, शृंगी घालून, बागेतील शांतिचौकांत, गुरुस्थानी असलेले माझे गुरुबंधू श्री. अण्णा यांनी, घुमटींत तो अस्थिघट ठेविला. याच शांतिचौकांतील घुमटींत बसून गुरुमहाराज आत्मज्ञान चर्चा करीत. या समारंभाच्यावेळीं सद्गुरुंच्या कुटुंबांतील बहुतेक मंडळी आणि अनेक भक्त व शिष्य हजर होते. सर्वजण अंतःकरणे कळवळून अश्रुधारा ढाळीत होते!

सदरील समारंभाच्या रात्री माझे स्वप्नांत मला पुढीलप्रमाणें दृष्टांत झाला— श्री शांतिचौकांत सद्गुरूंच्या समाधि-दर्शनासाठी गेलो. सद्गुरूंनी पायघोळ कफनी

घातली होती. त्या कफनीवर सर्व बाजूंनीं ' ॐ शिवाय नमः ' हा तारक मंत्र छापला होता. आणि शांतिचौकांतील समाधीसमोर ते इकडे तिकडे फिरत होते. मला पाहतांच सद्‌गुरु महाराज म्हणाले, " मी येथें आहे " इतकेंच बोलून ते समाधींत शिरले आणि समाधीचे दार आपोआप बंद झालें-

× × × ×

गुरुपुत्राबरोबर श्रीगुरु श्रीगोपालकृष्णाप्रमाणें टिपऱ्या खेळत. ती खेळांतील ऐक्य-भावना वर्णन करण्यास मजजवळ पुरेसे शब्द नाहींत ! ' लडिवाळ बाळ खेळे सर्व काळ ' या पदाची आठवण येई ! आजतागायतहि कृष्ण संवगड्याप्रमाणें श्री. अण्णा महाराज व त्यांचे बंधू श्री. तात्या व श्री. अंताकाका, त्याचप्रमाणें सर्वस्वीं गुरुभक्तीलाच वाहून घेतलेले श्रीपादकाका वगैरे मंडळी खेळत असते.

एकंदरीत ४८-४९ वर्षांच्या अवधींत अनेक प्रकारचे अनुभव अनेकदां येऊन गेले.

गुरुमाय राखिते भक्तां दिन रजनी । टाकिते कृपा पदरीं ॥ असा पूर्ण अनुभव स्थिरावला ! हें अनुभव यथाशक्ति श्री सद्‌गुरुचरणीं अर्पण.

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. १५

( लेखक : श्री. बंडू नथू लोहार, मु. व पो. भडगांव. )

श्री सद्गुरु मयूरेश महाराज यांनीं मजकडून करवून घेतलेली पारमार्थिक सेवा आणि तिजविषयींचे अनुभव यथामति लिहून देत आहे. ते अर्थात् वेडेवाकडे असणार याविषयीं क्षमा असावी.

स. इ. १९१९ सालीं मी मराठी सातवींत होतों. माझे परमप्रिय गुरुबंधु श्री. सोनू लक्ष्मण तिवारी यांना श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचा अनुग्रह झाला होता. तो श्री. लक्ष्मीबाई केळकर यांचेकडे होणाऱ्या गुरुमहाराजांच्या भाद्रपद संकष्टीच्या उत्सवांत भाग घेत असे. त्या उत्सवाचें कौतुक आम्हां सहाध्यायी मित्रांना सांगायचा. तें ऐकून श्री अवधूत महाराजांविषयीं मला फार आदराची भावना वाढूं लागली आणि सोनूच्या संगतीनें मीहि केळकर वाड्यांत जाऊं लागलों. वाणि उत्सवांतहि भाग घेऊं लागलों. आमचे गुरूजी श्री. परशराम तानीराम वाणी यांच्या देखरेखीखालीं टिपऱ्या व लळीतांतहि भाग घेऊं लागलों. त्यावेळीं तीन वर्षे महाराज भडगांवीं न आल्यामुळें त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ घडला नव्हता. त्यांच्या भेटीची तळमळ एकसारखी मनांत वाढत असतां एकारात्रीं महाराजांनीं स्वप्नांत येऊन मला यथासांग अनुग्रह दिला. सकाळीं मी माझे गुरुबंधु सोनू यांना स्वप्नांतील हा दृष्टांत सांगितला, तेव्हां स्वानुभवावरून तो म्हणाला, 'हा खरा ठरणार!'

लवकरच गुरुमहाराजांचें पत्र केळकर बाईंना आलें. "या वर्षी मी उत्सवा-करतां भडगांवीं येत आहे" हें ऐकून आम्हां सर्वांना आनंद झाला आणि परशराम मास्तरनीं उत्सवासाठीं आमची जोरांत तयारी करवून घेतली. महाराज पत्राप्रमाणें आले आणि संकष्टीचा उत्सव थाटानें पार पडला. मग त्या १९१९ सालीं भाद्रपद वद्य 'इंदिरा एकादशीचे' दिवशीं श्री. परशराम मास्तरांचे समक्ष महाराजांनीं मला यथासांग अनुग्रह दिल्यामुळें मनाला शांति समाधान लाभलें. २–३ वर्षे अशीच केळकर बाईंच्या वाड्यांतील उत्सवांत गेली. मग श्री. केळकरबाई,

नारायण लक्ष्मण तिवारी, झिपरूशेट वाणी प्रभृती भडगांवकर भक्तांच्या सल्लामसलतीनें व सहकार्यानें आणि मुंबईकडील भक्तांच्या मदतीनें महाराजांनीं शेजारींच मठीची जागा विकत घेऊन व तेथें अधिष्ठान मांडून, पंताष्टमी, श्री दत्तजयंती इत्यादि उत्सव सुरूं केले. मला व्यायामाचा व वाचनाचा नाद असल्यामुळें महाराजांच्या परवानगीनें श्री अवधूत व्यायामशाळा व श्री. अवधूत-वाचनालयहि सुरूं केलें. माझ्याकडून महाराजांनीं अनेक पारमार्थिक ग्रंथांचें वाचन करवून घेतलें. त्यामुळें माझी शरीरयष्टी मजबूत होऊन मनालाहि योग्य वळण लागलें. आणि माझ्या हूड मनाला योग्य वळण लावण्यासाठीं कांहीं योगाभ्यासहि करवून घेतला. खलांच्या संगतीत सांपडून मी वाया गेलों नाहीं. माझें भाग्य थोर म्हणूनच गुरुमहाराजांनीं मला जवळ केले आणि मी निर्मळ दुनियेंत आलों असें मला वाटूं लागलें! मला महाराजांचा सहवास अंदाजे १८ वर्षें लाभला. महाराजांच्या शिकवणीनें मला दिव्यज्ञानाची ओळख पटली आणि अनुभवहि मिळून शंकाकुशंकांचे चक्रांत सांपडलों नाहीं!

## दृढनिश्चयानें गुरुंची आज्ञा पार पाडण्याला मदत

दत्तजयंतीस लागणाऱ्या कांहीं महत्वाच्या वस्तू चाळिसगांवाहून खरेदी करून आणण्यासाठीं महाराजांनीं मला एका प्रसंगीं आज्ञा केली. त्यावेळीं चाळिसगांवीं जाऊन जलद परत येण्याची रेलवे खेरीज दुसरी सोय नव्हती. मी सकाळीं उठून नगर देवळे स्टेशनवर पोचतों न पोचतों तोंच स्टेशनांतून गाडी चालू झाली! मग महाराजांचें स्मरण व मंत्राचा जप करीत मनात म्हटलें गाडी परत येऊन मला चाळीसगांवांस गेलेंच पाहिजे ' खरोखरच गाडी परत हटून स्टेशनांत उभी राहिली! घाईनें गाडीत चढल्या बरोबर गाडी चालू झाली! मग चाळीसगांवांतून जरूर त्या वस्तू खरीदून संध्याकाळच्या गाडीनें नगरदेवळें स्टेशनला व नंतर भडगांव मठींत योग्य वेळीं दाखल झालों! निश्चयानें गुरुस्मरण करून काम केल्यानेंच काम वेळेवर माझ्या हातून घडलें, अशी माझी श्रद्धा दृढ झाली!

नांदेडला महाराजांबरोबर एकदां गेलों असतां मला असें स्वप्न पडलें कीं "महाराजांनीं मला भगवें देऊन रात्रीं फेरीस पाठविलें. सर्व गांव गाढ झोपेंत होता. गल्लीगल्लींतून मी भजनें म्हणत निघालों. श्री. नामदेव वगैरे भक्त जागे होऊन टाळ, खंजेरी वगैरे घेऊन मला भजनांत सांथ देऊं लागली. आणि गांवभर भिक्षा करून बरेंच धान्य मिळालें."

नांदेडकर मालकरी (वारकरी) मंडळी आणि श्री अवधूत सांप्रदाझी यांचे दरम्यान त्यावेळीं बराच खटका उडाला! श्री. नामदेव प्रभृति अवधूत सांप्रदायाच्या भक्तांना वाळींत टाकून जाति बहिष्कृत करण्याचीहि हूल उठली होती! चौधरी वकिलांना अवधूत सांप्रदाया विरुद्ध कारवाई करण्यासाठीं पुढाकार देण्यात आला होता. ही सर्व हकीगत श्री. नामदेव नेमाडे यांचेकडून महाराजांना समजली याचवेळीं जळगांवास रहाणारे हरिभाऊ सोनार हे भडगांवचे महाराजांचे भक्त महाराजांना आपल्या निवासस्थानीं जळगांवास नेण्यासाठीं नांदेडला आले होते. हरिभाऊसह महाराज व आम्हीं जळगांव स्टेशनवर आलों त्यावेळीं बऱ्याच भक्तमंडळीचा मेळा बँड घेऊन महाराजांना मिरवत नेण्यासाठीं स्टेशनवर हजर होता. हरिभाऊकडे न जातां आपण ठरविलेल्या जागीं महाराजांना न्यावें, असा या मंडळींचा बेत होता! महाराजांना हें समजल्यावर महाराजांनीं या मंडळींना बजावलें, "पहिलें आमंत्रण हरिभाऊंचे असून ते मला घेण्यासाठीं नांदेडपर्यंत आले होते. तेव्हां मी प्रथम हरिभाऊकडे उतरून आजची रात्रपर्यंत तेथें मुक्काम करून मग तुमचेकडे येईन. हें तुम्हांला मान्य असेल तरच तुम्हीं आणलेल्या व्हिक्टोरियांत बसतों; नाहींतर मी त्या गरीब भक्ताकडे पायीं चालत जाऊन त्याचेकडेच मुक्कामास राहीन." त्या लोकांनीं तें मान्य केल्यावर महाराज त्यांनीं आणलेल्या गाडींत बसून हरीभाऊचे बिऱ्हाडीं गेले. मग दुसऱ्या दिवसापासून भावसार पंचमठींत ७ दिवस महाराजांचा कीर्तन सप्ताह झाला.

कीर्तन सप्ताह संपल्यावर आठव्या दिवशीं मला स्वप्नांत पुढील प्रमाणें दृष्टांत झाला;- मला रात्रीं १२ वाजतां महाराजांनीं फेरीस पाठवितांना सांगितलें "चौधरी वकिलांकडून झोळींत भिक्षा आली पाहिजे. तसें न केल्यास मला तोंड दाखवूं नको!" अवधूत सांप्रदाय नष्ट करण्याच्या कारवाईत पुढाकार घेतलेल्या चौधरी वकीलाला हें दर्शवून द्यावयाचे होतें कीं, अवधूत सांप्रदाय सनातनी, वेदमान्य व पद्धतशीर आहे. म्हणूनच महाराजांनीं इतकें निक्षून बजावलें होतें! "चौधरी वकिलाच्या घरापुढें भिक्षेची फक्त तीन पदें म्हणावयाची, तेवढ्यांत त्यांचेकडून भिक्षा न आल्यास प्राणायामाचे योगानें प्राण कुडींतून घालवावयाचा!" असा निर्धार करून चौधरी वकिलाचे घरापुढें पंतांनीं रचलेली अवधूत सांप्रदायाचीं तीन पदें मी म्हटलीं. तिसरें पद संपण्याचा आंतच चौधरी वकिलाकडून एक चौथ आंबेमोर तांदूळ व पांच रुपयांचें गुप्तदान माझ्या झोळींत येऊन पडलें! वकिल साहेबांनीं फेरींतील सर्व मंडळींना चहा केला. मग चौधरी वकिलांनी 'अवधूत सांप्रदाय हा अनादिसिद्ध' असल्याची जाहीर कबूली दिली आणि

अवधूत सांप्रदाय व वारकरी सांप्रदाय यांच्यातील तेढ मिटली ! " (या दृष्टांताप्रमाणें पुढें खरोखरच ही तेढ कशी मिटली हा वस्तुस्थिति दर्शक वृत्तांत श्री. नामदेव नेमाडे यांच्या विस्तृत आठवणींत आहे.) महाराजांविषयींची माझ्या मनांतील श्रद्धा जास्त दृढ झाली.

## म्हातारपणींहि पोहण्याचा विक्रम !

बरसातीच्या दिवसांत तापी नदी पूर येऊन दुथडीं वहात असतां, महाराजांनीं मला पाठीवर नुसता हात ठेवावयास सांगून पुरांतून पोहत सहज पैलतीरीं गेले आणि तिकडील मंडळीच्या स्वागताचा स्वीकार करुन तसेंच मला घेऊन......ऐलतीरीं पोहत आले ! यावेळीं महाराजांचें वय ६० च्या दरम्यान असल्यामुळें दोन्ही तीरांवरील भक्तांना त्यांच्या या विक्रमाचें मोठें नवल वाटलें ! माझीहि त्यांच्यावरील भक्ति वाढली !

## माझ्या मोठ्या मुलीच्या लग्नाचे विघ्नांतील निवारण

माझ्या मोठ्या मुलीचें लग्न लागल्यावर दुसऱ्या दिवशींच्या मानपानाचे प्रसंगी महाराजांचा अनुग्रह घेतलेला, माझ्या वडील भावाचा मुलगा 'सांडू' पान सुपारी वाटतां वाटतां एकाएकीं झटका येऊन, घाम सुटून बेशुद्ध पडला ! त्याच्या जीवांत थोडीच धुगधुगी दिसली ! त्यावेळीं भडगांवीं असलेल्या मालसे डॉक्टरनीं तपासलें आणि धोक्याची जाणीव होऊन, गुरुमहाराजांना शरण जाऊन जे सांगतील ते दैवी इलाज करणेस सुचविलें ! मग मी मठींत जाऊन खिन्न स्थितींत महाराजां-पुढें मान खालीं करुन उभा राहिलों. महाराज मला पहातांच, पंतांच्या फोटो नजीक जाऊन एका वाटींत तीर्थ व पुडींत अंगारा घेऊन आले. मी कांही बोललों नाहीं तरी माझ्या लक्षांत आलेल्या विघ्नाचा सर्व तपशील बोलून मला म्हणाले " बेशुद्ध पडलेल्या 'सांडूचे' सर्वांगास विभूती लावून त्याच्या तोंडांत तीन चमचे तीर्थ घाल म्हणजे तो शुद्धीवर येऊन त्याला बरें वाटेल आणि तुझ्यावर येणारें दुर्लौकिकाचें अरिष्ट टळेल ! 'महाराजांनी सांगितल्याप्रमाणें' केल्यानंतर तो शुद्धीवर आल्यावर त्याला दवाखान्यांत नेऊन डॉक्टरांनीं औषधोपचार केल्यावर बरा झाला. पुढें पांच महिन्यांनीं एकाएकीं देवाघरीं गेला ! या गतप्राण झालेल्या सांडूला बरा करुन महाराजांनीं माझ्यासारख्या शिष्यावर येणारा दुर्लौकिक टाळला ही केवढी त्यांची कृपा ! हा प्रसंग १९३३ सालीं घडला !

## १९३४ सालीं सोमेश्वर महादेवाचा उत्सव

हा उत्सव करण्याची परवानगी गुरुमहाराजांनी मला दिली. त्यांच्या आज्ञेच्या आशीर्वादानें वर्गणी जमा करुन मंदिरासमोर मंडप उभारला. मंडपांत यज्ञकुंड

करून व लघुरुद्र स्वाहाकार करून महाशिवरात्रीच्या उत्सवास सुरवात केली. बारा वर्षें मी हें कार्य केल्यावर पंचाचें हातीं पुढील व्यवस्था दिली व तें कार्य आज ३० वर्षांवर चालू आहे. भृगुऋषींच्या स्नान-संध्येच्या ठिकाणी हें स्थान संगमावर होते अशी जुनी आख्यायिका आहे. आतां फक्त सोमेश्वराचे देऊळच दिसत आहे. म्हणून भडगांवला 'भृगुक्षेत्र' म्हणत.

## मठींतील गैरहजेरी व सद्गुरु भेटीची तळमळ

असा कार्यक्रम चालू असतां मध्यंतरींच्या दोन वर्षांच्या अवधींत म्हणजे १९३७–३८ चे कालांत 'कांहीं कारणानें' मठींत जात नव्हतों. सोनू, हिरामण व मी असे तीघेहि गुरुबंधू मठींत जात नव्हतों! १९३९ च्या गुढी पाडव्याचे दिवशीं गुरुमहाराजांच्या भेटीची मला विलक्षण तळमळ लागली. हें मी सोनू व हिरामण या दोघांनाहि सांगितलें. त्यांनीं होकार दिला. पण ते आपापल्या धंद्यांत गुंतल्यामुळे संध्याकाळपर्यंत त्यांना रिकामपण मिळालें नाहीं! जेवण करून ते झोंपले. पण मी झोंपलों असता मला स्वप्नांत महाराज भेटले व खालीं वर्णन केलेला प्रकार मी स्वप्नांत पाहिला तो असा :—"मी एकटाच रात्रीं १० चे सुमारास मठींत येऊन पाहतों तों देवळाभोंवतीं पालखीची फेरी चालली होती, बरीच गर्दी जमली होती. महाराजांची एकांतांत एकट्याची भेट घेण्याची मला तीव्र इच्छा होती. म्हणून शेजारीच रहात असलेली गुरुबहीण सुंदराबाई हिच्या घरांत मठींतील गर्दी कमी होईपर्यंत मी बसून राहिलों. सर्व लोक घरोघर गेल्यानंतर मी मठींत गेलों. तोंच महाराज आपल्या खोलींतून बाहेर आले आणि पांच पेढे आणि चार फुलें माझ्या हातावर ठेवून 'लवकर घरीं जा' असें बोलले! महाराजांना वंदन करून मी घरीं आलों पण मला झोंप येईना! 'लवकर घरीं जा' असें गुरुमहाराज कां बोलले याच विचारानें झोंप येत नव्हती. थोडा डोळा लागला न लागला तोंच महाराज स्वप्नांत येऊन म्हणाले, "तूं गेल्यावर मी समाधिस्थ झालों! माझी वेळ भरत आली होती, म्हणूनच तुला लवकर जाण्यास सांगितलें!" मी सदरील स्वप्न पहात असतांच चिन्धू न्हावी माझे घरीं रडत आला आणि 'महाराज समाधिस्थ झाले!' असे म्हणाला!

## 'शूर ओळखावा रणीं, संत ओळखावा मरणीं!'

गुरुमहाराजांचा पार्थिव देह अंदाजें ५४ तासांवर तसाच ठेवला होता. परंतु त्यांच्या पार्थिव देहावर इतकें तेज चढलें होतें कीं त्यांच्या कपाळरूपी आरशांत प्रत्येकाला स्वतःचें प्रतिबिंब दिसत होतें! त्यांच्या पार्थिव देहाचे भव्य मिरवणुकीला

भक्तांचा व चहात्यांचा अलोट जनसमूह जमला होता! मिरवणूकीची अघाडी गांवभर मिरवून मठीशीं आली. तेथेंच मिरवणुकीची अघाडी पिछाडीला मिडली! म्हणजे सबंध भडगांवालाच मिरवणुकींतील लोकांचा वेढा पडला होता! महाराज वारंवार म्हणत, "शूर ओळखावा रणीं आणि संत ओळखावा मरणीं!" या गोष्टीचें प्रत्यक्ष प्रात्यक्षिकच गुरुमहाराजांच्या पार्थिव देहाच्या अन्त्य मिरवणुकींत आम्हांला पहावयास मिळालें! यापेक्षां मोठें भाग्य तें कोणतें?

## महाराज समाधिस्थ झाल्यानंतर

माझा देह सुखी राहिला नाहीं! मला गुप्त भगंदर रोग (Fistula) होता तो १९४० सालीं एकदम विकोपाला गेला! गुदाच्या मागील बाजूस दीड इंच व्यासाचें आणि साडेपांच इंच खोलीचें भोंक पडलें होतें. त्यामुळें माझ्या देहाचा भरंवसा नव्हता! रात्रंदिवस 'हाय हाय' करीत तळमळत होतों! पण गुरुमहाराजांचें ध्यान व गुरुमंत्राचा जप सारखा करीत होतों. एका गुरुवारीं रात्रीं १२ चे सुमारास महाराज प्रत्यक्ष माझ्या उशाशीं येऊन बसले, असा मला भास (स्वप्नांत) झाला! मला महाराजांनी उठवून बसतें केलें. माझ्या पाठीवरून व तोंडावरून हात फिरवला! समाधिस्थ झालेले महाराज माझ्या जवळ कसे?' या आश्चर्यानें मी ग्लानींतच असतां आश्चर्यचकीत झालों! मग मला तक्याला टेकून बसवून महाराज म्हणाले, "उद्यांपासून तूं मजविषयीं, दत्ताविषयीं व ईश्वराविषयक कविता कर. म्हणजे या भगंदर-विकारांतून मुक्त होशील." इतकें सांगून महाराज गुप्त झाले! दुसऱ्या दिवशीं महाराजांच्याच कृपाप्रसादानें एक वैद्यनाथ भेटले. त्यांचा औषधोपचार सुरूं झाला, त्याला गुण पडत चालला आणि मी कविता करण्यास सुरवात केली. अंदाजें एका महिन्यांत भगंदर पीडेपासून मुक्त झालों! त्याच महिन्यांत श्लोक, पदें व अभंग रूपांत कांहीं कविता लिहिल्या हा केवढा सद्गुरुकृपेचा चमत्कार! या कविता, जवळ पैसे नसल्यामुळें, छापतां मात्र आल्या नाहींत!

भगंदर रोगांतून बरा झाल्यावर १९४३–४४ सालीं 'रावळगांव शुगर फॅक्टरीत' काम धरलें. तेथें पैसा पुष्कळ मिळाला. पण दैवानें घात केल्यामुळें विषमज्वरानें भयंकर आजारी पडलों. नंतर पोटदुखीचा विकार जडला! पोटदुखीमुळें सतत २० वर्षे तळमळून काढली! प्रापंचिक अडचणी धंदा विचित्र. त्यांतच कुटुंबाचा भार या भवचक्रांत महाराजांची विस्मृती झाली! नऊ महिन्यापूर्वीपासून अन्न अजिबात् बंद करावे लागले. तीन महिन्यांत पोटदुखीमुळें वांत्या! अखेर धुळे–सिव्हिल

हॉस्पिटलमध्ये मला ठेवण्यांत आलें. सिव्हिल सर्जनच्या ( शस्त्रक्रियेच्या ) उपचारानंतर ६ व्या दिवशीं शुद्धीवर आलों. पण पोट दुखणें बंद झालेच नाहीं ! १५ दिवस दवाखान्यांत होतों. मजकरितां मुलानें व मुलीनेंहि बराच पैसा खर्च केला, पण याचा उपयोग झाला नाहीं.

## मला विसरलास म्हणून फसलास !

अखेर एका रात्रीं स्वप्नांत दर्शन देऊन महाराज म्हणाले, "अरे तूं मला **विसरलास म्हणून घसरलास ! सर्वत्र मला पहा, म्हणजे पूर्ण बरा होशील !"** खरोखरच, महाराजांच्या या जागृतीप्रमाणें वागायला लागल्यापासून माझा पोटदुखीचा विकार कुणीकडच्या कुणीकडे गेला ! आतां दोन्ही वेळां जेवून काम धंदा उत्तम करीत आहे !

## मुंजीविषयीं भ्रमनिरास आणि शंका-समाधान

आतां कांहीं विशेष आठवणी नमूद करण्या सारख्या आहेत. १९२६-२७ सालीं भडगांवचे सुप्रसिद्ध सदाशिव वामन भडमुळे यांचे गुरु अवणे शिवणीकर महाराज, हे फारच विद्वान व ज्ञानी म्हणून नावाजलेले होते. ते व सदाशिव वामन हे महाराजांच्या ज्ञानाविषयीं रोज आपसांत चर्चा करीत. **महाराजांना केवळ पाठ्यज्ञान आहे. अशा भ्रमांत दोघेहि होते !** मला एकदां यांचेकडून विचारण्यात आलें 'तुझ्या महाराजांशीं आम्हांला कांहीं शास्त्रीय चर्चा करावयाची आहे' तें महाराजांना मी कळविल्यावर त्यांनीं 'येऊं देत' म्हणून संमति दिली. दोघांनीं दररोज ४ ते ६ पर्यंत सायंकाळीं महाराजांशीं शास्त्रीय ज्ञान विषयक चर्चा केली. मग एकदां त्या उभयतांना महाराजांनीं विचारलें 'तुमचें मौजीबंधन झालें ना ?' त्यांनी हंसत 'हो' म्हणून आपापलीं जानवीं दाखविलीं. तसेंच तुम्ही पण जानवें दाखवा' असें ते महाराजांना बोलले "उद्यां दोघे तयारी करून या. म्हणजे दाखवितो !" असें उत्तर दिलें ते तसे झाल्यावर महाराजांनीं दोघांनाहि आपल्या खोलींत नेलें. आणि अनुग्रह देऊन दिव्य ज्ञान दाखवून दिलें ! ( मौजीबंधनाविषयीं श्री अवधूत महाराजांचे स्पष्ट विवेचन श्री. नामदेव नेमाडे व श्री. मेघःशाम बुवा यांच्या आठवणींत आहे, तें पहावें ) भडगांवांत अनेकांचे शंका-निरसन महाराजांनीं केल्यामुळें किती शिष्यभक्त तयार झाले याची माहिती अनेकांच्या आठवणींत असल्यामुळें येथें ती देत नाहीं.

## कीर्तनद्वारा प्रचार करणारे कांहींजण !

या शिवाय वाघडीकर मन्सराम तेली, फकीराशेठ यांनीं महाराजांकडून भगवें घेऊन प्रचार चालविला आहे. महाराजांचे गुरुबंधु गोविंदराव यांचे शिष्य हरिभाऊ

गारगोटीकर हे भगवे घेऊन अवधूत मार्गास लागल्यावर माझ्याकडे एक महिना मुक्कामास होते. अनेकांचा महाराजांनीं उद्धार केला. एका मुसलमान शिष्याची गोष्टही नमूद करण्यासारखी आहेः —

## एक मुसलमान शिष्य

बऱ्हाणपूरचा अल्लाउद्दिन शहा, महाराजांचा अनुग्रह घेण्यासाठीं भडगांवास येऊन मला भेटला. त्यांची शर्त अशी होती कीं " महाराजांचा अनुग्रह घेतल्यावर मी बऱ्हाणपूरच्या पिराच्या तुरबतीवर जाईन. तेथें मला जाईची फुलें पडतांना दिसलीं तरच मी महाराजाचें शिष्यत्व मानीन " हें महाराजांना मी सांगितल्यावर महाराजांनीं अल्लाउद्दिन शहाला बोलावून घेऊन अनुग्रह दिला. त्याला त्याच्या म्हणण्याप्रमाणें पिराच्या तुरबतीवर जाईचीं फुलें दिसलीं! तीं घेऊन दुसरें दिवशीं तो भडगांवीं आला आणि त्यानें खुषीनें महाराजांचें शिष्यत्व मान्य केलें!

## महाराजांचें सगुण दर्शनाचा उपाय!

माझा स्वतःचा अगदीं अलीकडील अनुभव नमूद करतों :–' ज्या भक्तांना गुरुमहाराजांचें प्रत्यक्ष सगुण दर्शन व्हावें ' अशी इच्छा असेल त्यांनीं महाराजांचें अहंनिवृत्तीपर भजन आणि अवधूत हरिपाठ नित्य रात्रीं १२ वाजतां असे अखंड १०८ दिवस भक्तिभावपूर्वक वाचावा म्हणजे महाराजांचें प्रत्यक्ष सगुण दर्शन होईल असें मी स्वानुभवानें म्हणतों. हाहि अनुभव समर्थ सद्गुरुचरणीं अर्पण!

## डॉ. कापसे यांनीं सगुण दर्शनाचा लाभ मिळविला!

वरील अनुभव नमूद करतांना डॉ. कापसे यांची स्मृति झाली त्यांनीं सगुण दर्शनाचा अनुभव कसा मिळविला हा तपशील नमूद करतों :–

मालेगांवचे डॉ. कापसे हे भडगांवास नोकरी निमित्तानें आल्यावर मठींत नित्य-नियमानें महाराजांचे दर्शनास येत. त्यांनीं केडगांवच्या श्री. नारायण महाराजांचा अनुग्रह घेऊन कांहीं योगाभ्यासाचीहि सिद्धी मिळविली होती. श्रद्धाळू व अभ्यासीहि होते. ते गुरांचे डॉक्टर असल्यामुळें एखाद्या शेतकऱ्यास आत्मविश्वासानें सांगत ' तुझें हें जनावर ठीक होईल, ' त्याप्रमाणें घडूनहि येई!

डॉ. कापसे स्वतः ' सिझर ' ब्रँड सिगारेट ओढीत. कित्येक वेळां स्वतः सिगारेट ओढून शेजाऱ्याचे तोंडून धूर काढून दाखवीत! एकदां मला म्हणाले, ' तूं धूर काढ! ' मी म्हटलें, ' तुमचा धूर तुम्हांलाच लखलाभ असो! ' त्यांच्या प्रयोगानें माझ्या तोंडून धूर निघाला नाहीं! मग खजिल होऊन मला एकीकडे नेऊन म्हणाले, " या योगसिद्धीचा आतां मला वीट आला आहे आणि तुझ्या

महाराजांच्या सगुणदर्शनाची तळमळ मला लागली आहे!" मी वर उल्लेख केल्याप्रमाणें १०८ दिवसांचा तो उपाय त्यांना सुचविला. त्यांनीं तसें केल्यावर त्यांनाहि श्री अवधूत महाराजांचे सगुण दर्शनाचा साक्षात्कार होऊन त्यांच्या मनाची भ्रांति फिटली! त्या दिवसापासून ते मला 'बंडू' न म्हणतां 'ज्ञानराया' म्हणत!

× × × ×

सद्गुरुभक्त बंडू लोहार यांनीं श्री अवधूत महाराजांच्या धर्तीवर भजन, पद्यें, सात वारांचीं पदें रचलीं व तीं चांगलीं साधलीं आहेत. तें पुस्तक छापण्याचा त्यांचा विचारहि चांगला आहे. या चरित्रांत त्यांचें वाङ्मय छापण्याला वाव नसल्यामुळें त्यांच्या सदिच्छेला मान देण्याकरितां त्यांतील एक पद आम्ही वानगी-दाखल खालीं देत आहों. —संपादक

पद २९

भजन करा सावकाश। जेणें तुटे यमपाश॥ ध्रु०॥
आसन दयेचें घालुनि निशिदिनीं। सद्गुरूचा मनिं ध्यास॥
मन, पवन एकासनीं स्थिर करी दृष्टीस॥ १॥
एकचित्तानें सहज स्थितीचा। नित्य करी अभ्यास॥
सोहं हंसा अजपाजप। ह्याचि चाले श्वासोच्छ्वास॥ २॥
शांभवी मुद्रा नयनीं चढवितां। पडतो स्वप्रकाश॥
काळा, निळा, पिवळा नाहीं। शुद्ध तो प्रकाश॥ ३॥
साधकानें सावध व्हावे। सोडुनी संशयास॥
चिणी चिणी शंख भेरी। भुलूं नको नादास॥ ४॥
स्वात्मानंदी नित्य रमतां। उणे न आनंदास॥
सद्गुरु प्रेमें कृपा प्रसादें। मुक्त अवधूत दास॥ ५॥

●●●

## भाग पहिला

# आठवण नं. १६

### लेखक :-कौतिक नथू सूर्यवंशी

### ( भडगांव मठींत बांधकाम करणारा एकनिष्ठ भक्त )

लहान वयांतच मला श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचा अनुग्रह झाला होता. दररोज मठींत जाऊन महाराजांचा आत्मबोध ऐकत बसण्याची मला गोडी लागली होती. तो बोध ऐकून मला आनंद वाटत असे. त्या बोधाचें महत्त्व व रहस्य समजण्याचें माझें वय नव्हतें तरीहि ऐकत बसण्यास गोडी वाटे! माझे वडील गवंडी काम करीत व मी त्यांचे हाताखालीं कामें करतां करतांच मी गवंडी कामांत तयार झालों.

### गुरुमहाराजांनीं प्रोत्साहन दिलें.

मठींत महाराजांनीं मला विचारलें, "तूं काय काम करीत असतोस?" मीं म्हटलें, "माझ्या वडिलांचे हाताखालीं मी थोडें गवंडी काम करीत असतों." त्यावर महाराज म्हणाले, "मी तुला येथें थोडें गवंडी-काम देतों, तुला येईल तसें तूं करीत जा." 'त्या प्रमाणें' मी त्या कामास लागलों. माझा कामाचा अनुभव थोडा असल्यामुळें महाराजांनी सांगितलेलें काम तितकें चांगलें झालें नाहीं, असें मला वाटलें. पण महाराज मला धीर देत म्हणाले, "अरे कौतिक, तुझें काम छान झालंय. आतां यापुढें मठींतील बांधकाम तूंच करीत जा" महाराजांनीं मला माझ्या कामांत असें प्रोत्साहन तर दिलेंच; शिवाय मठींतील कामें करतांना माझी खाण्यापिण्याची व विश्रांतीची छान बडदास्त ठेवून मला कामाची मजुरीहि गांवांतील मजुरीच्या मानानें चांगली देत राहिले! महाराजांनीं आपल्या हयातींत मठींतील बरीचशीं बांधकामें करून घेतलीं. मी मजुरीचा दर ठरविला नाहीं आणि आग्रहानें कधीं मजुरी मागितलीहि नाहीं! तरीहि महाराजांनीं मला योग्य मजुरी वेळच्या वेळीं दिली. गुरुमहाराजांच्या या कृपेमुळें मी मठींतील कामाची कधींहि टाळाटाळ केली नाहीं. माझा व्यवसायहि त्यांच्याच कृपेनें ठीक चालला आहे.

मठींतील कामाच्या असल्या ओढीमुळें माझा मत्सर करणाऱ्यांनीं मला नांवे ठेवून बरी-वाईट भाषाहि वापरण्यास सुरवात केली. पण मी त्या सर्वांकडे दुर्लक्ष करून मठीवरील भक्ति-प्रेमाच्या निष्ठेंत अंतर पडूं दिलें नाहीं !

मठींत केव्हा जावयाची संधि मिळते आणि गुरुमहाराजांच्या सान्निध्यांत राहून त्यांचा बोध केव्हां ऐकावयास मिळतो, अशी मला ओढ लागे ! यामुळें मठींतील कामें करण्यांत मला फार आनंद वाटे. माझे काम चालू असतां वरचेवर येऊन गुरुमहाराज मला हंसतमुखानें उत्तेजन देणारी भाषा बोलत. महाराजांच्या व्यवहारदक्ष वागणुकीमुळें मला मठींत खाण्यापिण्याची चंगळ असे आणि मजुरी कधीहिं मांगावी न लागतां योग्य ती योग्य वेळीं मिळे. पुढे पुढें महाराजांचे कारकीर्दींतील उत्तम बांधकामें महाराजांनीं प्रोत्साहन देऊन मजकडून करवून घेतली ! व तीं मला करतां आलीं ती महाराजांचीच कृपा यांत शंका नाहीं ! त्या काळांत महाराजांच्याच कृपेमुळें मला पारमार्थिक वाङ्मय वाचण्याचाहि नाद लागला. पंतमहाराजांची प्रेमलहरी व महाराजांचीं पदें व भजनें वाचूं लागल्यामुळें महाराजांच्या अध्यात्म बोधाचें महत्व व रहस्य हळूंहळूं मनावर जास्त परिणाम करूं लागलें. या परमार्थ-प्रकाशामुळें मी संसार-व्यवहार परमार्थ दृष्टीनें करण्याचा आनंद उपभोगूं लागलों ! महाराजांच्या या थोर कृपेमुळें माझा हा परमार्थ दृष्टींतील संसार छान चालला आहे.

## संतती झाली : वैगुण्य गेलें

मला मूल-बाळ नसल्यमुळे गावातील लोक नावें ठेवीत असत. पण तुढें संतति होऊन हेंहि लोकांच्या दृष्टीला दिसणारे वैगुण्य नाहींसें झालें.

## श्री अण्णा महाराजांनींहि पुढें प्रोत्साहन चालूं ठेवलें

मोठ्या महाराजांचे कारकीर्दीत, महाराजांच्याच देखरेखीखालीं, पुढील कमानी व दर्शनी गोल खांब माझे हातून झालें तें पाहून महाराजांना अतीशय आनंद झाला ! बाहेरील श्री दत्तमूर्तीपुढील कमानहि महाराजांनीं माझेकडूनच करवून घेतली.

## प्राणसंकटांतून गुरुकृपेचें रक्षण !

एकदां १२ फूट उंच व २५ फूट लांब इतकें बांधकाम झालेली भिंत एकाएकी कोसळली ! आणि माझ्या हाताखाली काम करणारीं माणसें दूर फेकले

गेलों! पण मला व माझ्या हाताखालील लोकांना कसलीहि इजा न होतां आम्ही सर्व सुरक्षित राहिलों. खरोखर हा गुरुमहाराजांच्या आशीर्वादाचा आणि गुरुभक्त परमपूज्य अण्णांच्या पुण्याईचाच प्रभाव असें आम्हांला वाटलें!

मी श्री. अण्णांनाहि गुरुस्थानीं मानून गुरुभक्तिप्रेमाचा आनंद भोगीत आहे. अजूनहि नवें बांधकाम निघालें कीं परमपूज्य अण्णा मला बोलावून घेतात आणि मीहि मोठ्या आनंदानें व तत्परतेनें कामावर हजर होतों. सर्व कामाची जबाबदारी अण्णा मजवरच विश्वासानें सोंपवितात. मठीच्या विस्ताराचें सर्व बांधकाम चांगल्या रीतीनें पुरें होऊन ऐहिक व पारमार्थिक दृष्टींची सांगड घालण्याची आणि मानव कल्याणाची ही गुंरुपरंपरा भरभराटीस येवो, हीच श्री दत्त प्रभुचरणीं प्रार्थना.

● ● ●

## भाग १ ला

# आठवण नं. १७

लेखिका : श्रीमती गंगूबाई गोडबोले

( घ. नं. ५४२ बुधवार पेठ, कासार गल्ली, पुणे २. )

### आईची तळमळीची तपश्चर्या

माझ्या आईची व अवधूत महाराजांची भेट इ. स. १९१८ सालीं झाली. देवभक्तीची, पोथ्या पुस्तकें वगैरे भक्तिपर वाङ्मय वाचण्याची आणि कथा कीर्तनें ऐकण्याची माझ्या मातुश्रींना फार आवड होती. माझे वडील मी लहान असतांनाच देवाघरीं गेले. त्यामुळें आपलें उरलेलें आयुष्य भक्तिमार्गांत घालविण्याचा निश्चय माझ्या आईनें केला. भक्तिमार्गाच्या वाङ्मयाचें वाचन आणि कीर्तन प्रवचनांचें श्रवण यांमुळें एखाद्या अधिकारी सत्पुरुषाचा अनुग्रह घेऊन जन्माचें सार्थक्य साधण्याची माझ्या मातुश्रींना तळमळ लागून राहिली होती. तशा सत्पुषाच्या शोधांत ती होती. शास्त्री-पंडित व साधु-पुरुषांच्या गांठी भेटी घेऊन माझ्या मातुश्री सत्पुषाच्या शोधांत व निवडीत सारख्या असत. परंतु योग्य बोध न मिळाल्यामुळें तिचें समाधान होईना. तीर्थयात्रा करून मनस्वास्थ्य मिळविण्याचाहि तिनें प्रयत्न केला. एक तप—म्हणजे बारा वर्षें—तिची या प्रकारची तळमळीची तपश्चर्या चालू होती. मग माझ्या आईच्या व माझ्या भाग्योदयाचा काळ नजीकच आल्याची तिला व मलाहि त्यावेळीं जाणीव नव्हती !

इ. स. १९१८ ला अवधूत महाराजांचा मुक्काम पुणे शहरीं झाला. ते कुरुंदवाडकरांच्या वाड्यांत उतरले होते. त्यावेळीं तपकीर गल्लींतील खरे यांच्या विठ्ठल मंदिरांत महाराजांचा कीर्तम सप्ताह चालू होता. ही बातमी शहरांत पसरतांच कीर्तनाला हजारों लोक जमूं लागले ! सुबोध कीर्तन व गुरुबोधाचें तेजस्वी सामर्थ्य याविषयींची वर्णनें अनेक मुमुक्षु श्रोत्यांचे मार्फत माझ्या मातुश्रींचे कानांवर आलीं. श्री अवधूत महाराजांच्या कीर्तनाची व तेजस्वी वृत्तीची थोरवी ऐकतांच ४ ते ६ चे सुमारास घरांतून धांवतच ती विठ्ठल-मंदिराकडे गेली ! परंतु मंदिराचे आंत बाहेर

अलोट गर्दी असल्यामुळें बाहेर उभे राहूनच बोधामृताचे चार शब्द दुरून ऐकूनच साडेदहाचे सुमारास घरीं परतावें लागलें! दुसरे दिवशीं मला बरोबर घेऊन माझी आई कीर्तन सुरूं होण्याचे अगोदर दीड तास मंदिरांत जागा धरून बसली! गांवांतील मोठमोठ्या शास्त्री–पंडितांची कीर्तन-श्रवणासाठीं गर्दी झाली. महाराज देवळांत आल्याबरोबर कीर्तन ऐकण्यास उत्सुक असलेले लोक सर्वत्र शांत बसले. महाराजांचे अंगावर भगवी कफनी, डोकीस भगवा सुंदर फेटा, गळ्यांत शुभ्र स्फटिकांची आणि टपोऱ्याच रुद्राक्षांची माळ व कफनीवर रुळणारी शैली, अशा थाटांत गोरे व तेजस्वी कांतीचे महाराज उठून उभे राहिले आणि कीर्तन-निरुपणाला सुरवात झाली. त्यांचे हातांतील पांढऱ्या गारांच्या करताळाचा नाद ऐकून श्रोतृवर्ग चकितच झाला! महाराजांचे पायांत चाळ बांधले होते आणि नामस्मरण–भजनाचे वेळीं ते नाचत; यामुळें करतळांचे आवाजांत चाळांचा आवाज आणि मुखानें भजनाचा आवाज या त्रिरंगाचे नादांत भाविक श्रोते तल्लीन होऊन जात!

नामस्मरणानंतर पूर्वरंगाचें निरूपण सुरू होई. '**गुरू पहातां लक्ष–कोटी**' या समर्थांच्या श्लोकाचें विवरण करून '**गुरुपदांबुजीं अलिहोई**' या पदाचा भावार्थ सांगून महाराजांनीं श्रोतृगणांना तल्लीन केलें.

नंतर महाराजांनीं संत सखूचें आख्यान लावलें. आम्ही अनेक हरिदासांचे कीर्तनांत हें आख्यान पूर्वी ऐकलें होतें. पण महाराजांची त्या आख्यानाचें निरूपण आणि त्यांतील रहस्य रंगविण्याची शैली अगदीं अपूर्व वाटली! माझ्या आईच्या व माझ्या मनावर त्याचा इतका परिणाम झाला कीं पुढें कीर्तनें संपेपर्यंत आम्ही एकसारख्या कीर्तनाला हजर राहूं लागलो. इतकेंच नव्हे तर महाराजांचे मुक्कामीं जाऊन त्यांचा बोध घेण्याची इच्छाहि माझ्या आईनें महाराजांचे कानांवर घातली.

## अनुग्रहास काय लागते?

'अनुग्रह देण्यास काय लागते?' असा माझ्या आईनें महाराजांना प्रश्न केला व कळकळीच्या शब्दांत म्हणाली, 'कीर्तनांत सांगितलेला बोध मला पटला. अनेक साधुसंतांना भेटून व त्यांची चर्चा ऐकून मला शांति—समाधान लाभलें नाहीं. तें आपल्या सात दिवसांच्या कीर्तनांतील बोधानें लाभलें. आपण 'राजयोगी' आहां अशी मनाची खात्री झाली. आपल्या बोधामृताने जिवास शांति—समाधान लाभेल असा आत्मविश्वास वाटूं लागला. आतां आपल्या पायीं पडते, तारा अगर मारा!"

महाराज म्हणाले, "अनुग्रहासाठीं काय लागते असा प्रश्न तुम्हीं केल्यात मी सांगेन तें द्याल कां?" त्यावर माझ्या मातुश्रीनें चटकन् 'हो' कार दिला. महाराज मग म्हणाले, "तुमच्या अंतःकरणांतील 'मीपणा' संपूर्ण अर्पण करीत असाल तर अनुग्रहासाठीं केव्हांहि या. आणखी दुसरें कांहीं लागत नाहीं!"

शुभ दिन वेळ पाहून कुरुंदवाडकर वाड्यांत माझ्या मातुश्रींनीं (त्यांचें नांव राधाबाई जोशी) यांनीं इ. स. १९१८ सालीं अनुग्रह घेतला. शुद्ध भावनेनें महाराजांना नमस्कार करून ती महाराजांचे सान्निध्यांत बसली. तिचें अंतःकरण जाणून महाराजांनीं तिला अनादिसिद्ध अवधूत सांप्रदायाचा 'तारकमंत्र' दिला. माझ्या मातुश्रीचें अंतःकरण 'त्यामुळें शांत समाधानी झालें' आणि 'धन्य सद्‌गुरु माउली' असे सहजोद्‌गार तिच्या तोंडून निघाले! लगेच आपली मुलगी श्रीमती गंगूताई हिला (म्हणजे मला) घेऊन ती गुरुमाऊलीकडे गेली. 'ज्याप्रमाणे माझेवर पूर्ण कृपा केलीत तशीच माझ्या मुलीवरहि करा' अशी माझ्या आईनें महाराजांना विनंती केली. तेव्हां ते म्हणाले "आपण आपल्या मुलीस घेऊन श्रावणमासीं कुरुंदवाडासच या. श्रावण अष्टमीला माझे परमपूज्य सद्‌गुरु श्रीपंत महाराज यांचा जन्मोत्सव मी कुरुदवाडीं करीत असतों. त्यावेळीं दोघींना उत्सव सोहाळा पहावयास मिळेल आणि उपदेशहि घेतां येईल"

## दोघीं कुरुंद्‌वाडास गेलों.

महाराजांच्या आज्ञेप्रमाणें इ. स. १९१८ सालींच आम्ही श्रीपंत महाराजांच्या जन्मोत्सव प्रसंगीं कुरुंद्‌वाडास गेलों. तो उत्सवाचा सोहळा अनुभवून आम्ही थक्क तर झालोंच; पण धन्यताहि वाटली! उत्सवांत भजन-टिपऱ्या कीर्तनादि भरगच्च कार्यक्रम होते. ते कार्यक्रम अनुभवून आमच्या मनांतील शंका-उपशंकादि पार नाहींशा झाल्या! पंताच्या जन्मदिवशींच माझ्या आईच्या विनंतीप्रमाणें, मलाहि अनुग्रह देऊन गुरुमाऊलीनें पूर्ण कृपा केली! आम्ही दोघीहि अतीशय आनदित झालों. महाराज व्यवहारांतहि अतीशय दक्ष असून उत्सवासाठीं येणाऱ्या भक्तांना अत्यंत प्रेमानें वागवून कसलीहि न्यूनता भासूं देत नसत! असें असूनहि भक्तांकडून कसलीहि अपेक्षा करीत नसत!

अशी परिस्थिति प्रत्यक्ष अनुभवल्यापासून आमची गुरुमाऊलीचें ठिकाणीं पूर्ण श्रद्धा बसली. त्यांच्या विचारेंच आम्ही पुढील आयुष्यांत संसार परमार्थरूपानेंच आनंदानें करीत आलों.

## पुण्यांत घर खरेदी

थोड्याच कालावधींत, म्हणजे १९१९ सालीं, माझ्या मातुश्रींनीं पुणे शहरीं बुधवार पेठेंत घर खरेदी केलें. गुरुमहाराजांना कुरुंदवाडास ही आनंदाची बातमी पत्रानें कळवून आमच्या या घरीं गुरुमहाराजांनीं आपली चरणधूळी झाडून तें पावन करावें अशी विनंतीहि आम्ही केली. श्री गुरुमहाराजांना आनंद होऊन चारच दिवसांनीं ते पुण्यास आमच्या घरीं येऊन उतरले. त्यावेळीं श्री पंतमहाराजांच्या फोटोचें अधिष्ठान आमचेकडे ठेवून चार दिवस मुक्काम करून शुभाशीर्वाद दिला आणि नंतरच मुंबईस गेले. यानंतर मुंबईहून कुरुंदवाडास जातां येतां आमच्या घरीं पुण्यास उतरीत असत.

१९१९ सालीं आमचें घरींच कीर्तन करून अनेक भाविकांना अनुग्रह दिला. शहरांतहि कीर्तनें करून अनेक भाविकांना भक्तिमार्गास लाविलें. यामुळें पुणें शहरीं अवधूत सांप्रदायाचा बराच प्रचार झाला.

## बाळेकुंद्रीस

२–३ वर्षें लोटल्यानंतर श्रीपंत महाराज बाळेकुंद्रीकर यांच्या पुण्यतिथीचा उत्सव बाळेकुंद्रीस होत असल्याची माहिती सांगून आम्हा दोघींनाही ते बाळेकुंद्रीस घेऊन गेले. तेथील प्रेमभक्ति सोहाळा पाहूनहि आम्हाला अतीशय आनंद व धन्यता वाटली. त्यावेळीं पंतांच्या मातुश्रींना आम्ही भेटावयास गेलों होतो. त्यांना नमस्कार करून समोर बसलों त्यावेळीं त्यांनीं माझे मस्तकावर हात ठेवून कृपाशीर्वाद दिला. मग मला प्रेमानें जवळ घेऊन म्हणाल्या, "काय ग, येवढ्या लहान वयांत तुला भक्तिमार्गांची गोडी कशी लागली? माझ्या दत्तूचें नांव तुला कसें समजलें?" मी म्हणालें "माझे गुरु श्री अवधूत महाराज सर्व माहिती सांगून आम्हाला घेऊन आले आहेत."

पंतमहाराजांच्या मातोश्री म्हणाल्या "तुझे महाराज म्हणजे मोरू कां?" मी होकार दिल्यावर त्या पुढें म्हणाल्या "माझा मोरू फारच प्रेमळ असून माझ्या दत्तूच्या नांवाचा तो बराच प्रचार करीत असतो." त्यांचे ते शब्द मी जसेच्या तसे नमूद करीत आहे, ह्यांवरून श्रीपंत मातुश्रींचे माझ्या गुरुमहाराजांवर किती प्रेम व विश्वास होता हें स्पष्ट होतें.

पंत मातुश्रीप्रमाणेंच पंतांचे सर्व बंधूहि श्री अवधूत महाराजांना फार मानीत असत, सर्व बंधूना आमचे घरीं आणून महाराजांनीं आम्हांला

उपकृत केलें आहे. महाराज आमचे घरीं आल्याची बातमी पुण्यात त्वरित पसरे आणि असंख्य भक्तमंडळी बोध ऐकण्यासाठीं जमत. या भक्तमंडळींत श्री. अण्णा साहेब देशपांडे वकील, कापडाचे व्यापारी श्री. बाळासाहेब भरडी, म्युनिसिपालिटींचे अधिकारी श्री. दादासाहेब गोडसे, किर्लोस्कर थिएटरचे (आतां वसंत टॉकीज) मालक श्री. मार्तंडराव टापरे ही मंडळी प्रमुख असे. श्री. धूतपापेश्वर कारखान्याचे एजंट श्री. भिकाजी रामचंद्र खरे हे आमच्या घरींच अनुग्रहीत झाले. भक्तांचा अलोट समाज गुरुभक्तीप्रेमाची लूट करीत असे. बोध निरूपणाचा तपशील माझ्या सारख्या बुद्धिहीनाला ठीक सांगता येणार नाहीं. परंतु इतकें खरें कीं गुरुमहाराजांची आत्मबोध करण्याची हातोटी फारच अप्रतीम होती. एकसारखे १०–१२ तास आत्मबोध करीत आणि श्रोतृगणांना तल्लीन करून सोडीत! मी हें प्रत्यक्ष पाहून आणि अनुभवून सांगत आहे. "धन्यधन्य माझे गुरुमहाराज!"

## श्री दत्तमूर्ति भडगांव मठीसाठीं देण्याचे आश्वासन

१९२१ सालीं आम्ही फिरून बाळेकुंद्रीस उत्सवानिमित्त गेलो होतों. श्री दत्तमूर्ति भडगांव मंदिरास देण्याचें आश्वासन माझ्या मातुश्री श्री. राधाबाई जोशींनीं दिलें आणि मंदिर बांधण्याचें आश्वासन श्री. मुकुंदराव राणे यांनीं दिलें. त्यावेळीं बेळगांवास पंतांचा वाडा पहाण्यासहि गेलों असतां, वाड्यांत सर्व पंतबंधु आणि आमचे गुरुमहाराजहि होते. तसेच गुरुबंधु मुकुंदराव दादाजी राणेहि तेथेंच होते. भडगांवास श्रीदत्तमंदिर बांधण्याविषयींच्या महाराजांच्या मनोगताविषयींची चर्चा चालू होती. "पूर्व खानदेशांतील या ठिकाणीं श्रीदत्त मंदिर बांधल्यानें हजारों लोकांना श्रीपंत—भक्तीस लावतां येईल आणि श्रीपंतांची आध्यात्मिक थोरवीहि या लोकांना पटवितां येईल" अशा स्वरूपाचे विचार महाराजांनीं सर्वांपुढें मांडले होते. या विचारांची चर्चा ऐकतांच माझ्या मातुश्री एकदम म्हणाल्या, "या मंदिरासाठीं मी श्रीदत्तमूर्ती घेऊन येते." माझ्या मातुश्रींचे तोंडून सदरील शब्द बाहेर पडतांच श्री. मुकुंदराव राणे यांनीं मंदिर बांधून देण्याची तयारी दाखविली!

## 'मोरबा तूं पंतांचा सच्चा भक्त आहेस'

## श्री. गोविंदराव दादांचे उद्गार!

हें ऐकतांच श्रीपंत बंधूंना फार आनंद झाला. त्यापैकीं सर्वांचे वतीनें श्री. गोविंद दादा गुरुमहाराजांना म्हणाले, "मोरबा, तूं श्रीपंतांचा सच्चा सद्भक्त आहेस तुझे मनांत येईल तें सहज घडावें अशी तुझेवर

**श्रीपंतांची कृपाच आहे. "** श्रीपंतबंधू श्री. दादा यांचें हें म्हणणें खरें ठरलें ! माझ्या मातुश्रींनीं ठरल्याप्रमाणें श्री दत्तमूर्ती आणून अर्पण केली आणि श्री. मुकुंदराव राणे यांनींहि मंदिराची घुमटी बांधून दिली. श्री महाराजांनीं थोडीफार रक्कम जमवून श्री दत्तमंदिराचें काम भडगांवांस पुरें केलें. श्री दत्तजयंतीचा उत्सव आणि श्रीपंतमहाराजांचा जन्मोत्सव असे दोन उत्सव भडगांवच्या श्रीदत्तमठींतच होऊं लागले. महाराजांच्या मनोगताप्रमाणें पूर्व खानदेश जिल्ह्यांतील हजारों माविक भक्त आज पंत–अवधूतमार्गांत रंगलेले आहेत. **महाराजांसारख्यांच्या सत्पुरुषांचे तोंडचीं वाणी अशा चमत्कारांनीं खरी ठरते हें आम्ही प्रत्यक्षच पहात आहों.** म्हणूनच **'धन्यगुरुमाता'** असे उद्गार आम्हांसारख्या भक्तांचे तोंडून निघतात ! भडगांव श्रीदत्तमठींत श्रीदत्तांची स्थापना झाल्यानंतर इ. स. १९२७ पासून आम्ही दरवर्षी पुण्याहून भडगांवीं उत्सवास जात असूं; उत्सवाचे दिवस जवळ येतांच जाण्याचें औत्सुक्य आणि आनंदोत्साह वाटे. आमचे बरोबर पुण्याहून बरीच भक्त मंडळीहि भडगांवास येत. महाराज सर्व भक्त मंडळीची बडदास्त मोठ्या प्रेमानें व आनंदानें राखीत.

## आमच्यावरील कृपाछत्र गेलें !

इ. स. १९३९ सालीं गुरुमहाराज स्वानंदवासी झाल्याची दुःखद वार्ता आम्हांस समजली. **'आमच्यावरील कृपाछत्र गेलें'** असेंच आम्हांला वाटलें ! मी त्यावेळीं आजारी असल्यामुळें मला आईनें ही बातमी एकदम सांगितली नाहीं, बरें वाटल्यावर मला कळलें त्यावेळीं मला अत्यंत वाईट वाटलें. पण महाराजांचा आत्मबोध ऐकल्यामुळें मन स्थिर ठेवण्याच्या प्रयत्नांत आम्ही यश मिळविलें. ४–५ वर्षें आम्ही दोघींनीं मन स्थिर राखण्याच्या प्रयत्नांनीं कालक्रमणा केली. पण **माझी आईहि १९४२ सालीं देवाघरीं गेली.** यापूर्वीं एक वर्ष माझ्या आईनें घर व सर्व जवळचा ऐवज माझ्या नांवें केली. आईचें आणि गुरुमाऊलीचें स्मरण होऊन मला चुकल्या चुकल्यासारखें वाटूं लागलें !

## माझ्या मनांतील हेतू : अण्णांचें मार्गदर्शन

माझ्या सारख्या स्त्रीची ही अवस्था ध्यानीं घेऊन माझे गुरुबंधू (श्री. श्रीदत्त महाराज) आणि गुरुबंधु मेघःशाम हे वरचेवर येऊन भेटत आणि गुरुमहाराजांच्या बोधामृताची आठवण देऊन धीर देत. अखेर अशाच एका खेपेस माझे

गुरुबंधु श्री दत्तात्रय महाराज यांना माझ्या मनांतील हेतू एकदां सांगून टाकला. मी म्हटलें, "अण्णा, आपला एक मुलगा दत्तक घेण्याची माझी इच्छा असून, जें कांहीं माझ्या मातुश्रीनें माझें नांवें करून ठेविलें आहे त्याचा त्याला वारस करावा" माझा हेतु समजल्यावर अण्णा म्हणाले "आपण कुलीन घराण्यांतील आहात; धर्मशास्त्राला अनुसरून आपल्याच घराण्यांतील एखादा सत्शील मुलगा पाहून त्यालाच दत्तक घेऊन वारस व कुलदीपक करणें योग्य होईल. त्यामुळें तुमचें व आमचें भक्तिप्रेमाचें नातेंहि अखंड राहील." श्री अण्णांचे श्रीदत्तात्रय महाराजांचे–हे विचार ब्रह्मवाक्य समजून मी माझ्या सासरच्या घराण्यांतील चि. श्रीकृष्ण विष्णुपंत गोडबोले या माझ्या मोठ्या दिराच्या नातवाला दत्तक घेतलें. इतकेंच नव्हे तर त्याचा विवाह करून त्याचेवरच वारस या नात्यानें व्यवहाराची सर्व जबाबदारी सोंपविली. त्यामुळें मी श्रीगुरुमाऊलीच्या सत् बोधामृत चिंतन–मननासाठीं मोकळी झाले. त्याचा आनंद व शांति समाधान आतां मी उपभोगीत आहे.

१९५६ सालीं चैत्रमासीं श्री. श्रीकृष्ण विष्णुपंत गोडबोले याना दत्तक घेतल्यावर १९६१ सालीं ते भडगांवीं आले आणि माझे गुरुबंधू श्री दत्तात्रय महाराज यांनीं भडगांवींच त्यांना अनुग्रह दिला. या माझ्या दत्तक मुलाला त्यावेळीं श्रीगुरुभक्तीची अत्यंत गोडी असल्याचें अनुभवास आलें.

एकंदरींत माझी गुरुमाऊली व श्री मातुश्री स्वानंदवासी झाल्यानंतर आतां पर्यंत माझे श्रीगुरुबंधु श्री. अण्णा–श्री दत्तात्रय महाराज यांनींच मला योग्य मार्ग दाखवून सर्व उणीव भरून काढली, हें मला विसरतां येणार नाहीं. माझे सद्गुरु श्री मोरेश्वर महाराज आणि गुरुबंधु श्री. अण्णा–दत्तात्रय महाराज आणि गुरुबंधु मेघःश्याम या सर्वांच्या कृपेनें, सर्व पंतबंधु सर्वश्री भाऊसाहेब, बाबुराव, बापूसाहेब इत्यादींनीं माझ्या घरीं चरणधूळी झाडली आहे.

सदरील आठवणीं माझे गुरुबंधु श्री. मेघःश्याम यांनीं अत्याग्रहपूर्वक विचारून घेतल्या व मी माझ्या अल्पबुद्धीप्रमाणें व स्मृतीप्रमाणें त्या सांगितल्या त्याप्रमाणें त्यांनीं लिहिल्या आहेत.

\+ \+ \+ \+

पुढें १९६४ च्या चातुर्मासांत श्री दत्त महाराज तथा अण्णा यांनीं गुरुबंधु मेघःश्याम यांना मुद्दाम पुण्यास पाठवून मला भडगांवी नेलें आणि तेथें चातुर्मास-

अखेर राहून दत्त महाराजांच्या कीर्तनांतून गुरुमहाराजांचें बोधामृत आकंठ प्राशन करण्याचा लाभ झाला. पुढें अन्नकोटाचा अपूर्व सोहाळा प्रत्यक्ष पाहण्याचाहि लाभ मिळाला आणि अंतःकरणाचीहि तृप्ति झाली आणि माझ्या आत्मानंदाच्या सुखावर कळस चढल्यासारखें वाटलें ! मग माझी पुण्याच्या घरीं—म्हणजेच 'माहेरहून सासरी' पाठवणी झाली ! बोधामृत व अन्नकोटाचा सोहाळा माझ्या हृदयांत आयुष्याचे अखेरीपर्यंत राहील आणि तीबद्दल मी गुरुमहाराजाची आणि गुरुबंधु श्रीं दत्त महाराज व मेघःश्यामबुवा या सर्वांना धन्यवादच देत राहीन.

• • •

## भाग पहिला

# आठवण नं. १८

( लेखिका : श्रीमती भागिरथीबाई गोपाळ देशपांडे, पुणे )

### गरीबींत मुलाचें शिक्षण

माझे पति तारमास्तरची रेल्वेची नोकरी करीत होते. माझा एकुलता एक मुलगा चि. बंडू ९ वर्षांचा असतांच वडील गेल्यामुळें मला अत्यंत गरीबींत मुलाचें शिक्षण करावें लागले. तो मिळविता झाल्यावर मी मोकळी झाले. त्याचें शिक्षण बेताचेंच झालें, पण त्याचा स्वभाव प्रेमळ व लाघवी असल्यामुळें त्यानें कांहींना कांहीं उद्योग करून गरीबींतच उदरनिर्वाह चालविला. माझ्या मुलाला ३ मुली व २ मुलगे माझी सूनबाईहि मुलाप्रमाणें प्रेमळ आणि माणसें जोडणारी आहे.

### पूज्य गुरुमहाराजांची प्रथम भेट

मुंबईस गुरुमहाराजांचे गुरुबंधू श्री. शिवाप्पा हे आम्ही रहात असलेल्या ठिकाणाजवळून फेरीस जातांना ॥ अवधूता गुरुवरा, भक्त जनांच्या माहेरा ॥ हें पद गोड आवाजांत म्हणत जात. त्या पदानें माझ्या अंतःकरणाचा ठावच घेतला ! श्री. शिवाप्पांना भिक्षा घालून मी त्यांचेकडून महाराजांचें नांव व रहाण्याचा पत्ता विचारून घेतला. गुरुमहाराज जयकर वाडींतील श्री. शिवाप्पांचे झोंपडींतच त्यावेळीं मुक्कामास होते. आगरबाजारांतील मारुतीचे मंदिरांत त्यांचीं कीर्तनें चालूं होतीं. मी शिवाप्पांचे झोपडींत जाऊन गुरुमहाराजांचे डोळे भरून दर्शन घेतलें आणि नमस्कार केला. तसेंच मारुती मंदिरांत महाराजांचा कीर्तनांतील बोधहि ऐकला. त्यावेळीं गुरुमाउलीच्या थोर अधिकाराची कल्पना आली. चारच दिवसांनंतर शुभदिन पाहून महाराजांनीं शिवाप्पाचे झोंपडींतच मला अनुग्रह देऊन धन्य केलें. त्यांचा बोध वारंवार ऐकून माझें मन शांत-समाधानी झालें. नंतर माझ्या बिऱ्हाडीं येऊन महाराज माझें व मुलाचें सांत्वन करूनहि जात. त्यानंतर महाराजांनीं व त्यांचे सुपुत्र श्री. दत्तमहाराज तथा अण्णा-यांनीं देखील आम्हांला वेळोवेळीं सांवरून धरून कमतरता पडूं दिली नाहीं. वय १९ असतांना चि. बंडूलाहि महाराजांनीं अनुग्रह दिला तो त्यानंतर महाराजांच्या कृपेनें उद्योग करीत राहिला.

कांहीं दिवसांनीं माझा मुलगा कोणाच्या तरी मदतीनें लहानसा छापखाना चालवून उदरनिर्वाह करूं लागला. दादरच्या आमच्या बिऱ्हाडीं गुरुमहाराज वरचेवर येऊन आम्हांला मार्गदर्शन करीत. महाराजांच्या मार्गदर्शक कृपेनेंच आम्ही आजचे दिवस पहात आहों.

## श्री दत्तमहाराजांनींहि कुटुंबीयांप्रमाणें वागविलें

१९३९ सालीं गुरुमहाराज गुढीपाडव्याचे मध्यरात्रीं स्वानंदवासी झाले. त्यावेळेस माझा मुलगा चि. बंडू अखेरच्या दिवसांत आणि और्ध्वदेहिक दिवसांत प्रत्यक्ष हजर होता. त्याप्रसंगीं आम्हां सर्वांना काय आणि किती वाईट वाटलें तें शब्दांनीं नमूद करण्यास मी असमर्थ आहे! महाराजांचे पश्चात् त्यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज ऊर्फ अण्णा महाराज यांनीं आम्हांला अनेक अडचणींत मदत करून आपल्या कुटुंबीयांप्रमाणें आपुलकीनें वागविलें. त्यांचीहि आमच्यावर पूर्ण कृपा आहे.

## चि. बंडूचें लग्न श्री दत्तमहाराजांनीं जमवून दिलें

श्री दत्तमहाराजांनींच पुढाकार घेऊन नाशीक येथील सत्शील घराण्याचे श्री. वासुदेव पांडुरंग कुळकर्णी यांची द्वितीय कन्या सौभाग्य कांक्षिणी बाबी हिच्याशीं जमवून दिलें आणि थाटानें लग्न केलें. आणि आपुलकी आजतागायत चालू ठेविली आहे. माझ्या मुलाचा मोठा मुलगा चि. मधू याची मुंजहि भडगांवीं श्री दत्तमहाराजांनीं स्वखर्चानेंच केली.

गुरुमहाराजांची कीर्तन करण्याची हातोटी फार परिणामकारक होती. त्यांचा बोध ऐकून मनांतील शंकांचें पार निरसन होई. मनाचे ते प्रेमळ, उदार आणि सर्वांना समदृष्टीनें पहाणारे आणि वागविणारें होते.

× × × ×

१९५७ सालीं चि. बंडूचे पाठीवर काळपुळी होऊन दुखणें जवळ जवळ असाध्य, असें डॉक्टरांनीं सांगितलें. असतांना गुरुमाऊलीचे कृपेनें त्याचें रक्षण होऊन माझ्या वृद्धावस्थेंत मुलाचा आधार तुटला नाहीं. आम्ही भडगांवला वरचेवर जाऊन वरचेवर आपल्या माहेराप्रमाणे भक्तिप्रेमाचा सोहाळा भोगून येतों. घरीं गुरुमहाराजांचे फोटो-अधिष्ठान ठेवून भजन पूजन नित्यनेमानें करीत असतो. १९४२ सालीं आम्ही मुंबईहून येऊन पुण्यास बिऱ्हाड केलें. गुरुमाऊलीचे कृपेनें माझा नातू मिळविता झाला व आतां ठीक चाललें आहे.

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. १९

( लेखक : चिन्दा न्हावी, भडगांव पूर्वखानदेश )

पूज्य श्री महाराजांविषयींचे माझे थोडे अनुभव, पूज्य गुरुमहाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव श्री. दत्त महाराज आणि गुरुबंधु मेघःश्याम व इतर कांहीं गुरुबंधू यांच्या आग्रहावरून श्री. मेघःश्याम यांचेजवळ सांगितले आहेत.

गुरुमहाराज प्रत्यक्ष भेटींत ज्या भक्तिप्रेमाच्या गोष्टी सांगून उपदेश करीत तो ऐकण्यास परमानंद वाटत असे. तो जशाचा तसा सांगण्याइतका मी शिकलेला नाहीं.

माझें शिक्षण भडगांवांतच झाले. माझे वडील बंधू मोतीराम हे शाळेंतून घरीं आल्यावर मला पारमार्थिक गोष्टी सांगत. माझे शाळेंतील शिक्षक श्री. परशराम मास्तर हेहि महाराजांचे अनुग्रहीतच होते; केळकरांचे वाड्यांत मी त्यांचेकडे शिकण्यास जाई तेव्हां तेहि महाराजांच्या अनुग्रहामुळें पारमार्थिक गोष्टींची चर्चा करीत. यामुळें माझ्या मनांतील महारांजांच्या भेटीची तीव्र इच्छा व तळमळ तृप्त होण्याचा काल लवकरच लाभला !

### बंधूंच्या मध्यस्थीनें अनुग्रह

परमपूज्य गुरुमहाराज भाद्रपद संकष्टीच्या उत्सवासाठीं भडगांवास येत. केळकरांचेच वाड्यांत भक्त व शिष्य मंडळी एकत्र जमून त्यांचा जन्मदिन थाटानें साजरा करीत. मी या उत्सवासाठीं महाराज केळकरांचे वाड्यांत आल्याचें समजतांच महाराजांना भेटून त्यांचे पायां पडलों. दुरूनच त्यांचेकडे पहात उभा असतां ती तेजःपुंज मूर्ति पाहून मनाचें समाधान झालें. मग फिरून त्यांचे पाय धरून त्यांचा अनुग्रह घेण्याची मनांतील इच्छा भीत भीतच माझ्या बंधूमार्फत सांगितली. त्याच क्षणीं माझेकडे कृपादृष्टीनें पाहून १९२० सालीं महाराजांनीं मला अनुग्रह दिला व पूर्ण कृपा केली.

नजीकच नवी जागा घेऊन, श्री दत्तमठी बांधून महाराज तेथें श्री पंत-जन्मोत्सव करूं लागले. माझ्या अंतःकरणांत महाराजांच्या गुरुत्व कृपेची पूर्ण श्रद्धा उत्पन्न झाली. महाराज फिरतीवर गेले तरी त्यांचेंच सदैव चिंतन मनांत असे व परत आले कीं आनंद होई. वारंवार त्यांची भेट नवीन मठींत घेऊन भक्ति प्रेमाच्या गोष्टी ऐकण्यात आनंद वाटे. मठींतील भजनास नियमीत जात असे. सहा वर्षांचा काल अशा भक्तिप्रेम-रंगात गेला. श्रीमती केळकरीणबाईंचे नागपूरकडील भाचे श्रीयुत नानासाहेब हेहि गुरुमहाराजांचे अनुग्रहीत होते. नागपूरचे राजे श्रीमंत राघोजी भोसले यांचे उपाध्येपण श्री. नानासाहेबांकडे होतें. गुरुमहाराजाचीं कीर्तनें नागपूरला व्हावी. अशी त्यांना फार इच्छा होती. नागपूरला गुरुमहाराजांची कीर्तनें व्हावीं, अशी राजेसाहेबांची इच्छा असल्याचेंहि ते म्हणाले. नागपूरला कीर्तनासाठीं येण्याचें आमच्या गुरुमाऊलीनेंहि वचन दिलें होतें. चार दिवस मडगांवला राहून श्री. नानासाहेब नागपूरकडे परत गेले आणि गुरुमहाराज आपल्या घरी कीर्तनासाठीं येणार म्हणून तयारी करूं लागले. गुरुमहाराजांच्या ध्यानीं आले कीं नागपूरला आपली साथ करण्यास आपल्या बरोबर तबलजी नाहीं. मला ते म्हणाले 'चिन्दा तूं येतोस कां माझ्याबरोबर नागपुरांत तबल्याची साथ करण्यासाठीं ?' मी खजील होऊन मान खालीं घालून मीत मीत म्हटलें 'मी आपल्या बरोबर यायला तयार आहे. पण मला तालसुरांचें कांहींच ज्ञान नसून भजनांत झांज वाजविण्याची सांथहि साधत नाहीं. मग मी आपल्या कीर्तनांत तबल्याची साथ कशी करणार ?"

महाराज मला म्हणाले, "चिन्दा तुला आठ दिवसांत मी तबल्याची साथ करण्यास शिकवितों. तूं वेळ मिळेल तेव्हां उद्यांपासून मठींत ये!" दुसऱ्या दिवशीं मी मठींत गेल्यावर महाराजांनीं माझ्यापुढें तबला आणून ठेवला आणि मला बोल शिकवून पाठ करून तबल्याचा ठेका धरण्यासहि शिकविलें. आठ दिवसांत गुरुमहाराजांनीं मला तबल्याच्या साथीसाठीं शिकवून तयार केला! मग म्हणाले, "चिन्दा आतां तूं तबला सुंदर वाजवितोस!" मला त्यांनीं शक्ति दिली होती!

'शक्ति देई सेवा घेई। भजन प्रिय दत्ता ॥'

हें भजनहि महाराजांनीं मला पाठ करण्यास सांगितलें पत्र पाठवून नानासाहेबांनीं गुरुमहाराजांना रीतसर आमंत्रण दिलें. महाराज श्री. दत्तु महाराज व मी तिघे नागपूरला ठरलेल्या तारखेस गेलों. नानासाहेबांनीं आमची सर्व सोय उत्तम केली होती. गुरुमहाराज नागपूरला आल्याचें कळतांच तेथील लोकांची

त्यांच्या दर्शनासाठीं गर्दी जमे! कीर्तन ऐकणाऱ्यांपैकीं बरेच लोक विन्हाडी भेटण्यास येत. रात्रीं कीर्तन आणि दिवसा बिन्हाडी परमार्थ विषयांवर चर्चा, असा कार्यक्रम एक महिनाभर नागपूरला झाला. लोक दररोज ६ ते ८ तास परमार्थ चर्चेसाठीं बसत असत.

## सीताबर्डीस महाराजांचीं कीर्तनें

नागपूरहून महाराज सीताबर्डीस कीर्तनासाठीं गेले. तेथेंहि १५ दिवस कीर्तनाची गर्दी उडाली. विद्वान् शास्त्री पंडित गवईहि कीर्तनास येत. परंतु महाराजांच्या वाणींतील गोडवा आणि परमार्थ विषय सोपा करून सांगण्याची हातोटी यांवर हे नामांकित लोकहि खूष होत. या लोकांत शास्त्री, जपी, तपी, आणि योगीहि या ब्रह्मचर्चेत अभिमान टाकून रंगत असलेले पाहून सामान्य लोक थक होत! या पारमार्थिक चर्चेचा आनंद शब्दांनीं मला वर्णन करतां येण्यासारखा नाहीं.

## भिक्षेची फेरी

गुरु महाराजांच्या आज्ञेवरून मी आणि गुरुबंधु दत्तमहाराज गांवांत भिक्षेची फेरीहि करीत असूं. भिक्षा–फेरींत उच्च स्वरांत म्हटलेल्या श्रीपंतांच्या पदांनीं आकर्षित होऊन आणखीहि लोक गुरुमहाराजांच्या दर्शनासाठीं व परमार्थ चर्चेसाठीं गर्दी करीत असत!

## सीताबर्डीनंतर ७ दिवस अमरावतीस

अमरावतीसहि महाराजांची कीर्तनें लोकांच्या आग्रहावरून झालीं त्यानंतर आम्ही भडगांवला परत आलों.

गुरुमहाराजांचे बरोबर नागपूरला जाण्यापूर्वी मी माझी सुंदर गाय विकून गेलो. कारण माझ्या गैरहजेरींत गाईचें गोठा पाणी व देखभाल करण्याची खटपट कोण करणार? गाईच्या लोभांत गुंतलों असतों तर महाराजांच्या अपूर्व संगतीच्या सान्निध्याच्या आणि परमार्थ चर्चेच्या आनंदाला मुकलों असतों!

## महाराजांनीं मला गाय दिली!

गुरुमहाराज भडगांवास परत आल्यावर मी गाय विकल्याचें महाराजांना समजलें असावें! कारण आल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं मला मठींत बोलावण्यांत आलें. गुरुमहाराज मला बोलले, "चिन्दा माझ्या मनांत आमची गाय तुला द्यावी असे आले आहे. तिचा तूं उत्तम सांभाळ करशील असा मला विश्वास वाटतो." लगेच माझे स्वाधीन गाय करून वर ४० रु. देऊं लागले! मी फक्त गाय घेऊन गेलों. ४० रु. नको म्हणून सांगितलें. पण महाराजांनीं ४० रु. दुसऱ्याकडून माझे घरीं पाठविले!

## बियाणांसाठीं महाराजांची मदत

ठरल्याप्रमाणें दररोज मी महाराजांच्या दर्शनास जात असे. एकदां पेरणीच्या मोसमांत भुइमुगाच्या बियाणासाठी मजजवळ पैसे नव्हते. स्नेह्यांतून कोणीहि माझी कर्ज देऊन गरज भागविणारा भेटला नाहीं ! त्या दिवशीं मठींत गेल्यावर मला जवळ बोलावून महाराज म्हणाले, 'चिन्दा आज तूं चिंताग्रस्त कां दिसतोस ?' माझ्या चिंतेचें कारण मीत मीत सांगतां क्षणींच महाराजांनीं लगेच दहा रु. आणून माझ्या हातांत घातले ! मी त्या रकमेंतून शेंगदाण्याचें बियाणें घेऊनं शेतांत भुइमूग पेरला. पीक चांगलेंच मस्त आलें ! नंतर मी महाराजांचे दहा रु. देण्यास मठींत गेलों. तेव्हां रुपये परत न घेतां महाराज म्हणाले **"तुझ्या घरांतील दारिद्य आतां पासून नाहींसे होण्याचा आशिर्वाद् मी तुला देतों"**

खरोखरीच गुरुमहाराजांचा तो आशीर्वाद आज तागायत फलद्रुंप झाल्याचा झाल्याचा अनुभव मला आलेला आहे. माझी अशी एक गुंठा जमीन किंवा १ खण घर नव्हतें ! पण आतां मी ९ बिघे (एकर) शेतीचा मालक झालों. असुन एका ऐवजीं दोन घरें बांधून गुरुमातेचें चिंतत-स्मरण करीत माझे दिवस ब्रह्मानंदांत जात आहेत, त्याचें वर्णन करण्यास मला शब्दच सुचत नाहींत !

* * *

# भाग १ ला

# आठवण नं. २०

( लेखक :—श्री. विनायक त्र्यंबक पंडित–भडगांव )

मी भडगांवचाच रहाणारा असून, माझें नांव विनायक त्र्यंबक उर्फ 'भय्या' पंडित. आमचे वाड्यांत श्रीमती गं. लक्ष्मीबाई केळकर या श्री. अवधूत महाराजांच्या अनुग्रहीत असल्यामुळें त्यांचेकडे श्री. अवधूत महाराज २–३ वर्षें उतरत असत त्यावेळीं स्टेशनवरून त्यांना आणण्यासाठीं आदल्या दिवशींच बैलगाडी जात असल्यामुळें आम्हांला महाराजांच्या आगमनाची बातमी आगाऊ एक दिवस समजत असे व आम्ही मुलें त्यांचीं औत्सुक्यानें वाट पहात असूं.

गुरुमहाराज आले कीं गांवांतील मंडळीची त्यांना दर्शनासाठीं बोलावणी येत. परंतु महाराज माझी शाळा सुटेपर्यंत कोठें जात नसत. माझी शाळा सुटून वाड्यांत आल्यावर मला हाक मारून महाराज म्हणत 'विना, माझ्याबरोबर चल' मीहि मोठ्या आनंदानें त्यांचेबरोबर जाई. कारण त्यांचेबरोबर गेलें कीं चांगल्या खाऊची माझी चंगळ होई, हें मला ठाऊक झालें होतें! मी व माझे निवडक मित्र 'आपल्या बरोबर चला' म्हणतात केव्हां यांची आम्ही मुलें शाळा सुटल्यावर वाटच पहात असूं!

एकदा एका गृहस्थानें महाराजांचे बरोबर त्याचे घरीं गेलों असतां माझा अपमान केल्यामुळें मी महाराजांबरोबर जाईनासा झालों. महाराजांना हें समजल्यावर त्यांनी त्या गृहस्थांची चांगलीच कानउघाडणी केली! तेव्हां त्याला पश्चाताप होऊन त्यानें महाराजांची व त्यांच्या सांगण्यावरून माझीहि माफी मागितली व त्यांच्याकडे जाणे पूर्ववत् चालू झालें!

## मला व माझ्या मित्रांना अनुग्रह

मला माझ्या ५–६ मित्रांना मिळून 'महाराजांनीं आम्हांला अनुग्रह द्यावा, अशी विनंति केली. माझ्या मित्रांना महाराज म्हणाले 'तुमच्या वडिलांची परवानगी घेऊन या मग अनुग्रह देईन' मात्र माझे वडील श्री. त्र्यंबकराव

यांना महाराजांनीं सांगितलें "मी तुमच्या विनाश माझा करणार"! माझे वडील म्हणाले "हें तर उत्तमच आहे!" मी व माझे ५।६ मित्र वडिलांच्या परवानगीनें त्यावेळीं अनुग्रहीत झालों.

## श्रीमती केळकर यांच्याशी अबोला व आमचेवर परिणाम!

पुढे कांहीं कारणांनीं श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांच्याशी (महाराजांचा) अबोला झाला आणि केळकरबाईंचीं कामें पहाणारे श्री. परशराम वाणी मास्तर व मी ह्याच वाड्यात रहाणारे असल्यामुळें महाराजांशीं अबोला धरण्याचा आम्हां दोघावरहि प्रसंग आला! दरम्यान भडगांवीं नजीकच नवी जागा घेऊन आणि अधिष्ठान मांडून महाराजांनीं दोन उत्सव सुरू केले होते. या उत्सवांचे कार्यक्रमांत आमची दोघांची नांवें असत. ह्यामुळें आम्ही दोघेहि उत्सवाचे आदले दिवशीं भीत भीतच मठींत गेलो! दारातच उभे असलेले गुरुमहाराज पुढें येऊन मला म्हणाले "अरे, वाट चुकलास काय?" महाराज जाणून होते कीं आमची कांहीं चूक नव्हतीच, आम्ही परतंत्र होतों! नंतर महाराजांनीं मला जवळ बोलाविलें आणि पाठीवरून हात फिरवून म्हणाले, "तुमची इच्छा लवकरच पुरी होईल!"

## संकष्टीच्या उत्सवानें वातावरण निवळलें!

गोकुळाच्या उत्सवांनंतर श्रीमती लक्ष्मीबाई केळकर संकष्टीचा गुरुमहाराजाचा जन्मोत्सव करीत असत. ह्यावेळीं बाईंनीं मला बोलाविलें आणि म्हणाल्या "माझ्या बरोबर गुरुमहाराजांच्या दर्शनास चल—" मी थक्कच झालों! पण बाईंच्याबरोबर मठींत गेलों. दर्शनाचा कार्यक्रम झाल्यानंतर गुरुमहाराज मला मागची आठवण देऊन म्हणाले "आतां तरी तुझ्या मनाप्रमाणें झाले ना?"

नंतर पूर्वीप्रमाणें उभयतांचे दरम्यान सर्व व्यवहार व्यवस्थित चालू झाले. नंतर १९२० सालच्या श्रीदत्तजन्मोत्सवापूर्वी एक दिवस मला महाराज म्हणाले,"आपल्या-पैकीं सर्वांना कामें वाटून द्यावयाचीं आहेत; आज रात्रीं सर्वजण मठींत या म्हणजे कामांची यादी तयार करून सर्वांना सांगेन" रात्रीं आम्ही जमल्यावर माझ्याशिवाय सर्वांना कामें नेमून दिलीं! मला कांहींच काम नेमून न दिल्यामुळें मी हिरमुसला होऊन बसलो! मग महाराजांनीं हंसत विचारलें, "विना कोठें दिसत नाहीं तो?" मग मी उठून उभा राहून हात जोडून म्हणालों, "मला कांहीं सेवा सद्गुरुंनीं सांगावी!" मग मला उद्देशून महाराज म्हणाले, "दहा दिवस कीर्तनांत हार घालून बुक्का लावण्याचें काम तुला नेमून देतों, पण लक्षांत ठेव कीं, तूं शिक्षणा-

साठीं बाहेरगांवीं गेलास तरी तें काम तुझ्याकडूनच झालें पाहिजे!" ही सेवा साधी व सोपी वाटल्यामुळें मी चटकन् होकार दिला! मग गुरुमहाराज म्हणाले, "तुला वाटते तितकी ही सेवा सोपी नाहीं!" त्यावेळीं १५-१६ वर्षांचा असेन. मी माझ्या मित्रांसह 'फायनल' ची परीक्षा देऊन आलों होतों. नंतर मला इंग्रजी शिक्षणासाठीं कल्याणला जावें लागलें! त्यावेळीं मला गुरुमाउलीनें दिलेल्या इशाऱ्याची आठवण झाली. आतां सेवेंत खंड पडणार, म्हणून चिंता वाटूं लागली! 'भडगांवला सेवेकरितां जाणार' असें सांगून सुटी मागण्याचें मला धैर्य नव्हतें! सेवेचा ध्यास मात्र लागला होता! योगायोग असा आला कीं त्यावेळीं आमची भावजय चाळिसगांवीं जावयाची होती. तिला पोचवण्याची कामगिरी मजकडे आली होती; त्या निमित्तानें मी चाळीसगांवीं आलों असतांना ४ दिवस राहण्याचा आग्रह मला झाला. त्या अवधींत माझे वडील मला चाळीसगांवीं भेटले असतां म्हणाले, "तुला नेमून दिलेली सेवा तूं येईपर्यंत मी स्वतः करीन आणि अशा रीतीनें तुझ्या सेवेंत अंतर पडूं देणार नाहीं!" आश्चर्य असें कीं, वडिलांचेजवळ माझ्या या सेवेबद्दल बोललों नव्हतों! पण गुरुमाऊलीनेंच त्यांना प्रेरणा केल्यामुळें त्यांनीं वरीलप्रमाणें सेवा पत्करून मला आश्वासन दिलें असावें.

## प्रसादांत अस्पृश्यता नाहीं!

पुढें माझे वडील परलोकवासी झाल्यामुळें माझें शिक्षण बंद होऊन मी भडगांवातच राहू लागलो. ऋग्वेदी शाखेतील ब्राह्मणांनीं मैत्रायणी शाखेंतील ब्राह्मणाकडे अन्न घेऊं नये अशी चाल होती. तसें करणाऱ्यांवर ऋग्वेदी शाखेचें धर्माधिकारी ब्राह्मण बहिष्कारहि घालीत! मठींत असलें सोवळे पाळलें जात नसल्यामुळें मी मठीतील भंडारा व प्रसाद घेत नसे. भंडाऱ्यांचे रात्रीं गुरुमाउलीनें विचारलें, "प्रसादाला कां आला नाहींस?" मी माझी अडचण प्रांजलपणें कबूल केल्यावर महाराज म्हणाले, "अरे लक्षांत ठेव, यापुढें १० वर्षांचे आंत ज्यांना अस्पृश्य समजतात त्यांच्या हातचे अन्न खाण्याची पाळी सर्वांवरच येणार आहे!" असें म्हणून श्रीपादकाकाकडून शिधा आणवून त्यांनी मला डाळ तांदुळाचा शिधा देवविला! मला तें कसेंसें वाटले! मी तो शिधा न घेतां सद्गुरूंच्या चरणांवर लोळण घेतली! गुरुमाउलीनें स्वतःच्या हातानें प्रसाद माझ्या मुखीं घातला! सद्गुरुवाणीचा अनुभव १० वर्षांत आला. जगातील शिवाशिव वगैरे सोवळें आतां पार नष्ट झालें आहे!

× × × ×

## सद्गुरुंच्या स्वानंदवास-समाधीचे वेळच्या आठवणी

१९३९ च्या चैत्रपाडव्या दिवशीं रात्रीं गुरुमहाराज स्वानंदवासी झाले. 'रात्रीं पालखी निघावयाची सर्व भक्तांनीं यावें' अशी महाराजांची आज्ञा सर्व भक्तांना सकाळींच रामदास गुरव मार्फत समजली होती. त्याप्रमाणें मी रात्रीं मठींत गेलों. मला भजनाची हौस फारशी नाहीं; तरीपण गुरुमहाराजांची आज्ञा समजून मठींत हजर झालों. १२ वाजतां पालखीचा कार्यक्रम संपून आरती झाली. महाराजांनीं प्रसादाचें ताट माझ्या हातून घेऊन 'मीच सर्वांना शेवटचा प्रसाद देणार' असें म्हणून, मंदिरांतच टांगलेल्या झोंपाळ्यावर बसून सर्वांना प्रसाद वाटला! माझ्या हातीं प्रसाद देतांना गुरुमहाराज म्हणाले, 'हा प्रसाद शेवटचाच आहे!' माझ्या मठ्ठ डोक्यांत महाराजांच्या या इषाऱ्याचा अर्थ शिरला नाहीं! पण हातीं प्रसाद घेऊन घरी पोचतो न पोचतो तोंच मठींतील मिमजी गडी घाबऱ्या घाबऱ्या धांवतच मला व श्री. परशराम मास्तरना बोलावण्यास आला! तो म्हणाला, "महाराज बेचैन होऊन बेशुद्ध झालेत, तुम्हांला आईसाहेबांनीं ताबडतोब बोलाविलें आहे!" जास्तींत जास्त ३ ते ५ मिनिटें आम्हाला घरीं पोचावयास लागली असतील, इतक्यांत मठींतून हा निरोप आला! आम्ही सखेदाश्चर्यानें थक्कच झालों! मिमजीवर रागावलों देखील! तो बिचारा म्हणाला, "तुम्ही वाटेल तितके रागवा पण अगोदर मठींत चला!" या गडबडींत १० मिनिटें गेली असतील! आम्ही धांवतच मठींत गेलों! तेथें पहातों तों खरीखरीच महाराजांच्या पार्थिव देहांत धुगधुगीहि नव्हती! मठींत त्यावेळीं आमच्या खेरीज आईसाहेब, श्रीपादकाका व त्यावेळेस सौ. माई पण होत्या. अण्णा महाराजांची मुले मीरा व बालमुकुंद व मिमजी येवढीच माणसें होतीं! मग आईसाहेबांच्या समजुतीकरितां डॉ. दीक्षित यांना मी बोलावून आणलें. डॉक्टरांनीहि आमच्या समजुतीसाठीं गुरुमहाराजांच्या देहाला एक इंजेक्शन दिलें आणि आम्हांला बाजूला बोलावून महाराजांच्या तीघां चिरंजीवांना जवळच्या आप्तेष्टांना व भक्तांना तारा करून बोलावून घेण्यास सांगितलें. सद्गुरुंच्या या पूर्व नियोजित तडकाफडकीच्या स्वानंदवासामुळें मी अगदीं हतबुद्ध झालों होतों! तरीपण वांट्याला आलेलें कर्तव्य कितीहि अप्रिय असलें तरी केलेंच पाहिजे, गुरुमहाराजांच्याच शिकवणीची जाणीव होऊन श्री. दादा सहस्रबुद्धे यांना बोलावून आणलें. ठिकठिकाणीं तारा करण्याची व्यवस्था त्यांनीं केली. त्यावेळचे भडगांव पोस्टांतील पोस्ट मास्तर श्री. चितळे हे स्वभावानें नास्तिक व स्पष्ट असले तरी माझ्या विनंतीप्रमाणें त्यांनीं श्री. अण्णा महाराजांना व दुसऱ्या दोघां बंधूना व इतर कांहीं भक्तांना तावडतोब तारा केल्या! गुरुमहाराजांच्या प्रेरणेनेंच

त्यांच्या वृत्तींत क्रांति झाली असावी! या अत्यावश्यक गोष्टी केल्यानंतर, गुरुमहाराजांचा पार्थिव देह, त्यांचे तीन्ही चिरंजीव मठींत येईपर्यंत, ठीक राखण्यासाठीं त्याजवळ मी, दादा सहस्रबुद्धे, परशराम मास्तर व रामदास इतके जण बसून होतों. महाराजांच्या त्या पार्थिव देहाला तूप व अत्तर चोळीत राहिलो. पहाटे गांवभर ही खेदाची बातमी वणव्यासारखी पसरल्यामुळें अनेक भक्त व शिष्य मध्यरात्रीनंतर पहाटेपर्यंत दर्शन घेऊन गेले.

श्री. अण्णामहाराजांना चेंबूरला तार मिळाली, पण तात्बडतोब गाडी मिळाली नाहीं! त्यामुळें त्यांना भडगांवीं येऊन पोचण्यास रात्रीं १० वाजले! तोपर्यंत सर्व खानदेशभर बातमी पसरून अनेक भक्त व शिष्य भडगांवीं आले होते. येतांक्षणींच श्री. अण्णा महाराजांनाहि दुःखाचा आत्यंतिक धक्का बसला! पण लवकरच दुःखांचा आवेग गिळला पाहिजे आणि जगरहाटीप्रमाणें पुढील कर्तव्याला लागलें पाहिजे हें जाणून सर्व मंडळीच्या सहकार्यानें महाराजांच्या पार्थिव देहाच्या अंत्यसंस्काराचे तयारीला श्री अण्णाहि लागले. शिष्य मंडळीच्या आस्थेवाईक खटपटीनें अंत्य संस्कारासाठीं खूपच चंदन जमा झालें. अण्णामहाराज यांनी चाळिसगांवाहून ७ मण आणि नाचण खेड्याहून गाडीभर चंदन आणविलें! चिता चांगली पेटण्यासाठीं सुके नारळहि भक्तांनीं खूप जमविले.

अखेर गुरुमहाराजांच्या पार्थिव देहाची अंत्ययात्रा प्रचंड जनसमूहाच्या मिरवणुकीनें निघाली. त्यावेळीं गुरुमहाराजांच्या पार्थिव देहाच्या तोंडावर आणि शरीरावर विलक्षण तेज दिसत होतें. प्राण ज्या देहाला सोडून गेला अशा देहांत इतकें विलक्षण तेज मी कधींच पाहिलें नव्हतें! अनेक लोक एकमेकांना हेंच सांगत होते!

वास्तविक आपली निर्याणाची वेळ श्री सद्‌गुरूंनीं कधींच ओळखली होती हें त्यांच्या अखेरच्या हालचालीवरून आतां लक्षांत येतें! आम्हां मूढ जनांना मात्र तें लक्षांत आलें नाहीं! नंतर भडगांवचें विद्वान दशग्रंथी ब्राह्मण वेदमूर्ति बापूराव तथा सदाशिव बाळकृष्ण पटवर्धन, यांचेकरवीं गुरुमहाराजांच्या पार्थिव देहाला ब्राह्मणधर्माप्रमाणें यथासांग मंत्राग्नी गिरणानदी तीरावर महादेवाचे मंदिरानजीक देण्यात आला. वेदमूर्ति बापूराव यांनीं या प्रसंगीं हें अंत्यविधीचें कार्य पत्करलें हें देखील गुरुमहाराजांच्या पुण्याईच्या प्रेरणेनेंच घडलें असें म्हणावेसें वाटतें! कारण, मठींत गुरुमहाराजांनीं शिवाशिवीच्या सोवळ्याचें प्रस्थ अजिबात मोडून काढल्यामुळें, विद्वान ब्राह्मण या दृष्टीनें गुरुमहाराजांनीं अनेकवेळां निमंत्रण देऊनहि वेदमूर्ति

बापूराव यापूर्वीं मठींत कधीं आले नाहींत! पण गुरुमहाराजांच्या समाधी-मुळें त्यांना हें सत्कार्य करण्याची प्रेरणा झाली खरी! 'यापूर्वींच आपण या सत्पुरुषाचा परिचय करून घेतला नाहीं' असें म्हणून त्यांनीं दिलगिरी व्यक्त केल्याचेंहि मी ऐकलें आहे!

## अंत्यविधीनंतर भंडारा

अंत्यविधीचा कार्यक्रम १८ दिवस झाल्यानंतर गुरुमहाराजांच्या अनेक भक्तांनीं भंडारा करण्याचा आग्रह धरला. १५ व्या दिवशीं भंडाऱ्याचा प्रसाद मोठ्या धामधुमीनें झाला! किती लोक भंडाऱ्याचे प्रसादाला येतील आणि किती सामुग्री लागेल. याचा साधारण अंदाज करून भंडारा करण्याची सिद्धता श्री. अण्णांनीं निकट भक्तांच्या व शिष्यमंडळीच्या सहकार्यानें केली होती. पण अंदाजापेक्षांहि दुप्पट लोक भंडाऱ्याचे प्रसादासाठी आले! त्यावेळीं भडगांवांत श्री. माधवनाथ महाराजांचे अनुग्रहीत श्री. छापेकर हे तलाठी होते. भंडाऱ्याच्या दिवशीं रात्रीं त्यांनीं मठींतील फरशी धुण्याचें काम मोठ्या हौसेनें केलें याचें सर्वांना नवल वाटलें!

## गुरुचरित्रांतील प्रसंगाची आठवण!

असंख्य लोक भंडाऱ्याचा प्रसाद घेऊन गेल्यावर, वाढण्याचें वगैरे कामें करणाऱ्या कार्यकर्त्यांनीं प्रसाद घ्यावयाचा होता. दिवसभर दगदगीचीं कामें करून कार्यकारी मंडळी अगदीं थकून गेली होती! इतक्यांत जवळपासच्या खेड्यांतील ५०-६० भक्त भंडाऱ्याच्या प्रसादासाठीं आले. जेमतेम २५-३० कार्यकारी मंडळीपुरताच प्रसाद शिल्लक होता. बाहेर :वावरणाऱ्या कांहींनी 'आतां प्रसाद संपला' म्हणून या ५०-६० खेडुत भक्तांना सांगितलेंहि! मी बाहेर येऊन चौकशी केली व त्या ५०-६० खेडुत भक्तांना जरा थांबा, म्हणूनं विनंति केली. मग गुरुबंधु श्री. अण्णा यांचे कानावर ही गोष्ट घातली. तेव्हां श्री. अण्णा तथा श्री दत्तुबुवा-दत्तमहाराज, यांनी खाली येऊन सद्‌गुरूंच्या समाधीपुढें साष्टांग नमस्कार घातला आणि शिल्लक राहिलेल्या प्रसादाचे अन्नावर श्री सद्‌गुरूंची कफनी घालून तीर्थाचे सिंचन केले! नंतर आलेल्या ५०-६० खेडुत भक्तांची पानें श्री. दत्तमहाराजांच्या सूचनेप्रमाणें मांडण्यांत येऊन त्यांना प्रसाद वाढला. ५०-६० खेडुत गोसावी प्रसाद पोटभर जेवून गेल्यानंतरहि कार्य-कर्त्यां २५-३० माणसांकरितां प्रसादाचें अन्न भरपूर शिल्लक राहिलें! मला

गुरुचरित्रांतील असल्याच प्रसंगाची आठवण झाली! आम्हांवर गुरु-महाराजांच्या कृपेनें जणु अन्नपूर्णाच प्रसन्न झाली! आम्हीं २५-३० कार्यकर्त्यांनींहि नंतर यथेच्छ प्रसाद-सेवन केलें.

पुढें गुरुमहाराजांच्या पहिल्या पुण्यतिथीचे प्रसंगी त्यांचा पार्थिव देह दहन झालेल्या जागीं स्तंभ उभारण्याची जबाबदारी गुरुमहाराजांचे सुपुत्र श्री दत्तमहाराज यांनी मजवर सोंपविली आणि मीहि ती आनंदानें पत्करली-गांवातील कांही लोकांचा हा स्तंभ उभारण्याला विरोध होता. कांही लोक त्या जागीं चौथरा बांधून लोखंडी कठडा करून पादुका स्थापन कराव्या असेंहि सुचवीत होते. पण येथें पादुका स्थापन झाल्यास, गांवांत मुसलमान वस्ती बरीच असल्यामुळें पादुकांची विटंबना होणें संभवनीय होतें. स्वतः दत्तमहाराज, तलाठी श्री. छापेकर व श्री. दादा सहस्रबुद्धे यांना पादुकांची सूचना पसंत नव्हती.

स्तंभाविषयींची आग्रही सूचना मात्र श्री. तलाठी श्री. छापेकर यांची होती आणि स्तंभ उभारला गेला तो मुख्यतः त्यांच्याच खटपटीमुळें हें कृतज्ञतेनें नमूद केलें पाहिजे. कारण तलाठी या नात्यानें त्यांनीं आपल्या अधिकाराचा सदुपयोग करून प्रांताधिकारी व मुंबईराज्य-सरकारच्या गृहखात्या-पर्यंत त्यांनीं या मागणी विषयींच्या कागदपत्राचें लोण पोचविलें होतें. या कामी जरूर ती परवानगी मिळावी म्हणून श्री दत्त महाराजांनीं श्री. मुकुंदराव राणे यांच्या मदतीनें गृहखात्याचे अधिकारी श्री. मदन यांची भेटहि घेतली होती. श्री. मदन यांनीं महाराजांचीं कीर्तनें काळ्या राम मंदिरांत ऐकली असल्यामुळें ते महाराजांना ओळखीत होते. जरूर तर तारेनें स्तंभाविषयीं परवानगी मंजूर करून पाठविण्याचें आश्वासनहि श्री. मदन यांनीं दिलें होतें. पण तशी जरूरी लागली नाहीं ! छापेकरांच्या खटपटीनेंच स्तंभाच्या परवानगीचें काम तडीस गेलें ! श्री. छापेकर यांच्या सूचने-प्रमाणें प्रांताधिकाऱ्यांपर्यंत कागदपत्रांच्या विल्हेवाटीचे प्रकरणीं खेपा घालण्याचे काम मी हौसेनें करीत होतों.

पण माझ्या हौसेचा विपरीत अर्थ करून गांवांतील विरोधी लोक स्तंभाचें निमित्त करून 'मठीचे पैसे खाणारा' म्हणून टिंगल टवाळी करूं लागले होते ! त्यावेळीं श्रीदत्त महाराज प्रेमलहरींतील पंतांची पदें मला दाखवून म्हणाले, "तुझा पाठीराखा श्री सद्गुरु असल्यामुळें, आज तुझ्यावर कुत्सित टीका करणारेच उद्यां तुझे गुण गाऊं लागतील!" श्री. दत्तमहाराजांच्या प्रोत्साहनानें स्तंभाच्या कामाला फिरून जोराची चालना मिळाली. एके दिवशीं स्वप्नांत गुरुमहाराज येऊन

मला म्हणाले, "तुला हातीं घेतलेल्या या कार्यात यशच मिळेल. आणि चैत्र १०–११ चे दरम्यान तुझ्या हातीं पाकीट येईल." पण त्या पहिल्या पुण्यतिथीचे प्रसंगी गुरुमहाराजांच्या पादुका व फोटोची पालखी चावडीसमोर आलेली पाहून श्री. बाळासाहेब देशपांडे यांनीं मला बोलाविले व म्हणाले, "प्रसादाचा पेढा द्या" मी त्याचा अर्थ समजलों. मी त्यांना विचारलें, "काम झालें ना?" कामाच्या परवानगीने पाकीट चैत्र १ ला दोन प्रहरीं ११–१२ चे सुमारास मिळालें. मधून मधून अजूनहि स्वप्नांत गुरुमहाराज येऊन आशीर्वाद देतात. श्री गुरुमाउलीच्या कृपेनेच आम्ही टीक संसार चालवीत आहों! भडगांवकरांची पूर्व पुण्याई म्हणूनच भडगांवाला हा थोर सत्पुरुष लाभला! गुरुमहाराजांची श्रीदत्त पीठाची परंपरा महाराजांचे ज्येष्ठ पुत्र श्रीदत्तमहाराज श्रीगुरुमहाजांच्याच थोर बाण्यानें पुढें चालवीत आहेत. श्रीगुरुमाउलीने श्रीदत्तमहाजांच्या हृदयांत वास करून सर्व भक्तांकडून योग्य सेवा घ्यावी अशी श्रीदत्तप्रभुचरणीं प्रार्थना करून या माझ्या आठवणींना विराम देतों.

❁ ❁ ❁

भाग १ ला

# आठवण नं. २१

लेखक : श्री. नारायण रामचंद्र जोशी, भडगांव
(मैत्रायणी शाखेंतील वेदशास्त्रसंपन्न)

१९२१ ते १९२७ चे दरम्यान, भडगांवचे रहिवासी, गोपालकृष्ण मंदिराचे पुजारी श्री. गोविंद रघुनाथ टोकरे यांनीं आणि मी श्री. अवधूत महाराज कुरुंदवाकर यांचा अनुग्रह एकदमच भडगांवीं घेतला. भडगांवीं योगायोगानें आलेल्या या सत्पुरुषाचा अनुग्रह घेतल्यास आपल्याला संतसमागमाचा लाभ मिळून, अंतःकरणांतील शंका-कुशंकाचें निरसन होईल आणि त्यामुळें शांति-समाधान लाभेल, हीच भावना अनुग्रह घेण्याविपयीं होती. पूर्वजन्मीच्या पुण्याईमुळेंच भडगांवास ही गुरुमाउली धावून आली असें मला वाटलें. याच जन्मांत कोणत्या साधनानें परमार्थाचें ध्येय गांठता येईल या विषयींची तळमळ मला होती. "शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिर मासनम् आत्मनः" या श्रीभगवद्गीतेतील वचनाप्रमाणें मी नासिकाग्र दृष्टि ठेवून जप करण्याचे प्रयत्न करीत होतो. रोज सकाळीं शीर्षासनाचाहि अभ्यास चालू होता. वयाचे २६ वे वर्षी एकदां गिरणा नदीवरील महादेवानजीक घाटावर नासाग्र दृष्टी ठेवून जपात मग्न झालों असतां, लोकांनीं नदीस पुराच्या पाण्याचा लोंढा येत असल्याची ओरड केली, तेव्हां भानावर येऊन वेळींच घराकडे परतलों, म्हणून वचावलों! नासिकाग्रदृष्टी ठेवून जप केला असतां निर्भयत्वाचा लाभ होतो हें मला अनुभवानें पटलें. रोज माझा या एकाग्र जपांत बराच वेळ जाई. वयाच्या २७ व्या वर्षी पाचोरा तालुक्यांतील 'नाचण खेडे' गांवांत पंडित रामसिंग पाटील या यजमानांचे घरीं शिवलीलामृताचें पारायण करीत असतां एका-एकीं प्रकृति बिघडली! ती इतकी कीं त्यावेळीं माझा पुनर्जन्म झाला म्हणण्यास हरकत नाहीं! कांहीं दिवसांनी तब्येत सुधारली; नंतर सुखशांति निर्भयता व समाधाना-साठीं भगवद्गीतेचा अभ्यास व प्रवचनेंहि करूं लागलों. वयाच्या २८ व्या वर्षी श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेण्याचा योग कसा आला त्याचा उल्लेख सुरवातीला केलाच आहे. गुरुमहाराजांचे सहवासांतील आध्यामिक विवरणामुळें अंतःकरणांतील

शंकाचें निरसन होऊं लागलें. नासिकाग्र दृष्टीचा हटवाद उपयोगी नाहीं. सहजगत्या होणाऱ्या एकाग्रतेनेंहि निजसुख शांति मिळूं शकते. हें हळूहळू अनुभवानें समजूं लागलें. पण सद्गुरुंचा बोध अंतरांत पूर्ण ठसला. गुरुशिष्याचे संबंध कसे असावे हें हळहळू समजूं लागलें. गुरुमहाराजाचीं कीर्तनें सांप्रदायिक स्वरूपाची असली तरी आबालवृद्धांना रमविणारी आणि बोधप्रद असत. महाराजांच्या पुढीलसारख्या उक्तींनी माझ्या मनाची पकड घेतली—

गुरुशिष्यां जेथें एकच पद। तेथें नाही भेदाभेद ॥
परि या देहाचा संबंध। तोडिला पाहिजे ॥

तसेंच

अहंकार जिनका गया नहीं। शांती में मन गढा नहीं ॥
ब्रह्मज्ञानसे चित्र लगा नही। जोग लिया तो क्या हुवा ! ॥

गुरुमहाराजांना एकदां मी विचारलें, "तुमचा व्यवसाय कीर्तनाचा असल्यामुळें, ब्रह्मज्ञानाचा अभ्यास निरूपणाचे योगाने सहज घडतो; परंतु आमचा भिक्षुकीचा व्यवसाय असल्यामुळें आत्मज्ञान, आत्मशांति व निर्भयता इत्यादि ब्रह्मज्ञानाला पोषक अशा गुणांचा अभ्यास प्रयत्नपूर्वक करावा लागतो" महाराज म्हणाले, "हें तुमचे म्हणणें खरेंच आहे."

त्यानंतर एका कीर्तनांत महाराजांनी समर्थांची पुढील ओवी म्हटली—

विवरितां विवरितां शेंवटीं। अखंड निवृत्ति पदीं भेटी ॥
झालियानें तुटी होणार नाहीं ॥

ही ओवी ऐकून मला अत्यंत आनंद झाला. वारंवार देहवृत्ति सद्गुरुला अर्पण, ब्रह्मार्पण केल्यानें निवृत्तिपदाची अखेर भेट झाली कीं सुख, निजशांति व निर्भयता यांचा लाभ होऊन तो अखंड टिकतो.

परंतु व्यवहारांत सामान्य साधकांची निजशांति अनेकांच्या सहवासानें नष्ट होत असल्याचा भास होतो! कारण संसारांत गुरफटलेल्या आमच्यासारख्या शिष्य-साधकांनी सद्गुरूंच्या निजबोध अनुभवानें पचविलेला नसतो! सद्गुरु मोरेश्वर महाराजांचा बोध अंतरांत पूर्ण न ठसल्यामुळें संसारांतील विविध प्रकारची दुःखे आमच्यासारख्यांना भयावह व असह्य वाटतात! आणि यामुळेंच महाराजांच्या

अखंड सहवासाचा लाभ आमच्यासारख्यांना हवा हवासा वाटतो. सन्निध राहण्याची संधि लाभल्यामुळें महाराजांचे अखंड बोधामृत प्राशन करण्याचें भाग्य आम्हांला लाभलें !

प्रपंचच परमार्थरूप कसा करावा याविषयींचा बोध सोप्या भाषेनें स्पष्ट करण्याची महाराजांची शैली अवर्णनीयच होती ! संसार व्यवहारांतील आपापलें कर्तव्य वेळच्यावेळीं करण्यावर महाराजांचा कटाक्ष असे. प्रपंच म्हणजे 'सरकारी काम' समजून तें अगोदर आटपावें म्हणजे '**परमार्थरूपी खासगी कामाला**' निश्चितपणें चांगला वेळ मिळतो. महाराज म्हणत '**देवाची अर्चा केली तरी ब्रह्माची चर्चा पाहिजे**' ब्रह्म प्रपंचापलीकडे असून निर्विकारी बंधमोक्षातीत आहे. असें जरी असलें तरी प्रपंच–परमार्थ, बंध–मोक्ष, गुरुशिष्य संबंध, सुखदुःखादि द्वंद्वें, जन्ममृत्यू, पापपुण्य इत्यादि प्रकार हे निरतिशय आनंदस्वरूप ब्रह्माची लीला अगर खेळ आहेत ! अशाप्रकारें महाराजांचा नित्य सहवास व बोध अखंड मिळण्याचें भाग्य आम्हाला लाभलें !

॥ एक वरावा एक त्यजावा । कैसा हा संसार ॥

या प्रेमलहरींतील पदाचा महाराजांच्या बोधचर्चेंत वारंवार उल्लेख असे. योग व त्याग या दोहोंतहि राहून, त्यापलीकडील गुरुकिल्ली हस्तगत करण्याचें वर्म, कसल्याही सेवेची अपेक्षा न करतां महाराजांनीं आम्हांस सांगितलें ! प्रपंचांत राहूनच परमार्थ कसा साधावा हें महाराजांनीं स्वतःच्या जीवनांतील व्यवहारांवरूनच मुमुक्षूंना पटवून दिलें. नित्य व्यवहारांत वावरणाऱ्या महाराजांसारख्या सत्पुरुषांची ओळख पटणें सामान्य जनांना जमतेंच असें नाहीं !

महाराजांच्या सहवासांतील त्यांच्या साधुत्वाचे प्रसंग पुष्कळच असले तरी त्यांपैकीं स्वानुभवाचे कांहीं प्रसंग या लिखाणांत यथामति नमूद करतो :–

आमची वडील मुलगी चि. सौ. नर्मदा (भ्रतार श्री. वसंत पांडे) हिला दिवस राहिले होते. त्याप्रसंगीं गुरुमहाराजांनीं तिला 'ताट ओवाळणी' (डोहाळे जेवण) केलें. खूप थाटमाट त्याकरितां केला. केवळ अनुग्रहीत शिष्यावरच प्रेम करून न थांबतां त्याच्या सर्व कुटुंबीयांविषयींहि महाराज आस्था व प्रेम राखीत याचा हा दाखला आहे.

## सेवेचा निरपेक्ष प्रकार कसा सुचविला !

महाराजांच्या सहवासाचा लाभ मिळून आमची ऐहिक आणि पारमार्थिक उन्नति होत असतां एकदा माझे मनांत आलें कीं द्रव्यरूपानें कांहीं सेवा थोडी फार

आपल्या हातून घडावी. त्याप्रमाणें 'आपल्याकडेच २५ रु. उसनवार म्हणून ठेवावे' अशी मी महाराजांना विनंति केली. 'तशी कांहीं जरूर नाहीं' असें उत्तर महाराजांनीं दिलें. मग मझ्या अत्याग्रहावरून २५ रु. महाराजांनीं ठेव म्हणून स्वीकारले. नंतर कांहीं दिवसांनीं 'तुमचे ठेवीचे २५ रु. घेऊन जा' असें मला सांगितलें. मग मी म्हणालों, "मला २५ रु. ची गरज नसल्यामुळें आपल्यालाच धर्मादाय स्वरूपांत ते अर्पण केले आहेत. ती रक्कम सत्कारणी लागावी अशी माझी इच्छा आहे." बाहेरील श्रीदत्तमूर्तिचे मस्तकावर चांदीची छत्री करवून आणावी ती सुदीर्घकाल राहील आणि त्यामुळें आपल्यावरहि श्रीदत्त-गुरुंचे सदैव कृपाछत्र राहील, असा द्रव्यसेवेचा निरपेक्ष सुंदर उपाय महाराजांनीं सुचविला! याप्रमाणें देवाला चांदीची छत्री मस्तकावर करून दिली. तेव्हांपासून गुरुमहाराजांच्या कृपेनें आमचा प्रपंच व परमार्थ आजतागायत अखंड ठीक चालला आहे. महाराजांच्या हयातींत त्यांचा व आमचा वियोग क्वचित् प्रसंगी होई. आमच्याविषयीं आपलेपणाचें प्रेमछत्र महाराजांनीं सतत राखलें! आमची सेवा-भक्ति कायिक नसली तरी थोर सत्पुरुषाचा सहवास आम्हांला लाभल्याची जाणीव सदैव आमचे हृदयांत होती व अद्यापहि आहे. शारीरिक सेवेप्रमाणें, किंबहुना अधिकच महत्व, मानसिक सेवेला आहे याचें एक उदाहरण नमूद करावेसें वाटतें.

### मानसिक सेवेचें महत्व सुचविणारें उदाहरण

इंदूर शहरीं ज्योतिषशास्त्राचे अध्यापक गुरु, रामसूत्रित त्रिपाठी, यांचेकडे आम्ही आणि एरंडोलचे श्री. त्र्यंबक तुकाराम जोशी असे दोघेजण ज्योतिष शिकण्यासाठीं एकाच वेळीं होतों. श्री. जोशी गुरुंची कपडे धुण्यासारखी शारीरिक सेवा नित्य करीत. माझ्याकडून तशी सेवा होत नसे. एकदां गुरुजी श्री. जोशींना म्हणाले "तुम्ही माझी शारीरिक सेवा पुष्कळ करितां पण तुमचें मन अभ्यासांत रमत नाहीं; म्हणून तुम्हांला विद्या देणेचा तितकासा उपयोग नाहीं; विद्याग्रहण करणारा नारायण रामचंद्र जोशीसारखाच विद्यार्थी पुढें विद्येचे रूपानें आमचे नांव चालवील." या दृष्टीनें गुरुजी मलाच प्रथम पाठ सांगत. यावरून शारीरिक सेवेपेक्षां मानसिक सेवा श्रेष्ठ ठरते.

यावरून 'सत्पुरुषांची शारीरिक सेवा करूच नये' अशी समजूत कोणी करून घेऊं नये. मानसिक भक्ति असली तरच केलेल्या शारीरिक सेवेचा उपयोग अधिक होतो, असाच याचा स्पष्टार्थ आहे. हेंच तत्व प्रपंच व परमार्थ दोहोंकडेहि लागू पडतें.

## श्रीदत्तमठीचें कार्य पंचामार्फत चालविण्याचा प्रयत्न!

श्रीदत्तमठीचें कार्य पंचामार्फत चालावें या कोणीतरी केलेल्या सूचनेला महाराजांनी संमति दिली. याकरितां, बंडू लोहार, हिरामण सोनार, सोनू महाराज वगैरे भक्त शिष्यानीं पुढाकार घेऊन एक सभा भरविली. या सभेला मीहि हजर होतों. मला बंडू लोहार व त्याचे निकटचे मित्र यांनीं सांगितलें 'तुम्ही सेवा करतां (पारायणें–अभिषेक) वगैरे ती मोफत करावी " मी थोडा विचार करून म्हटलें "मी या सभेंत लंबीचवडी आश्वासनें दिलीं आणि माझे हातून तसें प्रत्यक्ष न घडलें तर काय करणार? सेवा न करण्याचा आरोप तुम्ही कराल आणि महाराजांचे मन माझ्या विषयीं कलुषित करण्याची कारवाई केलीत तर!" या शिष्य भक्तांची ती मनोवृत्ति लक्षांत घेऊन मी पारायणाचें वगैरे काम त्यावेळीं हयात असलेले श्री. अनंत सखाराम जकातदार यांजवर सोंपविले! पण त्याखेरीज मठींतील इतर सेवा मी सोडली नाहीं.

## गैरसमजा विरुद्ध महाराजांचा इषारा

वरील सभेनंतर आलेल्या श्रीदत्त जयंतीचे उत्सवांत भोजनासाठी पांच सुवासिनी सांगून त्यांना प्रत्येकीं आठ आणे देण्याविषयीची कामगिरी महाराजांनीं मला सांगितली. त्याप्रमाणें मी केलें. उत्सव समाप्त झाल्यावर दोन महिन्यांनीं अनंतराव जकातदार यांनीं पैशांची मागणी मजजवळ न करतां, 'पैसे खाल्ले' अशा समजुतीनें थेट महाराजांकडे पैसे मागितले! त्यांचें कुटुंब उत्सवांत रोज वाढण्याचें काम करी आणि त्याकरितां त्या मेहनतीच्या पैशांची त्यांना अपेक्षा होती! "श्री. अनंतराव यांना आपल्या बायकोनें उत्सवांत वाढण्याचें काम केल्या-बद्दल पैसेच हवे होते तर त्यांनीं तुम्हांला तसें सांगावयास पाहिजे होते. मी तेहि पैसे तुमच्या जवळ दिले असते. पण तुम्हांला तसें न सांगतां त्यांनीं माझ्याकडे मागणी करून तुमच्याविषयीं मनांत अढी धरून गैरसमज मात्र उत्पन्न केला!" असें बोलून या प्रश्नाविषयीं तात्त्विक खुलासा करतांना महाराज म्हणाले, "संसारांत काय किंवा परमार्थांत काय, व्यवहार मोकळ्या मनानें केला पाहिजे. तसें नसलें म्हणजे माणूस कोणाविषयीं कांहींहि कल्पना करून गैरसमज पसरविण्यास कारणीभूत होतो, याचेंच हें प्रत्यक्ष उदाहरण घडलें" असें म्हणून श्री. जकातदारांशीं संबंध ठेवण्या-विरुद्ध महाराजांनीं सावधगिरीचा इषारा दिला! 'आपल्या परमार्थ मार्गाशीं मिळते जुळतें घेणाऱ्यांशींच संबंध ठेवावा' असेहि महाराज म्हणाले.

## भेदभावना निर्माण करणारे नालायक पंच !

श्रीदत्तमठी संस्थानचा व्यवहार चालविण्यास पंच निवडण्याची सभा झाल्याचा उल्लेख मागें आला आहे. "आत्मा वै पुत्र नामासि" या वेदोक्तीचा उल्लेख करून निवडलेले पंच नालायक असून चि. दत्तूच मठीचा व्यवहार चालविण्यास योग्य आहे," असें एका प्रसंगीच्या भाषणांत महाराजांनीं सुचविल्या पासून पंच म्हणवून घेणारा एक कंपू यापूर्वी अनुग्रहीत भक्त असूनहि अभक्तां सारखा वागून इतर भक्तांत गैरसमजाचे वीष पसरविण्याच्या कारवाया करूं पहात होता. महाराजांचे पारमार्थिक विवेचन पटण्याइतकी पात्रता या लोकांत नव्हती हे या लोकांनीं आपल्या अनेक कारवायांवरून आपणच दाखवून दिलें ! या लोकांच्या चालू व भावी हालचालीवरून महाराजांचा अंदाज अचूक होता हें दिसून आलें.

सारांश, लोकमान्य टिळकांनीं देहावसानाचे वेळीं देश स्वतंत्र करण्याची उरलेली कामगिरी महात्मा गांधीवर सोपविण्याविषयीं आत्मविश्वास व्यक्त केला, त्याचप्रमाणें "चि. दत्तू हा माझा आत्मा आहे" या वाक्यांत श्री. दत्तमहाराजां-विषयींचा आत्मविश्वास महाराजांनीं सुचविला तोच पुढें आणि आतांपर्यंतहि खरा ठरला ! भडगावच्या श्री दत्तमठीचा व्यवहार ठीक निःस्वार्थपणे चालविण्यास आणि सेवेची उपासना वाढविण्यास श्री. दत्तमहाराजच योग्य आहेत हें त्यांच्या आतां पर्यंतच्या कारकीर्दीवरून उत्तम तऱ्हेनें सिद्ध झालें आहे. कर्तव्यभ्रष्ट झालेल्या त्या बावचळलेल्या कंपूचा उल्लेख करतांना महाराजांनीं पंतांचे पुढील पदांचा संदर्भ दिला :—

नेणुनी तुमची संगति केली । पुरे आतां, फजिती झाली ! ॥
परमार्थाचें सोंग दावितां । विषयी वृत्ति तुमची मुरली ॥

हें सर्वच पद पंतांच्या प्रेमलहरींतून वांचण्यासारखें आहे ! विषयांत वृत्ति मुरली असतां, परमार्थाचे वरवर ढोंग करणारे स्वतःच्या व इतरांच्याहि फजीतीला कारण ठरतात !

शिष्यांनी संसारांत शुद्ध सद्वृत्ति राखली तरच सद्गुरूंचा उपदेश त्यांना मार्गदर्शक ठरतो, व असे सच्छिष्यच हळुहळू कृतार्थ होतात. सद्गुरूस तन, मन,

धन अर्पण करणें म्हणजे काय ! संसारांत जे जे बरे वाईट प्रसंग निर्माण होतात किंवा ज्या ज्या सांसारिक वा पारमार्थिक घटना घडतात, त्या सर्व सद्‌गुरूंच्याच प्रेरणेनें घडतात अशा श्रद्धेनें त्यांचा अहंकार सोडून सच्छिष्यांनीं त्या सद्‌गुरूंनाच अर्पण करावयाच्या असतात; त्यांचा भार आपल्या शिरावर घ्यावयाचा नसतो. सदरील तत्वबोध स्पष्ट करणारा एक प्रसंग माझ्या आयुष्यांत घडला तो नमूद करतो :–

भडगांवांतील श्री. वासुदेव कृष्णाजी मोहरीर व त्यांचे चिरंजीव नरहरी वासुदेव मोहरीर यांचे दरम्यान इस्टेटीसंबंधीं वाद निर्माण होऊन कोर्टांत वडिलांनीं नादारीचा अर्ज करण्यापर्यंतत तो विकोपास गेला ! कुलगुरू या नात्यानें या दोघांशीहि माझा संबंध होता. यामुळें कोर्टांत साक्ष देण्याविषयीं मला समन्स लावण्यांत आलें तर त्या प्रसंगीं "माझेविरुद्ध, कोणतीहि गोष्ट कोर्टापुढील आपल्या साक्षींत सांगू नका" अशी तंबी कोर्टांतील साक्षीचे पूर्वीं थोडे दिवस चि. नरहरी मोहरीर यांनीं मला दिली ! महाराजांनाहि माझ्याविषयीं कांहींतरी सांगून त्यांचा माझ्याविषयी गैरसमज व्हावा, अशी कारवाईहि त्यांनीं केली ! साक्षीच्या तारखेदिवशीं बंडू लोहार मार्फत मला महाराजांचा निरोप आला त्याचा आशय असा होता. 'तुम्ही काया, वाचा, मन हे सद्‌गुरूस म्हणून अर्पण केलें असल्या-मुळें साक्ष देण्याचे भानगडींतच न पडल्यास त्याचें पापपुण्य तुम्हांस नाहीं' व्याव-हारिक भानगडींपासून आत्मा निर्लेप व निष्क्रिय असतो हेंच महाराजांना या प्रसंगीं सुचवावयाचें होतें, असें दिसून आलें ! महाराजांना या नादारीच्या अर्जाचा तपशीलच माहित नसल्यामुळें त्यांनीं मला असा अलिप्त रहाण्याचा इषारा दिला असावा ! या घटनेनंतर महाराजांविषयीं माझी पूज्य भावना जास्तच वाढीस लागली ! 'प्रपंचांतच राहून परमार्थ कसा साधावा' हा बोध '**आधीं केलें मग सांगितलें**' या सुभाषिताला अनुसरून महाराजांनीं स्वतःच्या आचरणानेंच भक्तांना शिकविला. ही महाराजांची बोधाची पद्धत व हातोटी अवर्णनीय होती. तिचें शब्दांनी मी कसें वर्णन करणार !

खटल्याचा निकाल लागल्यानंतर मात्र नरहरी मोहरीर यांचा माझ्या-विषयींचा आदर व आपुलकी कायम राहिली आणि आजहि तशीच आहे.

महाराजांचें माझ्यावरील शुद्ध प्रेम अखेरपर्यंत कायम होतें. गुरुमहाराजांच्या सहवासामुळें आणि त्यांच्यावरील आमच्या भक्ति-श्रद्धेच्या भावनामुळें श्रीदत्तमठी विषयीं, आणि मठीचे सध्याचे सूत्रधार श्री. अण्णा तथा श्रीदत्तमहाराज यांच्या विषयीं. आमच्या सेवावृत्तीची निश्चयी श्रद्धा दृढ झालेली आहे; हीच सद्गुरुंच्या शिकवणीची आणि कृपाशीर्वादाची धन्यता होय.

असाच भक्ति-प्रेमाचा भाव श्री. दत्तमहाराज आपल्या गुरुबंधूमध्ये वाढवोत; अशी जगत्चालकाची आणि महाराजांसारख्या जागृत सद्गुरुदेवाची प्रार्थना करून हा निबंध पुरा करतो.

● ● ●

भाग १ ला

# आठवण नं. २२

( लेखक : श्री. राजाराम नारायण देशमुख, मु. पो. भडगांव. )

मोरेश्वर महाराजांनीं श्री. केळकरबाईंचे वाड्यांत १९२० सालीं मला अनुग्रह दिला. त्यावेळेपासून माझी ऐहिक व पारमार्थिक उन्नत्ति होत राहिली. मला टोणगांवची पोलीस पाटिलकी मिळाली. नंतर मी भडगांव ग्रामपंचायतीचा मेंबर झालों. मी आणि माझ्याबरोबर अनुग्रह घेतलेले शंकरराव, पाटील, सोनूदादा, नारोयण महाराज तिवारी, नारायणराव पाटील असे सर्वजण महाराजांच्या आज्ञे-प्रमाणें मठीच्या सेवेची सर्व कामें ताबडतोब करून देत होतों.

## श्री दत्तमूर्तींच्या स्थापनेचे समारंभाच्या वेळीं

सर्व गांवकरांना व भक्तांना लाडवांचा भोजन प्रसाद दिला. त्याप्रसंगीं आम्ही शिष्यभक्त भोजनाच्या पंक्ति वाढण्याची सेवा करीत होतों. परशुराम मास्तरहि पंक्तींत वाढण्याची सेवा करीत होते. सतत १५ दिवस तो उत्सव सोहाळा चालू होता. भंगी व झाडूवाले देखील प्रसाद भोजनासाठीं बोलाविले. पण सोन्याचा झाडू व चांदीची टोपली, झाडूवाले मागूं लागले ! "हा लग्न मुंजी सारखा खाजगी समारंभाचे नसून देवाचा प्रसाद आहे. येथें सोन्याचांदीच्या देणगीचा प्रश्न नाहीं. वाटल्यास प्रसाद घ्या नाहींतर जा" असें महाराजांनीं निक्षून सांगितल्यावर ते भोजनास बसले नाहींत पण प्रसादाचे वाटप मात्र घेऊन गेले !

## खंड-शेती गेली; पण पुढें चांगलेंच झालें !

मी श्री. केळकरबाईंची शेती खंडानें करीत होतो पण त्यावेळीं ९ वर्षें शेतमालास चांगला भाव नसल्यामुळें देण्यापायीं माझी शेती गेली ! तरी महाराज धीर देऊन म्हणाले, "देशमुख घाबरू नका, पुढें तुम्हांला चांगले दिवस येणार आहेत. महाराजांच्या आशिर्वादानें मला वयाच्या ४० व्या वर्षी नोकरी मिळाली. भडगांवापासून ८ मैलांवर तरवाडे येथील पाटीलकीचें तें काम होतें.

श्री अवधूत महाराज तिकडून मोटारीनें नांदेड वगैरे ठिकाणीं कीर्तनासाठीं व नामसप्ताहासाठीं जात असतांना, माझे बंगल्यावरच उतरत असत; त्यावेळीं महाराज म्हणत "कां देशमूख, माझ्या सांगण्याप्रमाणें तुम्हांला चांगले दिवस आले ना ?" मी म्हटलें, 'महाराज आपल्या आशीर्वादानें सर्व कांहीं ठीक झालें."

माझा मुलगा दोनदां 'फायनल' परीक्षेंत नापास झाला तेव्हां त्याला शाळेंतून काढला. तेव्हां महाराज मला म्हणाले, "देशमूख मुलाला शाळेंत पाठवा, फिरून परीक्षेला बसूंद्या तो पास होईल" त्याप्रमाणे मुलगा खरोखरीच पास झाला व हेडमास्तरच्या जागेवर आता आहे. एकंदरींत महाराजांच्या आशीर्वादानें आमचा प्रपंच व परमार्थहि आनंदांत चालला आहे. इतकी आठवण यथामति नमूद केली ती महाराजांचे चरणीं अर्पण करीत असून श्री दत्तमहाराजांनीं ती गोड करून घ्यावी.

* * *

भाग १ ला.

# आठवण नं. २३

[ **श्री. रामचंद्र तानीराम काळे :—** यांनी स्वतःच्या आणि **पाचोरा स्टेशनवरील** आपले मित्र कै. दिगंबर तंगाबाबुल, राहणार, बाळद, यांच्या व त्यावेळचे स्टेशनमास्तर याचेविषयींच्या या आठवणी सांगितल्या आहेत. ]

मला श्री अवधूत महाराजांची भेट व दर्शन प्रथम १९३० साली झालें. भडगांव मठींतील हे महाराज फार अधिकारी असल्याचें मी या पूर्वींच ऐकलें होतें. मी व माझे परमार्थातील मार्गदर्शक श्री. दिगंबर तंगाबाबुल ( रहाणार बाळद ) हे दोघेजण भडगांवास जाऊन या महाराजांचे दर्शन घेण्याचा बेत पुष्कळ दिवस करीत होतो. रेल्वेवर आमच्या नोकऱ्या होत्या; मी 'केबिनमन' आणि माझे स्नेही श्री. दिगंबर हे प्रमुख पोर्टर–होते. या कामांमुळें, बरेच दिवस आम्हांला वरील बेताप्रमाणें भडगांवास महाराजांच्या भेटीस जाणें जमलें नाहीं.

## भेटीचा योगायोग

कांही दिवस गेल्यानंतर आमच्या सुदैवानें भडगांवच्या अवधूत स्वामींच्या भेटीचा योग पाचोऱ्यास झाला ! पाचोऱ्याच्या कांही प्रतिष्ठित मंडळींनीं महाराजांना निमंत्रण देऊन त्यांचे पाचोरा शहरांत भव्य स्वागत केलें. तेथील श्री दत्तमंदिरांत महाराजांचा सात दिवस कीर्तन–सप्ताह झाला. ही बातमी कळल्यावर आम्ही श्रीदत्तमंदिरांतील कीर्तनास जाऊन महाराजांचा बोध कीर्तनात ऐकला. तो ऐकत असतां 'जणु आमच्या मनांतील अनुग्रह घेण्याचा हेतू, समजूनच महाराज बोलत आहेत' असें आम्हांला वाटलें ! भक्ति, ज्ञान, वैराग्य या विषयींचा आध्यात्मिक बोध आम्हांला अमृता सारखा गोड वाटला. आमच्या मनांतील शंका उपशंका नाहींशा होऊन त्या बोधामुळें आमचें समाधान झालें. गुरुमहाराजांचा कीर्तनांतील आणि निवास स्थानच्या बैठकींतील बोध–चर्चेचें हेंच वैशिष्ठ्य होतें. महाराजांनीं म्हटलेल्या ( स्वरचित ) पुढील पदावरूनहि याचा बोध होतो.

अनुभव हेतू जाणुनीं दीक्षा दिधली गुरुवारी बंदे
चित् शक्ति ही विवेक–गंगा पावन करि मंदे

कोणत्याहि जातीचा भक्त असो, जातपात न पहातां, त्याच्या अंतकरणांतील हेतु जाणून महाराज तात्काळ त्याला तारक मंत्राचा अनुग्रह देत आणि ज्ञानगंगेच्या प्रवाहात त्या भक्ताला पावन करीत! महाराजांचे समोर बसणाऱ्या भक्ताचे मनांत जो हेतू असेल तो पूर्ण करणाराच बोध महाराज करीत, असा अनेक भक्तांचा अनुभव आहे!

महाराजांचें कीर्तन झाल्यावर ते उतरले होते त्या ठिकाणी आम्हीं दोघे त्यांचे पाठोपाठ गेलों. महाराजांचे लक्ष्य आमचेकडे गेल्यावर हास्य मुखानें त्यांनी आमच्या येण्याचें कारण विचारलें. आम्ही उत्तर दिले, "महाराज, आपला अनुग्रह आम्हांस मिळावा या हेतूनें आलों आहों. आपल्या कीर्तनांतील बोधानें समाधान झालें" असें म्हणून दोघांनींहि महाराजांचे चरणीं डोकें ठेऊन त्यांचे पाय धरले. महाराजांनी मातेच्या दयाळूवृत्तीनें आमचे पाठीवर हात फिरविला आणि म्हणाले, "बाबानों, येथें आमचा मुक्काम आठ दिवस आहे. कीर्तन रोज चालू आहे. कीर्तनास दररोज येत जा; नंतर उपदेश घेतलात तर बरें." त्याप्रमाणें आम्ही दररोज कीर्तनास जाऊन लक्षपूर्वक बोध ऐकत होतों. बोधरूपी सिंहानें आमच्या अंतःकरणांतील अहंकाररूपी श्वापद गिळून टाकलें! महाराज पाचोऱ्याचा कीर्तनसप्ताह आटोपून भडगांवास गेले. नंतर आम्ही सुटीचे दिवशीं भडगांवास जाऊनमहाराजांच्या बोधवचनांचा लाभ घेत होतो. अनुग्रहहि पुढे घेतला. आम्ही दोघे भडगांवला जात असल्याची बातमी पाचोऱ्याचे त्यावेळचे स्टेशनमास्तर बोरगांवकर यांना समजली. त्यांनीं मला विचारलें, "कायरे रामचन्द्र, तूं आणि दिगंबर प्रत्येक सुट्टीचे दिवशीं कोठे जातां?" मी म्हटलें, "भडगांवचे अवधूत महाराज अधिकारी सत्पुरुष असल्यामुळें त्यांच्या भेटीस जातों" मला आणखीहि कांहीं प्रश्न विचारून त्यांनीं महाराजांच्याविषयीं सर्व माहिती समजून घेतली. नंतर म्हणाले, "रामचन्द्र, तुम्ही आतां भडगांवला जाल त्यावेळीं आम्ही पण अवधूत महाराजांच्या दर्शनास येऊं." मी पुढील सुट्टीचे दिवशीं मास्तरसाहेबांचे घरीं गेलों. ते आपल्या पत्नीसह भडगांवास जाण्यासाठीं तयारी करून राहिले होते. माझ्यासह मोठ्या आनंदानें ते मोटारींतून भडगांवास आले. मठींत गुरुमहाराजांचें दर्शन व भेट घेऊन आणि नमस्कार करून त्यांनीं आपल्या मनांतील हेतू महाराजांना सांगितला. गुरुमहाराजांनीं त्यांना पूर्ण आशीर्वाद दिला कीं "तुम्हांला पुत्रप्राप्ती होऊन तुमची इच्छा पूर्ण होईल. काळजी नको." ते उभयतां पतिपत्नी मोठ्या आनंदानें पाचोरा स्टेशनला परत आले. स्टेशनमास्तरांनी महाराजांच्या आशीर्वादानें झालेला आनंद बोलून दाखविला. कांहीं दिवसांनंतर महाराजांच्या आशीर्वादाप्रमाणें स्टेशनमास्तरांना पुत्ररत्न झालें.

भडगांवास स्वतः जाऊन मास्तरांनी ही आनंदाची बातमी महाराजांना सांगितली. पाचोऱ्यास परत येण्याचेवेळीं महाराजांना त्यांनी विनंति केली, " मला आपण कांहीं सेवा सांगावी. " महाराज म्हणाले, " तुम्ही सत्यनारायणाची पूजा मठींत करा " स्टेशनमास्तरांनीं तें मान्य करून सर्व साहित्याचा खर्च दिला आणि म्हणाले, " मला नोकरीच्या अडचणीमुळें सत्यनारायण प्रसंगीं हजर राहतां न आलें तरी दिगंबरराव रामचंद्र यांचेबरोबर प्रसाद पाठवून द्यावा. "

मग गुरुमहाराजांनीं सत्यनारायणाचा दिवस नक्की ठरवून प्रसाद घेऊन जाण्याविषयीं मला व दिगंबरला निरोप कळविला.

## प्रसाद आणण्याचे वेळीं आम्हां दोघांवरील संकटाचे निवारण

प्रसाद आणण्यासाठीं आम्ही दोघे पाचोऱ्याहून भडगांवकडे निघालों त्यावेळीं अचानक पावसाचें वादळ उठून आम्ही अनेक संकटांत सांपडलों! नाले व ओढे यांना पुराचे लोट आले! ' भडगांवास जावें कीं न जावें ' याविषयीं आम्ही साशंक झालों! अखेर सद्गुरूंच्या आज्ञेप्रमाणें जावयाचेंच, असा निश्चय केला. झिमझिम पाऊस पडतच होता. वाटेंत एका नाल्याला पाण्याचा लोट आलेला दिसला. पोहून पलीकडे जाण्याचा निर्धार करून पाण्यांत शिरलों! नाल्याच्या अगदीं मध्यभागापर्यंत पोहत गेलों. पाण्याला फार जोराची ओढ असल्यामुळें मी खालीं वहात चाललोसे पाहून दिगंबरनें आपल्या ताकतीच्या जोरावर मला धरून पलीकडील तीराला पोहत नेलें! ' गुरुमाउलीनें अशा रीतीनें संकटांतून आमचें रक्षण केलें. गुरुमहाराजांची कृपा ' असें म्हणत आम्ही थोडी विश्रांति घेतली. पण पुढें तितूर नदीलाहि पूर आल्याचें दिसलें. दुसरें संकट आमची परीक्षा घेणार असें वाटलें! संध्याकाळीं ६॥ ची वेळ होती. पलीकडील तीरावर नावाडी नावेसह उभा होता. त्याला आम्ही ओरडून हांक मारली. पण त्या भयंकर पुरांतून नाव अलीकडे आणण्यास तो तयार होईना! दीडतास आम्ही स्वस्थ बसून राहिलों; पाण्याचा जोर नंतर कमी झाला आणि मग नावाड्यानें नाव अलीकडे आणली. आम्हांला नावेतून त्यानें पलीकडे नेल्यावर आनंद झाला. पावसांत-आणि पाण्यातहि भिजून चिंब झाल्यामुळें आम्ही सद्गुरूचें चिंतन करीत रात्रीं ८॥ ला भडगावीं श्रीदत्तमठींत पोचलों. आमची ती दुर्दशा पाहून गुरुमहाराजांनीं विचारलें, " कायरे कसे आलात या वादळांत ? " आम्ही उत्तर दिलें " आपलें चिंतन करीत आल्यामुळेंच संकटांतून आमचा बचाव झाला! " मग त्या रात्रीं भडगांवांतच मुक्काम करून पहाटेच सत्यनारायणाचा प्रसाद स्टेशनमास्तरना देण्यासाठीं बरोबर घेऊन

पाचोरा स्टेशनवर मास्तरसाहेबांना प्रसाद पोचवला आणि आम्ही दोघेहि आपापल्या कामावर योग्यवेळीं हजर झालों. भडगांव ते पाचोरा ८ मैलांचें अंतर असूनहि नोकरी संभाळून भडगांवीं महाराजांचे दर्शनास सुटीचे दिवशीं पायीं जाण्याचा क्रम चालू ठेविला (त्यावेळीं बस सर्व्हिसच्या वगैरे सोयी नव्हत्या.) आम्हांला महाराजांनीं भक्ति-प्रेमाचें जणु वेडच लावून ठेविलें होतें ! वेळोवेळीं गुरुमहाराजांची बोधचर्चा ऐकल्याशिवाय आम्हांला चैन पडत नसे ! एखादे वेळीं लहर आली कीं रजा घेऊनहि आम्ही भडगांवास जाऊं लागलों. वरचे अधिकारी केव्हां केव्हां आमचेवर चिडत; पण आपोआप शांत होत असत असा अनुभव वरचे-वर येई ! अशा रीतीनें पाचोऱ्यास १२ वर्षें नोकरीवर असतां गुरुमहाराजांचा भक्ति-प्रेमाचा उपदेश ऐकण्याचा लाभ मिळाला; कारण त्या मुदतींत आमची बदली दुसरीकडे झाली नाहीं. आमच्या बरोबर कामें करणाऱ्या पुष्कळ लोकांच्या सहा सहा महिन्यांनीं दुसरीकडे बदल्या झाल्या. पण आम्हीं मात्र १२ वर्षें म्हणजे एक तप पाचोरा स्टेशनवर राहिल्यामुळेंच आम्हाला परमार्थाचा लाभ मिळाला हीहि गुरुमहाराजांचीच कृपा.

गुरुमाउली बाहेर गांवी फिरतीला जातांना आणि परत येतांना आम्हाला कोणत्या गाडीनें जाणार, येणार, हे अगोदर कळविण्यात येई. त्यामुळें आम्हा दोघा-नाहि त्याचे सामान गाडीत चढविण्याची किंवा उतरून घेण्याची सेवा करतां येई; आणि तीहि आम्हांला या बारा वर्षांत करावयास मिळाली. भडगांवमठींतील उत्सवा-साठीं बाहेरगांवाहून येणाऱ्या भक्तांना त्यांच्या सामानांसह सुरक्षित उतरून देणें व जातांना गाडींत बसवून देणेची सेवा आम्ही करीत असूं. या सेवेचें फळ मला व माझे जोडीदार दिगंबर या दोघांनाहि मिळालें–दोघांचेहि संसार परमार्थीवाण्यानें चालून आम्हांला शांति–समाधान लाभलें.

१९३९ सालीं गुरुमहाराज स्वानंदवासी झाल्यावरच माझी बदली वर्धा स्टेशनला झाली. तेथून ४ वर्षांनीं माईटीला बदली झाली आणि आतां फिरून पाचोऱ्यास आलों आहे. श्री गुरुमहाराजांच्या भडगांवचे श्रीदत्तमठींत, त्यांचे सुपुत्र श्रीदत्तमहाराज यांच्या सहवासानें, सेवा करण्याचा लाभ घेण्याची फिरून संधि लाभणार आहे, ही भाग्याची गोष्ट होय.

## कै. दिगंबर तंगा बाबुल यांच्या कुटुंबीयांची सद्‌गुरुनिष्ठेंत प्रगति

माझे जोडीदार गुरुबंधु कै. दिगंबर यांचें महाराजांच्या स्वानंदवासाचें मागोमाग २०-१२-१९३९ ला देहावसान झालें. त्यांचे मागें त्यांचे लहानसें कुटुंब दोन पुत्ररत्नें व एक कन्यारत्न आहें. त्यांची पत्नी अजून हयात आहे. या कुटुंबानें, आणि विशेषतः वडील मुलगा श्री रामदास दिगंबर यानें, गुरुनिष्ठा कायम राखून सद्‌गुरु कृपेनें परमार्थ रूपानें संसारांत भक्तिप्रेमानें रंगण्याची प्रथा पुढें ठीक चालविली आहे. या कुटुंबांचा ऐहिक व पारमार्थिक दर्जा सारखा वाढत आहे. कै. दिगंबर यांची इच्छा अशा रीतीनें त्यांच्या पश्चात् पूर्ण झाली आहे, हें मला पूर्ण माहीत आहे. दोघेहि चिरंजीव मोठ्या सरकारी जागांवर आहेत आणि सद्‌गुरुनिष्ठा व भक्तिप्रेम यांनीं पूर्ण आहेत.

* * *

## भाग पहिला

# आठवण नं. २४

**( कल्याणच्या श्रीमती राधाबाई दामोदर देशपांडे मुक्काम भडगांव )**

कल्याणास माझे छोटेसें माहेरघर आहे. माझा विवाह फार लहानपणींच झाला व थोड्या काळांतच माझा सर्व संसारहि आटोपला ! तेव्हां पासून मी माझ्या आईकडेच रहात असे. गुरुमहाराजांचा अनुग्रह घेतलेले श्री. बंडोपंत देशपांडे हे माझे दीर होत. त्यांच्या घरी एक कीर्तन करणाऱ्या बाई श्री. घारूताई साठे रहात असत. कल्याण शहरीं त्या वर्ष दोन वर्षांनी कीर्तनासाठीं येत. आमचा व श्री. बंडोपंताचा नात्याचा संबंध असल्यामुळें श्री. घारूताई साठे आमच्या कडेच बंडोपंताच्या आईसह महिना दोन महिने रहात असत.

एका वर्षी आमचें साताजन्मांचे पुण्य म्हणा, अगर आमचें भाग्य म्हणा, माझ्या नगरीं योगिराजांचे दर्शन घडण्याचेंच नव्हेतर अनुग्रह मिळण्याचेंहि भाग्य आम्हांला लाभलें ! श्रीअवधूत महाराजांचे कीर्तन कल्याण शहरांतील देवीच्या मंदिरांत तीन दिवस झालें. श्री. बंडोपंताच्या आईनीं महाराजांच्या कीर्तनाचे वर्णन करून मला व माझ्या आईला कीर्तन ऐकण्यास नेलें. मग दुसऱ्याच दिवशीं, महाराज उतरले होते त्या जागीं मला व माझ्या आईला श्री भागीरथीबाई देशपांडे घेऊन गेल्या. आणि आम्ही श्री अवधून महाराजांचा अनुग्रह घेतला. आमच्या बरोबर कल्याणच्या अनेक स्त्रियांनीहि त्यावेळीं महाराजांचा अनुग्रह घेतला. माझ्या परिस्थितीमुळें माझ्यांत देवधर्माची आणि परमार्थ मार्गाची आवड लहानपणींच उत्पन्न होऊन वाढत गेली.

पुढें एकदां आम्ही दत्तजयंतीच्या उत्सवासाठी भडगांवास श्री अवधूत मठीत आलों. आम्ही नवीनच असल्यामुळें मठीतील अधिकारी माणसांची ओळख व परिचय नव्हता. या प्रसंगानें सर्वांची ओळख झाली. दोन वेळां उत्सवांत आल्यावर श्री दत्तमठींतच महाराजांचे कीर्तन ठीक ऐकावयास मिळालें. पुढें कांही दिवसांनीं उतारवयांत श्री अवधूत महाराजांनीं कीतंन करण्याचें सोडलें. आणि मठीची सर्व जबाबदारी श्री. अण्णामहाराजांवरच सोपविली.

श्रीदत्तजयंतीचे उत्सवांत श्री. अण्णा कीर्तनासाठी बाहेरील पटांगणांत उभे राहिले कीं आंतील मंदिरांत श्री अवधूत महाराज श्री. अण्णांचे कीर्तन लक्षपूर्वक ऐकत रहात आणि मग श्री. अण्णांच्या कीर्तनातील निपुणतेचे कौतुक करीत !

पुढें कांहीं दिवसांनीं महाराजांची तब्येत रक्तदाबाच्या विकारानें जास्तच बिघडली आणि त्यांतच महाराजांच्या आत्मज्योतीनें पार्थिव देह सोडला ! त्यावेळीं महाराजांचे तीन्ही चिरंजीव, आईसाहेब, तीन्ही सुना, अनेक आप्तेष्ट आणि असंख्य भक्त व शिष्य यांना जे अलोट दुःख झालें, त्याचें वर्णनहि करवत नाहीं! मी आणि माझी आई यांना मात्र, आमच्या दुर्दैवानें, महाराजांच्या अंत्यदर्शना-साठीं भडगांवीं येतां आलें नाहीं !

पुढें वर्षश्राद्धाला मी आईसह आले होते. दुसऱ्या वर्षापासून महाराजांच्या पुण्यतिथीचा उत्सव सुरूं झाला. आमच्या आर्थिक हलाखीमुळें दर उत्सवासाठीं आम्ही हजर राहूं शकलों नाहीं. सौ. माई ( श्री. अण्णा महाराजांच्या सहधर्म-चारिणी ) आमच्या गरीबीची जाणीव होऊन एकदां म्हणाल्या, " तुम्ही भाड्याची काळजी करूं नका दर उत्सवाला भडगांवीं येत जा ! " त्यामुळें नंतर आम्ही भडगांवास दोन उत्सवासाठीं येत होतों. आमच्या परमार्थ मार्गातील अपुऱ्या राहिलेल्या गोष्टी श्री. अण्णांच्या सहवासानंतर पुऱ्या झाल्या.

## माझी आई देवाघरीं गेल्यावर

माझी आई देवाघरीं गेल्यावर मी एकटी पोरकी झाले ! मनांत वाटे कीं " आतां पर्यंतचा काळ नातेवाइकांतच घालविला. पण यापुढचा काळ सद्गुरु–सेवेंत आणि संतांच्या संगतींत जावा, पण असा योग जुळावा कसा व केव्हां ? " पण गुरुमहाराजांच्या प्रेरणेमुळें असो किंवा स्वाभाविक चांगुलपणामुळें असो, सौ. माईनींच मला मोठ्या उदार बुद्धीनें श्रीदत्तमठींतच ठेवून घेतलें आणि तशाच उदार बुद्धीनें श्री. अण्णा व सौ. माई आणि मठींतील लहान मुलांसह सर्वजण मला वागवीत आहेत. अशा रीतीनें सद्गुरु व श्रीदत्त यांची सदैव सेवा करण्याची संधि मला मिळत आहे. माझी ही अनंत जन्मींची पुण्याईच फळास आली, असें मला वाटतें ! परंतु प्रारब्धभोग कोणाला देवा-दानवांना सुद्धा सुटत नाही म्हणतात मग मला तरी तो कसा सुटणार ? माझ्या शरीराला दम्याचे दुखणे जडल्यामुळें सद्गुरुंच्या घरची सेवा घडावी तशी माझ्या हातून घडत नाहीं असें लक्षांत येऊन वाईट वाटतें. सौ. माईनीं माझ्यासाठीं पुष्कळ औषधांचा खर्च केला आणि करीत असतात. पण श्रीदत्ताचे तीर्थ व अंगारा यांनींच मला बराचसा गूण वाटूं लागला.

एरवीं माझी परिस्थिति फारच कठीण झाली असती ! तशी झाली नाहीं, हीहि सद्गुरूंची कृपाच म्हणावयाची ! श्री. अण्णा महाराजहि माझ्या तब्येतीविषयीं वारंवार चौकशी करून काळजी घेतात. सौ. माई, श्रीपादकाका आणि सर्व मुलें माणसेंहि मला आस्थेनें व प्रेमानें वागवितात ! पंतमहाराजांच्या नऊ भोवऱ्यांचे जे अनुभव त्यांच्या शिष्यांना आले, तसेच प्रेमळपणाचे अनुभव मला या सद्गुरुघरांत सदैव येत असतात हें माझें अहोभाग्यच होय.

सद्गुरुमहाराजांच्या महाप्रयाणानंतर आज पंचवीस वर्षें श्रीदत्तजयंती, महाराजांची पुण्यतिथि, गोकुळाष्टमी संकष्टीचा महाराजांचा जन्मोत्सव आणि बारीक सारीक अनेक समारंभ आणि देवकृत्यें अगदीं बिनचूक चालू आहेत. आजकालच्या महागाईंत इतका व्याप खटाटोप बिनचूक सांभाळणारे श्री. अण्णा आणि सौ. माई यांच्या आवरशक्तीची धन्यता वाटते ! श्री. अण्णा तर खरोखर देवमाणसाप्रमाणे वागतात. कोणत्याही बाबतींत कोणाचेंहि मन दुखवावयाचे नाहीं, असें त्यांचें वागणें असते ! त्यांना सर्व बाबतींत शांतता व समाधान राखण्यासाठीं सौ. माईहि उत्कृष्ट सहधर्मचारिणी ठरून श्री. अण्णांच्या सर्व हालचालींना सुरेल साथ देतात.

प्रपंच हा परमार्थ जाहला । व्यवहार अवघा शांतीनें भरला ॥

या पंतमहाराजांच्या पदाप्रमाणेंच घरांतील नित्याच्या व्यवहारांत आणि उत्सवाच्या गर्दींत व धामधुमींतहि सर्व व्यवस्थेंत शांति समाधान व आनंदित वातावरण राखण्याची, श्री. अण्णा व सौ. माई आपल्या परीनें पराकाष्ठा करतात, या गोष्टीविषयीं धन्यता व कौतुक करावे तितकें थोडेंच ठरेल ! सर्वांची ममतेनें आणि प्रेमळपणानें विचारपूस करून त्यांच्या चहापाण्याची व जेवणाखाण्याची व्यवस्था, कोणाची मदत नसली तरी, उत्तम ठेवण्यावर उभयतांचा कटाक्ष असतो. जणुं काय 'पार्वती-परमेश्वराची' ही जोडी गुरुघराण्यांत अवतरली असें वाटतें. महागाईच्या हल्लींच्या काळांत अशी व्यवस्था राखणे किती कठीण आहे, याची अनुभवी माणसांनाच कल्पना येईल.

आतांपर्यंत अनेक संत होऊन गेले व आजहि आहेत. परंतु हल्लींच्या विपरीत काळांत कोणत्याहि बाबतींत कमतरता पडूं नये असा साधुवृत्तीच्या औदार्याचा कारभार चालविणें अशक्यप्राय असून या गुरुघराण्यांत तसा चालला असल्याचे मी प्रत्यक्ष अनुभवीत आहे ! राजघराण्यांतील व्यवहारांतहि उणीवा दिसून येतील, परंतु माझ्या सद्गुरूंच्या घरीं कसलीहि न्यूनता दिसून येत नाहीं ! अशा सद्गुरुघराण्यांत सेवा करण्याची संधि लाभली हे माझ्यावर सद्गुरूंचें अनंत उपकार

आहेत. अनंतकोटी जन्म घेऊनहि या उपकारांचे ऋण फिटण्यासारखे नाहीं! एकंदरींत सद्भावनेच्या श्रद्धेचें फळ मिळाल्यावांचून रहात नाहीं. जग हे त्रिविध आणि विचित्र असल्यामुळे संतसज्जनांना देखील निंदकाच्या निंदेचे घाव सहन करावे लागतात. म्हणतात ना 'टाकीचे घांव सोसल्यावांचून देवकळा येत नाहीं!' म्हणूनच—

'निंदीत हे जन, आनंदचि मजला ॥'

या पंतांच्या पदाप्रमाणें मनाचा तोल जाऊं न देतां होईल तितकी सेवा करण्याचा मनाचा निश्चय आहे.

एकदां अंथरुणाला आजारानें खिळले असतांच मला गुरुमहाराज श्री. अण्णा व सौ. माई या त्रिमूर्तीचें दर्शन डोळे झांकले असतांच झालें आणि त्यानंतर माझी तब्येत सुधारत चालली. ही देखील सद्गुरूंचीच कृपा! सद्गुरूच एका पदांत म्हणतात— 'दत्तदास आहे, काळाचा तो काळ ॥"

त्यावेळीं खरोखरीच काळ आला होता, पण वेळ आली नव्हती! ही सद्गुरूंचीच कृपा नव्हे कां? सद्गुरूंची लीला अगाध आहे याचा वेळोवेळीं अनुभव येऊन धन्य धन्य वाटतें!

अखेर सद्गुरुचरणीं पुढील शब्दांत नम्र विनंति करून माझ्या या लहानशा आठवणी पुऱ्या करतें.

शक्तिहीन मी, भक्तिहीन मी, अर्थहीन मी।
कशि करूं सेवा दयाळू सद्गुरूदेवा।
देवा सुमति द्यावी, सेवा घ्यावी।
दत्त सद्गुरूनाथा, दिनानाथा, करावी दया॥

सद्गुरुचरणापाशीं हीच अंखेरीस विनंती.

• • •

भाग १ ला

# आठवण नं. २५

( लेखिका : श्रीमती रखमाबाई विष्णुपंत देसाई ठाणे–मुंबई उपनगर )

रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापूर तालुक्यांतील मोरडे हे माझ्या सासरच्या घरण्याचें मूळगांव. माझे सासरे श्री. नारायण सदाशिव देसाई कोल्हापुरांत पोलीस इन्स्पेक्टरचे हुद्यावर होते. ते सद्धर्मानें वागून आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करीत नसंत आणि सर्व कुटुंबाचें उत्तम प्रकारें पालन पोषण करीत. मुलांचा विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर आणि त्याना मिळविते केल्यावरच ते सेवानिवृत्त झाले. मोठे चिरंजीव वासुदेव नारायण सरदेसाई यांनी एम्. बी. एस. पर्यंत शिक्षण झाल्यावर डॉक्टरीचा व्यवसाय कोल्हापुर जिल्ह्यांत सुरूं केला. ' उत्तम प्रकारचे प्रख्यात डॉक्टर म्हणून कोल्हापुर जिल्ह्यापैकी इचलकरंजींत त्यांचें नांव सर्वांचे मुखीं झाले. इचलकरंजींत ६ वर्षें काढल्यानंतर त्यांनीं सांगलीस स्वतःच्या दवाखाना काढला आणि हजारों लोकांना आसन्नमरण स्थितींतून, वांचवून लोकांचा या सेवेमुळें दुवा मिळविला. डॉ. वासुदेव नारायण यांचे धाकटे बंधु विष्णु नारायण हे माझे पतिदेव. मॅट्रिक पास झाल्यावर त्यागीं ठाण्याचे कोर्टीत क्लार्कची नोकरी धरली. यामुळे १९२५ सालीं आमचें ठाण्यास बिऱ्हाड झालें. मला फक्त दोन मुली आहेत. पतिदेवांचा स्वभाव अत्यंत सात्विक, परमार्थाची त्यांना अत्यंत गोडी होती. त्यांच्यामुळें मलाहि परमार्थांची गोडी वाटूं लागली. त्यांचा सहवास आम्हां सर्वांना आनंददायी ठरला.

ठाण्यास श्री अवधूत महाराज कीर्तनाला येत त्यावेळीं चंदनी येथे धाकूबाई-कडे उतरत, त्यांची कीर्तनें चंदनी दत्तमंदिर, कोपनेश्वर मंदिर, व श्री विठ्ठल मंदिरांत होत असत. हजारों श्रोत्यांची कीर्तन श्रवणास गर्दी होई. त्यांचा आत्मबोध ऐकून श्रोते भक्तिप्रेमाची लूट करीत ! मी, माझे पति, दोन लहान मुलींसह महाराजांच्या कीर्तनास जात असूं. त्यांचे सुबोध आणि कर्णमधुर कीर्तन ऐकून त्यांचा गौरव रस्त्यानें करीतच श्रोतृगण घरीं परत येतांना कीर्तनास उभे रहाण्याचा अवधूत बाणा, पारमार्मिक विषयाचे सुबोध स्पष्टीकरण आणि एकंदर वागणूकच इतर हरिदासांपेक्षां

वेगळी आणि आकर्षक होती. यामुळेंच हजारों श्रोते कीर्तनांत शांतचित्तानें बसून त्यांचा परमार्थिक पूर्वरंग व आख्यानें ऐकत. महाराजांचा अनुग्रह घेतलेले शेंकडो भक्त, संसार परमार्थ बाण्यानें करून आज आनंदात आहेत.

श्री. अवधूत महाराजांचें वागणें अगदीं करारी बाण्यांचें होतें. त्यांनीं भक्तांकडून कसलीहि अपेक्षा केली नाही. कीर्तनाची बिदागी कधीहि आगाऊ ठरवून कोणाचीहि अडवणूक करीत नसत. जें कांहीं मिळेल तेंच संतोषानें घेत. १९२६ पासून कीर्तनें ऐकून त्याच वर्षी मी श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला व त्यांच्या परमार्थ बोधाचा आनंद आजतागायत घेत आहे. श्री अवधूत महाराजांच्या या बोधामुळें, तन, मन, धन सद्गुरूंना अर्पण करून अनेक कठीण प्रसंगीं आम्ही वृत्ति आनंदांत राखूं शकलों आहों.

मुलींचे विद्याभ्यास व लग्नकार्ये उरकल्यानंतर १९६२ सालीं माझ्या पतिदेवांच्या आत्म्यानें पार्थिव देह सोडून स्वानंदवास पत्करला. आम्हाला आनंदाचे वाटेकरी करूनच त्यांनीं इहलोकची यात्रा संपविली.

## अनुग्रह घेऊन गुरुद्रोह करण्याचा धोका !

श्रीमती घारूबाई नांवाच्या पुण्याच्या बाई अल्पवयांत विधवा झाल्या. त्या अवधूत महाराजांच्या अनुग्रहीत होत्या, त्यांच्या बंधूनीं गुरुमहाराजांची भेट घेऊन बहिणीविषयीं सर्व हकीकत सांगितली आणि तिला कीर्तन करणेची आज्ञा आपण द्यावी, अशी विनंति केली. 'या आज्ञेचा सदुपयोग करून ती आनंदानें कालक्रमणा करील' असेंहि तिचे बंधू महाराजांना म्हणाले. तेव्हां महाराज म्हणाले "**कीर्तन शिकवून येत नसते. शिक्षण घेऊन कीर्तन करणारे बहुतेक पोपटपंची करतात.** पण तुझ्या बहिणीला कीर्तन करावयाचें असल्यास माझ्या परवानगीची जरूरीच नाहीं. !" परंतु **गुरुकृपेशिवाय या बाईनें एक व्यवसाय म्हणून कीर्तनकाराचा** पेशा चालविला आणि गुरूंची आज्ञा न मानतां आडमार्गानें वागूं लागल्या ! लोकांना **अनुग्रह देण्याचेंहि ढोंग त्यांनीं सुरूं केलें.** "माझा अनुग्रह घेऊन तूं आपलें कल्याण करून घे" असें मला अनेकदां म्हणाल्या ! पण माझे पतिदेव, सासूसासरे व आईबाप यांच्या पुण्याईनें मला त्या बाईच्या जाळ्यांत पडण्याची दुर्बुद्धि झाली नाहीं. त्याच पुण्याईमुळें माझ्या सद्गुरूंनीं अनादिसिद्ध अवधूत संप्रदाय माझ्या पदरांत टाकून माझें कल्याण केलें. धन्य माझी गुरुमाता !

पुढें त्या बाई म्हणजे '**सांप्रदायांतील एक धोक्याचा लाल कंदील**' असें समजून सच्चे भक्त व शिष्य त्यांच्यापासून दूर राहूं लागले !

## दोन्ही मुलींचे विवाह ठीक झाले

गुरुमहाराजांचा अनुग्रह झाल्यानंतर माझ्या दोन्ही मुलींचे विवाह ठीक झाले. सर्व कांहीं समाधानकारक झालें, दोघींचेहि पति शाळा मास्तरचा व्यसाय करतात. धाकटी मुलगी चि. लीला हिचे यजमान याच वर्षी दुर्दैवानें देवाघरीं गेले. तिला सद्गुरुबोधाविषयीं सदैव जागृती राखून मन स्थिर ठेवण्याविषयीं तिला वारंवार सुचवीत असते. माझ्याप्रमाणेच गुरुबंधु मेघःशामबुवा वारंवार येऊन आम्हांला धीर देत असतात.

हल्लीं मी शाळामास्तरिणीची नोकरी करीत असून श्रीगुरुचिंतनांत आणि नामस्मरणांत आहेसे पाहून मुलीहि तसेंच वागण्याचें प्रयत्नांत असतात. विपरीत परिस्थितींतहि या आनंदी वृत्तीचा लाभ आम्हांला मिळतो ही गुरुकृपाच होय.

## श्रीगुरुमहाराजांनंतर श्रीदत्तमहाराजांनीं सांप्रदाय ऊर्जितावस्थेंत राखला!

सद्गुरु महाराज १९३९ सालीं स्वानंदवासी झाल्यानंतर, त्यांच्याच आशीर्वादानें त्यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री दत्तमहाराज तथा श्री अण्णा, यांनीं धैर्यानें श्री अवधूत दत्त साप्रदायाची सर्व जबाबदारी घेऊन ते त्या सांप्रदायाचें कार्य आणि सर्व उत्सव उत्तम तऱ्हेनें चालवीत आहेत. त्यांच्या नेतृत्वानें सर्व शिष्यभक्त भक्ति-प्रेमांत खेळत असल्याचें आम्ही पहात आहों. मी मधून मधून भडगांवीं उत्सवास जाऊन तो सोहाळा पहाते तेव्हां मला आनंद व धन्यता वाटते. भडगांवची ती पूण्यभूमि असंख्य भाविक भक्तांचें माहेरघरच ठरली आहे! गुरुबंधु मेघःशाम यांच्या आग्रहावरून सुचल्या तेवढ्या आठवणी माझ्या अल्पबुद्धिप्रमाणें यथामति व यथाशक्ति लिहिल्या त्या सर्व सद्गुचरणीं गुरुबांधवांकरितां अर्पण करतें.

* * * *

सुरवातीच्या तीन पानांत **श्री. गं. रखमाबाई यांच्या अवधूत महाराजां-**विषयींच्या आठवणी, त्यानीं सांगितल्या तशाच सारांशानें सुबोध शब्दांनीं नमूद केल्या आहेत. त्यानंतर त्यांची धाकटी कन्या **श्रीमती लीलाबाई** यांनीं आपल्या आईविषयीं लेख पाठविला. त्यांतील **श्री. गं. रखमाबाई** यांनीं अत्यंत प्रतिकूल परिस्थिती अनेकदां आली तरीहि पतिनिष्ठा, कर्तव्यनिष्ठा आणि अखेर सद्गुरुनिष्ठा व ईश्वरावरील श्रद्धा यांचे बळावर वयाची ७० वर्षे उलटून गेलीं तरीहि आपली **संसारविषयक कर्तव्यें परमार्थ निष्ठेंत कशी उत्कृष्ट रीतीनें पार पाडली** इत्यादींचें सविस्तर व सुंदर वर्णन त्याचे लेखांत आहे.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. २६

[ लेखक : कौतिक शंकर मराठे मु. परेल मुंबई ]

श्री सद्गुरु अवधूत महाराज यांची कीर्तनें ऐकण्याचा सुयोग मला जळगांवास प्रथम लाभला—कीर्तनांतील सुबोध मनांत असल्यामुळें भडगांवीं जाऊन १९२७ साली श्रीदत्तजन्माचे दिवशीं सकाळी दहाचे सुमारास मी श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. माझी परिस्थिति फार वाईट होती; पण महाराजांचा अनुग्रह घेतल्यानंतर ती सुधारत गेल्याचा अनुभव मी घेत आहे. माझी त्यानंतर सर्व प्रकारच्या व्यसनांतून सुटका झाली. माझी दोन लग्नें झाली. पहिली पत्नी वारल्या-नंतर कांहीं कालानंतर मी दुसरें लग्न केलें. महाराजांच्या अनुग्रहानंतर मला कोणत्याहि प्रकारची कमतरता पडली नाहीं— सर्व गोष्टी समाधानकारक रीतीनें पार पडूं लागल्या.

१९४४ सालीं मी मुंबईच्या एका गिरणींत 'डॉफर जॉबर' म्हणून नोकरी धरली. आज तागायत मी त्याच नोकरीच्या जागेवर आहे. मला या जागेवरून काढण्याकरितां माझ्या हितशत्रूंनीं खूप खटपटी लटपटी केल्या, लांच देऊन माझेवर मारेकरी देखील घातले ! परंतु मला मारण्याचें धाडस त्यांना साधलें नाहीं ! अखेर माझ्या बिऱ्हाडी येऊन माझ्या हितशत्रूंनीं मला विचारलें "कोणत्या साधनानें तुझें रक्षण होतें तें तरी सांग" ! मी प्रांजळपणें श्री सद्गुरु अवधूत महाराजांच्या अनु-ग्रहाची हकीगत सांगितली.

१९५० सालीं कल्याणला मी रहाण्याची जागा मिळाली म्हणून गेलो. ताजेदिन बावांना कांहीं धनिक भक्तांनीं तेथें मठ बांधून दिला होता. त्या ठिकाणीं कांहीं भाडेकरूं राहूं शकतील अशी उत्तम सोय केली आहे. पण त्या जागे विषयीं अजब प्रकार असा होता कीं, तेथें रहावयास जाणाऱ्या भाडेकरूची बायको थोड्याच दिवसांत मरून जाई ! असा ४–५ भाडेकरूंना कटू अनुभव आला होता ! मी त्या अवलियाला विचारलें तेव्हां त्यानें व इतर लोकांनीं मला त्या 'अजब प्रकारच्या' धोक्याचा इषारा दिला ! तरी देखील सद्गुरु अवधूत महाराजांच्या आशीर्वादाचे जोरावर मी तेथें जाऊन राहिलोंच ! मला तसा वाईट अनुभव तर नाहींच आला, पण मला त्या जागेंत एक मुलगाहि झाला. तीन वर्षें पर्यंत त्या जागेंत आनंदानें राहिलो. नंतर मुंबईस अनायासें सोयिस्कर जागा मिळाल्यामुळे मुंबईचे जागेंव येऊन राहूं लागलों. एकदरींत सद्गुरूंच्या कृपाशीर्वादानेंच मी संसार परमार्थ रूपानें करून आनंदांत आहे.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. २७

( लेखिका : कु. कृष्णाबाई भगवंतराव रेळे खार, मुंबई. )

मी एक प्रौढकुमारी आहे. लहानपणी मला आंकडी येत होती. कितीही औषधोपचार झाले तरी गूण नाहीं. सहा महिन्यानंतर माझे आजोबाचे ( आईचे वडील ) ओळखीचे एक मुसलमान सत्पुरुष होते. त्यांना 'उदी' दिली ती लावल्या नंतर फिरून आंकडी आली नाहीं. पण डावा डोळा व डावा हात थोडा अपंग राहिलाच आणी जीभ जड झाल्यामुळें बोलतांना अडखळून तोतरेपणा आला.

बारा वर्षांची असतांना एकदां मोटारखाली सांपडलें; पण मोटारीची इजा झालेली दिसली नाहीं, फिटस मात्र येऊं लागल्या वाजंत्री वाजण्यासारखे आवाजहि सहन होईनासे झाले ! एकटीला बाहेर जाणें धोक्याचें ठरलें! अर्थात् या मुळें शाळेंत जाऊन शिक्षण घेतां आलें नाही.

## १९३६ साली अवधूत महाराजांची कृपा व अनुग्रह

१९३६ साली अवधूत महाराज खारला आले होते. त्यांच्या कीर्तनाला मी कोणाबरोबर तरी जाई. त्यावेळी श्री अण्णा...श्री दत्तमहाराज यांचेकडून अनुग्रह घेतला व तारकमंत्र घेतला. ८-४ दिवसांनीं श्रीअवधूत महाराज-मोठेमहाराज-खारला आले. त्यावेळीं ते उतरले होते त्या ठिकाणीं श्री. अण्णांना कांही प्रश्न विचारण्यासाठीं मी गेले होते. श्री. अण्णा घरांत नव्हते म्हणून मोठे महाराज तेथें होते त्यांना मी माझी हकीगत सांगून कांहीं साधन करायला हवे कां ? असें विचारलें मोठे महाराज म्हणाले "तुला चि. दत्तूने मंत्र दिला आहेना ? आतां परत कांहीं त्रास झाल्यास मला सांग माझी कृपा दृष्टि तुम्हांवर आहेच" त्यानंतर मी मंत्रजप करीतच होते. दोन महिन्यांनी मी स्वप्नांत पंतमहाराजांना पाहिले व त्यांच्या उजव्या पायांचा अंगठा चोखला. लागोपाठ तीन रात्री असाच दृष्टांत स्वप्नात झाला ! त्यानंतर माझी वाचा थोडी सुधारली आतां मी गुरुकृपेनें व पंतांच्या कृपेनें भडगावला एकटी जाऊं येऊं शकते. त्यांच्याचं कृपेनें मला आतां कांहीं कमी नाहीं. ही अल्पशी आठवण गुरुबंधूंना सादर करतें.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. २८

लेखक : श्री. बसप्पा कोनय्या गोनेवार, मुंबई नं. ८
( कामाठीपुरा ५ वी गल्ली, घर नं. ९४ पहिला माळा. )

श्री. सद्गुरु अवधूत महाराज यांची पहिली भेट सुमारें सन १९१०–११ ला कामाठीपुरा ८ व्या गल्लीतील श्रीदत्तमंदिरासमोर झाली. सात दिवस महाराजांचा कीर्तनसप्ताह चालू होता. मी त्यावेळीं १४ वर्षांचा होतो. मंदिरासमोर महाराज गाडींतून खालीं उतरले त्या वेळीं, " प्रत्यक्ष दत्तमहाराजच अशा रूपानें आले असें वाटायचें ! त्यांची गौरवर्ण कांती, तेजःपुंज नेत्र, काषायवस्त्र, कंठीं स्फटिक माला, कानीं रुद्राक्ष कुंडलें, पायीं पादुका, कफनीवर शैली आणि हातीं कुबडी व करतल अशा थाटांत कीर्तनाला महाराज उभे रहायचे ! " कीर्तनांतील गोड पदे व भक्तिविषयक आख्यानांत मात्र मी रमत असे.

## अनुग्रह घेतला

१९१४ सालीं महाराजांचा परिचय पुष्कळ वाढल्यावर त्यांचा अनुग्रह घेण्याची इच्छा मला झाली. मातापित्यांच्या संमतीनें एका गुरुवारीं गुरुबंधू पोचेटी यांचेबरोबर गुरुगृहीं जाऊन गुरुपदेश घेतला. महाराजांच्या कृपेनें भजन-स्फूर्ति उत्पन्न झाली. एकतारी व चिपळ्या घेऊन घरीं दोन तास भजन करूं लागलों. बोबडा होतों पण भजन करूं लागल्यापासून स्पष्ट बोलूं लागलों. ' मूकं करोति वाचालम् ' हाच सद्गुरुमहिमा ! १९२६ पर्यंत गुरुमहाराज श्री दत्तमंदिरासमोरील मंडपांत कीर्तन करीत असत. १९२७ पासून भडगांवीं श्रीदत्तमठींत दत्तजयंतीचा सप्ताह सुरू झाला. मग कामाठीपुऱ्यांतील प्रथम महाराजांचा व नंतर श्री. दत्तमहाराजांचा कीर्तन-सप्ताह कामाठीपुऱ्यांत होत असतो. खत्तर गल्लींत श्री. जयकर यांच्याकडील मुक्कामांत महाराजांनीं मला स्फटिकांचीं माळ दिली, गांवदेवीकडील मेंगळे यांच्याकडे मुक्काम असतां पूजेकरितां पादुका दिल्या. १९३२ पासून श्रीअवधूत महाराजांचा जन्मोत्सव आम्ही भाद्रपद सप्तमीला करीत असतो. त्याचप्रमाणें मार्गशीर्षांत दरसाल लहान प्रमाणांत श्रीदत्तजयंतीचाहि उत्सव सुरू केला आहे. १९३८ सालीं चौपाटी चेंबर्समध्यें श्री. काशिनाथ महादेव ताम्हनकर यांचेकडे महाराज असतांना गुरुजयंतीला आमच्या विनंतीप्रमाणें महाराज घरीं आले.त्यावेळीं

आम्हांला फार आनंद झाला. त्यावेळीं महाराजांनाहि आनंद झाला. त्यावेळीं महाराजांवरच रचलेली पदें म्हणून पूजा व आरती केली. महाराजांनाहि आनंद झाला. तेव्हां "जयजयकार सदा गुरुपुत्रांचा जयजयकार सदा" हें पद श्री. शिवाप्पा कडून म्हणवून घेऊन महाराजांनीं शुभाशीर्वाद दिला.

## भक्तांचें संकट निवारण केल्याचे अनुभव

एकदां साखरेची टंचाई असतां महाराजांकडून न मागतां अचानक साखर मिळाली! १९३२ सालीं माझी नोकरी सुटून घरीं असतांना संध्याकाळीं शिजवायला तांदूळहि मला महाराजांकडून अचानक मिळालेले पाहून आईला आनंद झाला ! पुढें नरसू मिलमध्यें कामहि मिळाले. सद्गुरुकृपेनें माझ्यां घरी आतां अन्नपूर्णा व लक्ष्मी नांदत आहे. सद्गुरु अंतरसाक्षी असल्याचे अनुभव आले आले व अजूनहि येतात.

## आणखी विशेष

हा कीं जो विषय व शंका मनांत धरून सद्गुरुकडे मी जाई, त्याविषयीचा सुबोध खुलासा सद्गुरु मुखांतून बाहेर पडे ! असे कितीदां तरी मला अनुभव आले ! गुरुमाउलीनें मजवर अनंत उपकार केले. 'माझी सर्वात्मभावना झाल्याशिवाय' या उपकारांचा उतराई मी कसा होणार ? त्यांची पूर्ण कृपा झाल्याशिवाय सर्वात्मभावना होणार नाहीं. म्हणून मी त्या प्रेमळ गुरुमाउलीस अनन्य भावें शरण आहे. कर्ता करविता सद्गुरुच आहे. गुरुचरणाचा महिमा अगाध आहे! (यानंतर बसाप्पानीं आपले तीन स्वप्नदृष्टांत व एक 'सद्गुरुवरील पद' नमूद केलें आहेत. दृष्टांत श्री अवधूत महाराजांनाहि आवडत नसत म्हणून येथें ते वगळले आहेत.)

माझ्या हयातींत महाराजांशी माझा एकदाच पत्रव्यवहार झाला. १९२१ सालीं चैत्र शुद्ध पंचमी बुधवारीं रात्रौ १० वाजतां माझे वडील देवाघरी गेले व माझ्यावर सर्व संसाराचा बोजा पडला ! महाराजांना कुरुंदवाड मुक्कामीं पत्र पाठवून मी कळविलें. महाराज त्या पत्राच्या उत्तरांत म्हणतात, "पक्षी आकाशांत असला तरी सर्व लक्ष पिलांवर असते, मी दूर असलो तरी माझें लक्ष भक्तांवर असते, भिऊं नको!"

पाठिराखा सद्गुरु असतां कारे तूं भिसी ?॥ असा पंतांचा निर्वाळा आहे ! महाराज दरसाल मुंबईस येत असत त्यामुळें दर्शनाचा व गुरुबोधाचा प्रत्यक्ष लाभ मिळे. म्हणून त्यांना पत्र पाठविण्याचा प्रसंग एकदांच वरीलप्रमाणें आला.

● ● ●

भाग १ ला

# आठवण नं. २९

( लेखक : श्री. कृष्णराव नारायण पाठारे खोताची वाडी मुंबई. ४ )

## मातृपितृ घराण्याची धार्मिक वृत्ति

आमची मातृपितृ घराणीं. धार्मिक होती. आमच्या आईचा जन्म संतांच्या घराण्यात झाला. तिचे आई व वडील सदाचरणी व अतिथिसत्कार व गरिबास दानधर्म करण्यात तत्पर होते तोच गुण आमच्या आईतहि उतरला होता. आमचे वडिल श्री. हरिचंद्र सुंदरजी हे मातृपितृभक्त, गुरुभक्त, गोसेवक, गोरगरिबांस दानधर्म करण्यास तत्पर तसेच अतिथींचा आदरसत्कार करणारे होते. वडील बंधूंना व्यापारात नुकसान आलेलें पाहून, आमच्या आजोबांनी स्वतःची इस्टेट विकून नुकसान भरपाई केली. ठाकुरद्वारच्या घसवाडींतील श्रीराम मंदिराचे श्रीसद्‌गुरू हरिभाऊ यांचा अनुग्रह आमच्या आजोबानीं घेतला होता.

## भुलेश्वर कबूतर खान्यानजीक श्रीजगदंबेचे मंदिर आहे.

हे मंदिर आमच्या आजीच्या आतेच्या मालकीचें होते. आजीचे यजमान कॉन्ट्रॅक्टर होते. सुरतेस कॉन्ट्रॅक्टरचे कामासाठी गेले असतां ते तापी नदीत स्नान करीत असतां त्यांच्या पायाशी संगमरवरी २४ हातांची देवी लागली. त्यांनी त्या देवीला लगेच उचलून खांद्यावर घेतलें आणि मुक्कामास नेऊन तेथून सुरतस्टेशनवरून रेल्वेनें मुंबईस आले व भुलेश्वर येथील आपल्या घरी देवीस आणून विहिरीजवळील एका कोनाड्यात ठेविली. देवीची पूजा करण्याचें काम एका तेलगू ब्राह्मणावर सोंपविलें होतें.

नंतर कांही दिवसांनी आमच्या आतेचे कॉन्ट्रॅक्टर पतिराज आणि त्यांची बायको ( आजीची आत्या ) कालवश झाली, तेव्हां तें घर व देवी आमच्या आजोबाकडे आलें. कांही दिवसांनी आजोबाना देवीनें स्वप्नात दृष्टांत देऊन स्थापना करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें आजोबांनीं विद्वान ब्राह्मणांना बोलावुन एका शुभ मुहुर्तावर देवीची रीतसर वेदमंत्रांनीं स्थापना करण्याचा दिवस व वेळ ठरविण्यांत आली. देवीच्या स्थापनेकरतां एक सिंहासनहि तयार करण्यांत आलें. त्या आसनावर

देवीला नेऊन ठेवण्यासाठीं तीन ब्राह्मण देवीला उचलूं लागले तरी देवी हलेना ! मग ते ब्राह्मण आमच्या आजोबांना म्हणाले, " हरिश्चंद्रजी तुम्ही तरी प्रयत्न करून पहा. " मग आजोबांनीं देवीची प्रार्थना व नामस्मरण करून एकट्यानेंच देवीला उचलून :स्थापनेच्या जागीं नेऊन ठेविलें ! मग यथासांग स्थापनेचा विधि झाला. आजोबा सकाळ संध्याकाळ स्नानसंध्या व गाईची सेवा करीत. आमच्या आई-वडिलांचे प्रेरणेनें व आजोबा आजीच्या पुण्याईनें, तसेंच श्री अवधूत महाराजांच्या कृपेनें, माझे वडील बंधु श्री. रघुनाथराव स्थापत्य विशारद ( सिव्हिल इंजिनीयर ) झाले आणि श्री. गणपतराव श्रीकृष्ण दादरकर यांच्या सहकार्यानें त्यांनीं या देवीचें मंदिर बांधलें.

## श्री अवधूत महाराजांवरील श्रद्धा

आमचे वडील, श्री. नारायणराव, ठाकुरद्वारवरील विद्यारामभाईच्यां श्रीदत्त मंदिरांत एकदां दर्शनासाठीं गेले असतां तेथें त्यांनीं सद्गुरु श्री अवधूत महाराजांचें कीर्तन ऐकल्यावर त्यांचेवर वडिलांची श्रद्धा बसली.

श्री अवधूत महाराजांचा मुक्काम माधव बागेनजीक दुसऱ्या सुतार गल्लींत आमचे चुलत मामा श्री. सदाशिव पुरुषोत्तम सहानी यांच्याकडे असे. तेव्हां आमच्या वडिलांसह आमच्या घरांतील सर्व मंडळींनीं अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. महाराज नेहमीं आम्हाला कुरुंदवाडास आपल्याकडे येण्याचा आग्रह करीत. " तिकडील उत्तम हवा पाणी आणि अन्न यांचा प्रकृति उत्तम करणारा आनंद तरी अनुभवा " असें म्हणत. एकदां सहज म्हणाले, **" अवधूत सांप्रदाय पुढें चालविण्यासाठीं चि. दत्तूला तयार केलें पाहिजे "** आमच्या घरीं दोन तीन वेळां महाराजांचें कीर्तन झालें. आमच्या आई-वडिलांची फार इच्छा होती कीं महाराजांनीं एक वेळ तरी आमच्या देवीचे मंदिरांत कीर्तन करावे. पुढें महाराजांची तब्येत नादुरुस्त झाल्यामुळें त्यांचें कीर्तन देवीचे देवळांत होण्याचा योग जमला नाहीं. पण बनामहॉल लेनमध्यें महाराज उतरले असतां श्रावण महिन्याचे अखेरीस एके दिवशीं, माझ्या वडील बंधूनीं महाराजांची भेट घेऊन, नवरात्रीं निमित्त महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज यांचे कीर्तन देवीचे देवळांत व्हावें अशी विनंती केली. महाराजांनीं आनंदाने तशी परवानगी दिली ! त्याप्रमाणे श्री. दत्तमहाराजांनीं, श्री. अण्णांनी, आमच्या देवीच्या मंदिरांत नवरात्रीं सुश्राव्य कीर्तन केलें.

## महाराजांच्या आशीर्वादानें बहिणीचा मुलगा वांचला व मोठा झाला !

बनामहॉल लेन मधील महाराजांची भाड्याची जागा भाद्रपद महिन्यापुरत्याच मुदतीची होती. तेव्हा त्यानंतर नावलकर लेन मधील आमच्या बहिणीचे घरी महाराजांच्या मुक्कामाची सोय करविली. या वेळे पर्यंत मुंबईत चातुर्मासांत महाराजांचीं कीर्तनें होत नसत. पण चातुर्मासांत मुंबईत कीर्तनें सुरू झाली व ती प्रथा श्री. दत्तमहाज–तथा श्री. अण्णा–यांनीं चालू ठेविली.

श्री नावलकरांकडील आमच्या बहिणीचीं मुलें जगत नसत; चार पांचववर्षांची झाली कीं त्यांचे देहवसान होई ! महाराज उतरले असतांना आमच्या बहिणीला मुलगा झाला; आमच्या बहिणीनें त्याला महाराजांचे चरणांवर घातला. त्यांचा आशीर्वाद मागितला. महाराजांनी त्या मुलाला आशीर्वाद देऊन सांगितले " भिऊं नका, हा तुमच्या वंशाचा अंकूर वाढेल ! " महाराजांनीं त्या मुलाचें नांव ' अवधूत ' ठेवण्यास सांगितलें. आज तो मुलगा २६ वर्षें वयाचा आहे !

❁ ❁ ❁

भाग १ ला

# आठवण नं. ३०

(श्री. विष्णू मानाजी चेउलकर, ग्रांटरोड, मुंबई ७)

माझें वय अंदाजे १६ व धाकटा भाऊ महादेव हा अंदाजें १२॥ वर्षांचा असताना, १९१४ साली माझे वडील श्री. मानाजी चेउलकर यांनी, दुसऱ्या सुतार गल्लींत श्री. सहानी यांचे बिऱ्हाडी श्री. अवधूतमहाराज होते त्यांचा अनुग्रह घेण्यासाठी श्री. मुकुंद सारंग याचे बरोबर आम्हाला पाठविले. त्यावेळी मी कडियाचा (गवंड्याचा) व्यवसाय करीत असे. सूर्यास्तानंतर गुरुवारी रात्रीं ८ चे सुमारास आम्हा दोघा भावांना अनुग्रह दिला त्यामुळें निजबोधाची ओळख होऊन आम्हांला अत्यानंद झाला! त्या नंतर माझा नित्य नियम असा कीं, संध्याकाळी कामावरून सुटल्यावर घरी जाण्यापूर्वी महाराजांचे दर्शन घेऊन जावयाचें. मग जेवल्यावर महाराजांचें कीर्तन असले तेथें तें ऐकावयास जावयाचे.

## श्रीपंतवाङ्मयाचा श्रीगुरुकृपेनें परिचय

एक दिवस कामावरून सुटून महाराजांचे दर्शन एकट्यानेंच घेतलें आणि बाजूला बसलो. महाराज त्या वेळी जमलेल्या भक्तांना उद्देशून म्हणाले "आमच्या पंतमहाराजानी तयार केलेलें, 'प्रेमलहरी' हें पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झाले असून त्यांत श्री दत्तभक्तीची पदें, अभंग, साध्या ओव्या इत्यादि भक्तिपर कविता आहेत. सध्या या पुस्तकाची किंमत १॥ रुपया, पंतभक्तांसाठी ठेविली असून, लवकरच त्याची किंमत वाढणार आहे. ज्यांना ऐपत असेल त्यांनी हे पुस्तक विकत घ्यावे. त्यांना त्याचा नित्यभजनासाठीं फार उयोग होईल. माझ्या खिशात चार आणेसुद्धां त्यावेळी नव्हते! मी महाराजांना म्हटलें "मजजवळ आतां पैसे नाहीत हें पुस्तक तर घ्यावेसे वाटते," महाराज म्हणाले "कांहीं हरकत नाहीं. जेव्हा मिळतील तेव्हां पैसे द्या. परंतु ज्यांना पुस्तकं पाहिजेत त्यांनो आतांच नांवे द्यावींत. म्हणजे मी उद्यां तितकीं पुस्तके मागवून घेईन" चार दिवसात उसनवारीने दीड रु. जमवून महाराजांना दिला. महाराजांनी दुसरेच दिवशी मला 'प्रेमलहरीचें पुस्तक

दिलें तेव्हां मला फार आनंद झाला! घरीं आल्यावर पुस्तक उघडून पाहिलें तो मला त्यांतले कांही समजेना. पण श्रीदत्ताचे नाव तेवढें खूप ठिकाणीं वाचलें. माझे वडील आत्मज्ञानी दत्तभक्तच असल्यामुळें त्यांनाहि हें पुस्तक पाहून आनंद झाला.

## दुसऱ्यांदा महाराजांची कृपा

एकदां दादाजी धाकजींच्या इमारतीचे बाजूस पंतभुवनांत होणाऱ्या कीर्तनांत महाराजांच्या प्रेरणेनें एकतारी वाजविण्याची संधि महाराजांनी माझ्यासारख्या अनभिज्ञाला दिली!

## तिसऱ्या अनुभवांत महाराजांनीं मला काळाच्या दाढेंतून वाचविलें!

१९२२ सालीं पायधुनी नाक्यावर माझें फ्रेममेकरचें धंद्याचें सामान आणणेसाठीं गेलों असतां माझ्या दंडात २॥ तोळ्याचे सलकडे ३ तोळ्यांच्या सोन्याच्या ३ अंगठ्या बोटांत व खिशांत २२५ रु. च्या नोटा असतां मुसलमान गुंडांच्या कारवाईतून महाराजांच्या तारक मंत्रानें माझा बचाव झाला!

## मुठी मारल्यांतूनहि बचाव

१९३४ ते १९३५ सालांत दोन इसमानीं मला मुठी मारल्या! दोन्हीहि वेळीं संकटें आलीं पण गुरुस्मरणानें व तारक मंत्रानें टळली असा प्रत्यक्ष अनुभव आहे.

## माझ्या दुसऱ्या विवाहाचा वृत्तांत

मी माझ्या खोलींत एकटाच झोंपलों असतां ३० एप्रिल १९३९ रोजीं रात्रीं सुमारें १२ वाजतां मला स्वप्न पडून गुरुमहाराजांचें दर्शन झालें. मला महाराज म्हणाले, "उठून बस. तुला दुसरे लग्न केलेंच पाहिजे." मी म्हटले, "मला आतां लग्न करणें नाहीं. पहिलें लग्न झाल्यापासून वारंवार आजारी पडलो, त्यांतच ५ मुलें झालीं. त्यांपैकी पहिला मुलगा हयात असून बाकीची देवाघरीं गेली. बायकोहि त्यांचे मागोमाग गेली. आतां स्वतंत्र धंदा आहे, पण काम नाही, दुकानाचें व राहत्या जागेचें भाडें थकलें असून नोकरांचे पगारहि अद्याप देतां आले नाहीत. बायकांच्या व मुलांच्या औषधोपारासाठीं कर्ज वाढून राहिले आहे, या आपत्तीमुळें प्रपंचांतील सुखदुःखांना विटलों. आहे! या स्थितींत दुसरें लग्न कशाला? सद्गुरुनींच यांतून तारावे!" माझें हें रडगाणें ऐकून गुरुमहाराज म्हणाले "तुला त्याचें काय? तुला

मी मुलगी देतों ती तुझ्या पहिल्या बायको पेक्षां भक्तिवान् व गुणवान् आहे, तेव्हां तिच्याशीं लग्न केलेंच पाहिजे " मी म्हटलें लग्न कसें होणार ? मी अगदी धनहीन झालों असून अंगावर कपडे नाहींत व दोन वेळ हॉटेलातहि जेऊं शकत नाही ! गुरुमाउलीचा व माझा सदरील संवाद, स्वप्नांतील दृष्टांतांत, रात्रीं १२ ते १ पर्यंत चालला होता ! पुढें महाराजांनीं दिलेल्या दृष्टांताप्रमाणें अचानक मदत येऊन माझा दुसरा विवाह झाला.

## यापेक्षां जास्त आठवणी आहेत पण लिहीत कां नाहीं ?

वर नमूद केल्यापेक्षा जास्त भयंकर प्रसंगातूनहि मला माझ्या गुरुमातेनें वाचविले आणि छळ करणाऱ्या दुर्जनाना शिक्षा केल्या. परंतु तो तपशील हिंसा करणारा ठरेल, म्हणून नमूद करीत नाहीं. फक्त माझा बचाव कसा केला येवढें दर्शविण्यापुरता मजकूर लिहिला.

## माझ्या गुरुबंधूंना अखेरची विनवणी

माझ्या गुरुबंधूंनो, मी पामर तुमच्या चरणापाशीं येवून विनंति करतों " अनंत विश्वें धुंडाळलीत तरी गुरुमातेचें सामर्थ्य कोठेंहि अनुभवास येणार नाहीं ! गुरुविणें अन्य दैवत नाहीं, गुरुविणें कोणी तारणारा नाहीं. आपले अनंत अपराध असले तरी शरण गेले असतां गुरुमाउली क्षमा करून जवळ घेते. आणि हृदयाशीं धरून भक्तिप्रेमाचें दूध पाजते ! अशी सद्गुरु माऊली कृपाळू !

### पद

किती गुरुचे गुण गाऊं । किती नित्यप्रेम आठवूं ॥
उपकारांसि नाही सीमा । सदा त्याचें ध्यानीं राहू ॥ धृ ॥
अंतर्बाह्य आपणचि विलसे । कोठें स्वरूप पाहूं ॥ २ ॥
मी पण अर्पुनि मोरेश्वर पदीं । प्रेमामृतें न्हाऊं ॥ ३ ॥

* * *

**विशेष सूचना :–**

[ स्वानंदवासी श्री अवधूत महाराज व पंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांना ' चमत्कार दाखवून नमस्कार ' मिळविण्याची कल्पना आवडत नसे. म्हणून वरील आणि इतर कांही भक्तांच्या आठवणींतील चमत्कारांची निवेदनें बरींच वगळलीं आहेत. ]

भाग १ ला

# आठवण नं. ३१

( लेखिका : श्रीमती चंपूबाई क्षीरसागर, दादर मुंबई )

विद्याराम भाईचे दत्तमंदिरांत १९२४-२५ च्या अधिकमासांत श्रीअवधूत महाराजांचीं कीर्तनें चालू होतीं. महाराज कीर्तनला उभे राहिले कीं प्रत्यक्ष मच्छेंद्रनाथच उभे असल्यासारखें वाटे ! 'नवनाथांच्या कथा' हाच त्यांच्या कीर्तनांतील उत्तररंगाच्या आख्यानांचा विषय असे. कोणी अनुग्रह घेण्याविषयीं सांगितलें कीं मी म्हणत असे त्यांचे पाय धरण्याची उत्कंठा अत्यंत वाढेल त्यावेळीं अनुग्रह घेईनहि.

नंतर गुरुपौर्णिमेला सुतारगल्लींतील सहानी यांच्या येथें श्री अवधूत महाराजांचे दर्शनास गेले. माझ्याबरोबर माझी बहीण पिरोजबाई व तिची महाराजांचा अनुग्रह घेतलेली मैत्रीण होती. महाराजांची कीर्तनें कोठेंहि असली तरी त्या जात असत. एकदां चिंताग्रस्त असतांना महाराजांनीं स्वप्नांत मला दर्शन देऊन धीर दिला. श्री. सहानी यांचेकडील १९४५ चे मुक्कामांतच महाराजांचा अनुग्रह घेतला.

भडगांवीं श्रीदत्तमंदिराच्या स्थापनेच्या समारंभाला आम्ही गेलों होतों, त्यावेळीं कोर्तनांत "**झाले मी बाई वेडी, दरबार गुरूचा झाडी**" हें पद म्हटलें त्या पदाचा तो नाद अजूनहि माझे कानांत घुमतो !

नंतर खत्तर गल्लींतील जयकरांच्या घरीं महाराजांचा मुक्काम असतांना महाराजांनीं एक पद एकतारीच्या सुरांत म्हटलें व तें आम्ही त्यांच्या संमतीनें लिहून घेतलें. त्यानंतर १९४० सालीं मी भडगांवला गेलें असतां नुकतेच स्वानंदवासाची समाधी घेतलेल्या श्री अवधूत महाराजांनीं श्रीदत्ताच्या पायरीवर बसले असतां स्वप्नांत मला दर्शन दिलें आणि पाठीवर हात ठेवला तेव्हां स्वप्नांतून जागी झालें ! नंतर दरसाल मी सौ. सरस्वतीबाई आपटे यांच्याबरोबर भडगांवला जात असे. श्री दत्तजयंतीच्या उत्सवासाठीं माझी बहीण पिरोजबाईही बरोबर असे. मंदिरांत जात असलेले महाराज त्यावेळीं पडलेल्या स्वप्नांतहि दिसले ! चैत्रांत पिरोजबाई अक्कलकोट स्वामींच्या जन्मोत्सवास गुंतल्यामुळें भडगांवीं येत नसे. ती अक्कलकोट स्वामींची अनुग्रहीत असली तरी श्री अवधूत महाराजांकडेहि त्याच दृष्टीनें पाही.

मी घरीं दररोज महाराजांच्या फोटोची पूजा करते. त्यावेळीं तुळशीपत्र अगर गुलाबाची पाकळी फोटोवर वहात असे. एकदां स्वप्नांत येऊन महाराजांनीं सांगितलें, "डोक्यावर भार कशाला ? चरणपूजा हीच खरी पूजा !" * * *

# आठवण नं. ३२

( लेखिका श्री. मनोरमा नथुराम नगरकर मुंबई. )

माझे पती ( श्री. नथूराम नगरकर ) यांची श्री अवधूत महाराजांचेवर अखंड श्रद्धा होती. 'पतीधर्म तोच पत्नीधर्म ' मानून मीहि त्यांचे सद्‌गुरूवर श्रद्धा ठेविली. माझे कांही अनुभव नमूद करतें :—

एकदां झोंपेत घाबरून मी किंचाळले. तेव्हां पतिदेवांनीं मला सद्‌गुरूंचा अंगांरा लावला व म्हणाले " माझा सद्‌गुरू रक्षणकर्ता असतां तुला कोणाचीहि भीति नाही, तूं पण गुरूपदेश घे. "

मीहि श्रीअवधूत महाराजाचीं कीर्तनें ऐकली होती. त्यांच्या त्या निरूपण पद्धतीनें मनाला आनंद होई. यामुळें १९२८ सालीं मी पतिदेवांबरोबर जाऊन महाराजांचा अनुग्रह घेतला.

## मुलगी संकटांतून गुरुकृपेने वांचली.

भडगांवीं आम्ही दत्तजयंतीच्या उत्सवास गेलों होतों. गिरणानदीवर स्नान करून कपडे धूत असतां माझ्या हातून वस्त्र सुटून वाहून जाऊं लागलेलें माझ्या मुलीनें पाहिल्यावर ती तें वस्त्र धरावयास पाण्यात गेली पण पाणी खोल आणि ओढ असल्याकारणानें ती खोल पाण्यांत पडून वस्त्राबरोबर वाहात चालली आणि डोहांत सांपडून गटंगळ्या खाऊं लागली ! मी घाबरून जाऊन ओरडूं लागलें तें ऐकून गावांतील एका मुलानें पाण्यात उडी घेऊन मुलीला वर काढले व सुखरूप घरीं आणलें तो मुलगा म्हणाला " जरा पुढे गेली असती तर मुलगी सांपडणें शक्य झाले नसते " मुलगी वाचली म्हणून मला अत्यानंद झाला पण ही बातमी कोणालाही न बोलतां मी मनांत सद्‌गुरुचे आभार मानले !

त्याच दिवशीं श्रीदत्तमठींत महाराज प्रवचन करीत असतां माझ्या पतिदेवांना बोलावून म्हणाले " आज पंत महाराज धावून आले म्हणूनच तुमच्यावरील अरिष्ट टळलें ! काय ते तुला तुझ्या पत्नीकडून कळेल !" असे महाराज का बोलले असे माझ्या पतीने मला एकीकडे बोलावून विचारलें ' कोणतें अरिष्ट आलें होतें ? ' मी मग नदीवर घडलेला प्रसंग सांगितला तेव्हां दोघेंहि गुरुमहाराजांच्या अंतर्ज्ञानामुळें आश्चर्यानें थक्कच झालों !

## महाराजांच्या अंतर्ज्ञानाचें व कृपेचे एक ठळक उदाहरण

माझा मुलगा आजारी असतां महाराज एकदां मुंबईस आले होते. मी त्यांच्या दर्शनास गेले तेव्हां मला पहातांच महाराज म्हणाले "तुझ्याकडे दत्तप्रेमलहरीचे पुस्तक आहे ते सात दिवसांत वाचून पुरे कर" मी म्हटलें मला चालीवर तीं पदें म्हणतां येत नाहींत' महाराज म्हणाले 'इतर गोष्टीचीं पुस्तकें वाचतां तसेंच वाच. महाराजांच्या आज्ञेप्रमाणें मी दत्तप्रेमलहरी रोज वाचूं लागले. पण काय आश्चर्य! तिसरे दिवशीं मुलाचा ताप उतरूं लागला आणि त्याला आराम पडला! तेव्हांपासून माझी गुरुनामावर व गुरुस्मरणावर अखंड श्रद्धा बसली.

## महाराजांच्या स्वानंदवासानंतरहि आमचे रक्षण व मार्गदर्शन

१९३९ सालीं महराज स्वानंदवासी झाले. ती अशुभ वार्ता आम्हांला अत्यंत दुःखदायक वाटली! परंतु महाराजांचा पार्थिव देह नाहीसा झाला असला तरी संकटाच्या प्रसंगीं ते कोणत्या ना कोणत्या प्रकारानें आमचें रक्षण व मार्गदर्शन करतात असा अनुभव आहे.

## १९४२ च्या भयानक काळांतील अनुभव

१९४२ साल भयंकर ठरलें. दंगे गोळीबार आणि कर्फ्यू ऑर्डर आणि पोलिसांचा व सोजिरांचा धिंगाणा, यामुळें घराबाहेर तोंड काढणें कठीण होऊन बसलें होते! माझा धाकटा मुलगा त्यावेळीं आजारी होता. डॉक्टर वैद्याचें औषधोपचार करणेंहि अवघड झालें होतें. एक दिवस संध्याकाळीं कर्फ्यू ऑर्डरनें रस्ता बंद होण्यापूर्वी अचानक एक फुलाची पुडी खिडकींतून घरांतील महाराजांच्या फोटो पुढेंच पडली! त्या पुडींत एक फुलांचा हार होता! माझ्या पतिदेवांना 'फूल व मूल सारखेंच' हे महाराजांचे उद्‌गार त्यामुळें आठवले! महाराजावरील श्रद्धे-मुळें तो हार पतिदेवांनीं महाराजांच्या फोटोला घातला. माझा धाकटा मुलगा त्यानंतर लवकरच खडखडीत बरा झाला!

## मजवर आकाशीची कुऱ्हाड! गुरुबंधूंनीं धीर दिला.

१९४४ सालीं मजवर अकस्मात् आकाशीची कुऱ्हाड कोसळून माझे पतिदेव देवाघरीं गेले! माझें त्यावेळचें दुःख शब्दांनी वर्णन कसें करूं? मग गुरुबंधू शिवराम सकपाळ व श्री. मेघःशामबुवा यांनीं येऊन माझें सांत्वन केलें व चार धीराच्या गोष्टी सांगितल्या. अखंड नामस्मरणाचा उपाय दुःख शमनार्थ सांगितला. मग निदान मुलांकरितां तरी दुःख आवरून आपलें कर्तव्य करीत राहिलें पाहिजे, असें मला वाटूं लागलें.

सद्‌गुरु महाराजांच्या कृपेनें आणि मार्गदर्शनानें सदैव मी वागत असल्यामुळें आम्ही सर्व कुटुंबीय संसारसागरांत तग धरून सुखरुप आहों.

• • •

भाग १ ला

# आठवण नं. ३३

( लेखक : श्री. सखाराम हरी मयेकर, मुंबई )

वयाच्या १२ वर्षांपासून मी अवधूत महाराजांची कीर्तनें असतील तेथें जाऊन ऐकत असे. ५-६ वर्षें असा क्रम चालू होता. १९२० सालीं एकदां माझ्या काकांनीं मला कामाठीपुऱ्याचे ८ व्या गल्लींत श्री अवधूत महाराजांच्या कीर्तनास नेलें. दुरूनच श्री अवधूत महाराजांना पाहिलें. त्यांचा तो कीर्तनाचा थाट पाहून थक्कच झालों. परमार्थज्ञानाचा पूर्वरंग संपल्यावर महाराजांनीं श्री तुलसीदासांचें आख्यान लाविलें. मी त्या आख्यानांत अगदीं रंगून गेलों! महाराजांनीं वेळ संपल्यामुळें 'अर्धें आख्यान दुसऱ्या दिवशीं पुरें करूं' असें सांगून त्या दिवशींचें कीर्तन संपविलें. मला तें भक्तिपूर्ण आख्यान ऐकण्याचा ध्यासच लागला. दुसऱ्या दिवशीं कीर्तन सुरूं होण्याचे कितीतरी अगोदर मी कीर्तनाचे जागीं जाऊन बसलों! तें आख्यानहि संपलें तरी, मला महाराजांच्या कीर्तनाची अत्यंत गोडी लागल्यामुळें लागोपाठ ८ दिवस मी त्यांची कीर्तनें ऐकलीं! मनावर परिणाम होऊन महाराजा-विषयीं अत्यंत आदर वाटून मी माझ्या काकांना विचारलें, "सद्गुरु मला अनुग्रह देतील कां?" त्यांनी होकार दिला व मला महाराजांच्या मुक्कामीं घेऊन गेले. महाराजांनींहि लगेच रुकार देऊन मला माझ्या १८ वे वर्षीं अनुग्रह देऊन धन्य केलें, हें माझें भाग्य! त्यानंतर महाराजांची कीर्तनें होतील त्या त्या ठिकाणीं जाऊन तीं मी ऐकत असे. थोड्या दिवसांनीं महाराज मुंबई सोडून गांवीं गेले ते बरेच दिवसांत मुंबईस आले नाहींत. त्यामुळें मला महाराजांचा परमार्थबोध ऐकण्याची तळमळ लागून राहिली होती! नंतर एक दिवस स्वप्नांत दर्शन देऊन सद्गुरु बोलले, "तुला दर्शनाची व बोधाची इतकी तळमळ आहे तर दुसऱ्या सुतार गल्लींत श्री. सहानी यांचेकडे मला येऊन भेट!" माझ्या एका गुरुबंधूला हा दृष्टांत सांगितल्यावर आम्ही दोघेजण दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं श्री. सहानीचे-कडे गेलों. त्याठिकाणीं सद्गुरूंचे खरोखरच दर्शन झालें! मी त्यांना झालेला दृष्टांत सांगितला. आणि थोडावेळ बोध ऐकून प्रसाद घेऊन घरीं आलों.

पुढें १९२२ सालीं माझा विवाह होऊन संसारांत पडलों. संसार परमार्थरूपानें कसा करावा ही सद्गुरुंची शिकवण प्रत्यक्ष व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न करूं लागलों ! सद्गुरुकृपेनें कसलेहि अडथळे आले नाहींत !

## ब्लडप्रेशरच्या दुखण्यांतून सुटका !

१९५६ सालच्या पहिल्या सहामाहीत मी गांवीं जाण्याचे ठरवून बरोबर न्यावयाच्या सामानाची तयारीहि केली. जाण्याच्या दिवशींच माझी प्रकृति ब्लडप्रेशरमुळें एकदम बिघडली ! गांवीं जाणें रहित करून, आणलेलें सामान मेहतांबरोबर गांवी पाठविलें. मुलगा व पुतण्या नोकरीचे कामावर गेले होते, माझी बायकोही गांवी गेलेली होती. घरांत एकटी सून होती. नेहमीचे डॉक्टर येऊन त्यांनीं तपासल्यावर औषध देऊन गेले. मुलाला कामावरून घरीं बोलावण्यांत आलें. मुलानें घाबरून जाऊन मोठा डॉक्टर आणला. त्यांनीं तपासून सांगितलें. "नेहमींच्या डॉक्टरनें दिलेलीं औषधें बरोबर आहेत. तींच देत चला." इतक्यांत त्या डॉक्टरांचें लक्ष माझ्या समोर असलेल्या सद्गुरुंचे फोटोकडे गेलें, तेव्हां ते म्हणाले,—"या सद्गुरू सारखा तुमचा पाठिराखा असतांना तुम्हाला वास्तविक औषधोपचारांची जरूरीच नाहीं !" पुढें हळु हळु सद्गुरु कृपेनेंच माझी प्रकृति ताळ्यावर आली !

आतां मला ५६ वर्षें होऊन गेल्यामुळें माझ्या हातून नोकरी होत नाहीं. श्री गुरुकृपेनें अजून सर्व ठीक आहे. यापुढेंहि असेच चांगले दिवस लाभावे, हीच सद्गुरुचरणीं प्रार्थना.

* * *

# आठवण नं. ३४

(भगिनी श्रीमती बापूबाई रामचंद्रराव पौडवाल मुंबई, वय वर्षें ८०,)

## गुरुमहाराजांचें १९०९ सालीं दर्शन व अनुग्रह

१९०९ सालीं माझे पतिदेव श्री. रामचंद्रराव त्रिंबकराव पौडवाल काळारामाचे देवळांत श्री अवधूत महाराजांचे कीर्तन ऐकण्यास गेले होते. त्यांचा कीर्तनांतील बोध ऐकून आणि त्यांची तेजस्वी मूर्ति पाहून त्यांचा अनुग्रह घेण्याचें मनानें निश्चित ठरवून घरीं आले. लगेंच दुसरे दिवशीं मला व लहान मुलांना घेऊन देवळांत कीर्तन ऐकण्यासाठीं गेलें "असें सुबोध कीर्तन आपण कधींच ऐकलें नव्हते" असें मला वाटलें! घरीं येऊन आम्ही उभयतांनीं श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेण्याचा निश्चय केला. दुसरे दिवशीं महाराज उतरलेल्या जागेची चौकशी करून उत्तम दिवस पाहून मुगभाटमधील चौघडेवाल्यांचे चाळींत महाराज उतरले होते तेथें आम्ही दोघांनींहि महाराजांचा अनुग्रह घेऊन धन्य झालों! आमचे गुणदोष वगैरे कांहीं न विचारतां आमचा मीपणा नाहींसा करून गुरुमाउलीनें आमचेवर पूर्ण कृपा केली! आम्हाला येवढा मोठा अवधूत सांप्रदाय देऊन आमचेकडून गुरुमाउलीनें कसलीहि अपेक्षा केली नाहीं. आमची अशी श्रद्धा कीं, "आमचे श्रीगुरु ५ वा वेद असून श्रुति, स्मृति, पुरणांतरीचे रहस्य जाणणारे आहेत!" माझे मुलगे व मुली यांनींहि मोठे झाल्यावर श्री गुरूंचा अनुग्रह घेतला. त्यांनाहि श्रीगुरूंचे वेड लागलें! सर्वजण आम्ही आमचे घरीं त्यांचे अधिष्ठान ठेवून नित्य पूजा आरती व भजन करीत असतो. इतकेंच नव्हें तर आम्ही सर्व कुटुंबीय एक विचारें राहून ऐक्याचा आनंद भोगीत असतों! मी आज ८० वर्षांची असून गुरुकृपेची गोड लीला इतकीं वर्षें अनुभवीत आहे.

आमचे घरी मुंजलग्न इत्यादि कार्यें निघालीं आणि आम्ही बोलाविलें की गुरुमहाराज मोठ्या अगत्यपूर्वक आमचे घरीं येऊन मोठ्या प्रेमानें आशिर्वाद देत! गुरुमहाराजांच्या इच्छेप्रमाणें आम्ही भडगांवी श्रीदत्तजयंतीचे उत्सवासाठीं ५-६ वेळां गेलो होतों. भक्तांना वागविण्याची महाराजांची शिस्त व आपुलकी वाखाणण्या

सारखी होती. हजारों लोकांच्या एकत्र खाण्यापिण्याची सोयहि ते अत्यंत आस्थेनें करीत. तें अवाढव्य व्यापाचें अन्नदान पाहून आम्ही थक्कच झालों! विशेष हा कीं गुरुमहाराज सर्वांवर सारखें प्रेम करीत! सकाळपासून संध्याकाळ पर्यंत सर्वांचीं सर्व प्रकारें महाराज काळजी घेत. सर्वांत मिसळून बालवृतीनें वागतांना त्यांना पाहून धन्य वाटे! फिरून त्यांना मोठेपणाचा अभिमान नसे आणि कोणी स्तुति केलेली खपत नसे!

## भडगावला जाणेचे पूर्वीं कुरुंदवाडास.

१९१८ साली महाराजांच्या इच्छेप्रमाणे श्रीपंत अष्टमीचे जन्मकाल उत्सवासाठी माझे पतिदेव सदाशिवराव सहानी, श्री. भगवंतराव आहिरे श्री. विष्णुपंत व वसंतराव वगैरे मंडळी कुरुंदवाडीं गेली होती. तोहि उत्सव मोठ्या थाटानें झाल्याचे माझ्या पतींनीं वर्णन केले. पंतांच्या आत्मबोधाचा सोप्या भाषेत प्रचार महाराज करीत, त्यामुळें कुरंदवाड व आसपासच्या खेड्यांतील हजारों भाविक श्रीपंतभजनीं लागल्याचेहिं वर्णन त्यांनीं केलें.

## माझे पतिदेव संगमावरील अपघातांतून वांचले.

माझे पति व मुंबईहून गेलेले गुरुबंधू एकदां कृष्णा पंचगंगेच्या संगमावर स्नानासाठीं गेले. पोहतां येत नसल्यामुळें बहुतेक मंडळी भराभर स्नानें करून वर आलीं. पण माझ्या पतिदेवांना चांगलें पोहतां येत असल्यामुळें ते नदींत पोहत राहिले. पण नदीला नवापूर आल्यामुळें संगमानजीक भोंवऱ्यांत सांपडून ते गटंगळ्या खाऊं लागले! त्या बरोबर एक ब्राह्मण तरुणानें पाण्यात उडी मारून अंगावरील उपरणें माझ्या पतीकडे फेंकून तें घट्ट धरण्यास सांगितलें. त्यांनीं तसें केल्यावर तो ब्राम्हण त्यांना कडेला घेऊन आला! कडेला पोचून सावध झाल्यावर माझ्या पतींनीं बरोबरच्या मित्राना सांगितलें कीं, माझ्या खिशांतून १ रु. काढून त्या ब्राम्हणाला मला वांचविण्याचे कामगिरीबद्दल बक्षिस द्या! पण रुपाया काढून त्या ब्राह्मणास पाहतात तो केव्हांच अदृश्य झाला होता! घरीं गेल्यावर मित्रांनी गुरुमाउलीचे कानांवर ही गोष्ट घातली तेव्हां महाराज म्हणाले "माझा श्रीपंतच तो ब्राम्हण!" मला ही हकीगत समजतांच मला पुढील पद आठवलें. ॥ वंदू कोणा गुरुगुह्य आतां। सर्वत्र दिसे गुरु त्राता॥

कुरुंदवाडास ४ दिवस राहून सद्गुरुंचा निरोप घेऊन सर्व मित्रमंडळी मुंबईस आली. ज्या ठिकाणीं श्रीपंतांनीं अपघातांतून वाचविलें. तेथील वाळू माझ्या पतींनीं मुंबईस घरीं आणली होती, पण त्या अपघाताविषयीं कोणाशींहि बोलत नव्हते.

थोड्याच दिवसांनी गुरुमहाराज मुंबईस आले. त्यावेळीं मी त्यांच्या दर्शनास गेलें असतां ते म्हणाले तुझ्यावर श्रीगुरुची पूर्ण कृपा आहे त्यांनीं तुझ्या पतींना वाचविले तुम्हांस कांहीं काळजी करण्याचें कारण नाही "मला ते कांहीं समजलें नाहीं! मी घरीं आल्यानंतर माझ्या पतिदेवांना विचारलें, "महाराज असे म्हणाले त्याचा मला नीट बोध झाला नाही! त्याचा खुलासा कराल तर बरें." मग कुरुंदवाडास आपण बुडतांना कोणी आपल्यास वांचविलें याची सर्व हकीगत त्यांनीं मला सांगितली. मला तें ऐकून काय वाटलें तें मी सांगू शकत नाहीं! "माझ्या दोन्ही-कडील वाडवडिलांची पुण्याई आणि सद्‌गुरूंची कृपा यामुळेंच आम्ही हे आनंदाचे दिवस पाहिले" असें वाटून धन्य रे गुरुराया। धन्य केलें भक्तांसि ॥ असेंहि उद्‌गार तोंडून सहज निघाले! मग आम्ही दोघेंहि गुरुमाउलीचे मुक्कामीं जाऊन त्यांना वंदन करून आलों. त्याच दिवशीं आम्हीं दोघेंहि दिवसभर म्हणत होतों! 'धन्य अमुचा श्रीगुरु मोरया। धन्य तुझी लीला' ॥

## पतिदेवांचा स्वानंदवास!

१९२१ सालीं माझे पतिदेव देवाघरीं जाऊन स्वानंदवासी झाले. माझ्यासह सर्वांचेंच कृपाछत्र गेलें! आम्हांला झालेल्या तीव्र शोकाचें वर्णन कसें करणार? पण धैर्य धरून मन खंबीर करणें भागच होतें. गुरुमहाराजांना कुरुंदवाडास आणि बाळेकुंद्रीस ही अभद्र बातमी कळविण्यांत आली. गुरुमहाराज तिसऱ्याच दिवशीं आमचे घरीं आपल्या मातुश्रीस घेऊन आले. १२ व्या दिवशीं बाळेकुंद्रीहून श्री. गोपाळराव व बंधु श्री. वामनरावहि आले. गुरुमहाराजांप्रमाणें सर्वांनींच मला व मुलांना धीर देऊन सांत्वनपर बोलले. केवढी अगाध ही गुरुकृपा!

## गुरुकृपेनें फिरून सर्व स्थिति सुधारली!

पतिदेव स्वानंदवासी झाल्यानतर प्रपंच्याची सर्वच जबाबदारी माझेवरच पडली! घरचा मिळविता पुरुष गेला. मुलांचे शिक्षण वगैरे अनेक अडचणी होत्या. अशा परिस्थितींत फक्त गुरुकृपेचा तेवढाच आधार मला होता. गुरुमहाराज मधून मधून घरीं येत आणि अडचणींतून पार पाडण्याचे उपाय सांगत. त्याप्रमाणे वागत गेल्यामुळें सर्व अडचणी हळु हळु नाहींशा झाल्या. आणि सर्व दैन्यहि अखेर गेलें! मुलांचा अभ्यास पुरा होऊन श्रीगुरुकृपेनें त्यांना नोकऱ्या चांगल्या मिळाल्या आणि माझ्या हातीं संसार खर्चाला पुरेसे पैसे फिरून येऊं लागले! त्यात सद्‌गुरु चिंतन व नामस्मरणाच्या आनंदाने उर्वरित आयुष्य घालवीत आहे. सर्व मुलें मुली मोठी होऊनहि माझ्या वचनांत वागतात आणि आपापल्या संसारांतील

जबाबदाऱ्या ठीक पार पाडतात. सर्व मुलांनाहि परमार्थ मार्गाची आवड व गुरुभक्ति आहे. इतक्या उतार वयांतहि असे भाग्याचे दिवस मला श्रीगुरुकृपेनेंच लाभले आहेत! महाराजांचा अनुग्रह घेतल्यापासून पंचपदी, महाराजांनीं रचलेले सर्व श्लोक व पदें, हरिपाठ इत्यादि परमार्थिक वाङ्मयाचें वाचन, पठन, मनन रोज करीत आहे. माझे घरीं भगवें परिधान करून सद्गुरुंनीं यावें, अशी माझी फार दिवसांची इच्छा होती, तीहि गुरुमाउलीनें एकदां पुरी केली!

माझी मोठी सूनबाई एकदां महाराजांच्या दर्शनास गेली असतां तिनें महाराजांना विनंति केली. "महाराज सासूबाईंना भेटण्यास सवड करून यावें, त्या आतां अगदीं थकल्या आहेत" "असं कां? तर मग आतांच येतो" असें म्हणून महाराज भगवें वस्त्र परिधान करूनच आमचे घरीं आले! तें पाहून आम्हां सर्वांनाच आनंद झाला! त्याच वेळीं महाराजांनीं पायांतील खडावा काढून आमच्याकडे पूजेस ठेविल्या! १९३८ सालीं झालेली ही गुरुमाउलीची आम्हांला शेवटचीच भेट ठरली! त्या पादुकांची दररोज पूजा करून लहान थोर मंडळी नमस्कार करितात आणि गुरुमहाराजांच्या कृपेनें सर्व संकटांतून आम्ही पार पडत असल्याचा अनुभव अद्याप घेत आहों.

## सद्गुरुंचा स्वानंदवास आणि नंतर

१९३९ सालीं गुरुमहाराज अकस्मात् स्वानंदवासी झाले! आम्हांला त्याचें किती वाईट वाटलें याचें वर्णन करण्यास शब्द अपुरे पडतात! गुरुमहाराजांच्या अंत्यविधीनंतर दहावे दिवशीं मी भडगांवीं गेले होतें. सर्व गुरुभक्त शिष्यांना 'आपण पोरके झालों' असें त्याप्रसंगीं वाटलें त्यांचा भक्तिप्रेमाचा दिव्य बोध आठवूनच आतां आनंद मानीत आहों.

## सुपुत्रांने अवधूत–सांप्रदायाची थोरवी पुढें चालू ठेविली.

आतां श्रीदत्त अवधूत मठीचा सांप्रदाय. गुरुमहाराजांचे ज्जेष्ट सुपुत्र श्री. दत्त महाराजांचा श्रीअण्णा, यांनी त्याच बाण्यानें चालविला आहे. श्री अण्णांच्या धर्मपत्नी सौ. मथुराबाई, सत्शील आणि उदार बुद्धीनें, या कामीं आपल्या पतींना सर्व दृष्टीनीं उत्तम हातभार लावीत असतात! हजारों भक्त मंडळीनां आज गुरुमहाराजच जागृत असल्या सारखें वाटतें! सर्व भाविक भक्तांना सुपंथ दाखवून सर्वांच्या कल्याणासाठीं श्रीदत्त महाराजहि अवधूत सांप्रदाय पुढें चालवीत असल्याचे आम्ही प्रत्यक्षच पाहात आहों. धन्य माझे गुरु-वंशज आणि धन्य गुरुमाऊली!

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ३५

( लेखक श्री. तुकाराम संपत बोरसे, जळगांव )

माझ्या वयाच्या ५ व्या वर्षी त्या काळचा मूक सिनेमा 'लंकादहन' पाहिला तेव्हांपासून श्रीरामाची व मारुतीची पदें स्तोत्रें, अभंग आवडूं लागले आणि ऐकून पाठ करूं लागलो. शाळेच्या बाल वर्गात अवघे ६ महिनेच शिकलों; पण धार्मिक पोथ्यांचा ध्यास असल्यामुळे अक्षरओळख लवकर झाली. रामायण, हरिविजय व नवनाथ इत्यादि पोथ्या वाचल्या. १८ पुराणांपैकीं विष्णुपुराणादि ८-९ पुराणेहि वाचलीं. रात्री भजनमंडळांत जाऊन टाळ मृदंगादि वाजविण्याचा सराव झाला. संधि मिळेल त्याप्रमाणे कीर्तनें, पुराणें व प्रवचनेंहि ऐकूं लागलों. कथाभागांतील देवदैत्यांच्या गोष्टी समजत पण ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत वाचून आणि ऐकूनहि समजत नसे ! प्रवचनकारांना अर्थ विचारला तर ते म्हणत 'तूं मोठा झालास व सद्गुरुला शरण गेलास म्हणजेच या आध्यात्मिक गोष्टी गुरुच तुला समजावून देतील.'

आमच्या गांवांत मनसाराम पांडुरंग सकपाळ ज्ञानेश्वरीवर प्रवचन करीत असे. ते सद्गुरु मोरेश्वर महाराज तथा श्रीअवधूत महाराजांचे अनुग्रहीत होते. त्यांचे प्रवचन ऐकण्यास त्यांचे घरीं जाऊं लागलों. तेथें गणपत नथु माळी, यादव सांडू माळी वगैरे ८-१० मंडळीं रात्रीं जमून गुरुभक्तीचा महिमा वर्णन करीत. त्यांची चर्चा ऐकून मला ठीक समजत नसे. वयाच्या १० व्या वर्षी मी गिरणीत नोकरीं धरली; कारण घरची गरीबी होती.

### वयाच्या १७ व्या वर्षी अवधूत महाराजांचा अनुग्रह.

१९२७ च्या श्रावण महिन्याअखेरीस श्रीकृष्ण जन्माष्टमीचे उत्सवासाठीं भडगांवीं श्री. गणपत नथु माळी यांचेबरोबर गेलों; एकंदर आठजण होतों. माझें वय त्यावेळीं १७ वर्षांचें होतें. तेथील सोहाळ्यात खूप रमलों ! कारण श्री सद्गुरु मोरेश्वर तथा श्री अवधूत महाराज यांचे निर्मल अंतःकरण, तेजस्वी मूर्ति आणि सुबोध करण्याची

गोड पद्धति यांनीं मी अगदीं मोहून गेलों ! आणि त्याच प्रसंगीं माझ्या विनंतीप्रमाणे त्यांनीं मला अनुग्रह देऊन कृपा केली. तेव्हांपासून त्यांचे मनाचे श्लोक, अभंग व पदें वगैरे एकतार व संजिरीवर गाऊं लागलों. त्यांचा भक्तगण मेळा हळुहळू खानदेशांत वाढत गेला.

## गुरुमहाराजांचें जळगांवीं आगमन

१९२९ सालीं जळगांवच्या भक्तमंडळीचे आग्रहावरून महाराज जळगांवीं आले. जळगांवांतील मारुती पेठेंतील भावसार मठींत महाराजांच्या मुक्कामाची व्यवस्था करण्यांत आली. गांवांतील जुन्या श्रीराम मंदिरांत ७ दिवस कीर्तन ठरलें.

पण त्या मंदिरांत सात ऐवजीं तीनच दिवस कीर्तन झालें. कारण जळगांवांतील जुन्या ब्राह्मणांनीं विरोध केला. त्यांनीं तक्रार केली "ब्राह्मणांचें गुह्य ज्ञान सर्व समजांना उघड सांगू नये तेंच हे हरिभक्त महाराज सांगतात !" नंतर त्या विरोधकांनीं अनेक कारवाया करून त्या मंदिरांतील कीर्तन बंद पाडलें ! नंतर महाराजांच्या भक्तांनीं भावसार मठी नजीकच कीर्तनाचा सप्ताह पूर्ण करण्याची व्यवस्था केली. भावसार मठीच्या भिंतीस लागून असलेल्या घरापुढील खुल्या जागेंत हा सप्ताह झाला. अंदाजे ३०० वर श्रोते कीर्तन ऐकण्यास जमूं लागलें. रात्रीं भगवी कफनी घालून महाराज कीर्तनास उभे रहात. कीर्तनाचे जागेपासून ६ फूट अंतरावर असलेल्या घरांत ६ वर्षांचा मुलगा अत्यवस्थ स्थितींत आजारी होता. "तो मुलगा लवकरच मरणार आणि माणसें रडणार आणि बायांच्या रडण्यामुळें कीर्तनास अडथळा होणार, म्हणून सूचना देण्यास आलों आहे" असें महाराजांच्या जवळच मी उभा असल्यामुळें त्या घरच्या ब्राह्मणानें येऊन मला एकीकडे सांगितलें ! मी महाराजांकडे बोट दाखविल्यावर त्यानें महाराजांना नमस्कार करून घडलेली हकीगत सांगू लागला. महाराज त्या ब्राह्मणाला म्हणाले **"भिऊं नका, तुमचा मुलगा मरत नाहीं, उद्यां सकाळपर्यंत चांगला बरा होईल"** हें आश्वासन ऐकून त्या ब्राह्मणानें महाराजांना नमस्कार केला व घरी गेला. ९॥ वाजतां 'जय शिवशंकर उमाधवा' या पदानें कथेला सुरवात झाली. मला रहावेना म्हणून मी त्या घरांत मुलाला पहायला गेलों. तो मुलगा सावध होऊन चांगली हालचाल करूं लागल्याविषयींचे बायांचे आनंदाचे उद्‌गार ऐकले व परत कीर्तन ऐकण्यास आलों ! कीर्तन निर्विघ्नपणें पार पडलें. दुसरें दिवशीं तर तो मुलगा खडखडीत बरा होऊन खेळूं लागला ! महाराजांचें आश्वासन खरें झाल्याचें पाहून त्यांचेविषयीं धन्यता वाटली !

त्या प्रसंगीं महाराजांकडेच राहून जरूर त्या कामीं सेवा करण्याची जबाबदारी इतर भक्तांनीं मजवरच सोंपविली होती. महाराज एकदां म्हणाले ‘ अरे खालीं जा आणि माझी उशी घेऊन ये ’ बिछान्याजवळ दोन वस्तू होत्या त्यापैकीं एक आणून मी महाराजांना देऊं लागलों. ती वस्तू पाहून महाराजांनीं उग्र रूप धारण केलेलें पाहून माझा थरकांप झाला ! महाराज रागानें म्हणाले “ अरे गुलामा याला लोड म्हणतात, तुला उशी म्हणजे काय कळेना व सांपडेना ! तेव्हां डोळ्यांतून अश्रू आले व आपल्या बिछान्यांतून एक लहान वस्तु काढून मला दाखवीत म्हणाले “हिला उशी म्हणतात !” मग गोड शब्दांनीं माझ्या मनांतील भीति नाहींशी करून महाराज शांत झाले ! महाराज नेहमी बाल वृत्तींत रमत असत !

## १९३३ सालचा महाराजांचा जळगांवीं मुक्काम

१९३३ सालीं जळगांवच्या तरुण मंडळींनीं भजनासाठीं एक खोली घेऊन तेथें महाराजांना दर्शनासाठीं व त्यांना वंदन करण्यासाठीं आग्रहानें बोलाविलें. त्या समारंभासाठीं मुलांनीं एक मण दुधाची बासुंदी केली. पण दुध फाटून बासुंदी नासल्यासारखी झाली ! मग महाराजांना थोडी फळें व दूध देण्यांत आलें. तें पाहून महाराज म्हणाले, “ अरे तुम्ही बासुंदी केली ना ? त्यांतली थोडी आणा पाहूं ” मग एका कांचेच्या ग्लासांत महाराजांचे हातीं ती बासुंदी दिली तेव्हां महाराजांनीं ती भराभर पिऊन टाकली आणि म्हणाले, “ अरे वा ! बासुंदी तर छान केलीत ! ” ते ऐकून बालगोपाळांना फार आनंद झाला ! **खरोखरच नासलेली बासुंदी चांगली झाली होती** आम्ही सर्व भक्त गण तीच बासुंदी प्यालो तरी शिल्लक राहून पुढें तीन दिवस चांगली राहिल्यामुळें पीतच होतों ! सद्गुरूंनीं दाखविलेल्या चमत्काराचेंहि आम्हांला नवल वाटलें !

## गुरु भक्तांना ग्रहांची बाधा नाहीं !

१९३७ साली सोमवती अमावास्येदिवशीं ( श्रावण महिन्यांत ) सूर्य ग्रहण होते, जळगांवच्या भक्तांनी पर्वकाळीं स्नानास जाण्याचा विचार करून शेवटीं असें ठरविलें की ‘ भडगांव क्षेत्रीं गिरणेचें स्नान करून श्री अवधूत महाराजांचे दर्शन घेऊन निजात्मबोध ऐकावा ! हेंच सर्वांत श्रेयस्कर ’ मग नामदेव चांगो चौधरी, गोविंद दशरथ, तुकाराम रंगो काळे, गणपत नथु माळी, तुकाराम संपत पाटील, अकांत बुवा आणि मी स्वतः असे ७-८ जण भडगांवीं गेलों आणि गिरणानदींत स्नान केलें. त्यानंतर गुरुमहाराजांचें दर्शन घेऊन त्यांना वंदन करून त्यांचा आत्मबोध ऐकावयास बसलों महाराजांच्या बोधांतील मुख्य भाग असा :—

"गुरु भक्तांना ग्रहांची बाधा नाहीं, ते विग्रही असतात." पुढें महाराज म्हणाले "यापुढें जगांत जागतिक युद्धें होतील. आणि नित्योपयोगी सर्व वस्तु दुर्मिळ व अत्यंत महाग होतील. कोट्यावधी माणसे मृत्यू पावतील" महाराजांचे ते शब्द पुढें खरे ठरले याचा अनुभव आपण आज सर्वच घेत आहो. माझ्या प्रत्यक्ष अनुभवांनीं 'महाराज हे एक सत्पुरुष होते, याविषयीं माझी खात्री झाली. माझ्यावरील अनेक संकटांचें त्यांच्याच कृपेनें निवारण झालें.

( श्लोक : शार्दूलविक्रीडित )

कैलासीं शिवशक्तीचा सुत असे नामें मयूरेश्वर ।
अर्धांगीं निज शारदा सहगमे तो दंड परशूधर ॥ १ ॥
ताराया जडमूढ भाविक जनां । अवतार जो घेतसे ॥
तो सद्गुरू मयूरेश्वर महा । गिरणा तटाकीं वसे ॥ २ ॥

* *

भाग १ ला

# आठवण नं. ३६

[ लेखक : भीमराव सोनू पाटील ऊर्फ भीमजी, भडगांव ]

## सद्गुरू मुक्यांनाहि बोलके करतो !

मी प्रथम दादा सहस्त्रबुद्धे यांचेकडे कामावर होतो. दादांचेकडे श्री अवधूत महाराज नेहमीं येत व त्यांचेहि महाराजांकडे जाणें येणे होतें. मला दादांनींच महाराजांचेकडे कामास ठेविलें आणि तेथूनच माझ्यासारख्या अशिक्षित सांगकाम्या माणसाचा भाग्योदय झाला !

मी अडाणी लाजाळू व अबोल असल्यामुळें कोणाशीं फार बोलत नसे. मठीतील सर्व भक्तमंडळी भजन, आरत्या म्हणत, तेव्हां मला म्हणता व वाचतां येत नसल्यामुळें वाईट वाटे ! असाच खिन्न मनानें बसलों असतां महाराज एकदां म्हणाले, "अरे भिमजी असा खिन्न होऊन कां बसलास ? तुला कांहीं होतंय कां ?" मी उत्तर दिलें, "महाराज मला साधी आरतीहि म्हणतां येत नाहीं म्हणून वाईट वाटतें !" महाराज नंतर म्हणाले, "वेडा कां तूं ? माझा सद्गुरू मुक्यांना सुद्धां बोलके करतो ! तूं पंतांचीं भक्ति कर, म्हणजे तुला सर्व येऊं लागेल ! ऊठ, असं बसून राहूं नये."

## अनुग्रह व उन्नति

१९३६ सालीं गोकुळाष्टमीच्या उत्सवांत महाराजांचा अनुग्रह मी मोठ्या भक्तीनें घेतला, तेव्हांपासून माझी उन्नतीच होत गेली. माझ्यासारख्याला मुंबई कशी पहायला मिळणार ? पण महाराजांनीं मला मुंबईस आपल्याबरोबर नेलें. तेथून बाळेकुंद्रीस पंतपीठाकडेहि मी महाराजांच्या बरोबरच गेलों आणि तेथें अवधूत दरबारची खूण महाराजांनींच पटविल्यामुळें पावन झालों !

बाळेकुंद्रीहून भडगांवला परत आल्यावर मी भडगांवीं आरत्या व पदें पाठांतर न करतांच म्हणूं लागलों तेव्हां महाराज बोलले होते त्याचा अनुभव आला ! महाराजांचा आशीर्वाद खरा ठरला ! महाराजांच्या आज्ञेप्रमाणें मी मठींतील जागेंत औदुंबराचे झाड लावलें. महाराजांनीं पाडव्याला मला नवे कपडे

केले व प्रसाद दिला आणि आशीर्वाद देतांना म्हणाले, "भीमजी, माझ्या पंतांना विसरूं नकोस; तुला त्यांच्या कृपेनें कसलीच उणीव पडणार नाहीं!"

## सर्व घराण्यावर गुरुकृपा

पाडव्याच्या रात्रीं महाराज एकाएकीं स्वानंदवासी झाले! सर्व उत्तरक्रिया करून भंडारा झाल्यावर श्री. दत्तमहाराज तथा श्री. अण्णा मुंबईकडे गेले. सर्व मंडळी लहान फाटकांतून गेल्यावर मोठें फाटक उघडेंच राहिलें. उत्सवांतील दगदगी-मुळें थकल्या कारणानें मला गाढ झोंप लागली होती. थोड्या वेळानें स्वप्नांत महाराज येऊन म्हणाले, "अरे, भिमजी, अशा झोंपलास काय? तुला मठीचें रक्षण करण्यास ठेविला नां? ऊठ आणि उघडें राहिलेलें फाटक बंद कर!" मी खडबडून उठून फाटक बंद केलें आणि इकडे तिकडे पाहिलें तों कोणीच दिसलें नाहीं! फिरून अंथरु-णावर तसाच पडून राहिल्यावर लक्षांत आलें कीं स्वप्नांत महाराजांनीं मला आज्ञा केली पण आपण नमस्कारसुद्धां केला नाहीं! खूप वाईट वाटलें, मग झोंपच आली नाहीं!

त्यानंतर महाराजांच्या कृपेनें मी एका चक्कीवर कामाला लागलों. आणि माझा धाकटा भाऊ दगडू याला मठींत कामास ठेविलें. दगडूला कांहीं दिवसानीं दुसरें काम पत्करावें लागल्यामुळें माझा तिसरा भाऊ नथू यास मठींत ठेविलें. अशा क्रमा-क्रमानें आमचें सर्व घराणेंच सद्गुरूंच्या कृपेनें पावन झालें! त्यांच्याच कृपेनें नथू आणि त्याचे खालोखाल चौथा भाऊ मुंबईच्या उपनगरांतील कारखान्यांत चांगल्या नोकऱ्यांवर व्यवस्थित नांदत आहेत.

## श्रीदत्तमठीचा विस्तार

अगदीं अलीकडे १९६४ सालच्या जुलई महिन्यांत भडगांवीं, श्री दत्तमठीकडे ये जा करीत असतां श्रीदत्त मठीचा विस्तार वाढून नवी घुमटी बांधण्याच्या वाटाघाटी चालू असतां माझा शेती व जोडधंदा करणारा धाकटा भाऊ दगडू याला एकदां स्वप्नांत येऊन गुरुमहाराजांनीं २५ रु. हातीं घालून सांगितलें, मनांत श्रीदत्त-मठीचा विस्तार व नवी घुमटी याविषयीं जे विचार आले ते खरे होणार! तो पहा एक श्रीमान् धनिक धनाच्या थैल्या घेऊन त्यासाठींच येत आहे!" या स्वप्ना-प्रमाणें ता. ६ बुधवार दि. २६ ऑगस्ट १९६४ रोजीं सकाळीं ११–१२ चे सुमारास श्रीमान् मुकुंदराव राणे यांनीं नवीन घेतलेल्या जागेंत नवी घुमटी बांधण्यासाठीं भूमिपूजन केलें आणि श्रीदत्तमठीचा विस्तार करण्याची रूपरेषा आपल्या तज्ज्ञां-मार्फत आंखून व ठरवूनच बाळेकुंद्रीस जाण्याकरिता आपल्या पत्नी सौ. गुलाबबाई आणि मित्र मंडळी, यांच्यासह त्याच दिवशी दोन प्रहरी पुढें प्रवासास निघाले.



भाग १ ला.

# आठवण नं. ३७

( लेखक : श्री. चिंतामण रामचंद्र सोनार, सेवानिवृत्त शिक्षक, भडगांव )

माझ्या आठवणीचे खरे श्रेय माझ्या कै. गं. भा. आईस आहे. माझ्या आईचे आरंभीची ७–८ मुलें वारली. त्यामुळें तिचे मनावर फारच परिणाम झाला. ती महादेवाची (शंकराची) भक्ति करू लागली. आईने मरेपर्यंत सोमवारचे उपोषण केले. मी जन्माला आलेपासून आईवडिलांनी माझी फुलाप्रमाणें जोपासना केली. कोठेही एकटे बाहेर जाऊच दिले नाहीं. असे वयाच्या १७ व्या वर्षापर्यंत वागविले. पुढें मात्र वडिलांस प्लेगाचे सांथीने ओढून नेले. आई तर अगदींच अशिक्षित होती. परंतु माझे मामा ती. रा. रा. गोविंद हरी सोनार हे त्यावेळीं हेडमास्तर होते. आईवडिलांची इच्छा मुलाने खूप शिकावे अशी होती. पुढे मामांनीं पुढील शिक्षणास हातभार लावला. हीच स्थिति सौ. पत्निकडेही होती. समाजाचा पत्नीचे शिक्षणास अडथळा होई. परंतु त्याला न जुमानता आम्ही आमचे ध्येय आईवडिलांचे कृपेनें पार पाडले. यापूर्वसंबंधामुळेंच पुढील सद्गुरुंचा योग लाभला आहे.

श्री समर्थ सद्गुरुंचा पहिलाच अनुभव म्हणजे इ. स. १९३२ साली दत्तजयंतीच्या उत्सवास रात्री घरांतील सर्वजण कीर्तनास गेली. मीच एकटा घरी रोज रात्री कांहींतरी वाचावे म्हणून अंथरुणाशेजारी कंदील ठेवून व जवळच उदबत्ती लावून वाचन करीत असतांनाच डोळा लागला. लगेंच केव्हांतरी उदबत्तीची ठिणगी अंथरुणावर पडून तें पेटत पेटत उशापर्यंत जेव्हां आंच झाली तेव्हां एकदमच जाग आली. मी तर भांबावल्याप्रमाणें होऊन क्षणभर कांहींच सुचेनासें झाले! घरांत खूप धूर दाटलेला. तशांत गादी विझवली. दाराची कडी उघडली. नंतर घरची सर्व माणसें परत आली. त्यांना तर ही परिस्थिति पाहून आश्चर्यच वाटले. अशावेळी सद्गुरुंनीच हा प्रसंग टाळला असा मनाचा पूर्व विश्वास वाढला. संकटी तो धावून येतो तें कांहीं खोटें नाहीं!

इ. स. १९३६ साली आमचे मेहुणे श्री. रा. वामन सीतारामशेट सोनार राहणार आमडेद, पेटा भडगांव यांचे ठिकाणी श्री. स. स. अमरनाथ त्यांचें शिष्य भिकारीनाथ प्रेमीनाथ मठखकनारे (बऱ्हाणपूर जवळ आहे हे ठिकाण.) तेथील नाथांची शक्ति (अंगांतील वारे) त्यांचे ठिकाणी येऊन त्यांनी मला व इतरांनाहि बरेच अनुभव दाखविले. त्याचवेळीं येथें श्री. स. विनायक पुरुषोत्तम कापसे डॉक्टर (व्हेटरनरी) हेही भडगांवीच रहात होते. त्यांचेकडेस मी सतत गुरुवारचे

अजनास जात होतो. डॉक्टरांनीहि मेहुण्यांचे अंगातील नाथांच्या शक्तीचा बराच अनुभव घेतला. त्याचप्रमाणें श्रीसमर्थ मोरेश्वर महाराजांच्याही आध्यात्मिक ज्ञानाचा बराच अनुभव मला त्यांनीं सांगितला. तुम्हाला पुढील मार्ग गुरुशिवाय कळणार नाही म्हणून त्यांनी मला आधी गुरुपदेश घेण्यास सांगितले. त्याप्रमाणें मी इसवी सन १९३६ साली श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. उपदेश घेतल्यापासून मनाची शांति वाढत चालली. तेवढाच मनाला आनंद वाटावयाचा. परंतु महाराजांची आपणांकडून कांहींतरी सेवा घडावी अशी मनाला फार हुरहुर वाटायाची. शेवटी इ. स. १९३९ साली महाराज समाधिस्त झाल्यावर स्वप्नांत आले. मी त्यांचे निवासस्थानाचे खोलींत बसलो आहे. प्रकृति बरी नाही. म्हणून त्यांना त्यावेळीं कांहींतरी औषधी वस्तु दुकानावरून आणावयाची होती. तेथें ८–१० भक्तगण बसले होते. महाराजांनी प्रश्न केला. कोण जातो? मी म्हटलें, मी जाऊन आणतो. त्याप्रमाणें मी बाजारांत गेलों. व दुकानदारांस रात्रीं १२ चे सुमारास उठवून ती वस्तु आणून दिली. नंतर तेथें महाराजांची अंगचेपीची सेवा करून घरीं आलों. अशा तऱ्हेने माझी असलेली सेवेची मनीषा सद्‌गुरुंनी पूर्ण करून घेतली. त्यांनी सांगितले कीं, कांहीं भिण्याचें कारण नाहीं. मी तुझ्या नेहमी पाठीशी आहे. याप्रमाणें आतां पर्यंत मी शांतिसुखांत रहात आहे. हा जो शांति-सुखाचा लाभ झाला. तो केवळ त्यांच्या दरवर्षीच्या दत्तजयंति उत्सवाचे कीर्तनाचे वेळीं त्यांचे तोंडून जे जे दृष्टांत व अमृतरसयुक्त कथाभाग ऐकला त्याचाच होय.

श्री समर्थ सद्‌गुरुकृपादृष्टीनें आज माझ्या पत्नी सौ. वारुबाई सोनार असि. डेप्यु. एज्यु. इन्स्पेक्ट्रेसच्या जागी काम करीत आहेत. आम्हांस एक मुलगी व तीन मुलें आहेत. मुलीची (सौ. सुशिला) मराठी सातवी व इंग्रजी तीसरी पास आहे. ती चांदवड जि. नाशिक इथें दिली असून जावई श्री. रामचंद्र नानाशेठ सोनवणे हे हल्ली नाशिक इथें सप्लाय अवलकारकून आहेत. त्यांची मामलेदारची परीक्षा ४–५ वर्षांपूर्वी पास झाली आहे. वडील मुलगा (चि. कमलाकर) हा इंटर नापास असून तो हल्लीं भडगांव पेठ्यांतच गोंडगांव येथें ग्रामसेवक आहे. मधला मुलगा (चि. राघवेंद्र) हा चालू वर्षी १९६४ बी. आर्टचा पांच वर्षांचा डिग्री कोर्स पास होऊन हल्लीं तो मुंबईतच खाजगी कंपनींत काम करीत आहे. शेवटचा मुलगा (चि. रमेशचन्द्र) हा मागील वर्षी प्री. डिग्री सायन्स पास झाला आहे. पुढें त्याचे शिक्षण चालू आहे; अपत्यांच्या बाबतींत फक्त वडील प्रथमचाच एक मुलगा वारला आहे. त्यानंतर मात्र मुलांचें बाबतींत दुःख नाहीं. वरील थोडी माहिती देतांना मला सद्‌गुरुंचा पाठिंबा आहे. असा माझा दृढविश्वास आहे. ही अल्प सेवा सद्‌गुरुचरणी अर्पण करीत आहे.

● ● ●

भाग १ ला

# आठवण नं. ३८

(लेखक : श्री. भीमराव वाणी मातंग, मिरज–सांगली)

आमंच्या गांवच्या लोकांचे भजनांत 'शिव शंकरा रे। निज प्रेम बाळावरी ॥' हें एकतारीवर म्हटलेलें पद ऐकून व वाचून मला गुरुमहाराजांचा अनुग्रह गेण्याची इच्छा झाली. माझे वडील कट्टे शिवभक्त असल्यामुळे हा अवधूत पंथ घेण्याला प्रथम त्यांचा विरोध होता. सातारा जिल्ह्यांतील म्हसवड तालुक्यांतील, शिखर शिंगणापूर शंभु महादेवाचे आम्ही लिंगायत भक्त. परंतु वर नमूद केलेल्या पदावरून दत्त व शंकर यांत भेद नाहींसें वाटू लागलें. श्री. यशवंतराव पाटील यांनीं गुरुमहाराजांचीं कीर्तनें आमचे गांवांत करविलीं तीं ऐकून महाराजांचा अनुग्रह घेणेची इच्छा मी त्यांना सांगितली. त्यांनीं त्यावेळीं श्रीपाद पाटील, कुरुंदवाड, यांचे-देखत स्वतःच्या पदरचा दीड रुपया खर्चून मला अनुग्रह देवविला. मग महाराज कुरुंदवाडकडे गेले.

नंतर मी भजन आणि पंतवाङ्मयाचें वाचन चालू ठेविलें. श्री अवधूत महाराजांचे श्लोक, पदें व अभंग पाठ करूं लागलों. हळू हळू अर्थहि कळूं लागला. गुरुमहाराजांविषयींची भक्ति आणि निष्ठाहि वाढत गेली.

महाराजांचें नं. २ चे (पोलिसखात्यांतील वरिष्ठ अधिकारावर असलेले) चिरंजीव श्री. पांडुरंग मोरेश्वर ऊर्फ पांडुतात्या यांचें लग्न कुरुंदवाडास महाराजांनी खूप थाटानें केलें. त्यावेळीं मी तेथें हजर होतों.

नंतर गुरुमहाराज बाळेकुंद्रीस गेले. तेथें जाऊन दर्शन व भेट घेतली. त्यावेळीं तेथील सर्व संताची संगत आणि गुरुमहाजांचा परमार्थबोध यांनीं पूर्ण शांति समाधान देणारें भक्तिप्रेम अन्तरंगांत ठसलें. आतां माझेवरील १० माणसांचा प्रपंच परमार्थ रूपानें चालविण्याचें शिकवणीप्रमाणें मी तो चालवीत आहे. बाळेकुंद्रीतील संतसंगति व महाराजांचा बोध यांचे चित्र व पडसाद अजूनहि हृदयांत उमटतात! आत्मलिंग पूजनाचें रहस्य गुरुमहाराजांकडूनच समजलें व पटलें. बाळेकुंद्रीचे उत्सवांत आम्ही मातंगकर भक्तच पहारा करीत असतो. गुरुमहाराज स्वानंदवासी झाल्यानंतर मी भडगांवासहि त्यांनीं निर्माण केलेलें क्षेत्रस्थान पाहून आलों. आतां त्या भडगांवपीठाची व अवधूतपंथाची सर्व धुरा महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री दत्त महाराज तथा श्री अण्णा यांनीं आपल्या शिरावर घेतली असून महाराजांच्या उदार भक्तिप्रेमाच्या बाण्यानेंच ही जबाबदारी ते उत्कृष्ट रीतीनें पार पाडीत आहेत. याविषयीं त्यांना हार्दिक धन्यवाद देतों!

* *

## भाग पहिला

# आठवण नं. ३९

( लेखक : श्री. रामचंद्र श्रीपत वाघ, मु. पो. तळई, जि. पूर्व खानदेश

मी तळई गांवचा राहणारा. शिक्षण सही करण्यापुरतेच. माझ्या गांवची लोकसंख्या २॥ हजार आहे. सर्व जातीचे लोक गांवांत आहेत. आमच्या गांवीं श्री अवधूत महाराजांना आणून अवधूत सांप्रदाय देण्याचें श्रेय श्री. हरिश्चंद्र परशुराम महाजन यांना आहे. महाराज १९२२ चे सुमारास आले. सात दिवस त्यांचा परमार्थबोध ऐकल्यावर त्यांचा अनुग्रह घेऊन श्रेष्ठ श्री अवधूत सांप्रदायांत मी प्रवेश केला. महाराज प्रथम तळई गांवीं आले त्यावेळीं २५ लोकांनीं अनुग्रह घेतला. गांवांत महाराजांच्या साधुत्वाविषयीं सर्वत्र वाहवा झाली !

त्याप्रसंगी तळईतील व आसपासच्या गांवांतून कांहीं शास्त्रीपंडित व सत्यशोधक पंथांचे लोक तसेच महानुभाव पंथाचें कांहीं लोक महाराजांशीं वाद करण्यास आले त्यांच्याशी मोठ्या प्रेमाने चर्चा करून सत्यश्रेष्ठ अवधूत सांप्रदायाचे महत्व पटवून दिल्यावर ते निरुत्तर झाले आणि त्यापैकीं कांहींनी महाराजांचा अनुग्रह घेतला !

मला लहानपणापासून संतवाङ्मयाची आवड होती. सद्गुरु शिवाय जन्माचे सार्थक्य नाही ! असें वाचून व ऐकून तीन गुरुंना शरण गेलों, पण मनाचे समाधान झालें नाहीं ! अखेर श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतल्यावर मात्र संशयभेद नष्ट होऊन समाधान लाभलें व आनंदांत काळ जाऊं लागला. मी एकदां श्री अवधूत महाराजांना विचारलें 'या श्रेष्ठ सांप्रदायाचे पालन आमच्या सारख्याचे हातून कसे होणार ? तेव्हां मला त्याविषयीं खुलासेवार बोध करून महाराज म्हणाले—

॥ सोडू नये धर्म कुलाचार कर्म जाणुनिया वर्म स्थिर राहे ॥
या त्यांच्या बोधानें संशय नाहींसा होऊन माझ्या मनाचे पूर्ण समाधान झालें. तळई सोडून जातेवेळी पूजेसाठीं फोटो देऊन महाराज भडगांवीं गेले. नंतर मी भडगांवीं उत्सवासाठीं वारंवार जात असे.

## तळई गांवीं श्री दत्तमहाराजांचे हस्तें श्री दत्तमूर्तींची स्थापना

१९६२ सालीं तळईच्या भक्तांनीं श्रीदत्तमूर्ति घेऊन छोटेसे दत्तमंदिर बांधले. आणि १९६३ सालीं या मंदिरांत श्री अवधूत महाराजांचे सुपुत्र श्री· दत्तमहाराज यांचे हस्ते श्रीदत्तमूर्तीची स्थापना या मंदिरांत केली. गुरुमहाराज माझे घरी आल्यापासून अनेक प्रसंगांतून गुरुमाउलीनेंच आमचें रक्षण केलें व करीत आहेत आणि संसार परमार्थांत कसलीच उणीव भासत नाहीं.

अशी कृपा आमचेवर केली. तळईस श्रीदत्तमूर्तीचे स्थापनेचे वेळीं श्रीदत्तमहाराजांबरोबर मंहादू महाजन, धोंडू शेंदुर्णीकर व औरंगाबादचा बाबू हे होते.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ४०

( लेखिका : श्रीमती ' गोदाआक्का ', तानंग, वय ७० )

माझे सद्गुरु कुरुंदवाडचे आणि मीहि कुरुंदवाडचीच. लेल्यांचे वाड्यांत लहानपणीं श्री. अवधूत महाराजांचीं कीर्तनें ऐकलीं. माझे बंधु व मातुश्री त्यांचेच अनुग्रहीत आहेत. अर्थात् माझ्या मातृघराण्यांतूनच माझ्याकडे हा गुरुसांप्रदाय आला व सद्गुरुकृपेचा लाभ मला झाला. माझ्या तानंग गांवीं कुरुंदवाडची सर्व भक्त मंडळी येत असतात. श्रीपंतभक्त सीताराम बापू, गणपतराव, तसेंच माझे गुरुबंधु मेघःशामबुवा बांवडेकर, तुकाराम शिंदे, गणपतराव शिंदे ही सर्व मंडळी माझे घरीं येऊन गेलीं. त्याचप्रमाणें बाळेकुंद्रीचे घराण्यांतील सर्वश्री भाऊसाहेब, बाबुराव अप्पासाहेब, बापूसाहेब, अण्णासाहेब हेहि माझे घरीं आले होते.

मला ३ मुली आणि ९ मुलगे झाले. पैकीं ८ मुलगे आणि मुली हयात आहेत. माझे पतिराज १९५६ सालीं इहलोक सोडून स्वानंदवासी झाले. त्यांचे पश्चात् आजपावेतों सद्गुरुंच्या कृपेनें आनंदांत आहों. माझी सर्वच मुलें मातृपितृभक्त असून सर्वच सद्गुरुंचीहि भक्त आहेत तें पाहून मन उल्हसित रहाते. ७० वर्षें झाली असून हें भाग्य मला सद्गुरुकृपेनेंच लागले आहे.



# आठवण नं. ४१

( लेखक : श्री. दिनकर गोपाळ देवघर, आर्टिस्ट व फोटोग्राफर, पुणे नं. २ )

श्री. मोरुदादा–तथा श्री अवधूत महाराज–माझे घरीं वरचेवर येत. ते माझे सख्खे आतेभाऊ. त्यांचीं कीर्तनें मी ऐकलीं आहेत. आमचे नात्याचेप्रमाणें आप्तसंबंधहि आहेत. लहानपणीं आम्ही कुरुंदवाडचे वाड्यांतील नाटकांत काम करीत होतो. गणपती उत्सवांतहि उत्साहानें भाग घेत असूं.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ४२

( लेखक : श्री. लोटू घनःशाम जंगले, नांदेड, जि. पूर्व खानदेश )

मला लहानपणा पासून एकनाथी भागवत वाचण्याचा नाद होता. भक्ति, ज्ञान, योग यांची खरी ओळख सद्गुरुवांचून होत नाही, असे समजून तेव्हांपासून सद्गुरुभेटीची तळमळ मला लागली. पण सद्गुरु मिळेना व मनाला शांति लाभेना. अशा तळमळींत मला एका रात्रीं स्वप्न पडलें. स्वप्नांत एक दिव्य पुरुष भेटला व 'हाच तुझा सद्गुरु' असे शब्द मी स्वप्नांत ऐकले! पण जागेपणी असा दिव्य पुरुष दिसेना! अर्थात् त्याविषयीं :मनाची तळमळ चालूंच राहिली. कांही सुचेनासें झालें! एक वर्षाचा काल अशाच मानसिक तळमळींत गेला पण एकदां माझ्यासारख्या कांहीं भक्तांत अध्यात्म चर्चा चालू असतां त्या बैठकींतील एका भक्ताकडून समजलें कीं, "भडगांव क्षेत्रीं कोणी एक महा सत्पुरुष आला आहे" ही बातमी ऐकून मला आनंदाच्या लहरी उठल्या! मनांत वाटूं लागलें 'हाच स्वप्नांत दिसलेला आपला सद्गुरु असावा' मार्गशीर्ष या सत्पुरुषांचे मठींत श्रीदत्तजन्मोत्सव होतो, हें ऐकून आणखी चार भक्तांसह मी भडगांवच्या श्रीदत्तजन्मोत्सवासाठीं गेलों. तेथील महाराजांचें दर्शन होतांच मला पटलें की, स्वप्नांत मला दिसलेले दिव्य सत्पुरुष ते हेच!' मग मी त्यांना अनुग्रह देण्याचीं विनंति केली. त्यावेळी ते सत्पुरुष (म्हणजेच श्री अवधूत महाराज) मला म्हणाले, "तुला स्वप्नांत जो पुरुष दिसला, तो तुला भेटला का?" महाराजांची या 'सर्वज्ञ दिव्य दृष्टीची खूण' पटून मी थक्कच झालों! आणि अर्थात् त्यांच्याविषयींचा 'सद्गुरु' या दृष्टीचा जास्त आदर मला वाटूं लागला. अनुग्रहानंतर घरीं परतल्यावर त्याचा अनुभव मला मिळूं लागला. सद्गुरुंचें ध्यान करूं लागलों म्हणजे 'तेज दिसून घंटानाद व मुरलीनाद' ऐकूं येऊं लागलें! त्यामुळें फिरून सद्गुरु-भेटीची तळमळ लागून राहिली. मग एकदां सर्व काम सोडून थेट भडगांवास गेलों, तेथें सद्गुरुंची प्रसन्न मुद्रा पाहून मला फार आनंद झाला! सद्गुरु अवधूत महाराज म्हणाले, 'तुला काय मागायचे असेल तें माग' मी अज्ञ बुद्धीने

"मला योग द्या' म्हटलें! महाराज बोलले 'अरे तुला योग मिळाला आहे!' परंतु त्यांच्या या बोलण्यानें माझे समाधान झालें नाहीं! मनांतील तळमळ तशीच राहिली! मग सकाळीं भजन चालू असतां महाराज फिरून बोलले, "अरे, तुला योग पाहिजे ना! माझ्या वियोगानेंच तुला योग मिळेल!"

नंतर थोड्या दिवसांनीं माझ्या मनोवृत्तीवर देहबुद्धीनें झडप घातली! तेव्हां श्री सद्गुरूंची निंदा करण्यास सुरवात केली! त्यामुळें सहजच सद्गुरूंचा वियोग मला झाला! पण सद्गुरूनें एकदां ज्याला 'आपला' म्हटलें त्याचें रक्षण, मुलाचें रक्षण माता करते त्याप्रमाणें, **अनुग्रहीताचें रक्षण करणें** हा सद्गुरूंचा बाणा माझ्या बाबतींत मला अनुभवावयास मिळाला! एकदां नांदेड येथें पांचपिंपळ देवळाजवळ श्री. अवधूत महाराजाचें आगमन झालें. मला पोहण्याचा लहानपणा-पासून नाद होता. मला एकदां पुढील अनुभव आला. "पोहतां पोहतां पाण्यांत बुडी मारून संकल्प केला, "मला सत्यसंकल्पाचा सद्गुरुदाता आहे, हें जर खरें असेल तर सद्गुरु येथेंच येऊन मला भेटतील." संकल्प केल्याबरोबर महाराज पाण्यांत माझ्या नजीकच पोहत राहिले होते, त्यांचा माझ्या डोक्याला व सर्वांगाला स्पर्श झाला, यासरशी माझा देहाचा अभिमान हळूं हळूं मावळत चालला, शेवटीं मी सद्गुरूंना शरण जाऊन पायीं पडलों. त्यावेळीं '**वियोगाचा योग सहजासहजीं घडून आला आणि सर्व प्रकारची भ्रांति मावळली!** मला सद्गुरूंनीं प्रेमसागरांतच नेलें! सुख दुःखापासून मला मुक्त करून, मला सत् चित् आनंदांत मुरवून घष्ट पुष्ट केलें! सद्गुरूंनीं आपली वाणी सत्य करून दाखवून, आपल्या कृपारूपी छत्राच्या छायेंत बसविलें! 'सत्य बालावधूत' ही वाणी मला सद्गुरूंनीं प्रचीतीला आणली. माझ्यासारख्या पतिताला पावन केलें! भ्रांति नाहींशी करून मला निभ्रांत बनविला! सद्गुरुमाउलीचे हे उपकार आठवावे तितके थोडेच! '**काय वानू मी या संताचे उपकार!**' हें संत वचन माझ्या प्रत्यक्ष अनुभवाला आलें! मला यापुढें 'निरंतर जागवीत' राहिले! **सद्गुरूंचे सहज बोलणें हाच विकल्प जाळून निर्विकल्प करणारा उपदेश आहे,** हें मला समजूं लागलें. अवधूतमार्गरूपी सूर्योदय झाला की अज्ञानरूपी काळोख कोठच्या कोठें पळून जातो, हें तत्व समजूं उमजूं लागलें! सद्गुरू शिष्याचे हृदयांत तेजरूपी बीज पेरतो—

आत्मस्वरूपीं रंगविलें। तेजोरूपी बीज।
भोक्तया सांपडे। ऐसे तुला त्रिखंड रूप केलें॥

अशा उक्तीप्रमाणें सद्गुरूनें रोकडे ज्ञान दान दिलें आणि चोखडें रूप केलें. ज्ञानाचें मूळ पाहूं जातां, कित्येक वेदवक्ते शास्त्रज्ञ बुझावले! अजूनहि त्यांना त्याचा पुरा थांग लागला नाहीं! मला मात्र हें 'ज्ञानाचे ज्ञान' सद्गुरूंनीं हासत खेळत दिलें! अशा प्रेमळ गुरुमातेचे किती उतराई होऊं? उतराई व्हावें म्हणून जिवाची कुरवंडी करून ओवाळली तरीहि हे उपकार फिटणार नाहीत!

सद्गुरु अवधूत महाराजांनीं कळकळीनें बोध करून अनेक लहानथोरांत भक्तिप्रेमाच्या अवधूत मार्गाची जागृति त्यांचे ठिकाणीं उत्पन्न केली.

जागृत केलें ऐका। कळवळ्याची वाणी। विनालाभ प्रीति॥

कांहीहि लाभ नसतांना बाळावर आई प्रीति करते तशी सद्गुरूंची प्रीति असते. बाळाला आपल्या प्रेमसागरांत सद्गुरू खेळवितात!

अशा सद्गुरुमातेचा जयजयकार असो! सद्गुरुमातेच्या या ज्ञानदानाला कल्पतरूचीहि उपमा उणीच पडते! कारण कल्पतरू कल्पिलेले तेवढेंच देतो. परंतु सद्गुरु निर्विकल्प करून जागृत करतात आणि जन्ममरणाचा फेरा चुकवितात तसें आम्हां शिष्यांना अवधूत महाराजांनीं जागृत करण्यासाठीं स्वतःचा देह झिजवीत परमात्म्याचे दिव्य तेजांत स्वतः विलीन होऊन त्यांनी स्वानंद-वासाची समाधि घेतली!

अशा गुरुमाउलीचा जयजयकार असो!

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ४३

( लेखक : श्री. कृष्णाजी दत्तात्रय छत्रे, कुरुंदवाड. )

अंदाजें ५० वर्षांखालीं कुरुंदवाड ज्यूनियर पातीचे श्रीमंत भाऊसाहेब महाराज यांचेबरोबर मी मोरबा तथा अवधूत महाराज यांना पाहिलेलें आठवतें. श्रीमंत त्यांची सल्लामसलत अनेक प्रसंगीं घेत असत. ते निस्पृहपणानें चोख सल्ला–मसलत देत, असा त्यांचा लौकिक माझे कानांवर आलेला आहे. त्यांचे वागणेंहि खुल्या अंतःकरणाचें होतें. मंडळांत ते सदा हंसतमुख दिसत.

१९०४–०५ चें सुमारास प्लेगमध्ये झोंपडींत रहात असतां सर्व लुटलें गेलें त्याप्रसंगीं काशीयात्रेला गेले. श्री. गोपाळराव लेले यांचे सोप्यावर त्यांचें श्रीदत्त व पंत भजन, पूजन, चर्चा व कीर्तन होत असल्याचेंहि आठवते. ते प्रथम काशी-यात्रेस गेले त्यांचेबरोबर गोपाळराव लेले व बंडोपंत टाकवडेकर होते. श्रीसद्गुरु पंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांचा श्री मोरबांनीं अनुग्रह घेतला होता. लेल्यांच्या सोप्या-वरील पंतमहाजांचा गोकुळाष्टमीचा उत्सव पुढें ते स्वतःच्या घरीं करूं लागले. त्यांचे कीर्तन भक्तिप्रेमानें रसाळ होई. लहान मुलें त्यांना फार आवडत. मी नेहमीं त्यांच्या कीर्तनांस जात असे. एकदां मुंबईस मी त्यांचे मुक्कामीं गेलों होतों त्यावेळीं त्यांनीं मला अत्यंत प्रेमानें व आपुलकीनें वागविलें. त्यांची राहणी साधी आणि विचार उच्च प्रतीचे होते. लोकांशीं सहज बोलतांना ते श्रोत्यांच्या अंतरंगाचा ठाव घेत! यामुळें सर्वांना त्यांचेविषयीं आपुलकी वाटे. त्यांचा पोषाख राजयोग्यासारखा नीटनेटका असे. साहजिकच त्यांना भेटणाऱ्याचे अंतःकरणांत त्यांचेविषयीं आदर आणि पूज्य भावना उत्पन्न होई.

• • •

भाग १ ला

# आठवण नं. ४४

( लेखक : शिवराम रामचंद्र गुरव, मु. पो. कुरुंदवाड )

मी १९२८ सालीं कुरुंदवाडासच महाराजांचा अनुग्रह घेतला. माझा पेशा शाळामास्तरचा. ३० वर्षें नोकरी करून पेन्शन घेतली व गुरुमहाराजांच्या कृपेनें सुखांत आहे.

मला महाराजांनी आपल्याबरोबर ठाणा, वसई, कल्याण, मुंबई वगैरे ठिकाणीं तबला व पखवाज वाजविण्यासाठीं नेले. त्यांच्या कीर्तनास सर्व ठिकाणीं अलोट गर्दी जमत असे. त्यांची अध्यात्म चर्चा इतकी सोप्या व गोड भाषेंत होई कीं ती एकदां ऐकणारा मनुष्य दुसऱ्या खेपेस आणखी ४–५ जणांना बरोबर घेऊन येई ! मी ४–५ महिन्यांची नोकरीची रजा घेऊन महाराजांबरोबर होतों.

बरोबर नेलेल्या माणसांची महाराज मातेप्रमाणें काळजी वहात. आणि त्यांचा उत्तम प्रकारें सांभाळ करीत. कोणी पांथस्थ आला तर त्याला खायला प्यायला देत. अन्नदान करण्याची फार दक्षता घेत. त्यांना जीवन व्यवहारांत कसलीहि कमतरता पडली नाहीं. स्वभावानें महाराज अत्यंत प्रेमळ होते. महाराजांना कीर्तनाचे दौऱ्यांत खूप मिळकत होई. सोनें, कापड वगैरे अनेक मूल्यवान वस्तूंहि असत. पण महाराज सढळ हातानें अनेक मूल्यवान वस्तूंदेखील बरोबरच्या सहकाऱ्यांना आणि गरजू गरीबांना देऊन टाकीत. कीर्तनांतील रोख रकमाहि त्यांच्या उदार दातृत्वामुळें संपून जात असत ! त्यांनीं संग्रह कधीं केलाच नाहीं. गांवांतील त्यांच्या परिचयांतील लोक त्यांना 'हाच गांवचा खरा राजा' म्हणत. त्यांचा राजयोगाचा बाणा त्यांना शोभून दिसे ! ते श्रीमंत गरिबांशीं व लहान थोरांशीं सारख्याच प्रेमळपणानें वागत. जात–पातींच्या भेदाला त्यांच्याजवळ थाराच नव्हता ! मोह कधींहि त्यांना शिवला नाहीं. आत्मज्ञानाची चर्चा अत्यंत साध्या व सोप्या भाषेंत करून श्रोत्यांच्या मनांतील संशय नष्ट करण्याची त्यांची हातोटी केवळ अलौकिकच होती ! ज्याला 'आपला' म्हटला त्याला कधींहि अंतर देत नसत. त्यांच्यासारखा तेजस्वी, उदार व प्रेमळ पुरुष अद्याप माझ्या पहाण्यांत नाहीं !

* *

भाग १ ला

# आठवण नं. ४५

( लेखक : भाऊ परशुराम शिंदे, मु. पो. कुरुंदवाड, जि. कोल्हापूर )

सद्‌गुरु श्री अवधूत महाराजांचा जन्म कुरुंदवाडास झाला. श्रीपंतमहाराजांचें ज्ञानखड्ग हातीं घेऊन त्यांनीं अनेक अज्ञजनांना भक्तिप्रेमाच्या मार्गावर नेऊन सुखी केलें.

मला श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह १९२३ सालीं झाला. १९२३ पासून १९२६ पर्यंत गुरुमहाराज ज्या ज्या वेळीं कुरुंदवाडकडे येत त्या त्या वेळीं मला दर्शन होई आणि भेट घेतां येई. नोकरीच्या निमित्तानें मी १० वर्षें सातान्यास होतों. तेव्हां महाराजांचा सहवास फार थोडा लाभला. त्या सहवासांत जे अनुभव आले त्यांच्या आठवणी महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज तथा श्री. अण्णा यांच्य सूचनेवरून आणि गुरुबंधु श्री. मेघःशाम बुवांचे अत्याग्रहावरून यथामति सांगितल्या आहेत :—

माझे नं. ३ चे काका श्री. तुकारामबुवा आणि ४ नंबरचे काका श्री. गणपतराव हे अवधूत महाराजांचे अनुग्रहींत होते. कुरुंदवाडांतील छोटेसें घर घेऊन त्यांनीं मिठाईचें दुकान चालविलें होतें. शिवाय थोडी शेतीहि करून एकंदर उदरनिर्वाह करीत. माझे वडील लहानपणींच गेल्यामुळें या काकांचेकडेच राहून मिठाईच्या धंद्याचें शिक्षण घेतलें. त्याच धंद्यांत पुढें सातारा शहरांत नोकरीस राहिलों. तिकडे मी १० वर्षें नोकरी केली. महाराजांचा अनुग्रह घेतल्यावर एकदां ते काकांचेकडे आले तेव्हां मी भेटीस गेलो असतां गुरुमहाराजांनीं मला स्वतःच्या अंगांतील एक कोट, एक कोपरी, फेटा आणि कोटास लावण्यासाठीं पंतांचा फोटो असलेली बटणें दिलीं होतीं. काकांचे घरीं गुरुमहाराजांची परमार्थावर बोधचर्चा चाले पण त्या लहान वयांत मला समजत नसे. उपदेश घेण्याचे अगोदर नरसोबाचे वाडीस विठ्ठल मंदिरांत महाराजांचें कीर्तन झालें. त्यावेळी महाराजांचें एकच कीर्तन ऐकण्याचा लाभ मिळाला.

## काकांचे घरीं महाराजांचे अनुष्ठान

माझे काका तुकारामबुवा यांनीं आपल्या घराचे पूर्वेस थोडे बांधकाम करून पंतमहाराज व श्री अवधूत महाराज यांचा फोटो ठेविला होता. त्या अधिष्ठानापुढें

पूजन भजन वगैरे भक्तमंडळी करीत असत. त्या जवळच्या लहानशा चौकांत गुरुमहाराजांनी एक औदुंबर लाविला तो अद्याप आहे. महाराज कुरुंदवाडीं मुक्कामास आले कीं माझ्या काकांनीं मांडलेल्या अधिष्ठानाकडे बहुतेक दररोज येत असत.

१९३७ सालीं श्रीअवधूत महाराज भडगांवीं स्थायिक झाले. त्यावेळीं माझ्या काकांचें घर, अनेक जाणत्या लोकांच्या योग्य सल्ला-मसलतीनें योग्य ती किंमत देऊन माझें नांवें करून घेतलें. हें घर घेण्यांत माझा हेतू इतकाच कीं या ठिकाणीं माझे सद्गुरु महाराज येत असत. त्यामुळें ती वास्तु पवित्र झाली अशी माझी भावना आहे. म्हणून १० वर्षें कांकांचे मागें लागून ते मोडकळीला आलेलें घर मी घेतलें. मग त्या घराची यथाशक्ति बांधकामानें डागडुजी करून, माझ्या सद्गुरूंच्या फोटोची स्थापना केली. आणि नियमितपणें पूजा आरती व भजन चालू केलें. त्यानंतर महाराज इकडे आले कीं, मला मोठ्या प्रेमानें घरीं बोलावून, कुशल विचारीत असत. माझ्या अल्पवयांत गुरुमहाराजांनीं जी अंतःकरणांत सद्भावनेची प्रेरणा केली तिचें सुफल मला अनेक प्रकारांनीं मिळत आहे. जे कांहीं मी करीन त्यांत महाराजांच्या कृपेनें यशच मिळत आहे. वास्तविक गुरुमहाराज ( यांचा-सहवास ) मला फारच थोडा मिळाला आणि माझ्या हातून सद्गुरूंची सेवाहि फारशीं घडली नाहीं, त्याचेंच वाईट वाटतें, मात्र महाराजांनीं जो मला सरळ राजमार्ग दाखविला त्याच मार्गानें मी निष्ठेनें जात आहे. त्यांच्यासारखा प्रेमळ सद्गुरु मी आजपर्यंत कोठें पाहिला नाहीं!

## ‘ श्री अवधूत कृपाछत्र ’

१९५७ सालीं मी घराचें काम पुरें केलें व गुरुमाऊलीचे सुपुत्र श्री. दत्तमहाराज-तथा श्री अण्णा-यांना कळविलें. त्यांना विचारल्यावरून त्यांनीं ‘श्री अवधूत कृपाछत्र’ असे नांव ठेवण्यास सांगितलें त्याप्रमाणेंच घराचें नांव ठेविलें आहे. आतां प्रत्येक गुरुवारीं भक्तमंडळी जमून भजन करीत असतात. नियमित भजन चालू ठेवून या अधिष्ठानांत अखंड जागृति राखण्याचा आटोकाट प्रयत्न आम्ही करीत असतों. या माझ्या अधिष्ठानावर गुरु घराण्यांतील सर्व मंडळी येऊन गेलीं तसेच बाळेकुंद्रीहून श्री. भाऊसाहेब येथें येऊन आशीर्वाद देऊन गेले. बांबवड्याचे मेघःश्याम बुवाहि वरचेवर येतात. त्यांच्याच आग्रहानें या आठवणी वेड्यावाकुड्या शब्दांनीं सांगितल्या.

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. ४६

( लेखक : **किसन राघू पाटील**, पहान, ता. पाचोरा, जि. पू. खानदेश )

श्री सद्‌गुरु अवधूत महाराज यांचे स्मारक मंदिर–अधिष्ठान–बांधणेविषयी भक्तमंडळींनीं निर्णय घेतल्यावर या कार्यांत **स्वखुषीनें मदत देणाऱ्यांची यादी** तयार करण्याकरितां, मी आनंदा व कडगांवचे गिरीधर लाला, यांचेबरोबर भडगांव मठीतर्फें श्री. मेघःशामबुवा बांबवडेकर हे **पाचोऱ्यानजीक 'पहान'** कडे यावयास निघाले.

### संकटसमयीं सद्‌गुरुंचें सहाय्य

बस स्टॉपपासून पाचोरा एक मैल आहे. यावेळीं अगोदरच अधू असलेल्या मेघःशामबुवांच्या पायाला दुखापत होऊन जास्तच इजा झाल्यामुळें त्यांना एक मैलाचे अंतरहि चालत जाणें शक्य नव्हतें. काय करावें अशी तीघेहि गुरुबंधू चिंता करीत होते. इतक्यांत पहान गांवचीच श्री. जयराम पांडुरंग महाजन यांची गाडी समोरून जात होती. त्यांनीं या तिघांना पाहिल्याबरोबर त्यांना गाडींत घेऊन पहान गांवीं सुखरूप पोचविलें. अशा रीतीनें सद्‌गुरु आपल्या भक्तांना वेळोवेळीं संकटांत सहाय्य करीत आहेत !

तीघेहि भक्त माझ्या ( किसन राघू पाटील याच्या ) घरीं उतरले. मी त्यांची उत्तम व्यवस्था गुरुकृपेनें ठेविली. गांवच्या अनेक भक्तांनी खुषीनें आम्हांला भेटून सढळ हातानें यथाशक्ती मदत केली आणि श्री अवधूत महाराजांचें स्मारक मंदिर उभारण्याचें ध्येय धोरण मोठ्या आस्थेनें ऐकून घेतले. त्याबद्दल त्यासाठीं मुद्दाम आलेल्या तिघाहि गुरुबंधूंनीं सर्वांना धन्यवाद दिले आणि त्यांचे आभार मानले.

पहानगांवची भक्त मंडळी अत्यंत प्रेमळ असून महाराजांनीं त्यांना शिकविल्या प्रमाणें संसार परमार्थरूपानें करण्याचा स्वानंद भोगीत आहेत याबद्दल तीन्हीहि गुरुबंधूंनीं सर्वांचें कौतुक केलें.



भाग १ ला

# आठवण नं. ४७

[ लेखक : श्री. मारुती पाटील, तानंग, जि. सांगली ]

## प्रास्ताविक

आमच्या तानंग गांवांतील भाविकांचा श्री अवधूत सांप्रदायानें भक्तिप्रेमाची जागृति देऊन, श्री अवधूत महाराजांनीं उद्धार केला. या खेडेगांवाची लोकसंख्या अवघी दोन हजारच आहे; पण महाराजांच्या शिकवणुकीमुळें या गांवांत एकजुटीची मजबूत संघटना झाली असून सर्व धर्मांतील, सर्व जातीचे लोक एकजुटीनें व एकविचारें वागत असतात !

## घराण्यांतील संसारांची त्रोटक माहिती

घराण्यांतील अवधूत सांप्रदायी भक्तांना मी अवधूत सांप्रदाय घेण्याची कळकळ दाखविल्यावर माझे आजोबा यशवंतराव पाटील यांनींच ती माहिती सांगून श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचा अनुग्रह योग्य वेळीं घेण्यास मला मदत करण्याचें आश्वासन दिलें. नंतर १९३१ सालीं वांबवड्याचे गुरुबंधु मेघःश्याम यांनीहि आमचे गांवीं आले असतां, माझ्या आजोबांचे आश्वासनाला दुजोरा दिला. मी या दोघांवर पूर्ण विश्वास ठेवून १९३२ सालीं महाराजांचा अनुग्रह घेऊन धन्य झालों ! सद्‌गुरु व सत्‌शिष्य यांची पूर्ण माहिती सांगून श्री अवधूत महाराजांनीं मला अनुग्रह देऊन पूर्ण कृपा केली व मला आपलासा केला. पुढें सर्व आयुष्यांत तेच माझे रक्षण करीत आहेत.

## भयानक संकट व गुरुकृपेनें सुटका

माझेवर एकदां भयंकर प्रकारचे संकट आलें ! माझ्या चावडींतील रेकॉर्डचे महत्त्वाचे कागदपत्र कोणीतरी द्वेषबुद्धीनें जाळले ! या कामीं सरकारी अधिकाऱ्याकडून खूप त्रास मला झाला. मला सस्पेंड करण्याचीहि कारवाई वरिष्ठांनीं केली !

पण सद्‌गुरूकृपेनें या सर्व किटाळांतून मी सहीसलामत निर्दोषी ठरलों आणि आज तागायत जबाबदारीनें सरकारी काम करीत आहे.

## श्री दत्तात्रय महाराजांची अखंड जागृति

१९३९ सालीं गुरुमहाराज स्वानंदवासी होऊन आम्हां भक्तांना पार्थिव देहरूपानें दिसेनासे झाले ! पण त्यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री दत्तात्रय महाराज यांनीं सांप्रदायाची सर्व जबाबदारी पत्करली असून आमच्या गांवीं केलेली भक्तिप्रेमरूपी ऐक्य बोधाची जागृति व संघटना तेजस्वी राखण्याचे सत्कार्य आपल्या प्रेमळ बोधानें करीत असतात. सांप्रदायाचे सर्व भक्त आणि गुरुमहाराजांनीं जवळ केलेले भक्त आणि आप्तेष्ट आमच्या गांवीं येऊन गेले. तसेंच बाळेकुंद्रीच्या श्रीपंतघराण्यांतील मोठमोठ्या लोकांनीं आमच्या गांवीं येऊन आम्हांला धन्य केलें आहे. आमचे गांवांतील भक्तहि श्रीसेवेसाठीं दरसाल जात असत. श्रीगुरुकृपेनें आमचे ऐहिक पारमार्थिक व्यवहारहि ठीक चालले आहेत.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ४८

(लेखक : श्री. काशीनाथ दादा पाटील, मु. बुधगांव)

मी श्रीमंत बाळासाहेब महाराज कुरुंदवाडकर यांचे पदरीं मी खाजगी चाबुकस्वार असल्यामुळे त्यांचे स्वारीबरोबर असे. श्री. सीताराम भोपे हे श्रीपंत-दर्शनास श्रीक्षेत्र बाळेकुंद्री बेळगांवला जात असत. तेव्हां त्यांचेबरोबर बेळगांवला गेलों. त्यावेळी श्रीपंत महाराज शाळा मास्तर असून व्यायाम शाळेत होते. तेव्हां त्यांची भेट तेथे झाली. त्यावेळी माझी तब्येत उत्तम असल्यामुळे श्रीपंतानी माझ्याकडे पाहून मला बोलावले व त्यांचेबरोबर कुस्ती धरली. त्यावेळी त्यांनी त्यावेळीच एक पद म्हटले. '**गुरुसवें धरिली आज कुस्तीरे**' परंतु त्यावेळी मला त्यांचा अनुग्रह घेण्याचा योग आला नाही! मी येथें नोकरीतून इ. स. १९०९ सालीं मोकळा झाल्यावर माझ्या घरी येऊन महादेवाचे कीर्तन भजन करूं लागलों. तसेंच श्रीमंताचे आग्रहास्तव वाड्यामधें भजन केलें. पुढे मला श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह कुरुंदवाड येथे त्यांचे रहाते घरीं माडीवर झाला. त्यांचा विनोदी स्वभाव असल्यामुळे श्रीमंताना फारच आवडत असत.

मला राजयोगी गुरु भेटल्यामुळें त्यांचेच कृपेनें दिलदार संस्थानिक बाबासाहेब बुधगांवकर यांची नोकरी करण्याची संधि लाभली. श्री अवधूत महाराजांच्या कृपेनें आज ८२ वर्षांचे वय ओलांडलें तरीहि मी आत्मानंद भोगीत आहे.

एकदां श्रीमंत राजे जिवावरच्या संकटांत सांपडले असतां मी स्वतःचा जीव धोक्यांत घालून (घोड्यावरील अपघात प्रसंगीं) त्यांना वांचविलें आणि श्री गुरुकृपेनें माझाहि बचाव झाला.

अशा अनेक प्रसंगीं श्रीगुरुकृपेची प्रचीति आली तो तपशील लिहावा तेवढा थोडाच. या वयांत आठवलें तेवढें मेघःश्यामबुवांना सांगितलें.

***

भाग १ ला

# आठवण नं. ४९

(लेखक : श्री खंडेराव सखाराम जोशी मुंबई ४)

(श्री. खंडेराव हे शेणवी वाडींत घरमालक असूनहि त्यांना अलोट भक्ति प्रेम आहे.)

महाराज मुंबईंत इ. स. १९१० चे चातुर्मासांत, लेलेबंधु आणि पेटी तबल्याचे वगैरे साथीदार यांसह कीर्तनासाठीं आल्याचे मला आठवते. त्याचा मुक्काम भुगभाटांत चौघडेवाल्याचे चाळीत होता. सुप्रसिद्ध विद्यारामभाईचे दत्तमंदिरांत (ठाकुद्वार) त्यांचा प्रथम कीर्तन सप्ताह झाला. त्यांच्या सुबोध कीर्तनामुळें आणि तेजस्वी आकर्षक व्यक्तिमत्वामुळें कीर्तनासाठीं हजर राहणाऱ्या श्रोत्यांची गर्दी दिवसें दिवस वाढत गेली!

मीहि कीर्तनांतील बोध आणि महाराजांच्या साधुत्वाची छाप पडून महाराजांचा अनुग्रह घेतला आणि कीर्तनांना आणि त्यांच्या आध्यात्म चर्चेला वारंवार जाऊं लागलों.

महाराजांचे कीर्तनांत पेटीची सांथ करण्याचा योग मला पुष्कळ वर्षें लाभला. महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज उर्फ अण्णा लहानपणापासून महाराजांचे सहवासांत राहून आणि यांचे शिक्षण घेऊन महाराजांप्रमाणें उत्कृष्ट कीर्तन करूं लागले आहेत. इतकेंच नव्हे तर चारित्र्य व परमार्थ या दृष्टीने अवधूत सांप्रदायांत परिपूर्ण होऊन भडगांवच्या श्रीदत्त अवधूत मठीचे कार्याची परंपरा अत्यंत तेजस्वी पद्धतीनें चालवीत आहेत याविषयींची ग्वाही अनेक भक्त अनुभव पूर्वक सांगतात, यावरून त्यांना धन्यवाद देतो. माझें वय आंता ८०-९० चे घरांत गेलें असलें तरी अजूनहि मोठ्या श्रद्धेनें पौर्णिमेच्या मुंबईतील उत्सवांत मी हजर राहातों व स्वतःला धन्य समजतों.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ५०

( लेखक : श्री. महादेव बुवाजी महाजन )

मी महादेव बुवाजी महाजन. भडगांवचा रहाणारा. मला श्री अवधूत महाराजांचें दर्शन व भेट १९०९ सालीं झाली, त्यावेळीं मी वयानें अंदाजें २० वर्षांचा होतो. महाराज भडगांवास पहिल्यानेंच रामनवमीच्या उत्सवास आले. त्यावेळीं त्यांच्या कीर्तनांतील बोध ऐकून त्यांना शरण जाण्याची तीव्र इच्छा झाली. त्याप्रमाणें त्यांना भेटून माझें मनोगत सांगितलें. महाराजांनीं माझी विनवणी ऐकून त्याचदिवशीं मला पूर्ण कृपेनें अनुग्रह दिला. त्यानंतर मी दररोज त्यांच्या दर्शनास जाऊन त्यांच्या मुखांतून निघणाऱ्या प्रासादिक बोधामुळें आनंदित होत असे. त्यांनीं कांहीं काम सांगितलें तर ते करण्यात मला आनंद वाटे.

## माझ्या सेवेचें स्वरूप

पुढें भडगाव येथील गुरुमहाराजांच्या श्री दत्तमठींत परगांवाहून भक्तमंडळी येत. त्यावेळीं बस-सर्व्हिस नव्हती. त्यामुळें भक्त मंडळींना स्टेशनवरून मठीकडे आणण्याची कामगिरी महाराजांनीं मला सांगितली. माझी गरिबीची स्थिति असल्यामुळें मोडक्यां संसाराला थोडी मदत म्हणून भाड्यानें माणसांची व मालाची वाहतुक करण्यासाठीं मी बैलगाडी ठेविली होती. मुंबई, पुणे इत्यादि दूर ठिकाणाहून जे भक्त येतील त्यांना पाचोरा स्टेशनवरून भडगांव श्री दत्तमठींत आणण्याची सेवा महाराजांच्या आज्ञेवरून मी आनंदानें पत्करली. माझ्या मदतीला गांवांतील आणखी कांहीं गाड्यांचेंहि सहकार्य मी जमवून घेतलें.

गुरुमहाराज फिरतीला जाऊन भडगांवास आले कीं मी त्यांना स्टेशनवर उतरून घेऊन भडगांव मठींत आणीत असे. महाराजांचा स्वभाव भोळा पण तापट होता. ते संतापले कीं त्यांच्या दृष्टीला दृष्टी भिडवण्याची कोणाची छाती नव्हती! पण त्या क्षणापुरताच तो तापटपणा. थोड्याच वेळांत सर्व विसरून ते शांत होत; मनांत कांहीं रहात नसे. त्यांच्या कलाकलानें वागणेंच भक्तांना

हितकारक ठरे. भक्तमंडळी जमली कीं आत्मज्ञानाच्या बोधपर गोष्टी महाराज सांगत. त्यांची वाणी गोड आणि सांगण्याची पद्धत मोठी मोहक होती. खानदेश भागांत गुरुमहाराजांचेबरोबर कांहीं प्रसंगीं मी फिरतीसहि जात असे. ज्या गांवीं जात त्या गांवांतील लोक त्यांच्या कीर्तनांतील प्रासादिक बोध ऐकून आनंदानें त्यांचा जयजयकार करीत! '**लहानांत लहान तर थोरांत थोर**' अशी महाराजांची वागण्याची हातोटी होती! अंतःकरणांत कांहीहि भेदभाव न ठेवतां सर्वांशीं ते समत्व भावनेनें वागत. म्हणूनच सर्व जातीचे लोकांना महाराजांविषयीं आदर वाटे आणि ते अनुग्रह घेत.

## महाराजांची दयाशील वृत्ति

गुरु महाराजांचा अनुग्रह घेतल्यापासून माझी ऐहिक आणि पारमार्थिक उन्नतीच होत राहिली. पूर्वीं माझी अत्यंत गरिबी असून जमिनीचें क्षेत्रहि अगदीं थोडें होतें. घरप्रपंच फार कष्टानें चालवीत असे. एकदां पाचोरा व आसपासच्या टापूत अतीशय पाऊस पडून सर्व पिकांची नासाडी होऊन दुष्काळानें उग्र स्वरुप धारण केलें! अशा स्थितींत गुरुमहाराज बाहेर गांवीं फिरतीस गेले होते. त्यांचे भडगांवीं परत येण्याविषयीं पत्र आल्याचा निरोप मला समजल्यावर मी त्यांना आणण्यासाठीं गाडी घेऊन पाचोरा स्टेशनला गेलों. महाराजांचें सामान हमालांकडून गाडींत घेतलें आणि महाराजहि गाडींत येऊन बसले. महाराजांनीं गांवची परिस्थिती विचारून माझ्या संसारव्यवहाराची विचारपूस केली. सर्व हकीगत व विशेषतः माझें सांसारिक दैन्य ऐकून त्यांना फार वाईट वाटलें! कांहीं वेळ स्तब्ध राहून महाराज म्हणाले "यंदाचा तुमचा हंगाम तर फुकट गेलाच! जाऊंदे; पुढला हंगाम तुम्हांला चांगला लाभ देईल हें लक्षांत ठेवा!" पुढील वर्षीच महाराजांच्या या शब्दांचा अनुभव मला प्रत्यक्षच आला! कारण मागील सालापेक्षां माझ्या शेतांतील पीक चौपटी इतकें जास्त आलें! संसारांतील अडचण दूर होऊन मनास धीर आला. महाराजांनीं गाडींत जो आशीर्वाद दिला त्याचें सुफळ एक वर्षांतच मला मिळालें! सद्गुरुंविषयींची श्रद्धा भक्ति अंतःकरणांत जास्तच दृढ झाली. यानंतर दरवर्षीं माझ्या शेतांत भरपूर पीक निघूं लागलें. प्रपंच आनंदानें चालवूनहि शिल्लक उरूं लागली. त्या शिल्लकेंतून दरवर्षी थोडथोडी जमीन आणखी खरेदी करूं लागलों. मुलांच्या खाण्यापिण्यात व कपडालत्त्यांत फाजील कांटकसर न करतां त्यांचे शिक्षण पुढें चालू ठेविलें. माझ्या मालकीची एकूण ६० बिघे जमीन झाली! हल्लीं नंबर १ चा मुलगा चि. रामचंद्र 'फायनल परीक्षा' पास होऊन गांवांत समाज सेवा करीत आहे. नंबर २ चा मुलगा लक्ष्मण २ वर्षांचा असतां खूप

आजारी पडला. महाराजांनीं या मुलाला मठींत आणण्यास सांगितलें त्याप्रमाणे त्याला मी मठींत घेऊन आलों. त्यावेळीं तो आसन्नमरण स्थितींत होता! गुरुमहाराजांनीं मुलाला मांडीवर घेऊन त्या मुलाचे अंगास विभूती लावून डोकीवर कृपाहस्त ठेविला आणि कृपादृष्टीनें पाहून म्हणाले, "हे पहा महाजन, तुमचा मुलगा आज धन्य झाला! हा मोठा बुद्धिवान् होऊन अधिकाराची जागा मिळवील!" घरीं मुलाला नेल्यानंतर तो त्या आजारांतून खडखडीत बरा झाला व प्रकृतीहि सुधारत गेली. पुढें त्याचें एफ. वाय. पर्यंत शिक्षण झाले व तो आतां जामनेरला अव्वल कारकुनाचे हुद्यावर नोकरी करीत आहे. तो मामलेदारीचा कोर्सहि पास झाला आहे. नं. ३ चा मुलगा चि. अर्जुन हा भडगांवींच रहात असून, उत्तम प्रकारच्या शेतींत तरबेज झाला आहे आणि श्रीदत्त मठींतहि जात येत असून त्याला भजनाची अत्यंत आवड आहे.

## तळईचा मावसभाऊ अनुग्रहीत : तेथें महाराजांची फेरी

तळईस माझा मावसभाऊ **हरिश्चन्द्र मुकुंद महाजन** त्यानेहि गुरुमहाराजांचा अनुग्रह घेतला आहे. महाराजांचेवर त्यांची पूर्ण श्रद्धा असून महाराजांचे दर्शनास वारंवार येई. तळईला एकदां कीर्तनाची फेरी करण्याची त्यानें महाराजांना विनंति केली व त्याच्या निमंत्रणाप्रमाणें महाराजांनीं तळईस जावयाचेंहि ठरविलें. नक्की दिवस ठरवून महाराजांनीं हरिश्चन्द्र महाजन यास पूर्वतयारी करण्यास सांगितलें. ठरल्याप्रमाणें महाराज चार दिवसांनीं तळईच्या फेरीस निघाले. त्यावेळीं महाराजांबरोबर मी, श्री. अण्णा–दत्त महाराज, धोंडु शेंदुर्णीकर व बंडू लोहार इतके जण होतों. त्या गांवीं महाराजांचा कीर्तन-सप्ताह चालू झाला तेव्हां गांवांतील हजारों लोक, तसेच आजूबाजूच्या खेड्यांतील लोकहि कीर्तन ऐकण्यास जमू लागले! कांहीं लोक महाराज उतरलेल्या जागीं येऊन प्रश्न विचारून चर्चा ऐकूं लागले. प्रश्नांचीं उत्तरें लगेच समाधान करणारी मिळूं लागली. पण प्रत्येक ठिकाणीं निंदकहि असावयाचेच! निंदकांनीं कीर्तनसप्ताह बंद पाडून हरिश्चन्द्र महाजनचा अपमान करण्याचा घाट घातला होता! त्यांतील निंदकच प्रश्न विचारण्याचा आगाऊपणा करीत होते! विरोध करण्याचे धुंदींत कांहीं तरीच आचरटपणाचे प्रश्न करीत! परंतु महाराजांच्या समर्पक उत्तरानें त्यांचीं तोंडें बंद होत. या निंदकांच्या घोळक्यांत त्यावेळचे 'सत्य समाजिष्टहि' घुसले होते! "हें ब्रह्म-मायेचे बंड वेळींच मोडलें पाहिजे, नाहीं तर फोंफावून जगाचें नुकसान करील." अशी कोल्हेकुई ते लोकांत करीत असत! पण गुरुमहाराजांना शुष्क वादंग कधींहि आवडत नसे. '**तुटे वाद संवाद तेथें करावा**' अशी त्यांची वादाविषयींची

व्यवस्था होती. यामुळें निंदक समाजिस्टांच्या प्रश्नांना समर्पक उत्तरें मिळत गेल्यामुळें निरुत्तर होऊन त्यांना स्तब्ध रहावे लागे ! पण विरोध करून बखेडा माजविण्याची खुमखुमी असल्यामुळें सत्यसमाजिष्ट आणि शास्त्री-पंडित यांनीं एकत्र बसून त्याविषयीं कट रचला ! मग शास्त्री-पंडित गुरुमहाराजांकडे येऊन म्हणाले, "आमच्या प्रश्नांचीं उत्तरें आपण समाधानकारक द्याल कां ?" महाराज म्हणाले, "ठीक ठीक, काय प्रश्न विचारावयाचे ते विचारा. मला उत्तर देतां आलें तर देईन. नाहीं तर आपण सर्व सुज्ञ पंडित आहां, तेव्हां आपल्याकडून मी समजून घेईन." त्यांनीं मग प्रश्न केला, "महाराज, कातड्याच्या मोटेनें काढलेलें पाणी आपण स्वयंपाकासाठीं वापरतां तेव्हां आपल्याला शुद्ध ब्राह्मण कसें समजावयाचें ?" त्याबरोबर जमलेल्या इतर भक्तांना 'शांत रहा' असें सुचवून महाराजांनीं त्या पंडित म्हणवून घेणाऱ्यांना प्रश्न केला, "आपण कोण आहांत" ते म्हणाले, "आम्ही ब्राह्मण आहों." वास्तविक 'उत्सवे, व्यसने चैव स्पृष्टा स्पृष्टि र्न विद्यते" असें शास्त्र वचन आहे. उत्सवादि समारंभ व अडचणीचे प्रसंग यावेळीं शिवाशिवीचें बंड मानूं नये." महाराज म्हणाले, "तुम्ही ब्राह्मण म्हणविताना ? ठीक. पण तुम्ही ब्राह्मण गाई म्हशीचें दूध पितां ना ? त्या गाई म्हशी मेल्या कीं त्यांच्या कातड्याची मोट करतात. गाईच्या स्तनांतून दूध निघतें तिथेंहि पातळ कातडेच असते. वास्तविक सिद्धांत असा कीं ज्या कारणापासून कार्य होतें तें कार्यहि कारणरूप असते. संत कबीर म्हणूनच म्हणतात,-"राजा राम जपना चमडेकी पुतली भजन करना" तात्पर्य तुम्ही दूध पिता कातड्याच्या संसर्गांतूनच. आधुनिक शास्त्री पंडित ब्राह्मण नळाचें पाणी सोवळे समजून पितात. त्या नळाच्या तोटींत चामडे बसविलेले असतें. तुम्ही दूध पितांना हा चामड्याचा संसर्ग तुमचें सोंवळे बिघडवीत नाहीं कां ?" तात्पर्य तुम्ही ज्ञान म्हणतां तें अज्ञानानें माखलेलें आहे ! पोथ्या पुस्तकी ज्ञानाची पोपटपंची शुद्ध विचारी ज्ञानापुढे कशी टिकेल ? असल्या वेगडी ज्ञानाचे भ्रमांत तुम्ही किती दिवस गुरफटून राहणार ? एक पंडित ओरडला "अहो, मी ब्राह्मणच आहे !" महाराज म्हणाले, "तुम्ही ब्राह्मण नसून विप्र आहां. विप्र कर्माचा अधिकारी होतो व कर्मांतच गुरफटला जातो. ब्राह्मण शुद्ध ज्ञानाचा अधिकारी असावयास पाहिजे. तुम्हाला ब्राह्मण खरोखरच व्हावयाचें असेल तर असली 'वेगडी ज्ञानाची बडबड' तुम्ही सोडून द्यावयास पाहिजे !" इतकीं कानउघाडणी केल्यावर पंडित थिजून जाऊन त्यांनीं महाराजांपुढें शरणांगति पत्करली ! इतकेंच नव्हे तर झालेल्या स्वयंपाकाच्या प्रसादासाठीं त्यांनीं सहभोजनाच्या पंक्तीतहि भाग घेतला ! अखेर—

"आपल्या गांवीं येऊन आम्हां सर्वांवरच आपण उपकार केले" असें म्हणून सर्वांनीच महाराजांचे आभार मानले! महाराज भडगांवीं परतण्याचे वेळीं तळईच्या सर्व लोकांनीं त्यांचा सत्कार करून त्यांना मोठ्या प्रेमानें निरोपहि दिला! मग सर्व भाविक भक्तांना भक्ति प्रेमाचा आशीर्वाद देऊन गुरुमहाराज भडगांवीं परतले. तळई गांवची ही हकीगत मी माझ्या प्रत्यक्ष अनुभवानें यथाशक्ति नमूद केली आहे.

## पडीक खडकाळ जमीन खरीदण्याचा बेत, माझा विरोध!

महाराजांनीं जमीन घेण्याचें ठरविलें पण ती नापीक, खडकाळ असल्याचे मी दाखवून दिलें. मग त्यांना पटले.

चार सहा दिवस मी जमीन खरीदण्यास विरोध केल्याचा महाराजांना राग आला होता! मी गुरुमहाराजांच्या दर्शनासाठीं भीतभीतच मठींत गेलों व दर्शन घेऊन नमस्कार केला. पण महाराज शेताच्या खरेदीविषयीं बोललेच नाहींत! ते सर्व प्रकार विसरून गेले होते! महाराज बालवृत्तीचे सिद्ध होते. त्यावेळच्या गोष्टी त्याचवेळीं लगेच विसरून जात, असा अनुभव मला अनेकदां आला! यावेळीं त्यांनीं कांहीं आध्यात्मिक विषयांवरच बोलण्यास सुरवात केली! त्यावेळीं महाराज म्हणाले, "कांहीं निमित्तांनीं आमचे भडगांवीं येणें झालें. पण येथेंच आमचे हातून एकपवित्र स्थान निर्माण व्हावें, यांत वडील मातुश्रींची पुण्याई आणि सद्गुरूंची कृपाच आहे. आपल्याला हें पवित्र स्थान यांमुळेंच पहावयास मिळत आहे." हें ऐकून मी गुरुमहाराजांना विचारलें "महाराज आपल्या पूज्य वडील मातुश्रींना काशी, मथुरा, अयोध्या, गया इत्यादि पवित्र तीर्थांना नेऊन आपण पुण्य संपादन केलें! पण आमच्या सारख्यांना हें कसें घडणार?" महाराज म्हणाले, "हे पहा महाजन, **माणसानें सदिच्छा अंतःकरणांत धरून ठेविली कीं ती श्री दत्तकृपेनें केव्हांना केव्हां पूर्ण होतेच!**"

## महाराजांच्या प्रेरणेनें काशीयात्रा

वरील गोष्टीस २ वर्षें लोटल्यावर एक दिवस माझी आई मला म्हणाली, "महादू तूं दररोज मठींत जातोस, गुरुपदेशहि घेतला आहेस, व्यवहार-संसारहि ठीक करीत आहेस, पण आतां आम्ही उभयता (वडील मातुश्री) वयोवृद्ध झालों; तेव्हां असें वाटतें कीं तीर्थयात्रा करावी. देवधर्म करावा." मला

वाटलें, गुरुमाउलीनेंच माझ्या सौ. आईला सुबुद्धी दिली असावी! गुरु-महाराजांच्या त्यावेळेच्या बोलण्याचा प्रत्यय दोन वर्षांनीं आला. मीहि मग वडील मातुश्रींसह तीर्थयात्रेस जाण्याची तयारी करून महाराजांचा आशीर्वाद मठींत येऊन घेतला व तीर्थयात्रेस निघालों. थोर संत पुरुषांच्या सहवासानेंच अशी पुण्य-कृत्यें आपल्या हातून घडतात हें मला पटलें. काशी, प्रयाग, अयोध्या, मथुरा इ. सर्व तीर्थक्षेत्रें आम्ही केली. काशीस असतांनाच भडगांवला प्लेगची सांथ आल्याचे समजलें. गुरुमहाराजांची अनुज्ञा घेऊन आलों असल्यामुळें सर्व तीर्थयात्रा संपल्या-वरच भडगांवला परत जाण्याचा आम्ही निश्चय केला होता. त्याप्रमाणें सर्व तीर्थ-यात्रा झाल्यांवरच आईवडिलांसह भडगांवास परत येऊन गुरुमहाराजांचें दर्शन मठींत घेऊन त्यांना नमस्कार केला. मगच घरीं गेलो. घरचें सर्व वातावरण ठीक आनंदीच होतें. ही सर्व गुरुमाउलीचीच कृपा! सद्गुरूच्याच कृपेनें त्यांचें वचन माझ्याकडून सत्य झालें. त्यांच्याच कृपेनें या संसारांत राहूनच परमार्थाचा आनंद उपभोगीत आहे.

## गुरुमहाराजांच्या सहवासांतील आणखी कांहीं आठवणी

### एरंडोलची कीर्तन-फेरी

१९२९ सालीं गुरुमहाराज श्रीं अण्णा व मी एरंडोल गांवीं कीर्तनसप्ताहासाठीं गेलों. गांवांतील बहुतेक सर्व लोक कीर्तन ऐकण्यास येऊन बोध ऐकून आनंदानें घरोघर जात.

जे कां शिणले भागले। त्यांसि म्हणे जो आपुले॥

हा महाराजांचा बाणा असल्यामुळें गांवांतील अज्ञ जनांमध्यें आत्मज्ञान-सुखाची गोडी त्यांनीं उत्पन्न करून त्या लोकांना धन्य केल्याचा अनुभव मी प्रत्यक्षच घेतला!

त्या गांवांतहि कांहीं अभिमानी शास्त्रीपंडित होतेच. त्यांनीं गांवच्या लोकांत विरोधी प्रचार करण्याचे प्रयत्न केले. महाराज त्यांना शांतवृत्तीनें उत्तरें देऊन गप्प बसवीत. मग ते खिन्न मुद्रेनें परत जात! त्यांना महाराजांनीं दिलेलीं उत्तरें मला अजूनहि आठवतात. महाराजांकडून भक्तिप्रेमाचें रहस्य शिकलेल्या भक्तांना महाराजांच्या त्या विवेचक बोधाचें रहस्य समजतें. सर्व सत्पुरुष महाराजांप्रमाणेंच लोकोद्धाराचीं कर्तव्यें करून स्वानंदवासी झाले. आम्हां सर्वांना हें रहस्य उमजेल तोच आपला सुदिन ठरेल!

## जळगांवास कीर्तन-सप्ताह : नाटकांना शह !

एरंडोल गांवांतील लोकांचा प्रेमळ निरोप घेऊन महाराज जळगांवास आले व तेथेंहि कीर्तन-सप्ताह सुरू झाला. यावेळीं महाराजांसह आम्ही रंगाऱ्याचे मठींत उतरलों होतों. आमच्या आधीं थोडेच दिवस गंधर्व कंपनी जळगांवास आली होती व तिचीं लोकप्रिय नाटकें चालू झालीं होतीं. महाराजांचे कीर्तनास गर्दी होऊं लागली आणि नाटकाचे खेळांना फार थोडे लोक जाऊं लागले ! नाटक कंपनीच्या चालकांना याचें नवल वाटून त्यांनीं चौकशी केली तेव्हां जळगांवचे लोक गावांत अवधूत महाराजांची कीर्तनें सुरूं झाल्यामुळें कीर्तन ऐकण्यास जात असल्याचें त्यांना समजलें–कंपनीच्या चालकांनीं कांहीं माहितगार लोकांना विचारलें, "महाराजांचीं कीर्तनें किती दिवस चालणार ?" एक सप्ताह करून महाराज भडगावीं जाणार असें त्यांना समजलें. तेव्हां एक सप्ताह आपल्या नाटकांना उत्पन्न थोडेंच येणार याविषयींची कंपनीच्या चालकांची खात्री झाली आणि त्यांनीं आपल्या नाटकाचा कार्यक्रम त्याप्रमाणें बदलला ! महाराजांची कीर्तनपद्धति किती मोहक आणि प्रभावी होती याची यावरून वाचकांना कल्पना येईल.

## जळगांवीं भिक्षेच्या फेरीचा अनुभव

जळगांवच्या मुक्कामांत श्री. अण्णांना महाराजांनीं भिक्षेच्या फेरीस जाण्याची सूचना केली. गुरुवार होता. बरोबर जळगांवची कांहीं शिष्यमंडळीहि होती. त्यांचे बरोबर मीहि एक झोळी घेऊन निघालों. गुरुमहाराजांना नमस्कार करून आम्हीं भिक्षेला निघण्याचे वेळीं मी महाराजांना विचारलें, "महाराज आम्ही भिक्षेस निघालों खरें, पण भिक्षा मिळेल कां ?" महाराज म्हणाले, "काय होतें तें प्रत्यक्षच पहा !" मग अण्णांना बोलावून त्यांच्या व आमच्या सर्वांच्या कपाळांना भस्म व कुंकू लावलें. नंतर माझे झोळींत कांहींतरी टाकून महाराज म्हणाले, "महाजन, आतां मागें पाहूं नका, भिक्षा मिळेल ती झोळी घेऊन पुढेंच चला !" महाराजांचा हा इषारा ऐकून आम्ही भिक्षेच्या मार्गावर आलों.

> झूट कर्म अरु पाप कर्मसे। धनको कमाना ना चाहिये।
> नये नये पंथोंके बाता सुनकर फसाना ना चाहिये ॥

हीं घोषणा ऐकून त्या गल्लींतील लोकांनीं भिक्षा घालणेस गर्दीनें सुरवात केली ! जळगांवांतील मोठ्या रस्त्यांनीं फिरून, अनादिसिद्ध अवधूत सांप्रदायाची लोकांना जागृति देऊन आम्ही परत आलों. हा अनुभव आल्यानंतर 'कांहींतरीच

शंकाखोर प्रश्न विचारल्याबद्दल मी महाराजांची क्षमा मागितली! मला सद्‌गुरूंच्या योजकतेची धन्यता वाटली.

## समाधीच्या प्रसंगांतील अनुभव

माझ्या परमपूज्य सद्‌गुरूंच्या सहवासांत माझा १९०९ ते १९३९ पर्यंतचा काळ अगदी आनंदांत गेला. महाराज अनादिसिद्ध अवधूत सांप्रदायाविषयींचा जिव्हाळा निजभक्तांचे हृदयांत बोधरूपानें प्रगट करतां करतांच १९३९ सालच्या पाडव्याचे मध्यरात्रीं एकाएकीं स्वानंदवासी झाले! भडगांवांत ही दुःखद बातमी मध्यरात्रीनंतर पसरतांच असंख्य लोक अंत्यदर्शनासाठीं मठींत गेले, मीहि मठींत जाऊन गुरुमहाराजांचे पार्थिव देहास वंदन केलें. माझ्या अंतःकरणांत दुःखाचा कल्लोळ झाला त्याचें शब्दांनीं वर्णनहि करवत नाहीं! मनांत विचार केला कीं महाराजांच्या पार्थिव देहाचे दहनविधीसाठीं चंदन आणावें. मग आठवलें कीं **नाचणखेडचे श्री नथू पाटील** यांचे शेतांत चंदनांचें झाड आहे. तेव्हां आपली बैलगाडी घेऊन जाऊन त्या चंदनाचीं लांकडें आणावी. श्री. नथु पाटील हेहि गुरुमहाराजांचे भक्त असल्यामुळें ते या कामीं नकार देणार नाहींत असा मला विश्वास होता. मग गुरुमहाराजांना आवडणारी माझी गाडी व बैलजोडी घेऊन नाचण खेड्यास गेलो आणि श्री. नथू पाटील यांना भेटून माझें मनोगत सांगितलें. त्यांना महाराजांनीं समाधी घेतल्याचें ऐकून अत्यंत दुःख झालें. लगेच त्यानें चार मजूर बोलावून चंदनाचीं लाकडें तोडून माझ्या गाडींत भरली व मला त्वरेनें भडगांवास पाठविलें.

## एका कसायाची तक्रार व लोकमतापुढें माघार!

श्री. नथु पाटलांनीं हें लाकूड भडगांवचें श्री. बाबेखां कसाई यांना विकलें होतें. पण त्यांनाहि आपण या प्रसंगाची जाणीव दिल्यावर ते हरकत घेणार नाहींत, असें त्यांना वाटलें. मी चंदनी लाकडाची माझी गाडी श्रीदत्तमठीबाहेर आणून उभी केली. श्री. पाटलांनींहि लांकूड या पवित्र कार्यासाठीं आणल्याचें श्री. कसाई यांना सांगितल्यावरहि तेहि खरें खोटें प्रत्यक्ष पहाण्यासाठीं मठीकडे आले. ते पाहून ते गृहस्थ अत्यंत संतापले आणि पोलीस ठाण्यावर त्यांनीं आपलीं तक्रार नोंदविली! महाराजांच्या समाधीची बातमी पसरल्यावर भडगांवांतील सर्व जातींच्या व्यापाऱ्यांनीं आपापलीं दुकानें बंद करून **स्वयंस्फूर्तीनें हरताल पाळला!** भडगांवच्या पोलीस पाटलांनीच 'महाराजांच्या अंत्यदर्शनास सर्वांनी यावें' असें दवंडी पिटून कळविलें! मठीबाहेर भडगांवचे असंख्य लोक जमून 'आपल्या गांवचे भूषण हरपलें' असें दुःख व्यक्त करून हळहळत होते! सर्व

दुकानदारांनीं असें जाहिर केलें कीं 'सद्गुरूंच्या अंत्यविधीसाठीं नारळ व कापूर फुकट घेऊन जावें!' रस्त्यावर नारळ व कापूर घेऊन बसणाऱ्या लोकांची खूपच गर्दी झाली! इतक्यांत व्यापाऱ्यांना चंदनाच्या लाकडाविषयींची तक्रार बावेखां यांनीं नोंदल्याची बातमी समजली. सर्व व्यापाऱ्यांनीं आणि विशेषतः मुसलमान व्यापाऱ्यांनी बावेखां यांची समजूत घालून या पवित्र कार्यांत सहभागी होण्याची सूचना केली. समजूत काढण्यात **अकबरअल्ली व उस्मानअल्ली हे बोहरी व्यापारी** यानीच पुढाकार घेतला होता. बाबरेखां कसाई यांना त्यांच्याच मुसलमान धर्मातील हे पुढारी म्हणाले—

"हें पोलीस पाटलाकडील तक्रारीचें खटलें तुम्हीच परत घ्या. हा खटला तुम्ही पुढें चालविल्यास आपल्या धर्माच्या श्रेष्ठ तत्वाला काळिमा लावण्याचें पाप तुम्हांला लागेल! म्हणूनच आम्ही तुम्हाला हें सुचवितों. वास्तविक भडगांवचे अवधूत महाराज हे एकट्या जमातीचे नसून ते सर्वच जमातीचे होते. सर्वांविषयीं त्यांचे अंतःकरणांत सारखें प्रेम होतें. जास्त बोलण्याचा हा प्रसंग नव्हे हें ओळखा आणि ही तक्रारीची भानगड स्वतःच रहित करून स्वतःच तुम्ही या असंख्य भक्तांची इच्छा या अवलियांविषयीं पुरी करावी आणि हीं चंदनाचीं लाकडें त्यांच्याकरितां अग्निसंस्कारासाठीं द्यावी" श्री. बावेखां यांना हें पटलें आणि त्यांनीं नोंदललेली तक्रार स्वतःच मागें घेऊन चंदनाची ती लांकडे मोठ्या दुःखी अंतःकरणानें, गिरणानदी किनाऱ्यापर्यंत नेली आणि गुरुमहाराजांच्या पार्थिव देहाला अग्नि देण्यासाठीं त्यांचा सदुपयोग झाला!

## श्री दत्तमूर्तीच्या स्थापनेच्या समारंभाची गोड आठवण

१९२७ सालीं भडगांवच्या श्रीदत्तमूर्तीची स्थापना मोठ्या समारंभानें झाली. या समारंभासाठीं मुंबई, पुणे इ. शहरांतून आणि आसपासच्या अनेक खेड्यांतून असंख्य भक्तांची गर्दी झाली होती. १५ दिवस हा सोहळा चालू होता. सर्व जातींचे लोक होते. सर्वांनाच श्रीदत्तमठीविषयीं आपलेपणाचा जिव्हाळा वाटावा, असें गुरुमहाराजांचें वागणे होतें–त्यांनीं सर्वांच्या खाण्यापिण्याची व राहण्याची व्यवस्था जागा लहान असूनहि शक्यतों उत्तम ठेविली होती. या समारंभांत गावांतील सर्व लोकांना सुग्रास पंचपक्वान्नांचा प्रसाद मिळाला असें मला आठवतें! शेवटच्या दिवशीं भंडाऱ्याचा मोठा प्रसाद झाला. शहरांतील, खेड्यांपाड्यांतील आणि भडगावांतील असंख्य लोकांची गर्दी पाहून मी गुरुमहाराजांना एकीकडे नेऊन म्हटलें, "इतके लोक जमलेत तेव्हां प्रसादाचे लाडू सर्वांना पुरे पडतील का?" महाराज

म्हणाले, " महाजन, कसलाहि संशय नको. सर्व मंडळींना प्रसाद पोहचला कीं नाहीं पहा ! कोणालाहि प्रसाद मिळाला नाहीं, असें होणार नाहीं ! "

## समारंभाची पुरवठाशक्ति

खरोखर महाराजांच्या म्हणण्याप्रमाणें इतक्या असंख्य लोकांनाहि प्रसाद मिळाला ! प्रसाद घेणाऱ्यांच्या अनेक पंक्ती उठल्या तरी पुष्कळच अन्न शिल्लक राहिलें ! मला आंत बोलावून महाराजांनीं शिल्लक अन्नाचा राशी दाखवून म्हटलें, " हे पहा महाजन, माझे सद्गुरु श्रीपंतमहाराज अशा समारंभाची पुरवठा-शक्ति निर्माण करीत आहेत, मग काय उणीव राहणार ! " मी अन्नाची रास पाहून थक्क झालों ! आणि महाराजांचे पायीं पडून बाहेर आलों. एकंदरींत मोठ्या थाटानें 'श्रीदत्तमूर्ति स्थापन करण्याचा समारंभ पार पडला.

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. ५१

( लेखक : श्री. शामसिंह दगडूसिंह राजपूत, मु. व पो. भडगांव )

### श्री. केळकरबाईकडे नोकरीस

मी सन १९२० सालीं श्री अवधूत महाराजांना केळकर बाईंचे वाड्यांत अनुग्रह घेतला. व त्यावेळीं मी केळकर बाईंचेकडेच कामाला होतों. माझे आईवडील लहानपणींच वारले आणि आम्ही तीन भाऊ होतों. मोठा भाऊ रतनसिंह दूर देशी होता. म्हणून मला बाईकडे कामाला रहावें लागलें. त्यावेळीं बाई व परशराम मास्तर यांचे गुरू श्री अवधूत महाराज यांचे दरम्यान चाललेली परमार्थ चर्चा मला दुरून ऐकावयास मिळे. बाईंचेकडे सालोसाल गुरुमाउलीचा उत्सव होई. या उत्सवासाठीं महाराज येत असत.

### मठींत कामावर

१९२१ सालीं महाराजांनीं सध्याची मठीची जागा ख़रीदली त्यावेळीं मठींत मला महाराजांनीं कामावर ठेविला. तेथें श्रीदत्तमूर्तिच्या फोटोचें अधिष्ठान मांडलें. या जागे समोरील पटांगणांत एक वडाचें झाड होते. तें मीच महाराजांच्या आज्ञेवरून तोडलें. माझ्या मदतीला एक माणूस देऊन महाराजांनीं बाहेरील पटांगण साफसूफ केलें. महाराज फिरतीवर गेले कीं दगडूशेट वाणी अधिष्ठानाची पूजा वगैरे करीत. दर गुरुवारी भिक्षेची फेरीहि करीत. रोजचा नैवेद्य मला देत. मागें बगीच्या केला होता. महाराज धुमी जवळ असत. एकदां मी बगीच्या झाडीत असतां महाराज मला म्हणाले,

झाडतों सारवितों । मला तो गमे भूतळींचा रवि ।
नारायण विधि अत्रीनाथ । दत्तजनार्दन एकनाथ ॥

असा तूं आहेस! तेव्हांपासून मला गुरु-प्रेम भक्तीची चटक लागली. मठींत टिपऱ्या व लळीत खेळण्यास शिकून मी भक्ति-प्रेमानें मस्त झालों होतों! एकदां

प्रसादाचे वेळीं वाढणारानें भातावर खूपच मीठ वाढलें पण मी प्रसाद म्हणून तसाहि भात खाऊन गेलों! पण मला तें बाधलें नाहीं!

## गुरुकृपेनें बचाव

एकदां कीर्तन ऐकून घरीं आल्यावर गाढ झोंपलों असतां, माझ्या अंगाखाली चांगला ३-३॥ फूट लांबीचा नाग सर्प आला व तो माझ्या अंगाखाली अंदाजे वीतभर चेपला गेला होता. माझा धाकटा भाऊ नारायणसिंह हा अगोदर उठल्या-बरोबर माझ्या दोन्ही पायामध्ये त्याला सापाचें अंग दिसलें! मला जाग्रणामुळें गाढ झोंप लागली होती! नारायणसिंहानें तें पाहून मला एकदम हातांनीं ओढून दुसरीकडे बसविलें! 'निजलेल्या माणसास असा कां त्रास देतोस?' असें रागानें बोलून मी त्याच्या थोबाडींत मारलें! माझा तो लहान भाऊ म्हणाला, "मारलेंस तर मार, पण तुझ्या अंगाखालीं केवढा साप आहे तें पहा!" पण गुरुमहाराजांच्या कृपेनें सापहि जिवंतपणीं मुकाट्यानें निघून गेला व मीहि सुरक्षित राहिलों!

लग्न झाल्यावर माझ्यावर एकामागें एक अशीं अनेक संकटें आलीं! मुलगा झाला पण बायकोला बाळंतपण लागल्यामुळें आईच्या दुधानें त्याचें संगोपन न होतां वरच्या दुधावरच तो वाढला. त्याचें नांव रामसिंह. माझी बायको १४ वर्षें सतत बाळंत रोगानें झिजून अखेर देवाघरीं गेली! माझें मठींत जाणें येणें त्यामुळें बंद पडलें! २५ वर्षें मलाच अन्न शिजवावें लागलें. माझें वय आतां ६५ वर्षें आहे. गुरुमाउलीचे दर्शनास यामुळेंच अंतर पडलें. तरीपण अनेक जन्मोत्सवांस हजर राहून मी महाराजांचें वेळोवेळीं दर्शन घेई.

मजजवळ आतां वडिलोपार्जित १० बिघे जमीन, स्वतःचे घर आणि मुलगा आहे. गुरुमाउलीच्या कृपेनें सध्यां मी आनंदात दिवस काढीत आहे.

•••

भाग १ ला

# आठवण नं. ५२

(लेखक : श्री. बाबुराव बळवंत शेलार तानंग जि. सांगली.)

## प्रास्ताविक

मी तानंग गांवचा राहणारा. सद्गुरु श्री अवधूत महाराजांचे चरित्रांत प्रसिद्ध करण्यासाठीं माझ्या आठवणी सांगण्याची सूचना मला गुरुबंधु श्री. दत्तात्रय महाराज यांनीं केली आणि मग गुरुबंधु मेघःशामबुवा येऊन खणपटीस बसले त्यामुळें गुरुमहाराजांच्या आठवणी मी यथामति सांगितलेल्या त्यांनी लिहून घेतल्या.

माझे वडील मातुश्री वैष्णव सांप्रदायाचे परंपरेनें अनुयायी होते. माझ्याहि लहानपणापासून तोच संस्कार अंगवळणी पडला. वडील वाचीत असलेलें पुराण ऐकण्यास गांवांतील भक्त येत असत. या पुराणांत वारंवार सद्गुरुंचा उल्लेख येई आणि सद्गुरुकृपेवांचून जीवन व्यर्थ अशा आशयाचें प्रतिपादन ऐकून मला सद्गुरुविषयीं तळमळ लागून राहिली. एकदां चातुर्मासांत वडिलांनीं माझेकडून संपूर्ण दासबोध वाचून घेतला. त्यांतील गुरुमार्गाचें संपूर्ण विवेचन वाचून त्यामार्गाविषयींची जिज्ञासा पूर्ण झाली. पण 'असा खरा अधिकारी सत्पुरुष केव्हां आपल्याला भेटेल' अशी तळमळ अंतःकरणांत उत्पन्न झाली! सर्व पुराणांपेक्षां मला दासबोध जास्त आवडला.

## श्री. यशवंत पाटील व श्री. गं. गोदाअक्का

आमच्या गांवचे श्री. यशवंत पाटील व श्री. गं. गोदाअक्का यांनीं कुरुंदवाडचे श्री अवधूत महाराज यांचा अनुग्रह घेतला होता. त्यांनीं एका शुभमुहूर्तावर आपल्या घरीं गुरुमहाराजांच्या फोटोचें अधिष्ठान मांडून भजनादि कार्यक्रम सुरूं केले. तींतील सद्गुरुंच्या अनुग्रहाचा तपशील मात्र सांगितला नाहीं. ते म्हणाले, "व्यावहारिक प्रश्न तुम्ही केले पण परमार्थाविषयीं तळमळ तुमच्यांत दिसली नाहीं. म्हणून हा विषय विचारल्यावांचून वाटेल त्याच्याशीं बोलूं नये." मला त्यांचे बोलणें पटलें. म्हणून मी सद्गुरुंविषयींची माझ्या अंतःकरणांतील तळमळ प्रांजळपणें त्यांचेपुढें उघड केली.

मग श्री. यशवंतराव म्हणाले, "माझे सद्‌गुरू महाराज १५ दिवसांनीं कीर्तन सप्ताहास येणार आहेत. त्यांच्या कीर्तनातील व बैठकींतील बोध ऐकून मगच पुढील विचार ठरविणें बरें." श्री. अवधूतमहाराज आमचे गांवी ( १९२६ मध्यें ) आले. त्यांचे दुरून दर्शन घेऊनच मला आनंद झाला! त्यांची तेजःपुंज व भव्य मूर्ति पाहून कोणाला आनंद होणार नाहीं ? नंतर मी जवळ जाऊन त्यांचे चरण घट्ट धरले. समर्थ रामदासांनीं दासबोधांत केलेलें वर्णन श्री. अवधूत महाराजांना तंतोतंत लागू पडते, असा त्यांचा बोध ऐकल्यावर मला विश्वास वाटला! पण महाराजांना अनुग्रह देण्याची मी विनंति केल्यावर तेहि म्हणाले, "आणखी कांहीं दिवस जाऊ देत. तों पर्यंत तुझा वाचन भजनादीचा कार्यक्रम चालला आहे तसाच चालू दे." मला हें ऐकून वाईट वाटलें! 'अनुग्रह देण्यास मी अयोग्य आहे' असें महाराजाचें मत असावें असें वाटून अत्यंत असवस्थ झालों! पण एकदा छंद लागल्यामुळें यशवंतराव पाटलांची संगत व भजनमंदिर सोडवेना. दुसऱ्या दिवशीं यशवंतरावा-जवळ माझी निराशा बोलल्यावर त्यांनी मला धीर दिला. 'तुझी इच्छा लवकरच पूर्ण होईल' असे आश्वासन देऊन श्री अवधूत महाराजांच्या श्लोक व पदांचें छोटे पुस्तक मला वाचावयास दिले. त्याप्रमणें दररोज ह्यांतील अभंग व पदें वाचून शंकानिरसन करून घेऊं लागलों. पुढें ह्या पुस्तकाचें पारायण चालविलें. एक वर्षानंतर कुरुंदवाडचे महाराजांचे शिष्य श्रीपतराव दादा पाटील आमचे गांवी आले. ते यशवंतराव पाटलांचे मेहुणेच असल्यामुळें त्यांच्या बोधचर्चेंलाहि हजर राहून मी आनंद लुटला. महाराजांच्या अशाच अनेक भक्तांचे सहवासांत माझीं ३ वर्षें गेलीं.

## पवित्रस्थळीं मला महाराजांचा अनुग्रह लाभला!

३ वर्षांनंतर श्री. यशवंतराव पाटील व त्यांचे मेहुणे श्रीपंत पाटील यांनी मला आपल्याबरोबर बाळेकुंद्री या पवित्रस्थळीं नेलें. श्री. अवधूत महाराज भड-गांवाहून येऊन ज्या धर्मशाळेंत उतरत होते, तेथेच आम्ही जाऊन उतरलों त्याच दिवशीं महाराजांनीं मला अनुग्रह देऊन पूर्ण आपलासा केलें.

गुरुशिष्य भाव नाहीसा करून ऐक्य भाव माझ्या अंतकरणांत मुरविला! 'द्वैताद्वैत, पापपुण्य, बंध-मोक्षादीच्या विपरीत कल्पना नाहीशा केल्या आणि सर्वानुभूतीं ब्रम्ह ही खूण पटविली! "गुरुचिया मुखें होईल ब्रह्मज्ञान। विठोबाची खूण कळे मग ॥ हें तुकोबांचे वचन आठवलें! तसेंच, गुरू भेटला मजला। आनंद पोटीं माझ्या माईना ॥ हें गुरुमहाराजांचे पदहि सत्य असल्याची

प्रचीति आली! उत्सव उरकल्यावर गुरुमहाराज कुरुंदवाडला गेले आणि आम्ही आमचे तानंगगावीं परत आलों.

## प्लेगमधून गुरुकृपेनें बचाव!

तानंगला आल्यानंतर दुसरेच दिवशीं मला प्लेगनें पछाडलें. सर्व डॉक्टरी उपाय थकून अंतकाळ नजीक आलासें वाटलें! शुद्धींत असल्यावेळीं मनांत तारक मंत्राचा जप आणि गुरुस्मरण करून आनंदांत होतों. सद्गुरूंच्या निजबोधामुळें पार्थिव देह जाणार असला तरी त्याची कसलीहि भीति वाटत नव्हती. श्रीपंतांचे पुढील पद 'आज उद्यांचा नाहीं भरवसा। सावध हो झडकरी ॥' मनांत घोळत होतें! माझ्या गुरुदेवांची कांहीं सेवा न करता त्यांच्या ऋणांत तसाच राहिलों, येवढेंच वाईट वाटे! माझ्या गुरुमाउलीनें माझी सुटका केली! प्लेगची गांठ फुटून निचरून गेली आणि मला थोड्याच दिवसांत अगदीं आराम पडून बरें वाटलें! माझी प्रेमळ मातापिता व बंधू आणि आप्तेष्ट अशा सर्वांनाच आनंद झाला! तेव्हांपासून माझ्या खात्यांतील २०–२५ मंडळींना गुरुदेवांची भक्ति जडून ते गुरुदेवांच्याच भजनीं लागले!

बरा झाल्यावर चार भक्तमंडळीसह मी महाराजांच्या ६० व्या वर्षाच्या जुबिली समारंभाचे निमित्तानें भडगांवीं गेलों. गुरुमहाराजांनीं हंसतच मोठ्या प्रेमानें आमचें स्वागत करून आम्हां सर्वांची उत्कृष्ट व्यवस्था ठेवली. आम्ही ७ दिवस भडगांवीं राहिलों. प्लेगमधून माझी कशी सुटका झाली, ही हकीगत महाराजांना सांगितली तेव्हां महाराज म्हणाले,

> "ज्या भक्ताचें अंतःकरण निर्मळ असते तेथें सद्गुरु प्रगट असून त्याचे संकटांतून रक्षण करीत असतो, तेथें महाकाळाचें देखील कांही चालत नाहीं! मात्र सद्गुरुचें स्वरुप खरोखर ओळखणाऱ्या भक्तांनाच असा अनुभव येतो."

महाराजांचा निरोप घेऊन गांवीं आल्यावर सर्व गुरुबंधू एकत्र जमून श्री. यशवंतराव पाटील यांचे घरीं अहोरात्र भजन–वाचन व अध्यात्म–चर्चा चालविली. आम्हां भक्तांना वेळोवेळीं फराळ व चहापाणी देऊन स्वखर्चानें सर्व प्रकारची बडदास्त गुरुभक्तीनें, श्री. गं. गोदाअक्का करीत.

## श्रीमती गोदाकांना अन्नदानाचा हव्यास!

त्यांना अन्नदानाचा मोठा हव्यास! तानंग गांवच्या आम्हां लोकांना भक्तिमार्गाला लावण्याचें श्रेय या थोर मातेलाच आहे, हें नमूद केल्यावांचून

राहवत नाहीं ! गुरुमहाराजांनीहि वारंवार या गांवीं येऊन सर्वांना पंतभक्तीचें वेड लावलें ! यामुळें आमच्या गांवचे अंदाजे १००-१५० लोक दरसाल बाळेकुंद्रीतील पंतजन्मोत्सवास जात असतात. १९३२ सालीं गुरुमहाराजांचे हस्ते आमचें गांवीं पंतमहाराजांचें फोटोचे अधिष्ठान ठेविलें. गुरुमहाराजांचीं कीर्तनें व बोध वारंवार ऐकून आमचे गांवीं भजन पूजनादि श्रीपंतांचें भक्ति-प्रेम जागृत झालें आणि मेघःशामबुवांनीं वारंवार येऊन ही जागृति अखंड ताजी राखली याविषयी त्यांचेहि आम्ही आभारी आहों.

## गुरुमहाराज स्वस्वरूपीं लीन-स्वानंदवासी-झाल्यानंतर

१९३९ सालांतील चैत्रपाडव्यादिवशीं मध्यरात्रीं गुरुमहाराज स्वस्वरुपांत विलीन झाल्याची-स्वानंदवासी झाल्याची-आम्हांला अतीशय दुःखद ठरणारी व खेदाचा धक्का देणारी बातमी तुंबें गांवाहून श्री. मेघःश्यामबुवांनीं पाठविलेल्या पत्रांत आली. आम्हां भक्तांना या बातमीचा केवढा खेदकारक धक्का बसला असेल याची कल्पना आमच्यासारख्या गुरुभक्तांनाच येईल ! आम्ही पोरके झालों ! आम्हां सर्व भक्तांचें कृपाछत्रच नाहीसें झालें !

## श्री. अण्णानीं सांत्वनपर पत्र पाठवून जबाबदारी पत्करली

पण नंतर आमचे गुरुबंधु आणि गुरुमहाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज तथा-श्री. अण्णा-यांचे सांत्वनपर आणि भक्तिप्रेम-बोधानें भरलेलें पत्र आम्हां भक्तांना आलें. त्यांचेकडेच आतां सद्गुरु-दृष्टीनें पाहून आम्हां संसार-परमार्थ रूपानें करण्याच्या गुरुमहाराजांच्या शिकवणीप्रमाणें वागत आहों. श्री. दत्तमहाराजांनीं गुरुमहाराजांचे पश्चात् त्यांच्या कार्याची सर्व जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेतली असून ती ते मोठ्या धैर्यानें व घडाडीनें पार पाडीत आहेत, हे आम्ही स्वानुभावानें नमूद करीत आहों.

## आभार

गुरुमहाराज गेल्यापासून त्यांनीं आम्हांला बंधुप्रीति आत्मशांति व सद्गुरुभक्ति याविषयीं जी शिकवण दिली, ते महान् सद्गुण येथील सद्गुरूंचे पीठांत अखंड राखविण्याची दक्षता आम्ही राखीत आहों.

आम्हांला या सर्व भक्तिप्रेमाचे खेळांत मार्गदर्शन केल्याबद्दल फिरून एकवार श्री. दत्तमहाराजांचे आणि गुरुबंधु मेघःश्यामबुवांचे आभार मानून त्या आठवणी यथामति आटोपत्या घेऊन चरित्रग्रंथाकरितां अर्पण करतों.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ५३

(श्री. सैफुद्दिन बोकारी मुल्ला, मु. पो. तानंग, ता. मिरज, जि. सांगली)

## कुरुंदवाडास जाऊन अनुग्रह घेतला

मी तानंग गांवी राहणारा मुसलमान आहे. मला गुरुमहाराजांची भेट आमच्या गांवचे श्री. यशवंतराव पाटील या उदार बुद्धीच्या आणि बाणेदार गृहस्थांनीं करून दिली.

श्री अवधूत महाराज १९२६ सालीं प्रथम आमचे गांवीं आले. त्यांच्या परमार्थ बोधाचा आम्हां बंधूवर फार परिणाम होऊन आपणहि गांवकर भक्तांप्रमाणें महाराजांचा अनुग्रह घ्यावेसें वाटूं लागलें! पण "आपल्या मुसलमानी धर्माच्या लोकांत बोभाटा होऊन आपल्याला त्यांचा कदाचित् विरोधहि होईल, अशा भीतीनें गुपचूप राहिलों" पण मनांतील तळमळ कांहीं केल्या जाईना! मग मनांतील सर्व श्री. यशवंत पाटील यांना सांगून त्यांचेबरोबर कुरुंदवाडास जाऊन श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. गांवांत आल्यावर गावांतील माझ्या जातभाईनीं बराच बकवा केला! पण गुरुमहाराजांच्या उपदेशांतील खंबीर तत्त्वामुळें मी कोणाची पर्वा केली नाहीं! आमचे गांवीं येऊन लोकांत भक्तिप्रेमाची जागृती गुरुमहाराज करीत आणि कांहीं भक्तांना बरोबर घेऊन बाळेकुंद्रीस श्रीपंतांच्या पुण्यभूमीकडे जात. एकदां मीहि महाराजांबरोबर बाळेकुंद्रीस गेलों आणि तेथील विश्वधर्माचें वातावरण आणि वैभव पाहून थक्कच झालों! तेथें जातिभेद आणि धर्माचार-भेद यांना थाराच नव्हता! या दृष्टीनें श्री. अवधूत महाराजांची बोधरीती अजब होती! तिची ओळख बाळेकुंद्रीत मला पूर्णपणें पटली!

## सांगली येथें हलाखींतील गुरुकृपेची अजब मदत

पुढें घरच्या हलाखीमुळें सांगलीस जाऊन पोलीसखात्यांत नोकरी धरली. तेथें घरच्या सर्व १० मंडळींसह राहिलों. पगार अवघा १० रुपयेच मिळे!

तरीपण त्याच स्थितींत गुरुमाउलीचें चिंतन करून समाधानी स्थितींत रहाण्याचा प्रयत्न करीत होतों. पण एक दिवस असा उजाडला कीं घरी शिजवायला धान्य नाहीं आणि धान्य आणायला पैसेहि नाहींत! उपास काढण्याचाच तो प्रसंग! नोकरीवरून १२ वाजतां घरीं आलों. तों सर्वत्र खडखडाट! पगार व्हायला आणखी ११ दिवस होते! सर्वजण चिंतातुर होऊन बसले होते! मला ही परिस्थिति पाहून काय वाटलें, तें सांगण्यास शब्दच नाहींत! मन स्थिर करून सद्‌गुरुंचें चिंतन करीत राहिलों. इतक्यांत मधुकरी मागत असलेला १२ वर्षाचा तेजःपुंज मुलगा येऊन मजपुढें उभा राहून म्हणाला, "काय हो, असे चिंतातुर होऊन स्वस्थसे कां बसलात? सर्व ठीक आहे ना?" असें बोलून त्यानें आपल्या झोळींतील सर्व शिधा काढून मजपुढें ठेविला! आपण हें घेऊन याचा उपयोग करा" त्याचे हे शब्द ऐकून आम्हांला फार संकोच वाटला! "या मधुकरी मुलाची भिक्षा आपण वापरणें ठीक नाही, उलट त्यालाच आपण शिधा देऊन मदत केली पाहिजे" असें वाटलें. आम्ही त्या मुलाला असें सांगून 'भिक्षेचा शिधा त्याला परत घेऊन जा' म्हणण्याचे अगोदर तो शिधा आमचेपुढें ठेऊन एकदम नाहींसा झाला! त्यानें आणलेल्या शिध्यावर आमची १० माणसांची जेवणाची व्यवस्था त्या दिवशीं झाली.

दुसऱ्या दिवशीं आम्हां दहा माणसांना पुरेल इतका शिधा मधुकरीचे झोळींतून आणून त्या मुलानें आमचेपुढें ठेविला! त्याला कांहीं बोलण्याचे आंतच तो पसार होई! मग पांचव्या दिवशीं त्याच्या पाळतीवर राहून त्याला गांठून मी म्हटलें, "बाळ तूं मधुकरी मागून शिधा मिळवितोस तो तुझ्या घरींच नेत जा, घरचीं माणसें तुला रागावतील" त्या मुलानें मोठें आश्चर्य वाटण्यासारखें उत्तर दिलें! तो म्हणाला, "मी एकटाच असून मला घरचें कोणीच नाहीं. ही भिक्षा मी माझे घरीं देतों असें समजा, याबद्दल मला फिरून कांहीं विचारूं नका." असें म्हणून तो निघून गेला! "आठदहा दिवसच नव्हे, तर दीड महिना हा मुलाचा क्रम चालू होता!" त्यामुळें आमच्या सर्व अडचणी नाहींशा झाल्यां. दीड महिन्यांनीं त्या मुलाला मुद्दाम गांठून मी म्हटलें, "बाळ आज माझा पगार होऊन आतां आम्हाला कसल्या अचडणी नाहींत, तेव्हां आमच्या करितां मधुकरी मागण्याची तसदी तूं घेऊं नको." यावर त्या मुलानें मला उत्तर देऊन थक्क केलें! तो म्हणाला, "आजोबा पगार झाला असेल पण लाकडाचे बिल बरेच दिवस तुंबलें आहे, तें देऊन टाका म्हणजे झालें" असें म्हणून फिरून तो अदृश्य झाला! मग मात्र माझ्या डोक्यांत प्रकाश पडला! पण मग

लक्षांत येऊन काय उपयोग ? त्या माझ्या अवधूत गुरुमूर्तीला ओळखलें नाहीं आणि प्रणाम केला नाहीं ! मी पापी ! गुरुमातेला माझ्यासाठीं किती कष्ट झाले ! पण माझा हा अपराध असून माझ्या गुरुमाउलीनें तो 'अपराध' असें मानलेंच नाही ! धन्य अवधूत सद्गुरु ! तेव्हां पासून आज तागायत मला अन्नवस्त्राला कांही कमी नाहीं !

१९३५ सालीं माझा धाकटा भाऊहि पोलिस खात्यांत नोकरी धरून माझ्याकडेच रहावयास आला. दोघांच्या मिळून पगारावर आमचा उदरनिर्वाह ठीक चालूं लागला. थोड्याच दिवसांनीं सांगलीचे श्रीमंत चिंतामणराव यांनीं स्वखुषीनें माझी '**गेस्ट हाऊस**' (पाहुण्याकरितां निवासस्थान) कडे बदली केली. आमचें सर्व बिऱ्हाड त्या बंगल्यानजीकच्या जागेंतच (आउट हाउस) नेलें. आमची उत्तम प्रकारची व्यवस्था झाली. "मला माझ्या राजयोगी सद्गुरूच्या कृपेनें राजाश्रय मिळाला !" तरी मी व्यवहारांतील सत्यनिष्ठा आणि सद्गुरुंचे पारमार्थिक बोध स्मरण न विसरता चालूं ठेविलें.

## चोरीचा आरोप आला, पण निर्दोषी ठरलों !

एकदां गेस्ट हाऊस मधील "सोन्याचें ताट" चोरीला जाऊन बरीच गडबड व नोकरांची धांवपळ झाली ! अखेर सर्वांनीं माझेवरच त्या चोरीचा आरोप घातला ! मनाला लागून मी तब्येतीनें खंगूं लागलों ! पण माझा सद्गुरुच माझा पाठिराखा असल्यामुळें १५ दिवसानंतर तें सोन्याचें ताट सांपडलें आणि माझ्यावरील किटाळ नाहींसें झालें ! मला त्या विषयीं आनंद झाला ! तरी पण 'ही नोकरी नकोच" असें वाटूं लागलें !

## अवलियाच्या रूपानें सद्गुरुचें मार्गदर्शन व दुःख निवारण

पुढें माझा पोटदुखीचा विकार बळावल्यामुळें 'नोकरी सोडून गांवीं जावें आणि मिळेल त्यावरच उदरनिर्वाह करून सद्गुरु बोध-चिंतनांत पुढील काळ घालवावा' असें वाटूं लागलें. असा विचार करीत असतांच एक अंदाजें ६० वर्षांचा अवलिया पुढें येऊन उभा राहिला ! अंगावर शुभ्र कफनी, गळ्यांत स्फटिकांची माळ, कानांत रुद्राक्ष, हातांत कमंडलू आणि अती लांब शुभ्र दाढी, तसेंच डोकीचे शुभ्र केस जटारूपांत पाठीवर सिंहाच्या आयाळी प्रमाणें शोभत असलेले अशी ती धिप्पाड व तेजस्वी मूर्ति होती !

मला "तो तेजःपुंज अवलिया' म्हणाला :—"बाबांरे, चिंतातुर होऊन विचार कसला करतोस ? तुझें ठीक चाललें आहे नां ?" मी 'हो' म्हटलें पण 'फक्त पोट दुखतें' अशी तक्रार सांगितली. तेव्हां तो अवलिया म्हणाला :—"या शहरांत डॉक्टर चांगले आहेत तेव्हां तब्येत दाखवून रोग-मुक्त हो"

असे बोलून तो अवलियाला जावयास निघाला, तेव्हां मी तांदळाची भिक्षा त्या अवलिया घालून नमस्कार करण्यासाठीं आलों पण तो केव्हांच अदृश्य झाला होता !

दुसऱ्याच दिवशी त्या अवलियाच्या सूचनेप्रमाणें सांगलींतील एका चांगल्या डॉक्टरना तब्येत दाखविली. त्यांनीं मला संपूर्ण तपासून पोटावर शस्त्रक्रिया (ऑपरेशन) करणेचें ठरविलें. चार दिवसांनीं माझ्या पोटावरील शस्त्रक्रिया झाली आणि १५ दिवस दवाखान्यांतच रहावें लागलें. मग पोट दुखीच्या दुखण्यांतून मुक्त झालों ! मात्र दवाखान्यांत पडून असतां सद्गुरूंचें आणि त्यांच्या बोधाचे सारखें स्मरण करीत होतों. मला योग्य सूचना करून रोगमुक्त करणाऱ्या त्या अवलियाच्या भेटीची इच्छा असूनहि पुरी झाली नाहीं ! सद्गुरु माउली वेळोवेळीं अनेक रूपें घेऊन मदत करते पण आपण वेळींच सद्गुरुना ओळखून त्यांची पाउलें धरलीं नाहींत याचें वाईट वाटतें !

पुढें आणखी ४–५ वर्षें नोकरी केली आणि सद्गुरुंचे चिंतन भजन-पूजन सारखें चालू ठेविलें.

## माझ्या धाकट्या भावालाहि सद्गुरूंचा कृपाप्रसाद

माझा धाकटा भाऊ रहेमान याला तुरुंगावर पहारा करण्याचे काम देण्यात आलें. त्याचे दुसरेच दिवशीं बाळेकुंद्रीकडील उत्सवाचा पहिला दिवस होता. मी त्याला म्हटलें "मी ४ दिवसांची रजा काढून बाळेकुंद्रीच्या उत्सवास जात आहे. तुला मात्र सरकारी हुकमाप्रमाणें जेलवरील नोकरीवर उद्यांपासूनच हजर झालें पाहिजे. ती जबाबदारीची नोकरी आहे तींत चूक होतां नये. पुढील वर्षी या उत्सवास तूं रजा काढून जावेस" असें सांगून मी उत्सवासाठीं बाळेकुंद्रीला गेलों. परंतु नोकरीची पर्वा न करतां रहेमान दुसरे दिवशीं भेट बाळेकुंद्रीस येऊन माझ्या समोर हजर ! मी मग म्हटलें "आतां आलासच ! तेव्हां लगेच पंतांच्या अधिष्ठाना पुढें वंदन करून, पूज्य दादांना भेट आणि गुरुमहाराजांनाहि वंदन करून आणि त्यांचा पूर्ण आशीर्वाद घेऊन संध्याकाळचे डयूटीवर हजर होण्यासाठीं

तावडतोब सांगलीस जा" त्यावेळीं गुरुमहाराजांना भेटला असतां त्यांनीं त्याचें कौतुकच केलें आणि त्याला भस्म कुंकू लावून आणि प्रसाद देऊन पाठविलें. तो योग्य वेळीं आपल्या कामावर पोचला आणि कोणीहि वरिष्ठांनीं त्यांना बोल लाविला नाहीं! गुरुकृपा! 'बाळेकुंद्रीचे उत्सवांत आम्हाला विशेष हा दिसला कीं अनेक जातीचे व धर्मांचे लोक एकत्र जमून कोणताहि भेद-भाव न मानतां एकमेकांशीं भक्तिप्रेमाच्या सलोख्यानें वागून आनंदांत असतात! श्रीक्षेत्र भडगांव येथेंहि बाळेकुंद्रीप्रमाणे भक्तवर्गांत समता व बंधुभाव नांदत असल्याचा अनुभव आम्ही घेतला आहे.

## सर्वभूतीं एकच अल्ला!

परंतु आमच्या गांवांतील व आसपासचे कांहीं मुसलमान आमची ही हिंदुधर्मीयांशीं समानतेनें वागण्याची तऱ्हा पाहून आमचेवर बहिष्कार टाकणेच्या कारवाया करूं लागले! आमच्या कांहीं धर्मगुरूंच्या कानीं कागाळ्या पोचवून त्यांना सांगलीस घेऊन आले! आम्हाला 'असें कां वागतां?' म्हणून सवाल टाकण्यात आला. मग सद्गुरूंचें स्मरण करून मी त्या मुसलमान धर्मगुरूंना म्हणालों, "एकच अल्ला सर्वत्र भरला आहे हीच आमच्या अवलियारूपीं सद्गुरूंची शिकवण आहे. आमच्या धर्माची रीति व नीति शोधण्यास त्यांनीं आम्हांस सांगितलें नाहीं. त्यांची शिकवण श्रेष्ठ व पवित्र आहे. उलटपक्षीं आमच्या धर्मातील खरी नीतीच पाळण्याविषयीं त्यांनीं सांगितलें आहे कुराणांतील धर्माचें सारच आमचेंपेढें त्यांनीं ठेवलें आहे. 'सर्वभूतीं एकच अल्ला' या दृष्टीनें मुसलमान, हिंदु व इतर यांचेकडे पाहून तसें वागण्यानेंच सुखसमाधान लाभतें असें सांगणारें तत्वज्ञान सर्व जाति-पंथ व धर्म यांत भेद न मानणारें व सर्वांचेंच कल्याण साधणारे नाहीं काय? तें तसें आहे, अशी आमची खात्री अवलिया सद्गुरूनें पटवून दिली असल्यामुळें आम्ही बहिष्काराच्या फोल विडंबनाला भिणारे नाहीं! सर्व धर्मांना मान्य असें थोर तत्त्व आचार-विचारांत आणणें हेंच खऱ्या धार्मिक लोकांचें सर्वांच्या कल्याणाचे दृष्टीनें कर्तव्यच आहे."

## मुसलमान धर्मगुरूंहि अवधूत महाराजांशीं समरस झाले!

सदरीलप्रमाणें माझा खुलासा ऐकल्यावर त्या मुसलमान धर्मगुरूंनीं विनंति केली, "तुझ्या अवलिया सद्गुरूंची भेट आम्हांला करवून दे' मग त्या मुसलमानी धर्मगुरूंना बाळेकुंद्रीस नेऊन आमच्या सद्गुरूंना भेटविलें. तेथील समतेचें वातावरण पाहून त्या मुसलमानी धर्मगुरूंना आनंद झाला. श्री अवधूत महाराजांबरोबर सतत चार दिवस परमार्थाच्या गोष्टी बोलत

होते ! इतकेंच नव्हे तर चार दिवसांनीं त्या मुसलमान धर्मगुरूंनीं आमच्या अवलियाचा उपदेश घेतला ! नंतर ते कोल्हापुराकडे परत गेले. आमच्या अवलिया विरुद्ध म्हणजे सद्‌गुरूविरुद्ध बोलणें हा अल्लाचाच अपमान' असें या मुसलमान धर्मगुरूंनाहि अखेर पटलें ! थोड्याच दिवसांनीं मी सेवा-निवृत्त होऊन गांवीं आलों आणि भजन, पूजन व सद्‌गुरूबोध स्मरण यातच रंगून राहिलों आहे. श्रीक्षेत्र बाळेकुंद्रीत श्री. भाऊसाहेबांचे सेवेंत १॥ वर्ष राहून आलों. भडगांवीं महाराजांचें कार्य श्री. दत्तमहाराज तथा श्री. अण्णा उत्तम प्रकारें पुढें चालवीत असून त्यांच्याच प्रेरणेनें गुरुबंधु श्री. मेघःश्याम-बुवा आमचेकडे येऊन आम्हांला जाग्रत ठेवतात, याबद्दल दोघांचेहि आम्ही ऋणी आहों. त्यांच्याच प्रेरणेनें आठवणी यथामति सांगण्याचा आनंद लुटला !

## धाकट्या भावास उपदेश !

वडील बंधू सैफुद्दिन बोकारी मुल्ला यांचे प्रमाणेंच त्यांचा धाकटा भाऊ रहेमान यालाहि अवधूत महाराजाचा अनुग्रह घेण्याची संधि मिळाली तेव्हां महाराज त्यांना म्हणाले " हे पहा, हिंदू मुसलमान। आंतमां नाही दुजा जाण ॥ हे आमच्या अवधूत पंथाचे तत्वज्ञान असल्यामुळें अनेक जातीचे, पंथाचे आणि वर्णांचे लोक सर्व अभिमान टाकून या तत्त्वाचे भक्त झाले. या तत्व-ज्ञानाला आमच्या श्रुति-स्मृति पुराणांतहि आधार आहे. 'मी मुसलमान आहे' असें न सांगतां आला असतास तरीहि मला आनंद झाला असता आणि आतांहि होतो. बाबारे, तूं आणि मी एकच आहों. दोघांचेहि देहांत सारखीच पंचमहाभूतें आहेत. दोघांच्याहि डोळ्यांतील व हातापायादि इंद्रियांतील शक्ति एकरूपीच आहेत. दोघेहि एका आधारावरच उभे आहोंत. म्हणून यापुढें ब्राह्मण–मुसलमान अशा प्रकारचा भेदच मानूं नको." अशा प्रकारचा बोधपर खुलासा करून महाराज पुढें म्हणाले "तुला उपदेश पांच मिनिटांत देतां येईल. परंतु घेतलेला बोधोपदेश टिकविणें सोपें नाहीं. म्हणून अनुग्रह घेणेची गडबड करूं नकोस. कांहीं दिवस मंडळींत बसून पूजन, भजन, बोधचर्चा पहात व ऐकत रहा, म्हणजे अंतःकरण पूर्ण शुद्ध होईल, मग अधिकारी सत्पुरुष स्वतः तुझेकडे येऊन उपदेश देईल; यावेळीं हाच तुला माझा उपदेश झाला असें समज" महाराज मला असें सांगून कुरुंदवाडास गेले.

मग महाराजांच्या सांगण्याप्रमाणें मी (रहेमान बोकारी मुल्ला) भक्तमंडळीचे सहवासांत दोन वर्षें राहून भक्तिप्रेम बोधचर्चेचा अनुभव घेतला. महाराजांच्या प्रत्यक्ष भेटीची फिरून तीव्र तळमळ लागली ! भक्तमंडळींनींहि मला आपुलकीनें वागविलें त्याबद्दल मी सर्वांचाच ऋणी आहे.

१९३५ सालीं मी तानंग गांवच्या भक्तांबरोबर बाळेकुंद्रीस गेलों. कुरुंदवाड-करांचे धर्मशाळेंत महाराजांचें दर्शन व भेट घेतली व त्यांना डोळे भरून पाहिलें! महाराज त्यावेळीं विनोदानें म्हणाले "अरे ही ब्राह्मणांची यात्रा, तूं परजातीचा येथें येऊन ती भ्रष्ट कां करणार?" मी तानंग गांवीं विचारलेल्या पहिल्या संशयाचे प्रश्नाला हा विनोदी टोमणा होता हें मीं ओळखलें! मी म्हणालो :–"गुरुमहाराज या पामराला पावन करून आपल्या भक्तिप्रेमपंथांत घ्या. या पेक्षां जास्त मागणी नाहीं" असे म्हणून महाराजांचे घट्ट पाय धरले! हे माझे दुबळ्याचे बोल ऐकून त्याच ठिकाणीं मला अनुग्रह देऊन महाराजांनीं मला पंतभक्तीचें वेड लावलें! श्री. यशवंत पाटील याचें आश्वासन खरें ठरलें. त्यानंतर मला भक्तांतील परमार्थ चर्चेचें मर्म कळूं लागलें.

### रहेमानचें निवेदन

"घरची गरीबी व शेतीची मदत पुरी पडत नसल्यामुळें बाळेकुंद्रीस जाण्या-पूर्वीच सांगलीस पोलीस खात्यांत नोकरीचा अर्ज करून गेलो होतों. गुरुकृपेनें परत आल्याबरोबर मला नोकरी मिळाली. त्यावेळीं माझें वय १९ वर्षे असून प्रकृति उत्तम होती. पण नोकरीचा पगार फक्त १४ रु. दरमहा इतकाच होता. पण स्वस्ताई होती आणि वडीलबंधूहि सांगलीसच पोलीस खात्यांतच नोंकरी करीत असल्यामुळें दोघे एकत्र राहून सांसारिक गरजा भागवीत होतो."

### नात्यागोत्यांतील मंडळीचा आरोप व त्याचें निरसन!

जात्यंध विरोधक मुसलमान समाजानें बहिष्काराचें शस्त्र उगारल्यावर मुसलमान धर्मगुरूच आमच्या महाराजांशी कसे समरस झाले ही हकीगत वडील बंधूच्या आठवणींत आहेतच.

### मुलीच्या विवाहाची चिंता गुरुकृपेनें निवारण झाली!

माझ्या मुलीचा विवाह कसा होईल याची मला बरेच दिवस चिंता वाटत होती. पण गुरुमहाराजांच्याच प्रेरणेनें गुरुबंधु मेघःश्यामबुवा यांनीं बांव्रवडे येथील एक कुलशीलवंत आणि सधन मुसलमान घराण्यांतीलच तरुणाशीं माझ्या मुलीचें लग्न जमवून आणि ते व्यवस्थित पार पडेलसें करून माझी चिंता निवारण केली! त्या मुलीचें कल्याण झालें. आणि आम्ही दोघे बंधु सेवानिवृत्त झाल्यावर गावांत घरीं येऊन आनंदानें संसार परमार्थ दृष्टीनें करून आनंदांत आहों.

१९३९ साली गुरुमहाराज समाधिस्थ झाले आणि त्यांचे वडील सुपुत्र श्री. दत्तात्रय महाराज हे अवधूत संप्रदायाची सर्व जबाबदारी शिरावर घेऊन उत्कृष्ट मार्गदर्शक ठरले आहेत. श्री. दत्तमहाराज व गुरुबंधु मेघःश्याम यांचीहि आम्हा तानंगच्या भक्तावर कृपादृष्टि आहे.

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. ५४

(श्री. रामचंद्र बळवंत गडचे, मु. व पो. सांगली गजाजन मिल्स, वय वर्षें ६०)

तासगांव तालुक्यापैकीं बुर्ली गांवीं असतांच माझी आई देवाघरीं गेली आणि माझ्या १८ व्या वर्षी १९१८ साली वडीलहि गेले. माझे वडील मातुश्री दोघेहि भक्तिमार्गात होते. आमचें घराणें लिंगायत वाणी, शिवाची उपासना करणारें. पण वडीलांनीं वारकऱ्यांचा वैष्णव पंथ पत्करला होता. माझ्या गांवींच माझें जेमतेम मराठी चौथी पर्यंतचें शिक्षण झालें. घरची अत्यंत गरीबी असल्यामुळें शाळा सोडून शेतीच्या व इतर कामीं मदत करूं लागलों. घरांत वडील व त्याचे स्नेही पोथ्या पुराणें वाचन आणि भजन करीत तें ऐकण्याची गोडी माझे ठिकाणीं वाढत गेली. वारंवार पुराणांतील विचार ऐकून मलाहि तरुण वयांतच सद्गुरु भेटीची तळमळ लागून राहिली! १८ व्या वर्षी वडील गेल्यानंतर माझ्या एकट्यावरच उपजीविकेची सर्व जबाबदारी पडली! घरच्या शेतीचे आधारें कांही दिवस कसेबसे ढकलले पण फारच हलाखी झाल्यामुळें १९२२ सालीं मुंबईतील गिरणींत नोकरी धरून करीरोड वरील कुंभारचाळींत राहूं लागलों. मला संतसंगती व संतवाङ्मयाची आवड! त्या खोलींतील गप्पा चकाट्याच्या वातावरणामुळें मन अगदीं उदास होई! पण अंतरींच्या संतसंगतीच्या निश्चयाला सुफळ मिळण्याचा योग लवकरच आला! मी रहात असे त्याच चाळींतील आपल्या नात्यांतील कांहीं मंडळीना भेटण्यासाठीं सातारा जिल्ह्यांतील बांबवडे गांवचे मेघःशामबुवा पाटील येत आणि त्या मंडळीना गुरुमहाराजांच्या कांहीं बोधपर गोष्टी सांगत आणि कांहींना त्यांच्या गुरुमहाराजांच्या भेटी करवून महाराजांचा अनुग्रह देखील देववीत! मला हें समजतांच मी त्यांची ओळख करून घेतली. ते रविवारीं तेथें येत असता तेथें जाऊन त्यांची बोधचर्चा एका रविवारीं ऐकली तेव्हां आनंद झाला! घोडपदेव हाजी कासमचे चाळींत ४ दिवसांनीं मेघःशामबुवांना भेटलों आणि त्यांना गुरुमहाराज–श्री अवधूत महाराज यांचा मला अनुग्रह देववण्याची ठीक विनंति

केली. भडगांवाहून महाराज मुंबईस आल्याबरोबर मेघःशामबुवानी मला आणि कांही भक्तांना गुरुमहाराजांकडून अनुग्रह मिळण्याची व्यवस्था करून आम्हांला धन्य केलें! मुंबईस ५ वर्षें महाराजांच्या कीर्तनातून आणि बोधचर्चेंतून माझें अंतःकरण भक्तिप्रेमाच्या आनंदानें रंगून गेले!

## मुंबईहून सांगलीस

पण नंतर या आनंदावर विरजण घालणारी घटना घडून आली. मुंबईत माझी तब्येत ठीक राहेनाशी झाली. डॉक्टरांचे मनाप्रमाणें मुंबई सोडून मला सांगलीस जावें लागले! मला सांगलींवाले श्री. वेलणकर यांच्या 'श्री गजानन मिल्स' मध्ये काम करावें लागलें. अशा परिस्थितीत गुरुबंधु मेघःश्याम बांधवख्यास येत, त्यावेळीं मला मुद्दाम भेटून धीर देत. एकदां तर मला बाळेकुंद्रीस नेऊन आणि तेथील पंतांचें वैभव दाखवून त्यांनी धन्य केलें! गुरुमहाराजांनींहि मला 'पंतांचें वैभव' पहाण्याची शिफारस केली होती ते शब्द आठवूनहि धन्यता वाटली!

## माझ्या बायकोचा अत्यवस्थ आजारांतून बचाव!

वरील प्रकारच्या आनंदांत २ वर्षें काढल्यानंतर माझी बायको आजारी पडून तो आजार अत्यवस्थ स्थिति होण्याइतका वाढला! डॉक्टरी उपाय करून थकलों. रात्रंदिवस गुरुमहाराज यांनीं दिलेला तारक-मंत्र म्हणत गुरु-स्मरण सतत रात्रंदिवस चालू ठेविलें. गुरुमहाराजांनाहि ही परिस्थिति पत्रानें कळविली. महाराजांनी लगेच मेघःशामबुवांना विभूति देऊन पाठविलें. त्यांनीं माझे घरीं येऊन माझ्या बायकोला विभूति लावल्यावर थोड्याच दिवसांनीं तिला बरें वाटूं लागलें.

## गुरुराज वैद्य भेटला। संसाररोग समूळ हटला॥

या पंताच्या पदाप्रमाणें असा अनुभव आला! आतां मला दोन मुलगे व पहिली मुलगी असून सर्व परिवारासह मी परमार्थरूपी संसाराच्या आनंदांत आहे. गुरुमहाराजांची शिकवण आणि भक्तिप्रेमाचा बोध अगदीं निस्वार्थी व निस्पृह होता. सद्गुरु पंताविषयीं माझे गुरुमहाराज म्हणत "श्रीपंतासारख्या भक्तिप्रेमाचा जिव्हाळा इतर ठिकाणीं सांपडणें अशक्य! माझ्या श्रीपंतांचें वाङ्मय वाचून आणि त्यांच्या नामाचा गजर करून धन्य व्हावें." माझ्या गुरुमाउलीनें मला पंतांच्या भक्ति-प्रेमांत भरपूर खेळविलें असल्यामुळें त्या आनंदांतच मी रमतो! माझे गुरुमहाराज "जो व्यवहार व परमार्थ दोन्हीहि दक्षतेनें करतो तोच खरा पारमार्थिक" असें म्हणत. अनन्य भावानें शरण येणाऱ्या भक्ताला गुरुमहाराज निःस्वार्थबुद्धीनें जवळ

करीत. मुंबई, पुणें, ठाणें, वसई, सोलापूर, बडोदा, नागपूर, इत्यादि ठिकाणीं कीर्तनें व फेरी करून हजारों भाविकांना श्रीपंतांच्या भक्ति-प्रेमाची गोडी सद्गुरूंनीं लावली. अखेर पूर्व खानदेशांतील भडगांवी श्रीदत्तमठी स्थापन करून श्रीपंत सांप्रदायाचा अवधूत झेंडा फडकाविला ! तेथें नांदत असलेलें भक्तिप्रेमाचें शांतिप्रेम मी प्रत्यक्ष अनुभविलें आहे. सद्गुरूंनी कीर्तनाकरितां ठराविक बिदागी मागून कोणालाहि अडविलें नाहीं. भडगावांत होणाऱ्या सर्व भक्तांना समतेनें वागवून सर्वांच्या सुखसोयींकडे आस्थेने लक्ष पुरवीत. सद्गुरूंची श्रीपंतावर अत्यंत निष्ठा होती, तशीच श्रीपंतांची श्री अवधूत महाराजांवर पूर्ण कृपा होती. म्हणूनच सर्व प्रकारचे भक्त त्यांना धन्यवाद देऊन जात !

## निंदकांचा देखील गौरव !

बाळेकुंद्रीतील श्री पंतांच्या उत्सवास जाऊन तेथील आंबराईत श्री अवधूत महाराज कीर्तन करीत. पण कांहीं कुत्सित गुरुबंधु दूर उभे राहून त्यांची निंदा करतांना मी ऐकलें. "मोरू म्हणे उत्तम कीर्तन करतों, त्यानें सोंग घेऊन फक्त स्वतःचा स्वार्थ साधला यापेक्षां काय केलें ?" असें ते निंदक बडबडत ! पण तेथें श्रीपंताच्या भक्तिप्रेमरूपी अवधूत पंथाचे विश्वव्यापी महत्त्व सोप्या शब्दांनीं महाराज सांगत असतां भाविक श्रोते त्यामुळें वाटणाऱ्या आनंदानें डुलत त्यांना धन्यवाद देत होते ! पेटीची सांथ श्री. अण्णा व तबल्याची सांथ कोल्हापूरचे तबलापटु दशरथ गोंधळी करीत होते.

**सावध सावध होई । थारा दृढ करी सद्गुरु पायीं ॥** इत्यादि श्रीपंतांची ज्ञानभक्तिपर पदें गोड आवाजांत गाऊन महाराज त्यांचे सुबोध पद्धतीनें स्पष्टीकरण करीत असतां श्रीपंत घराण्यांतील श्री. गोविंददादा आदि करून भक्त मंडळीहि आनंदानें डुलत होतीं ! श्री दादाना तर फारच आनंद झाल्याचें मी पहात होतों. कीर्तन संपल्यावर कुरुंदवाडच्या धर्मशाळेंत श्री. गोविंददादा महाराजांबरोबर बोलत बोलत आले आणि महाराजांच्या कीर्तनांतील बोधाविषयीं म्हणाले "मोरबा, चार तास कीर्तन करून तूं थकला आहेस. तेव्हां जरा खाली बैस" महाराज कफनी वगैरे काढून खाली बसल्यावर त्यांच्या जवळच श्री गोविंददादा बसून म्हणाले, "अरे मोरू, अलीकडे तुझी स्मरणशक्ति जास्तच तीव्र झाली असून, बोध सांगण्याची हातोटी थेट श्रीपंतासारखी वाटते. श्रीपंतांच्या पदाचे विवरण करतांना तुझें अर्थानुसंधान अगदीं बरोबर

रहाते. कीर्तनांतील तुझी बोधपद्धति निरपेक्ष असून श्रोत्यांच्या अंतःकरणांना भक्तिप्रेमाची चालना देणारी असते. खरोखर श्रीपंतांनी तुझ्या मस्तकावर वरदहस्त ठेवून केलेल्या पूर्ण कृपेचेंच हें सुफल होय." इतकें बोलूनच न थांबता श्री. गोविंददादा सद्गदित होऊन पुढें म्हणाले, "श्रीपंतांची पदें म्हणून त्यांचें विवरण तूंच करावेंस! इतरांनीं उगीच ती उष्टावूं नयेत! तूंच खरा अवधूत आहेस म्हणूनच तुझें भक्तिप्रेम पाहून, तुझेबरोबर बोलावें म्हणून मी मुद्दाम तुझेबरोबर येथें आलों" श्री. दादा असें बोलून बाहेर गेल्यावर महाराज मला म्हणाले, "माझे कीर्तनाविषयी आणखी कोणी कांहीं बोललें असल्यास सांग पाहूं!" मी भीत भीत त्या निंदकांनीं केलेल्या निंदेचा तपशील सांगितला. तेव्हां गुरुमहाराज म्हणाले "हे पहा रामू, श्रीपंतांनी बुद्धि दिली असेल तसे तसे ते झाले तरी बोलणार, आणि मला दिलेल्या बुध्दी प्रमाणे मी बोलणार! कोणी निंदा करा, स्तुति करा, सद्गुरु भक्तानें तिकडे लक्ष न देतां आणि आपली मनस्थिति बिघडूं न देतां, या पवित्र ठिकाणीं निजशांति भोगण्यासाठीं आपण जमतो, हें ध्यानांत ठेवा." महाराजांना आपल्या कर्तबगारीचा अहंकार कधीही शिवला नाहीं! एकदां कीर्तन ऐकल्यावर मी महाराजांना म्हणालों, "आपलें कीर्तन खरोखर फारच उत्तम झालें!" त्यावरोबर महाराज बोलले, "अरे कीर्तनांत मी बोलत नसून श्रीपंतच मला बोलवीत असतात! काय म्या पामरें बोलावीं उत्तरें, अशी स्थिति असते." शिवाय—

सद्गुरू निजभक्त मनीं नित्य तो वसे। बोधानंदे तृप्त करी ब्रह्मरसें ॥

मी केवळ निमित्तमात्र आहे!" पुढें महाराज बोलले, "माझ्या सर्व कर्तव्यकर्माचा आधार माझा श्रीपंतच आहे!"

महाराजांना 'गुरुमहाराज' म्हटलेलें आवडत नसे. ते म्हणत, "गुरु म्हणजे एकच आणि तो माझा श्रीपंत, तुम्ही आम्ही सर्व त्याचेच भक्त! एकंदरींत माझ्या प्रेमळ अवधूतास ज्यांनीं ओळखलें ते धन्य!"

## सद्गुरूंचा स्वानंदवास!

मी १९३८-३९ चे दरम्यान एकदाच भडगांवला गेलों होतों. सांगलीस आल्यापासून प्रत्यक्ष गुरुसहवास फार लाभला नाहीं. बाकी वेळोवेळीं मेघःश्याम-बुवांचे भेटीनें अंतःकरणांत गुरुस्मरण आणि त्यांच्या भक्तिप्रेमाची जागृति मात्र सदैव राही. १९३९ सालीं गुरुमहाराज आम्हां भक्तांना पार्थिव देहाचे रूपांत अगदीं पोरके सोडून :एकाएकीं स्वानंदवासी झालेले ऐकून मनाला केवढा धक्का बसला त्याचें वर्णन शब्दांनीं करवत नाहीं!

मात्र सद्गुरूंच्या बोधामृताचे आधारें मी, माझी सौभाग्यवती आणि दोन मुलें यांची जबाबदारी माझ्या ६० व्या वर्षांत पार पाडीत आहे.

## गुरुस्थानी आतां श्री. अण्णा तथा श्री. दत्त महाराज

गुरुमहाराजांच्या पश्चात् यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री अण्णा यांना गुरुस्थानीं मानून मी कालक्रमणा करीत आहे. श्री. अण्णानीं महाराजांच्या सर्व भक्तांना महाराजां-सारख्या भक्तिप्रेमानें राबवून भडगांवीं श्रीदत्तमठीचें कार्य सुरेख चालविलें आहे.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ५५

(लेखक : श्री. त्र्यंबक शिवराम मराठे, जोशी पेठ, जळगांव)

१९३० सालीं मी मराठी ४ थ्या इयत्तेंत शिकत असतां श्रीअवधूत महाराज भावसार क्षत्रिय समाजाचे जागेंत उतरले होते. त्यावेळीं माझे आतेभाऊ भिकाबुवा व भाऊ श्री. गिरिधर राघो मराठे, या दोघांनी महाराजांचा अनुग्रह घेतला. महाराजांचे दर्शनासाठी मी या दोघांबरोबर जात असे. महाराजांची ती भव्य उदात्त मूर्ति पाहून त्यांचेविषयीं माझ्या मनांत आदर निर्माण झाला. मी महाराजांना नमस्कार करून भक्तमंडळींत बसलों. कांही लोक अनुग्रह घेण्याचें साहित्य बरोबर आणून त्यांनीं महाराजांचा अनुग्रह घेतला. तें पाहून महाराजांचा उपदेश घेण्याची इच्छा झाली. परंतु अनुग्रहाचें साहित्यासाठीं १॥ ते १॥। रुपये खर्च करण्याइतकी आपल्या घरची परिस्थिति नाहीं, असे लक्षांत येऊन स्वस्थ बसलों! माझी इच्छा कोणासहि बोलून दाखविली नाही. रात्रीं महाराजांच्या कीर्तनासहि हजर राहिलों. त्यांनी नाथ मच्छींद्रांचें आख्यात लावले होते. शंकर पार्वतीला नदी तीरावर उपदेश करीत असतां, तो उपदेश मच्छीच्या गर्भातील महाविष्णूनीं ऐकला व पुढें मच्छींद्र कसे अवतरले या विषयींचें रसाळ निरुपण महाराजांनीं कीर्तनांत केलें. त्याचा माझे मनावर फारच परिणाम होऊन 'हा आपल्याला उपदेशच मिळाला' असें वाटलें! पुढें महाराजांचे स्वानंदवासानंतर त्यांचे सुपुत्र श्री. दत्तमहाराज यांचेकडून मला सांप्रदायाचा अनुग्रह मिळाला. मला त्याकरिता कांहीं द्यावें लागलें नाहीं. महाराजांचे कीर्तन ऐकल्यानंतर मी नियमितपणें अवधूत समाज खोली नं. १ या ठिकाणीं जाऊं लागलों.

## मला भजनाचा व आध्यात्मिक चर्चा ऐकण्याचा छंद

श्री अवधूत समाजांत एकतारी व खंजिरीच्या सांथीनें भजन चाले, त्याची मला गोडी लागल्यामुळें रोज तेथें हजर राही. अवधूत मठींत होणाऱ्या उत्सवासाठी कागदाचीं फुलें व द्राक्षें वगैरे बनवून नेत. असे तें काम १० दिवस खोलीवर चाले त्यांतहि मी हौसेनें भाग घेई. श्री अवधूत महाराज गावात कीर्तनासाठी मधून मधून

येत त्यावेळी त्यांच्या दर्शनास जाऊन कीर्तनाचें जागीं हजर रहात असें. त्यामुळें भक्तिमार्गाची मला अधिकच गोडी लागली. विकट आर्थिक परिस्थितीमुळें भडगांवी उत्सवास मात्र बरेच दिवस जाऊं शकलों नाही. कीर्तनांतील बोधाची पकड मात्र माझे मनावर चांगलीच होती. भजनाचा व आत्मज्ञान चर्चेचा छंदच मला लागला ! अवधूत समाजांत वावरणारे भक्त विशेष शिकलेले नसूनहि भक्तिप्रेमानें भजनी पदे म्हणून त्यावर सुबोध मार्मिक चर्चा करण्याचा अधिकार त्यांना गुरुकृपेमुळे प्राप्त झाला असला पाहिजे.

झाले मी बाई वेडी । दरबार गुरुचा झाडी ॥
आम्ही सद्गुरुचे किंकर । नव्हे यमाचे चाकर ॥

इत्यादि पदांचे विवरण करून हे भक्त सुरेख अध्यात्म चर्चा करीत. शिवाय या भक्तांनीं पंतमहाराजांचे चरित्र–वाङ्मयहि अभ्यासिलें होते. हे लोक या पारमार्थिक वाङ्मयाचे चर्चेत आणि भजनांत अगदीं गुंग होऊन जात. ही खरोखर आश्चर्यकारक वस्तुस्थिति होती ! कारण आत्मप्रचीति, शास्त्रप्रचीति, सद्गुरुप्रचीति आणि त्रिपुटीची सांगड घालण्याविषयींची पारमार्थिक चर्चा; केवळ महाराजांचा बोध ऐकूनच सुबोध रंगविण्याइतकी तयारी या अनुग्रहीत मंडळीची, अशिक्षित असूनहि झाली होती ! श्री ज्ञानेश्वरांनीं रेड्याचे मुखांतून वेद वदविला आणि अवधूत महाराजांनीं 'अशिक्षित' समजल्या जाणाऱ्या आपल्या भक्तांना इतके अधिकारी केलें होतें !

## पूर्व खानदेशांतील लोकांचें परमभाग्य

आपल्या सांप्रदायामार्फत श्री अवधूत महाराजांनीं ७०० मैलांवर पंत-महाराजांच्या शिकवणीचा प्रचार केला आणि जडमूढ भक्तजनांना अखंड ज्ञानामृत पाजून जागृत परमार्थांत हुषार केलें ! खरोखर खानदेशांतील लोकांचे परमभाग्य म्हणून कुरुंदवाडचे रहिवासी असूनहि पंतमहाराजांचा अनुग्रह घेऊन पूर्ण कृपा संपादन केल्यानंतर श्री अवधूत महाराज खानदेशांत फिरतीवर आले आणि गिरणानदीकाठीं भडगांवीं त्यांनी श्रीदत्त अवधूत मठीचें क्षेत्र निर्माण केलें. त्यांच्या या क्षेत्रस्थानामुळें खानदेशचे हजारों श्रमजीवी लोक पारमार्थिक जागृतीनें पावन झाले ! प्रेमलहरींतील पदांचे रहस्य श्री अवधूत महाराजांकडून समजून घेतलेले भक्तिप्रेमांत धुंद होतात.

श्री अवधूत महाराजांची कीर्तनांतून परमार्थ विषय सुबोध करण्याची हातोटी अत्यंत आकर्षक आणि भक्ति रसपूर्ण असल्यामुळेंच हजारो लोक महाराजांच्या

परमार्थ कार्यांत रमूं लागले आणि भडगांव, जळगांव, कडगांव, नांदेड, पहान तरसोद वगैरे खानदेशच्या अनेक ठिकाणी कर्तबगार भक्त मंडळी तयार झालेली दिसतात. संसारच परमार्थरूपानें करण्याच्या महाराजांच्या शिकवणींत हे भक्त तरबेज झाले आहेत !

## भडगांवांतील अनेक उत्सव

श्रीक्षेत्र भडगांवांत श्रीपंतजन्म, श्रीदत्तजयंती, श्री अवधूत महाराजांची जन्मतिथी व पुण्यतिथी इत्यादि उत्सवासाठीं मुंबई, पुणे, इत्यादि दूरच्या ठिकाणचे आणि खानदेशांतील शेंकडो भक्त जमतात आणि आनंदाने उत्सवांत भाग घेऊन अनेक प्रकारांनीं श्रीदत्त सेवा करतात. संत सर्वश्री ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास प्रभृति संतांनी सत्यधर्म व ईश्वर निष्ठेचा मार्ग यांनीं अखिल महाराष्ट्रातील बहुजन समाजाला जागृत केले, त्याचप्रमाणे श्री अवधूत महाराजांनी सर्वसाधारण श्रमजिवि वर्गांतील असंख्य लोकांना आपल्या अवधूत सांप्रदाय-प्रचाराने जागृत राखले ! ही जागृति आतां त्यांचे सुपुत्र श्री दत्त महाराज यांनीं वाढीस लावली असून त्याचा ऐहिक-पारमार्थिक फायदा हजारों श्रवजीवींना मिळत आहे. खानदेशांतील बहुजन समाजाची अवधूत सांप्रदायाविषयींची आणि पंतमहाराजांच्या वाङ्मयभक्तीची आवड पाहून श्री अवधूत महाराजांनीं खानदेशांतील कांहीं प्रमुख भक्तांना बरोबर घेऊन बेळगांव, बाळेकुंद्री, देसनूर वगैरे कर्नाटक महाराष्ट्राच्या भागांची यात्रा त्यांचेकडून करविली. १९४७ सालीं जळगांवची आम्ही १५–१६ भक्तमंडळीहि बाळेकुंद्रीतील पंतमहाराजांच्या उत्सवास गेलों होतों. एकदां पंतमहाराजांचे पुतणे भाऊसाहेब भडगांवी आले असतां त्यांनीं जळगांवीहि आम्हा भक्तांना भेट देऊन उतराई केलें !

भक्तांची जननी कली माजि आली । त्रिकांड महती जनां दावियेली ॥
जड मूढ भक्ता दिला प्रेमपान्हा । म्हणे मोरयाहो, नमस्कार त्याला ॥

अशा स्वतः रचलेल्या प्रेमळ पदातील उल्लेखाप्रमाणें स्वानंदवासी परम पूज्य अवधूत महाराजांनी भक्तिप्रेमाचा प्याला दीनदुबळ्यांना देऊन हजारोंचा उद्धार केला ! प्रपंच–परमार्थ यांची सांगड घालण्याची गुरुकिल्ली आपल्या भक्तांचे हातीं दिली, यामुळें अवधूत नामाचा गजर हजारों भक्त करीत आहेत. ठिकठिकाणीं श्रीपंत–दत्त मंदिराचीं अधिष्ठानें निर्माण होऊन भक्तिप्रेमाचा आनंद शेंकडों

श्रमिक भक्त लुटत आहेत ! मला तर वाटते, पंताच्या अवधूत सांप्रदायाचा बोधरूपी नंदादीप अवधूत महाराजांनीं अखंड ठेवण्याची कामगिरी उत्कृष्ट रीतीनें वजाविली आहे !

निंदा करो जन । स्तुती करो माझी ॥ या उक्तीप्रमाणें वागून श्री अवधूत महाराजांनी परिणामांची व परिस्थितीची पर्वा न करतां जीवनाचे अखेरपर्यंत आपले परमार्थ बोधप्रचाराचें कार्य चालू ठेविले होतें.

## विघ्न संतोषींचे उपद्व्याप

पण कांही विघ्नसंतोषी खलांना, खानदेशांतील महाराजांच्या अवधूत बाण्याचा प्रचार व महाराजांची प्रतिष्ठा, यांविषयीं मत्सर वाटूं लागल्यामुळें कांहीं लोकांनीं बाळेकुंद्रीस राहून व सेवेचे सोंग करून श्री अवधूत महाराजाच्या कार्याची निंदा–नालस्ती करण्याचे उपद्व्याप केले ! पण श्री अवधूत महाराजांच्या निष्ठावंत कार्यांमुळें असले उपद्व्याप व्यर्थ गेल्याचा अनुभव या मत्सरी व 'ढोंगी सत्पुरुषांनाच' आला ! परंतु अवधूत महाराजांच्या पश्चातही त्यांचे सुपुत्र श्रीदत्तमहाराज यांच्याशीं सहकार्य करून अनेक भक्तांनीं अवधूत सांप्रदायाचा आनंद स्वतः भोगून इतरांनाही त्याचा वाटा देण्याचें कार्य चालविलें असल्यामुळें, या सांप्रदायाची दिवसें दिवस भरभराटच होत आहे.

यारे, यारे, लहान थोर । याती भलती नारीवर ॥ या श्री तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणेंच श्री अवधूत महाराजांची पारमार्थिक शिकवण आणि आचार–विचार पद्धति होती. त्यांनी स्पृश्यास्पृश्यतेचें बंड मोडून प्रत्यक्ष हरिजनांनाही अनुग्रह देऊन भक्तिप्रेमांत पावन केलें. त्यांचें प्रचारकार्यांत उचनीच, गरीब श्रीमंत हा सामाजिक भेद नसून, रूढीचे भेद न राखतां सर्वांशीं समानतेने वागत. आपल्या भक्तजनांतहि ही समदृष्टी त्यांनीं निर्माण केली आणि समदृष्टीच्या बंधुप्रेमाचा लाभ सर्वांना सरांस दिला. यामुळे समाजांतील खालच्या थरापर्यंत त्यांच्या अवधूत सांप्रदायाचा प्रभावी प्रचार झाला.

## सुपुत्र श्रीदत्तमहाराजांनीं पुढें चालविलेला अवधूत मार्ग

१९३९ साली अवधूत महाराजांनी स्वानंदवास पत्करल्यानंतर त्यांचे सुपुत्र प्रेमभक्तिस्वरूप श्रीदत्तमहाराज यांनीहि त्याच बाण्यानें या अवधूत सांप्रदायाचें भक्तिप्रेमाचे ज्ञानामृत पाजण्याचे कार्य पुढे जोमाने चालू ठेविले आहे. असंख्य

भक्तांना मुक्त होण्याची, म्हणजे संसार परमार्थ रूपानें करण्याची अमोलिक शिकवण यामुळें मिळत आहे. श्रीदत्त महाराजांचे प्रेमभक्ति स्वरूप छत्राखालीं हजारों भक्त मंडळी प्रेमामृत प्राशनाने तृप्त होत आहेत.

गुरु भेटला मजला । आनंद पोटांत माझ्या माईना ।

अशा भक्तिप्रेमानंदांत भक्तांचे दिवस जात आहेत. सद्‌गुरुभक्तिप्रेमाचें वेड लावणाऱ्या सत्पुरुषांचे मी कितीसें वर्णन करणार ! त्यांच्याच प्रसादानें चार आठवणीचे शब्द लिहिण्याचा प्रयत्न मी केला; अन्यथा मी इतकेंहि लिहूं शकलों नसतो. श्रींच्या कृपेनें माझा जीवन व्यवहार, संसार परमार्थ रूपानें करण्याचे प्रयत्नांत, आनंदानें चालू आहे.

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ५६

(लेखक : श्री. तुकाराम रंगो काळे, जळगांव)

## वडील मातुश्रीकडून देवभक्तीचे वळण

आईवडिलांच्या पुण्याईनें, आईच्या वडिलांनी मला आधार देऊन माझ्या संगोपनाची जबाबदारी स्वतः घेतली. मी पूर्ण वयांत येईपर्यंत या आजोबांनींच मला लहानाचा मोठा केलें. लहानपणींच माझें लग्न एका सुशील घराण्यांतील 'गोदावरी' या मुलीशीं झाले होते. तिच्यापासून मला तीन मुलगे व एक मुलगी अशी चार अपत्यें झाली. वडील मातुश्रींनीं लहानपणा पासून लावलेल्या वळणामुळें माझा परमार्थाकडे ओढा होता. विशेषतः मारुतीची ध्यान–पूजनादि उपासना मला फार आवडे, त्याशिवाय मनास समाधान वाटत नसे! एका रात्रीं स्वप्नांत मारुतीराय येऊन त्यांनीं आशीर्वाद दिला कीं 'तुला संतभेट होईल!' या दृष्टांताप्रमाणें १९३५ सालीं भडगवांला कांहीं भक्तांबरोबर उत्सवासाठीं गेलों असतां श्रावण महिन्यांतील गुरुवारी अष्टमीचे रात्रीं श्री. अवधूत महाराजांनीं 'तूं माझा आहेस असा आशिर्वाद आणि अनुग्रह दिला. त्या दिवसांपासून 'सद्गुरुच आपलें सर्व कांहीं" ही भावना अंतःकरणांत दृढ होत गेली!

## अनुग्रहानंतर बाळेकुंद्रीच्या यात्रेचा योग

१९३६ सालीं श्री अवधूत महाराज मी व ८–१० गुरुबंधु यांचेसह बाळेकुंद्रीस पंत महाराजांच्या उत्सवासाठीं गेलों. सद्गुरूंच्या त्या सहवासांत आणि बाळेकुंद्री येथील परमार्थाच्या चर्चेंत, मंत्र, विभूति आणि मुद्रा हा विषय विशेष दृष्टातांनी अंतःकरणांत पूर्ण ठसला. माझ्या मनांतील हेतु जाणून प्रत्येक चर्चेचे प्रसंगीं गुरुमहाराज याच विषयावर सोप्या शब्दांनीं खुलासेवार बोध सांगत त्यामुळें मनांतील सर्व शंका–कुशंकांचें अनायासेंच निरसन झालें! श्रीपंत अधिष्ठानांत सर्व प्रेमळ भक्त होते. श्री. अवधूत महाराजांना सर्वांनीं प्रेमालिंगन दिलें. त्यावेळीं श्रीपंतमहाराजांच्या बंधूचे तोंडून श्री अवधुत महाराजांचा गौरव ऐकला तो असा :—

"अवधूत मार्ग प्रकट करून परिणामकारक प्रचार करावा तर श्री. मोरबांनीं" पंतांचे सहवासांतील अनेक थोर भक्त त्यावेळीं सद्गुरु अवधूत महाराजांना प्रेमानें भेटले. बाळेकुंद्रीचा उत्सव आटोपल्यावर आम्ही मोटारीनें बेळगांव नजीक वडगांवहून कुरुंदवाडचे श्रीमंत संस्थानिक आम्ही उतरलों त्याजागीं आपल्या सौ. राणीसाहेबांसह आले. तेव्हां आम्ही उठून बाहेर जाऊं लागलों. पण महाजांनीं जाऊं दिलें नाहीं. 'श्रीमंत गरीब हा भेदाभेद' संतांजवळ नसतो, हें महाराजांनीं स्वतःच्या या वागण्यानेंच आम्हां भक्तांना पटवून दिलें! या श्रीमंत संस्थानिकांनीं आपल्या लवाजम्यांसह गुरुमहाराजांना भेट दिलेली पाहून आमच्या अंतःकरणांत गुरुमहाराजांविषयींचा आदर जास्तच दृढ झाला. वडील मातुश्री व आप्तेष्ट यांच्यापेक्षां सद्गुरूंचे प्रेम ही विशेष आदरणीय महत्त्वाची गोष्ट आहे असें वाटूं लागलें! या निष्काम प्रेमाचें वारें अंगात शिरलें तें कायमच! भडगांवच्या व बाळेकुंद्रीच्या उत्सवांत 'ॐ शिवाय नमः' या तारक मंत्राचा गजर कानांतून हृदयांत शिरून देहभान रहात नसे. हृदयस्थ सद्गुरु मला वारंवार धीर देत. "तुझें अज्ञान धुवून टाकलें, कोणी कांहीं म्हटलें तर डगमगून जाऊं नको!" माझे गुरुबंधु बांबवडे येथील मेघःश्यामबुवा हेहि मला पंत-अधिष्ठान व सद्गुरु अवधूत महाराज यांच्या थोरवीविषयीं तपशील सांगून धीर देत. महाराजांची व पंतमहाराजांचे बंधु गोविंददादा व गोपाळदादा प्रभृतींची, भेट झाली त्यावेळीं "मोरबा खरे अधिकारी पुरुष, पंतांच्या अवधूतमार्गाचा बहुजनसमाजांत मोठ्या कर्तबगारीनें झेंडा सर्वत्र फडकविला मोरबांनींच" असा गुरुमहाराजांचा गौरव आम्ही प्रत्यक्ष ऐकला! अन्य देशांतील भौतिक ज्ञानांत पुढारलेल्या प्रवृत्तिमार्गी लोकांना वेळोवेळीं सावधगिरीचा इषारा देऊन परमार्थाची जागृति देण्याचा अधिकार आपल्या भारताच्या वांट्यास आला असून महाराजांसारखे संत महात्मे हेंच कार्य करीत आले आहेत.

## बाळेकुंद्री व दड्डी

आम्ही या बाळेकुंद्रीच्या यात्रेंत पंतांची जन्मभूमी दड्डी पाहिली तेथें तळघराचे आकाराप्रमाणें पंतांची घुमटी असून नंदादीप सतत तेवत प्रकाश पुरवीत आहे. '**प्रेमचि गुरूंचे सार**' या पंतांच्या पदाचें विवरण ऐकत घुमटीच्या पायऱ्या चढूं लागलों तेव्हां सद्गुरूनीं एकदम उद्गार काढले '**तें शुद्ध प्रेम तूंच आहेस!**' तें मोठ्यानें उच्चारलेलें वाक्य माझ्या कानीं आदळतांच माझ्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला व मी तेथेंच स्थिर झालों! मी बरोबरच्या

गुरुबंधूंना म्हणालों, "महाराजांचें हें वाक्य मला समजावून सांगा!" पण सर्व गुरुबंधूंनीं उत्तर दिलें, 'महाराज काय बोलले हे आम्हांलाच ऐकूं आलें नाहीं.' मी आश्चर्यचकितच झालों! केवळ माझ्याकरितांच गुरुमहाराज हें वाक्य पदाचा खुलासा म्हणून बोललें असेंच समजलों! मला काय वाटलें हें शब्दांनीं सांगतां येत नाहीं! घुमटीच्या बाहेर पडल्यावर पंतांच्या मागे घराण्यांतील मंडळीनीं आम्हाला अल्पोपहार दिला. नंतर आम्ही घटप्रभानदीकडे पारसवाडला गेलों. पंतमहाराज या ठिकाणीं बालपणीं देखील सवगड्याशी पारमार्थिक खेळ खेळत ती जागा पाहिली. आसपास उंच डोंगर व दाट जंगल यामुळें सृष्टिदेवीचें तें क्रीडास्थानच वाटलें!

पुढें माहुरगडचे गुरुबंधु श्री. यशवंत मराठे यांचा पाहुणचार एक दिवस घेऊन गुरुबंधु मेघःशाम यांच्या बांबवडे गांवी झुणकाभाकरीने तृप्त झालों.

## दिसनूर येथील पंतांच्या गुरुबहिणीचें दर्शन

नंतर दिसनूरला पंताच्या ९० वर्षें वयाच्या तंगव्वा या गुरुबहिणीचे दर्शन घेतलें. त्यांच्याकडे खडावा, एकतारी व काठी या बालमुकुंदाच्या वापरांतील पुण्यवस्तूंचे दर्शन घडलें. त्या वृद्ध तपस्विनीनें पंत महाराज व बालमुकुंद उर्फ बाळप्पा ज्या भुयारांत तपश्चर्येला बसत तें भुयार आम्हांला दाखविलें. 'पंतांची गाढ गुरुभक्ति, शुद्ध भक्ति-प्रेम, दिव्य आत्मज्ञान, कडकडीत वैराग्य वगैरेचें वर्णन या वृद्ध तपस्विनीचे तोंडून आम्ही ऐकलें. शेवटीं आम्हाला प्रेमाचे पोहे उपहारास देऊन तिनें तृप्त केलें! याप्रसंगीं सद्गुरु मोरेश्वर महाराजांच्या तोंडून पद्यरूपानें परमार्थाच्या लकेरी उठत त्यामुळें आम्ही सर्वभक्त परमार्थ चिंतनांत रंगून निघालों!

## गुरु महाराजांचें जन्मस्थन कुरुंदवाड येथील गोड अनुभव

नंतर गुरुमहाराजांचें जन्मस्थान कुरुंदवाड येथे आम्ही गेलों. महाराजांनीं तेथें आम्हा भक्तांचें उत्कृष्ट आदरातिथ्य केलें. त्या गांवाचा पूर्वेतिहासहि सांगितला. आत्मनिष्ठा, निश्चय प्रेमभक्ति, ऐक्यभक्ति वगैरेतील गोडी इत्यादि विषयांवरील सुबोध चर्चाहि गुरुमुखांतून त्यावेळीं ऐकण्याचा मोठाच लाभ झाला. ते सामान्य पुरुष नसून कांहीं विशिष्ट कार्यासाठीच त्यांचा अवतार असल्याविषयीं त्यांच्या सहवासामुळें आम्हां भक्तांची खात्री झाली! सद्गुरुंनीं नंतर आम्हाला कृष्णा नदीवरील कुरुंदवाडचा सुंदर घाट दाखविला. बनारसच्या राजाचे

घाटासारखा तो घाट असून तेथील निसर्गसौंदर्य रम्य आहे. त्या घाटावर स्फटिकाचा गणपति आहे. गांवांतील विष्णुलक्ष्मीचें मंदिर व सुंदर मूर्तीहि पाहण्यासारख्या आहेत. पंतांच्या साक्षात्कामुळें सद्गुरु मोरेश्वर महाराजांनी अत्यंत प्रासादिक अशी पद्यरचना केली. प्रपंच परमार्थरूप कसा करावा याचें मर्म आपल्या पद्य ग्रंथांत महाराजांनीं सांगितलें आहे. अवधूत मार्गाचा प्रभावी पुरस्कारहि त्यांत आहे. गुरुभक्तीच्या राजमार्गाचें सुंदर स्पष्टीकरण आहे. या पद्य ग्रंथांचें स्पष्टीकरण या प्रवासांत आम्हांला सद्गुरु–मुखांतूनच ऐकण्याचें भाग्य लाभलें !

## प्रवास संपवून घरीं परतण्याचा निरोप

सद्गुरूंच्या गोड निरोपानंतर आम्ही जळगांवास घरीं परतलों. भडगांवास वारंवार गुरुबंधु श्री. श्रकांत चौधरी यांचेबरोबर जाऊन आम्ही महाराजांचा ज्ञानबोध ऐकण्याचा क्रम चालू ठेविला. ज्ञानचर्चा व्यापक रूपानें पुष्कळच ऐकावयास मिळाली. एकदां 'परमार्थाचे टक्के' याचा खुलासा मी विचारला तेव्हां महाराजांनी सोप्या शब्दांनीं त्याचें विवरण केलें. दृश्य जगं व शरीर हे सत्य मानण्याची भ्रांति सामान्य भक्तांनीं नामस्मरणाचें साधन करून कशी क्रमाक्रमानें सुटते हें वर्म महाराजांनीं एकदां स्पष्टीकरण केल्यावर भक्तांच्या हृदयांत ते विवेचन ठाम बसे. त्या शंका निवारण करणारा बोध सांगण्यांत महाराज समरस होऊन रंगून जात! संसारांत नेहमीं वागणे गृहजस्थितींत राहून व्हावें. देहापासून सहा तास अलग होण्याचा योग प्रयत्नांनी साध्य होतो, असें स्वानुभवानें महाराज सांगत! साधक भक्तांना अंतःकरणपूर्वक केलेल्या नामस्मरणानें देखील योग साध्य होतो, असेंहि महाराज म्हणत, महाराजांना अखंड गुरुस्मरण सहजसाध्य झाले होतें. तें म्हणत 'माझ्या पंताचेंच सर्व कांहीं आहे! शिष्य भक्तांना ते ग्वाही देत "अरे पाठिराखा सद्गुरु केला कीं तुमचे कांहींहि वांकडे होणार नाहीं!" त्यांचा आम्हां भक्तांना नेहमीं शुभाशीर्वाद मिळे.

## सद्गुरू साक्षात्कार झाल्यावर भीक मागण्याची काय जरूर?

एकदां मठींत अध्यात्मचर्चा चालू असतां एक भिक्षुक ब्राह्मण आला आणि महाराजांना म्हणाला, "परमालयाचे गोविंदमहाराज यांचा साक्षात्कार होऊन त्यांनीं मला आज्ञा केली तूं एक मंदिर बांध; तेव्हां मंदिराला मदत मागण्यासाठीं मी आलों आहे." गुरुमहाराज हंसून म्हणाले "सद्गुरूंचा साक्षात्कार झाला त्याला

भीक मागण्याची काय जरूर ? माझ्या पंताचा साक्षात्कार मला झाला आणि ही श्रीदत्तमठी निर्माण झाली. मला भीक मागावी लागली नाहीं. सद्‌गुरू मला भीक मागूंच देत नाहींत "! हे ऐकून तो ब्राह्मण खट्टू होऊन जाऊं लागला! तेव्हां महाराजांनी त्याला परत बोलावून ५ रु. ची देणगी दिली. महाराज परमार्थ बोलले तरी व्यवहार ठीक सांभाळीत असत. याचकाला कोरडा परत पाठविणें हें त्यांचें ब्रीद नव्हतें! मात्र ' स्वतः सत्पुरुष व्हा! ' असेंहि त्यांनी त्या ब्राह्मणाना गोड शब्दांनी सुचविलें. आपल्या सद्‌गुरूंचे चरण हेंच महाराज विश्रांतिस्थान मानीत!

## महाराजांचा ६० वर्षांचा जुबिली–उत्सव

श्री अवधूत महाराज यांनीं ६० च्या वर्षांत प्रवेश केल्याचा जुबिली उत्सव मोठ्या थाटानें झाला. बरीच दूरदूरची मंडळी येऊन भजन, पूजन अखंड नामस्मरणाचे कार्यक्रम झाले. त्यावेळीं महाराजांच्या स्नानाचे पाण्यांत अत्तरें आणि अनेक सुगंधी पदार्थ कांहींनीं आणून टाकले. महाराजांना तें पसंत न पडल्यामुळें ते या भक्तांना म्हणाले, "देहाचा इतका बडिवार कसला करतां ? तुमच्या हृदयांतच गुरुचरण आहेत त्याची सुगंधयुक्त पूजा–अर्चा करा तर तुमचें कल्याण होईल. शरीर कांहीं काळानें मातींतच मिसळणार."

## जळगांवास ३ दिवस कीर्तनाचा कार्यक्रम

१९३७ सालीं आम्ही गुरुभक्तांनी एकत्र जमून महाराजांचा कीर्तनाचा कार्यक्रम ठरविला आणि तशी विनंति महाराजांनीं मान्य केली. रात्रीं कीर्तन आणि दिवसा महाराज उतरलेल्या जागीं आध्यात्मिक चर्चा चाले. यावेळी भीत भीत मी महाराजांना माझ्या घरी भोजनाचें निमंत्रण दिलें. जेवणानंतर थोडी विश्रांति घेऊन महाराजांनीं पारमार्थिक चर्चा सुरूं केली. त्यावेळीं महाराज मला म्हणाले, "तुझ्या घरांत आतां अवधूत भूत घुसलें तें आतां कदापि निघणारच नाहीं" मला त्याचा नीट अर्थ समजला नाहीं! माझे एक गुरुबंधु श्री. हरीभाऊ सोनार हे ' हटयोग केल्याशिवाय मुक्ति नाही ' असें सांगत. दुसरे कांहीं गुरुबंधु ' कांहीं तरी तप केल्याशिवाय मुक्ति नाहीं ' असें म्हणत! बरेच लोक बोलतांना आत्मज्ञानाची खूप पोपटपंची करीत; परंतु संसार व्यवहाराची रडकथा त्यांच्या मागची सुटलेली नाहीं असा चक्क अनुभव येई! "भाषा शास्त्रीपंडिताची आणि

बागणूक मात्र महारांची " असाच प्रकार पारमार्थिक चर्चा करणाऱ्यांपैकीं पुष्कळांचा असे ! तरीपण महाराजांचा बोध अंतरीं ठसल्यामुळें वरील प्रकारचीं चर्चा करणाऱ्यांच्या पोकळ बडबडीमुळें मीं गडबडून जात नसे !

## श्रीक्षेत्र गाणगापुरांतील गुरुचरित्र पारायण

एकदां १०–१२ गुरुभक्तांना घेऊन श्रीक्षेत्र गाणगापूर येथें गुरुचरित्राचें पारायण करावयाचें महाराजांनीं ठरविलें. हें १९३६ सालीं घडलें. बरोबरच्या सामानासह गाणगापूर स्टेशनवर उतरलों. गांव ८ मैलावर असल्यामुळें बैलगाडीनें निघालों. बैलगाडींत सामानासह फक्त महाराज व स्त्रियांनीं बसावें, असें ठरवून बाकीचे चालत निघालों.

तुजविणें न देखों आतां । सृष्टीमाजीं अवघा भरला ॥ सद्गुरुदाता ॥

अशी सर्वांच्या मनातील तंद्री होती ! गाणगापूर गांव आल्यावर सद्गुरू म्हणाले, "नरसिंह सरस्वतीचे मठांत जाऊन त्यांच्या पादुकांचें दर्शन अगोदर घेऊं." तेथील पुजारी प्रत्येकाकडून दर्शनासाठी दहा रु. ची दक्षणा मागे ! पण महाराजांनीं त्याला 'बोध सोटा' दाखविल्यावर मात्र त्यानें प्रत्येकाला निमूटपणें पादुकांचें दर्शन घेऊं दिलें !

## शिष्यांना ब्राह्मण केलें

सद्गुरु नंतर आम्हां भक्तांना म्हणाले, "तुम्हांला आतां ब्राह्मण करतों त्याप्रमाणें कांहीं विधि करून महाराजांनीं प्रत्येकास जानवें घातलें. मग 'ॐ भवती भिक्षांदेहि' असा सवाल शिकवून भिक्षा (माधुकरी) मागावयास पाठविलें– माधुकरीचे पवित्र अन्नक्षेत्रांत सेवन करावें असें म्हणतात, त्याची प्रचीति आली ! त्यामुळें आमच्या क्षुद्र भावना नाहींशा झाल्या आणि महाराजांच्या पारमार्थिक बोधानें आम्ही आचार विचारांची उच्च पातळी गांठली ! "अघाडी चले गुरूराजा । पिछाडी शिष्योंका फौजा ॥" अशा भीमा–मरजा संगमाकडे जातांना रस्त्यावर एक कट्टा दिसला. त्याची आख्यायिका महाराजांनीं सांगितली.... अखेर संगमावर जाऊन पोचलों. त्या वैराग्य भूमीवर महाराजांसह आमचा सात दिवस सप्ताहासाठीं मुक्काम होता. या मुदतींत प्रेमभेट आणि प्रेमलहरी यांच्या स्पष्टीकरणाचा महाराजांनीं केलेला बोध अद्यापहि माझ्या कानांत घुमत आहे ! त्या बोधाच्या भक्तिप्रेमलहरी माझें हृदय अजूनहि हेलावून सोडतात ! सप्ताह संपल्यावर महाराजांचे हस्ते भंडारा उरकून आम्ही सुखरूप परतलों.

या प्रवासांत असाहि अनुभव आला कीं शिष्याचा अहंभाव सुटला नाही तर सद्गुरूबोध त्याच्या हृदयांत शिरतच नाहीं. असला शिष्य आयुष्यभर सद्गुरु सहवासांत असूनही त्याच्या स्वार्थी अहंकारामुळें तो महापापी ठरतो! मी अशा-पासून दूर झालों.

## नागापासून रक्षण !

महाराजांनीं मला आत्मनिष्ठा, अद्वयभक्ति अशा भक्तिप्रेमाचा कानमंत्र फुंकल्यामुळेंच मी दुही माजविणाऱ्या ढोंग्यापासून दूर राहिलों आणि गुरुमाउलीचें रक्षणछत्र मजवर सदैव राहिलें, असा प्रत्यक्ष अनुभव आला! एकदां शेताकडे जाण्यास निघालों असतां, शेताच्या बांधाजवळून मोठा नागसर्प चालला असल्याचें पाहिलें! अखेर फणा काढून माझ्या समोर राहिला! अंगावर एकदम मीतीनें शहारे आले! पण सद्गुरुच अनेक रूपांनीं जगांत भरला आहे अशा श्रद्धेनें मी त्या नागाला नमस्कार केला, त्याबरोबर तो नाग आपल्या वाटेनें नाहींसा झाला! सद्गुरू शिष्यांचें असें अनेक प्रकारें रक्षण करतात!

## अकस्मात् स्वानंदवासी समाधि !

सद्गुरू मोरेश्वर महाराजांचा तथा अवधूत महाराजांचा—सहवास मला अल्पकाळच लाभला. दि. २३–३–१९३९ चे रात्रीं महाराज अकस्मात् स्वानंद-वासी झाल्याची तार जळगांवास आली! ‘ महाराजांच्या पश्चात् मठाधिपति आपणच एकटें व्हावें ’ अशी खोटी महत्वाकांक्षा धरणारा एक कंपू होता त्यांत जळगांवचे हरीभाऊ सोनार ही एक व्यक्ती होती! त्याला तार आल्याबरोबर कोणालाहि न कळवितां तो एकटाच जळगांव सोडून अंमळनेरला गेला! पण आम्हां निष्ठावंत भक्तांना ही अत्यंत धक्का देणारी दुष्ट बातमी **बिनतारी संदेशाने** समजली! आणि आम्ही निष्ठावंत भक्त हरिभाऊ सोनाराचे अगोदर भडगांवीं जाऊन पोचलों! खोटें बोलणाऱ्या व वागणाऱ्यांचे पदरांत दगड–गोटेच पडतात!

## स्वानंदवासाच्या रात्रीची हकीगत

१९३९ च्या चैत्रपाडव्याचे रात्रीं महाराज अकस्मात् स्वानंदवासी कसे झाले याविषयींची इत्थंभूत हकीगत इतर आठवणींत आलेली असल्यामुळें मी येथें ती देऊन जागा अडवीत नाहीं, मात्र इतकेंच नमूद करतों कीं गुरुमहाराजांचा पार्थिव देह अंत्यविधीपर्यंत अत्यंत तेजस्वी दिसत होता. **‘ साधू ओळखावा मरणीं ’** म्हणतात त्याचा प्रत्यक्ष प्रत्यय आला! भडगावांत स्वयंस्फूर्त हरताळ पडून

व्यापाऱ्यांनीं दुकानें बंद ठेविलीं. मिरवणुकींत गांवोगांवाहून आलेल्या लोकांची व भडगांवच्या लोकांची अलोट गर्दी होती. अत्यंविधी वेदोक्त मंत्रांनी सांगोपांग पार पडला.

## महाराजांची परंपरा सुयोग्य चालविणारे श्री. दत्तमहाराज

महाराजांचे पश्चात्, त्यांचे श्री. हरिभक्तिपरायण ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज त्यांची परंपरा अत्यंत सुयोग पद्धतीनें चालवीत आहेत. श्री. दत्तमहाराज ऊर्फ अण्णा यांची प्रेमळ भक्ति आणि सर्व भक्तांशीं समरस होण्याची वृत्ति, यांनीं आकर्षित होऊन हजारों भक्त श्री. दत्तमठींत दर्शनासाठीं आणि सेवेसाठीं येत असतात. मठींतील सर्व उत्सव पूर्वीपेक्षांहि गर्दीनें साजरें होतात. लढाईची धान्य महर्गता, रेशनिंग इत्यादि संकटपरंपरा आल्या तरी सद्गुरुंच्या कृपाशिर्वादानें व श्री. दत्तमहाराजांच्या दक्षतेनें आणि त्यांनीं समतेच्या प्रेमळ आपुलकीनें जोडलेल्या भक्तांच्या उत्साही सहकार्यानें, उत्सव समारंभ बिनबोभाटपणें आणि थाटानें पार पडत आहेत. असे संतसत्पुरुष जगांत क्वचितच लाभतात. श्री. दत्तमहाराज यांचें शिक्षण मराठी ४ थीच्या पुढें जाऊं शकलें नसलें तरी महाराजांच्या कृपेनें सतत वाचन, मनन व सद्गुरुस्मरण करून त्यांनीं स्वतःची योग्यता इतकी वाढविली आहे कीं, "वेदांत विषय अधिक उदाहरणांनी व शास्त्रवचनांनीं सुबोध करून भक्तांना शांति–समाधान देण्याचा, महाराजांचा अप्रतीम कित्ता, त्यांनीं आत्मसात केला आहे." पुष्कळ सहवासानंतर माझ्या अनुभवास आलें कीं, जीवाची पर्वा न करितां विरक्ति साध्य करून, ऋद्धि सिद्धीकडे ढुंकूनहि न पाहतां अनन्य प्रेमभक्तीनें श्री. दत्तमहाराज उर्फ अण्णा आत्मबोधांत रंगून जात असतात!

## श्री अवधूत महाराजांच्या हयातींतील विशेष आठवणी

१९३७ सालीं एकदां श्रीदत्तजयंतीच्या उत्सवासाठीं मी माझे घरची मंडळी आणि अकांत चौधरी व त्याची मंडळी भडगांवकडे निघालों. अकांत चौधरी अगोदर पुढे गेला होता. रात्रीं १२ वाजतां आम्ही पाचोरा स्टेशनला पोचलों. श्री. सहस्त्रबुद्धे यांच्या मोटार सर्व्हिसनें भडगांवला निघालों. मोठा पाऊस नुकताच पडून गेल्यामुळें वाटेवर तितूर नदीला पुराचा लोंढा आला होता. आम्हांला भडगांवचे श्रीदत्तमठीची ओढ असल्यामुळें पुराचा विचार न करतां पाण्यांत शिरतांच छातीपर्यंत पाणी आले. तीन वर्षांची माझी मुलगी माझ्या खांद्यावर आणि ओझी घेऊन चालणाऱ्या बाया बरोबर होत्या! तसेच पुढें चाललों— नदीपलीकडे आम्ही सर्वजण जाऊन पोचलों कसें हें आम्हाला समजलेंहि

नाहीं! सद्गुरूंच्याच कृपेनें आम्ही सुरक्षित पोचलों. ही घटना खरोखर आश्चर्य-कारक! पलीकडच्या मोटारड्रायव्हरनें आश्चर्य वाटून आम्हांला विचारलें, "येवढ्या मोठ्या पुराच्या पाण्यांतून या बाजूला आलांत तरी कसे?" मी बोललों, "तें आम्हालाहि समजलें नाहीं! आमचें सर्व लक्ष श्रीदत्त मठीकडे होतें!" त्यावेळीं सद्गुरूंच्या कृपाशीर्वादांची आठवण झाली! गुरुमाउलीनें आशीर्वाद दिला होता– "तुम्हाला आतां विश्वभक्षक, देवदेवता इत्यादि कोणापासून कसलीहि भीति नाहीं!" मठींत मोत्या नांवाचा कुत्रा कडक पहारा करीत असे. तो फक्त गुरु-पुत्रांना आंत जाऊं देई, इतरांना अडवून त्यांच्या अंगावर धावे! मोत्याच्या परवानगीनें आमचा मठींत प्रवेश झाला! रात्रीं दीड वाजले होते तरीहि महाराजांनीं येऊन आमची विचारपूस व व्यवस्था केली. चर्चेंत अनन्य गुरुभक्ति, तिला आड येणारा अहंकार, एकांत मननाचे महत्त्व, नामस्मरणाचे सामर्थ्य व महिमा इत्यादि पारमार्थिक तत्त्वांवर महाराजांचें सुबोध व गोड विवेचन ऐकण्याचें भाग्य लाभलें. एकदां पारमार्थिक चर्चेच्या वेळीं माझी तीन वर्षांची मुलगी जवळच होती. तिच्याकडे पाहून महाराज म्हणाले, "तिला तुम्ही तीन वेळां हांक मारली पण तिनें तुमच्याकडे ढुंकून तरी पाहिलें कां? पहा, ही मुलगी किती एकाग्र झाली आहे!" महाराजांनीं या प्रसंगीं "मला छंद लागला आत्मारामाचा...गजर करित गुरुनामाचा" हें पद म्हणून त्याचें गोड स्पष्टीकरण केलें. महाराज एकदां चर्चेस बसले कीं त्यांना खाण्यापिण्याचें चर्चेचें व अन्य व्यवहारांचें भान रहात नसे! शांतिचौकांत चर्चा चालू असतां एकदां महाराज एकदम गर्जून म्हणाले, "अरे, मनसाराम वाळवंटांत गाडला गेलारे! काढा त्याला बाहेर!" दुसऱ्या दिवशी गांवचे लोक आले ते सांगूं लागले "मनसारामला खड्ड्यांतून काढलें नसते तर तो मरून गेला असता!" मनसाराम तेली जातीचा होता. महाराजांचा अनुग्रहीत असला तरी विरोधी भक्त! तरी देखील महाराजांना त्याचेविषयीं फार आपुलकी वाटे! कांहीं दिवसांनीं त्याला वेड लागून त्यांतच त्याचा अंत झाला!

दुसरे गुरुबंधु नामदेव चौधरी यांना ज्योतिषाचा नाद होता. एकदां मी त्यांना म्हटले "ज्योतिषाच्या नादांत कांहीं समाधानी असते कां?" आपले महाराज ज्योतिष येत नसतांनाहि भूत-वर्तमान व भविष्याच्या तीन्हीहि काळांचें ज्ञान सांगूं शकतात. आम्ही महाराजांकडे हा वाद नेला. त्यांनी त्या भेदरूपी वादाकडे दुर्लक्ष करून पारमार्थिक विवेचन केलें आणि म्हणाले, "विषयांच्या जंजाळांतून वृत्ति सुटत जाऊन गुरुप्रेम वाढत जाईल आणि सुख-शांति-समाधान वृत्तींत निर्माण होत जाईल."

महाराज दंभाला कटाक्षपूर्वक विरोध करीत. एकदां आमचे गुरुबंधु **श्री. नामदेव नेमाडे, नांदेडकर** यांच्याविषयीं बोलणें निघालें. माणसांना समंध बाधा कां व कशी होते याविषयी चर्चा चालली होती. 'सर्व अभिमान गुरुचरणी वाहून गुरुभजनी दंग राहिलें कीं समंध बाधू शकत नाहीं' असें गुरुमहाराज कळकळीनें सांगत होते.

दररोज पहाटे ४ वाजतां उठून गुरुमहाराज एकतारीवर भजन करीत "गुरु माझा जीवाचा जीवन" हें पद नेहमीं म्हणत—"माझें सर्वस्व माझे पंतच आहेत, माझ्या पंताखेरीज मला कोणीच दिसत नाहीं" अशा प्रकारची भाषा गुरुमहाराजांचे तोंडी अखेरपर्यंत होती !

## भला मोठा काळा विषारी विंचू डसला तरी महाराज हंसतच होते !

श्रीदत्त मठींस माडीवर पंतांची मोठी तसबीर आहे. त्या ठिकाणीं महाराज फिरत होते. मीहि त्यांचे बरोबर होतो. "तत्त्वम् आत्मा पूर्ण जाणुनी सहज समाधी भोगि नरा '..... "जन्ममरण चुकवी फेरा" या पंतांच्या पदाचें विवरण करण्याची मी विनंति केली तेव्हां कांहीं न बोलतां महाराज हंसतच राहिले ! पण विचार केल्यावर माझा मलाच पदाचा स्पष्टार्थ लागूं लागला ! जणुकाय, मला गुरुमहाराज बिनतारी संदेशानें शिकवीतच होते !

एकदां त्याच पंत-हॉलमध्ये कांहीं मंडळीशीं चर्चा केल्यावर गुरुमहाराज खालीं उतरत असतां एक भला मोठा काळा विषारी विंचू महाराजांच्या पायाला डसलेला आम्ही पाहिला ! पण महाराज हंसतच होते, हें पाहून आम्ही आश्चर्यानें थक्कच झालों ! महाराज म्हणाले, "पूर्व सुकृतानें हा प्राणी मला भेटला।" हें पाहून व त्यांचे शब्द ऐकून "हा सामान्य मनुष्य नसून अवतारी सत्पुरुषच आहे" अशी आमची खात्रीच झाली !

## शेंकडों लोकांना वाढूनहि चुलाणावरील आमटी जशीच्या तशी !

एकदां श्रीदत्तजयंतीच्या उत्सव प्रसंगीं आम्ही आणखी एक नवल पाहिलें ! बाहेरगांवच्या व गांवच्या मंडळीच्या पंक्ति प्रसाद जेवून जात होत्या. माझेकडे चुलीजवळ स्वयंपाकाकडे नजर ठेवण्याची कामगिरी होती. चुलाणावर आमटी मोठ्या भांड्यांत उकळत होती. आमटी इतक्या हजारों मंडळीच्या पंक्तीना पुरी पडणार-नाहीं. अशी आम्हांला भीति वाटली ! गुरुमहाराजांनीं देवाला नैवेद्य समर्पण करून 'पंक्ती वाढा' असें सांगितलें. किती पंक्तीला आमटी वाटली तरी भांड्यात होती तेवढीच होती ! मीं गुरुबंधू श्री. अकांत चौधरी यांना विचारलें, "हा काय

चमत्कार ?' त्यांनी मला खुणेनें चूप रहाण्यास सांगितलें ! तेव्हां

तो हा सगुण ब्रह्म अवतरला । सद्गुरू भूमीवरी उतरला ।
.........दत्त मनोरथ पुरला ॥

या पदाचा प्रत्यय आम्हांला आला !

## गुरुकृपेनें मुलीचें लग्न चिंतेशिवाय झालें

माझी मुलगी उपवर झाल्यावर, जवळचे स्नेही तिच्या लग्नासंबंधी आग्रह करूं लागले ! परंतु जवळ भरपूर पैसा नसल्यामुळें तिचें लग्न सहजासहजीं कसें जमणार ? पण जवळच्या स्नेह्यांनीच मदत केली आणि सहज लग्न होऊन मुलगी सासरीं गेली. मिथ्या प्रपंचाची चिंता न करतां सर्व भार देवाच्या व गुरूंच्या चरणीं अर्पण केला कीं त्यांच्या कृपाप्रसादानें भक्तांच्या अडचणी टळून सहज प्रयत्नांनाहि यश लाभते, हाहि प्रत्यक्ष अनुभव आला ! सद्गुरूंच्या कृपेचें व शिकवणीचें सुफळ लाभलें.

## १९३६ सालीं गाणगापुर क्षेत्रीं विलक्षण अनुभव

१९३६ सालीं महाराजांबरोबर गाणगापुरी आम्ही भक्तमंडळी गेलों, त्यांत नामदेव नेमाडे नांदेडकर, नांदेडचेच मंगा पाटील, बुधोभाऊ, जळगांवचे अकांत चौधरी, गोविंदा दशरथ, माधव धन्जी पाटील, मी स्वतः ( तुकाराम रंगो काळे ) आणि सर्वांचीं कुटुंबीय मंडळी होती.

संगमावरील कर्मठ ब्राह्मणाला महाराजांचा परमार्थ बोध ऐकून फारच नवल वाटलें. त्यांतील एका जाणत्या ब्राह्मणानें असे उद्गार काढले कीं, "हे तर प्रत्यक्ष दत्तमहाराजच आहेत ! कारण या ठिकाणीं तीन दिवसांपेक्षां जास्त दिवस कोणीहि राहूं शकले नाहींत !"

गुरुमहाराज म्हणत, "गाणगापूर ही भूमि पूर्ण वैराग्याची आहे !"

## दत्तभक्त कुत्रा !

गाणगापुरच्या संगमस्थानावर एक कुत्रा होता. आरतीला सुरवात झाली कीं तो संगमांत स्नान करून तेथील भस्माचे डोंगरावर भस्मांत लोळून येई आणि आरती संपेपर्यंत एक सारखा शंखनादासारखा नाद करीत राही ! जणु काय तो स्वतःही आरतीच म्हणे ! गुरुमहाराज त्या कुत्र्याची माहिती सांगतांना म्हणाले, "हा त्या दत्तभक्त कुत्र्याचा नित्यक्रमच आहे ! चोखामेळा, रोहिदास वगैरे संत जातीचे अंत्यज असून ब्राह्मणांनाहि वंद्य झाले मग हा निस्सीम दत्तभक्ति करणारा कुत्राहि वंद्य कां न व्हावा ?" भडगांव श्री दत्तमठींतहि असेच दोन कुत्रे आहेत !

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. ५७

( लेखक : श्री. वुधा धना भोळे नांदेडकर मु. पो. अमळनेर )

### नांदेडला अवधूत महाराजांची प्रथम भेट

गुरुबंधु मेघःशाम, हे स्वतः पायानें अधू असूनहि, या कामासाठीं गांवोगांव हिंडून भक्तांकडून आठवणी मिळवितांना माझ्या खणपटीलाच बसले, तेव्हां मात्र महाराजांविषयींचें माझे अनुभव, वेड्या वांकड्या शब्दांत कां होईना, सांगण्याचें धाडस करीत आहे :—

सर्वश्री गुरुबंधु फकीराशेठ, मंगा पाटील व नामदेव नेमाडे यांच्यामुळें मला गुरुमहाराजांच्या भेटीचा योग आला. या तीन्ही गुरुबंधूनी नांदेडगांवच्या प्रतिष्ठित मंडळींना महाराजांच्या थोरवीची माहिती सांगून नादेडला कीर्तनासाठीं महाराजांना निमंत्रण देण्याची संमति मिळविली आणि त्याप्रमाणें नांदेडच्या भक्तांनीं भडगांवास जाऊन श्री. अवधूत महाराजांना निमंत्रण दिलें. महाराजांनीं आनंदानें मान्यता देऊन नांदेडला येण्याचा नक्की दिवस ठरविल्याचें महाराजांचें पत्र १५ दिवसांचें आंतच आलें. ठरलेल्यां दिवसाचे आधीं एक दिवस फकीराशेट महाराजांना आणण्यासाठीं भडगांवला गेले आणि जळगांव-धरणगांव मार्गानें महाराजांसह नांदेडला आले. नांदेडचे शेंकडो लोक त्या सत्पुरुषाचे दर्शनासाठीं उत्सुक झाले होते. गांव स्वच्छ करण्यात आला आणि वेशीवर आणि महाराज येणार त्या रस्त्यावर जागोजागीं रोषणाई केली होती. वेशीजवळ महाराजांच्या स्वागतासाठीं शेंकडो लोकांची गर्दी झाली होती. सर्वांनी नामस्मरणाचा जयघोष चालविला होता ! मी अशिक्षित मनुष्य त्या अपूर्व प्रसंगाचें बरोबर वर्णन कसें सांगणार ! महाराजांची ही नांदेडला प्रथमच भेट १९२८ सालीं झाली.

### पंतस्वरुपी गाडीवानाची मदत

महाराजांना आणण्यासाठी धरणगांव स्टेशनावर २ बैलगाड्या तयार ठेवल्या होत्या दोन्ही गाड्यांत मिळून श्री. अवधूत महाराज, त्यांचे सुपुत्र श्री. दत्तमहाराज आणि अनुग्रहीत शिष्य बंडु लोहार व बरोबरची मंडळी यांना नांदेडला नेण्यात आलें आणि भाड्याची गाडी ठरवून महाराजांबरोबर आलेलें सर्व सामान घालून मी नांदेडला यावें असें ठरलें. पण तो गुडीपाडव्याच्या सणाचा दिवस

असल्यामुळें धरणगांवच्या आसपास कोठेंहि गाडी अनेक फेऱ्या घालूनहि न मिळाल्यामुळें मी फिकीरींत पडलों आणि स्टेशनवर ठेवलेल्या सामानाजवळ चिंतातुर होऊन बसलों! इतक्यांत एक शेतकऱ्यासारखी व्यक्ति येऊन त्यानें माझ्या चिंतेचें कारण समजून घेतल्यावर तो म्हणाला "माझी सुंदर बैलांची गाडी घेऊन तुम्हाला या सामानासह नांदेडला पोचवितों" मी आनंदाने सांगितलें "ये गाडी घेऊन. यावेळी मी तुला मागशील ते पैसे देईन!" मग त्या शेतकऱ्यानें सर्व सामान टाकून आम्ही नांदेडचा रस्ता धरला. नांदेडला पोचतों केव्हां आणि महाराज उतरलेल्या जागीं सामान ठेवून महाराजांचें दर्शन घेतों केव्हां' अशी मला घाई झाली होती. चार तासांत नांदेडला पोचलों. सामान सर्व उतरून धांवतच गेलों आणि महाराजांचें दर्शन घेऊन त्यांचे पायां पडलों व जवळच बसून राहिलों, "गाडीवाल्यास गाड्याचे पैसे आणून देतों" असें सांगून आलों त्याचें विस्मरणच मला झालें! मग आठवण होतांच भाड्याचे पैसे घेऊन ते गाडीवानास देण्यासाठीं बाहेर आलों तों काय? गाडी नाहीं आणि गाडीवानहि नाहीं! पुष्कळ शोध करूनहि गाडी व गाडिवान यांचें दर्शनच नाहीं. मग महाराजांजवळ जाऊन लाजेनें मान खालीं घालून झालेला प्रकार त्यांना सांगितला! तें ऐकून महाराज शांतपणानें म्हणाले, "हे पहा, तो गाडिवान् कोणी तिऱ्हाईत कां होता? माझा भक्तवत्सल भक्ताभिमानी सद्गुरू पंतच की रे तो! पण बुधा, घडलेला हा प्रकार कोणाला सांगूं नको!"

हें ऐकून व अनुभवून अनुग्रह घेतला. श्री अवधूत महाराजांविषयीं माझ्या मनांत अगोदरच उत्पन्न झालेली श्रद्धा व आदर अधिकच वाढीला लागला आणि 'केव्हां एकदां त्यांच्या अनुग्रहाचा लाभ मला होतों' असें मला झालें!

मग महाराजांच्या कीर्तनास नांदेड गांवीं सुरवात झाली. कीर्तनासाठीं गांवांतील आणि आसपासच्या खेड्यांतील शेंकडों भाविक लोक जमूं लागले; ते आणि कीर्तनांतील परमार्थबोध ऐकून घेऊन बैठकीतील परमार्थचर्चेत या शंका विचारून त्याचे निरसन करून घेत. पांचव्या दिवशीं मी श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. मी त्यावेळीं २५ वर्षांचा होतों. गांवांतील २०० मंडळी कीर्तन चालू असलेल्या दिवसांत अनुग्रहीत झाली! कीर्तनें संपल्यावर सर्व भाविकांचा प्रेमळ निरोप घेऊन आणि सर्वांना शुभाशीर्वाद देऊन महाराज भडगांवला परत गेले.

## महाराजांची नांदेडला दुसरी भेट

१९२८ सालच्या पहिल्या भेटीमुळें नांदेडच्या लोकांना महाराजांच्या कीर्तन प्रवचनांची अत्यंत गोडी लाभल्यामुळें कांही भक्त भडगांवी महाराजांचे दर्शनासाठीं वारंवार जाऊं लागले. १९२९ सालीं नांदेडच्या भक्तमंडळींनीं महाराजांना कीर्तन

सप्ताहासाठीं फिरून आमंत्रण देऊन आणलें. त्यावेळीं महाराजांनीं आपल्या कीर्तन प्रवचनांत अवधूत सांप्रदायाची पूर्णतेनें ओळख पटविणारा बोध केला. यावेळीं मोठमोठे पंडित व शास्त्री महाराजांचा बोध ऐकून समाधानी होऊन जात! त्यांच्या बोधांत वेदांतांची सोपी व सुबोध मांडणी ज्ञानपर गोष्टींच्या आधाराने करण्याची अपूर्व हातोटी होती! भाविक भक्त त्यामुळें स्वात्मानंदांत रंगून डुलत असत!

## माझी नोकरी व महाराजांचा आशीर्वाद

घरची गरीबी असल्यामुळें अमळनेरला जाऊन तेथील गिरणीत नोकरी धरावी, असें मनांत ठरविल्यावर १९३१ सालीं मी महाराजांची यासाठीं अनुज्ञा घेण्यासाठीं भडगांवला गेलों. अनुज्ञा घेऊन अमळनेरला गेल्यावर मला गिरणींतील १५ रु. दरमहाची नोकरी 'प्रताप मिल्स' मध्ये मिळाली. पण पगार फारच अपुरा असल्यामुळें दुसऱ्या गांवीं जाऊन नोकरी धरण्याचें मनांत आलें. फिरून महाराजांची अनुज्ञा घ्यावयास भडगांवीं गेलों. यावेळीं महाराजांनीं मला निक्षून बजावलें, "तूं अमळनेर सोडून दुसरीकडे जाऊं नकोस, तुला तेथेंच चांगली नोकरी मिळेल." सद्गुरूंचा हा इषारा खोटा कसा ठरणार! थोड्याच दिवसांनीं मला त्या प्रतापमिलमध्येच 'वॉरपरची' नोकरी ६० रु. पगाराची मिळाली! पहिला पगार आल्याबरोबर मी भडगांवला जाऊन महाराजांचे हातीं दिला आणि याचा श्रीदत्त जन्मोत्सवांस खर्च व्हावा, अशी महाराजांना विनंति केली. 'सद्गुरु वचनावर विश्वास ठेवणाऱ्याचें असें कल्याण होते' अशी श्रद्धा बाणली! यामुळें शास्त्रांनीं गुरुभक्तीला इतकें महत्व दिलें असावें! निजभक्त अनन्य भावानें सद्गुरु-भक्ति करून आपलें ऐहिक व पारमार्थिक कल्याण साधतात, हेंच सत्य होय.

## अमळनेरला महाराजांचे तीन दिवस कीर्तन

१९३६ ला मी अमळनेरला गुरुमहाराजांचा तीन दिवस कीर्तनाचा कार्यक्रम ठरवून त्यांची संमति मिळविली. महाराज कीर्तनासाठीं आले आणि आपल्या सुबोध कीर्तनांनीं त्यांनीं श्रोत्यांना भक्तिप्रेमरसांत रंगवून सोडले! नंतर कांहीं दिवसांनीं महाराज अमळनेरला आले व मला म्हणाले, "मी गाणगापूरला जाणार आहे. तुझ्या मातुश्रींना आमचेबरोबर पाठीव" मी मोठ्या आनंदानें माझ्या वृद्ध मातेला महाराजांचेबरोबर गाणगापूरचे पवित्र यात्रेस पाठविले. मी भडगांवपर्यंत तिला पोचविणेस गेलों.

याप्रमाणें आम्हांसारख्या दीनावर गुरुमहाराज पुत्रवात्सल्यानें प्रेम करीत असत. कितीहि जन्म घेऊन या उपकारांची फेड होईल कां! धन्य धन्य गुरुमाउली!

* * *

### भाग १ ला

# आठवण नं. ५८

( ले. श्री. पीतांबर रूपचंद पाटील, कडगांव )

मला ही आठवण कडगांवचे श्रीमान् पुरुषोत्तम पुना पाटील यांचे घरच्या मंडळीकडून मिळाली असून त्यांच्या हयातींतच त्यांनीं लिहिली होती. श्री. पुरुषोत्तम पाटील आतां परलोकवासी झाले आहेत. त्यांच्या या आठवणींत ते लिहितात :—

" १९३७ साली श्री. मोरेश्वर अवधूत महाराज कडगांवीं आले त्यांचे तोंडून पारमार्थ ज्ञानोपदेश ऐकल्यापासून माझी अवधूत सांप्रदायावर निष्ठा बसली. अनुग्रह मात्र पुढें लवकर घेतला. ज्यावेळीं श्री अवधूत महाराज कडगावीं येत त्यावेळीं कीर्तनें व परमार्थ बोध मोठ्या श्रद्धेनें मी ऐकण्यासाठीं हजर रहात असे. मला संसाराची सर्व अनुकूलता होती, पण पोटी पुत्र संतान नव्हतें. तेव्हांहि याविषयीं मला विचारलें तर मी म्हणे "श्री अवधूत महाराजांना सर्व काळजी मी त्याची चिंता करत कां झुरावें ?" कारण अनुग्रहीत झाल्यावर श्रीअवधूत महाराजांवर माझी गाढ निष्ठा होती. या निष्ठेचें फळहि मला लवकरच मिळालें!

एका रात्री माझ्या पत्नीचे स्वप्नांत श्री सद्गुरू मोरेश्वर महाराज येऊन त्यांनी तिचे हातीं दोन रुपये दिले. आणि म्हणाले " बाई कसलीहि काळजी करूं नकोस, हा प्रसाद घे म्हणजे तुझी इच्छा पूर्ण होईल." दुसऱ्या दिवशीं माझ्या पत्नीनें स्वप्नांतील दृष्टांत मला सांगितला मीहि महाराजांच्या भक्तांना दृष्टांतांतील आशीर्वाद सांगितला. या दृष्टांतमुळें जास्तच श्रद्धा बसून मी श्री अवधूत महाराजाचा अनुग्रह घेतला. त्याचें फळ मिळालें. स्वप्नांतील दृष्टांताप्रमाणे मला माझ्या पत्नीपासून दोन मुलें झाली. त्यावेळेपासून मी अवधूत सांप्रदायांत खूप रंगून जाऊं लागलों."

## भडगांवीं पाहिलेला एक चमत्कार

श्री. पुरुषोत्तम पाटील यांची आठवण वर नमूद केली. आतां मी स्वतः भडगांवास श्री. मोरेश्वर—अवधूत महाराज स्वानंदवासी झाल्यानंतर त्यांच्या अन्त्य दर्शनसाठीं व सेवेसाठीं भडगांवाहून रूपचंद पाटील, चावदस पाटील वगैरे बरीच भक्त मंडळी भडगांवीं गेली होती. त्यांचे बरोबर गेलों. अखेर भंडारा झाला. त्यावेळीं माताचे हंडे उतरविण्याचें काम जळगांवचे आणि कडगांवचे कांहीं भक्त करीत होते. त्यावेळीं जळगांवचे लक्ष्मण बारी आणि कडगांवचे चावदस पाटील हंडा उलटून आधण भात व वाफा यांनीं दोघांचीं शरीरें होरपळली असे जमलेल्या सर्वांना दिसलें ! आतां त्यांचें सर्व अंगच भाजून निघेल, असें सर्वांना वाटलें ! परंतु ते दोघेहि गुरुमहाराजांचे स्मरण करीत बागेंतील औदुंबराच्या कट्याजवळ गेले आणि तेथें असलेली विभूति त्यांनीं आपापल्या भाजलेल्या शरीरांवर माखली. आश्चर्य हे कीं दोघांच्याहि शरीरांना भाजल्याच्या कांहींहि खुणा राहिल्या नाहींत कीं इजा पोचली नाहीं ! ही सद्गुरुंचीच कृपा हें जाणून सर्वांनीं ‘ धन्य सद्गुरु मोरेश्वर महाराज ’ असा जयजयकार केला !

* * *

भाग १ ला

# आठवण नं. ५९

( लेखक : श्री. झिपरू टिकाराम क्षीरसागरे विठ्ठलपेठ जळगांव )

मी लहान असतांना माझे वडील 'पाय तुझे गुरुराया। माझी देवपूजा ।' वगैरे भक्तिपर पदे म्हणून दररोज भजन करीत होते.

१९१९ सालीं माझे मराठी ४ थी पर्यंत शिक्षण झाल्यावर, गरीबीच्या परिस्थितीमुळें शाळा सोडली. आणि १९२२ मध्ये खानदेश मिलमध्ये नोकरी धरली. १९२५ सालीं माझे वडील वारले. त्यांच्या गुरुमहाराजांचा फोटो आमचे घरीं होता. मलाहि गुरुमार्ग पत्करण्याची त्यावेळीं इच्छा झाली. पण लहान वय असल्यामुळें मी कोणाजवळ त्याविषयीं बोललों नाहीं.

## महाराजांचें दर्शन व अनुग्रह.

आमचे गल्लींत श्री मनसाराम मास्तर यांचेकडे सर्वश्री गणपत माळी यादवराव माळी वगैरे मंडळी जमून भजन करीत. मीहि त्यांच्या भजनांत जाऊं लागलों. या सर्वांना श्री. अवधूत महाराजांचें दर्शन घेण्याची इच्छा झाली. १९२८ सालीं श्रीदत्तजयंतीचे उत्सवासाठीं मीहि भडगांवला गेलों. महाराज धुमी जवळ बसून बऱ्याच भक्त मंडळीशीं परमार्थ चर्चा करीत असतां मी त्यांचें दर्शन घेऊन पाया पडलों. त्यांचा बोध ऐकून अनुग्रह घेण्याची विनंति श्री. गणपतराव माळी यांचे मार्फत महाराजांना केली. लगेच महाराजांनीं मला अनुग्रह देऊन कृपा केली तेव्हां पासून श्रीक्षेत्र भडगांव येथील उत्सवास जात असतो.

जळगांवकर मंडळी एकतारी व खंजिरी या सांथीवर भजन करीत मी खंजिरी वाजवीत असे. उत्सवांतील भजनांत मी खंजिरी वाजविलेली ऐकून महाराज म्हणाले, " याची खंजिरी ऐकून मला बाळेकुंद्रीकरांची आठवण येते." तेव्हांपासून मला खंजिरी वाजवूं लागलों.

## ऐनवेळीं सद्गुरुकृपेची मदत !

त्या पुढील वर्षी सर्व जळगांवकर मंडळी उत्सवासाठीं भडगांवला निघाली पण पैशाच्या टंचाईमुळें आपण कसें जाऊं शकणार अशा चिंतेंत मी गिरणीच्या कंपाउंडमध्यें बसलों असतां, अचानक वारा सुटून एक ५ रुपयांची नोट माझ्या पुढ्यांत येऊन पडली ! ती नोट पाहून मला आनंद झाला ! 'सद्गुरुकृपेनेंच ही मदत आली ' अशा श्रद्धेनें मी त्या रकमेचा उपयोग भडगावीं जाण्यासाठीं केला.

## पुराच्या वादळांतून गुरुकृपेनेंच वांचलों !

एकदां गोकुळाष्टमीचे उत्सवाकरितां एका सोबत्यासह निघालों. पाचोरे ते भडगांव या रस्त्यावरील तितूर नदीला एकदम पूर आलेला दिसला. परंतु नावाड्यानें आम्हां दोनच माणसांकरितां नाव सोडण्याचें नाकारलें. भजनाची अत्यंत ओढ अंतःकरणांत असल्यामुळें, महाराजांनीं दिलेल्या तारक मंत्राचा जप करीत. पुराच्या त्या पाण्यांतच पलीकडे जाण्यासाठीं शिरलों ! पण आश्चर्य असें कीं खोल पाणी न लागतां आणि पाण्याचे ओढीमुळें घसरून वहात न जातां आम्ही सुखरूप नदीपार कसे झालों याचे भान आमचे आम्हांसच राहिलें नाहीं !

सद्गुरुंनी आमच्या सुरक्षितपणाची आणि योगक्षेमाची काळजी अनेक प्रसंगीं घेतल्याचे दाखले आहेत ! आजतागायत प्रपंच व्यवहारांत आणि पारमार्थिक मार्गांत सद्गुरुकृपेमुळें कोणत्याहि प्रकारची उणीव भासली नाहीं, हा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे.

●●●

## भाग १ ला

# आठवण नं. ६०

( लेखक : श्री. चावदस पाटील, कडगांव )

### कडगांव-जळगांवकडील अवधूत सांप्रदायाचा विशेष विस्तार

आमच्या कडगांवीं १९३७ सालापर्यंत श्री अवधूत सांप्रदायाचे फक्त दोघेच भक्त होते. [१] सदाशिव गोपा पाटील व [२] दशरथ रामजी पाटील. आपल्या कडगांवांत या सांप्रदायाचे भक्त वाढविण्याची या दोघांची सदिच्छा होती. परंतु घरच्या गरिबीमुळें स्वतःच्या जबाबदारीवर गुरुमहाराजांना कडगांवीं आणणें त्यांना शक्य झालें नव्हतें. या दोघांनीं कडगांवांतील सर्वश्री रूपचन्द चावदस पाटील, चावदस तुकाराम पाटील व टेकू चावदस पाटील यांना अवधूत महाराजांच्या थोरवीविषयीं माहिती सांगून त्यांना आपल्या कडगांवीं आणण्याची इच्छा बोलून दाखविली. अखेर या दोघांच्या आग्रहाप्रमाणें सर्वजण भडगांवीं श्री अवधूत महाराजांच्या दर्शनास गेले. महाराजांची भव्य तेजस्वी मूर्ति, त्यांचे मुखावरील तेज, शिष्यांना ज्ञान, उपासना आदि मार्ग दाखवून सुबोधपूर्वक जागृत राखण्याची त्यांची विलक्षण हातोटी पाहून कडगांवच्या या मंडळींना महाराजांविषयीं अत्यंत आदर व पूज्य भावना झाली आणि त्यांनीं त्या मार्गशीर्षांतील दत्तजयंतीच्या शुभदिनीं गुरुवारीं महाराजांचा अनुग्रहहि घेतला ! आतां हे सर्व अवधूत महाराजांचे भक्तच झाल्यामुळें त्या सर्वांनी मिळून कडगांवला येण्याविषयीचे आग्रहाचे व नम्र नियंत्रण महाराजांना दिलें.

" मलाहि तुमच्या गांवीं येण्याची इच्छा होती ती तुमच्या या निमंत्रणानें पुरी करण्याचा सुयोग आला. " असें म्हणून " पौषमासींच सर्व परिवारांसह आमच्या मोटारीनें तुमचे कडगांवीं येतो " असें महाराजांनी कडगांवच्या या भक्तांना सांगितलें. महाराजांच्या या आश्वासनानें सर्व कडगांवकर भक्तांना अत्यानंद होऊन त्यांनी महाराजांचे थाटानें स्वागत करण्याची तयारी जोरानें चालविली ! महाराजांच्या स्वागतासाठीं ते यावयाच्या दिवशीं गांवाबाहेर चार फर्लांगावर चारशेवर कडगांवचे भाविक लोक जमा झाले !

महाराजांची मोटार खळ्यांत ठेविली. तिची राखण करण्याची जबाबदारी श्री. भादु लक्ष्मण कोळी यांनी पत्करली. महाराजांच्या भेटीला येणाऱ्या कडगांवच्या आणि आजूबाजूच्या गांवाहून येणाऱ्या भाविकांना महाराजांच्या ज्ञानामृत सुबोधाचा अपूर्व लाभ मिळूं लागला! रात्रौ गांवाबाहेरील भव्य पटांगणांत श्री. अवधूत महाराजांचे सुपुत्र श्री. दत्तमहाराज यांचे जाहीर कीर्तन सुरूं झालें. कीर्तनासाठीं कडगांवचे आणि आजूबाजूच्या खेड्यांतील तीन चार हजार भाविक श्रोत्यांची गर्दी होऊं लागली! कीर्तन झाल्यावर तें पटांगण गुलाल व तांदुळ यांनी भरून गेलेले दिसे! महाराजांच्या प्रवचनांचे आणि श्री. दत्तमहाराजांच्या कीर्तनाचे कार्यक्रम कडगांवीं ५ दिवस भरगच्च होऊन महाराजांच्या दर्शनासाठी लोकांची दिवसभर रीघ लागूं लागली! या पांच दिवसांत कडगांवांतील बहुतेक ठळक ठळक लोकांनीं महाराजांचा अनुग्रह घेतला.

### मत्सरी लोकांचे उपद्व्याप

कांहीं मत्सरी दुष्ट लोकांनीं महाराजांच्या मोटारीच्या कांचा फोडण्याचा कट रचला! अनुग्रह घेतलेल्यांत सर्वश्री भादू लक्ष्मण कोळी, खुशाल दगडू महाराज हे दोघेहि होते- श्री. भादू लक्ष्मण कोळी यांचा कडक पहारा मोटारीवर होता, यामुळें या कटवाल्यांना वेत साधेना! त्यांनीं मग श्री. भादू कोळी यांना कांहीं सबबीवर गांवांत येण्याचे मोहांत पाडलें आणि त्यांच्या गैरहजिरींत एका इसमानें मोटारीवर दगडफेंक करून मोटारीची पुढील कांच फोडली! ही गोष्ट महाराजांना कोणी तरी येऊन सांगितली. अशी कांच विकत आणण्यासाठीं महाराजांचे भक्त जळगांवीं एका इसमास पाठवूं लागले त्यांना थांबवून महाराज म्हणाले "अरे तुमचे आणि माझें असा भेद नाहीं. ही माझी सर्व मालमत्ता तुमचीच आहे! दुष्ट बुद्धीनें कोणी कांच फोडली असली तरीहि त्याला तुम्ही दुखवूं नये, दुष्ट कृत्यें करणाराला परमेश्वरच शासन करतों!"

खरोखर महाराज भडगांवीं मोटारीनें गेल्यावर थोड्याच काळांत मोटारीची कांच फोडणाऱ्या इसमाचा बैल मरण पावला!

श्री अवधूत महाराज कडगांव सोडून निघाले तेव्हां नदीचे रस्त्यावर अंदाजें अर्धा तास थांबले. ते बरोबरच्या भक्तांना म्हणाले "हा गांव कडगांव फार भाग्यवान् आहे. येथें पूर्वी ऋषींचे आश्रम होते. समोरील नदी नजीकच शेतांत एक गोमुख आहे. पुरुष दोन पुरुषपर्यंत खणल्यावर तेथें सुंदर बांधकाम केलेलें एक गोमुख सांपडलें! महाराज यावेळीं कडगांवी पांच दिवस झालेल्या थाटाच्या कार्यक्रमाचा उल्लेख करून म्हणाले, "आजपर्यंत इतक्या थाटाचे व भक्तिप्रेमाचे,

कार्यक्रम मुंबई, पुणे इत्यादि मोठ्या व छोट्या गांवी या पूर्वी झाले नाहींत व पुढेंहि होतीलसे दिसत नाहीं! धन्य तुम्हां भक्तांच्या भक्तिप्रेमाची!" तुम्ही सर्व भक्तांनीं मिळून असाच भक्तिप्रेमाचा प्रचार चालू ठेवावा. आम्हीहि आलों कीं तुमच्याकडे असेच कार्यक्रम करूं. मग कडगांवीं महाराज उतरत त्याच, श्री. रूपचंद चावदस पाटील यांच्या इमारतींत, कडगांवकर भक्तांनी भजनादि कार्यक्रम चालू ठेविले.

नंतर १९३९ सालीं महाराज स्वानंदवासी झाले. १९३७ सालीं कडगांवास महाराजांचा तो अपूर्व समारंभच अखेरचा ठरला!

**कडगांवाहून जळगांवास जाणाऱ्या भक्तांना अपघात व गुरुसंरक्षण**

मागें वर्णन केलेल्या कडगांवच्या ५ दिवसांच्या मोठ्या कीर्तनप्रवचन-समारंभाच्या पुढील वर्षी गुरुमहाराजांचीं कीर्तनें जळगांवास चालू झाल्याचें कडगांवकर भक्तांना समजलें. तेव्हां कडगांवचे ७-८ शिष्य रात्रींच गाडी करून जळगांवास जण्यास निघाले. त्यांत सर्वश्री रूपचंद पाटील व चावदस पाटील होते. अमावास्येची ती काळोखी रात्र होती; थंडी मी म्हणत होती! नुकताच जोराचा पाऊस पडून गेल्यामुळें त्या थंडींत झोंबणाऱ्या वाऱ्याची भर पडली होती! गाडी भाडलीगांव ओलांडून पुढें चालविण्यांत आली, पण अचानक उलटली आणि गाडींतील सर्व इसम नाल्यांत पडून त्यांचे अंगावर गाडी पडली! नाल्यांत पडलेले चावदस पाटील यांचे खेरीज सर्व लोक कसेबसे सावरून उठले आणि गाडी सर्वांनीं मिळून बाजूला ओढून काढली. परंतु या अपघातांत चावदस पाटील यांचा हात चेंगरून मोडला व त्यांना हालचाल करतां येईना! सर्वच लोकांचे कपडे पाण्यांत पडून ओले चिप्प भिजले होते व सर्व थंडीनें कुडकुडत होते! चावदस पाटलांचा हात धक्क्यामुळें जास्त दुखू नये म्हणून गळ्यांत उपरण्याचे सहाय्यानें अडकविण्यांत आला—अमावास्येच्या दाट काळोखांत गाडी पुढें चालविली खरी, पण ओले कपडे वाळविण्यास शेकोटी करतां आली तर बरें, असें वाटलें तरी कोणाजवळही काड्याची पेटी नव्हती! गाडी थांबवून खालीं उतरलों पण आगपेटी कोठून मिळणार? सद्गुरु मोरेश्वरांचा धांवा सर्वजण मनांत करीत होते. 'सद्गुरूच आम्हांला या संकटांतून सोडवतील' असेंहि चिंतन चालू होतें! तों काय चमत्कार! एक घोडेस्वार दौडतच आमच्या बाजूला आला आणि म्हणाला, "तुम्हाला आगपेटी पाहिजे ना? ही घ्या!" असें म्हणून त्यानें अगदीं कोरी व कोरडी आगपेटी आमच्यापैकीं एकाचे हातीं दिली आणि एकदम अदृश्य झाला! गाडींतील बैठकीखालील सुकें गवत काढून आम्ही शेकोटी पेटविली आणि तिच्या

उजेडांत पाहिलें तों घोडेस्वार केव्हांच पसार झाला होता! मग आम्हीं सर्वांनीं 'सद्गुरुच रक्षण असें करतात' असें म्हणत अंग शेकून कपडेहि सुकविले आणि फिरुन गाडींत बसून जळगांवास पोंचलों आणि रंगाऱ्याच्या मठींत सद्-गुरूंचा मुक्काम होता तिथें जाऊन अगोदर महाराजांच्या चरणांवर जाऊन पडलों! अपघाताचा वृत्तांत महाराजांना सांगण्यापूर्वीं महाराज आमचेकडे पाहून बोलले,

"कायहो, सद्गुरू सर्वत्र आहे आणि तो भक्तांकरतां संकटप्रसंगीं धावून येऊन रक्षण करतो, याची खात्री पटली का?" महाराजांच्या या बोलण्यानें सर्वजण ताज्या अनुभवामुळें आनंदित झाले! मग महाराजांनीं जळगांवच्या एका भक्तास बोलावून चावदस पाटलाचा दुखरा हात चोळण्यास सांगितलें. त्यामुळें रात्रीं त्यांना स्वस्थ झोंप लागली व सकाळीं उठून पहातात तो हात पूर्वींप्रमाणें अगदीं बरा झाला, दुखापतीची थोडीदेखील खूण राहिली नाहीं! अशा संरक्षणाचा आनंद लुटणारे महाराजांचे भक्त धन्य होत!

## चावदस पाटलांचे निवडणुकीचा चमत्कार!

चावदस पाटील ग्रामपंचायतीच्या इलेक्शनला उभे होते. निवडणूक संपल्याच्या दुसऱ्याच दिवशीं पेट्यांतील मतें मोजून जळगांवीं निकाल जाहीर होणार होता. गांवांतील लोकांचा समज होता कीं चावदस पाटील पडणार! आणि त्या समजुतीनें ते निवडणुकींत पडल्याची गांवांत हूल उठली! चावदस पाटील या हुलीमुळें निवडणुकीचा निकाल ऐकण्यास जळगांवीं गेले नाहींत. दुपारीं १२ वाजतां विश्रांती-साठीं थोडे आडवे झालें तोंच त्यांना थोडी झोंप लागली. झोंपेंतील स्वप्नांत सद्गुरु मोरेश्वर महाराज आले आणि म्हणाले "अरे तूं तर निवडणुकींत निवडून आलास! झोंपलास काय ऊठ! गांवांत सर्वांना तुझ्या यशाची वार्ता कळूं दे!" चावदस पाटील उठले तोंडावर पाण्याचा हात फिरवून ते ५-६ भक्त बसले होते त्यांना भेटून स्वप्नांतील दृष्टांत सांगितला. आम्ही म्हटले "महाराय, तुम्ही निवडून आलांत, असें आतां ठाम समजा!" कांहींना हें म्हणणे पटलें नसावें असें दिसलें! आम्ही त्या दृष्टांताचा विचार करीत असतांच जळगांवाहून एक इसम सायकलनें आला आणि त्यानें आनंदानें सांगितलें "चावदस पाटील निवडून आले!" सर्वजण उठून आम्ही श्रीदत्तमंदिरांत गेलों आणि देवापुढें उदबत्ती लावून प्रभूची प्रार्थना केली! सद्गुरुवचनें कशी फलद्रूप होतात, या आठ-वणी एकमेकांस सांगूं लागलों! सर्वांच्या तोंडून त्याप्रसंगीं उद्गार निघाले "धन्य सद्गुरु अवधूत महाराज, धन्य तुमची ज्ञानबोध शक्ति, धन्य तुमचा महिमा!"

* * *

## भाग १ ला

# आठवण नं. ६१

( लेखक : श्री. लक्ष्मण संपत बारी, जळगांव )

### आईकडून संगोपन

मी जळगांवास रहातों. माझा जन्म एका गरीब शेतकरी कुटुंबांत झाला. मी एक वर्षाचा असतांनाच माझे वडील देवाघरीं गेले! ते फार धार्मिक वृत्तीचे आणि दयाळू अंतःकरणाचे होते. मग माझी आई कमलाबाई हिनें अतीशय कष्ट काढून माझें संरक्षण-संगोपन केलें. नांवाप्रमाणें ती कोमल-अंतःकरणाची पतिव्रता साध्वी होती. आईनेंच कष्ट करून तिसऱ्या इयत्तेपर्यंत माझें शिक्षण केलें. आमची थोडीशी जमीन भाड्यानें करवून माझी आई, विड्याच्या पानांचीं विक्री करी आणि जमिनीच्या तुटपुंज्या उत्पन्नाला जोड देऊन आमची दोघांची उपजीविका चालवी. वयाच्या १२ व्या वर्षीच एका चांगल्या घराण्यांतील मुलीशीं माझें लग्न झालें. तिचें नांव शेवंताबाई. आई-वडिलांच्या वळणामुळें लहानपणापासून माझी धार्मिक भावनेकडे व देवभक्तीकडे ओढ होती. मी मारुतिभक्त होतों. मारुतीचे दर्शन घेऊन दररोज पूजा अर्चा करीत असे. श्रावण महिन्यांत दर सोमवारीं शंकराला अभिषेक करवी. एकदां माझा मुलगा लहान असून फार आजारी झाला व सोमवारीं त्याची प्राणांतिक अवस्था झाली! मला घरची मंडळी 'जाऊं नको' म्हणत असतांहि महादेवाचे देवळांत जाऊन अभिषेक करून मी परत येऊन पहातों तों मुलगा हुषारींत दिसला! त्याच्या चर्येवरील आजाराचीं लक्षणें पार गेलीं होतीं! याचप्रमाणें मारुतिरायानेंहि माझें अनेक चमत्कार दाखवून संकटसमयीं रक्षण केलें!

### मोरेश्वर महाराजांचा उपदेश

१९३५ सालीं भडगांवीं जाऊन मी श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. त्यावेळीं मी भक्ति-प्रेमांत तन्मय होऊन देहभानहि विसरलों! यानंतर मला सद्गुरु माउलीवांचून कांहीं सुचेनासें झालें! जळगांवास आल्यावर माझे सहवासांतील

गुरुबंधु अकांत चौधरी, तुकाराम काळे, गणपत माळी व गोविंद बाबा असे सर्वजण एकत्र जमून भजन, पूजन व चर्चा करीत असूं.

## सद्गुरूंचा दृष्टांत

एकदां शेताला कुंपण करीत असतां, माझे समोरून दोन साप येतांना दिसले! मी अंतःकरणांत सद्गुरूंचें स्मरण करून त्या सर्पांना नमस्कार केला. दोन्ही साप माझ्या पायाजवळ येऊन एक उजव्या बाजूनें तर दुसरा डाव्या बाजूनें निघून गेला. मागेवळून पहातों तों दोघेहि अदृश्य झाले होते!

॥ गुरुशिष्यांची अभिन्न जोडी। कलिमाजीं प्रगटली ॥

या पदाचें त्यावेळीं मला स्मरण झालें!

## प्रेमळ आई व कांता देवाघरीं!

पुढें कांहीं दिवसांनीं माझी प्रेमळ माता देवाघरीं गेली! प्रपंचाची जोखीम माझ्या एकट्यावर पडली! पण सद्गुरूंच्या कृपेनें अज्ञानांत गुरफटलों नाहीं!

पुढें कॉलऱ्याच्या सांथींत माझी प्रेमळ कांता—शेवंता—देवाघरीं गेली! त्यामुळें प्रपंचभारानें माझी फार शोचनीय स्थिती झाली! 'श्रीदत्ता किती अंत पहासि' असें वारंवार म्हणूं लागलों! एका रात्रीं स्वप्नांत लक्ष्मीचें दर्शन झालें. तिनें प्रसन्न होऊन विचारलें, "चोरी करतोस?" मी नाहीं म्हटलें तेव्हां पुन्हा विचारलें "तुला धन पाहिजे?" मी 'नको' म्हटलें! मग लक्ष्मीदेवीचें मला एक ज्वारीची भाकर दिली व गुप्त झाली! मी ज्वारीचे खळ्यांतच झोंपलों होतों. त्यावेळीं सद्गुरु मोरेश्वर महाराजांनीहि स्वप्नांत दर्शन दिलें. सद्गुरूंनीं हातीं धरून उन्नतीच्या ठिकाणी नेऊन सोडलें. त्यावेळीं मला अत्यानंद झाला तो शब्दांनीं कसा वर्णूं? गुरुपुत्रांवांचून अशा आनंदाची कोणालाहि कल्पना येणार नाहीं!

## जळगांवच्या कांहीं गुरुबंधूची फसवणूक!

एका दत्तजयंती उत्सवाचे प्रसंगीं जळगांवचे सर्व गुरुबंधु, अकांत चौधरी यांच्या सांगण्यावरून पहूरपारधी येथें फकीराशेटकडे गेले. मला 'तूंहि चल' म्हणाला. मी म्हणालों, "मी गुरुमहाराजांच्या अधिष्ठानावरच जाईन." त्याप्रमाणें 'मी एकटा भडगांवीं दत्तजयंतीच्या उत्सवासाठीं गेलो. श्री दत्त-महाराज व गुरुबंधु मेघःशाम यांनीं 'जळगांवची बाकीची मंडळी कोठें आहेत?' म्हणून चौकशी केली. तेव्हां ते सर्व लोक 'पहुर पारधी' येथें उत्सवाला कसे गेले ही सर्व हकीगत सांगितली!

भडगांवच्या उत्सवाला यावेळी पंतमहाराजांच्या बाळेकुंद्री येथील अधिष्ठानाचे प्रमुख श्री. भाऊसाहेब आलें होते! त्यांच्या नेतृत्वाखालींच उत्सव थाटानें पार पडला. त्यांच्याच हस्तें भोजन–प्रसाद मिळण्याचें भाग्य लाभलें! जणुकाय माताच बालकांना भेटली असा सर्व भक्तांना आनंद झाला. 'संग कसा घडला नवलाई हें खुण बाणली दत्ता' या गुरुमहाराजांच्या उक्तीचें स्मरण झालें.

भडगांवचा उत्सव संपल्यावर मी श्री. अण्णामहाराजांची परवानगी घेऊन जळगांवला आलों. तेथें अकांतबुवा व परिचयाचे भक्त भेटल्यावर म्हणाले, "तूं आम्हांबरोबर आला नाहींस पहुर पारधीस फार आनंद झाला' मी उत्तर दिलें "तुमचा आनंद तुम्हालाच लखलाभ होवो! भडगांवास मला पंतांच्या अधिष्ठानाचे प्रमुख भाऊसाहेबांच्या हस्ते, म्हणजे आमच्या आजोळ गुरुघराण्याचा प्रसाद मिळाला!" मग ते वरमले. आणि म्हणाले, "आम्हांला अकांत बुवानें फसवलें!"

## सद्गुरूंच्या अंत्यविधीनंतरचे कार्यांत चमत्कार

सद्गुरु मोरेश्वर महाराज स्वानंदवासी झाल्यानंतर उत्तर कार्याचे १४ दिवस संपल्यावर भंडारा झाला. त्यावेळीं कडगांवचे चावदस पाटील व जळगांवचा मी (लक्ष्मण संपत बारी) भाताचे हंडे उतरविण्याचे कामावर होतों. लहाळावरून भाताचे ३५–४० हंडे उतरविले पण एकदां नुकत्याच उतरलेल्या भाताच्या ढिगावर आम्ही तोल जाऊन पडलों व वाफेनें होरपळलों असें सर्वांना दिसलें! परंतु आम्हांला कांहींहि इजा झाली नाहीं! ही गुरुमाउलीची कृपा!

## पंत महाराजांचा दृष्टांत

मी खळ्यावर झोपलों असतां एकदां महाराज स्वप्नांत दर्शन देऊन म्हणाले "अरे लक्ष्मण झोंपून काय राहिलास? ऊठ, मी सर्व घटीं कसा भरलों आहे तें पहा. मग सद्गुरु आणि मी एकरूप झालों. 'दत्तची पंत दिसती एकछंद। खुण बाणली दत्ता' ही सद्गुरुची उक्ति ऐकून तन्मय झालों. सद्गुरु महिमा खरोखर अगाध आहे!

* * *

# भाग १ ला

# आठवण नं. ६२

( लेखक : श्री. धनजी पाटील, जळगांव )

## जळगांवीं नोकरीचे शोधांत, मग महाराजांचा अनुग्रह

मी कडगांवहून १९२७ सालीं जळगांवीं नोकरीच्या शोधांत आलों आणि १९२८ सालीं म्युनिसिपालिटींत नोकरीस राहिलों. तेव्हां मला श्री. अकांतबुवा व गोविंदा यांनीं भडगांवच्या श्री. अवधूत महाराजांविषयीं गौरवपूर्ण बोलून मला त्यांचा अनुग्रह घेण्याचा आग्रह केला. त्याप्रमाणें १९३३ सालीं श्री. दत्तजन्मोत्सवासाठीं भडगांवीं जाऊन ३१ नोव्हेंबर रोजीं श्री. अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. तेव्हांपासून दरसाल उत्सवासाठीं भडगांवी जाऊं लागलों. त्यावेळीं मला महाराजांचा भक्तिप्रेम रंगानें उभारलेला परमार्थबोध ऐकावयाचा लाभ मिळे. मी अनुग्रह घेतल्यापासून माझी नोकरी संपेपर्यंत माझी बढती होत गेली आणि परमार्थाच्या विचारांना अनुसरून वागत गेल्यामुळें माझे सर्वतोपरी कल्याण झालें, हे श्री. अवधूत महाराजांच्या कृपेचें फळ !

## महाराजांच्या कृपेने मुलाचा बचाव !

१९३४ सालीं श्री दत्तजयंतीच्या उत्सवासाठीं भडगावीं गेलों त्यावेळीं घरची मंडळी शांताराम नांवाच्या सव्वा वर्षाच्या लहान मुलाला घेऊन आली होती. बरोबर अकांतबुवा, गोविंदा हरी सोनार आणि त्यांची मंडळीहि आली होती. आम्ही हिरामण यांच्या घरीं आंघोळीस जाऊन मठींत महाराजांचा परमार्थ बोध ऐकण्यास आलों; पण बाया माणसें धुणी धुवून आणण्यास मागें राहिलीं. बोधचर्चा चालू असतां महाराज एकदम मोठी गर्जना करून म्हणाले " हिरामण सोनाराकडे कोण बाया गेल्या आहेत ? त्यांचा मुलगा विहिरींत पडला पण बचावला, कोणीतरी जाऊन पहा ! " तेव्हां मी धांवत जाऊन पाहिलें तेव्हां मला समजलें कीं " विहिरींतुन बाया पाणी काढीत असतांना मुलगा तेथे जाऊन वांकून विहिरींत पहात असतां विहिरींत पडला ! पण विहिरीच्या कांठाशीच खेळत राहिलेला दिसला ! तेव्हां त्याला विहिरींतून काढून पोटाशीं धरले " पण ' तुम्हांला हें कसें समजलें !'

असे तेथील माणसांनीं विचारलें. मी म्हटलें ' महाराजांनीं सांगितल्यावरूनच मी धांवत इकडे आलों. हें ऐकून सर्व मंडळी आश्चर्यचकितच झालीं. महाराजांच्याच कृपेनें मुलगा जिवंत राहिला ' म्हणून सर्वांनी महाराजांना धन्यवाद दिले !

## श्रीक्षेत्र गाणगापूरची १९३६ सालीं यात्रा

**टीप** :—यात्रेविषयीं ( इतर भक्तांच्या आठवणी लिहून आल्या त्यांतील मजकुराची पुनरुक्ति न करतां या आठवणींतील त्यापेक्षां अगदीं वेगळीच हकीगत नोंदली आहे. )

गुरुवार ता. २ एप्रिल १९३६ रोजीं ८–१५ च्या पॅसेंजरनें निघून आम्ही कांहीं जळगांवकर भक्त शुक्रवार ता. ३ एप्रिल १९३६ रोजीं रात्रीं १० वाजतां गाणगापूर स्टेशनवर उतरलों. आमच्याबरोबर श्री अवधूत महाराज त्याच गाडींतून उतरले. रात्रभर स्टेशनवर काढून शनिवार सकाळीं ता. ४ एप्रिल १९३६ ला दुपारीं ४ वाजतां गाणगापूर क्षेत्राच्या संगमावर पोचलों. आम्हां सर्वांनाच महाराजांच्या सहवासाचा मोठाच योग लाभला ! बरोबर १०–१२ भक्त व बाया माणसें होतीं.

## कानडी मराठीचा गोंधळ

त्यावेळीं गोविंदा व तुकाराम काळे शेजारच्या खेड्यांत मातीची भांडी-कुंडी आणण्यास गेले असतां ' भांडीकुंडी ' मागणाऱ्या या मराठी बोलणारांना त्या कानडी लोकांनी रागावून हाकलून दिलें ! महाराजांकडे येऊन दोघांनीं सांगितल्यावर महाराज हंसून म्हणाले, " भांडीकुंडी या शब्दांचा अर्थ त्या कानडी बोलणाऱ्यांना विपरीत वाटल्यामुळें ते रागावले असतील ! कशाला इतकी घाई करतां ! मिळून जातील भांडीकुंडी ! " महाराजांचें हें बोलणें संपते न संपतें तोंच ते लोक महाराजांकडे आले आणि पाहिजे असलेल्या सर्व वस्तू त्यानीं दिल्या. ते लोक कसे आले आणि आम्हांला हव्या त्या वस्तू त्यांना कशा समजल्या हें फक्त महाराजच जाणोत

**एका रात्रीं शुभ्र चांदण्यांत** आम्ही महाराजांबरोबर संगमाचे कांठीं गेलों तेव्हां तर महाराजांच्या मुखांतून बोधगंगा रात्रभर वहात होती ! त्यावेळी त्या स्थानाचें माहात्म्य वर्णन करतांना महाराज म्हणाले, " भीमा नदीच्या कांठावर नरसिंह सरस्वतीचें स्थान असून पलीकडे अमरजा नदीचे कांठीं औलियाचे स्थान आहे. दोघेहि या स्थानी वारंवार भेटत. अर्थात् ही वैराग्य भूमि आहे. हा महिमा

अत्यंत भक्तिप्रेमानें महाराज सांगत होते! त्याच दिवसांत औलियाचा उत्सव असतो. तेथें जावें म्हणून आम्ही जाऊं लागलों पण अमरजा नदीस मोठा पूर आला असल्यामुळें परतलों! तेव्हां महाराजांना हें सांगितल्यावर महाराज म्हणाले, "चला आपण जाऊन पाहूं" महाराजांचे बरोबर आम्ही जाऊन आम्ही नदीपार झालों सर्वांचे कपडे कोरडेच राहिले! कसे नदीपार झालों हेंदेखील समजलें नाहीं! पलिकडील लोकांनीं पुरांतून आम्ही न भिजतां आलेले पाहून आश्चर्य व्यक्त केलें. आम्ही म्हटलें, "आलों खरें पण कसें तें समजलें नाहीं!"

औलियाचा उत्सव पाहून परततांना महाराजांनीं दुसऱ्याच मार्गानें नदी पार करून आम्हाला ठिकाणावर आणलें! या सर्व प्रकारामुळें आम्ही आश्चर्य-मुग्ध झालों! सद्गुरुंची करणी अगाध खरी, असें सर्वांना वाटलें!

## तपस्वी लोकांचा जास्त रहाण्याचा आग्रह व गहिंवर!

गुरुवार ता. ९ एप्रिल १९३६ रोजीं. बाळाभाऊ मुंबईकर, नेमाडचा चांदा आणखी एक गृहस्थ या तीघांना संगमावर अनुग्रह दिला. तेथील तपस्वी लोकांना महाराजांची सुबोध परमार्थ चर्चा ऐकून त्यांचेविषयीं फार प्रेमादर वाटूं लागला. महाराज संगमावरून परत फिरण्यापूर्वीं ते तपस्वी म्हणाले—

"महाराज आणखी थोडे दिवस रहा. येथें ३ दिवसांवर कोणी रहात नाहीं हें खरें, पण आपण तर ७ दिवस येथें राहून सप्ताह केला!" त्या लोकांनीं अशी महाराजांना आणखी रहाण्याची विनंति करतांना गहिंवरून त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या!

## गाणगापुरांत भिक्षेची फेरी

संगमावरून निघाल्यावर गाणगापूर गांवांत भिक्षेची फेरी काढण्याची महाराजांनीं भक्तांना आज्ञा केली. महाराज स्वतःच आमच्याबरोबर फेरीवर आले. मग सर्वांनीं एका घरांत बसून भिक्षेचें अन्न सेवन केलें. त्यावेळेच्या महाराजांच्या प्रेमळ वागणुकीचें वर्णन करण्याला शब्द अपुरेच पडतात! नंतर इतर यात्रिकांना दुर्लभ ठरलेलें श्री. नरसिंहसरस्वतींच्या पादुकांचें दर्शन महाराजांच्याच कृपेनें सहज घडण्याचें भाग्यहि आम्हांला लाभलें!

## सद्गुरूंचे सर्वांवर सारखें प्रेम

आम्ही गाणगापूर गांवांतून संगमावर जाण्यास निघालों तेव्हां आमच्यापैकीं कांहीजण मागें राहिले. " ते आमचे बरोबर येई तो आपण प्रेमभेट आणि प्रेमतरंग वांचू या " असें कांही भक्त म्हणाले. तेव्हां गुरुमहाराज म्हणाले " आणि माझी मुलें कांहीं मागें राहिली असतां, त्यांच्याशिवाय कसें वाचतां ? " महाराजांचें सर्व भक्तावर सारखें प्रेम होतें, हें यावरून दिसून येते !

## श्री दत्ताप्रमाणें कुत्र्यांचा सहवास

गुरुमहाराज झोंपत असत, तेव्हां त्यांच्या अंथरुणाच्या चार कोपऱ्यांवर चार कुत्रे बसलेले दिसत. महाराजांच्या चेहऱ्याभोंवती सुदर्शन चक्राकार तेजोवलय दिसत असे !

धनजी पाटलांचा मुलगा माधव आपली आठवण सांगतांना म्हणाला " महाराजांनीं संगमावर कांहीं विधी करून आम्हाला ब्राह्मण केलें "

## जागतिक क्रांतीचें स्वप्न

' जगांत क्रांती होणार ' असें तुकाराम रंगो काळे यांना गाणगापुरास असतांना स्वप्न पडलें. महाराजांना या स्वप्नाची हकीगत सांगितली तेव्हां महाराज म्हणाले, " १९४० पासून जगांत मोठी क्रांती होईल व रक्ताचे पाट वाहतील. याप्रमाणें दुसरे महायुद्ध पेटून कोट्यावधी लोक मृत्युमुखीं पडल्याची घटना प्रत्यक्ष घडलेली जगभर प्रसिद्धच आहे ! "

● ● ●

## भाग १ ला

# आठवण नं. ६३

( लेखक : श्री. बापुराव नाईक, मु. अमळनेर )

### भक्तिप्रेमाचा पाया

लहानपणींच माझी आई देवाघरीं गेली. मग माझ्या वडिलांनीं माझें थोडे फार शिक्षण करून मला लगेच उद्योगाला लावलें. पोथ्यापुराणें वाचण्याची आणि गुरुचरित्राचे सप्ताह करण्याची माझ्या वडिलांना आवड होती. साधुसंतांविषयीं ह्यांना आदर होता. शक्य तों साधू व सत्पुरुष यांना घरीं आणून त्यांचें ते स्वागत करीत. श्रीरामदास स्वामींचे मालिकेंतील सज्जनगडचे श्री. नारायण महाराज यांचा अनुग्रह माझ्या वडिलांनीं घेतला होता. वडिलांचें माझ्यावर अत्यंत प्रेम असल्या-मुळें आणि ते स्वतः अधिकारी सत्पुरुष असल्यामुळें, त्यांचाच अनुग्रह घ्यावा असें मला वाटे. पण तसें घडण्याचा योग नव्हता. कारण त्यावेळीं मी वोहऱ्याचे दुकानांत नोकरीवर होतों. याच वर्षी म्हणजे १९३२ सालीं महाराज एका भक्ताचे निमंत्रणामुळें तेथें आले होते.

### अनुग्रह मिळाला

महाराजांचें कीर्तन ऐकून, त्याचा उपदेश घ्यावा, असें मला वाटू लागलें. दररोज त्यांचें कीर्तन ऐकण्यास मी जाऊं लागलों. त्याचे निवासस्थानीं जाऊन कांहीं परमार्थचर्चाहि ऐकूं लागलों. त्यांनीं सांगितलेलें एखादे कामहि करूं लागलों; सात दिवस माझा असा क्रम चालू होता. त्यांचा बोध ऐकून मला असें वाटूं लागलें कीं यांचाच उपदेश घेऊन आपल्या जन्माचें सार्थक्य करावें. 'मग उपदेश घेण्यास किती खर्च येईल' असें तेथील परिचितांस विचारलें तेव्हां 'उपदेश घेण्यास आपल्या मनांतील कळकळीशिवाय दुसरें कांहीं लागत नाहीं' असें समजल्यावर मी श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतल्यानंतर माझी घरची परिस्थिति अत्यंत गरीबीची होती ती सुधारत गेली, असें माझ्या अनुभवाला प्रत्यक्ष आलें.

## वडिलांचीहि विरोधी वृत्ति पालटली !

मी 'श्री अवधूत महाराजांचा' उपदेश घेतलेला माझ्या वडिलांना समजल्यावर त्यांना फार वाईट वाटलें. ते मला प्रथम भडगांवला जाण्याची परवानगी देत नसत. एकदां वडिलांना कळूं न देतां मी भडगांवीं श्रीदत्तजयंतीच्या उत्सवास गेलों. त्यावेळीं 'माझ्या घरीं या' अशी मी महाराजांना नम्र विनंति केली व त्यांनी ती मान्यहि केली. वचन दिल्याप्रमाणें ते आमच्या घरीं आले. त्यावेळीं माझे वडील घरींच होते. '**जो कोणी पाहील त्याला आपलासा करण्याचें सामर्थ्य महाराजांच्या दृष्टींत आणि वागण्यात होतें.**' महाराजांना पहातांच माझ्या वडिलांनीं हात जोडून त्यांना वंदन केलें. इतकेंच नव्हे तर दोन दिवस आमच्या घरीं महाराजांना ठेवूनहि घेतलें ! त्यावेळेपासून महाराजांचा अनुग्रह घेतला. वडील मला याविरुद्ध कांहींहि बोलले नाहींत. नंतर मी भडगांवीं उत्सवानिमित्त वरचेवर जाऊं लागलों.

### भक्तिप्रेमाची निजशांति

गुरुमहाराजांच्या स्वानंदवासी समाधीनंतर श्रीदत्त महाराज तथा श्री. अण्णा महाराजहि तितकेच पारमार्थिक अधिकारानें संपन्न झाले असून मी त्यांचेकडेहि गुरुभावनेनेंच पहात असतों. त्यांच्याच नेतृत्वानें माझ्या मोठ्या मुलाचें मौंजीबंधन झालें, हें मी कधींच विसरणें शक्य नाहीं. अनेक सांसारिक अडचणींतून पारमार्थिक दृष्टीनें कसें पार पडावें याविषयीं दिव्य बोध वेळोवेळीं करून त्यांनींच मला भक्तिप्रेमाच्या निजशांतींत रहावयास शिकविलें.

आमचे गुरुबंधु मेघःशाम यांनीं येथें येण्याची तसदी घेऊन सद्गुरुंच्या आठवणी लिहिण्याची जागृति दिली त्याप्रमाणें यथामति जें लिहितां आलें तें लिहिलें.



भाग १ ला

# आठवण नं. ६४

( लेखक : श्री. गणपतराव नथू माळी, जळगांव )

## आईकडून गुरुमार्गाची प्रेरणा

मी जळगांवचा रहाणारा. माझा जन्म गरीब घराण्यांत झाला. मी अगदीं अशिक्षित आहे. गुरुबंधु मेघःशामबुवा यांच्या आग्रहावरून माझ्या अल्पबुद्धीस सुचलेल्या महारांविषयीच्या आठवणी सादर केल्या आहेत.

महाराजांचे कांहीं अनुग्रहीत भक्त जळगांवांत होते. महाराजांच्या फोटोचें अधिष्ठान ठेवून ही भक्त मंडळी भजन पूजन करीत. या भक्तमंडळींकडून मला समजलें कीं भडगांव येथील श्री. अवधूत महाराज हे अधिकारी सत्पुरुष आहेत. हें ऐकून माझें मन या महाराजांचें दर्शन घेण्यासाठीं उतावीळ झालें. मला माझ्या आईमुळें भक्तिमार्गाचें प्रेम वाटत असे. ती वैष्णव सांप्रदायाची होती आणि संतसाधूंना गुरु मानून त्यांची भक्ति करीत असे. माझी आई हमेशा म्हणत असे "तूं पण गुरु करून भक्तिमार्गाला लागावेस" आईच्या सांगण्याप्रमाणें मी योग्य गुरु शोधीतच होतो. 'निश्चयाचें बळ तुका म्हणे तेंचि फळ' या तुकोबांच्या उक्तीप्रमाणें भडगांवच्या श्रीअवधूत महाराजांचा मला शोध लागला !

## श्री दत्तजयंती दिवशीं अनुग्रह घेतला

१९२० सालीं श्री अवधूत महाराजांच्या जळगांवांतील भक्तमंडळीबरोबर श्री दत्तमूर्तीच्या अवधूत मठींतील स्थापनेच्या समारंभाचे वेळीं मी भडगांवीं अनुग्रह घेण्याच्या निश्चयी तयारीनें गेलों. या समारंभांत सेवा करणाऱ्या भक्तांची गर्दी जमली होती. भक्तिप्रेमांत रंगून सेवा करणाऱ्या भक्तांचें दृश्य मी माझ्या आयुष्यांत प्रथमच कौतुकानें पाहिलें ! अशा धामधुमींत महाराजांना माझा हेतू कसा सांगणार ! बरोबरीच्या भक्तांमार्फत हा माझा हेतू कानांवर घालण्याचा प्रयत्न मी केला तो

यशस्वी ठरला! महाराजांना माझा हेतू समजल्यावर त्यांनीं लगेच मला जवळ बोलावून श्री दत्तजयंतीच्या शुभदिनींच मला अनुग्रह देऊन पूर्ण कृपा केली! धन्य गुरुमाऊली व धन्य तो सुदिन! माझ्या मातुश्रींचा हेतू अशा रीतीनें सफल झाला. विशेष नमूद करण्यासारखा चमत्कार हा कीं अगोदर स्वप्नांतच जळगांवीं मला सद्गुरुंनीं दर्शन दिलें तेंच स्वरुप प्रत्यक्ष अनुग्रहाचे वेळीं मला भडगावास दिललें! गुरुमाउलीच्या बोधामुळें भक्तिप्रेमाचा ध्यास लागला आणि सद्गुरूंची परमार्थ चर्चा ऐकण्याची मिळणारी संधि मी केव्हांहि सोडली नाहीं. गुरुमाउलीनेंहि मला जवळ करून मातेच्या पुत्रवात्सल्यानें मला वागविले! गुरु-माउलीच्या या ऋणांतून मुक्त होणें शक्यच नाहीं. अनुग्रहोपदेश घेऊन आल्यानंतर माझ्या आईला सांगिल्यावर तिलाहि फार आनंद झाला! गुरु महाराजांचा फोटो आणून घरीं पूजेंत ठेवून आजतागायत नियमित पूजा व भजन करीत आहे. तेव्हां-पासून माझ्या घरचें वातावरण आनंदित राहून संसार–परमार्थ सुरळित चालू आहे.

## सद्गुरूंचा शुभाशीर्वाद

भडगांवास अनुग्रह घेऊन उत्सव संपून परततांना महाराज मला म्हणाले, "गणपत, आतां तूं माझा आहेस. आतां निष्काळजीनें रहा आणि संसार परमार्थ रूपानें चालीव" सद्गुरूंच्या या आशीर्वादाचें सामर्थ्य फार असल्याचा अनुभव माझ्या संसार-परमार्थांत सतत येत आहे, माझें सर्व कांहीं बरें वाईट सद्गुरूंवर अवलंबून आहे ही जाणीव जागृत राखूनच मी सुखानें वागत आहे ही सद्-गुरूंचीच कृपा.

## उत्सवाविषयीं औत्सुक्य व मनाची ओढ

श्रीदत्त–जयंतीच्या उत्सवासाठीं दरसाल जाण्याचा माझा क्रम आहे. उत्सव जवळ आला की केव्हां जाऊन गुरुमहाराजांचे दर्शन घेतों, अशी मन ओढ घेई. महाराजांनाहि भक्तांच्या आगमनाचा आनंद वाटे. त्यांनीं उत्सवांत आम्हाला सेवा सांगावी आणि ती आम्ही हौसेनें करावी, असा थाट असे. उत्सव आटोपून परत येतांना मात्र मला अतिशय वाईट वाटे! पण अवधूत बाण्याला अनुसरून 'संसार नेटका करून मग परमार्थ' अशी शिस्त असल्यामुळें संसारासाठीं घरीं परतणें भाग पडे!

## कडगांवकडे महाराजांची कीर्तन फेरी

कडगांवकडे गुरुमहाराज कीर्तनास जाणार असल्याची बातमी आम्हां जळगांव–भक्तांना समजल्यावर आम्हीं गुरुबंधू एकत्र बसून ठरविलें कीं गुरुमहाराज कडगांवला जाण्यापूर्वी तेथील भक्तांना त्यांची सर्व व्यवस्था ठीक ठेवण्याविषयीं आगाऊ माहिती पुरवून शक्य ती मदत आपण करावी. त्याप्रमाणे आमच्यापैकी ८–१० जण रात्रीं ७ चे सुमारास कडगांवकडे जाण्यास निघालों. वाटेंत आम्हां सर्वांना अतीशय तहान लागली. आजूबाजूस पाणी मिळण्याची सोय नव्हती. गांव तर अजून बरेंच दूर आहे. तेव्हां काय करावें या विचारांत चालत असता वाटेवरच एक मातीचा माठ भरलेला दिसला! सर्वांनी पाहिलें हा माठ भरून ठेवणारा कोठेंतरी आसपास असेल, तो इतक्यांत येईल असा विचार करून आम्ही १५ मिनिटें त्याची वाट पाहिली. पण कोणीच आले नाहीं आणि आसपास कोणी दिसलेंहि नाहीं. मग आम्ही सर्वजण मांठांतील गार पाण्यानें तहाना भागविल्या आणि तो माठ तेथेंच रिकामा ठेवून पुढें गेलों. ही अकस्मात् घटना गुरुकृपेनेंच घडली असावी, असा विचार करीत आम्ही कडगांवास जाऊन पोचलों. कडगांवचे दशरथ पाटील आणि सद्दु गोबा पाटील या दोघां अनुग्रहीत भक्तांनींच पुढाकार घेऊन महाराजांना कीर्तनाचें निमंत्रण दिलें होतें. त्यांचे घरीं आम्ही गेलों तेव्हां त्यांना फार आनंद झाला. याकरितां गांवच्या कांहीं प्रतिष्ठित लोकांनीहि अगत्यपूर्वक संमति दिली होती. 'माठाचा चमत्कार' त्यांना सांगितला तेव्हां यांनी कंदील देऊन कांहीं लोकांना माठाच्या तपासासाठीं पाठविलें. परंतु त्या ठिकाणीं माठ वगैरे नाहीं आणि कोणी माणूसहि नाहीं म्हणून ते लोक सांगत आले! यामुळें आमची तहान भागविण्यासाठीं सद्गुरूंनींच पाणी भरून माठाची योजन केली असावी, असेंच सर्वांना वाटलें!

श्री. दशरथ पाटील प्रभृति भक्तांनीं आमच्या कडगांवला येण्याचा हेतू आदरपूर्वक विचारून आमच्या सूचनेचे अगोदरच आमच्या म्हणण्याप्रमाणें महाराजांच्या वसतिस्थानाची योग्य व्यवस्था केली असून चारच दिवसांनीं महाराजांना सन्मानपूर्वक घेऊन येण्यासाठीं ४ भक्तमंडळी कडगांवाहून जाणार

असल्याचेंहि आम्हा जळगांवकर भक्तांना आश्वासन दिलें. या व्यवस्थेच्या आश्वासनानें आनंदून आम्ही तेथेंच रात्रीं भजन आरती वगैरे करून पहाटे ४॥ वाजतां जळगांवकडे परतलों.

## तुळशीच्या माळेवरून विनोद व बोध

एकदां आम्ही भक्तमंडळी भडगांवीं उत्सवासाठीं जमलों होतो. नदीवर स्नानासाठीं गेलों असतां श्री. फकीरशेटच्या गळ्यांतील तुळशीची माळ गंमतीनें लपविली ! तुळशीची माळ घालणारा भक्त कसा असावा, त्याचे आचार विचार कसे असावे, याविषयीं आम्ही आपसांत चर्चा करूं लागलों. जेणें विठ्ठल मात्रा ध्याची । तेणें पथ्थें सांभाळावी ॥ हा तुकाराम बुवांचा अभंगहि म्हटला ! 'विठ्ठलाच्या नांवावर तुळशीची माळ घातली पण त्या माळेला शोभेसें वर्तन न ठेवणें हें भक्ताचें कर्तव्य नव्हे' इत्यादि टीकाहि आमच्या चर्चेत आम्ही मोठ्यानें करीत होतो ! नंतर श्रीदत्तमठींत येऊन महाराजांना नमस्कार केला. फकीराशेटनी रागारागानें महाराजांकडे आपलें तुळशीच्या माळेविषयीं गाऱ्हाणें सांगितलें ! आम्ही सर्व भक्त घाबरून गेलों- महाराजांनीं रुद्रावतार धारण करून आम्हां टिंगलटवाळी करणाऱ्या सर्वांना बोलाविलें. आम्ही भीतभीतच पुढें गेलों ! 'फकिराशेटची माळ कोणी काढून लपविली !' असें महाराजांनीं दरडावून विचारलें, आम्ही मुकाट्यानें अपराध कबूल केला आणि तुळशीची माळ महाराजांपुढें ठेविली ! आमचें म्हणणें ऐकून घेतल्यावर महाराज आम्हांला सर्वांना उद्देशून बोलले "संताची सर्व लक्षणें आंगी असणारानींच माळ घालावी, हे पहा फकीरा तुझ्या आंगी अशीं सर्व लक्षणें असल्यास तूं खुशाल ही माळ घालीत जा."

## वडील बंधूंचा माझ्यावर राग व त्यांना मिळालेला धडा !

माझ्या वडील बंधूंनीं, स्वतः वैष्णव संप्रदायी असून मी महाराजांचा अनुग्रह घेतल्यामुळें, माझ्यावर रागानें भरपूर तोंड सुख घेतलें; इतकेंच नव्हे तर माझ्या सद्गुरुंचीहि भरपूर निंदा केली ! पण मी प्रत्यक्ष अनुभवानें कृतार्थ झालों याची जाणीव रागानें धुंद झालेल्या बंधूंना कशी असणार !

एकदां गुरुमहाराजांजवळ मी वडील बंधूंच्या या छळाची गोष्ट बोललों महाराज तें ऐकून म्हणाले, 'अवधूत सांप्रदाय' हा हिरा तुला दिला आहे, हा जतन करून ठेव, कोणीतरी काढून घेतील मग पश्चात्ताप पावशील. या अमोलिक वस्तूंकडे सर्वांचे लक्ष लागेल!" सद्गुरूंच्या या बोलण्याचा विलक्षण अनुभव आला! माझा छळ करणाऱ्या वडील बंधूंचे अंगांत पिशाच संचारूं लागलें! त्यावर त्यांनीं 'जंतर मंतर' 'देवस्की' इत्यादि उपाय केले, लिंब नारळ उतरण्याचेहि प्रकार केले! परंतु त्या सर्वांचा कांहींहि उपयोग न होतां त्यांची तब्येत जास्तच भडकली! पुढें त्यांना माझ्या गुरुबंधूंपैकीं एकजण भेटला. "बाबारे, असल्या त्रासांतून सुटावे, बरे व्हावे, असे तुला वाटत असल्यास तूं भडगांवास जा, तेथील गुरुमहाराज तुझ्या सर्व दुःखांचे निरसन करतील." त्या गुरुबंधूच्या सूचनेप्रमाणें माझे वडील बंधु भडगांवीं गेले आणि श्री अवधूत मठींत जाऊन त्यांनीं श्रीदत्तदर्शन घेतलें. तेथें एकदांच अंगांत आलें. नंतर आलें नाहीं आणि पिशाचबाधा नाहींशी झाली! या चांगल्या अनुभवांमुळें या माझ्या वडील बंधूंनींहि महाराजांचा अनुग्रह घेतला. मला हें कळतांच अत्यानंद झाला! सद्गुरू मागें म्हणाले होते तुला हिरा दिला आहे' 'सद्गुरुभक्ति हाच हिरा' या वचनाचा प्रत्यक्ष अनुभव माझ्या जीवनांत अनेकदां आला!

## सद्गुरूंचे निजभक्तांवरील प्रेम

आमचे गुरुबंधु मुंबईचे श्री. मुकुंद दादाजी राणे हे परम गुरुभक्त आहेत. मुंबईत त्यांनी बांधलेल्या भव्य इमारतीचें उद्घाटन सद्गुरूंचे हस्तेंच करण्याचा त्यांचा विचार असल्यामुळें भडगांवास पत्र पाठवून महाराजांना या समारंभासाठीं निमंत्रिलें होतें. त्याच सुमारास आमच्या जळगांवच्या बालगोपाळ मंडळींनीं कीर्तन ठरवून चार मुलांना महाराजांना घेऊन येण्यासाठीं भडगांवीं पाठविले होते. श्री. मुकुंदराव यांचें पत्र येण्यापूर्वींच हा कार्यक्रम ठरून महाराज जळगांवास येण्याचें तयारींतच होते. नंतर हें पत्र आल्यामुळें, महाराजांनीं ठरलेला कार्यक्रम न बदलतां महाराजांनीं मठींतील परमभक्त श्रीरावदाव यांचेकडून श्री. मुकुंदराव राणे यांना असें

पत्र लिहविलें कीं 'जळगांवच्या मुलांनीं माझा कीर्तनाचा कार्यक्रम याच मुदतींत आगाऊच ठरविला असल्यामुळें मी मुंबईस येऊं शकत नाहीं.'' 'मुलांचा' म्हणून ठरलेला कार्यक्रम रहित करावयाचा नाहीं या सद्‌गुरूंच्या निस्पृह बाण्याचें कौतुक सद्‌भक्तांनी केलें!

## चित्त शुध्द होण्यासाठीं 'आत्मस्वरूपच गुरुपीठ!'

मी महाराजांच्या ६० वें वर्ष लागल्याच्या 'ज्युबिली उत्सवा' साठीं भडगांवास गेलो होतों. त्यावेळीं एका गुरुद्रोही बाईला दिलेला पारमार्थिक धडा ऐकावयास मिळाला! पुण्याच्या कीर्तनकार श्रीमती घारूताई साठ्ये यांचे हातून अनेकदां गुरुद्रोह घडला होता. तरीहि सद्‌गुरूंनी त्यांना दूर लोटलें नव्हतें; त्यांच्याशीहि महाराज समत्वानें वागत. एकदां महाराजांचें चरणतीर्थ घेण्यासाठीं श्रीमती घारूताई समोर आल्या असतां, महाराज म्हणाले,

"हें तीर्थ तुम्ही कुठपर्यंत घ्याल? मी जिवंत असें पर्यंतच ना? माझा हा देह अग्नि देवाला अर्पण झाल्यानंतर आपण कोणत्या उपायानें 'शुद्ध' होणार? हे लक्षांत घ्यावयास पाहिजे. तुम्ही तुमच्या आत्मस्वरुपास गुरु मानून त्या आत्मचरणाचेंच तीर्थ घ्या आणि आपलें चित्त 'शुद्ध' ठेवा.'' गुरुद्रोही भक्ताला देखील सद्‌गुरूंनीं शुध्दीचा खरा राजमार्ग सांगितला हें मी प्रत्यक्ष पाहिलें असल्यामुळें नमूद करीत आहे.

## आणखी एका गुरुद्रोह्याचें उदाहरण!

एकदां श्रीदत्तमहाराज कांहीं कामाकरितां जळगांवास आले त्यावेळीं देखील श्री मनसाराम तेली यांनी त्याचे समोर वेडेंवाकडें बोलून महाराजांची निंदानालस्ती केली! हा प्रकार महाराजांना समजला. एकदां सहज महाराज बोलले "येवढ्या मोठ्या रावणानें आपल्या अचाट भक्तीनें शंकर-महादेवांना प्रसन्न करून आत्म-लिंग मिळविलें. पण त्याचा त्याला पूर्ण फायदा घेतां आला नाहीं! तात्पर्य गुरु-देवास प्रसन्न करून घेतल्यानंतर ज्यांना त्याचा सदुपयोग करून घेतां येत नाहीं तेच दैत्य ठरतात!"

## समारोप

१९२७ ते १९३९ पर्यंत सद्‌गुरुमाउलीचा सहवास मला जाऊन येऊन, घडला. त्यामुळें आमच्या घरांत आम्ही सर्व एक दिलानें रहात असून गुरुभक्तीच्या आत्मानंदांत आहोंत.

पाचोरा येथील गुरुभक्त श्री. दिगंबर यांचेकडून आम्हांला सद्‌गुरूंनी समाधी घेतल्याची अत्यंत दुःखद बातमी समजली ! हां हां म्हणतां सर्व जळगांवांत ही बातमी आगीसारखी पसरली ! सर्व भक्तांची भडगांवास जाण्यासाठीं जळगांव स्टेशनवर गर्दी झाली. भडगांवला जाऊन आम्ही सद्‌गुरूंच्या पार्थिव देहाचें अंत्यदर्शन घेतलें. त्यावेळेच्या प्रसंगाचे अलोट दुःख शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं ! आम्हां भाविक भक्तांचे हें मोठेंच कृपाछत्र गेलें ! सद्‌गुरुंच्या अंत्य-विधीचा सोहाळा उरकल्यावर आम्ही मोठ्या जड अंतःकरणांनीं जळगांवला परत आलों.

समाधीनंतरहि सद्‌गुरुमाऊलीच्या कृपाप्रसादानें आमचा संसार-परमार्थ ठीक चालला आहे.

❀ ❀ ❀

आठवणी भाग पहिला समाप्त





श्री अवधूत महाराजांच्या चरित्रलेखनाची माहिती कष्टपूर्वक गोळा करणारे त्यांचे प्रेमळ शिष्य श्री. ह. भ. प. मेघःश्याम पांडुरंग संकपाळ बांबवडेकर



भडगांव गिरणा नदीच्या घाटावरील प्राचीन महादेव-मंदिर आणि
त्या समोरील श्री अवधूत महाराजांच्या स्मारकाचा स्तंभ

# भाग दुसरा

## श्री मोरेश्वर केशव दातार

## तथा

## श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर

# श्री मेघःशाम पांडुरंग संकपाळ, बांबवडे

## गुरुबोधाविषयींचें वेड

इ. स. १९२४ ला मी मुंबईंत करीरोड येथें मुक्कामास होतो. माझा चुलत भाऊ मला मुंबईंत घेऊन आला होता.

माझे गांवा नजिकच्या येळा गांवचे श्रीयुत रामचंद्र मोहिते हे मुंबईंत घोडपदेव येथील 'दावासासून' गिरणींतील वीव्हिंग खात्यांत हेड जॉबर होते. ते श्री अवधूत महाराजांचे अनुग्रहीत असून त्यांची राहणी पारमार्थिक सत्वशीलतेची असे. माझे एक मित्र त्यांच्याकडे राहात व त्याच गिरणींतील कामगार होते. मी या मित्राला भेटण्यास वरचेवर जात असे. एका रविवारच्या सुटीचे दिवशीं मी माझ्या मित्राला भेटण्यासाठीं श्री. रामचंद्र मास्तर यांच्याकडे गेलो त्यावेळी श्री मास्तर व काहीं मंडळी त्यांच्या बैठकीचे खोलीत श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर याच्या वाङ्मयाची ते चर्चा करीत होते. एका आसनावर **श्री. पंत महाराज बाळेकुंद्रीकर** आणि **श्री अवधूतमहाराज कुरुंदवाडकर** यांचे भव्य फोटो ठेविले होते. दररोज तेथें भजन आणि परमार्थ चर्चा चाले. मी खोलींत गेल्यावर एका बाजूस बसून पारमार्थिक चर्चा ऐकूं लागलों. मी एकदां प्रश्न केला "आपण कोणत्या ग्रंथांतील वाङ्मयाविषयीं चर्चा करीत आहां" मास्तर म्हणाले "आम्ही पंतमहाराजांच्या ग्रंथांतील वाङ्मयाची चर्चा करीत आहों" असें म्हणून त्यांनीं **पंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांचीं प्रेमलहरी, प्रेमतरंग** व **प्रेमभेट** हीं पुस्तकें माझे पुढें ठेविलीं. अशा रीतीनें सत्पुरुषांचें वाङ्मय पहाण्याचा सुयोग मला लाभला. कांहीं भाग वाचून पाहिले तें वाङ्मय फार गोड वाटलें. सर्व वाचून काढावें असें वाटूं लागलें, नंतर दररोज तेथें जाऊन प्रेमतरंग वगैरे वाचूं लागलों. मी चांगलें वाचतो असें वाटल्यावरून तेथील मंडळींनीं वांचण्याची कामगिरी माझ्यावरच सोपविली! अशा रीतीनें बऱ्याच पुष्पांचे वाचन झालें. पण मला त्यांतील भावार्थ कळत नव्हता. मास्तर समजून सांगत त्यामुळें थोडथोडा परमार्थ-प्रकाश डोक्यांत पडूं लागला! मग एक दिवस मास्तरना मी विचारले 'हे सत्पुरुष हयात आहेत कां! आणि ह्यानींच प्रेमलहरी इत्यादि

वाङ्मय लिहिल नां ?" श्री. मास्तर म्हणाले "पंत महाराज स्वानंदवासी झाले. पण त्यांच्या लगतचा फोटो कुरुंदवाडचे श्री. मोरेश्वर केशव दातार तथा श्री. अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांचा आहे. ते मात्र हयात आहेत. आणि त्यांचाच अनुग्रह आम्ही घेतला आहे" लगेच श्री. अवधूत महाराजांची इत्थंभूत माहिती सांगून मास्तरनीं मला उपकृत केलें! मास्तरांनीं केलेल्या वर्णनावरून मला श्री मोरेश्वर महाराजांच्या दर्शनाची तळमळ लागून राहिली. माझ्या लहानपणापासून माझ्या आईच्या आग्रहावरून मी तिला अनेक धार्मिक पोथ्या वांचून दाखविल्या होत्या. त्यामुळें मला देवभक्ति व धार्मिक विचार यांची गोडी लागली होती. माझ्या घरची बहुतेक मंडळी वैष्णव पंथी होती. पंढरपूरचे भागवतबुवा आमचे मार्गदर्शक होते. मला सद्गुरुप्राप्तीचीं तळमळ लागली नव्हती याचे आईला वाईट वाटे. 'सद्गुरुवांचून जीवन व्यर्थ' असे ती म्हणे! सन १९२२ पासून-साधुसंतांच्या गांठी भेटी घेण्याचा नाद मला लागला होता. उपासनीबाबा, केडगांवचे नारायण महाराज, सांगलीचे हणमंतराव कोटणीस इत्यादि साधुपुरुष आणि त्यांचे भक्त यांची दर्शने घेऊन त्यांचा परमार्थ समजून घेण्याचे प्रयत्न मी केलें. परंतु ह्यापैकीं कोणाचा उपदेश घेण्याची इच्छा मला झाली नाही! परंतु श्री. रामभाऊ मास्तर यांनीं मजकडून श्रीपंत महाराजांचें वाङ्मय वांचून घेतल्या पासून मला वाटूं लागले की, या वाङ्मयांतील परमार्थाचे विचार खरोखर फार सरस आहेत. नंतर मी श्री अवधूत महाराजांविषयीं विशेष चौकशी केली. तेव्हां त्यांचे कडून समजले की, ते भडगांवला असून १५ दिवसांनीं मुंबईस येणार होते, त्यांच्या कीर्तनाचा कार्यक्रम मास्तर ज्या गिरणींत होते तेथील लोकांनीं ठेविला होता. ते आले की त्यांची भेट करविण्याचें आश्वासन मला श्री. रामभाऊ मास्तरानीं दिलें. "**श्रीपंतमहाराजांच्या पारमार्थिक तत्वाचा प्रचार श्री अवधूत महाराजानींच करावा**" असा त्यांचा गौरवहि मास्तरांनीं केला! यामुळें अवधूत महाराजांच्या येण्याकडे मी लक्ष लावून राहिलों—रोज मास्तरांचे बिऱ्हाडीं जावे, त्यांची व त्यांच्या गुरुबंधूंनी चालविलेली पारमार्थिक चर्चा ऐकावी, कांही प्रश्न विचारून समाधान करून घ्यावें, असा क्रम चालू ठेविला...अवधूत महाराजांच्या कीर्तनासाठीं गिरणगांवांतील मोठ्या मैदानांत गिरणीकामगारांनीं मंडप उभारण्याची धामधूम चालविली, मीहि हौसेने त्यांत भाग घेतला. मुंबईतील मोठमोठे धनिक, शेटसावकार, अधिकारी वर्ग, शास्त्री—पंडित वगैरे हजारों लोक श्री अवधूत महाराजांचे चहाते असल्याचें मला यावेळीं आढळून आलें. मला या सर्व गोष्टीचें कौतुक वाटले. १०–१२ दिवसांत सभा–मंडपाचें काम संपलें. आणि सर्व लोक श्री अवधूत महाराजांच्या आगमनाची वाट पाहूं लागले. श्री अवधूत महाराज १०–१२ दिवसानंतर आले आणि खत्तर गल्लीत श्री जयकर यांचेकडे उतरल्याचें मला समजलें. दुसऱ्या दिवशी

पासून कीर्तनास सुरवात झाली. मलाहि महाराजांच्या दर्शनाची व भेटीची उत्सुकता होती. परंतु याचवेळीं माझा भाऊ थंडीतापानें आजारी झाल्यामुळें आणि त्याचा आजार वाढतच गेल्यामुळें मला त्याची शुश्रूषा करणे प्राप्तच होते. त्याला साधारण बरें वाटल्यावर मी त्याच्याच परवानगीनें श्री अवधूत महाराजांचें कीर्तन दूर बसून ऐकलें! व कीर्तन संपल्यावर थेट घरीं परत आलों! त्यावेळीं भेटीचा योगच नव्हता!

## माझ्या मनाची धरसोड

कोल्हापुरी सत्यसमाजिस्टांच्या तमाशांचे वारे आमच्या गावाभोवती पसरलें होतें; त्यांतून मी आलों होतों! या वाऱ्यांनीं माझे विचार भारलेले होते! ही माझी मनस्थिति मी मास्तरना मनमोकळेपणाने सांगितली. श्रीअवधूत महाराजांच्या कीर्तनांतील बोध आणि भक्तिमार्गाचें निरूपण मला आवडले. परंतु "ते ब्राह्मण असल्यामुळें त्यांना शरण कसे जावे, अशी सत्यसमाजी घाटाची शंकाहि मी बोलून दाखविली! माझी ही शंका ऐकून मास्तर थक्कच झाले! ते म्हणाले "उद्यां सुटीचा दिवस आहे. तेव्हां श्रीअवधूतमहाराजांच्या भेटीला तू मजबरोबर ये. मग काय तें ठरव."

## बोधवर्षावानें शंका–निरसन

श्रीअवधूतमहाराज श्रीजयकरांचे बिन्हाडी खुर्चीवर बसले होते अशा वेळी आम्ही तेथे गेलो. मास्तरनी महाराजांना नमस्कार केला ते पाहून मलाहि तसाच नमस्कार करणे भाग पडले! मी नमस्कार करून आम्ही दोघेहि त्यांच्या नजीक बसलो. श्रीअवधूतमहाराजांनी बोलण्यास सुरवात केली ती जणुं माझ्या मनांतील शंका निरसनासाठींच असें मला वाटले! कारण कांहीहि प्रश्न न विचारतांच महाराजानी आपल्या भाषणांत माझ्या मनातील सर्व शंकांचे निरसन केले! 'ब्राह्मण कोणास म्हणावे?' हा महाराजांच्या भाषणाचा विषय होता. नंतर शिष्य कोणास म्हणावे आणि त्याने कोणास शरण जावे व कसे शरण जावे, याचाहि महाराजानीं निस्पृह शब्दांनीं स्पष्ट खुलासा केला. शास्त्राच्या आधारेच महाराज सर्व खुलासा करीत होते. ऐकणाऱ्याला आपलासा करून घेण्याची जबर शक्ति महाराजाच्या भाषणांत मला दिसली. पुढें आलेला श्रोता समाधान पावूनच जावा, अशी त्यांची भाषण–शैली होती! आम्ही दोघेहि महाराजांचा बोध चित्रासारखे स्तब्ध होऊन ऐकत होतो! दीड तास होऊन गेला हेंहि आमच्या लक्षांत आलें नाहीं! वेळ बराच झालासे पाहून मास्तरांची जाण्याची वेळ टळेल म्हणून ते अखेर महाराजांचा निरोप घेण्यासाटीं उभे राहून म्हणाले "या मुलाला आपला उपदेश घेण्याची इच्छा आहे." महाराज हसून म्हणाले "रामभाऊ, उपदेशाची गडबड करूं नका!

येथें आमचा मुक्काम एक महिना आहे. तेव्हां आणखी कांही बोधपर खुलासा ऐकल्या नंतरच 'या ब्राह्मणाचा' उपदेश त्याने घेतल्यास बरें."

श्री. अवधूत महाराजांचे सदरील शब्द ऐकल्यावर मी खिन्न मुद्रेनें मान खालीं घालून परत आलो! श्री. रामचंद्र मास्तरांनी मला महाराजांचेकडे नेऊन त्यांचा अनुग्रह मला देवविण्याची इतकी खटपट केल्यानंतर महाराजांच्या सदरील शब्दांनी काय वाटलें असेल, ते त्यांचे तेच जाणोत!

नंतर ठाकुरद्वारच्या काळाराम-मंदिरांत महाराजांचें कीर्तन चालू झालें. मी त्या ठिकाणीं कीर्तन श्रवणास जाऊं लागतों. कीर्तनांतहि सर्व निरूपण जणुं माझ्या करितांच आहे, असे मला वाटे! गोड आवाज, निरूपण करण्याची उत्कृष्ट शैली आणि परमार्थ विषयाची फोड करण्याची बालबोध पद्धत आणि त्या विषयींचे गाढ ज्ञान, यांमुळें सर्व प्रकारचे श्रोते थक्कच होऊन जात! कीर्तनास नियमित जावें आणि महाराजांचे निवासांत जाऊन हृदयपूर्वक सर्व परमार्थ चर्चा ऐकावी असा मी महिनाभर क्रम चालविला. एक महिन्यानंतर श्री. मास्तरना भेटून मी म्हटलें, "श्री अवधूत महाराजांचा उपदेश घेण्याविषयी माझ्या मनाची आतां पूर्ण तयारी झाली आहे, तेव्हां कसेहि करा आणि मला महाराजांकडे घेऊन चला." असे म्हणून मी मास्तरांचेच घट्ट पाय धरले! पण काय उपयोग? कीर्तन संपल्यावर दुसरेच दिवशीं महाराज भडगांवीं गेल्याचें समजलें. मग मला वाटलें

"माझें अंतःकरण शुद्ध नसून मी पापी आहे म्हणूनच असें घडलें. एकंदरींत या खेपेस तरी माझी परीक्षा होऊन मी हिणकस ठरलों."

## सद्‌गुरु-भेटीची तीव्र तळमळ!

महाराज भडगांवीं गेल्यानंतर मी अगदीं बेचैन झालों. कांहीं वाचलें तरी तिकडे लक्ष्य लागेनासें झालें. कोणाशीं चर्चा केली तरी बरं वाटत नसे. एक प्रकारें माझा स्वभाव त्या वेळीं चिडखोर बनला! मात्र मास्तरांचेकडे जाणें येणें व परमार्थ चर्चा ऐकणें चालूच होते. अशा विमनस्क स्थितींत चार महिने काढले!

चार महिन्यानंतर महाराज मुंबईस आले; ही बातमी समजतांच मी श्री. मास्तरना भेटलों. मास्तरनी आपला गुरुबंधु सदाशिव याचे बरोबर मला सर्व अनुग्रह-साहित्याच्या तयारीनिशीं पाठविलें! १९२५ सालच्या चैत्रमासीं रामनवमीचा तो दिवस होता. दोन प्रहरीं १२ वाजतां श्री अवधूत महाराजांनीं श्री. जयकर यांचे बिन्हाडीं मला अनुग्रह देऊन पूर्ण कृपा केली! त्या वेळीं मी अवघा १९ वर्षांचा होतो. 'श्री गुरूमहाराज मला श्रीदत्तदर्शन घडवितील," अशी माझी अनुग्रह घेण्यापूर्वी कल्पना होती. कांहीं जुन्या भक्त मंडळीच्या बोलण्या वरून मी असल्या भावनेनें भारला गेलों होतों! मला

एकांतांत गुरू महाराजांनीं उपदेश दिला त्यावेळीं ज्ञानचक्षु खुला होणें, आत्मदर्शनासंबंधीं अलक्ष्य मुद्रा लागणे इत्यादि श्रीगुरुमहाराजांनीं मजकडून करवून घेण्याचा उपक्रम केला. आपल्या सन्मुख मला घेऊन षट्द्वार बंद करून अलक्ष्य मुद्रा लावली. मग मला गुरुमहाराजांनीं विचारलें, "कायरे, कसला रंग दिसतो ?' मला त्या रंगांतच दंग होणें नको होतें. मला श्रीदत्तदर्शन हवें होतें ! मी कांहींच उत्तर दिलें नाहीं, काय हवें तें बोलून सांगितलेंहि नाहीं ! पुन्हां पुन्हां प्रयत्न करून महाराज मला प्रश्न विचारीत. परंतु मजकडून उत्तरच नाहींसें पाहून महाराजांनीं फिरून विचारलें, "तुला कसला प्रकाश दिसतो कां ?" हा प्रश्न विचारल्याबरोबर माझ्या लक्षांत आलें कीं, "गुरुमहाराजांनीं तीन शिरांचें श्रीदत्त स्वरूप धारण केल असावें" ! ही कल्पना मनांत आल्याबरोबर मी म्हटलें, "गुरुमहाराज डोळ्यावरील हात काढा.' गुरुमहाराजांनीं हात काढताक्षणीं मी चटकन् वळून त्यांचेकडे पाहिलें, तेव्हां त्यांना एकच शीर असलेलें पाहून म्हटलें, "गुरुमहाराज पुन्हा माझे डोळे बंद करा" ही माझी लटपट पाहून महाराज रागावलेले दिसले ! मी चटकन् बोललों "मला अनुभव आला !"

## फिरून संशयाचे फेऱ्यांत !

मी गुरुमहाराजांकडून अनुग्रह घेतला, त्यावेळीं, पंतमहाराज बाळेकुंद्रीकरांचे शेवटचे अनुग्रहीत ('शेंडेफळ') परमभक्त श्री. शिवाप्पा हे हजर होते. ते गुरुमहाराजांना म्हणाले, "गुरुमहाराज आज रामजन्मदिन, अशा **शुभ दिवशीं या पोराचा पारमार्थिक जन्म** झाला आहे. अर्थात् श्रीरामप्रभूच्या वैराग्याचा लाभ याला होणार हें निश्चित !" त्यांच्या या प्रासादिक बोलण्याचें मला त्यावेळीं कांहींच वाटलें नाहीं. मला महाराजांनीं श्रीदत्तदर्शन दिलें नाहीं, याची अढी त्यावेळीं माझ्या मनांत होती ! शिवाप्पा माझी समजूत काढण्यासाठीं कांहींतरी बोलले, असेच मला त्यावेळीं वाटलें !

## श्रीपंत अधिष्ठानाकडे धावपळ !

बाळेकुंद्रीस जाऊन श्रीपंतबंधु श्रीगोविंददादांना भेटावें आणि त्यांचेकडून श्रीदत्तदर्शनाचा अनुग्रह घ्यावा, असे वारें माझ्या डोकींत शिरलें ! कोणासहि न सांगतां मी मुंबई सोडून निघालों. जवळ मुळीच पैसा नसल्यामुळें तिकिटाशिवायच कोल्हापूरपर्यंत प्रवास केला ! कोल्हापूर स्टेशनमधून बाहेर पडल्यावर एक मित्र मला भेटला. त्यानें 'कुठें निघालास ?' म्हणून विचारलें. 'महत्वाच्या कामासाठीं बेळगांवांस जातो' अशी थाप मारली ! पण मजजवळचे पैसे संपल्याचेंहि सांगितले ! तो म्हणाला "कांहीं हरकत नाही माझ्याबरोबर कागलपर्यंत चल,

मग तुला बेळगांवला पाठविण्याचें पाहूं" त्याच्या जवळचे फराळाचें खावयास मिळाल्यामुळे दीड दिवसाच्या उपासाचें पारणें फिटलें! माझ्या या मित्राच्या **बहिणीचे पति कागलास मामलेदारीचे हुद्यावर** होते; त्यांचेकडे त्याच्या-बरोबर उतरलों. ते मला ओळखीत असल्यामुळें त्यांनीं "बेळगांवास कशाकरितां जात आहां" असें मला विचारलें. "बाळे कुंद्रीकर श्री. गोविंददादा यांना भेटायास जाणार आहे." असें त्यांना मी खरें तें सांगितलें! मामलेदारसाहेब म्हणाले "छान! ते तर येथें आल्याला चार दिवस झाले. त्यांचा मुक्काम येथील राजवाड्यांतच आह"! श्री. **मामलेदारसाहेब** पंतांचे अनुग्रहीत असून मनाचे मोठे प्रेमळ. 'पंत घराण्याचा व माझा निगडित संबंध आहे" असेंहि त्यांनीं सांगितलें. माझी सर्व चौकशी केल्यानंतर ते म्हणाले "उदईक आपण राजवाड्यांत जाऊन श्री. गोविंददादांचें दर्शन घेऊं." हें ऐकून मला अत्यानंद झाला; कारण माझे अनायासें आयतेच साधणार होतें!

दुसरे दिवशी लौकर उठून श्री. मामलेदार साहेबांबरोबर जाऊन सकाळी ८ चे सुमारास राजवाड्यांत पोचलों. भव्य सिंहासनाच्या बैठकीवर श्री. गोविंददादा बसले होते. जमलेली मंडळी त्यांचे परमार्थ–विवरण शांत चित्तानें ऐकत होती. मी श्री. दादांचें दर्शन प्रथमच घेत होतों! श्री पंत–भक्त मामलेदार साहेब म्हणाले, "मी पुढें होतो माझे मागोमाग तुम्ही दर्शनास या" त्यांनी गर्दीतून जाऊन श्री. दादांना नमस्कार केला. मीहि नमस्कार करून बाजूस उभा राहिलों. श्री. दादांनीं ह्यांना विचारलें, "हा मुलगा कोणाचा?" श्री. मामलेदार साहेब म्हणाले, "हा मोरबांचा अनुग्रहीत आहे." माझ्या गुरू महाराजांचें नांव ऐकतांच श्री. दादांना अत्यानंद झाला व त्यांनीं मला जवळ बोलाविलें. डोकीवर वरदहस्त ठेवून पाठीवरून हात फिरविला. मग मला विचारले "कायरे, तुझे गुरुमहाराज कोठें आहेत? मी त्यांना चटकन् उत्तर दिले नाहीं! कारण "मोरबांचा अनुग्रहीत" असे श्री. मामलेदार साहेबांनीं सांगितल्यामुळें मी ओशाळलों होतों! गुरुमहाराजांना सोडून मी श्रीदत्तदर्शन घेण्यासाठीं धांवपळ करीत आलों असतां हा परिचयाचा घोटाळा नडणार असे मला वाटलें! भीतभीतच मी उत्तर दिलें "गुरुमहाराज मुंबईंत आहेत." मग श्री. दादा म्हणाले,

**"मोरबानींच पंतांचा बोध खरोखर पचनीं पाडून लोकांत त्याचा प्रचार केला, हें आम्हांला देखील साध्य झालें नाहीं. सर्व देशभर फिरून त्यांनी हजारों लोकांना गुरु–भक्तीचें वेड लावलें."** असे उद्गार काढल्यावर श्री. गोविंद दादांनीं मला फिरून विचारलें 'तुझ्या गुरु महाराजांचा कीर्तनाचा कार्यक्रम ठें चालू

आहे ?" मी सांगितले "गांवदेवी मुंबई येथें चालू आहे." पुढें दादा म्हणाले, "मी तुला भेटल्याचें सांगून त्यांना माझा प्रेमपूर्वक नमस्कार सांगण्यास विसरूं नको!"

श्री गुरु **महाराजांविषयीं दादांची किती पवित्र आणि पूज्य भावना** आहे आणि गुरु महाराज किती अधिकारी आहेत, या विषयींचा प्रकाश आतां माझ्या डोक्यांत पडला! श्री. दादांनीं हाच आपल्यास अनुग्रह दिला असें समजून, केल्या अपराधाची क्षमा मागून—त्यांचेच पाय धरावे, असा विचार जागृत झाला! निमूटपणे जाऊन मी श्री. दादांचे पाय धरिले आणि बाहेर आल्यावर थेट कोल्हापुरच्या रस्त्याला लागलों! कोल्हापूर स्टेशनवरून फिरून तिकिटाशिवायच प्रवास सुरूं केला! मनामध्ये चेकरची भीति सारखी होती! अखेर मिरजेहून पुण्याच्या गाडींत बसतांना खरोखरच चेकरनें पकडलें! तिकीटच काढले नसल्यामुळें त्याला तिकीट दाखविणार कसें? माझ्या जवळ पैसे नसल्याचें समजताच चेकरने मला डब्याबाहेर खेचलेंच! 'मी कोल्हापूरहून आल्याचें' खोटें मानून त्यानें धारवाड पासून डबल भाडें घेण्याचा धाक घातला! माझी घाबरगुंडी उडून अंगाला घाम फुटला! मनांत गुरुमहारांचें चिंतन मात्र चालूं होतें! इतक्यांत तेथे दुसरा एक चेकर आला। त्याने मला ओळखून विचारलें "कारे इकडे कुठें? हा काय प्रसंग? कुठें जाणार?" तो **माझा चुलत मामाच** असल्यामुळें त्याला पाहून मला आनंद झाला! त्याला माझी खरी हकीगत पटण्यासारखी नसल्यामुळें 'कोल्हापुरास मावशीला भेटून आलों' असे सांगितलें!

मग मला पकडणारा चेकर व दुसरा चेकर-माझा चुलतमामा—यांनी एकीकडे जाऊन कानगोष्टी केल्या आणि नंतर माझी सुटका होऊन मला माझ्या **चुलत मामानें किर्लोस्कर वाडीचें तिकीट काढून** दिले, आणि मला पुण्याकडील गाडीत बसवून वर खर्चाला खाऊ म्हणून दहा रुपयेहि दिले! परंतु किर्लोस्कर वाडीस उतरल्यावर मी गार्डाला भेटून ४॥ रु. दिले आणि थेट मुंबई—बोरीबंदरची पावती घेऊन मुंबईस आलों!

श्रीगुरुमहाराजास भेटण्यास निघालों त्यावेळीं मनांत विचारांची गर्दी उडाली! अखेर "गुरुमहाराज कांहींहि म्हणोत, त्यांचे पाय घट्ट धरून क्षमा मागावयाची", असें मनानें ठरविले. मी केलेल्या धांवपळीची कसलीच कल्पना महाराजाना नव्हती! मला पाहिल्या बरोबर श्रीगुरुमहाराज म्हणाले "कायरे, चार दिवसांत इकडे फिरकला नाहींस?" त्यांचे हे शब्द ऐकतांच मी पाया पडून त्यांच्या पायास मिठी मारली आणि डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या! हें पाहून महाराजांचें अंतःकरण द्रवलें! ते म्हणाले "उठून बैस आणि काय झालं तें सांग"!

मुद्रा दाखविते वेळीं झालेली माझ्या मनाची धांदल, श्रीदत्तदर्शनाची माझ्या मनांतील हांव, ती पूर्ण करणे करतां श्री. गोविंद दादाकडे केलेली धांवपळ, वगैरे इत्थंभूत हकीगत सांगून मी फिरून महाराजांचे पाय घट्ट धरलें आणि 'क्षमा करा' म्हटलें !

श्री गुरुमहाराज मग म्हणाले "आतां माझे चरणांवर पडलाच आहेस. तेव्हां येथून उठणार नाहीं हीच भावना पक्की कर, त्यांतच तुझे कल्याण आहे" नंतर मी धीर आल्यावर श्री गोविंददादा यांनीं सांगितलेला निरोप व नमस्कार महाराजांनां सांगितला. श्री. गोविंददादांनी त्यांचा केलेला गौरवहि महाराजानीं शांतपणानें ऐकून घेतला. महाराजांचेकडेच राहून मी पांच दिवसांनंतर करीरोडला गेलों !

करीरोडकडे राहणारा माझा चुलतभाऊ मला चोहोंकडे हुडकून थकून गेला आणि मी गांवीं गेलों असेन या कल्पनेने त्यानें माझ्या चौकशीसाठीं गांवाकडेहि पत्र पाठविलें होतें. मी करीरोडला गेलों त्याच दिवशी मी गांवी गेलों नसल्याचे उत्तर येऊन काळजी व्यक्त केली होती! तें पत्र वांचतांच मी आईला पत्र लिहिलें "मी मुंबईतच आनंदांत आहे काळजी करूं नको"! भावानें चार दिवस बेपत्ता झाल्या विषयीं मला रागानें विचारलें त्यावेळी "मी ४–५ दिवस गुरु महाराजांकडेच" असल्याचे त्याला सांगितलें! त्यांचें तेवढ्यानें समाधान झालेसे दिसलें !

नंतर दररोज गांवदेवीस गुरुमहाराजांचें कीर्तन चालू होते तिकडें जाऊन कीर्तन ऐकावें आणि प्रत्येक रविवारीं व सुटीचे दिवशीं आणि नंतर १५ दिवस महाराजांच्या निवासस्थानीं जाऊन परमार्थ–चर्चा ऐकण्याचा कार्यक्रम चालू ठेवला होता.

तीन चार महिन्यानंतर माझा चुलतभाऊ आजारी पडून आषाढ महिन्यांत देवाघरी गेला. त्यावेळीं मला अत्यंत दुःख झाले. माझा तो भाऊ फार प्रेमळ होता, त्यामुळे मी अगदी अस्वस्थ झालो! माझ्या मनाची ही स्थिति महाराज मडगांवला गेले होते त्यांना पत्राने कळविली. त्यावर उपदेशपर मोठें पत्र गुरुमहाराजांनी मला पाठविलें. 'मी गुरुपौर्णिमेस मुंबईस येत आहे. त्यावेळीं मला भेट" असेंहि त्या पत्रांत लिहिलें होतें.

आठ दिवसांनीं महाराज मुंबईस आलेले कळतांच मी त्यांना भेटावयास गेलो. मला पहातांच माझें सांत्वन करण्यासाठीं महाराज म्हणालें "बाबारे, देह हा क्षणिक आहे, त्याचा मोह प्रत्येकानें सोडावा हें बरें. आपलें मूळ स्वरूप पहाण्यांतच सुख लाभते. मूळ स्वरूपाचा विसर पडला की मनुष्य दुःखाच्या

फेऱ्यांत गिरक्या खातो "! असें म्हणून महाराजांनीं मला एक पद पाठ करण्यास सांगितलें त्याचा एकचरण असाः—

"क्षणिक सुखा भुलसी किती । भ्रमसि कां मना ॥"

दुःखाचा विसर पडावा असा आत्मबोध करून महाराजांनीं मला आपल्या गांवीं जाण्याची सूचना केली. त्याप्रमाणें मी गांवीं गेलों आणि तिकडेच ७–८ महिने राहिलों. घरची गरिबी आणि सर्व नात्याच्या मंडळीची व आप्तेष्टांची फुटाफूट झालेली अशी स्थिति होती! जमिनी कोणी पहाणारे नसल्यामुळें पडूनच होत्या! 'परत मुंबईस जावें' असें वाटूं लागलें! 'पण मुंबईत माझा प्रेमळ भाऊ आतां नसल्यामुळें कोणाचा आधार ?' असेहि वाटून मन अगतिक व उदास झाल! अशाच स्थितींत एक महिना गला. नंतर 'गुरुमहाराज तुझी आठवण काढतात तेव्हां मुंबईस ये' असें मास्तरांचें पत्र आलें! हें पत्र वाचतांच मला आनंद झाला आणि आईचा व भावांचा निरोप घेऊन **मी १९२६ मध्यें** मुंबईस आलो आणि घोडपदेव येथें श्री. मास्तरांच कडेच उतरलों. संध्याकाळीं गुरुमहाराजांना भेटून वरचेवे र त्यांच्या कीर्तनास व भेटीस जाऊ लागलों १९२६ ते १९३१ पर्यंत 'दावा सासून' गिरणींतच कामावर होतो, मुक्काम हाजीकासम चाळींत श्री. मोहिते मास्तरांचे कडेच होता. त्यांच्या बैठकीचे खोलींत पूर्वीप्रमाणेंच भजन–पूजन चालूं होतें. महाराजांचा संबंध मात्र अगदीं निकटचा झाला. कीर्तनास जावें, नोकरी करावी, आणि दर महिन्यास घरखर्चासाठीं गांवीं पैसे पाठवावे, असा कार्यक्रम आनंदानें पार पडूं लागला. गांवची कांहीं मंडळी मुंबईस आल्यावर त्यांची व महाराजांची भेट करवून द्यावी आणि त्यांनीं अनुग्रह घ्यावा असेहि घडूं लागलें. नंतर असें वाटूं लागलें कीं ज्या गुरुमहाराजांच्या कृपेनें आपण धन्य झालों त्यांना आपल्या गांवीं एकदां न्यावें. आणि त्यांच्या कीर्तनांचा व बोधामृताचा गांवच्या लोकांना फायदा द्यावा. आपलें घर महाराजांच्या पायधुळीनें पावन व्हावे असाहि पोटांत हेतू होताच.

## १९२५ सालीं महाराजांचा अनुग्रह

अनुग्रह घेतल्यापासून घरीं महाराजांच्या अधिष्ठानापुढें भजन–पूजन–आरती वगैरे कार्यक्रम मी चालू केलाच होता. माझ्या चुलत घराण्यांतील मंडळी 'आजकालच्या शिक्षणांत' वाढलेली आहेत, त्यामुळें बहुतेकांचें रहाणें बाहेरगांवींच असते. यापैकीं एक घराण बडोद्यास असून त्यांतील २०-२५ मंडळी तिकडेच स्थाईक झालीं आहेत. यापैकीं कांहींना माझा गांवांतील भजनपूजनादींचा राग येऊन ते माझा तिरस्कार करूं लागले होते. त्यांनीं व गांवांतील त्यांच्या विचारांच्या कांहीं लोकांनीं माझे 'भजनपूजनादींचें बंड' वेळींच मोडून काढण्याचा कट केला होता! बडोद्याच्या

सुशिक्षित व वजनदार काकांकडून 'माझें हें बंड' मोडून काढण्याचा बत ठरवून मी गांवीं असतां या लोकांनीं काकांना बोलावून घेतलें. हें मला समजल्यावर मीहि याच वेळीं गुरुमहाराजांना गांवीं येण्याविषयीं आग्रहाची विनंती केली, गुरुमहाराज गांवीं आले त्यावेळीं बी. ए, एल्‌एल. बी. पर्यंत शिक्षण घेतलेले माझे दोन काका गांवांत आले व त्यांनीं सतत सात दिवस गुरुमहाराजांशीं वादविवाद केला. पण अखेर त्यांना तत्त्व पटल्यामुळें गुरुमहाराजांना त्यांनीं वंदन केलें.

इतकेंच नव्हें तर काकांनीं मला पुत्रवात्सल्यानें जवळ बोलावून घेऊन ते म्हणाले "हे पहा पूर्वपुण्याईनें आम्हाला अनुक्रमें बडोद्याच्या व ग्वाल्हेरच्या महाराजांचा आश्रय लाभला असला तरी तें सर्व व्यर्थ! तुला हे राजयोगी गुरु भेटले आहेत त्यांच्याकडून घराण्याचें कल्याण करून घे" असा मला उपदेश करून महाराजांचा निरोप घेऊन ते दोन्हीहि काका आपापल्या नोकऱ्यांवर बडोदा ग्वाल्हेरकडे गेले.

## पूजेस पादुका ठेविल्या

याच वेळीं म्हणजे १९२७ सालीं महाराजांनीं आमचे गांवीं कीर्तनसप्ताह केला व त्यावेळीं जातांना माझ्या घरी पूजेस पादुका ठेवल्या. नंतर ४ महिन्यांनीं मी मुंबईस जाऊन मास्तरांचे कडेच उतरलों. 'दावासासून' गिरणींतच कामाला लागलों. श्री. मोहिते मास्तरांकडेच राहिलो. त्यांच्या खोलीतील अधिष्ठानापुढें भजन, पंतांच्या वाङ्मयाचे वाचन, परमार्थ–चर्चा वगैरे कार्यक्रमांत वेळ चांगला जाऊं लागला.

## काळाराम मंदिरांतील कीर्तनें

१९२८ सालीं महाराज मुंबईस आले व काळ्यारामाचे मंदिरांत त्यांचीं कीर्तनें सुरुं झालीं तेव्हां मीहि कीर्तन–श्रवणास जाऊं लागलों. कीर्तनांतील पारमार्थिक बोध ऐकून मनास समाधान वाटे. कोणत्याहि प्रकारची शंका न राहता बुद्धीचा विकास होई व अंतःकरणांत आनंदाच्या लहरी उठत!

पहिले दिवशी काळाराम मंदिरांतील कीर्तन आटोपल्यावर गुरुमहाराजांनी पेटी–तबल्याच्या किल्या मजजवळ देऊन सांगितलं की तूं अगोदर येऊन पेटीं–तबला दररोज नीट मांडून ठेव. नंतर महाराज व श्री अण्णा, मेंगळे यांचे घरीं गेले आणि मी किल्या घेऊन माझ्या ठिकाणीं गेलों. त्यानंतर दररोज काळाराम मंदिरात जाऊन तबला–पेटीची व्यवस्थित मांडणी महाराजांचे कीर्तन सुरूं होण्याचे अगोदर करीत असे. पंधरा दिवस हे काम आनंदानें केलें.

## सेवेंतील भयंकर विघ्न !

१९२८ सालच्या या काळांत 'पठाण लोक लहान मुलाना पळवून नेतात' अशी हूल उठली. या हुलीमुळें हिंदु–मुसलमानांत तेढ वाढून शहरभर मोठी दंगल उडाली ! दिवसाढवळ्या हिंदुमुसलमान वस्तींत विरुद्ध जातीच्या माणसांचे खून पडूं लागले–ते प्रसंग आठवतांच अजूनहि अंगावर शहारे उठतात ! दंग्याच्या दिवशी मी रहात असलेल्या भागांत माणसांचे खून पडत होते आणि वातावरण अगदीं तंग झाले होते ! आमच्या टापूंत तर ९ माणसांचे खून पडले होते ! रस्त्यावरून माणसांचा शुकशुकाट होता ! तेव्हां ठाकुरद्वारला कीर्तनास जाण्याचें वेळी मला मास्तर म्हणाले व शेजारी लोकांनींहि बजावलें "बाबारे आज तूं घर सोडून जाऊं नको. गेलास तर परिणाम फार वाईट होईल." पण "कीर्तनाचे अगोदर पेटी तबला मांडण्याची जबाबदारी महाराजांनीं मजवर टाकली असल्यामुळें मला गेलेंच पाहिजे." असें मनांत ठरवून कोणाचेंहि न ऐकतां बाहेर पडण्याचें धाडस केलें ! पेटी तबल्याच्या किल्ल्या माझे जवळ असल्यामुळें 'कसेंहि करून गेलेंच पाहिजे' असा निर्धारानें बाहेर तर पडलों ! या वेळीं निर्भयपणा विषयीं महाराजांचें बोधवाक्य आठवलें तें असें:—

॥ गुरुरूपें जग पाही मना रे ॥ तसेंच कीर्तनांत आत्मज्ञान सुलभ करून सांगण्याची महाराजांची विलक्षण शैलीहि आठवली. अंतःकरणांतील सर्व भीति व द्वैतभाव नाश करणारा तो उपदेशहि आठवला. '**सद्गुरु सर्वत्र ओतप्रोत भरून उरला आहे मग भीति कोणाची ?**' असेंहि शब्द अंतःकरणांत उमटले !

## दंग्यांत गंडांतर व सुटका

भररस्त्यावर येऊन इकडे तिकडे न पाहतां चालूं लागलों ! रस्ता निर्मनुष्य व भेसूर दिसत होता ! रस्त्याच्या एका बाजूस एक आंधळा हिंदु मनुष्य भिक्षा मागतांना दिसला. इतक्यांत सहा मुसलमानांनीं येऊन त्या आंधळ्या भिकाऱ्यावर झडप घातली ! एकानें हातांतील सुऱ्यानें त्या अंधाचें मुंडकें उडविलें ! ते भयानक दृश्य व रक्ताचे थारोळें पाहून माझ्या हृदयाचा थरकांप झाला ! आणि माझी गाळण उडून मी एकाच्या घराचा आडोसा घेतला ! पण या ठिकाणीं दोन्ही बाजूस मुसलमानांचीच वस्ती होती ! म्हणून तीहि जागा सोडून नजीकच्या एका मुत्रींत लपलों ! त्या आंधळयाला ठार केल्यावर खून चढलेले ते मुसलमान रस्त्यावर आरडाओरड करून नाचत होते ! त्यांतले कांही म्हणत होते आतां याच रस्त्यानें एक लंगडा हिंदू पाहिला, तो बेटा येथेंच कोठें तरी लपला असावा. त ऐकून मुत्रींत माझ्या हृदयाचें पाणीच झालें ! त्यांतील आणखी कांहींजण म्हणत होते,

"आपल्याच कांहीं लोकांनीं त्या काफर हिंदूला लपवून जीवदान देण्याचा बेत केला नसेल ना!" अखेर त्यांच्यातीलच एक मुसलमान मी लपलों होंतों त्याच मुत्रींत लघवी साठीं आला तो माझ्याकडे डोळे वटारून पाहूं लागला. त्याला पाहून माझा थरकांप झाला! सर्व अवसान गळून शक्तिपात झाला! मला धरून रस्त्यावर खेचण्यात आलें. त्या आंधळया भिकाऱ्या सारखीच आपली गत होणार असें मला वाटलें! संभाजी राजाप्रमाणें आपले हाल हाल करून हे लोक ठार करणार म्हणून जीवाची आशा सुटली! '**ईश चिंतन करीत प्राण ज्याचा जातो त्याला सद्गती मिळते,** ह्या गुरुमहाराजाच्या उपदेशाची आठवण झाली. म्हणून गुरुमहाराजांचा 'ॐ नमः शिवाय' हा तारक मंत्र म्हणत जमीनीवर पडून राहिलों!

इतक्यांत एक ६०–७० वर्षांचा पठाण गर्दीतून पुढें आला. माझा डोळा एकानें उघडून तीक्ष्ण सुरा डोळ्यांपुढें धरला. 'चलो उठो' म्हणून मला फरफटत घेऊन गेले! आजूबाजूचे सर्व मुसलमान 'हिंदूओका लडका, पकडो, गर्दन काटो' अशीं एकसारखी ओरड करीत होते!

मला फरफटत ओढत असता माझ्याकडे निरखून पहाणारा तो म्हातारा पठाण माझा परममित्र **हयात महंमदच** होता! त्यानें मला निरखून पाहून ओळखलें. त्यानें सर्व मुसलमानांची गर्दी हटविली आणि त्या खुनी लोकांना म्हणाला "**यार ये लडका मेरा अवलियाका है, पीछे हटो, चलो**" सर्व मुसलमान मागें हटल्यावर मी त्या पठाणाकडे पाहिलें आणि त्याला गिरणींतील परम मित्र 'हयांत महंमद' म्हणून ओळखलें आणि त्याच्या गळ्याला घट्ट मिठी मारली! त्याला विनविलें मला येथून घेऊन चल"! माझें अंग थरथरत होतें आणि महाराजांचा तारक मंत्र–जप चालूच होता! तेव्हां मला पोटाशीं घट्ट धरून माझा म्हातारा पठाण मित्र म्हणाला "मेघःशाम भिऊं नको मी तुला पोटाशी घट्ट धरला आहे. तुझ्या केसालाहि कोणी आतां धक्का लावणार नाहीं—हे सर्व लोक तुझे व माझे भाई आहेत, डोळे उघडून या सर्व भाईकडे पहा!" त्याप्रमाणें मी केलें तो खरोखर सर्व मुसलमान शांत झालेले दिसले! महाराजांनीं कीर्तनांत उपदेशिलेल्या 'तारक मंत्राची' आठवण झाली आणि त्याचा अनुभवहि आला! महाराजांच्या कीर्तनांतील पुढील पदाची आठवण झालीं.

अल्ला रखेगा वैसाहि रहना! मौला रखेगा वैसाहि रहना॥
रहिम रखेगा वैसाही रहना॥

थोड्या अवधीनंतर माझा पठाण मित्र हयात महंमद याने मला उचलून आपल्या नजीक असलेल्या दिवाणखान्यांत नेलें. दिवाणखाना प्रशस्त होता. मला माझ्या त्या पठाण मित्रानें सोडा आणवून पाजला. रस्त्यांतील सर्व मुसलमान वर

येऊन माझ्या समोर गोळा झाले आणि हयात महंमदला 'मी कोण' वगैरे चौकशी करूं लागले. माझी सर्व हकीगत माझ्या पठाण-मित्रानें त्यांना सांगितली. ती ऐकून सर्वांना वाईट वाटल्याचें दिसलें.

**पठाण हयात महंमद याला १९२७ साली महाराजानीं त्यांच्या निमंत्रणाप्रमाणें जाऊन अनुग्रह दिला होता.** तेव्हांपासून गुरुमहाराजांचा फोटो त्यानें आपल्या या दिवाणखान्यांत नित्याचे पूजेस ठेविला होता. ही हकीकत हयात महंमदकडून ऐकल्याबरोबर सर्व मुसलमान त्या फोटोजवळ जाऊन आदरानें सलाम करूं लागले आणि तोंडानें म्हणूं लागले 'अवलिया, आमचे हातून अपराध घडला माफ करा'! तें पाहून व ऐकून मी अगदीं निर्भय झालों. आणि सद्‌गुरूंच्या महामंत्राचें मला अत्यंत कौतुक वाटलें! 'धन्य तो तारकमंत्र धन्य धन्य' असे उद्‌गार मनोमन निघाले!

**ॐ नमः शिवाय। तरणोपाय। तारक मंत्र गुरूचा॥**

हा महातारक मंत्र अंतःकरणभर घुमूं लागला! याच मंत्रानें माझें रक्षण केलें ही मनाची खात्री झाली!

× × ×

नंतर थोडावेळ विश्रांति घेऊन हयात महंमद माझ्याबरोबर ठाकुरद्वार काळाराम मंदिराकडे आला. रोजच्यापेक्षां मला १५ मिनिटें उशीर झाला होता! महाराज मंदिरांत येऊन माझी वाटच पहात होते! मला पहातांच रुद्रावतार धारण करून त्यांनीं मला दरडावून विचारलें "कायरे, ही काय तुझी येण्याची रीत? माणसानें सदा नियमित वागण्यास शिकावें." इत्यादि! माझ्यावर आलेल्या प्रसंगाची माहिती सांगत राहण्याची ती वेळ नव्हती! म्हणून खिशांतून किल्ल्या काढून आम्ही दोघांनी पेटी तबल्याची मांडणी केली. कीर्तन श्रवणानंतर कीर्तन आटोपल्यावर मी आणि माझा पठाण मित्र हयात महमंद दोघेहि आपापल्या ठिकाणीं गेलों. मला त्याने माझ्या निवासस्थानीं पोचविले, घडलेला प्रकार कोणासही सांगितला नाहीं. दुसऱ्या दिवशी आम्ही दोघेहि श्रीगुरुमहाराजांच्या निवासस्थानीं-श्री. मेंगळे यांचे बिऱ्हाडीं गेलों आणि त्यांना आदल्या दिवशीं घडलेला सर्व प्रकार सांगितला, तेव्हा तें ऐकून महाराजहि आश्चर्यानें थक्कच झाले!

महाराज नंतर म्हणाले "बरं असो. आतां तरी तुझी खात्री झालीना?" महाराजांनीं यावेळीं मला दोन पदे पाठ करण्यास सांगितले. तीं अशीं—

(१) वद कुणा गुरु गुह्य आतांरे।
सर्वत्र (मज) दिसे गुरु त्रातारे॥

(२) पाहियले हे दिवस सद्गुरु होती तुझी कृपा ॥

आज पावेतो दररोज मी ही पदें म्हणत असतो.

मग महाराज मला म्हणाले " हें पहा उद्यांपासून दंगलींच्या दिवसांत इकडे कीर्तनास येऊं नकोस. तबला-पेटीच्या किल्या माझ्याकडेच देऊन टाक " !

× × ×

वर वर्णन केल्याप्रमाणें. **गुरुमहाराजांनीं मला भयंकर संकटांतून आपल्या तारक मंत्राच्या प्रभावानें तारल्याचा उल्लेख आलाच आहे.** त्यांची पूर्णकृपा मजवर असल्याचा प्रत्यक्ष अनुभव आला ! अशा सद्गुरूला आपल्या गांवीं न्यावें, आपलें घर त्यांच्या चरणधूलीनें पावन व्हावें आणि आपलें सर्व आप्तेष्ट अनुग्रहीत व्हावे, अशी इच्छा मनांत येऊन मी गुरुमहाराजांना तशी विंनति केली. गुरुमहाराजांनी माझी विंनति मान्य केली पण विनोदाने म्हणाले.

" **माझ्या सारख्या पैलवानांस गांवीं बोलावीत आहेस,** मीहि येण्यास तयार आहे. पण गांवीं नेण्याचा पूर्ण विचार कर. **अवधूत भूत तुझ्यापाठीं लागेल याचा गांवीं जाऊन पूर्ण विचार कर** आणि मग मी कुरुंदवाडला जात आहे तेथें येऊन भेट. "

त्यावेळीं महाराजांच्या त्या भाषणाचा गूढार्थ माझ्या लक्षांत आला नाहीं. मात्र होकारार्थी महाराजांना उत्तर देऊन त्यांना नमस्कार करून आपल्या ठिकाणीं गेलों. गांवीं माझ्या घरीं येण्याचें महाराजांनीं कबूल केल्यामुळें मला फार आनंद झाला.

१९२६ सालीं माघमासांत गांवदेवीच्या देवळांत महाराजांचे कीर्तन चालू होतें. मीहि कीर्तन–श्रवणास जात असे. तेथील कीर्तन सप्ताह झाल्यावर महाराज कुरुंदवाडास गेले. मी बोरीबंदर स्टेशनवर त्यांना पोचविणेस गेलों होतों. निरोप देतांना महाराज म्हणाले " मी दीड महिना कुरुंदवाडीच आहे. तुझ्या गांवीं मला नेण्याचा निश्चय ठरविल्यावर मला कुरुंदवाडास येऊन भेट. "

## बांबवड्यास महाराजांचें आगमन

महाराजांनीं गांवीं घरीं येण्याचें कबूल केल्यावर त्यांची व्यवस्था कशी करावी हें विचारचक्र माझ्या मनांत सुरूं झालें. 'दावासासून' मिलमधील नोकरीचे ३०–३५ रु. पगारपोटीं मिळत त्यांतून ५–१० रु. घरीं पाठविणेस मिळत. उरलेल्या रकमेंत मुंबईचा माझा खर्च कसा तरी भागे. तेव्हां गुरुमहाराजांना गांवीं न्यावयाचे तर खर्चाची व्यवस्था कशी करावी, या चिंतेनें ग्रासलों. मला तर गांवीं जातांना तिकीटापुरते पैसे उरण्याची पंचाईत ! " माझ्या गांवीं माझे घर वाडा असला तरी तो जुना आणि पडका ! तेव्हां महाराजांची रहाण्याची सोय

कोठें व कशी करावी ? माझें गांव अगदीं खेडेगांव, सोयी नाहींत, महाराजांना आमंत्रण देण्याचें धाडस करण्यात चूक केली असंच वाटूं लागले ! माझी मनस्थिति कोणास सांगावी तरी कशी ?" अशी चिंता करतां करतां खर्चाची व्यवस्था करण्याचा एक मार्ग ठरविला. माझ्याकडे कांहीं गुरुबंधु विश्वासानें शिल्लक पैसे ठेवीत. यांतील पैसे महाराजांच्या व्यवस्थेसाठीं खर्च करावे आणि आल्यावर त्या पैशांची परतफेड करावी, असा विचार मनांत ठरविला ! महाराज कुरुंदवाडला गेल्यावर एक महिन्याची रजा काढून ११-५-२६ रोजीं मी माझ्या गांवीं बांबवड्यास गेलों. महाराजांची उतरण्याची वगैरे सर्व व्यवस्था करून चैत्रमासी कुरुंदवाडास जाऊन महाराजांना भेटलो. आमच्या गांवीं महाराजांनीं यावें असें नक्की ठरवून आलों. गांवांत महाराज येणार असल्याचें सर्वांना जाहीर रितीनें कळविलें. भाविकांना आनंद वाटला. सर्वजण महाराजांच्या आगमनाची वाटच पहात होते. आमचे गांवीं चैत्रमासीं रामनवमीनंतर एकादशीपासून सात दिवस नाम सप्ताह होत असे. त्याच दिवशीं गुरुमहाराज आमच्या गांवीं आले. सर्व लोकांनीं गांवच्या वेशींतून ॐ नमः शिवाय भजन करीत (वाद्यांच्या गजरांत) त्यांना थाटाच्या मिरवणुकीनें घरीं आणलें. त्याच दिवशीं महाराजांच्या कीर्तनाला सुरवात झाली. माझे घरीं आल्यावर मला हाक मारून महाराज म्हणाले,

> **"मेघःश्याम, आजच्यासारखी धिंड काढून मला तुझ्या घरीं आणणार असशील तर मी फिरून तुझ्या घरीं येणारच नाहीं !"**

त्यावर "नाहीं नाहीं मी फिरून असें करणार नाहीं." असें म्हणून मी महाराजांचे पाय घट्ट धरून क्षमा मागितली ! गुरुमहाराजांना आपल्या घरीं आणून त्यांची ठीक बडदास्त राखावी, ही माझ्या डोक्यांत भेडसावणारी भ्रामक कल्पना पार नाहींशी झाली ! कारण महाराजांनीं माझी गरीबी ध्यानीं घेऊन **साधेपणानें सर्वांत मिळून मिसळून ते वागत होते,** "अगदीं निव्वळ चटणी भाकरच मला आवडते." असें म्हणून ते आनंदानें खात. गांवांत व घरांत संडासाची सोय नसल्यामुळें बहिर्दिशेस गांवांबाहेर जात असत. बांबवडे-गावांत महाराजांचें कीर्तन सुरू झाल्याची बातमी आसपासच्या गांवांत पसरल्यावर लोकांची गर्दी कीर्तनाचे व इतर वेळींहि जमूं लागली. बोधामृताच्या वर्षावामुळें, अनेकांचें शंका-निरसन होऊं लागलें. कीर्तन सप्ताह संपल्यावर कुरुंदवाडास जाणेचा दिवसहि ठरविला. महाराजांच्या जाण्याची मी सर्व व्यवस्था केली.

> **जातांना १९२६ च्या चैत्रमासीं महाराजांनी मला आपल्या खडावा पूजेसाठीं दिल्या. आज तागायत ह्या माझ्या अधिष्ठानांतील पूजेत आहेत.**

या पूजनानें माझ्या मन–कामना पूर्ण झाल्या आहेत. मला भक्तिप्रेमाची चटक लावून महाराजांनीं मला धन्य धन्य केलें आहे !

वास्तविक मला धट्टे कट्टे शरीर नाहीं, विद्वत्ता नाहीं, घरीं अठराविश्वे दारिद्य **अशा दुबळया व्यक्तीला हातांशीं धरून त्याचें कोडकौतुक अवधूत मातेने केलें! या मातेच्या ऋणांतून अनेक जन्म घेऊनहि मुक्त होणें कठीण!**

माझ्या घराण्यांतील आई, बहीण भाऊ इत्यादि सर्व मंडळींना महाराजांनीं अनुग्रह दिला. माझ्या ७ काकांच्या घरीं ६०–७० मंडळी आहे. कांहीं कारणांमुळें आपापसांत भांडण–तंटे होऊन, मुंबई हायकोर्टापर्यंत दावा चालू होता. गुरु-महाराजांनीं सर्वांना समजुतीनें सांगून आपसांतील तंटे व दावा मिटविला. सर्वांनीं एकमतानें वागण्याच्या फायद्याविषयीं सर्वांना समजूतीचा उत्तम बोध केला

**परमार्थांतील सखोल विचारा प्रमाणें महाराज व्यवहारांतहि दक्ष असल्याचा अनुभव या प्रसंगी आला.** त्यावेळेपासून आतांपर्यंत माझ्या घराण्यांतील मंडळीवर महाराजांच्या सद्बोधाची छाप आहे.

महाराजांनीं त्या चैत्रांत कुरुंदवाडास जातेवेळीं माझ्या घरांतील पंतांच्या व महाराजांच्या अधिष्ठानापुढें घडी केलेली कफनी ठेविली आणि पूजेला पादुका दिल्या. त्याप्रसंगीं महाराज काय बोलले हें मला नीट ऐकूं आलें नाहीं. महाराजांना बैलगाडींत बसवून भिल्लवडी स्टेशन पर्यंत नेलें आणि तेथें मिरजेला जाणाऱ्या गाडींत बसवून दिलें. महाराजांचा निरोप घेण्यास स्टेशनवर गांवकरी मंडळी बरीच आली होती. **घरी परत आल्यावर** अधिष्ठानाच्या चौरंगावर पाहिलें तों कापडाची घडी दिसली ! उलगडून पाहिल्यावर ती महाराजांची कफनी ! मला वाटलें महाराजांनीं विसरून कापडाऐवजीं कफनी ठेविली असावी ! शिवाय चौरंगावर ५ रु. ५ आणे आणि रुद्राक्षाची माळहि होती. या सर्व वस्तू महाराज विसरले असतील म्हणून जपून ठेविल्या आणि घरांतील सामान आणि मांडव वगैरेंची आवराआवर केली.

नंतर आठ दिवसांनीं महाराजांची कफनी वगैरे सर्व वस्तू घेऊन मी कुरुंदवाडास गेलों. महाराजांचें दर्शन घेऊन " या वस्तू आपण माझ्या अधिष्ठानाच्या चौरंगावर विसरून आलात त्या मी आणल्या आहेत " असें म्हणून मी सर्व वस्तू महाराजांपुढें ठेवून त्यांच्या चरणांवर डोकें ठेविलें.

तें पाहून महाराज हंसले आणि माझी खुशाली वगैरे विचारपूस केली. " मेघःशाम फिरून आलास ! तुला अवधूतानें पछाडलेले दिसतें ! हे

## कीर्तनास उभे श्री अवधूत महाराज



श्री अवधूत महाराज दुसऱ्या काशीयात्रेस निघाले त्यावेळीं बरोबरचे सांथीदार



सभामंडपाच्या कमानी



घुमटीच्या आंतील मूर्ती



भडगांव मंदिराची घुमटी

जिन्नस परत कां घेऊन आलास ? तुझ्या घरीं अवधूतासाठीं जे हवें तें मी ठेवून आलों. तें परत घेऊन जा " !

अजूनहि महाराजांच्या शब्दांतील गूढार्थ न समजल्यामुळें मी स्तब्धच राहिलों ! माझा कांवराबावरा बावळट चेहेरा पाहून महाराज फिरून बोलले " अरे **भगवेंवस्त्र, पादुका व माळ या सर्व वस्तू मी तुलाच दिल्या आहेत.** आतां **फेटा, शैली व झोळीहि देतों.** गावींच दिली असती पण त्यावेळीं झोळीं जवळ नव्हती आतां येथें आलाच आहेस तेव्हां परत जातांना झोळीसह सर्व घेऊनच जा ! माझा **परमभक्त जो शिवा त्याच्याप्रमाणें तूहि फेरी करीत जा !** आम्हाला प्रचार–कार्यासाठीं फेरीवाला लागतो. त्या दृष्टीनें तुझा आवाज बरा आहे. शिवाय तुला परमार्थाची आवडहि असल्यामुळें, जमल्यास निरूपणहि करून भाविकांना थोर भक्तिप्रेमाची गोडी लावतां येईल. म्हणून या सर्व वस्तू परत घेऊन जा, तुला **या मार्गांत सर्व वस्तूंचा उपयोग होईल."**

माझेसंबंधीं महाराजांनीं काय ठरविलें असावें याची स्पष्ट कल्पना महाराजांच्या सदरील खुलासेवार भाषणामुळें मला आली. पण सर्व भाषण शांतचित्तानें ऐकून घेऊनहि मी दगडासारखा स्तब्धच राहिलों ! हें पाहून महाराज फिरून बोलले "अरे मी हें सर्व तुला उद्देशूनच बोललों तरी तूं असा गप्प कां ? मला तुझें उत्तर हवें." महाराजांनीं मला असें रोखल्यावर मी म्हणालो " महाराज, उद्ईक विचार करून आपल्याला सांगेन " महाराज म्हणाले " ठीक आहे कांहीं हरकत नाहीं " त्या वेळेपुरती माझी सुटका करून घेऊन मी खालीं उतरलों ! सौ. मातुश्रींच्या सूचनेप्रमाणें मी जेवण उरकलें आणि श्री पंतांच्या अधिष्ठानाजवळ दोन प्रहरीं एक वाजतां थोडी विश्रांति घेतली. नंतर ३ वाजल्यावर कृष्णा–पंचगंगा संगमानजीक नावेंत बसून वाडीस श्रीनृसिंह सरस्वती श्रीदत्ताचें दर्शन घेतलें. मंदिरानजीक घाटाचे पायऱ्यांवर बसून गुरुमहाराजांच्या खुलासेवार आज्ञेविषयीं विचार करूं लागलों. ' मी भगवें घेऊन फेरी करू लागलों तर माझे आप्तेष्ट व नातेवाईक काय म्हणतील ? महाराज सांगतात त्या गोष्टी आपल्याला कशा साधतील ? इत्यादि शंका–कुशंका मनांत येऊन डोकें सुन्न होऊन गेलें ! " गुरुमहाराजांकडे परततांना मनांत विचारचक्र चालू झालें ! " गुरुमहाराजांना कबूल केल्याप्रमाणें उद्यां उत्तर तरी काय द्यावें ? नकारार्थी उत्तर देऊन त्यांच्या आज्ञेचा भंग केला तर गुरुमहाराजांचें मजवरील प्रेम नष्ट होईल कां ? त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागलों तर सर्व आप्तेष्ट व नातेवाईक माझी छीः थूः करतील ! तेंही पत्करून भगवें घेतलें तर भगवें घेणाऱ्या भक्तानें कसें वागलें पाहिजे या संबंधींची पथ्यें महाराजांनीं सांगितलीं ती मला पाळतां येतील कां ? " इत्यादि विचारांची गर्दी मनांत वावरत असतांच मी गुरुमहाराजांच्या निवासस्थानीं येऊन पोचलों.



सभामंडपाच्या कमानी



घुमटीच्या आंतील मूर्ती



भडगांव मंदिराची घुमटी

जिन्नस परत कां घेऊन आलास ? तुझ्या घरीं अवधूतासाठीं जे हवें तें मी ठेवून आलों. तें परत घेऊन जा " !

अजूनहि महाराजांच्या शब्दांतील गूढार्थ न समजल्यामुळें मी स्तब्धच राहिलों ! माझा कांवराबावरा बावळट चेहेरा पाहून महाराज फिरून बोलले " अरे, **भगवेंवस्त्र, पादुका व माळ या सर्व वस्तू मी तुलाच दिल्या आहेत**. आतां **फेटा, शैली व झोळीहि देतों.** गावींच दिली असती पण त्यावेळीं झोळीं जवळ नव्हती आतां येथें आलाच आहेस तेव्हां परत जातांना झोळीसह सर्व घेऊनच जा ! माझा **परमभक्त जो शिवा त्याच्याप्रमाणें तूहि फेरी करीत जा** ! आम्हाला प्रचार-कार्यासाठीं फेरीवाला लागतो. त्या दृष्टीनें तुझा आवाज बरा आहे. शिवाय तुला परमार्थाची आवडहि असल्यामुळें, जमल्यास निरूपणहि करून भाविकांना थोर भक्तिप्रेमाची गोडी लावतां येईल. म्हणून या सर्व वस्तू परत घेऊन जा, तुला **या मार्गांत सर्व वस्तूंचा उपयोग होईल.** "

माझेसंबंधीं महाराजांनीं काय ठरविलें असावें याची स्पष्ट कल्पना महाराजांच्या सदरील खुलासेवार भाषणामुळें मला आली. पण सर्व भाषण शांतचित्तानें ऐकून घेऊनहि मी दगडासारखा स्तब्धच राहिलों ! हें पाहून महाराज फिरून बोलले " अरे मी हें सर्व तुला उद्देशूनच बोललों तरी तूं असा गप्प कां ? मला तुझें उत्तर हवें. " महाराजांनीं मला असें रोखल्यावर मी म्हणालो " महाराज, उदईक विचार करून आपल्याला सांगेन " महाराज म्हणाले " ठीक आहे कांहीं हरकत नाहीं " त्या वेळेपुरती माझी सुटका करून घेऊन मी खालीं उतरलों ! सौ. मातुश्रींच्या सूचनेप्रमाणें मी जेवण उरकलें आणि श्री पंतांच्या अधिष्ठानाजवळ दोन प्रहरीं एक वाजतां थोडी विश्रांति घेतली. नंतर ३ वाजल्यावर कृष्णा-पंचगंगा संगमानजीक नावेंत बसून वाडीस श्रीनृसिंह सरस्वती श्रीदत्ताचें दर्शन घेतलें. मंदिरानजीक घाटाचे पायऱ्यांवर बसून गुरुमहाराजांच्या खुलासेवार आज्ञेविषयीं विचार करूं लागलों. ' मी भगवें घेऊन फेरी करू लागलों तर माझे आप्तेष्ट व नातेवाईक काय म्हणतील ? महाराज सांगतात त्या गोष्टी आपल्याला कशा साधतील ? इत्यादि शंका-कुशंका मनांत येऊन डोकें सुन्न होऊन गेलें ! " गुरुमहाराजांकडे परततांना मनांत विचारचक्र चालू झालें ! " गुरुमहाराजांना कबूल केल्याप्रमाणें उद्यां उत्तर तरी काय द्यावें ? नकारार्थी उत्तर देऊन त्यांच्या आज्ञेचा भंग केला तर गुरुमहाराजांचें मजवरील प्रेम नष्ट होईल कां ? त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागलों तर सर्व आप्तेष्ट व नातेवाईक माझी छीः थूः करतील ! तेंही पत्करून भगवें घेतलें तर भगवें घेणाऱ्या भक्तानें कसें वागलें पाहिजे या संबंधींची पथ्यें महाराजांनीं सांगितलीं ती मला पाळतां येतील कां ? " इत्यादि विचारांची गर्दी मनांत वावरत असतांच मी गुरुमहाराजांच्या निवासस्थानीं येऊन पोचलों.

गुरुमहाराजांचें दर्शन घेऊन चरणांवर डोकें ठेवून त्यांच्या जवळच बसून राहिलों. गुरुमहाराजांनी माझी मनस्थिति ओळखली असावी !

कारण मला उद्देशून महाराज बोलूं लागले " हें पहा मेघःशाम, ज्या सद्‌गुरूस आपण तन मन धनांनीं शरण गेलों त्याच्या ठिकाणीं 'मी-पणाला' जागाच उरत नाहीं. गुरूच्या आज्ञेप्रमाणें वागणें हेंच निजभक्तांचें कर्तव्य ठरतें. गुरु–आज्ञेपुढें लौकिक वासना, देहवासना किंवा शास्त्रवासना शिल्लक राहात नाहीं. कालत्रयींहि नाहीं ! सद्‌गुरु पूर्ण ब्रह्मनिष्ठ, पूर्ण श्रोत्रिय असतात. निजभक्तांना नुसता शाब्दिक उपदेश करून न थांबतां ते भक्तांना शिष्यांना आपली पूर्ण शक्ति देतात आणि कर्तव्याची पूर्तता करतात हें नीट लक्षांत घे." माझ्या मनामध्यें ज्या ज्या कल्पना अगर शंका होत्या त्या त्या कल्पना अगर शंका समूळ नाहींशा होतील अशा रीतीचा बोधरूपी खड्ग महाराजांनीं वापरला !

पण मी पडलों पढतमूर्ख ! माझ्यांतला मीपणाचा अहंकार अद्याप नाहींसा झालेला नव्हता ! यामुळें महाराजांना मी विचारलें, " महाराज आपण मला भगवें देणार तें मी सध्यां न घेतलें तरी चालेल कां ? आपल्याकडून शंका निरसन करून घेऊन आपल्या प्रेमळ बोधानें समाधानं मानून असतो येवढ्यानेंच तूर्त भागण्यासारखें नाहीं कां ? कां भगवें घेतलेंच पाहिजे त्या शिवाय गत्यंतर नाहीं ? महाराज, खरोखर मी आपलाच झालों आहें. मला आपणच हवेत, दुसरें कांहीं नको. दुसऱ्याची इच्छाच नाहीं ! मी अगदीं गरीब भक्त असून मजवर अनेक प्रकारची जबाबदारी आहे. जबाबदाऱ्यांच्या व्यापांतून मोकळा झाल्यानंतर भगवें घेण्याचा विचार केल्यास नाहींका चालणार ? आपणहि माझ्या घरची परिस्थिति पाहिली आहेच. आपणच आमच्यांतील तंटे व कोर्टांतील दावे मिटविले आहेत. आपली आज्ञा मी मान्य करण्यास तयारच आहे. आपलें वचन मोडून मी कधींहि वागणार नाहीं. पण सध्यांतरी मला भगवें नको !'

महाराजांनीं माझी सर्व बडबड ऐकून घेतली व पुढें कांहींहि न बोलतां 'बरें,' म्हणाले, त्यांनीं तो विषयच सोडून दिला ! मी आठ दिवस महाराजांच्याकडे राहून गांवीं परत आलों.

× × × ×

कर्तव्यकर्मांचा अहंकार माझ्यांतून गळाला नव्हता ! यामुळें ह्यावेळीं सद्‌गुरूंच्या आज्ञेचें उल्लंघन मी केलें ! कुरुंदवाडला जाण्याची माझी ती दुसरी खेप होती. तेथील आठ दिवसांचा मुक्काम एका दृष्टीनें भाग्योदयाचा होता !

## गुरुमहाराजांकडील नित्यक्रम

गुरुमहाराज पहाटे चार वाजतां उठून, बहिर्दिशेस जात. ते आल्यावर त्यांना सौ. मातुश्री चहा देत. चहा घेतल्यावर हातीं एकतारी घेऊन श्रीपंतांची पदे महाराज गोड आवाजांत म्हणत. **असें भंक्तिपर भजन आजपर्यंत मी कोणाचेंच ऐकलें नव्हतें !**

त्या पदांतील बोध मलाच ते करीत असल्याचा मला भास होई ! महाराजांची वाणी गोड आणि प्रासादिक प्रत्येकपदाशीं ते तन्मय आणि समरस होऊन जात ! कृत्रिमपणा आणि खळखळ यांना महाराजांच्या भजन-तंद्रींत बिलकुल थारा नसल्याचा अनुभव मला आला.

भजन झाल्यावर. कांहीं कामाची व्यवस्था लावल्यावर महाराज ९॥ ला आध्यात्मिक विषयांची चर्चा आल्यागेल्याशीं करीत. नंतर स्नान भोजनादि उरकून तीन प्रहरीं तीन पर्यंत विश्रांति घेत. तीन प्रहरीं चहा झाल्यानंतर ४॥ पर्यंत कांहीं आध्यात्मिक चर्चा आल्या गेल्याशीं केल्यावर बाहेर पडत, फिरून आल्यावर येतांना तुकाराम शिंदे याचे घरीं थोडावेळ बसत. महाराजांचे **हे सर्व व्यवहार अगदीं नियमित चालत व एक क्षण देखील फुकट जात नसे.**

कुरुंदवाडास महाराजांचा मुक्काम असल्याची बातमी कळतांच कोल्हापूर, शिरोळ, इचलकरंजी, मिरज इत्यादिं आसपासच्या गांवची भक्तमंडळी त्यांच्या मुखांतून बोधश्रवणासाठीं आणि त्यांच्या दर्शनासाठीं येत आणि शांति-समाधान लाभून परत जात. त्या आठ **दिवसाचे मुक्कामांत मला असा दृढ अनुभव आला कीं, सद्गुरुमहाराज ही एक थोर विभूति असून ' रंजल्या गांजल्यांना आपुलें ' समजणारे थोर सत्पुरुष आहेत.** जसें बाहेर तसें घरींहि अंतर्बाह्य वैराग्य व साधुत्व महाराजांचे ठिकाणीं असल्याचा मी प्रत्यक्ष अनुभवच घेतला.

× × × ×

भगवी कफनी शैली व माळ मी महाराजांकडे परत करून आलों तरी त्यांच्या वरील वाढल्या भक्तीमुळें, यांच्या पायांतील खडावा मी माझ्या पूजेंत ठेविल्या असून आजतागायत नियमित पूजा-आरती भजन करीत असतो. त्यांच्यासारख्या थोर सत्पुरुषाचे शब्द कधींच खोटे होत नसतात. **महाराजांनीं पुढें युक्तियुक्तीनेंच मला भगवें कसें घ्यावयास लाविलें हें वर्णनाच्या ओघांत पुढें येईलच.**

× × ×

मी कुरुंदवाडच्या दुसऱ्या खेपेंतून परत आल्यावर ८-१० दिवसानींच मुंबईहून महाराजांचें पत्र मला आलें. या पत्रांतील मुख्य मजकूर पुढीलप्रमाणें:—

तू बांबवड्यास परत गेल्यावर ८-१० दिवसांतच मी कुरुंदवाडहून मुंबईस आलों. गांवदेवी-मंदिरांत चैत्रमासाचें एक महिना कीर्तन चालूं आहे. तूं बांबवड्याहून मुंबईस लवकर आल्यास बरें. सांगितल्याप्रमाणें 'प्रेमतरंग' व 'प्रेमभेट' नित्य वाचीत जा. कांही शंका आल्यास इकडे आल्यावर विचार. तुझे गांवीं तू आमची फार चांगली व्यवस्था ठेवलीस याचा आनंद झाला. शंकरच्या मातुश्रीनें फार मेहनत घेतली. तुझ्या घरच्या सर्व मंडळींना पूर्ण आशीर्वाद. इत्यादि.

—मो. के. दातार

सदरील पत्रानंतर चारच दिवसांनीं मी मुंबईस गेलों. कामावर रुजूं झाल्यावर दुसरेच दिवशीं, जेठाभाई-बिल्डिंगमध्ये महाराज उतरले होते त्या ठिकाणीं सायंकाळीं ७ वाजतां त्यांच्या भेटीस गेलों आणि नंतर गावदेवीचे देवळांत कीर्तनासहि गेलों. नोकरी, कीर्तनश्रवण आणि महाराजांचे निवासस्थानीं अध्यात्मचर्चा, हे कार्यक्रम पूर्वीप्रमाणें सुरूं केले. **याचा मला किती फायदा भक्तिमार्गांत झाला त्याचें वर्णन शब्दांनीं मी करूं शकत नाहीं!** "भक्ति, ज्ञान वैराग्य यांच्या व्याख्या गुरुमहाराजांनींच कराव्या, इतरांचा तो अधिकार नव्हे" असें मला वाटे! या खेपेस कीर्तनश्रवण व अध्यात्म चर्चा यामुळें माझ्या मनांतील संशय व शंका पार नष्ट झाल्या! मनांतील द्वैत भावना पार लयास गेली सर्व कांहीं कर्ता सवरता सद्गुरूच ही भावना दृढ झाली. आत्मबोधाचा निश्चय पूर्ण बाणला!"

गुरुमहाराजांना माझे गांवीं नेऊन कीर्तनसप्ताह समारंभ वगैरे खर्च मी माझ्या गुरुबंधूंच्या माझ्याकडे असलेल्या ठेवींतून केला होता, तो या खेपेस परत देऊन त्यांच्या ठेवी सुरक्षित केल्या.

## भडगांवचा श्रीदत्त स्थापनेचा सोहाळा अंतरला!

वैशाख मासीं मुंबईचे कीर्तनाचे कार्यक्रम उरकून महाराज भडगांवास जातांना मला म्हणाले "मेघःशाम येत्या मार्गशीर्ष मासीं, आम्ही श्रीदत्ताची स्थापना करणार आहों. त्या समारंभासाठीं तूं भडगांवास आलें पाहिजे! मीहि महाराजांच्या आज्ञेला होकार दिला."

मात्र घरच्या अडचणींमुळें भडगांवास श्रीदत्त-स्थापनेच्या समारंभास मला जातां आले नाहीं! **हजारों भक्तांच्या उद्धारासाठीं महाराजांनीं भडगांवास**

**श्रीदत्त मठीची स्थापना इ. स. १९२७ मध्ये केली.** तो समारंभ सोहाळा मला मात्र अंतरला, याची हळहळ मला अजूनहि वाटते! ज्या परमभक्तांनीं प्रत्यक्ष हजर राहून तो समारंभ पाहिला, त्यांचेंकडून माहिती मिळवूनच मी ती वाचक भक्तांना सादर करीत आहे

त्यावेळीं गुरुमहाराजांच्या सहवासाचा एकेक क्षणहि महत्त्वाचा वाटे. त्यांना भेटण्यास येणाऱ्या भक्तांचे मनोगत अगोदरच ओळखून त्यांचे ते समाधान करीत.

श्रीदत्ताची स्थापना व समारंभ झाल्यावर महाराजांनीं भडगांवाहून मला वांत्रवड्यास पत्र पाठविलें, त्या पत्रांत महाराजांनीं लिहिलें :— "श्रीदत्त स्थापनेच्या समारंभ प्रसंगीं तुझी वाट पाहिली. सर्वच गोष्टी आपल्या इच्छेप्रमाणें घडत नसतात! चार प्रेमळ मंडळी समारंभांत एकत्र जमली कीं खूप आनंद होतो! 'कांहीं कामांमुळें येतां आलें नाहीं' अशा मजकुराचें तुझे पत्र पोचलें. इकडे सर्व क्षेम आहों. पत्राचें उत्तर पाठीव"

**—मो. के. दातार**

महाराजांचें सदरील पत्र वांचून फार वाईट वाटलें. माझ्या गुरुमातेच्या अलोट प्रेमाची कल्पना आली. हें प्रेम मला ओळखतां आलें नाहीं, याचें वाईट वाटलें! घरचीं कामें लवकर उरकून मुंबईस आलों. मन बेचैन होऊन गुरु-महाराजांच्या येण्याकडे डोळे लागले. त्यावेळीं एक महिन्यानंतर महाराज मुंबईस आले. ठाकुरद्वारच्या काळाराम मंदिरांत महाराजांची कीर्तनेंहि सुरूं झालीं. त्यावेळीं महाराज श्री काशिनाथ महादेव ताम्हनकर यांचेकडे उतरले होते. महाराजांना त्यांचेकडे जाऊन भेटलों. 'भडगांवास कां येऊं शकलों नाहीं' याचें कारण महाराजांना मी सांगितलें. तें समजल्यावर महाराज म्हणाले "अरे, **व्यवहार परमार्थालाहि सुटत नाहीं. जो व्यवहारांत दक्ष तो परमार्थांतहि दक्ष रहातो. मात्र एक पारमार्थिक तत्व लक्षांत ठेव. " काया, वाचा, मन** ही 'त्रिपुटी' घेऊन साक्षेपानें व्यवहार करावा. **साक्षीपणाचा अहंभाव टाकून श्री गुरुचिंतन केल्यास अकल्पित निजशांति प्राप्त होते.** मोठ मोठे जपी, तपी योगी यांना देखील दुष्प्राप्य अशी शांति अशा गुरुभक्ताला विनासायास गुरुभक्तीनेंच साध्य होते आणि ती अखंड रहाते. यावेळीं

**शांती परदेशीं झाली । भक्तजनां शरण आली ॥**

**या पदाचा संपूर्ण भावार्थ सांगून गुरुमहाराजांनीं मला धन्य केले.**

**धन्य रे गुरुराया । धन्य केलें भक्तासि ॥**

**हेंहि पद महाराजांनीं मला पाठ करणेस सांगितले.**

× × ×

## महाराजांनीं केलेलें भक्तीचें वर्णन

महाराज म्हणाले "भक्ति दोन प्रकारची असते. सकाम भक्ति आणि निष्काम भक्ति. यांत निष्काम भक्तीच श्रेष्ठ व तीच भक्तानें स्वीकारावी. तीमुळें न मागतां मनकांक्षा तर पूर्ण होतातच. पण पूर्वीं भक्ताला जें ज्ञान नव्हतें तें होऊं लागतें. असा निष्काम भक्तीचा प्रभाव आहे. म्हणूनच संत म्हणतात **"भक्ति ज्ञानाची माउली"** आणि **"भक्तीपासुनि मुक्ती झाली"** महाराजांची पंतावर पूर्ण निष्ठा होती. पंतांच्या वाङ्मयाचा आधार देऊन ते चर्चा करीत. पंतांच्या शिकवणीच बाळकडू आम्हांला पाजून महाराजांनीं धन्य केलें! कंठ दाटून येऊन महाराज वारंवार म्हणत **"माझ्या पंतासारखा प्रेमदाता सद्‌गुरू मिळणें अशक्य.', असं बोलतांना महाराजांच्या डोळ्यांतून खळखळ अश्रू वहात!** या वरून त्यांच्या गुरुनिष्ठेची कल्पना आम्हाला अनुग्रहीतांना येई आणि वाचकांनाहि येईल! शास्त्रपुराणांतील दृष्टांत महाराजांना मुखोद्गत असत. यामुळें भक्त-श्रोत्यांना अनायासेंच ज्ञानबोध होई आणि निजानंदांत श्रोते-भक्त निमग्न होत!

एकदां गुरुमहाराज मला म्हणाले "हे पहा, देवभक्तीचे वर्णन पुष्कळ लोक करतात पण गुरुदेवाचें वर्णन सोपें नाहीं, अवघड आहे. **देवभक्ती आणि गुरु-भक्ति यांत फरक आहे.** देवाला विरोध करून गुरुभक्तीचें मंडन करावें लागतें. लक्षांत ठेव कीं **सद्‌गुरुकृपा झाल्यावरच देवस्वरूपाची खरी ओळख पटते.** गुरुभक्तीवांचून अन्य साधन केल्यानें **'विश्वी विश्वंभर'** कसा भरला आहे आणि **'पिंडी ब्रह्मांडी परमेश्वर'** ओतप्रोत कसा मुरला आहे. हें मुळींच कळत नाहीं! हीच खूण समजून घेण्यासाठी श्रीज्ञानेश्वर. श्रीतुकाराम, श्रीनामदेव, एकनाथ, जनार्दनस्वामी, विवेकानंद यांसारखे अधिकारी सत्पुरूष श्रोत्रीय व पूर्ण ब्रह्मनिष्ठ सद्‌गुरूस शरण गेले आणि सद्‌गुरूंचेच कृपेनें आज जगांत कीर्तिरूपानं अजरामर झाले, याची साक्ष या सर्व सत्पुरुषांचें वाङ्मयच देत आहे. तसेंच या जगांत एकच परमात्मा सर्व घटीं कसा भरला आहे हें तत्वज्ञान या सर्व सत्पुरुषांनीं सिंहगर्जनेनें प्रतिपादिलें आहे! माझ्या पंतांनीं **आपल्या तीन हजार पदांत सर्वत्र गुरुप्रेमाचा जयजयकार केला आहे!** या दृष्टीनें श्रीदत्तप्रेमलहरी आणि इतर पुष्पें यांतील अनेक पद्यें पहाण्यासारखीं आहेत. श्रीपंत एकेठिकाणीं म्हणतातः—

गुरुविण दैवत स्वप्नीं नाठवुं। व्यभिचार भक्ति टाळूं॥

गुरु गारवा वांचून पंतांनीं काव्य केलें नाहीं, म्हणूनच **पंतांचें वर्णन मी पुढील प्रमाणें केलें आहे:—**

असा गुरु मिळेना कदा । चुकवि आपदा । देई संपदा । आत्मज्ञानाची ॥
[ चा. ब. ] अनन्य शरण जाऊनी । भेट घ्या त्याची ॥

अधिकारी सद्गुरुची भेट पूर्व सुकृतांनींच होत असते. त्याची कृपा संपादन करून, आपलें कल्याण करून घेण हें भक्तांचें कर्तव्य ठरते. तन-मन-धन या त्रिपुटीचा पूर्ण अभिमान सद्गुरुचरणी अर्पण करून जो सर्वस्वी सद्गुरूला शरण जातो त्यालाच खरें शांतिसुख प्राप्त होऊन तो आत्मानंदांत निमग्न होतो. 'आत्मसुख हें सर्वांत श्रेष्ठ ' या विषयीं वेद-श्रुति पुराणें एक-मुखानें साक्ष देत आहेत.. सर्व संत देखील तशीच घोषणा करतात.

आत्मसुख घ्यारे । उघडा ज्ञानदृष्टि ॥

असें संत सांगतात सद्गुरुकृपेनेंच आत्मसुख प्राप्त होत असते. या दृष्टीनें अन्य साधनें फोल आहेत ! सद्गुरूला शरण जाऊनहि आत्मसुख कोणाला प्राप्त होत नसेल तर खास समजावें कीं तो सद्गुरूला खरा शरण गेलेलाच नाहीं !

जो गेला शरण त्याला । प्राप्त झालें मरण ॥

**'मरण ' म्हणजे अहंकाराचें मरण.** हें मरण प्राप्त झाल्यावरच खरी आत्मस्थिति बाणते. "

महाराज सदरील प्रमाणें बोध-वर्षाव करीत होते. त्यावेळीं अधून मधून कांहीं शंका विचारण्याची कल्पना येई ! **पण माझ्या मनांत आलेल्या कल्पनांचें व शंकेचें ताबडतोब उत्तर त्यांच्या बोधवर्षावांत मिळून माझें तोंड बंद होई !** एकदा अध्यात्म विषय चर्चेला निघाला कीं गुरुमहाराज ८-९ तास एकसारखे बोलत रहात ! **शंका विचारण्याची जरूरीच रहात नसे.** सरळ मार्ग दाखविणारा असा हा सद्गुरूंचा उपदेश असे. कसल्याहि बुद्धिहीनाची बुद्धि त्या बोधानें तीक्ष्ण होई ! सर्व शंका कुशंका नष्ट होऊन अंतःकरण आनंद-लहरींनीं भरून जाई !

\+ + +

## पूर्ण कृपा व बांबवड्यास दुसरी खेप

**इ. स. १९२५ च्या चैत्रमहिन्यांत रामनवमीच्या शुभदिवशी** मला अनुग्रह दिल्यावर मी महाराजांचीं कीर्तनें श्रवण केलीं आणि अनेक वेळ आध्यात्मिक बोधचर्चा ऐकली. त्यामुळें मला असें वाटूं लागलें कीं, आपल्या गांवाकडील मुंबईंत येणाऱ्या व रहाणाऱ्या लोकाना आणि नात्यांतील लोकांना महाराजांचे कडे न्यावें आणि त्यांना अनुग्रह मिळून ते धन्य व्हावे. याप्रमाणें **१९२५-२६-२७**

या तीन वर्षी **आमच्या गांवचे** अनेक लोक महाराजांचा अनुग्रह घेऊन धन्य झाले. गुरुमहाराज मुंबईस आल्याचें समजतांच ५०–६० मंडळी त्यांच्या भेटीस जाऊं लागली. महाराज **विनोदाने म्हणत** "आलें आमचें वानरसैन्य !" सर्व मंडळी महाराजांचें बोधामृत कानांनीं पिऊन खरोखर धन्य होत ! महाराजांच्या बोधवाक्यांनीं पावन झालेले आणि आचार–विचारानेहि निर्मल झालेले अनेक लोक गुरुमाऊलीचे गुणानुवाद गाऊन आजहि नित्यानंद भोगीत आहेत.

कोण्या जन्मींचें पुण्य हें फळलें । आणि सद्‌गुरुपद मज मिळाले ॥

या पंतपदाची श्रेष्ठता या सर्वांना कळून चुकली ही खरी धन्यता !

इ. स. १२२७ च्या माघमासीं ठाकुरद्वारच्या राममंदिरांत एक महिना कीर्तन आणि फाल्गुनमासीं मुरलीधर मंदिरांतील कीर्तनें आटोपून महाराज भडगांवास गेले. कीर्तनांतील बोध आणि निवासस्थानांतील अध्यात्म चर्चा ऐकून **मला वाटूं लागलें कीं गुरुमहाराज हे साक्षात् दत्तावतारच आहेत !**

नररूपें जरी दिसतो । परी आहे देव वंशी ॥

भडगांवास जाते वेळीं मी महाराजांचा निरोप घेण्यास बोरिबंदर वर गेलों होतों. त्यावेळीं मी त्यांना 'कुरुंदवाडास केव्हां जाणार ?' म्हणून विचारलें. तेव्हां महाराज म्हणाले "सध्यां कांहींच ठरविलें नाहीं. भडगांवातील मठींत रहाणेची ठीक सोय नसल्यामुळें येणाऱ्या मंडळीचीहि कांहीं सोय व्हावी या दृष्टीनें मठीकरितां कांहीं बांधकाम करण्याचा विचार आहे. तें झाल्यावर कुरुंदवाडास जाईन. त्या वेळीं जमल्यास तुझ्या गांवीं येईन. तें आश्वासन ऐकून मला आनंद झाला. "आपलें कुरुंदवाडला जायचें ठरलें की मला तसें पत्र पाठवा, म्हणजे मी गांवीं जाऊन आपल्या कीर्तनसप्ताहाची वगैरे तयारी आगाऊ जाऊन ठीक करीन" अशी विंनती महाराजांना मी केल्यावर त्यांनीं ती मान्य केली. नंतर चारच दिवसांनीं महाराजांचें पत्र भडगांवाहून मुंबईस मला आलें. 'मी कुरुंदवाडांस कांहीं कामा निमित्त जात आहे तर तुला रजा मिळाल्यास तूहि कुरुंदवाडास ये' असा मजकूर पत्रांत होता. तें पत्र पोचतांच रजा वगैरे न काढतां मी लगेच बांबवड्यास गेलों. एक दिवस बांबवड्यास राहून दुसऱ्या दिवशीं कुरुंदवाडास गेलों. चार दिवस कुरुंदवाडास महाराजांच्या सान्निध्यांत काढल्यावर मी गांवीं जाण्याविषयीं त्यांची परवानगी मागितली. महाराज म्हणाले "जायला हरकत नाहीं. पण तुझ्या गांवचा सप्ताह जवळ आला असेल. गेल्या सालप्रमाणें यंदाहि मी तुझ्या गांवीं कीर्तन सप्ताहासाठीं येईन, तू पुढें जाऊन सर्व व्यवस्था कर." मी गांवीं जाऊन सर्व लोकांना कळवून उत्तम प्रकारची व्यवस्था

केली आणि महाराजांना येण्याविषयीं पत्र पाठविलें. महाराज नामसप्ताह सुरूं होण्याचे दिवशींच आले आणि त्यांच्या कीर्तनसप्ताहाला सुरुवात झाली.

## दुसऱ्या खेपेस २७ दिवस महाराजांचा मुक्काम

या खेपेस महाराजांचा मुक्काम माझें घरीं २७ दिवस होता. त्यांच्या या मुक्कामांत, अनेक लोक 'अनादि सिद्ध अवधूत संप्रदाय' घेऊन धन्य झाले. **फिरतीस कोठेहि जावोत, महाराजांचा वागण्याचा वाणा कालमान परिस्थितीला साजेसा ठेवण्यावर त्यांचा कटाक्ष असे.**

एक दिवस नित्याप्रमाणें पहाटे ४॥ वाजतां, महाराज बहिर्दिशेसाठीं गावा-बाहेर गेले होते. त्याबाजूस एक भुताटकीचें घर होतें! त्या घरचा मालक भुताटकीचा त्रास मिटविण्यासाठीं जंतर-मंतर ताईत-दोरे वगैरे उपाय करून थकला होता. त्याच्या घरची एक बाई अंगांत येऊन विवस्त्र दशेंतच भटकत असे! त्या मालकाला याचा वीट आला होता. महाराज गांवीं आलेवर त्याला त्यांची कीर्तनें ऐकून असें वाटलें कीं त्यांच्या कानांवर आपली ही परिस्थिति घालून उपाय विचारावा. तो महाराजांचे भेटीसाठीं आमचेकडे एक दोनदां आला, पण महाराजां भोवतीं मंडळीची गर्दी होती म्हणून त्याला बोलण्याचा संकोच वाटे! मग त्यानें महाराज बहिर्दिशेस जातांना पाहिलें आणि ते परत येतील त्याचवेळीं आपल्या घरीं बोलावून पाय धुण्यास पाणी देऊन घरीं बसवून आपलें गाऱ्हाणें सांगण्याची संधि साधावी, असे त्याने योजिलें आणि त्याप्रमाणें त्या दिवशीं महाराजांना बहिर्दिशेहून परत येतांना आपल्या घरीं बोलावून घेतलें. महाराज परत येतांच त्यांना पाय धुण्यास गरम पाणी देऊन सोप्यावर बसण्यास आसन दिल आणि आपल्यास होत असलेला भुताटकीचा त्रास सांगितला. मग महाराजांचे पाय धरून 'या त्रासांतून मुक्त होण्याचा उपाय सांगा' म्हणून त्यानें महाराजांना कळवळून विनंति केल।. त्याची दया येऊन महाराज म्हणाले "हे पहा असा धीर सोडूं नका. घाबरण्याचें कारण नाहीं. आपल्या घरीं आतां अवधूत भूत शिरलें आहे! काल्पनिक भुताची या पुढें आपल्यास बाधा होणार नाहीं असा माझा आपल्याला आशीर्वाद आहे।" मग धीर वाटून या घर–मालकानें आपली विवस्त्र असलेली ५० वर्षांची मुलगी बोलावून महाराजांपुढें उभी केली, व 'महाराजांना नमस्कार कर' असें तिला सांगितलें त्याप्रमाणें नमस्कार करून निमूटपणें ती बाजूला उभी राहिली. त्या बाईला विभूति लावण्याचे ठरवून महाराजांनीं त्या गृहस्थास माझ्या घरीं विभूति आणण्यास पाठविलें. 'मी महाराजांना उशीर कां झाला?' या काळजींतच होतो! इतक्यांत ते गृहस्थ विभूति मागण्यास आल्या मुळें मला सर्व समजलें व मीच विभूति घेऊन गेलों. महाराजांनीं त्या बाईला

विभूती लावून तिच्या डोकीवर वरदहस्त ठेविला. 'आतां या पुढें तुम्हांला भुताटकीची कसलीहि बाधा होणार नाहीं' असा आशीर्वाद देऊन महाराज आमच्या घरीं ८ वाजतां आले. महाराजांच्या आशीर्वादाप्रमाणें त्या गृहस्थांच्या मागचा भूतबाधेचा त्रास कायमचा मिटला !

## सांगलीचे वाटवे शास्त्री

एकदां सांगलीचे वयोवृद्ध, विद्वान व कर्मठ शास्त्री वाटवे या आडनांवाचे, महाराजांशीं वाद करण्याचे ईर्षेनें आले होते. महाराजांची व ह्यांची जुनीच ओळख असून वयानें ते महाराजापेक्षां मोठे होते. यामुळें महाराजांना ते 'मोरबा' म्हणत आणि 'अरें तुरें' अशी सलगीची भाषा वापरीत. महाराजांना पहातांक्षणींच ते म्हणाले "अरे मोरबा ठीक आहेना ? मला ओळखलंस कां ?" महाराजांनीं त्यांना ओळखून घट्ट मिठीच मारली ! या मिठींत काय जादू असेल ती असो, वाद करण्यास आलेले शास्त्रीबुवा स्वस्थ बसूनच राहिले ! त्यांच्या डोळ्यांतून खळखळ अश्रू वहात होते ! थोड्या वेळानें भानावर येऊन त्यांनीं महाराजांचे घट्ट पाय धरले ! मग म्हणाले "मोरबा, खरोखर तूं मोठा अधिकारी पुरुष आहेस. या वृद्धावर कृपा कर. तुझ्या सद्गुरूंचा श्रेष्ठ ठेवा तुजपाशीं आहे. तो तुला शोभत आहे ! अरे, मी अनेक प्रकारचीं साधनें करून थकलों, अजून मला तुझ्यासारखी आत्मशांति लाभली नाहीं. ही आत्मशांति मला देऊन धन्य कर" ! वाटवेशास्त्रींची ही वृत्ति पाहून महाराजांनीं त्यांना ४ दिवस ठेवून घेतलें आणि त्यांचेवर पूर्ण कृपा करून त्यांना परत पाठविलें.

## दुसऱ्या फेरीचा निरोप

आमच्या बांबवडे गांवांत सर्व वैष्णव सांप्रदायिक होते. त्यांना माझ्या श्रीगुरूंचा **शुद्धाद्वैत बोध** पटल्यामुळें, महारांजाविषयीं द्वेष मत्सर वगैरे हीन भावना न ठेवतां सर्वजण महाराजांचे गुणानुवाद गाऊं लागले ! दुसऱ्या खेपेस कुरुंदवाडास जातेवेळीं गांवाबाहेरपर्यंत येऊन महाराजांना सर्वांनीं हार्दिक निरोप दिला. या दुसऱ्या फेरींत महाराजांशी माझा अगदी निगडित संबंध येऊन त्यांच्या भक्तिप्रेमानें मी वेडा झालों ! सर्व व्याप सोडून महाराजांच्या अखंड सहवासांत रहावें, असें वाटूं लागलें !

\+ \+ \+

महाराज कुरुंदवाडास गेल्यावर मी लगेच मुंबईस जाऊन नोकरीवर हजर झालों. मी रजेची परवानगीहि न मागतां एक महिनाभर गांवीं जाऊन आलों

तरीहि मला आक्षेप न काढतां नोकरीवर परत ठेवून घेण्यात आलें, हीहि मोठी गुरुकृपाच !

नंतर मुंबईस येऊन ४ दिवस राहून महाराज भडगांवास गेले; जाते वेळेस म्हणाले "मेघःशाम तूं श्रीदत्तस्थापनेच्या समारंभास भडगावास आला नव्हतास तर आतां भडगांवास येऊन श्रीदत्तमठींतील सर्व व्यवस्था पाहून घे." पण ह्या वर्षीहि मला भडगावास जातां आलें नाहीं !

**१९२८ सालीं** श्री. महाराज व श्री. अण्णा दोघेहि आमचे गांवीं आले. १९२६ ते १९३२ पर्यंत दरसाल आमच्या गांवीं दोघे येत होते. **१९३१ मध्ये आमच्या गांवीं महाराजांची शेवटची फेरी झाली.** या वर्षीहि महाराजांचा कीर्तनसप्ताह आनंदांत चालू होता. या सप्ताहाच्या आनंदांत एका घटनेनें विरजण पडल्यासारखें झालें ! माझे चुलतबंधु श्री. इंदुराय सावळाराम संकपाळ, पोलीस-इन्स्पेक्टर, बडोदा, यांचें 'पत्र पोचतांच जरूर निघून यावें' असें निकडीचें पत्र आलें. "माझे वर खुनाचा आरोप असून मला अटक करण्यात आली आहे, घरीं लहान मुलें आहेत व मोठा परिवार आहे तेव्हां तूं त्यांना धीर देण्यास इकडे त्वरित यावें" अशा आशयाचा मजकूर त्या पत्रात होता ! मला मोठाच पेंच पडला. महाराजांचें कीर्तन सुरूं होऊन पांचच दिवस झाले आणखी पांच दिवस कीर्तन चालावयाचे होतें ! हजारों लोकांना जाहीर केलेला कीर्तनाचा कार्यक्रम मध्येच बंद तर ठेवणें इष्ट नाहीं. पत्र वाचतांक्षणीं सुन्न होऊन मी चिंताक्रांत झालों होतों. आंत बाहेर फेऱ्या करीत असलेल्या गुरुमहाराजांचें लक्ष्य मजकडे गेलें ! माझा रडका चेहेरा पाहून महाराज म्हणाले "कायरे, तुला बरें कां वाटत नाहीं ?" मी 'हो' म्हणून मागील दारीं जाऊन विचार करीत बसलों ! "महाराजांना पत्रांतील मजकूर कळला तर ते मला ताबडतोब बडोद्यास पाठवितील आणि कीर्तनाचा कार्यक्रम बंद पडेल" ! अशी धास्ती माझ्या मनानें घेतली होती ! कारण महाराज अतीशय व्यवहार–दक्ष आहेत. म्हणून पत्र कोणासहि न दाखवितां मी वरकरणी आनंदानें वागूं लागलों !

दुसऱ्या दिवशीं माझे चुलतबंधु बंडू पाटील यांना पत्रांतील मजकूर एकीकडे नेऊन सांगितला. 'काय करावें' या संबंधी आम्ही दोघे एका बाजूस मसलत करीत असतां, महाराज आमच्या मागें येऊन उभे राहिले ! महाराज आम्हांला म्हणाले "कायरे, तुम्ही दोघे एकांतांत चिंतातुर होऊन कसली मसलत करीत आहां ? मला सांगण्यास कांहींच हरकत नाहीं." मग आम्ही महाराजांना तें पत्र दाखवून सविस्तर हकीगत सांगितली. पत्र वांचल्यावर महाराज मला एका बाजूस बोलावून म्हणाले "तुला भावानें बोलावलें आहे तेव्हां आजच बडोद्यास

जाऊन त्यांना भेटून परत ये. माझें कीर्तन ठरल्याप्रमाणें दहा दिवस पूर्ण होइतों चालूंच ठेवीन. **इकडील काळजी तूं करूं नकोस मी स्वतःचें घर असल्या सारखा वागेन** "! महाराजांचे हे शब्द मी निमूटपणें ऐकून घेतले. मग मी म्हटलें "महाराज मीच बडोद्यास गेलें पाहिजे असें नाहीं. माझ्या या चुलत बंधूना पाठविलें तरी चालेल. ते जाण्यास तयार आहेत. त्यानेहि आपण बडोद्यास जाण्यास तयार असल्याचें महाराजांना सांगितलें." महाराजांनी नंतर माझे चुलतबंधूना देवापुढें उभें करून त्यांचे कपाळास भस्म व फूल लावलें, एका चिठीवर कांहीं लिहिलें आणि त्याला सांगितलें कीं बडोद्याचे बंधूचे हातीं या पुडींतील निमें भस्म द्यावें. व बाकीचें अंगाला लावावें, तीन दिवस मौन धारण करण्यास त्यांना सांगावें, आणि **श्रीदत्तनामाचें चिंतन मनानें करावें.** बडोद्याच्या बंधूंना हें सर्व नीट समजून सांगावें." माझे वांबवड्यांतील चुलतबंधू बड्डू पाटील हे त्याच दिवशीं बडोद्यास रवाना झाले. दुसरे दिवशीं बडोद्यास पोचतांक्षणींच तेथील बंधूंना महाराजांनीं दिलेल्या सर्व सूचना समजून सांगितल्या.

**श्रीगुरुमहाराजांच्या विभूतीमुळें आणि दिव्य स्पर्शामुळें माझ्या बडोद्याच्या बंधूची अपीलांत २६ वर्षाची शिक्षा रद्द ठरून ते निर्दोष होऊन सुटले!** लगेच श्रीमंत राज सयाजीराव यांनीं माझ्या चुलतबंधूंना जेलरची जागा देऊन त्यांची बढती केली. त्यांचें व त्यांच्या मुलांचे यामुळें कल्याण झालें. धन्य धन्य माझी गुरुमाता! तीन महिन्यानंतर गुरुमहाराजांना ही सर्व हकीगत सांगितली तेव्हां त्यांना फार आनंद झाला!

माझें चुलतबंधू श्री. बंडू पाटील यांना बडोद्यास पाठविल्यावर दहावे दिवशीं महाराजांनीं कीर्तन समाप्ती केली. नंतर आमचे गांवानजीक एक लहान गांव आहे तेथें गुरुबंधु रामचंद्र मोहिते यांनीं निमंत्रण देऊन महाराजांचा कीर्तन सप्ताह केला.

## तरुणांचा उद्धटपणा

त्या गांवीं कीर्तन चालूं असतां एक 'सुशिक्षीत' म्हणवून घेणारा तरुण ओरडला "महाराज आमच्या गांवचे लोक अशिक्षित आहेत तव्हां त्यांना पटेल, असें कीर्तन करा"! हें कीर्तन त्या गांवांतील विस्तीर्ण अशा सिद्धेश्वर मंदिरांत चालू होतें. कीर्तनाला गांवांतील लहान थोरांचा मोठाच समाज जमला होता. आमच्या गांवचीहि बरीच मंडळी कीर्तनांत हजर होती. श्री. अण्णा पेटी वाजवीत होते आणि कुरुंदवाडचे श्री. जयराम सिंगन् तबला वाजवीत होते. महाराजांनीं संतसखूचे आख्यान लाविलें होतें. सखूच्या भक्तिप्रेमाचें रसभरित वर्णन महाराज करीत होते. अशा

ऐन कीर्तन रंगात तो तरुण मध्येच उठून उद्धटपणें बोलला. त्याबरोबर मध्येच निरुपण थांबवून गुरुमहाराजांनीं त्या तरुणाला उलट प्रश्न केला. "माझ्यापुढें महान् श्रोतृसमाज आहे. 'या समाजाला निरुपण समजत आहे कीं नाहीं असा प्रश्न अगोदर विचारलास तर बरें! 'समजत नाहीं' असें उत्तर या समाजाकडून मिळालें तर मी या ठिकाणीं स्तब्ध बसतों"!

श्रोतृगणांनीं हें पाहून एकच गिल्ला केला! "महाराज या मूर्ख मुलाचें काय ऐकतां? आम्हांला आपलें कीर्तन व निरुपण फारच आवडलें आहे." पण महाराजांनीं सर्वांना शांत रहाणेस सांगितलें आणि आख्यानाचा उरलेला भाग उद्ईक पूर्ण करूं म्हणून कीर्तन त्या दिवसापुरतें संपविलें. नंतर दुसरे दिवशीं आख्यान पूर्ण करून महाराज कुरुंदवाडास गेले.

## चौथ्या काकांचा गैरसमज गेला!

माझे चौथे काका बी. ए. एलएल. बी; पर्यंत शिकलेले असून ते हैद्राबाद कडील भौम संस्थानचे राजे थोरात यांचेकडे कारभारी होते. या काकांना आपल्या उच्च शिक्षणाचा फार अभिमान होता. "मेघःशामनें घरीं कांही तरी स्तोम माजविलें आहे, देवस्थान मांडून भक्तीचें कांही तरी बंड माजविलें आहे. त्याचें हें देवस्थान उचलून बाजूस ठेवून दिलें म्हणजे त्याचें हें बंड मोडेल" अशी भाषा आमच्या गांवांतील लोकांजवळ ते बोलत." माझ्या कानांवर ही भाषा आली तेव्हांपासून या काकांची भीति मला वाटूं लागली! मग मी असा विचार केला कीं "श्रीदत्ताची मूर्ति आणून पूजेस ठेवावी म्हणजे ती मूर्तिच उचलून बाजूस ठेवणें काकांना जड जाईल"!

**१२३१ सालीं** महाराज आमच्या घरीं आले त्याच वेळीं काकांच्या विषयींची ही धास्ती माझ्या मनांत उत्पन्न झाली होती. घरीं श्रीदत्तमूर्ति पूजे-करितां आणून ठेवण्याची ही कल्पना मी महाराजांना सांगितली, महाराजांनी माझ्या या कल्पनेला पूर्ण दुजोरा दिला आणि माझे "ते चौथे काका येथें आहेत कां?" म्हणून विचारलें. मी 'हो, आहेत येथेंच आहेत.' आम्ही काका संबंधी बोलत असतां काकाच महाराजांच्या भेटीला स्वतः आले! काकांचें आणि महाराजांचें आध्मात्मिक विषयावर पुष्कळ वेळ बोलणें झालें आणि काकांच्या मनांत महाराजांविषयीं पूज्यभावना उत्पन्न झाली. चर्चा संपल्यानंतर काका उठले आणि त्यांनीं महाराजांना भक्तिपूर्ण भावनेनें नमस्कार केल्यावर मला हांक मारली. काका म्हणाले "मेघःशाम हें पहा महाराज 'राजगुरू' आहेत. यांच्या उपदेशाप्रमाणें वागत जा, त्यांतच तुझें कल्याण आहे. **इतकेंच नव्हे तर आपल्या सर्व घराण्याचेंच कल्याण आहे.** गांवच्या कांही लोकांनीं मला भलतेंच सांगितल्या-

मुळ या सत्पुरुषाविषयीं माझे तोंडून अनुदार उद्‌गार निघत याचें मला फार वाईट वाटतें. त्याबद्दल सद्‌गुरूंची मी क्षमा मागतो!" असें म्हणून काकांनी गुरुमहाराजांचे घट्ट पाय धरले! महाराजांनीहि त्यांना उठविलें आणि मोठ्या प्रेमानें अभय देऊन त्यांना धन्य केलें!

माझ्या चौथ्या काकांचें वरील प्रमाणें परिवर्तन झाल्यावर आणि महाराजाना निरोप दिल्यानंतर मी आनंदानें मुंबईस आलों. आणि फिरून नोकरीवर हजर झालों. यावेळीं मला ३० ते ३५ रु. पगाराचे मिळत. घरीं खर्चाला देऊन श्रीदत्तमूर्ति घेण्यासाठीं शिल्लक टाकायची कशी आणि किती? या वेळींहि हाजी कासमचे चाळींत घोडपदेव येथें श्री रामचंद्र मास्तर यांचेकडे रहात होतो. अखेर १९३२ सालीं कांही गिरणींतील मित्रांकडून ६५० रु. कर्जाऊ काढले आणि मुलेश्वर येथून ६५० रु. ला श्रीदत्तमूर्ती घेऊन ती हाजीकासम चाळींत श्री. रामचंद्र मास्तर यांचेकडे मोटारींतून आणून ठेविली आणि महाराजांना भडगांवीं पत्र पाठवून श्रीदत्तमूर्ति आणून ठेविल्याचें कळविलें. **त्या पत्राला महाराजांनीं उत्तर पाठविलें तें पुढील प्रमाणें**:-चि. रा. मेघश्याम यांस अनेक आशीर्वाद तुझें पत्र वांचून फारच आनंद झाला. मात्र देवाचें सर्व व्यवस्थित करणें संबंधी आज पासून दक्ष रहावें लागेल. तूं आज प्रत्यक्ष श्रीदत्त डोकीवर घेतला आहेस. हें लक्षांत ठेव! **श्रीदत्तास कोणता भक्त आवडतो तें तुला सांगतों** (१) पूर्ण कर्मिष्ठ किंवा (२) पूर्णज्ञानी, मध्य स्थिति नसावी. मूर्ति घेणे संबंधीं तुझ्या गांवीं तू मला विचारलें होतेंस; परंतु तावडतोब घेशील असें वाटलें नव्हतें. कांहीं हरकत नाहीं. आम्ही मुंबईस थोड्याच दिवसांनीं येणार आहों, तेव्हां बोलूं—कळावे हा आशीर्वाद.

—मो. के. दातार

\+ \+ \+

## निंदक चूपचाप! मूर्ति लाभदायक

१९३२ च्या आश्विन महिन्यांत मी मूर्ति घेतली. या महिन्याचे अखेरीसच महाराज व अण्णा मुंबईस आले. कांहीं गुरूबंधूंनी महाराज आल्याबरोबर त्यांना भेटून ही बातमी कळविली! महाराजांना न कळवितांच मी मूर्ति घेण्याचा 'आगाऊपणा' केला म्हणून महाराजांजवळ या लोकांनीं माझी नालस्ती केली! या लोकांचें सर्व बोलणें ऐकल्यावर महाराजांनीं त्यांना थोडक्यांत उत्तर दिलें, **"त्यानें श्रीदत्तमूर्तीच घेतली नां? आणखी कांहीं वेडेचार नाहीना केले?"** महाराजांचे हे शब्द ऐकून ते सर्व निंदक निमूटपणें आपापल्या

ठिकाणीं निघून गेले ! आणि नंतर चूपचाप राहिले ! गुरुमातेच्या कृपचा हा प्रभाव ! दुसरे दिवशीं मी महाराजांना भेटण्यास जाणार होतो. परंतु श्री. अण्णा व महाराज एका माहितगार माणसाला आणि आपल्या प्रिय भगिनीला घेऊन सकाळीं ९॥ चे सुमारास हाजीकासम चाळींतच श्रीदत्तमूर्ति पाहण्यास आले. महाराज आले असें समजून चाळींतील लोकांची दर्शनासाठी गर्दी झाली. महाराज श्रीदत्तमूर्तीचें दर्शन घेऊन म्हणाले "मूर्ति तर सुंदर घेतलीस. हे विष्णुदत्त आहेत." मग महाराजांना पुष्पहार घालून मी मूर्तीची पूजा व आरती केली. आरती झाल्यावर महाराजांनीं आपल्या गळयांतील हार मूर्तीला घातला नंतर महाराज म्हणाले "**मेघःशाम. या मूर्तीचें भक्तिभावानें पूजन कर, तुला ही मूर्ति लाभदायक आहे.**" महाराजांचे ते शब्द अजूनहि मला आठवतात ! महाराजांनीं सुचविलें "ही मूर्ति येथें फार दिवस न ठेवतां लवकर गांवीं घेऊन जा. आणि आज पासूनच या मूर्तीची नियमित पूजा आणि आरती करीत जा" असें सांगून महाराज गिरगांवांत आपल्या निवास स्थानीं गेले.

## श्री. अण्णांच्या मदतीनें मूर्ति गांवीं आणली

दुसऱ्या दिवशीं महाराजांना भेटण्यास गेलो त्यावेळी महाराजांनीं कांहीं लोकांनीं माझी नालस्ती त्यांचेकडे केल्याचें सांगितलें. हे लोक मत्सरी असल्यामुळें मूर्ति फारच संभाळून न्यावी लागेल" असा इषाराहि महाराजांनीं दिला ! ते म्हणाले "मूर्ती गांवीं केव्हां नेणार तो दिवस मला अगाऊच नक्की कळव. म्हणजे चि. दत्तूस तुझे बरोबर पाठवितों, म्हणजे तो मूर्ति तुझ्या गांवीं सुरक्षित पोचवून परत येईल ! तुला कांहींहि काळजी करण्याचें कारण नाहीं" !

माझ्या गुरुमातेला मजविषयीं किती काळजी व प्रेम हीते याची ही कल्पना, सदरील कळकळीची सूचना वांचून वाचकांना देखील येईल ! श्री. महाराजांची सूचना नीट विचारांत घेऊन मूर्ती **गांवीं नेण्याची तारीख ३ मार्च १९३३ ही ठरविली** आणि तसें महाराजांनाहि कळविले. ठरल्याप्रमाणें श्री. महाराजांनीं मूर्ति माझ्या गांवीं पोचविणेस मदत करण्याकरतां श्री. अण्णांना पाठविलें, "किर्लोस्करवाडी स्टेशनपासून बांबवडे गांवीं श्रीदत्तमूर्ति मोठ्या समारंभानें नेण्यांत येईल" अशी जाहीर पत्रके बांबवडे व आसपासच्या गांवीं वाटण्याची व्यवस्था केली. गुरुबंधू श्री. अण्णा यांनीं मूर्ति सुरक्षित नेण्यासाठीं फर्स्टक्लासची तिकिटें काढली आणि आम्ही दोघे किर्लोस्करवाडी स्टेशनवर श्रीदत्तमूर्तीसह उतरलो. स्टेशनवर आणि बाहेरच्या आवारांत श्रीदत्तमूर्तीचें स्वागत करण्यासाठीं भक्तांची खूपच गर्दी पाहून मी आश्चर्यचकीत झालों ! मूर्ती ज्या किर्लोस्कर मोटारींतून न्यावयाची असें मंडळीनें ठरविले होतें. ती मोटार

ऐनवेळीं नादुरुस्त झाल्यामुळें, खोक्यांत पॅक केलेली मूर्ती लोकांनीं मागे पुढें धरून बांबवड्यास आणली. गुरुबंधू अण्णा यांना मूर्ती जागेवर आणीपर्यंत पुष्कळच त्रास झाला पण त्यांनीं तो यत्किंचितहि प्रगट केला नाहीं ! सर्व लोकांनीं नमस्कार करून अण्णांना धन्यवाद दिले ! मूर्ति अधिष्ठानाच्या जागीं आल्यावर गांवकर लोकांनी मोठ्या भक्तीनें मूर्तीचें दर्शन घेऊन प्रणिपात केले, मूर्तीच्या आगमना-प्रीत्यर्थ श्री. अण्णांचें अकरा दिवस सुश्राव्य कीर्तन झालें. त्या आनंद–सोहाळ्याचें वर्णन करण्यासाठीं शब्द अपुरे पडतात !

या अकरा दिवसांत श्री. अण्णांचा व माझा अतिशय निकटचा संबंध आला आणि तो संबंध आणि परस्परांचे वरील जिव्हाळ्याचें प्रेम अद्यापहि चालू आहे । मूर्ती बांबवड्यास आणून पोचवून अकरा दिवस कीर्तनोत्साह

झाल्यानंतर श्री. अण्णा मुंबईस परतले त्यावेळीं महाराज भडगांवास गेले होते. मी श्रीदत्तमूर्ती माझ्या चुलतबंधूंचे सोप्यासमोर ठेविली. याच ठिकाणीं श्रीगुरु-महाराज व श्रीपंत यांच्या फोटोचें अधिष्ठान होतें. या स्थानांतून श्रीदत्तमूर्ति हालविण्याची माझ्या हैद्राबादकडील चौथ्या काकांची भीति राहिली नव्हती ! तेव्हां माझा संकल्प पुरा झाल्याच्या आनंदांत १५ दिवस गांवीं राहून मी मुंबईस गेलों. एक महिन्यानंतर गुरुमहाराजहिं मुंबईस आल्यावरोबर त्यांचे दर्शन व भेट घेतली. मूर्ती गांवीं पोचविल्याची सविस्तर हकीगत मी सांगितल्यावर महाराज म्हणाले " ती मूर्ति घरी ठेवण्याची वस्तू नव्हे. तुझ्या वाड्यावाहेर मोठें मैदान आहे तेथें लहानसें बांधकाम करून त्या मंदिरांत मूर्तीची सुरक्षित व व्यवस्थित स्थापना कर. "

## बांबवड्यास मंदिर बांधण्याचा गुरुमाउलीचा आदेश

वरीलप्रमाणें बांबवड्यांतील माझ्या घरासमोरील मोकळ्या जागेंत छोटेसें श्रीदत्तमंदिर बांधण्याचा आदेश वरीलप्रमाणें दिल्यावर महाराज म्हणाले " थोड्याच दिवसांत आम्ही कुरुंदवाडचें सर्वच बिऱ्हाड भडगांवीं आणणार आहों. चि. अनंता शिक्षण घेऊन कुरुंदवाडास नोकरी निमित्तानें राहिला तरच आमचें कुरुंदवाडास जाणे येणें राहील नाहींतर तो दुसरीकडे व्यवसायासाठीं राहिल्यास त्या टापूंत आलों तर तुझ्या श्रीदत्तमंदिरांतच उतरूं. "

गुरुमाउलीच्या आदेशाप्रमाणें मी श्रीदत्तमंदिर बांधण्याचें काम पूर्ण करीत आणूं शकलों ही श्रीगुरुमाउलीची कृपाच होय !

. मी त्यावेळीं गुरुमहाराजांना म्हटलें आपल्या गांवीं विहीर नाहीं. गांवा-बाहेरील विहिरीचें पाणी आणावें लागतें ! महाराज यावर म्हणाले—

"तूं मूर्तींची स्थापना ज्या ठिकाणीं करशील ह्या आवारालगत ज्या ठिकाणीं तू खणशील त्या ठिकाणीं श्रीदत्त पाणी देईल"! महाराज पुढें म्हणाले "तुला इतकेंच फिरून सांगतो कीं तूं भगवें घ्यावेस. परंतु मी अनेकदां सुचविलें तरी दुर्लक्ष्यच करीत आहेस!" (मी 'पुढें पाहू' असेंच प्रत्येक वेळीं बोलत आलों होतों!)

१९२५ सालीं महाराजाची भेट झाली. पण निकट संबंध आला नव्हता. मुंबईस अनुग्रह घेतल्यानंतर ४ वर्षांनीं महाराज भाडगांवाहून आल्यानंतरच त्यांच्या निवासस्थानी आध्यात्मिक विषय ऐकण्यास मिळे. दररोज मी कीर्तनास जात असे. जॉबरची नोकरी गिरणींत करणारा माझा चुलत भाऊ करीरोडला रहात असें. मला त्यानेंच गावाहून बोलावून गिरणींतील वीव्हिंग खात्यांत ठेविले होतें. त्याची परवानगी घेऊनच मी महाराजांच्या कीर्तनाला जाई आणि पहाटे उठून गिरणींतील कामावर जाई. या भावाचे मजवर फार प्रेम होतें. मी कीर्तनास जातो आणि महाराजांचा अनुग्रह घेतला हे माझ्या भावाला समजलें होते; या विषयीं त्याची संमति होती, विरोध नव्हता.

## पंतभुवनांत महाराजांचे कीर्तन

इ स १९२९ च्या श्रावण महिन्यांत गिरगावातील "श्रीपंत भुवनांत' काकाजीचे निवासस्थानीं महाराजांचें कीर्तन होतें. यावेळीं महाराजांचा मुक्काम श्री. का. म. ताम्हनकर यांचेकडे होता. महाराजांना मी पंतभुवनचा पत्ता विचारला तेव्हां महाराज म्हणालें 'काकाजी फक्त आपल्या कुटुंबीय श्रोत्यांकरितां कीर्तन करवितात बाहेरील मंडळीला निमंत्रण नसते, कारण बाहेरच्या मंडळीची गर्दी झाल्यास कुटुंबीयाना कीर्तन नीट ऐकावयास मिळणार नाही असें त्यांना वाटतें. म्हणून तूं व बरोबरचे लोक त्याठिकाणीं कीर्तनास येऊं नका" महाराजांची ही सूचना ऐकून माझा विरस झाला. मला कससेंच वाटलें! अशा स्थितींतच मी भावाचे बिऱ्हाडीं गेलों. पण रात्रीं झोप नीट आली नाहीं! कीर्तन ऐकण्यास मिळणार नाहीं अशी मनाला सारखी हुरहुर वाटत होतीं! गिरणींत कामाला गेलों तरी कामाकडेहि नीट लक्ष लागेना! मधून मधून काम सोडून कोठें तरी पहात राहूं लागलों! एका अधिकाऱ्यानें मला हटकलें आणि म्हणाला "कायरे असा वेड्यासारखा काय पहातोस? तुझी तब्येत आज ठीक नाहीं काय? मग मी कामांत गढलोसे दाखविलें! पण सर्व लक्ष घड्याळ्यांतील ६ च्या ठोक्याकडे होतें! कारखाना बंद झाल्यावर बिऱ्हाडीं येऊन स्नान केलें आणि कपडे घालून महाराजांच्या भेटीस गेलों. पण महाराजांना "मी एकटाच काकाजींकडे कीर्तनास येऊं कां?" असें विचारण्याचा धीर झाला नाही! मग मनाशीच असें ठरविलें कीं दुसऱ्या दिवशीं गिरणीला रविवारची सुट्टी असल्यामुळे तीनप्रहरीं ३-४ चे

सुमारास गिरगाव पोर्तुगीज चर्चेहून महाराजांची गाडी काकाजीकडे जाणार तिची वाट पहात उभे रहावें. पांच वाजण्याचे अगोदर महाराज श्री. अण्णा व पेडणेकर गाडीतून जातांना दिसल.

गाडी मागून मी गेलों आणि 'वर जावें कीं नाहीं' या विचारांत पडलों. महाराज वर जाऊन १५ मिनिटं होऊन गेलीं, आतां कीर्तन सुरू होणार, अशी उत्कंठा वाटून जिन्यापर्यंत जाण्याचें धाडस केलें! जिन्यांशीं उभा असलेल्या दंडधारी भय्याचा पहारा पाहून थबकलों! तेव्हां पहारेकऱ्याला चकवून वर जाण्याची परवानगी मिळवून देणारी एक युक्ति मला सुचली! शेजारच्या दुकानांतून एक झांज खरीदून मी गडबडीनें जिन्याजवळ आलों. तो पहारेकरी भय्या मला दटावून म्हणाला, "ए छोकरा किदर जाता है?" मी मराठींतच उत्तर दिलें, "महाराज वर कीर्तन करीत आहेत, त्यांचा झांजवाला मी आहे!" तो पहारेकरी भय्या माझ्या हातांतील झांज पाहून म्हणाला, "चलो चलो जलदी जाव." पहारेकऱ्याचें तावडींतून सुटलों खरा, पण जिना चढून वर जातांना 'महाराज रागावतील' या भीतीनें पाय थर थर कांपूं लागले! अंग घामानें डबडबलें! तशाच स्थितींत भीतीनें वरच्या दरवाज्यांत पाय ठेविला तोंच कीर्तनास सुरवात झाल्याचें ऐकलें! भीतीनें पुरा घेरल्यामुळें चार पायऱ्या उतरून पायरी-वरच ५ मिनिटें बसून राहिलों. फिरून अशी भीति वाटली कीं असा चोरून बसलेला कोणी पाहिल्यास भलताच बोभाटा होईल! म्हणून घट्ट मन करून वर गेलों आणि महाराज कीर्तन करीत होते त्या मागच्या बाजूस बसून कीर्तन ऐकलें आणि कीर्तन संपल्यावर आरतीस सुरवात झाल्याबरोबर चटकन् उठून तेथूनच महाराजांना वंदन करून माझ्या बिऱ्हाडीं पळ काढला! महाराजांनीं मला ओझरतें पाहिलें असावें, पण कीर्तन रंगांत काय बोलणार?

## भडगांवास श्रीदत्तजयंतीला हजिरी

१९३३ सालीं महाराजांनीं फिरून आग्रह केल्यावरून मी भडगांवच्या श्रीदत्तजयंतीच्या उत्सवास गेलों. चंपाषष्ठीचे दिवशीं महाराजांनीं मला सर्व मठीं दाखविली. मठींतील सर्व व्यवस्था आणि कार्यक्रम पाहून मला अतीशय आनंद झाला. ११ दिवसांत मठींतील सर्व कार्यक्रम पाहून धन्य धन्य वाटलें, सकाळीं पूजा आरती नेवेद्य आणि भक्तांना प्रसाद झाल्यावर थोड्या विश्रांतीनंतर तीन प्रहरीं ३ ते ६ मठींत आध्यात्मिक चर्चा चाले, मग भक्तांचीं जेवणें फराळ वगैरे झाल्यावर रात्रीं ८ वाजतां पालखी, ९ ते १० टिपऱ्या व गोफ आणि रात्रीं १० ते १२ कीर्तन 'सर्वच कार्यक्रम भक्तिप्रेमानें उत्तम रंगत असत.' कोणत्याहि गोष्टीची न्यूनता भासत नसे, '**मूर्तिमंत अवधूत**' अशा **मोरेश्वराच्या दरबारांत**

न्यूनता कशी असेल ! अशी सर्वत्र भावना ! श्रीमंत, गरीब, असा भेदाभेद न करतांना महाराज सर्वांशीं सारख्याच प्रेमानें वागत.

## नांदेडच्या तोताराम मास्तरांशीं आध्यात्मिक चर्चा

या उत्सवांत नांदेडच्या तोताराम मास्तरांशीं एक दिवस आध्यात्मिक विषयावर मनोवेधक वाद–चर्चा झाली. ते म्हणत "सात्विक आहार व सात्विक कर्म यांवाचून मनुष्य मुक्त होणें अशक्य" महाराजांनीं त्यांच्या या म्हणण्याचें खंडण करतांना शुद्धाद्वैताची भूमिका स्पष्ट केली. महाराजांनीं तोताराम मास्तरांना **मुक्त माणसाच्या स्थितीचें वर्णन करण्यास प्रथम** सांगितलें, तोताराम मास्तर म्हणाले "काया, वाचा, मनानें शुद्ध होऊन षड्विकार रहित जो होतो, तोच मुक्त होतो. त्याच्या स्थितीला मुक्तस्थिती म्हणता येईल."

महाराजांनीं नंतर तोताराम मास्तरनां **दुसरा प्रश्न** विचारला, "काया, वाचा, मन शुद्ध ठेवणें तें कसें हें सांगाः—तोताराम मास्तरनीं उत्तर दिलें काये कडून सर्व सात्विक कर्मच करवावें, वाचेनें सत्य तेंच बोलावें, आणि मन सात्विक कार्यांतच दक्ष राखावें. महाराज म्हणाले "आतां एकच प्रश्न विचारतो त्याचें उत्तर द्या म्हणजे झालें." महाराजांचा "तो प्रश्न असा"—"षड्विकार रहित होणें म्हणजे काय ? यावर श्री. तोताराम मास्तर म्हणालेः—"काया वाचा मनानें सात्विकतेनें वागून, अंगांतील सत्त्वगुणाचें सामर्थ्य मनुष्य वाढवील. अशा मनुष्याचे अंतः-करणांतून चुकूनहि षड्विकार रहाणार नाहींत तो विकार रहित होऊन मुक्त होतो."

मास्तरांचें सदरील उत्तर ऐकून महाराज बोलले "हे पहा मास्तर, अनुभव न घेतां तुम्ही शाब्दिक बडबड करीत आहां. आपल्या षड्विकार–रहित स्थितीचा मला अनुभव घेऊं द्या. तरच मला तें तत्व पटेल." मठीच्या माडीवरील श्री. पंतहॉल मध्ये ही चर्चा चालू होती, अंदाजें १२५ मंडळीं चर्चा ऐकत होती, मीहि चर्चा ऐकत होतो. मास्तरांचे हातीं घड्याळ होतें. त्याकडे पाहून महाराज मास्तरना म्हणाले "आपल्या हातांतील तें घड्याळ या गरीब विद्यार्थ्याला देऊन टाका पाहूं" ! हें ऐकून मास्तर कांहींच बोलेनात ! महाराज पुढें म्हणाले "आपण घरचे सधन आहांत, व्यवहारांत आपल्याला कसलीहि न्यूनता नाहीं, हें नांदडेला आपल्या घरीं आलों त्यावेळीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. आपल्या गांवीं वृद्ध, विधवा माता आणि आंधळें हलाखींत असतीलच. तेव्हां अंतःकरणांतील अतिस्वार्थी लोभ सोडून आपण अशांपैकीं कांही लोकांचा चरितार्थ चालेल अशी कांहीं तरी व्यवस्था तुमच्या धनांतून करण्याचें वचन मला द्याल का ? चार दिवस या मठींत आपण आनंदानें वावरत आहां, आपल्याशीं मीहि प्रेमानें आणि खेळीमेळीनें वागत आहे, गोड बोलत आहे, पण याच्या उलट याच क्षणीं मीं दुरुत्तरें करून आपला अपमान केला,

तरीहि मजवर राग न करतां चार दिवस जसे राहिला तसेच नंतरहि या मठींत आपण रहाल कां ? रागाचे भरांत तावडतोव आपल्या गांवी घरीं जाणार नाहींना ? कदाचित् असा प्रकार घडल्यावर या मठीत या जन्मीं पाऊलहि ठेवणार नाहीं असेच मला वाटतें ! एकुलता एक तरुण मुलगा देवाघरीं गेल्यास कोणीहि शोक व्याकुळ होतो नां ? सुंदर तरूणी पाहून खची होणारेच सर्वत्र दिसतात ! असें होत असता 'काम जिंकला' म्हणणें हास्यास्पद ठरत नाहीं कां ? क्षणाक्षणाला दुसऱ्याचा द्वेष करणारे सर्वत्र दिसतातच ! अहंकाराचे आधीन न होणारे किती लोक आढळतात ? असे विकार देह असेपर्यंत् बहुतांचे ठिकाणीं रहातात. हे विकार आवरावे कसे इतकेंच सज्जन व सत्पुरुष सांगत असतात. षड्विकार टाकून, षड-विकारांचे पलीकडे जाऊन भक्त काय करतो हें सांगणें सोपें नसून फार अवघड आहे ! म्हणून **विकारातीत होणे म्हणजेच मुक्त होणें ही आपली समजूत भ्रामक आहे !** धोंडा विकार रहितच' असतों. मग 'तो तुम्हां माणसांपेक्षां श्रेष्ठ' असे कां म्हणायचें ? 'सात्त्विक आहार घेतल्यानें मनुष्य सात्त्विक होतो' असें तुम्ही म्हणतां. असे करूं या कीं अगदीं टाकाऊ आहार घेणारा एक मनुष्य माझ्याकडे आहे अशी कल्पना करा आणि सात्त्विक आहार घालून सतत सहा महिने तुम्ही आपल्याकडे एक मनुष्य ठेवा. एखाद्या मोठ्या आध्यात्मिक पंडितानें अशा दोन माणसांची परीक्षा तुलनेनें घ्यावी. मग काय ठरतें व होतें याचा अनुभव मिळवावा."

महाराजांच्या या प्रश्नांनीं व खुलाशांनीं श्री. तोताराम मास्तर पूर्ण थिजून गेले आणि महाराजांना शरण आल्याचा प्रत्यक्ष अनुभव मी लिहीत आहे !

## श्री. अण्णांचे बरोबर फिरतीस

१९३३ चा श्रीदत्तजयंती-उत्सव झाल्यानंतर सर्व मंडळी आपापल्या ठिकाणीं गेली. मला त्यानंतर पंधरा दिवस महाराजांनीं ठेवून घेतलें. मुंबईस नोकरीवर जाण्याची परवानगी महाराजांकडे मागितली तेव्हां महाराजांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. मग चार दिवस जाऊं देऊन फिरून विचारलें 'महाराज माझी रजा संपत आल्यामुळें मला नोकरीवर आतां गेलेंच पाहिजे. मग महाराज म्हणाले "हें पहा, अशी आतां गडबड करूं नको. माडीवर ऑर्गन आहे, चल तिकडे" असें म्हणून मला माडीवरील पंत-हॉलमध्यें घेऊन गेले आणि ऑर्गन उघडून वाजवूं लागले. नंतर मला म्हणाले "दररोज येथें ऑर्गन वाजविणेस शीक; आणि हें शिक्षण घेऊन चि. दत्तूबरोबर ठाण्यास फिरतीवर जा." .

महाराजांनीं त्या वेळीं कीर्तनांतील प्रथम नमन—

'काषाय वस्त्रं कर दंड धारिणम्' स्वतः गाऊन मला वाजविण्यास

शिकविलें. मग म्हणाले "आठ दिवसांत तुला कीर्तनाची सांथ करतां येईल, अशी तुझी तयारी करून देतों." मग तूं दत्तूबरोबर फिरतीस जा."

महाराजांचे हे शब्द ऐकून मी थक्कच झालों! मी मुंबईस नोकरी करून दर महिना अखेरीस घरीं खर्चास पाठवी आणि त्यावर प्रपंच चाले. एकंदरींत घरची सर्व प्रकारची जबाबदारी मजवरच होती–यामुळें महाराजांना कसें सांगावें हें मला सुचेना!

महाराजांच्या शिकवणीनंतर मी ऑर्गन वाजविण्याचा कसा बसा प्रयत्न करीत होतो. मनांत एकदां वाटे 'महाराज सांगतात त्या प्रमाणें वागल्यास आपलें कल्याणच होईल' हाच विचार बळावून दुसऱ्या दिवशीं महाराजांना म्हटलें, श्री. दत्तुअण्णांबरोबर मी फिरतीवर जातों." घरची सर्व परिस्थिति सांगितली तर कदाचित् महाराज 'जा नोकरीवर म्हणतील आणि मी या थोर संगतीच्या सहवासाला मुकेन' अशी भीति वाटून मी दुहेरी पेंचांत सांपडलों! दररोज कष्टानें ऑर्गन वाजविण्याचें शिक्षण घेऊं लागलों. महाराज रोज नव्या नव्या पदांच्या चाली शिकवीत. १० दिवसांत पट्टीवर वेडेवांकडे बोट फिरविण्याइतपत शिकलो! पण महाराज म्हणाले "तूं आतां पेटीची सांथ उत्तम करशील! तेव्हां उद्यां चि. दत्तूबरोबर फिरतीस जाच" अशा रीतीनें महाराजांनीं माझी रवानगी श्री. अण्णांबरोबर फिरतीसाठी केली! परमपूज्य श्री. अण्णांचेंहि मजवर अवर्णनीय प्रेम होतेंच. माझ्या गांवीं श्री. दत्तमूर्ति पोचविणेस आले तेव्हां पासून त्यांचा निकट सहवास मला लाभला होता. त्यांच्या सहवासांत रहाण्याचा मलाहि फार आनंद वाटे. महाराजरूपी गुरुमाउलीनें अशा प्रकारे ही माझी आवड वाढीस लावली.

## ठाण्याचे विठ्ठल मंदिरांत एक महिना कीर्तन

ठाण्यास आल्यावर मी व श्री. अण्णा 'चंदनी' येथें धाकूबाईचे घरीं उतरलों. बरोबर ती सौ. माई (श्री. अण्णांच्या पत्नी) आणि कन्या कृष्णाबाई (वय २ वर्षें) होती. ठाण्याचे विठ्ठल मंदिरांत एक महिना कीर्तन ठरलें. कीर्तनांत ऑर्गनवर सांथ करण्याचा माझे वरील तो पहिलाच प्रसंग! त्या कठीण प्रसंगाचें वर्णन काय करावें! मी अगोदरच एका पायानें अधू. ताल–स्वर म्हणजे काय याची मला कांहीच माहिती नव्हती. श्री. अण्णा काळ्या ४ पट्टीच्या षडजांत पद म्हणूं लागले कीं मी साथ कसली करणार? भात्यावर पाय देऊन नुसता स्वर देखील भरदार देण्याइतका मी नेटका नव्हतो व नाहीं! त्यावेळीं भीतीनें थरथर कापूं लागलों आणि सर्वांगाला घाम सुटला! श्री अण्णांचे कडे पाहून जास्तच भीति वाटे! अशा परिस्थितींत कीर्तन करणाऱ्या अण्णांच्या पद्य–गानांत रंग कसा भरला असेल याची वाचकांनीच कल्पना करावी!"

" गुरुमहाराजांचा शिष्य ऑर्गनवर उत्तम सांथ करतो असं अण्णांना वाटलें असेल काय ? " माझी मात्र त्यावेळीं फट्फजिती होऊन त्रेधा उडाली ! विठ्ठल मंदिरांतील त्या कीर्तनाला अलोट गर्दी लोटली होती. मला वाटलें सर्व श्रोते माझ्याकडे पाहून हंसत होते ! तें पाहून मला काय वाटलें ह्याचें वर्णन आणखी करणें नको ! कीर्तन संपवून परत निवासस्थानीं आल्यावर श्री. अण्णा माझेवर खूप रागावतील असें मला वाटलें ! पण ते कांहींच बोलले नाहींत ! तेव्हां मीच श्री. अण्णांना म्हटलें " उदईक दुसरा पेटीवाला पहाल तर बरे ! मी आपला एकतारी घेऊन बसतो ! " श्री. अण्णा मग मला म्हणाले— " अरे तुला महाराजांनीं ऑर्गन वाजविणेस शिकवून माझ्या कीर्तनांत सांथ करण्यास पाठविलें आणि मीहि महाराजांना तुला घेऊन जाण्याचें वचन देऊन आलों आहे. तेव्हां तूं भय सोडून येईल तसें वाजवीत जा. हळू हळू तुला सर्व जमेल, कोणतीही गोष्ट एकदम चांगली होत नसते. " श्री. अण्णांनीं धीर दिल्यामुळें जरा बरें वाटलें. दुसरें दिवशींहि ऑर्गनवर सांथ करणेस बसलों. पण कसली सांथ करतो ? माझ्या अशुद्ध व अपस्वरामुळें श्री. अण्णांना बराच त्रास होई ! पण ते सहन करणारे जबरे ! माझ्या सारख्या पढत मूर्खालाहि जवळ करून ते प्रेमानें वागवीत !

या ठाण्याच्या फेरींत श्री. अण्णा रात्रीं खूप वेळ बसून माझ्याशीं अध्यात्म चर्चा करीत. कोणी भेटावयास आला तरी ही चर्चा चालूंच राही ! सौ. माईंना मात्र आमच्या चर्चा–सत्रामुळें फार त्रास सहन करावा लागे. दोन प्रहरीं तर १२ चे आंत सौ. माईंचा स्वयंपाक तयार असे. आमची जेवणासाठीं त्यांनीं किती वाट पहायची ! रात्रींही तसेंच, त्यांना ताटकळत बसावें लागे. चर्चेच्या भरांत जेवणाच्या व झोपेच्या वेळांचीहि आम्हांला दाद नसे ! सौ. माई मला एकदां सहज म्हणाल्या, " मेघःशाम जेवणें वेळेवर उरकून मग वाटेल तितका वेळ गप्पा मारत बसला तरी माझी आडकाठी नाहीं ! " श्री. अण्णांना मी मग सौ. माईंचें म्हणणें सांगितल्यावर श्री. अण्णा जेवणाची वेळ शक्यतों संभाळूं लागले !

## फेरीस जाण्याची तपश्चर्या

प्रत्येक कीर्तनाच्या मुक्कामांत गुरुवारीं अण्णा फेरीस जात. ठाण्यास मीहि भर रस्त्यांत अण्णांच्या बरोबर फेरीस जाऊं लागलों, मी झांज वाजवून सांथ करी. अगदीं पहाडी खड्या सुंदर आवाजांत श्री. अण्णा श्री. पंतांची पदे गात ती ऐकण्यास लोकांची गर्दी होई ! कीर्तनांतहि महाराजांची अनुग्रहीत मंडळी श्री. अण्णांच्या कीर्तनाचें कौतुक करीत. " इतक्या लहान वयांत गुरुकृपा संपादन केल्याविषयीं मोठमोठे शास्त्री पंडितहि श्री. अण्णांना धन्यवाद देत ! आणि म्हणत

गुरु महाराजांच पोटीं हा साक्षात् दत्तच अवतरला असून महाराजांचीं सर्व भूषणें त्याला शोभतात." हा **गौरव मी स्वतः ऐकून नमूद करीत आहे.**

## ठाण्यानंतर वसईस

ठाणे येथील कीर्तनांचा कार्यक्रम संपल्यावर आम्ही वसईस गेलों. आणि तथें श्री. राऊत यांच्या बंगल्यांत मुक्काम केला. वसईच्या श्रीदत्त-मंदिरांत श्री. अण्णांच्या कीर्तनाचा कार्यक्रम चालूं झाला. वसई गावांत गुरुमहाराजांचीं कीर्तनें पूर्वीं बरीच झालीं असल्यामुळें बरेच लोक वसईंत अनुग्रहीत झाले होते. श्री. **राऊत यांच्या बंगल्यांत सर्व पंतबंधूंना मोठ्या प्रेमानें बोलावून महाराजांनीं भक्तमंडळींना आपला परिचय करून दिलेला होता.** वसईला आम्हीं गेल्यावर हा सर्व पूर्वेतिहास आम्हांला व विशेषतः मला समजला. श्री. अण्णांच्या कीर्तनाला सुरुवात होताच कीर्तनाला आणि राउतांच्या बंगल्यांतील आध्यात्मिक चर्चेला लोकांची गर्दी होऊं लागली. वसई गांवांतहि श्री. अण्णा मला फेरीला घेऊन जात. वसईचे पाटील बंधु, जगोत्रा धरत, व त्यांचे घराण्यांतील इतर लहान थोर मंडळी अतिशय प्रेमळ आहेत. महाराज वसईस आल्याचें समजतांच महाराजांच्या राऊत-बंगल्यांतील निवासस्थानीं आध्यात्मिक चर्चा ऐकण्यासाठीं मंडळीची गर्दी होते असेंहि मला वसईच्या मुक्कामांत समजलें. वसईस एक महिना कीर्तनाचा कार्यक्रम झाल्यावर आम्ही परत भडगांवास गेलों.

## १९३४ मध्यें श्री. पांडुतात्यांचें लग्न व त्या वेळेची घटना

श्री. तात्यांच्या लग्नासंबंधीं श्री. महाराज सौ. मातुश्री व श्री. अण्णा यांच्यांत गोष्टी चालूं झाल्याचें मला समजलें. या सुमारास गुरुमहाराज व श्री. अण्णा केनेडी पुलानजीक मुंबईच्या सोमण बिल्डिंगमध्यें श्री. ताम्हनकरांचेकडे उतरले. श्री. अण्णांना मुलगी पहाण्यासाठीं महाराजांनीं सांगलीस पाठविलें. सांगलींतील सुप्रसिद्ध श्री. अप्पासाहेब जोग यांच्या भाचीला पहाण्यासाठीं, गणेशवाडीचे त्यांचे मामा श्री. हरिभाऊ दिवेकर यांचेसह गेले. ही मुलगी पसंत ठरत असल्याचें समजल्यावरून महाराजहि कुरुंदवाडास गेले. श्री. का. म. ताम्हनकरांचा मला त्या वेळीं विशेष परिचय नसल्यामुळें महाराज व श्री. अण्णा मुंबई सोडून गेल्यावर मला त्यांचेकडे राहण्याचा संकोच वाटला! म्हणून मी त्यांचेकडून निघून पूर्वीचे ठिकाण गांठलें! श्री. रामचंद्र मास्तर यांना भेटून गिरणींतहि काम धरलें!

आठ दिवसांनीं महाराज मुंबईस आले आणि श्री. ताम्हनकर यांचेकडे त्यांनीं माझी चौकशी केली. तेव्हां ताम्हनकराच्या पत्नी सौ. संतुताई यांनीं सांगितलें कीं,

"आपण मुंबईहून सांगलीस गेल्याच्या दुसरेच दिवशीं मेघःशाम येथून गेले ते आठ दिवसात इकडे आलेच नाहींत" ! हें ऐकून ताम्हनकरांचे घरच्या देवजी नांवाच्या बाळूला महाराजांनीं माझ्या रहात्या जागीं चौकशीला पाठविलें. मी देवजीबरोबरच ताम्हनकरांचे कडे जाऊन महाराजांना नमस्कार करून बसलों. महाराजांनीं पिशवीतून एक आणा काढून माझे हातीं दिला. मग मला म्हणाले "एक नारळ घेऊन ये. कारण न कळल्यामुळें मी नारळ आणणेस निघालो तेव्हां महाराजांनी मला परत बोलावले आणि सांगितले "या पलंगाखालीं नारळ आहेत त्यांतील एक घे, आणि गिरणीत जाऊन ज्या साच्यावर आठ दिवस काम केले म्हणून आतां सांगितलेस नां ? ह्या साच्यावर हा नारळ फोड आणि बाजूच्या लोकांना खोबरें वाटून ये." हें ऐकून मी भेकऱ्याप्रमाणें पहातच राहिलों ! तेव्हां महाराज म्हणाले "कायरे तू इथून पूर्वीच्या ठिकाणीं कां गेलास ?" मी गोंधळलों उत्तर काय द्यावें समजेना ! मग महाराज पुढें म्हणाले तूं पांडूचे लग्नास येणार कीं नाहीं ?" मी लगेच होकार दिला. महाराज नंतर म्हणाले "अरे प्रत्येक मनुष्य कांहीतरी ध्येय ठरवीत असतो. ते ध्येय साध्य होण्यासाठीं पोषक असेंच कर्म करावें लागतें. उदाहरणार्थ एकदां श्रीदत्तमूर्तीची उपाधी पत्करल्यावर अन्य उपाधींत सांपडून कसें चालेल ? तुला मी आतापर्यंत अनेकदां सांगितलें कीं यापुढें तूं आमच्याच सहवासांत रहावेस !"

गुरुमहाराजांनी माझेविषयीं काय ठरविले आहे याची या वेळी फिरून एकवार स्पष्ट कल्पना आली ! दुसऱ्या दिवशीं महाराज मला म्हणाले "हे तीस रुपये घे आणि तुझ्या कोटाचें व शर्टचें कापड घेऊन ये" मी विचार करून माझ्या सारख्याला ठीक दिसेल असें १२ रु. चें कापड घेऊन आलों आणि उरलेले १८ रु. महाराजांचे हातीं दिले. तें कापड पाहून महाराज रागानें म्हणाले "हे परत करून उंची कापड घेऊन ये ?" मग मी १५ रु. चें कापड आणलें. मग २ शर्ट व १ कोट माझ्याकरितां शिवण्यास टाकले. महाराजांच्या असल्या प्रेमळ वागणुकीचें वर्णन करण्यास मजजवळ पुरेसे शब्दच नाहींत !

## श्री. पांडुतात्यांचे थाटाचें लग्न

महाराजानी कुरुंदवाडास श्री. तात्यांचें लग्न मोठ्या थाटांत केलें. हा लग्न सोहळा पहाण्यासाठीं बाहेरगावचे लोक व भक्त आले होते. तात्यांची पाहुणे मंडळीहि बरीच होतीं. तो खूप थाटाचा समारंभ पाहून कुरुंदवाड ज्युनियर संस्थानिक भाऊसाहेब, महाराजांना म्हणाले "मोरबा, तूं खरोखर लक्ष्मीकांत असून या गांवचा जणु राजाच आहेस" त्या थाटाच्या लग्नसोहाळ्याची आठवण अजूनहि कार्य पाहिलेले लोक मोठ्या गौरवानें सांगतात !

## मी लग्नांतील खजिनदार !

या लग्नांत महाराजानीं मला खजिनदार नेमले होतें. माडीवरील एक कांचेचें कपाट माझ्या ताब्यांत दिलें होते. रोकड व दागदागिने या कपाटात असत. त्या कपाटाशीं मी बसलेला असे आणि कपाटांतील जिन्नस मागवयास आले की काढून देत असे.

गुरुमहाराजांचे चुलत बंधु श्री. नानबा दातार हे कऱ्हाडहून लग्नासाठीं सहकुटुंब आले होते. त्यांनी माझ्या विषयीं महाराजांकडे चौकशी केली. 'हा मुलगा कोण ?' महाराज म्हणाले, "हा बांबवडे गांवच्या पाटील घराण्यांतील अत्यंत प्रामाणिक व विश्वास ठेवण्याला योग्य असल्यामुळेंच त्याची मी या खजिन्यावर नेमणूक केली आहे." श्री. नानबांनीं माझ्या विषयीं एक प्रकारें संशयच व्यक्त केलेला मी ऐकला असल्यामुळें माझ्या मनाला वाईट वाटले ! महाराज थोड्या वेळानें तेथें आल्यावर मी त्यांना म्हटलें "महाराज या फडताळाच्या किल्ल्या आपल्या जवळच ठेवा" हे ऐकून महाराज म्हणाले "आता नानबा मला कांहीं म्हणाले असले तरी मी तुला बोललों कां ? तूं ते विसरून जा आणि त्याच ठिकाणीं बसून आपलें काम कर"

## माझ्यावरील अवघड जबाबदारी

श्रीपांडुतात्यांचा लग्न समारंभ झाल्यावर सर्व बाहेरगांवच्या पाव्हण्याची पाठवणी झाली आणि श्री. अण्णा घरच्या सर्व मंडळीसह भडगावला गेले. मी व महाराज दोघेच कुरुंदवाडला राहिलों. जातांना श्री. अण्णानी मला निक्षून सांगितलें गुरुमहाराजांना घरांत ठिकठिकाणचें सामान व्यवस्थित लावावयाचे होते. गच्चीचा आणि घरांतील कांहीं भाग दुरुस्त करवून घ्यावयाचा होता. श्री. अण्णानी मला सूचना दिली व मलाहि ती पटत होती कीं गुरुमहाराज बोलतील ते नीट ऐकून घ्यावे आणि त्याचे कला विरुद्ध बोलून वागू नये. मी त्याप्रमाणें गुरुमहाराजांच्या कलाकलानेंच वागूं लागलों.

सर्व मंडळी भडगांवला गेल्यावर गुरुमहाराज मला म्हणाले "मेघःशाम पांडुरंगाचें लग्न झाल्यावर मी सर्व उपाधींतून मोकळा झालों. आता चि. अनंताचें लग्न वगैरे सर्व जबाबदारी चि. दत्तूवरच राहील. तेव्हां मला जी पंतांनी निजस्थिति दिली आहे तींतच यापुढें मी निमग्न राहणार. आतां जगांतील लौकिक व भीड यांची मला पर्वा नाहीं !" मीहि महाराजांच्या अनुरोधानेंच वागूं लागलों. भडगांवला बिऱ्हाड गेले होते तरी कुरुंदवाडच्या घरांत अनेक लहान मोठी भांडीं आरसे व फर्निचर वगैरे पुष्कळच सामान होतें. हंड्या झुंबरे वगैरे आरासहि होती. यांतील कांहीं सामान व्यवस्थित ठेवण्याचे काम दररोज

मी थोडे थोडे करीत असे. एक दिवस मला हाक मारून गुरुमहाराज म्हणाले: "पेठेंत जाऊन कासाराला घेऊन ये. तांब्या पितळेची भांडी येथेच मोडीत घालूं. तुला पण कांहीं भांडी तुझ्या संसारोपयोगी असतील ती घेऊन जा." मला वाटले कीं गुरुमहाराज सर्व वस्तू फुकट देऊन टाकणार! मी ऐकलें न ऐकलेंसे केल्यावर फिरून गुरुमहाराजांनीं ओरडून तेंच मला सांगितलें! मग मात्र मुकाट्यानें पेठेत जाऊन कासाराला बोलावून आणला. त्याला महाराज म्हणाले "ही सर्व भांडीं आम्ही मोडीत घालणार, तुला हवी असतील ती घे" मग सर्व भांडी बाहेर काढण्यास मला महाराजांनीं सांगितलें! त्या कासाराला बाजूला घेऊन मी म्हणालों "बाबारे, मी आणि महाराज दोघेच येथे आहो. ही भांडी तूं नेऊ नको. भडगांवास भांडी कमी असल्याचें श्री. अण्णांचेकडून समजल्यामुळे भडगांवास ही भांडी न्यावयाची आहेत. तरीहि श्री. अण्णा येथें आले म्हणजे तुला बोलावूं" हें ऐकून तो लगेच आपल्या ठिकाणी परत गेला! थोड्या वेळानें महाराजानीं मला हाक मारली, "तो कासार कोठे गेलारे?" महाराजांनीं मला दरडाऊन विचारलें! मी थाप ठोकून दिली "महाराज तो म्हणाला भांडी मला नकोत" असें म्हणून लगेच निघून गेला!

महाराज मग म्हणाले "जाऊं दे. कांहीं हरकत नाहीं. पण इतकी हीं भांडीं येथें ठेऊन कांहीं उपयोग नाहीं. भडगांवला नेली तर भलताच चार्ज नेण्यासाठीं पडेल. म्यणून हीं भांडीं गरीब गुरीब गरजूंना देऊन टाकावी. त्यांना तरी अशी भांडीं कोंठून मिळणार!" आठ दिवसांत त्या पैकीं बरीच भांडीं महाराजांनी कांहीं लोकांना देऊन टाकलीं. श्रीपंत भुवनांतील भक्तांना बोलावून त्यांना हंड्या झुंबरें वगैरे दिलीं. त्यांतील कांहीं भांडीं व पाट वगैरे महाराजांना नकळत मी बाजूस काढून ठेविलीं. म्हणूनच भडगांवास नेण्यासाठीं राहिलीं! **महाराजांच्या या त्यागवृत्तीच्या औदार्यानें थक्क झालों!** त्यांना बोलून अडविण्याचें धाडस मला झालें नाहीं! महाराजांनीं बहुतेक सर्व सामानाची अशाच प्रकारें विल्हेवाट लावली! नंतर महाराज मला म्हणाले "अंबरेश्वरला जाऊन, हातीं फक्त एकतारी घेऊन नाम-सप्ताह करण्याचें माझ्या मनांत आहे. तूं माझ्या-बरोबर चल."

## निर्वाणीचा प्रसंग!

असें ठरल्याप्रमाणें जरूर तेवढें साहित्य घेऊन आम्ही दोघे अंबरेश्वराला गेलों. तेथें पोचल्यावर महाराजांनीं मला सांगितलें "येथें एकतारी घेऊन 'ॐ नमः शिवाय नमः' हा मंत्र म्हणत प्रदक्षिणा करणार. सात दिवस खालीं बसणार नाहीं. अहोरात्र मंत्रजागर करणार! तूं मला मध्यें कसलाहि व्यत्यय आणूं

नको. फक्त तीनच वेळां चहा, कॉफी अगर दूध दे. बहिर्दिशेस जावें लागलें तर तुला खूण करीन तेव्हां माझ्या हातांतील एकतारी घेऊन मी येईपर्यंत मंत्र जपत रहा. इतर सर्व भाषण वर्ज्य ! हे सर्व नीट लक्षांत घे. दूध आणण्याकरितां पैसे लागतील ते माझ्या पिशवींत आहेत." वगैरे तपशील मला पुनः पुन्हा बजावून सांगितला.

नंतर अंगांत भगवी कफनी, एका हातीं एकतारी आणि दुसऱ्या हातीं चिपळया घेऊन महाराजांनीं देवास वंदन केलें आणि मुखानें तारक मंत्र म्हणत प्रदक्षणा सुरूं केल्या. मी दूरच बसून राहिलों. सकाळीं १० वाजतां हें तप सुरूं झालें. दुपारीं १२ ला मी स्टोव्हवर चहा करून दिला. तो उभ्यानेंच महाराजांनीं घेतला; तीन प्रहरीं ४ वाजतां कपभर दूध दिलें. पण सायंकाळीं ६ चे सुमारास भयंकर वादळ सुरूं झालें ! अमरेश्वर मंदिर अगदीं उंचावर असल्यामुळें हवा अगदीं थंड झाली आणि सोसाट्याचा वारा सुटला ! याचा महाराजांना त्रास होत होता, तो पाहून माझा जीव खालीवर होऊं लागला. मला महाराजांचे ते हाल अगदीं पहावेनात ! मनांत विचार आला आतां ७ दिवस हे कसे उभे राहणार ! अण्णांना तार करावी तर ७ दिवस महाराजांना सोडून जाणार कसे ? सकाळीं ७ वाजतां दुसऱ्या दिवशीं महाराजांचा आवाज अगदींच मंदावला ! मग धिटाई करून 'नामस्मरण पुरें करा' अशी हातानें खूण केली ! आणि नमस्कारहि केला ! तेव्हां रागीट उग्र दृष्टीनें माझ्याकडे पाहूं लागले ! १०-२० मिनिटें गेल्यावर फिरून उठलों हात जोडून त्यांच्या पायां पडलों व रडूं लागलों. मग महाराजांचे अंतःकरण विरघळलें असावें ! कारण ते मला चटकन् म्हणाले, "**बाबारे, रडूं नकोस ऊठ, हा पाहा मी खालीं बसलों !**" त्यावेळीं मात्र अत्यंत आनंद झाला ! मी उठून महाराजांना घट्ट मिठीच मारली ! मग पेटींतील जाड चादर काढून त्यांना पांघरण्यास दिली, चादर पांघरून महाराज बसलेले पाहून मी चहा करूं लागलों. आम्ही दोघांनींहि चहा घेतला. पण नंतर ते माझ्याशीं कांहींच बोलेनात ! मला वाटलें मी त्यांचा तपाचा भंग करावयास लावल्या विषयीं ते मजवर रागावले असावे ! पण थोड्या वेळानें महाराज म्हणाले,—'अरे मेघःशाम मला संगमांत स्नान करावेसें वाटत आहे.' त्या वेळीं रात्रीं ८॥ वाजले होते ! थंडी व वाऱ्याचें वादळ चालूंच होतें ! 'अशा स्थितींत हे संगमावर स्नान करणार' या कल्पनेनेंच माझा थरकांप उडाला ! 'महाराजांना सोडून एक क्षणभरहि दुसरीकडे राहूं नको' असें भडगावला जातांना श्री. अण्णांनीं बजावलें होतें तें अगदीं बरोबर असें वाटूं लागलें ! महाराज संगमाकडे निघाल्याबरोबर मी त्यांचे पाठोपाठ चालूं लागलों ! "तूं कशाला येतोस येथेंच बसून रहा !" असें महाराज म्हणाले तरी मी त्यांची

पाठ सोडली नाहीं! तेव्हां मला महाराज म्हणाले, "पेटींतून कापूर काड्यांची पेटी व तबक घेऊन ये." मी धावतच जाऊन त्या वस्तू घेऊन परत धांव ठोकली व त्यांचे मागोमाग राहिलों. संगमावर महाराज हळू हळू खोल पाण्यांत शिरूं लागले. कमरे इतक्या खोल पाण्यांत महाराज गेलेलें पाहून मी मागोमाग जाऊन त्यांची कफनी घट्ट धरून ओरडलों, "महाराज कडेलाच येऊन स्नान करा. पुढें पाणी आणखी खोल आहे! मी ओरडून अगदींच आकांत केला तेव्हां कोठें त्या गुरु माउलीला माझी दया आली असावी! ते म्हणाले "बाबारे, चल मागें येतो" असे म्हणून कडेला आले! मग महाराजांनीं मला विचारलें 'अरे कापूरकाड्याची पेटी व तबक कोठें आहे?" वाळवंटांत ठेवलेले ते जिन्नस मी महाराजांचे हातीं दिले; तेव्हां महाराज म्हणाले "अरे, मी अनेक वेळां या संगमांतून गेलों आहे. आज या संगमाचें पूर्ण दर्शन घेऊन येथें मला अखंड ज्ञानदीप तेवत ठेवावयाचा आहे." असें म्हणून महाराजांनीं तबकांत कापूर पेरून विधियुक्त पूजा केली. पूजा झाल्यावर महाराज परत अमरेश्वर मंदिरांत आले तेव्हां कोठें मला निर्धास्त वाटलें! नंतर रात्रीं १॥ वाजण्याचे सुमारास महाराजांना अंथरूण करून झोंपविलें. मी रात्रभर पहारेकऱ्यासारखा बसून राहिलों! 'नरसिंह सरस्वतींनीं जलसमाधी घेतली' असें गुरुचरित्रांत वर्णन आहे तोच मार्ग गुरुमहाराज पत्करणार काय, अशी मला एकसारखी भीति वाटत होती! या भीतीमुळें झोंप तरी कशी येणार?

महाराज नेहमीं कीतीहि उशीरां निजले तरी पहाटे चार वाजतां उठतात; पण त्या दिवशीं ते दोनप्रहरीं १२ वाजून ५ मिनिटांनीं उठले! मी गरम पाणी दिलें त्यांनीं तोंड धुतलें मग मी त्यांना चहा दिला. १॥ चे सुमारास बहिर्दिशेस जातो म्हणून गेले त्यावेळींहि मी दुरून त्यांच्या पाळतीवरच होतों. पण ते परत आले व हातपाय धुतले. तोंपर्यंत दोनप्रहरचे २॥ वाजले. नंतर महाराज म्हणाले "आपलें सामान आवरून आतां कुरुंदवाडासच जाऊंया." नदीतीरावर आल्यावर १५ मिनिटांनीं कुरुंदवाडच्या हद्दींत सोडणारी नाव आली, मी नावेंत बसल्यावर देखील महाराजांची कफनी घट्ट धरली होती! महाराज म्हणाले "असें कां करतोस?" त्यावर मी कांहींच बोललों नाहीं तेव्हां ते हंसतच राहिले! इतके हंसलेले मीं कधींच पाहिले नव्हते! नांव कुरुंदवाडच्या घाटास लागली, तेव्हां टांगा पाहून सामान ठेविले आणि आम्ही दोघेहि कुरुंदवाडास घरीं गेलों, घरीं आल्यावर चार दिवस पूर्ववत् कार्यक्रम चालला होता. पांचवे दिवशीं मी महाराजांना विचारले "आपण भडगांवला कधीं जाणार?' महाराज म्हणाले "घर दुरुस्तीसाठीं आपण राहिलों पण सध्यां गवंडी व मजूर मिळत

नाहींत, तेव्हां आपण दोघेहि दोन दिवसांनीं भडगावास जाऊं" हें ऐकून मला फार आनंद झाला. पण महाराजांनीं पुढें बजावलें "भडगांवला पोचल्यानंतर मी कसलीहि जबाबदारी पत्करणार नाहीं! आता यापुढें सर्व कांहीं चि. दत्तूनें पहावयाचें आहे. तूं पण त्याला असेंच सांगून ठेव. माझा सांप्रदाय पुढें चालविणे आणि संसार व्यवहारहि पहाणे, हें त्याचें यापुढें कर्तव्य आहे."

महाराज पुढें म्हणाले "येथें मी जी दीक्षा प्रगट केलेली तूं पाहिलीसच आहेस. भडगांवला गेलों तरी मी या निजानंद स्थितींतच रहाणार आहे" यानंतर आम्ही दोघेहि भडगावला आलों.

## आम्हीं भडगांवीं गेलों

भडगावास श्री. अण्णांना मी गुरुमहाराजांच्या सहवासांत घडलेली सर्व हकीगत सांगितली. भडगांवाचा मोठा व्याप! मठीचा सांप्रदाय आणि संसार व्यवहार चालविण्याची जबाबदारी घेतलेल्या श्री. अण्णांना बसून राहणें शक्यच नव्हते! श्री. अण्णानीं फिरतीस जाणे विषयी गुरुमहाराजांना विचारले. त्यांनीं परवानगी दिली पण श्री. अण्णांना सांगितलें "मेघःशामला बरोबर घेऊन जा."

श्री. अण्णांनीं सर्व परिस्थितीचा पूर्ण विचार करून मला बाजूला बोलावून म्हणाले "मेघःशाम तुला तुझें पूर्ण कल्याण साधावयाचे असल्यास माझा मोह सोड...सध्यां तूं येथेंच रहा आणि गुरुमहाराजांच्या कलानें वाग. यापेक्षां सध्यां तुला जास्त सांगणें नकोच." मी अण्णाच्या सूचनेप्रमाणें मठीतच गुरुमहाराजांच्या सहवासांत राहिलों, आणि श्री. अण्णा फिरतीसाठीं मुंबईकडे गेले. दोन महिने गुरुमहाराजांच्या सान्निध्यांत राहिल्यावर माझ्या लक्षांत आलें की अण्णांनीं यावेळीं गुरुमहाराजांच्या सान्निध्यांत ठेवून मला इतकें ऋणी करून ठेविल आहे कीं त्या ऋणाची अनेक जन्म घेऊनहि सेवेनें फेड करतां येण्यासारखी नाहीं! यावेळीं गुरुमहाराज अगदीं बालवृत्तीनें रहात होते. त्यांचें तेजस्वी बोधामृत मला त्याच्या सान्निध्यांत राहून प्यावयास मिळाले! आपला अनुभव गुरुमहाराजांनीं श्लोक रूपाने लिहून ठेविला आहे.

खरा प्रेम ठेवा जिवाला मिळाला। मनीं शोक–चिंता अतां ती कशाला?

महाराज म्हणत माझ्या पंतांनीं मला गुह्यांत गुह्य दिलें! 'पण माझेकडून कांहींच सेवा घेतली नाहीं!' महाराजांच्या गुरुमहाराजांच्या या बालवृत्तींतील ती बोधभाषा ऐकत असतां मला वाटे कीं श्रीपंतच गुरुमहाराजांच्या स्वरूपांत मला भेटले! ती आनंदाची ऊर्मी अद्यापहि माझ्या हृदयांत स्फुरत असते!

श्री. तात्यांचें लग्न उरकून भडगांवला आल्यानंतर गुरुमहाराज आपल्या

अखंड आत्मानंदांत निमग्नच राहिले! आलेल्या भक्तांशीं समरस होऊन जात. त्या परमहंस श्रीअवधूताला शरण जाऊन अंतःकरणांतील जीवभाव टाकून, द्वैताद्वैत जाळून, ज्ञानाज्ञानांतीत होऊन त्याचप्रमाणें धर्माधर्म, कर्माकर्म बंधमोक्ष विरहित होऊन राहिल्यावांचून त्या चिद्विलासाचा आनंद अनुभविणें शक्य नाही! धन्य ते कीं ज्यांना असा आत्मानंदाचा अनुभव मिळाला!

१९३४ सालीं गुरुमहाराजांशीं भडगांवांत सहा महिने सहवास घडला त्या आत्मानंदाचें रहस्य माझ्यासारख्या मंद बुद्धीच्या माणसानें कितीहि वर्णन केलें तरी अपुरेंच ठरणार आहे. या विषयींचा एक निबंधच यथावकाश लिहिण्यासारखा आहे.

## श्री. अण्णांचे बरोबर वसईस

१९३५ सालीं अण्णांचे बरोबर वसईच्या फेरीस निघालों. त्यावेळीं भडगांवचे श्री. पाथरवट तबल्यासाठीं, श्री. काशिनाथ गुरव पेटीच्या साथीसाठीं, नांदेडचे मंगापाटील व शंकर नेमाडे आणि मी स्वतः, इतके जण श्री. अण्णांचे बरोबर ठाण्यास होतों. ठाण्यास एक महिना कीर्तन झाल्यावर मी व मंगापाटील श्री. अण्णांचे बरोबर वसईस गेलों आणि बाकीची साथीदार मंडळी भडगांवास परत गेली. वसईस पेटीवर मी बसे आणि श्री. अनंतराव तबल्याची सांथ करीत. यावेळींहि प्रत्येक गुरुवारीं आणि सोमवारीं श्री. अण्णा गांवांत भिक्षेची फेरी करीत. बरोबर श्री. अनंतराव मी आणि मंगा पाटील असूं. फेरींतील ती अवधूत बाण्याची नामगर्जना ऐकून लोकांच्या झुंडी आमच्या पाठोपाठ येत! वसईच्या श्रीराममंदिरांत एक महिना कीर्तन चालूं होतें. वसईच्या आमच्या मुक्कामांत गुरुमहाराजहि भडगांवाहून आले होते. त्यावेळीं वसईच्या समुद्रकिनाऱ्यावरील राणगांवीं कीर्तन चालूं होतें. लोकांना कीर्तनांतील बोध पटतोसे पाहून उपदेश देण्याविषयीं कांहीं लोकांनीं विनंति केली. श्री. अण्णा अत्यंत एकनिष्ठेचे गुरुभक्त असल्यामुळें त्या लोकांना श्री. अण्णांनीं नम्र शब्दांनीं सांगितलें "माझे परमपूज्य वडील श्री अवधूत महाराज ४–५ दिवसांत येथें येतील. त्यांचा मी अनुग्रहीत आहे. आपणहि त्यांचाच अनुग्रह घ्यावा." चार दिवसांनीं गुरु महाराज वसईस आल्याची बातमी लोकांत पसरतांच वसईचे व आसपासच्या गांवांतील बरेच स्त्री पुरुष दर्शनास व भेटीस येऊं लागले. त्यांतील राणगांवच्या भाविक भक्तांना महाराज म्हणाले, "माझ्या दत्तूचें कीर्तन तुम्ही ऐकलेत ना? त्याचा अनुग्रह आपण घ्यावा." महाराज पुढें म्हणाले, "हल्लीं मला असेच वाटते कीं जशी सांसारिक तशी पारमार्थिक जबाबदारी हा माझा चिरंजीव उत्तम प्रकारे पार पाडील. म्हणूनच त्याचाच अनुग्रह घेण्याविषयीं आपल्यास सुचविलें."

त्या वेळीं श्री. अण्णा, श्री. राऊत यांचे बंगल्यांत आंत बाहेर फिरत होते. गुरु महाराजांनीं मला बाजूस बोलाविलें आणि सांगितलें, "हे पहा मेघःशाम या राणगांवच्या मंडळींना उपदेश देण्याविषयींची माझी आज्ञा आहे, असे चि. दत्तूस सांग." मी तसें श्री. अण्णांना सांगितल्यावर ते म्हणाले "गुरुमहाराज गादीवर असे तों माझ्या हातून ही गुरूपदेशाची जबाबदारी पार पडणार नाहीं." आमचें बोलणें चालू असतांच गुरुमहाराजांनीं श्री. अण्णांना बोलाविलें आणि त्यांना म्हणाले–"दत्तू तुला मी जी आज्ञा करीत आहे ती मान्य केलीच पाहिजे. मी आतां मुंबईस जात आहे!" त्याप्रमाणें महाराज मुंबईस निघूनहि गेले! पण राणगांवच्या मंडळींना अनुग्रह न देतांच अण्णांनीं परत पाठविलें. ४ दिवसांनीं महाराज वसईस आलेले पाहून श्री. अण्णाच मुंबईस गेले! येणाऱ्या जाणाऱ्या मंडळींना अनुग्रह देण्याची जबाबदारी आपली नव्हे. महाराजांचाच तो अधिकार अशा ठाम समजुतीनें श्री. अण्णा दिवसा मुंबईस जात आणि रात्रीं कीर्तनाचे वेळीं वसईस हजर रहात, हें जाणून **महाराजांनींच अखेर त्या लोकांची अनुग्रहाची मनीषा पूर्ण केली.**

**श्री. अण्णांची व माझी तयारी महाराजांनीं कशी पाहिली!** वसईतील महाराजांचे अनुग्रहीत भक्त जगोबा धरत त्यांचे घरीं एक दिवस श्री. अण्णांनीं कीर्तन करावें असें जगोबा व महाराज यांनीं ठरविलें. श्री. अण्णा व मी जगोबांचे घरी कीर्तनास गेलों त्यावेळीं गुरुमहाराज श्री. राऊत यांचे बंगल्यावरच होते. रात्री ९ वाजतां कीर्तनाला सुरवात झाली. दरम्यान कीर्तन चालू होते. जगोबांचे घरी येऊन महाराज बाजूच्या एका खोलीत मुकाट्यानें बसून राहिले! याची गुप्तता राखण्यास त्यांनी जगोबांना बजावलें. "चि. दत्तू कीर्तन कसें करतो आणि मेघःशाम पेटी कशी वाजवितो" हे प्रत्यक्ष ऐकण्यासाठीं व पहाण्यासाठीं मी मुकाट्यानें या खोलींत बसलो आहे! कीर्तन दोन तास चालून 'शेवट गोड करी' या पद्यानें कीर्तन संपलें. त्याबरोबर त्या खोलींतून निघून श्री. राऊत यांचे बंगल्यावर महाराज आमचे अगोदर जाऊन बसलें!

महाराज कीर्तनाला आले होते याची आम्हांला काहीच कल्पना नव्हती! आम्ही राऊतांच्या बंगल्यावर रात्रीं ११॥ वाजतां आलों. कीर्तनांतून घरी आल्यावर प्रथम चहा घेऊन नंतर आम्ही जेवत असूं. मी चहासाठीं स्टोव्हला पंप करीत असतां गुरुमहाराज हलकेंच येऊन माझ्या मागें उभे राहिले. मग माझ्या डोकीवर वरदहस्त ठेऊन म्हणाले "मेघःशाम तूं कीर्तनांत पेटीची साथ उत्तम करतोस. तुला सर्व कांहीं आपोआप येईल, असा माझा तुला आशीर्वाद आहे"! हे आशीर्वादाचे उद्गार ऐकून मला राहवेना! मी विचारले "मी कीर्तनात पेटी वाजवितो हें आपल्याला कसें समजलें?" महाराज म्हणालें मी आज कीर्तनाला

आलो होतों" दुसरे दिवशीं सकाळीं जगोबा आले त्यांनीं श्री. अण्णांना महाराज कीर्तनाला आले व कोठे बसले होते इत्यादि इत्थंभूत हकीगत सांगितली!

नंतर कांहीं दिवसानंतर एका प्रसंगीं श्री. अण्णांनीं माझे डोकीवर महाराजांनीं वरदहस्त ठेवल्याची आठवण देऊन 'दक्ष रहाणेचा' इषारा दिला! याचें मर्म कालांतरानें माझ्या अनुभवास आलें. गुरु माऊलीचे शब्द खरेच ठरत असल्याचा माझा आतांपर्यंतचा अनुभव आहे! महाराजांनीं दाखविलेल्या राज-पंथानें सरळ जाणाऱ्या अनेकांचे कल्याणच झाल्याचे दाखले आहेत.

थोरांचिया वाटे जाता।
भव शोक आटे॥
तरीच आत्मदेव भेटे सत्संगें करोनी॥

या सत्संगतीचे महत्व अत्यंत मोठें आहे.

**पंत महाराजहि** सत्संगतीचे पुढील प्रमाणें महत्त्व गातात:—

संतांचे धरुनि पाय।
चुकवी अपाय।
सुलभ उपाय।
भवतारक, भवतारक।
यावीण अन्य साधनें फोल दायक॥

श्री तुकाराम महाराजांनींहि आपल्याला गुरुकृपा झाली तिचें वर्णन पुढील मोठ्या शब्दांनीं केलें आहे:—

गुरुराये कृपा केली, परिनाही घडली सेवा कांहीं।
सांपडली वाट जातां गंगास्नाना।
मस्तकीं तो जाणा ठेवी कर॥

तुकाराम महाराजांनीं गुरु–कृपेचा हस्त मस्तकीं पडल्यावर आपला परमार्थ कसा साध्य व सोपा झाला याचें वर्णन अनेक अभंगांत केले आहे. श्री. तुकारामांचे अभंग आणि श्री. पंतांची प्रमलहरींतील पदें यांत कांहींहि फरक नाहीं, हें या दोहोंचा अभ्यास करणाऱ्यांचे लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं! माझ्या गुरू महाराजांनीं केलेले कांहीं अभंग व पदें याच तोडीचीं आहेत.

## बाटलेले ख्रिश्चन श्रीदत्तउपासनेला लागले!

वसईस बहूतेक तांबड्या बनातीची टोपी घालणाऱ्या लोकांनीं ख्रिश्चन धर्म पत्करला असला तरी गुरुमहाराजांच्या कीर्तनांतील बोध आवडल्यामुळें त्यांचाच अनुग्रह घेऊन ते श्रीदत्तउपासनेस लागले!

## हायस्कूलच्या विद्यार्थ्यांना कीर्तन आवडलें.

१९३३ ते १९३६ या तीन वर्षांत श्री. गुरु महाराजांच्या आज्ञेनुसार मी श्री. अण्णांचे बरोबर कीर्तन-फेरींत होतों. त्यावेळीं आम्ही खार येथें अजिंक्य हॉस्पिटलच्या खालच्या मजल्यावर रहात होतों. येथून ठिकठिकाणीं उपनगरांत कीर्तन फेरीला जातां येई.

## जोगेश्वरीच्या रामेश्वर मंदिरांत.

जोगेश्वरीच्या रामेश्वर मंदिरांत श्री. अण्णांची कीर्तनें झालीं. तेथें **टाकी महाराज** हे अधिकारी सत्पुरुष असून त्यांचा भक्त-वर्गहि बराच होता. सर्व भाविक भक्त मंडळी कीर्तनास येत असत. या टापूंतील कांही विद्यार्थी येऊन कीर्तनांत गडबड बडबड करीत! श्री. अण्णांनीं गडबड करणाऱ्या विद्यार्थ्यांना सांगितलें, "माझ्या कीर्तनांत कांहीं चुकत असेल तर येथें येऊन मोकळ्या मनानें सांगावें. मीहि एक विद्यार्थीच आहे!" पण नंतर त्यांनीं श्री. अण्णांचें निरूपण शांतपणें ऐकलें. इतकेंच नव्हे तर या विद्यार्थ्यांनीं श्री. अण्णांचें कीर्तन **आपल्या हायस्कूलांत करवलें**! याच सुमारास श्री. गुरुमहाराज भडगांवाहून खारला आले. त्या मुलांना ही बातमी समजली. त्यांना असें वाटलें कीं छोटे महाराज जर इतकें चांगलें कीर्तन करतात तर त्यांचे वडील तर कीर्तनांतील निरूपणाची बहार करीत असतील! मग सर्व विद्यार्थ्यांनीं एकत्र जमून महाराजांचें कीर्तन ठरवून श्रवण केलें! टाकी महाराजांच्या भक्तांनीं महाराजांचें कीर्तन टाकी महाराजांच्या मठांत करवून ऐकलें.

## श्री. का. म. ताम्हनकर घर-जावई!

नंतर मुंबईस केनेडी पुलानजीकच्या सोमण बिल्डिंगमधील श्री. का. म. ताम्हनकर यांचेकडे महाराज मुक्कामास राहिले. श्री. ताम्हनकर हे "नवाकाळ" दैनिकांत त्यावेळीं सह संपादक असल्यामुळें त्यांचे घरीं राहणें थोडेंच असे. गुरु महाराजांच्या अत्यंत प्रेमळ वडील भगिनी श्री. आऊताई या ताम्हनकरांच्या सासूबाई. त्यांची सुशील मुलगी सौ. संतुबाई उर्फ शांताबाई या ताम्हन-करांच्या पत्नी.

घरीं श्री. ताम्हनकर फार थोडा वेळ असल्यामुळें गुरु महाराजांच्या मुंबई आणि ठाणे-वसईकडील भक्त मंडळीचें आगत-स्वागत आणि बडदास्त श्री. गं. आऊताई आणि त्यांची कन्या आणि महाराजांची लाडकी भाची सौ. संतुबाई मोठ्या आस्थेनें आणि आपुलकीनें करीत. पुष्कळ भक्त-मंडळींना तर असें वाटे कीं, "गुरुमहाराजांच्या सारख्या साधु पुरुषाच्या सोयीकरितां

**श्री. गं. आऊताई यांनीच मुंबईला बिऱ्हाड थाटलें असून श्री. ताम्हनकर यांना 'घरजांवई' म्हणून आपल्या बिऱ्हाडांत ठेवून घेतलें आहे!"** कारण एखाद्या वेळीं जेवणासाठीं किंवा रात्रपाळ्या नसल्या तर झोंपण्यापुरते बिऱ्हाडीं ताम्हनकर येत असत!

श्री. गं. आऊताई वयानें वडील असल्या तरी महाराजांना पारमार्थिक गुरु मानीत. पुष्कळदां हे प्रेमळ बहीण भाऊ परमार्थ चर्चेंत रंगून जात! पूर्वायुष्यांत वाळेकुंद्रीस पंतांच्या भेटीस जातांना किंवा कीर्तनाच्या मुंबईसारख्या फिरतीला जातांना या वडील भगिनींनीं महाराजाना वेळोवेळीं सढळ हातानें मदत केली होती. त्यांचे पति कै. **त्रिंबकराव मामा मराठे** हुजूर चिटणीस कोल्हापूर सरकार, हेहि महाराजांना मदत व प्रोत्साहन देण्यांत मोठ्या आपुलकीच्या हौसेनें भाग घेत. या उभयतांच्या मदतीच्या कृतज्ञतेच्या आठवणीनें महाराज उल्लेख करीत असत. या विशिष्ट कारणांमुळें ताम्हनकरांच्या, म्हणजे प्रेमळ भगिनी आऊ ताईच्या, निवासस्थानीं महाराज अगदीं एकत्र कुटुंबीयांसारखे खेळीमेळीनें रहात.

## बंधुप्रीति, आत्मशांति, गुरुभक्ति

श्री. गुरुमहाराजांनीं आपल्या आयुष्यांत बंधुप्रीति,—आत्मशांति आणि गुरुभक्ति या त्रिगुणांचा, स्वतःच्या आयुष्यांत प्रत्यक्ष अनुभव घेतला आणि तोच अनुभव मुमुक्षु-जनांपुढें प्रगटहि केला.

## पंतभक्त शिवाप्पा आणि गुरुमहाराज पंत दरबारचे मानकरीः!

कुलाबा जिल्ह्यांतील मोहेगांवीं शिवाप्पा नांवाचे श्रीपंत महाराजांचे शेंवटचे शिष्यभक्त (उर्फ शेंडेफल); यांचेवर पंतमहाराज बाळेकुंद्रीकरांनीं निजधामास जातेवेळीं पूर्ण कृपा केली. त्यांचें मुखांत द्राक्ष घालून त्यांना इतकेंच सांगितलें की "आतां तू येथेच न राहतां परत जा" तेव्हा शिवाप्पा उर्फ अप्पा यांनी श्रीपंतांना विचारलें "आपल्या मुखांतून मी कांहीच बोध ऐकला नाही, तेव्हां माझे कसे होणार?" तेव्हां पंतमहाराज म्हणाले "अरे पोरा तुझी पुढील सर्वव्यवस्था मी केली आहे. तुला त्याची काळजी नको." ! तेव्हां शिवाप्पानीं श्रीपंतांना मोठ्या भक्तिभावाने नमस्कार केला आणि दुःखी जड अंतःकरणानें परतले ! एकंदरीत त्यांना गुरुसंगतीचा लाभ २० मिनिटेंच झाला !

## श्रीपंतानी शिवाप्पाला दिलेला आशीर्वाद खरा ठरला !

शिवाप्पांना थोड्याच दिवसानी गुरुमहाराज भेटले. शिवाप्पांचा संसार व परमार्थ या दोहोची जबाबदारी महाराजांनीं आपल्यावर घेतली. आणि त्यांना बंधुप्रेमानें वागवून त्याचें पूर्ण कल्याण केले. सतत ३० वर्षे शिवाप्पा महाराजांच्या

सहवासात राहिले. १९०५ सालापासून महाराजांच्याबरोबर शिवाप्पा नेहमी फिरतीवर असत.

माझी आणि महाराजांची भेट १९२५ ला झाल्यामुळे आणि फिरतीचा सहवास फारच थोडा घडल्यामुळे मागील २० वर्षांच्या महाराजांविषयीच्या आठवणी सांगण्यास शिवाप्पाच हयात असावयास पाहिजे होते. त्यांच्या आठवणींनीं महाराजांचें चरित्र चांगलेंच रंगलें असते. शिवाप्पा म्हणजे महाराजांच्या सहवासांतील आवडता हिराच होता! हा हिरा हरपल्यामुळें महाराजांच्या आम्हां भक्तांचें झालेलें नुकसान भरून येण्यासारखें नाहीं!

१९२७ पासून 'शिवांप्पा व मी एकत्र येण्याचा योग जमला १९२७ ते १९६२ पर्यंतच्या आपल्या हयातीत शिवाप्पा यांनीं मला वारंवार जागे करून गुरुप्रेमाची चटक लावली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. श्रीपंतमहाराजांचा अनुग्रह घेतल्या पासूनचा अद्यावत् अनुभव अप्पा मला सहज हंसून बोलत सांगत. त्यांचा स्वभाव अत्यंत सरळ व भोळा. त्यांच्या दृष्टींत निर्विकल्प वृत्तीची छटा दिसे! अवधूत सांप्रदायाचा प्रचार करण्यासाठी गुरुमहाराजांनीं फेरीची सर्व वस्त्राभरणें त्यांना दिली होती. "त्यांनी आपल्या फेरींत अवधूत वाणा प्रगटकरून अनेकांना लाजविलें" असें त्यांच्या फेरीचे वर्णन महाराज कौतुकानें करीत!—'फेरी करावी तर शिवानेंच' असेंहि म्हणत! शिवाप्पा फेरीत कांही मिळाले तरी सदैव हंसतमुख व संतुष्ट असत ३५ वर्षाच्या उभयतांच्या सहवासांत आंत बाहेर गुरुप्रेमाचा ओघ दिसे!

श्री. अप्पा गुरुमहाराजांना 'माझे पंत' म्हणत! त्यांच्यासारखी निष्ठा क्वचितच आढळून येते. अखंड गुरुप्रेमामृत प्राशन करणारे ते गुरुदरबारचे मानकरीच होते! एकदां सहज बोलतांना श्री. अप्पा मला म्हणाले "**अरे पोरा या अवधुतास (गुरुमहाराजांना) ज्यांनीं डोळे भरून पाहिलें नसेल तो जीव पापीरे!** हें लक्षांत ठेव." अण्णांचा व गुरुमहाराजांचा पारमार्थिक संवाद सर्वांगाचे कान करून ऐकावा, असें मला वाटे! माझ्या मंदबुद्धीमुळें तो परमार्थी संवाद मला लिहून काढणें अशक्य आहे!

## अप्पानीं गोविंददादांना दिलेलें उत्तर!

एकदां बाळेकुंद्रीस अप्पा गेले असतां श्री. गोविंददादा यांना विनोदानें म्हणाले "कायरे शिवा, मोरबानें तुला नुसती भिक्षाच मागणेस शिकविलें ना?" त्यावर श्री. दादांना शिवाप्पांनीं ताडकन् उत्तर दिलें. '**माझे हित किंवा अनहित कशांत आहे हें अवधूत महाराजांनींच मला सांगावें. इतरांचा हा अधिकार नाहीं!** अप्पांची ही भाषा ऐकल्यावर दादांना वाटलें कीं 'मोरबा

येतो केव्हां आणि त्याला हें मी सांगतो केव्हां' ठरल्याप्रमाणें गुरुमहाराज वाळेकुंद्रीस उत्सवास गेले, तेव्हां श्री. गोविंददादांनी त्यांना भेटून विचारलें. "काय रे मोरू तूं त्या शिवाला अत्यंत बोलका केला आहेस! तो म्हणतो अवधूत महाराजानींच मला सांगावें व मी ऐकावे! अरे तो कोणासच दाद देत नसून पंतप्रेमानें मस्तच झाला आहे! खरोखर मोरू तूं ज्याला जवळ करशील त्याला पंतप्रेमाचे वेडच लावशील अशी मला खात्री पटल्यामुळें तुझी भेट होते केव्हां आणि हें तुला सांगूं केव्हां, असें मला झालें होतें!" महाराज विनयानें इतकेच बोलल 'ही श्रीपंताची कृपा'!

## गोहे येथील श्री. अप्पांच्या श्रीदत्तमंदिराला आग!

गोहे येथील श्री. शिवाप्पा यांच्या श्रीदत्तमंदिराच्या आगीची वातमीं भडगांवास समजली. कोणी म्हणाले, "आगीत अप्पाहि गेलें! ही बातमी ऐकून गुरुमहाराज मटकन् खालींच बसले! त्यांचे तोंडून पुढील उद्गार वाहेर पडले!

'माझ्या अगोदर गेलास!' लहान मुलाप्रमाणें महाराजांच्या डोळयांतून खळखळ अश्रू वाहूं लागले! मी त्या ठिकाणीं हजर होतों मला वाटलें कीं, 'बंधु–प्रीति म्हणतात ती अशी! गुरुमातेच्या अंतःकरणांत अशी अलोट बंधु–प्रीति होती!'

## हिंदु–मुस्लिम दंग्यांतील भयंकर प्रसंगानंतर

१९२८ सालीं मुंबईंतील त्या भयंकर प्रसंगांतून पार पडल्यानंतर गांवीं आल्यावर घरची परिस्थिति अगदींच खालावलेली होती. म्हणून १९२९ मध्ये पुण्यास जाऊन राजा बहादुर गिरणींत कामाला राहिलों. सोमवार पेठेंत एक खोली भाड्यानें घेतली, तेथें गुरुमहाराज व पंतमहाराज यांचा फोटो ठेवून दररोज श्रीपंत-वाङ्मयवाचन आणि भजन वगैरे चालूं ठेविलें. पण मनाचें औदासीन्य जाईना! गुरुमहाराजांच्या सहवासाला अंतरल्याची चुटपुट मनाला लागली! येथे त्यांचें कीर्तन ऐकण्याची संधि नाही; नित्य परिचयांतील कोणी शिष्यभक्त नाहींत, इत्यादि विचार एकसारखे मनांत येत. गुरुमहाराजांना भडगांवास पत्र पाठवून सर्व परिस्थिति कळविली. पुण्यास सांप्रदायांतील मंडळी असल्यास त्यांचे पत्ते माहिती कळविण्याची विनंति त्या पत्रांत केलीं. माझ्या पत्राचें उत्तर महाराजांनीं लगेच पाठविलें. ता. ३–६–२९ च्या त्या पत्रांत महाराजांनीं लिहिलें.—"तुझें पत्र पोचलें येथें कांहीं बांधकाम चालूं आहे. चि. श्री. श्रीपादची तब्येत थोडी नादुरुस्त झाल्यामुळें तुझ्या पत्राचें उत्तर पाठविण्यास विलंब झाला." मग लिहिलें.

संसृति यात्रें धाडुनि पुत्रा । आपण रहातो मागे ।

हें पद वांचून पहा. वांबवड्यास जाऊन थोडे दिवस राहून ये, असें सांगितलें होतें. तुझ्या पत्रावरून तूं पुण्यास आल्याचें समजलें. पुण्याची हवा बिघडल्याची बातमी आहे तेव्हां दक्षतेनें रहा. श्रीगुरु रक्षक आहेतच. काळजी नको. थोड्याच दिवसांत मी मुंबईहून कुरुंदवाडास जाईन. परत येतांना पुण्यास तुला भेटेन. पत्ता कळव " ई.

मो. के. दातार

महाराजांच्या पत्राप्रमाणें मी माझा पुण्याचा पत्ता त्यांना भडगावांस कळविला. मग 'गुरुमाता भेटणार याच आनंदांत' मग्न होऊं लागलों. अगोदर मला कांहीं न कळवितां मी रहात असलेल्यां खोली नजीक महाराज टांग्यांतून आले आणि माझी चौकशी करूं लागले. खोली बाहेरच्या कट्ट्यावरच मी उभा होतो! मी लगेच जाऊन टांग्यांतील सामान उतरून घेतलें, आणि महाराजांना खोलींत नेऊन व नमस्कार करून घट्टच मिठीच मारली! तो आनंद काय वर्णावा! महाराज त्यावेळीं म्हणाले, "गाईनें वासराकडे धांव घ्यावी, किंवा वासरानें गाईकडे पळत सुटावें म्हणजे गाईला भरपूर प्रेम पान्हा येतो."

नंतर महाराजांना विचारून कारखान्यांत चार दिवसांची रजा काढली. महाराज म्हणाले "येथें आतां तूं राहू नको. पगार घेऊन येथील नोकरी सोड, मुंबईत नोकरी सध्यां कर." मी महाराजांची आज्ञा आनंदानें मानून मुंबईस जाण्यास तयार झालों.

पुण्यांत गुरु महाराज येणार असल्याची बातमी मी परिचितांस कळविली असल्यामुळें सर्व भक्त मंडळी महाराजांस भेटली आणि तीन दिवस पुण्यांतच कीर्तन करण्याची त्यांना नम्र पण आग्रही विनंति केली. मी रहात असलेल्या जागे समोरील रस्त्यावरच महाराजांचीं कीर्तनें झालीं. कीर्तनाच्या जाहिरातीचा बोर्ड रस्त्यावर लावल्यामुळें सर्व पेठेंतील मंडळींनीं महाराजांच्या कीर्तनांत गर्दी केली. रात्रीं १० चे सुमारास कीर्तनाची सुरवात होई. गर्दी पाहून मी थक्कच झालों! 'अवधूत महाराज कुरुंदवाडकर,' या नांवानें पुण्यांतील भक्त मंडळी महाराजांना ओळखतात असें मला माहीत झालें! तीन दिवस कीर्तन आनंदांत आणि थाटांत झालें.

दुसऱ्याच दिवशीं पुण्याच्या 'राजा बहादुर मिल'मधील कामाचा राजीनामा देऊन मी पगार घेऊन आलों. नंतर महाराजांच्या बरोबर मी श्री. गंगूताई गोडबोले यांचेकडे गेलों. त्या नंतर महाराजांचे गुरुबंधू श्री. गणपूले यांनाहि महाराजांचे बरोबर भेटण्यास गेलों. पुण्यांतील सर्व भक्त महाराजांचे गुणगान करीत असल्याचें मला अनुभवास आलें. त्यांपैकीं बरेच जण

महाराजांचा अनुग्रह घेऊन धन्य झालेले दिसले! या वेळीं महाराजांचा मुक्काम माझ्या खोलींत ५ दिवस होता. पुण्याचा मुक्काम हालवितांना महाराज म्हणाले "आतां तूं माझ्या बरोबरच कुरुंदवाडास चल आणि नंतर बांबवड्यास येऊन नाम सप्ताह उरकल्यावर मुंबईस ये." नंतर खोलींतील सर्व सामानाची बांधाबांध करून भाडें चुकतें करून महाराजांचे बरोबर निघालों त्यावेळीं मजजवळ एक पैसाहि शिल्लक उरला नाहीं! दोघे टांगा करून स्टेशनवर उतरतांना फार वाईट वाटलें. कारण टांग्याचे पैसे देण्यास मजजवळ नव्हते! पण **महाराज अंतर्ज्ञानी असल्यामुळें** टांगाभाडें, तिकिट आणि लगेज वगैरे खर्चासाठीं महाराजांनीं माझ्या हातीं २० रु. दिले! मला कुरुंदवाडला नेऊन महाराजांनीं ८ दिवस ठेवून घेतलें. या आठ दिवसांत महाराजांचा बोध अनेक प्रकारांत ऐकण्याचा लाभ झाला. या बोधामृताचें महाराजांचें ऋण जन्मोजन्मी फिटणार नाहीं. संसार सागरांतून कसें पार पडावें, सुखदुःखाच्या लाटा कशा सहन कराव्या, द्वैतांत राहून अद्वैत स्थितीचा कसा अनुभव घ्यावा, संसार परमार्थ रूपानें करून, कर्तव्य कर्मांचा संपूर्ण अभिमान सद्गुरु चरणीं कसा अर्पावा, आणि अखेर हेंहि विसरून निजानंदी निमग्न कसें रहावें, इत्यादि परमार्थाचा बोध मी या ८ दिवसांत भरपूर श्रवण केला! गुरु–मातेचे ते थोर उपकार विसरणें शक्य नाहीं!

नंतर कुरुंदवाडहून बांबवड्यास आलों. या **१९२९ सालीं** महाराजहि ठरल्याप्रमाणें बांबवड्यास येऊन त्यांच्या नेतृत्वानें नाम सप्ताह पुरा झाला. नंतर मी मुंबईस जाऊन पूर्वींच्या ठिकाणीं ( मास्तर यांचेकडे ) राहिलों. गुरु-महाराजांनीं मुंबईस येऊन रहाण्याची आज्ञा केली तिचा हेतू नंतर लक्षांत आला. पुण्यासच राहिलों असतों तर गुरुमहाराजांच्या सहवासालाहि कदाचित् अंतरलों असतों! मला प्रेमानें सहवासानें जवळ राखून भक्तिप्रेमाचा पारमार्थिक खुराक खाऊ घालण्यावर गुरुमाउलीचा सतत कटाक्ष होता; त्यांचें कसें उतराई व्हावें! एकदां सहज बोलतांना महाराज मला म्हणाले "**माता मुलावर अंतःकरण-पूर्वक प्रेम करते, पण मातेच्या प्रेमाची परीक्षा मुलगा कशी करणार?**" महाराजांचे ते जिव्हाळ्याचे बोल अजूनहि आठवले कीं हृदय हालून जातें! इतका–गुरुमाऊलीच्या भक्ति प्रेमाचा अलोट लाभ झाला तरी वाचेच्या ऋणानें देखील त्यांचे उतराई अद्याप होतां आलें नाहीं! माझे हातून त्यांची कांहींच सेवा घडली नाहीं! या भवसागरांतून पार पडण्यासाठीं ज्ञान खड्ग हातीं देण्याची महाराजांनीं पराकाष्ठा केली! किती थोर दिलाची माझी गुरु माउली!!

किती प्रेमळ सद्गुरु आई ॥ मजला ठेवियलें पायीं ॥

## महाराजांबरोबर बाळेकुंद्रीस

१९३० सालीं गुरुमहाराजांनीं मला आपल्याबरोबर बाळेकुंद्रीस नेलें. दोघांनीहिं थर्डक्लासमध्ये जवळ बसून प्रवास केला. गाडींत गर्दी नव्हती. त्या वेळेच्या सहवासांतील प्रत्येक क्षण महत्त्वाचा वाटतो. कारण गाडीत देखील ते परमार्थाशिवाय बोलत नसत. सहज बोलण्याच्या त्यांच्या बोधांत फार माधुर्य आणि शिकण्यासारख्या गोष्टी असत हा त्या प्रवासात प्रत्यक्ष अनुभव आला. तो बोध ऐकत असतां मुंबई बोरीबंदर सोडून गाडी पुणें स्टेशनला येऊन थांबेपर्यंत भानच नव्हते ! साडेतीन तासाच्या प्रवासाचा कांहीच शीण वाटला नाही !

## महाराजांचा प्रामाणिक व्यवहाराविषयीं तीव्रकटाक्ष !

पुणे स्टेशनवर गाडी उभी रहातांच आमचें सामान एका हमालानें उतरलें त्याचवेळीं आमचे समोरच बसलेल्या एका व्यापाऱ्याचे सामान दुसऱ्या हमालानें उतरून घेतलें. या धांदलीत त्या व्यापाऱ्याच्या सामानांतील एक पिशवी आमच्या सामानात आली ! सदर्नमराठा गाडीचे डब्यात आमचें सामान ठेवलें त्यांतून ती पिशवी आली. महाराजानीं आमचें सामान मोजले त्यांत एक डाग जास्त दिसला. आमचे ६ च डाग असतांना ७ वी पिशवी आढळली ! हमालाला पैसे चुकते करतांना तो म्हणाला ‘आतां ही पिशवी कुणाची म्हणून समजावी व मी कुणाला देणार ?”

महाराजांनीं ती पिशवी माझ्याकडून उघडावयास लावली आणि आंतील वस्तु पाहिल्या. पिशवीतील सामान पाहिले तो त्यांत त्या व्यापाऱ्याची हिशेबाची चोपडीं, जरीची उपरणीं, एक टॉवेल आणि अनेक वस्तु आणि एक भलें मोठें पैशाचें पाकीट होतें. पाकिटांत ३०० रोख रु. हिऱ्याच्या आंगठ्या, हातांतील घड्याळ व घड्याळयाचा सोन्याचा पट्टा इत्यादि जिन्नस होते. ह्या वस्तू जशाच्या तशा त्या पिशवींत भरून ठेवण्यास महाराजानी सांगितले. आणि त्या व्यापाऱ्याची चोपडी तेवढी हातांत घेऊन, खाली उतरून महाराजांनीं स्टेशन–पोलिसाला त्या चोपडीवरील व्यापाऱ्याचें नांव सांगून त्याचा तपास करण्यास सांगितलें. ह्या नांवाचा मनुष्य गाडीचे डब्यांत व प्लॅटफॉर्मवरहि न मिळाल्यामुळें महाराज तीं पिशवी चोपडीसह घेऊन स्टेशनमास्तरकडे गेले व सर्व वस्तूंचे टिपण करून स्टेशन मास्तरची सही घेऊन आले. तो व्यापारी पुण्यांत राहणाराच होता. स्टेशन बाहेर टांग्यांत बसतांना त्याला पिशवी नसल्याचें ध्यानीं आलें ! मग सदर्न मराठा गाडी उभी होती त्या प्लॅटफॉर्मवरील पोलिसाकडे त्यानें चौकशी केली. तो पोलीस त्याला घेऊन आम्ही बसलेल्या डब्यांशीं आला. त्याला महाराजांनीं स्टेशनमास्तरच्या सहीची पिशवींतील सामानाची यादी दाखवून स्टेशनमास्तर-

कडून पिशवी घेण्यास सांगितलें. महाराज म्हणाले "मीच तुमच्या बरोबर आलों असतो. पण आमची गाडी सुटण्याची आतां वेळ झाली आहे" तो व्यापारी आपली चोपडी घेऊन स्टेशनमास्तरकडे धांवतच गेला! आमच्या गाडीनेंहि लगेच पुणे स्टेशन सोडलें!

त्या पिशवी विषयीं महाराजांनीं जी निर्लोभी, प्रामाणिकपणाची आणि परहिताविषयींची तीव्र दक्षता व्यक्त केली त्यावरून मला खात्री पटली कीं **शाळा कॉलेजांतून अशी परोपकारतत्पर, त्यागी साधुवृत्ति मानवाचे आंगीं बाणत नसून ती संत-संगतीनेंच बाणते** व्यापाऱ्यास त्याची पिशवी मिळवून देण्याचे कामीं आपल्या श्रमाचें सार्थक्य झाल्याचा आनंद महाराजांचे हंसत मुखावर दिसत होता. तो स्टेशन मास्तर व्यापाऱ्याची पिशवी त्याला देतो कीं नाहीं या विषयीं थोडी शंका त्यांनीं व्यक्त केली इतकेंच. गाडी स्टेशन बाहेर पडल्यावर महाराज मला म्हणाले "**परधन आणि परकांता हीं विषासमानच मानावीं**" यानंतर अनेक व्यावहारिक आणि पारमार्थिक बोध-विचारांचा ओघ महाराजांच्या भाषणांतून सुरूं झाला!

## गुरुबंधु नागरकट्टी-मामलेदारांशीं परमार्थ चर्चा

मिरज स्टेशनवर महाराजांना गुरुबंधु नागरकट्टीचे मामलेदार एका डब्यांत बसलेले दिसल्याबरोबर महाराजांनीं त्या डब्यांत जाऊन त्यांची भेट घेतली. गाडी सुटण्याची वेळ झाली म्हणून मी महाराजांना शोधूं लागलों तो दोघेहि गुरूबंधु डब्यांत येऊन बसले. महाराजांची सोबत मिळाल्यामुळें श्री. नागरकट्टी आम्ही बसलेल्या डब्यातच महाराजांचे शेजारीं येऊन बसले. परस्परांच्या भेटीमुळें दोघांच्याहि डोळयांतून प्रेमाश्रू खळखळ वहात होते. ही प्रेमाश्रूंची लाट थांबल्यावर एकमेकाचे कुशल विचारल्यावर महाराज मला म्हणाले, "हे माझे गुरुबंधु नागरकट्टीचे मामलेदार, हेहि आपल्या बरोबरच बाळेकुद्रीस येत आहेत." मी या थोर गुरुबंधुंना नमस्कार केला. मला वाटलें:—

**साधु गेला साधूपाशीं।**
**मौन धरितां उगीच हांसी॥**

या श्री पंतांच्या पदाची प्रत्यक्ष प्रगट अवस्था या प्रेमळांच्या भेटींत मला पहावयास मिळाली. एकमेकांच्या दृष्टीस दृष्टी भिडवून दोघेहि गुरु-बंधु खदखदां हांसत होते! नंतर महाराज श्री. नागरकट्टींना म्हणाले, श्री पंतांनीं मला ५ वी वाचा दिली असती तर त्या सर्वांचा उपयोग आतां केला असता. सध्यांच्या अनिर्वाच्य सुखाचें चारच वाचांनीं वर्णन कसें करणार! हृदयांत श्री पंतांच्या प्रेरणेचे पडसाद अजूनहि उमटत आहेत. जगांत **अनेक संत महंत आहेत** व

**होतील, पण श्री पंता सारखा प्रेमदाता व ज्ञानदाताच दुर्मिळ** मग पंतांची भक्ति, वैराग्य व बोधशैली यावर या दोघां प्रेमळ गुरु बंधूंचें संभाषण ऐकत असतां मला अत्यानंद होत होता. असा बोध आतांपर्यंत मी कधींच ऐकला नव्हता ! या बोधा नंतर इतर कोणाचाहि बोध फिकाच वाटतो ! या गुरु बंधूंचे प्रेम अवर्णनीय खरे. दोघेहि ' अरे तुरे ' करीत. त्यांची एकमेकांशीं बोलण्याची तंद्री लागली होती ! संभाषणांत श्री. नागरकट्टी गुरुमहारांना म्हणाले " मी लिहिलेले श्रीपंताचे बोल प्रसिद्ध केलेल्या लेखांत तूं वाचले असशीलच. त्यांविषयीं तुला काय वाटते सांग पाहूं. " यावर गुरुमहाराज विनोदानें म्हणाले " अरे तुझें तें लिखाण लिहिण्यासाठीं शाई कागद इत्यादीचा खर्च खूपच झाला असेल ! मी मात्र तसला खर्च केला नाहीं ! **सद्भक्ताचीं शुद्ध अंतःकरणें हेच माझे कागद** भक्तिप्रेमरूपी शाई, आणि निजज्ञानाची लेखणी घेऊन मी जें लिखाण केलें त्याचे मोल तुझ्या-सारखे प्रेमळ भक्तच करूं जाणोत. " ! इकडे तिकडे न पहातां दोघेहि अशा परमार्थी संभाषणांत रंगून गेलेले दिसले ! माझ्यासारख्या अशिक्षिताचे स्मरणांत ते सर्व बोल कसे राहणार ! तरीहि प्रभूच्या व गुरुमातेच्या कृपेने स्मरलें तेंच लिहिले आहे. त्यांच्या संभाषणाची शक्य ती टिपणें केल्यामुळें इतपत तरी लिहितां आलें. यांतील कांहीं टिपणें गमावल्यामुळेंहि या लेखनाला लगाम बसलाच !

## बाळेकुंद्रीच्या उत्सवसोहळ्यांत

बाळेकुंद्रीच्या धर्मशाळेंतहि श्री. नागरकट्टी व गुरुमहाराज यांचा संवाद चालूंच होता. महाराज या गुरुबंधूला म्हणाले " श्रीपंत १९०५ सालीं स्वानंदवासी झाले त्यावेळीं आपण दोघे येथें होतो; आणि आतां याच ठिकाणीं ' पंतांचे वैभव ' पहात आहों. मला वाटते की **सत्सद्गुरुपतांनीं सुवर्णाची खाणच निर्माण केली !** या खाणींत पंतबंधूंनी प्रवेश करून सुवर्ण शुद्ध करून त्याचे अनेक अलंकार केले आणि गांवोगावचे भक्त येऊन हे सुवर्णालंकार खरेदी करतात. असें हें मनोहर दृश्य आहे. " श्रीपंतांनीं गद्यपद्य असें बरेच लिखाण केलें त श्री. गोविंददादांनीं ग्रंथरुपानें प्रकाशित केलें. उत्सव सोहाळा ४ दिवस बाळेकुंद्रीला चालतो. चारीहि दिवसांत या दोघा गुरुबंधूची परमार्थ–सुख चर्चा चालू होती. पालखीचा सोहाळा व इतर कार्यक्रम या चार दिवसांत व्यवस्थित होतात. ते समारंभ पाहून भक्तांची अंतःकरणें भक्तिप्रेमानें पुलकित होतात हजारों भक्त श्रीपंत नामांचा गजर अहोरात्र करीत असतात. आणि त्या पुण्यक्षेत्रांत रंगून राहतात ! मलाहि तो सर्व सोहाळा पाहून धन्य झालोंसे वाटलें !

## बावन मात्रांची लावणी व निंचे सवाल !

श्रीपंत महाराजांच्या हयातींतच त्यांचा अनुग्रह घेतलेल्या गुरुमहाराजांनीं

बावन्न मात्रेची लावणी पुरी लिहून काढली. आणि बेळगांवीं जाऊन ती पंतांना वाचण्यास दिली. श्रीपंतांनीं ती लावणी मोठ्याने वाचण्यास सुरवात केली. त्या वेळीं श्री. गोविंददादा बाजूला उभे होते. लावणी वाचून संपल्यावर श्री. गोविंददादांनीं पंतांना विचारलें "अहो हा मोरूच एकटा सच्चा गुरुचा आणि आम्ही काय कच्चा गुरुचे चेल ?" श्रीपंत त्यांची समजूत काढतांना म्हणाले "अरे गोविंद, मोरू म्हणतो मी विचारलेल्या प्रश्नांची जो कोणी बरोबर उत्तरें देईल तो सच्चा गुरूचा चेला आणि ज्याला उत्तरच देतां येणार नाहीं तो कच्चा !" हे त्याचें म्हणणे बरोबर आहे, तू बरोबर उत्तरें देशील तर तुला कच्चा कोण म्हणेल ?" दादा श्रीपंताच्या खुलाशानें स्तब्धच झाले ! या वेळीं अनेक गुरुबंधू महाराजांना शंका विचारीत आणि त्यांचे ते समाधान करीत.

बाळेकुंद्रींत श्री. पंतांच्या अधिष्ठानासमोर विस्तृत व सुशोभित सभा मंडप आहे; बाजूला एक लोखंडी मजबूत सळयांची कोठडी आहे. भूतबाधा झालेल्यांना गुप्त गंगेचें स्नान घालून त्या कोठडींत कोंडून ठेवण्यांत येते ! सभा मंडपांत भक्त लोक भक्ति प्रेम भजनांत रंगतात त्याच वेळीं श्री. पंतनामाचा जयजयकार चालू असतां कोंठडींतील भूतबाधा झालेलीं माणसें आरडाओरड करून आणि वेडेवांकडे नाचून सर्वांचें लक्ष्य वेधून घेतात ! अनेक भक्तांनीं याविरुद्ध पंत बंधूकडे तक्रार केली तेव्हां श्री. गोविंददादा म्हणाले, "**हें कार्य मोरूवर सोंपवावें तोच यावर रामबाण तोडगा काढील**" !

## भुताटकीवर गुरुमहाराजांचा तोडगा !

त्याप्रमाणें श्री. दादांनीं गुरु महाराजांवरच हें कार्य सोपविलें—महाराज म्हणाले, "एक तासांनीं मी याचा बंदोबस्त करतो, त्या वेळीं आपण हजर रहा" नंतर दादा अनेक गुरुबंधूंना घेऊन त्या कोठडीच्या चारी बाजूस उभे राहिले. बरेच लोक वाट पहात उत्कंठेनें उभेच होते. मध्यंतरीं गुरु महाराज अडोशाला जाऊन सुरेख पातळ नेसून, अंगांत ब्लाउज घातला. हातांत बांगड्या व शोभेसे इतर दागिनेही घातले. कपाळीं सौभाग्यलेणें—कुंकू लावलें. असा सुंदर स्त्री वेष घेतल्यावर मग खाकेंत एक मजबूत छडी धारण करून लाजत मुरडत धर्मशाळेंतून कोठडींत शिरले ! कोठडी सभोवार श्री. दादा व इतर गुरुबंधु 'कांहींतरी घडणार' या उत्कंठेनें सभोंवतालीं वाटच पहात होते. महाराज स्त्री वेषानें गोषा घेऊन कोठडींत शिरले. पण तीहि अंगांत आलेली बाइच असावी, असें सर्वांना वाटलें ! बाई रागानें आंत गेल्यावर महाराजांनीं काखेशीं लपवून आणलेल्या मजबूत छडीनें भुताटकीवाल्यांना यथेच्छ झोडपण्यास सुरवात केली ! कोणाचे केस ओढले, कोणाचे कान पिळले आणि जास्त दंगा करणाऱ्यांना छडीचा खरपूस मार

दिला! मग बाहेरच्या लोकांचें लक्ष ठोक-मार करणाऱ्या ' त्या बाई 'कडे गेलें! तरी देखील ते महाराज आहेत असें कोणाला ओळखतां आलें नाहीं! भुताटकीचा खोटा बहाणा करणारे स्त्री पुरुष कोठडी बाहेर पळतच सुटले! सदा संचार झालेले मात्र सुंद होऊन जागच्या जागीं बसून होतें! एकूण ३६ स्त्रीपुरुष-पळून गेले. नंतर स्त्री रूप घेतलेले महाराज बाहेर आले. पंताच्या अधिष्ठानाला नमस्कार केला आणि नंतर त्यांनीं धर्मशाळेंत जाऊन स्त्री वेषाचें विसर्जन केलें! मगच श्री. दादा व सर्व गुरुबंधूंना घडलेला प्रकार लक्षांत घडला!

## ससुद्दीचे कुळकर्णी—नवे कान आणि नवी दृष्टि!

ससुद्दी-गांवचे कुळकर्णी आडनांवाचे सुशिक्षित गृहस्थ परमार्थ बोध करणाऱ्यांना दोन विचित्र प्रश्न करून निरुत्तर करण्याचा प्रयत्न करीत एकदां एक सज्जन स्नेह्यानें श्री. सहस्रबुद्धे यांना सांगितलें—" तुमच्या दोन प्रश्नांची उत्तरे देणारे एक सत्पुरुष आहेत, त्याची तुम्ही भेट घ्याल का? " श्री. कुलकर्णी यांनीं याला होकार दिल्यावर त्यांनीं पंत महाराज बाळेकुंद्रीकर यांचे पट्टशिष्य श्री. मोरेश्वर केशव दातार यांचेच म्हणजे गुरुमहाराजाचे नांव सुचविले. सहस्रबुद्धे कुरुंदवाडला येऊन महाराजांना भेटले. महाराजांनीं त्यांच्या नित्याच्या रिवाजा-प्रमाणें त्याचें चहा फराळाचे वगैरे पुढें करून स्वागत केलें. मग " कोठून आलांत " म्हणून विचारलें, मग त्यांनीं आपलें नांव व येण्याचें कारणहि महाराजांना सांगितलें. महाराज म्हणाले " हे पहा सहस्रबुद्धे आपण प्रवासांतून दमून भागून आला आतां जेवणाची वेळ आहे, तेव्हां स्नान उरकून घ्या. जेवून विश्रांति घ्या आणि उदईकच जा. मग तुमचे प्रश्नांचा शांतपणें व सावकाश विचार करूं. " त्यावर आपल्या स्वभावानुसार श्री. सहस्रबुद्धे म्हणाले " मी जो हेतू मनांत धरून आलों त्याप्रमाणें माझ्या प्रश्नांची उत्तरें मिळाल्यानंतर पुढचा विचार! "

हें ऐकून गुरुमहाराज आध्यात्मिक पद्धतीनें त्याच्या प्रश्नाचीं छाननी करूं लागले. पौराणिक दृष्टीनेहि त्या प्रश्नांचें महाराजांनीं विवेचन केलें. तें ऐकून सहस्रबुद्धे म्हणाले " वेद-श्रुति-स्मृति, पुराण इत्यादि गोष्टी जुन्या पुराण्या झाल्या. माझ्या दोन प्रश्नांचे उत्तर यां विरहित नव्या पद्धतीनें देऊं शकत नसाल तर मला येथून निघून जावें लागेल "! महाराज ही त्यांची विचित्र हटवादाची वृत्ति ओळखून म्हणाले " हे पहा तुमच्या दोन प्रश्नांची उत्तरें नव्या पद्धतीनें देण्याच्या उद्देशानेंच मी प्रथम सूचना केली होती! तुम्हांला नवीन पद्धतीचीं उत्तरें पाहिजेत **पण तुमचे कान आणि दृष्टि अद्याप जुनीच आहेत** मग ती नवी उत्तरें कशी पटावीं? तेव्हां मी सुरवातीलाच विनंति केल्याप्रमाणें आजचा दिवस व रात्री येथें रहा. **या वेळांत आपले जुने कान आणि जुनी दृष्टि टाकून नवे कान**

आणि **नवी दृष्टि उत्पन्न करण्याचे तप करा** म्हणजे नंतर मी मजजवळ तयार असलेल्या '**नव्या पद्धतीनें**' तुमच्या प्रश्नांची उत्तरें देतों म्हणजे तुमच्या **नव्या कानांना व नव्या दृष्टीला** ती पटतील"! गुरुमहाराजांचा हा खुलासा ऐकून श्री. सहस्रबुद्धे खदखदा हंसूं लागले! इतकेच नव्हे तर हर्षानें मिठी मारून महाराजांच्या पायीं लीन झाले! ते सद्‌गदित होऊन म्हणाले "आज माझे वय ७२, शिक्षण बी. ए. पदवीचें सरकारी मुलकी खात्यांत ३० वर्षें नोकरी झाली. आतां सेवानिवृत्त आहे. लहानपासून पारमार्थिक चर्चेची आवड. पोथ्या पुराणें, तीर्थयात्रा, देवधर्म वगैरे सर्व केले. संतमहंतांच्या भेटी घेऊन वादविवादहि केले **पण मानसिक समाधान लाभलें नाहीं** पण काय असेल तें असो. आतां तें लाभलें! तुम्हांला आतां मी शरण आहे. अनुग्रह देऊन उद्धार करावा" मग महाराजांनीं त्यांना अनुग्रह देऊन त्यांचे पूर्ण समाधान केलें.

## १९३० सालचा प्रसंग : "काळ आला पण दत्ताला भिऊन पळाला"!

आतां प्रथम १९३० सालीं गुरुमहाराजांनीं भडगांवीं सांगितलेल्या एका प्रसंगाचा तपशील नमूद केल्यावर १९३५ चा प्रसंग नंतर नमूद करतोः—

खानदेशच्या भक्तमंडळींना घेऊन सर्व तीर्थक्षेत्रें करीत, गाणगापुराहून महाराज खारला आले. त्यावेळीं डॉ. अजिंक्य यांच्या हॉस्पिटल मध्यें तळमजल्या-वर आम्ही निवासस्थान केलें होतें. गुरुमहाराज सौ. मातुश्री श्री. अण्णा, सौ. माई मी आणि श्री. अनंतकाका या निवासस्थानीं होतों. तीर्थयात्रेंतील आणि विशेषतः गाणगापुरांतील तपश्चर्येमुळें, महाराजांना ब्लडप्रेशरचा आजार झाला होता, तरी देखील प्रवासांतहि महाराजांनीं निजवैराग्य व निजानुभव सांगून आणि अवधूत स्वभाव प्रगट करून गाणगापुरास भक्तांना आपला चिद्विलास दाखविला! ते भक्त धन्य असोत! या प्रवासांत अनेक तीर्थांचे ठिकाणीं, आपल्या अवतार कार्यांतील श्रेष्ठ पारमार्थिक विचार व आचार, महाराजांनीं प्रगट केले खानदेशांतील त्या सर्व भक्तांच्या भेटी-गांठी घेऊन त्यांचे अनुभव आणि महाराजांविषयींच्या आठवणी शक्य तो, या सोबत दिल्या आहेत.

आतां वर उल्लेख केलेली खारच्या मुक्कामांतील घटना पुढील प्रमाणेः— श्री. अण्णांनीं भडगांवास मोटारीची नवी मोठी बॉडी तयार केली, तबला–पेटी बरोबर लागणारें सर्व सामान, कुटुंबीय व साथीदार या सर्वांचा समावेश या मोठ्या मोटारींत होत होता. ही मोटार भडगांवाहून खारला प्रथम आणली होती त्या गाडीचे ड्रायव्हर श्री. अण्णा आणि 'घट्टा कट्टा क्लिनर' (क्लीनर) मी! श्री. अण्णांचे मनांत आलें कीं "ही मोठी गाडी घेऊन अद्याप आपण कोणताच घाट

चढलों उतरलों नाहीं तेव्हां खंडाळा घाट चढण्या उतरण्याचा अनुभव आतांच घ्यावा. कारण गुरुमहाराजांना बाळेकुंद्रीस व इतरत्र या गाडीनें जाण्याची इच्छा असल्यास या गाडीच्या प्रवासासाठीं घाटाचा अनुभव घेतलेला असावा " गुरुमहाराजांची परवानगी घेऊन खंडाळा घाटांतील प्रवासाचा अनुभव घेण्याची तयारी केली. गाडींत गुरुबंधु श्री. उमाकांत; श्री. बंडोपंत देशपांडे, बंधु श्री. अनंतराव व मी इतकेजण होतों. गुरुमहाराजांना नमस्कार करून आम्ही या प्रयोगिक प्रवासाला नव्या मोठ्या मोटारींतून निघालों. गाडीच्या मागील चौकांत आम्ही बसलों होतो. ठाणारोडवर गाडीच्या चाकांचा 'डगडग' आवाज येऊं लागला. "हा डगडग आवाज कोठून येतो" असें ओरडून विचारतांना अण्णांच्या डोक्याला वाराची ठोकर लागली ! त्यामुळें स्टिअरिंग वरील हात ढिला होऊन, गाडी मोटार-रस्त्यावरून खालीं उतरली ! रस्त्याच्या कांठा-खालीं ३०-३५ फूट खोल खड्डा होता आणि खड्ड्यांत गलिच्छ सांठलेलें पाणी होतें ! त्या प्रसंगीं त्या खड्ड्यांतच आमची मोटार गेली असती ! डोक्यावरील माराच्या वेदनांची पर्वा न करतां अण्णांनी स्टिअरिंगचा घट्ट ताबा घेऊन गाडीचें तोंड फिरविलें. तेव्हां गाडी खड्ड्यांत न जातां खड्ड्यापासून ३ फूट अंतरावर पडली ! नंतर आम्ही सर्वजण बाहेर पडलों आणि कोणास कांहीं न लागल्यामुळे सर्वांना या प्रकाराचें हंसू आलें ! इतक्यांत ठाण्याकडून एक पॅसेंजर मोटार आली तीत ३०-४० पॅसेंजर होते. त्या गाडीच्या ड्रायव्हरचें लक्ष आमचेकडे गेलें. तेव्हां त्यानें आपली गाडी उभी केली. ड्रायव्हर आणि सर्व पॅसेंजर उतरून आमची विचारपूस केली, "अहो कसला भयंकर प्रसंग तुमच्या गाडीवर आला तरी तुम्हीं हंसतच आहां ! धन्य तुमची ! पोलिसानें हा प्रकार पाहिला तर त्रास देतील म्हणून पोलीस येण्यापूर्वी आडवी पडलेली गाडी रस्त्यावर उभी केली पाहिजे. " नंतर त्या लोकांच्या मदतीनें आम्हीं सर्वांनीं मिळून मोटार रस्त्यावर आणून उभी केली. ते लोक गेल्यावर श्री. अण्णा म्हणाले.

**" जिसको राखे राम । इसको मारे कौन ? ॥**
**उसपर दुनिया उलटी हुवे । तो प्रसंग बाकां होय ॥**

नंतर विशेष कांहीं न बिघडलेल्या त्या गाडींत बसून आम्ही सर्व खंडाळा घाट आनंदानें पाहून परत खारला सुखरूप आलों.

दुसरे दिवशीं गुरु महाराजांना घडलेला सर्व प्रकार सांगितला, तेव्हां महाराज म्हणाले **"गाडी चालविणारा प्रत्यक्ष दत्तच होता म्हणूनच तुम्हांवर आलेलें हें अरिष्ट टळलें !"**

## बाळे कुंद्रीची फिरून यात्रा

१९३२ सालीं महाराज पुढील मंडळींसह बाळेकुंद्रीस गेले, (१) बंधू

लोहार, (२) हिरामण, (३) रामदास गुरव, (४) जळगांवचे चौधरी, (५) जळगांवचे हरी चौधरी, (६) जळगांवचे इरी सोनार, (७) जळगांवचे तुकाराम काळे, (८) भडगांव मठीतील नोकर दौलू, (९) श्री. नामदेव नेमाडे राहाणार नांदेड, (१०) श्री. अण्णा व (११) मी. बाळे कुंद्रींतील सर्व भक्तीचें वैभव या सर्व मंडळीना महाराजांनीं दाखविलें. नंतर कोल्हापुरास जाऊन श्री. यज्ञोपवीत (बळवंतराव) यांचेकडे दोन दिवस मुक्काम केला. श्री. अंबाबाईचें दर्शन घेतलें व कोल्हापूरची इतर प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं. नंतर महाराज यांपैकीं कांहीं मंडळीसह मुंबईहून परस्पर भडगांवास गेले. कांहीं मंडळींना मी माझ्या बांबवडे गांवीं नेले. माझ्या गांवी आलेल्या या कांहीं जणांना महाराजांनीं पुत्रवात्सल्यानें दिलेली शिकवण मानवली नाहीं असें खेदपूर्वक नमूद करतों! कारण "महाराजांचें वय झालें असल्यामुळें त्यांच्या पश्चात् हा सांप्रदाय वारस म्हणून कोणी चालवावा?" या प्रश्नाचें खलबत या लोकांनीं बाळे कुंद्रीस केलें ते मला सांगितलें आणि म्हणाले "येत्या श्रीदत्तजयंतीचे उत्सवांत आम्ही हा प्रश्न उपस्थित करणार आहों त्यावेळीं तुम्हीं बांबवड्याहून अवश्य या. तेथेंच या सांप्रदायाचा वारस आपण निवडूं"! हें ऐकून या 'कलिपुरुषाना' बांबवड्यास आणण्यांत आपली चूक झाली असेंच मला वाटतें!

'या कलिपुरुषाना' मी सांगितलें "आपले सद्गुरु प्रत्यक्ष हयात आहेत ते सर्व प्रकारचा विचार करण्यास समर्थ आहेत. त्यांचा सल्ला घ्या. तुम्ही कांहीहि केलें तर तें फोलच ठरेल! तेव्हा विपरीत विचार सोडून गुरुद्रोह न घडेल याविषयीं दक्ष रहा, इतकेच बंधुप्रेमानें मी तुम्हा सर्वांना सुचवितों" श्रीतुकाराम महाराजांनी अशा 'कलिपुरुषाचें' वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे.

खळांची संगती दुःखासी कारण । होतो अपमान दुःख बहू ॥

माझ्या घरीं दोन दिवस मुक्काम केल्यावर हे लोक खानदेशकडे निघून गेले! नंतर महाराजांना भेटण्यास कपटभावनेनेंच जात असत. आपल्या मनांतील डाव गुरुमहाराजापुढें उघड करीत नसत! गुरुमहाराज भावानें सरळ व भोळे आणि यावेळी तर ते बालवृत्तींत होते! या संधीचा फायदा घेण्याचा या कलिपुरुषांचा डाव होता!

मठांत परमार्थ चर्चा करीत असतां 'आत्मा नाम वै पुत्रः' असे उद्गार केव्हांतरी गुरुमहाराजांचे तोंडून निघत! असे उद्गार ऐकतांच एकदां मठीत हे लोक चिडले आणि उभे राहून महाराजांना म्हणाले "गुरुमहाराज आपल्या अंतःकरणांत भेदभाव आहे! दत्तु आपला आत्मा आणि आम्ही काय डेघों आहोत?" हा अर्थाचा अनर्थ केलेला पाहूनहि गुरुमहाराजांनीं शांतपणानें

त्यांची विपरीत भावना नाहीशी करण्याचा प्रयत्न केला. परंतु गुरुमहाराजांचा हा बोध 'पालथ्या घड्यावरील पाण्या' सारखा निरुपयोगी ठरला!

## कलिपुरुषांच्या दुही माजविण्याच्या कारवाया!

तेव्हांपासून हें 'कलिपुरुष' इतर भक्ताच्या कानांत दुहीजें वीष ओकूं लागले! बांबवड्याहून मी मार्गशीर्षमासीं भडगांवला गेलों. तेव्हां महाराजानींच घडलेली ही हकीकत मला सांगितली. माझे गांवीं हे लोक आले असतां काय बोलले हे मी महाराजांना सांगितलें. भडगांव येथील कांहीं भक्तांनाहि या विषयींची गुणगुण समजली, होती. योग्यवेळीं श्रीदत्तजयंतीच्या उत्सवासाठीं बाहेरगांवची मंडळी येऊं लागली. उत्सवास नित्याप्रमाणें सुरवात झाली. पहिले दिवशी श्री. अण्णा कीर्तनासाठीं उभे राहिले. 'तेव्हां मठींतील शांति चौकांत' या लोकांनीं आपल्या साथीदारांना जमविलें आज अण्णांच्या कीर्तनांत गडबड करून कीर्तन बंद पाडण्याविषयीं मोठमोठ्यानें चर्चा करूं लागले! गुरुमहाराजांच्या निदर्शनास हा प्रकार मी आणला. त्याबरोबर गुरुमहाराज शांति चौकात आले. तेव्हां हे 'बंडखोर' जे पसार झाले तेव्हांपासून ते मठीत बरेच दिवस आलेच नाहींत!

या गुरुविन्मुख झालेल्यांची हल्लीं काय स्थिति आहे हें हजारों भक्तांना माहीत आहे! या कटुप्रसंगाविषयीं कमी लिहावें तितके बरे!

या नंतर कांहीं दिवसांनीं गुरुमहाराजानीं या लोकांना एक पत्र पाठविले. या विषयीं सहज बोलतांना महाराज मला म्हणाले "अरे माझ्या पंतांचा अनुभवच तुला सांगतो. अशा कलिपुरुषाविषयी श्री. पंत लिहितात.—

**नेणुनी तुमची संगत केली। पुरे आतां फजीति जहाली॥**

एकंदरीत महाराजांच्या तोंडून उद्गार निघाले तेच खरे ठरले! 'अरे आत्मानाम पुत्रः (असे ते उद्गार होते) या खेपेस गुरुमहाराजांनीं एक महिनाभर मला ठेवून घेतलें होते.

१९२५ ते १९३२ मध्ये मी मुंबईत नोकरी करून गांवीं जात असे.
१९३२ ते १९३९ हा काल गुरुमहाराजांचे सहवासांत आणि
श्री. अण्णांचे बरोबर फिरतीत घालविला.

## खोटें बोलल्यामुळें माझी फट्फजिती!

मुंबईस श्री. का. म. ताम्हनकर यांचे डोंगरें बिल्डिंगमध्यें बिऱ्हाडीं महाराज श्री. अण्णा व मी बरेंच दिवस रहात असतां संडासांत टमरेल घेऊन जाण्याची गरज नव्हती. कारण संडासांतच नळ असे आणि टमरेलहि ठेवलेलें असें. पुष्कळ

दिवस तेथें राहिल्यामुळें टमरेल संडासांतच ठेवून येण्याची संवय मला जडली ! भडगांवास या संवयीमुळें फजिती झाली !

भडगांवास संडासातच नळ टमरेल नसे. बाहेर कोनाड्यांतील टमरेल भरून घेऊन संडासांत जावें आणि संडासांतील काम आटोपल्यावर टमरेल आणून कोनाड्यांत ठेवावें, अशी व्यवस्था होती. मी एकदां सकाळीं टमरेल भरून घेऊन संडासांत गेलों आणि परत येतांना, टमरेल संडासांतच ठेवून परत आलों व मठींतील रस्त्यालगतच्या विहिरीशीं दांत घाशीत बसलों. मागून महाराजांना संडासांत जावयाचें होतें त्यांनी कोनाड्यांत टमरेल नाहींसे पाहून कोणी तरी संडासांत आहे अशा कल्पनेने बराच वेळ वाट पाहिली ! फिरून पाहिलें तें कोनाड्यात टमरेल नाहीं ! मग शंका येऊन त्यांनी संडासांत पाहिलें तो तेथेच टमरेल विसरून कोणी तरी गेलें हें त्यांच्या लक्षांत आले. नंतर त्यांनीं सर्वांना हाका मारून 'कोण संडासातच टमरेल विसरून आले ?' म्हणून चौकशी केली मला हांक मारल्यावर मी भीतभीत म्हणालो 'मी कांहीं संडासांत गेलों नाहीं, तेव्हां महाराज रुद्रावतार धारण करून म्हणाले थांब आतां याचा सोक्षमोक्षच लावतों." ह्याप्रमाणें महाराज मठींतील प्रत्येकाला दरडावून विचारीत आणि शपथेवर सांगण्यास सांगत, हें पाहून माझे गाळणच उडाली ! आंग थरथर कापूं लागलें, तोंड कसलें धुतो ! मागें पुढें पहात मी गिरणाकाठीं शनीच्या कट्ट्यावर जाऊन बसलों ! माझा तपास करीत मठींतून कोणी येतो काय आणि 'शपथ घेण्यास चल' म्हणतो काय अशा भीतीनें धाकधुक होत होते ! अंदाजें ११ चे सुमारास जळगांवचे गुरुबंधु सर्वश्री गणपतराव व तुकाराम काळे वेशीबाहेर पडतांना दिसले. हे महाराजांच्या आज्ञेवरून माझ्याच शोधासाठीं येत असावे. या भीतीनें अगदींच सर्द झालों ! पण ते दोघे गिरणा–स्नानास चालले होते व त्यांतील घडलेला प्रकार त्यांना माहितीहि नव्हता. गुरुबोध चर्चा करून आल्यामुळें त्याच तंद्रींत होते, माझ्याकडे त्यांचें लक्ष्यच नव्हतें, तेव्हां मीच त्यांना हांक मारून विचारलें, 'मठींत तुम्हीं शपथेबद्दल कांहीं ऐकलें का ? "शपथ ? कसली शपथ ? आम्हाला कांहीं कल्पनाच नाहीं" असें उत्तर देऊन दोघेहि स्नानास गेले ! मग माझी भीति जरा कमी झाली ! शपथेबद्दल जास्त गवगवा मठींत झाला नसावा, असें ठाम वाटलें. तरी पण रात्रीं ११ पर्यंत बसल्याच जागींच बसून राहिलों. मग वाटलें कीं गुरुमहाराज आतां झोपले असतील तर आतां मठींत जाऊन मुकाट्यानें कोठें तरी झोंपून जावें. त्याप्रमाणें केलें आणि सकाळीं उठून नित्याप्रमाणें महाराजांना नमस्कार करण्यासाठीं त्यांच्या खोलींत गेलों. महाराज गेल्या दिवशींचा सर्व प्रकार पार विसरूनहि गेले होते ! मला कांहीं रागावून बोलले नाहींत !

## १९३६ ची बाळेकुंद्रीची यात्रा

१९३६ सालीं गुरुमहाराज सौ. मातुश्री श्री. अण्णा आणि मी व मठींतील दौलू 'बॉडी गार्ड' या थाटानें बाळेकुंद्रीस मोटारीनें गेलों. आम्हां दोघांना भडगांव संस्थान छापाचे दोन पट्टे व प्रत्येकीं एक असे गणपती छापाचे बिल्ले दिले होते. दूरचा पल्ला असल्यामुळें भडगांवचे दादासाहेब सहस्रबुद्धे यांचे बंधू बाबासाहेब यांना मोटारीचे मदतगार म्हणून बरोबर घेतले होतें. त्या वेळेचा प्रवास आणि प्रवासांतील आठवणी अजूनहि आठवतात! सर्व जण बाळेकुंद्रीस योग्य वेळीं सुखरूप पोचलों. तेथील उत्सव संपल्यावर गुरुमहाराजांच्या इच्छेप्रमाणें पंढरपूरादि तीर्थें करीत कोल्हापूरला गेलों. श्री. यज्ञोपवीत यांचेकडे दोन दिवस राहून आम्हीं मिरजेस आलों. तेथें महाराजांनीं सांगितलें, "आतां तूं बांबवड्यास जाऊन ८ दिवसांनीं भडगांवला उत्सवाला ये." तेव्हां टोपीवरील भडगांव संस्थानचा बिल्ला श्री. अण्णांचे जवळ देऊन मी गांवीं गेलों आणि १९ दिवसांनीं उत्सवासाठीं भडगांवला गेलों.

## बिल्ल्याविषयीं खोटें बोलण्याचा प्रसंग !

उत्सवाचे वेळीं काम करणाऱ्या स्वयंसेवकांना भडगांव संस्थानचे बिल्ले देण्याचा प्रघात महाराजांनीं ठेवला होता. या उत्सवाचे वेळीं एक बिल्ला कमी पडूं लागला. त्यावेळीं "मेघःशामजवळ एक बिल्ला आहे" असें म्हणून मी गेल्यावर दुसऱ्याच दिवशीं मला बोलावून महाराजांनी माझ्याकडे दिलेला बिल्ला मागितला. मी विचार न करतां झटकन् म्हणालों 'महाराज, मिरज स्टेशनवर आपल्याला बिल्ला देऊन मी गांवीं गेलों'! माझें उत्तर ऐकतांच महाराज रागानें म्हणाले, "अरे, माझी अजून साठी उलटली नाही. तूं खोटें बोललास! माझ्याजवळ बिल्ला दिला नाहींस"! महाराजांचे तें रुद्रावतारी भाषण ऐकून माझा थरकांप उडाला आणि डोळ्यांतून खळखळ अश्रु वाहूं लागले! ते पाहून महाराज सौम्य मुद्रा धारण करून म्हणाले "आजपासून मी तुला रागानें बोलणार नाहीं! जा आतां आंत. भय सोड." थोड्यावेळानें मी श्री. अण्णाना भेटलों. आणि महाराज बिल्ल्याविषयी रागावल्याचें सांगितलें. तेव्हां ते म्हणाले "अरे तूं बिल्ला माझेजवळ दिलास हा घे. आणि खोटें बोलल्याबद्दल महाराजांची क्षमा माग" त्याप्रमाणे केल्यावर महाराजा पूर्ववत् प्रसन्न झाले!

चूक प्रत्येकाचे हातून होतें. पण लक्षांत आल्याबरोबर ती चूक कबूल करण्यानेंच मनाला शांति-समाधान लाभते. सद्गुरु प्रतिपादन करीत असलेलें निःशंक मनानें आचरणांत आणणाराच भक्त शांति समाधानाचा लाभ मिळवितो.

## सद्गुरूंच्या सहवासांतील बोधाचें सिंहावलोकन

१९३७–३८ सालीं गुरुमहाराजांच्या निकट सान्निध्याचा लाभ मला फिरून झाला. या वेळीं महाराज बालवृत्तींत आणि निजानंदांत असत. सहज बोलतां बोलतां त्यांच्या कडून जो बोध ऐकला त्याचें सिंहावलोकन यथामति करीत आहे.—

माझ्याकडे येणाऱ्या साधकांपैकीं प्रेम मागणारे क्वचितच, कोणी ज्ञान कोणी वैराग्य, अशा अनेक काल्पनिक भावना मनीं धरूनच येणारे फार ! त्यांच्या विपरीत कल्पना व भावना नाहींशा होण्यासाठीं सत्य ज्ञानाचा खुलासा त्यांचेपुढें आम्ही मांडतों. ज्ञान व वैराग्य यांची शाब्दिक बडबड उपयोगाची नाहीं ! **मोहाच्या आहारीं जाऊन रात्रंदिन तडफडत राहिलें** तर वैराग्याची बडबड काय कामाची ? ॥ **वैराग्य साधुनि भाग्य। होउनी योग्य। सद्गुरु बोधा** ॥ वैराग्य वृत्तींत मुरल्याशिवाय समाधान लाभत नाहीं. निजवरौग्या पासूनच निजधामाच्या पायरीकडे साधक जातो. आणि **निज वैराग्य व निजज्ञान संत् संगतीनेंच प्राप्त होतें**. अन्य मार्ग तसे उपयोगी नाहींत.

**आनंद दोन प्रकारचा असतो. १** ( साधना नंद ) **२** [ सिद्धानंद ] साधन करण्यांतहि आनंद घेणें तो साधनानंद आणि सद्गुरु भक्तीच्या साधनानेंच सिद्धानंद प्राप्त होत असतो.

गुरु महाराज नेहमीं म्हणत "**व्यवहारांत सुवर्ण तर परमार्थांत पंचीकरण** ! मानव पिंडांत अथवा ब्रह्मांडांत पंचभूतांहून वेगळे कांहींहि नाहीं. पंचभूतें चारी देहांत सत्वरूपानें प्रगटून कार्य करतात. आत्मतत्व हें पंचतत्वा विरहित आहे. हें आत्मतत्व पिंड व ब्रह्मांड या दोहोसहि आधारभूत आहे, किंबहुना त्या दोहोंतहि भरून उरलें आहे ! श्रीसद्गुरूस शरण गेल्यानेंच या आत्मतत्वाचा अनुभव प्राप्त होतो. शिष्य सद्गुरूस शरण गेला म्हणजे सद्गुरू त्याला देहातीत करून **मुक्त अवस्थेप्रत** नेतो. **स्थूल, सूक्ष्म, कारण महाकारण या चारी देहास** प्रथम शुद्ध करण्या करितां सद्गुरु दीक्षा देतात. **मंत्र, मुद्रा, तीर्थ प्रसाद व दीक्षा हेंच पंचायत दीक्षेचें स्वरूप**, यांचे वर्म सद्गुरु पूर्णपणें सांगतात, तें शिष्यानें एकाग्रतेनें श्रवण केल्यानेंच अनुभवासाठीं उपयोगी ठरतें.

प्राणी मूळचा 'मुक्तच' असतो; कल्पनेच्या तावडींत सांपडल्यामुळें तो आपल्यास 'बद्ध–मानतो. सद्गुरूच ज्ञानोपदेश करून कल्पनेचा भ्रम शिष्याचे अंतःकरणांतून नाहींसा करतात. आणि मूळस्वरूपाचीं ओळख पटवून देतात.

म्हणून '**मी कोण ?**' हा अंतर्मुख होऊन विचार करावा. या **विचारानें 'मी देह नव्हे'** हें सहज लक्षांत येईल. "**परब्रह्म अविनाशी आत्मरूप तोच मी**" हें कळूं लागेल. **आत्मरूपच सर्वांस आधारभूत असुनं सर्वांमध्यें**

**भरून उरलें आहे.** हें स्पष्ट समजून उमजण्यासाठींच सद्गुरु मुखांतून आत्मचर्चा ऐकावी. **सद्गुरु असा असावा** की जो शिष्याचे ठिकाणचा 'मी–तू 'पणाचा भेदभाव नाहींसा करून, त्याला तात्काळ मुक्त करील आणि आत्मपदाची प्राप्ती करून देईल.

**नाहीं तर**—कांहींहि विचार न करितां, शास्त्र, पुराणें ऐकण्याच्या मोहांत सांपडून भलत्याच 'नामधारी गुरूस' शरण गेल्यानें काय उपयोग होणार? आत्मज्ञान व आत्म चर्चा न करणाऱ्या व्यक्तीपासून दूरच रहावें! **अनादि सिद्ध सांप्रदाय देऊन सर्वांभूतीं विश्वीं विश्वंभर कसा भरला आहे ही खूण पटवितो तोच सद्गुरू.** अशा थोर महात्म्याला शरण जाणारे क्वचितच! कारण या **खऱ्या महात्म्यांजवळ 'ऋद्धि सिद्धी व अनेक चमत्कार' इत्यादींचें ढोंग नसतें.**

म्हणून स्वाभिमान कोणाच्या चरणीं अर्पण करावा, शरण जाण्यानें काय प्राप्त करून घ्यावयाचें असतें, शरण जाण्याची पद्धत कोणती, या सर्वांचा विचार केल्यावांचून कोणाला शरण जाऊं नये. **वरील पूर्ण विचार केल्यानंतर मुक्त करूं शकणाऱ्या खऱ्या सत्पुरुषास म्हणजेच सद्गुरूस शरण जावें.**

पण शरण जाण्याचे अगोदर साधन–संपन्न व्हावें लागतें. साधन संपन्न झाल्यावर सत्या सत्याचा विचार करावा, **नंतर योग्य सद्गुरूस** तन, मन, धन या त्रिपुटीचा अभिमान टाकून अनन्य भावानें शरण जावें. ही त्रिपुटी पूर्णपणे अर्पण केल्यावर तिचा चुकून देखील अभिमान वाटतां नये. ज्या सद्गुरूला ही त्रिपुटी अर्पण केली तोच तिचा मालक ठरतो. आपलें कर्तव्य संपलें. सद्गुरूच कर्ता व करविता, असे अनुभवानेंच समजतें.

॥ गुरूचिया सत्ते सर्व जग चाले। स्वानंदांत डोले आपेआप ॥

शास्त्रानें काया वाचा मन या त्रिपुटीची शुद्धि सांगितली आहे. काया पवित्र तीर्थांत पावन होते, वाचा नामस्मरणानें पवित्र होते आणि मन हें सात्विक विचारानें शुद्ध होतें. ही शास्त्रीय साधना. परंतु **सद्गुरू कोणत्या उपायानें ही त्रिपुटी शुद्ध करतात** याचा खुलासा अवश्य झाला पाहिजे. काया शुद्ध करण्यास विभूति, वाचा शुद्ध करण्यास मंत्रोच्चार आणि मन अलक्ष मुद्रेनें सद्गुरू शुद्ध करतात. अशा उपायानीं त्रिपुटी शुद्ध झाल्याशिवाय परमार्थ साधतच नाहीं. सदरील त्रिपुटीच्या शुद्धीखेरीज कर्ण शुद्धी, मुख शुद्धी, आणि नेत्र शुद्धि ही क्रमाक्रमानें झाली पाहिजे. या सर्व प्रकारच्या शुद्धि परमार्थासाठीं अपरिहार्यत्र आहेत.

संसार व परामार्थ उत्तम प्रकारें करावा असें वाटत असेल तर साधू

संतांनीं स्वतःच्या उदाहरणांनीं आणि आचरणांनीं दाखवून दिलेला राजमार्गच उपयोगी ठरतो. या विषय रूपी नक्रादीनी भरलेल्या संसार-सागरांत पावलोपावलीं विचार जागृतीच तारक ठरते. अविचार धोकादायकच ठरतो.

## लोक 'साधूची' व्याख्या कशी करतात ?

'षड् विकार ज्यांचे ठिकाणीं नाहींत त्यांना साधू म्हणावें' अशी व्याख्या कोणी करतात, पण ती बरोबर नाहीं. या प्रश्नाचा पूर्ण विचार करावा. वयोमानानें शरीरांतील कांहीं विकार कमी जास्त होतात पण कांहीं विकार पुष्कळांची मरेपर्यंत पकड सोडीत नाहींत! लोभ, मोह, क्रोध हे विकार मानवाला बहुधा अखेरपर्यंत सोडीत नाहींत! धोंड्याला मात्र षड्विकार असत नाहींत म्हणून तो सदरील व्याख्येप्रमाणें 'साधू' ठरतो! अर्थात् या व्याख्येनें अर्थाचा अनर्थ होतो! खरा अर्थ असा कीं या सहा विकारांना अतिथीप्रमाणें वागवून आपल्याला सोडून देण्यास शिकावें. भिक्षुकाला भिक्षा घालावी व जा म्हणावें. त्याला घरीं ठेवून घेतल्यानेंच भानगडी उत्पन्न होण्याचा धोका असतो! शरीरांत विकार प्रगट झाल्यावर त्याला योग्य दान ( धर्माऽविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि ) देऊन हाकलून लावावें हा उत्तम मार्ग. संत संगतीनें या युक्तीचा अनुभव शिकावयास मिळतो. श्रीपंत महाराज म्हणतात—

संतांचें धरुनी पाय। चुकवी अपाय। सुलभ उपाय।
भवतारक—भवतारक
याविणे अन्य साधनें फोलदायक ॥

तात्पर्य भवारण्यांतून मुक्त होण्यास-सद्‌गुरूच मार्गदर्शक ठरतो.

## गुरू आणि सद्‌गुरू

साधकांनीं गुरू आणि सद्‌गुरू यांतील फरक लक्षांत घेणे आवश्यक आहे. अनेक प्रकारची साधनें सांगून शिष्यास साधकावस्थेंतच ठेवतात ते गुरु; अधिकारी सद्‌गुरु शिष्याला स्वानुभविक सिद्धांत सांगून आणि पटवून तात्काळ मुक्तच करितात. हा फरक ओळखून वागतील ते धन्य होत!

समाज सुदीर्घ काळ अज्ञावस्थेंत पडला असतां ज्ञानोपदेश करून त्याला सत्य धर्माच्या मार्गाला लावण्याचें कर्तव्य आजपर्यंत संत सज्जन करीत आले आहेत.

सामर्थ्य नसतांना कांहीं ढोंगी गुरुत्वाचें ढोंग करून समाजाला भलतेंच कांहीं तरी सांगून समाजाला अधोगतीला नेणारे महापाप आचरीत असतात. अंधारांत चक्री वृत्तीच्या अधोमुखांना उर्ध्व अगर उच्च पातळीवर नेण्याचें सामर्थ्य ज्यांच्यांत नाहीं ते सद्‌गुरू नव्हेतच!

समर्थ रामदास म्हणतातः—

गुरू पाहतां लक्ष कोट्यानुकोटी ॥
बहू साल मंत्रावळी शक्ति मोठी ॥

आणि असले नामधारी गुरू 'आडक्याचे तीन' मिळाले तरी टाकावे ॥
अर्थात् शिष्यास मुक्त करणारा तोच खरा सद्गुरू.
अनेक जन्मांच्या सुकृतांनींच अशा खऱ्या सद्गुरूची भेट होते.

एरवीं 'मी कोण?' हे ज्याला स्वतःच कळलें नाहीं, तो दुसऱ्याला 'तूं कोण आहेस' हें कसें सांगू शकेल? जन्मांध प्रकाशाचें वर्णन करूं लागला तर तें कोणाला पटणार?

म्हणून खरें-खोटें याची पूर्ण विचारानें छाननी करून साधकानें खरें तें निवडावें आणि स्वहित करून घ्यावें.

## तर्कांत गर्क न होतां अर्कांत गर्क व्हावें

तुकाराम महाराज म्हणतातः—

जे कां रंजले गांजले। त्यांसि म्हणे जो आपुले ॥
तोचि साधू ओळखावा। देव तेथेंचि जाणावा ॥

साधकामध्यें अंतःकरणांत पटवून घेण्याची दृढ भावना, श्रद्धा व कळकळ असावी. संत सज्जन अशा तऱ्हेचा बोध वर्षाव करीत आले आहेत. त्यांचे वचनावर साधकानें पूर्ण विश्वास ठेवावा. 'विश्वात विश्वंभर भरून उरला आहे.' त्याची ओळख पटवून घ्यावी. वेद-श्रुति-पुराणांनीं असाच बोध केला आहे. × × × जन्मास येऊन पृथ्वीवरील सर्व तीर्थें केलीं. जप तपादि साधनें आचरलीं, यज्ञयाग, दान धर्म आणि तथाकथित पुण्यहि आचरलें, तरीहि अनेक साधकांना जन्माचे सार्थक्य झाल्याचें समाधान लाभत नाही.

## 'मी कोण?' हें पटवून देणारा सद्गुरू भेटेल तेव्हांच जन्माचें सार्थक्य होतें

म्हणून गुरू महाराज म्हणतातः—

सद्गुरू भेटला मजला। पोटांत आनंद माझ्या माईना ॥

× × ×

## लग्न करणेविषयीं महाराजांची आज्ञा
## गृहस्थाश्रम सर्वांत श्रेष्ठ

माझ्या परमपूज्य मातुश्रींनीं माझ्या लग्नाचा विषय महाराजांच्या कानावर १९२७ सालींच घातला होता. महाराज यांनीं याविषयीं मला थोडक्यांत सांगितलें "गृहस्थाश्रम सर्वांत श्रेष्ठ म्हणून तू पत्करावास. ब्रह्मचारी, वानप्रस्थ

व संन्यासी या बाकीच्या तीन्ही आश्रमांचें धारण पोषण गृहस्थाश्रमच करूं शकतो " उदाहरणार्थ आम्ही तुझे घरीं आलो कीं आमची खाण्यापिण्याची वगैरे व्यवस्था तूं गृहस्थाश्रमी झालास कीं चांगली करूं शकशील "—सद्गुरूंची अशी आज्ञा होतांच माझ्या मातुश्रींना होकार देऊन मी मुंबईस गेलों. मुलगी माझें गांवांतीलच नातेवाइकांची पण वयानें फार कमी असल्यामुळें गुरुमहाराजांना विचारून मगच नक्की ठरवूं असें सर्वांना सांगूनच मुंबईस गेलों.

## महाराजांनीं फेरी करावयास लावली !

**१९३८ सालीं** महाराज, श्री. अण्णा व मी श्री. नावलकर यांचेकडे उतरलों होतों. त्यावेळीं गुरुमहाराज सौ. मातोश्री वगैरे मंडळी बाळेकुंद्रीस गेली आणि गुरुमहाराजांनीं मला श्री. नावलकरांचे कडेच ठेविलें; सर्व सामान तेथें होतें. महाराज १० दिवसांनीं मुंबईस परत आले. एके दिवशीं महाराज मला म्हणाले "तुला मी भगवें घेण्यास सांगितल्यावर तूं अनेक सबबीं पुढें करीत आलास. आतां तुला सांगतो उद्यां गुरुवार एकादशीचा पवित्र दिवस आहे, उद्यां कामाठी पुऱ्यांत फेरीस जा. मी सांगतो लक्षांत ठेव. तुझें हित अनहित पाहणारा मीच आहे " हें ऐकून मी त्यांना उत्तर न देतां दिवाणखान्यांतून बाजूच्या खोलीत जाऊन विचार करीत बसलों. इतक्यांत कामाठीपुऱ्यांतून एक गृहस्थ भेटीला आले त्यांच्या बरोबर महाराजांनीं श्री. बाबुराव मिस्त्री यांना कामाठीपुऱ्यातून भेटीस बोलाविलें. त्याप्रमाणें श्री. बाबुराव भेटीस आल्यावर महाराजांनीं त्यांना सांगितलें. "उद्ईक मेघःश्याम कामाठीपुऱ्यांत फेरीस येईल. तुमच्या घरी कपडे करून फेरीस निघेल. तेव्हां कामाठीपुऱ्यांतील आपल्या मंडळींना हें सांगून ठेवावे " त्याप्रमाणें श्री. बाबुराव मिस्त्रींनीं सर्व व्यवस्था केली.

दुसऱ्या दिवशीं पहाटे ४॥ वाजतां मला उठवून महाराजांनीं स्नान करावयास सांगितलें, त्या प्रमाणे मी स्नान केलें. तेव्हां फेरीची सर्व भूषणें काढून महाराजांनीं सकाळीं ७ वाजतां माझ्या स्वाधीन केलीं, मी महाराजांना म्हटलें "विचार करण्यास थोडा वेळ द्याल तर बरें " ! महाराज लगेच मोठ्या आवाजांत म्हणाले "आतां आणखी कोणाचा विचार घेणार ? बंधु नागोजीराव यांचा ? " मी मानेनेच 'न'कार दिला ! मग जरा धीर करून म्हणालो "मला या कामीं श्री-अण्णांचा विचार आणि सहानुभूति हवी आहे. " इतक्यांत श्री. अण्णा खालच्या मजल्यावरून आम्ही दोघे बोलत होतो तेथेंच आले ! त्या बरोबर महाराज म्हणाले "हा पहा दत्तू आला त्याला कायतें विचार पण उगीच वेळ घालवूं नको " ! मग मी व श्री. अण्णा बाजूच्या खोलींत गेलों. महाराजांची फेरीची आज्ञा आणि माझ्या अडचणी मी अण्णांना थोडक्यांत सांगितल्यावर श्री. अण्णा म्हणाले "आपण होऊन महाराज तुला भगवे देतात तें तू वास्तविक आनंदानें

घ्यावेस. पुढील कांहींहि व कसलीहि काळजी करूं नको" या सूचनेप्रमाणें मी महाराजांचे हातून लगेच भगवें घेतलें देवघरांत नेऊन विधियुक्त पूजा करून मला भगवें वस्त्र लेववून फेरीचें साहित्य माझे हातीं महाराजांनीं दिलें. ठरल्या-प्रमाणें कामाठीपुऱ्यांत श्री. बाबुराव मिस्त्री यांचेकडे जाऊन, फेरीची वस्त्राभरणें परिधान करून फेरीस निघालों. सर्व कामाठीपुरा–गल्ल्यांत फेरी करून दुपारीं २ वाजतां श्री. बाबुराव मिस्त्रींचेकडे परत आलों. नंतर ३ वाजतां महाराजांकडे येऊन सर्व भिक्षा पुढें ठेवून नमस्कार केला. या प्रकारें गुरुमहाराजांनीं मला भगवें देऊन मला आजपर्यंत संरक्षण देऊन व कृपा करून माझें कल्याणच केलें आहे. **१९३८ च्या कार्तिकशुद्ध एकादशी दिवशीं मी भगवें घेतलें.**

## कामाठीपुरा श्रीदत्तमंदिरांत कीर्तन केलें.

नंतर महाराजांच्याच आज्ञेवरून कामाठीपुरा ८ व्या गल्लींतील दत्तमंदिरांत ७ दिवस कीर्तन केलें. दरम्यान गुरुमहाराज व श्री. अण्णा भडगांवास गेले. मीहि नंतर श्रीदत्तजन्माचे उत्सवाकरितां भडगांवास गेलों. दत्तजन्मादिवशीं तेथेंहि महाराजांनीं मला फेरीस पाठविलें. दत्तजन्मोत्सवानंतर मी महाराजांना लग्नाच्या वाटाघाटीसबंधी माहिती सांगून त्यांना विचारल्यावर महाराज म्हणाले "तुझ्या आईने मला लग्नाविषयीं जी माहिती दिली त्यावरून तू लवकरच लग्न उरकून घ्यावेस असें यला वाटते. मुलीविषयीं म्हणशील तर मुलगी वयानें किंचित् लहान असली तरी ठीक आहे. त्या मुलीचे वडील मातुश्रीहि दत्तभक्तच आहेत. हें लग्न तुला सर्वस्वी सुखावह होईल. गांवी जाऊन लग्नाचा मुहूर्त ठरविलास म्हणजे पत्र पाठीव–मीहि लग्नास हजर राहीन. थोड्याच दिवसांत बडोद्याहून निकडीचें पत्र आलें. ह्यावरून मला बडोद्यास जावें लागलें. बडोद्यास निकडीचें काम संपवून सर्वांना भेटून भडगांवीं परत येणार होतो; पण बडोद्याच्या मंडळींनीं कीर्तन करून जाण्याचा सत्याग्रह केल्यामुळें तेथील तारकेश्वर मंदिरांत १५ दिवस कीर्तन करण्याचें कबूल केलें. तेथील सर्व आनंदित वातावरणाची हकीगत महाराजांना भडगांवास पत्र पाठवून कळविली. कीर्तन आटोपून भडगांवास जाण्या-साठीं निघावयाचें त्याच दिवशीं बांबवड्याहून 'ताबडतोब निघून येण्या विषयींचें' पत्र आलें. भडगांवास महाराजांच्या सूचने प्रमाणें जातां आले नाहीं याचें वाईट वाटलें. पण बांबवड्यास पत्राप्रमाणे जाणेंच अत्यावश्यक होतें. तेथील अत्यंत महत्वाच्या कामांत आणि लग्नाच्या वाटाघाटींत माझे दोन महिने गेले!

## गुरुमाउलीचे अखेरचे पत्र!

१९३९ च्या चैत्र पाडव्याचे आदले दिवशीं गुरुमाउलीचें अखेरचेंच पत्र मला बांबवड्यास मिळाले. ते खालील प्रमाणें:—

'चि. रा. मेघःशाम यास पूर्ण आशीर्वाद. तुझें बडोद्याहून आलेलें पत्र वांचून आनंद झाला. तसेंच बांद्रवड्याहून पाठविलेलें पत्रहि पोचलें. अत्यंत महत्वाचे कामास गेलास हें फार बरे केलेस. तसेंच लग्नासंबंधीं पूर्ण कळत्र. इकडील सर्व कांहीं ठीक आहे. माझी तब्बियत म्हणावी तशी नाहीं. चि. रा. दत्त व चि. रा. अनंता तुर्में येथें रामनवमीचे उत्सवास गेले आहेत. तरी इतकेंच सांगणें. तुझीं सर्व कामें झालीं असल्यास ताबडतोब यावेस. जवळ बोलणे सारखे कोणी नसल्यामुळें वेळ जात नाहीं. सवड झाल्यास चिपरीचे दादा पाटील यांना पाठव. त्यांचे भाड्याचे पैसे येथें देईन. कळावे हा आशीर्वाद.

**मो. के. दातार**

हें माझ्या गुरु मातेचें शेवटचें पत्र !

याच दिवशीं तुर्मेहून अण्णाचें पत्र आलें. दोन्ही पत्रें पोचतांच माझ्या मातुश्रींची आज्ञा घेऊन ११ वाजतां निघणार तोंच माझे चुलत बंधु नागोजीराव मुंबईहून आले. तेहि कट्टे गुरुभक्त असल्यामुळें दोन्ही पत्रें वाचल्यावर ताबडतोब निघण्यास त्यांनींहि संमति दिली. श्री. अण्णांचे पत्र पुढील प्रमाणें होतें:—

## श्री. अण्णांचें त्याच प्रसंगीचें पत्र

चि. रा. मेघःशाम यास प्रेमपूर्वक आशीर्वाद. मी तुर्में येथें रामनवमीचे उत्सवास आलों आहे. त्रिभुवनशेट यांचे आग्रहास्तव यावें लागलें. गुरुमहाराजांचें प्रकृतिमान म्हणावें तसें नाहीं. उत्सव आटपतांच भडगावास जात आहे. तेव्हां इतकेंच सांगतों कीं, येथें पेटीवाला नसलेमुळें पत्र देखत तूं यावेस वाट पहात आहे. जन्मकाळ उरकून भडगांवला दोघेही जाऊं. तरी ताबडतोब यावेस. वि. भेटी अंतीं बोलूं. हा आशीर्वाद. दरबारच्या सर्व मंडळींना पूर्ण आशीर्वाद.

**द. मो. दातार**

दोन्हीं पत्रें वांचून किर्लोस्करवाडी स्टेशनवर विचारांच्या कात्रींत सांपडलो ! **आधीं भडगांव की तुर्में ?** शेवटीं मनांत ठरविलें कीं कुर्ल्याचें तिकीट काढून आधीं तुर्म्यास जाऊन श्री. अण्णांना भेटावें आणि त्यांच्या परवानगीनें लगेच भडगांवला महाराजांना जाऊन भेटावें.

तुर्म्यास रात्रीं ९ ला पोचलों त्यावेळीं श्री. अण्णा नुकतेच कीर्तनांत उभे होते. श्री. अनंतराव तबला वाजवीत होते व बाबू कासार पेटीचा स्वर धरून होता. मी माझें सामान एका खोलींत ठेवून श्री. अण्णांना नमस्कार करून पेटीच्या सांथीला बसलो. कीर्तन दोन तास झाल्यावर कार्यक्रम आटपून मी व श्री. अण्णा पहाटे ३॥ पर्यंत बोलत बसलों. वास्तविक नेहमींच्या गप्पाटप्पांत अण्णा शब्दांच्या कोट्या करून खूप हंसवितात. पण त्यावेळीं उदास व दुःखी वातावरणांत दोघेहि

बसलो. ३॥ वाजल्यावर मी चादर घेऊन आडवा झालों. माझ्याकडे पाहून अण्णा काय म्हणाले, "मेघःशाम, तूं आतां कसा दिसतोस सांगू ?" मी म्हणालों सांगा तेव्हां म्हणाले, "आतां तू थेट तिरडीवरील प्रेतासारखा दिसतोस !"

काय विचित्र योग असतो पहा ! श्री. अण्णांचे हे कठोर विनोदाचे भाषण होत होतें त्याच वेळी भडगांवास महाराजांचा प्राण कुडींतून निघून गेला होता आणि त्यांचा आत्मा स्वानंदवासी झाला होता ! या वेळीं बोलतांना मी अण्णांना म्हणालो, "तावडतोब निघून येण्याविषयीं गुरुमहाराजांचें आणि तुमचे अशी दोन्हीहि पत्रें बांबवड्यास एकदम माझ्या हातीं पडलीं. मोठाच पेंच मला पडला ! अखेर ठरविलें कीं तुम्हांला येथें येऊन भेटून लगेच दुसऱ्या दिवशीं भडगांवीं जाऊन महाराजांना भेटावें."

अण्णा म्हणाले, "येथें जन्मकाळ करून आपण दोघेहि जाऊं, आतां गडबड करूं नकोस." हें ऐकून मी गप्पच राहिलों.

## एक महत्वाची पूर्व सूचनेची घटना

मी स्तब्ध बसलेलो पाहून अण्णांनीं एक महत्वाची घटना मला सांगितली. ती अशीः—"मी फिरतीवर असतांना एक भक्त मुंबईहून भडगांवीं गेला होता. त्याचे जवळ महाराजांनीं विभूति, कुंकू व प्रसाद माझेकरितां पाठविला. आणि त्या सोबत निरोप होता कीं शांति चौकांत औदुंबर लाविला असून त्याचे पूजन करून तुला प्रसाद पाठविला आहे." हें सांगून श्री. अण्णा पुढें म्हणाले, "मी फिरतीवर अनेक वेळां गेलों आहे परंतु या खेपेचा हा अनुभव बराच चमत्कारिक वाटतो ! (पत्रांतील घटना सर्व घडल्या हें तर खरेच.) असे बोलतां बोलतांच अण्णा अंथरूणावर लवंडले तोच ४॥ वाजतां गुरुमहाराज 'सीरियस' असल्याची श्री. दादा सहस्रबुद्धे यांची तार त्रिभुवशेटचे नांवे आमचे हातीं आली ! मुंबईस श्री. का. म. ताम्हनकर यांचे नांवें श्री. सस्रबुद्धे यांनीं अशीच तार पाठविली होती. पहिली तार वाचल्या पासून अर्ध्या पाऊण तासांतच श्री. ताम्हनकर मुंबईहून टॅक्सी करून सौ. संतुताईसह तुर्भ्यास आले ! ताम्हनकरांना पहातांच अण्णा व अनंतराव यांनीं निघण्याची तयारी केली. मी त्या दोघांचे अगोदरच माझी ट्रंक व वळकटी मोटारीत नेऊन ठेविली ! माझी ही तारांबळ पाहून अण्णा म्हणाले, "तूच एकटा जा, आम्ही येथें राहातो !" हे शब्द ऐकतांच मी वरमलों आणि मोटारींतील माझें सामान काढून बाहेर उभा राहिलो ! हे पाहून अण्णांनाहि वाईट वाटलें पण मग मला समजावतांना ते कळवळून म्हणाले, "गुरुमहाराजांची प्रेरणाच अशी की तूच हा कीर्तन सप्ताह पार पाडून यावेस. म्हणूनच अचानक येऊन तू सेवेस हजर झालास. तरी वृत्ति संयमानंदांत ठेवून कीर्तन सप्ताह पुरा कर

आणि ये. मी भडगांवला जाऊन महाराजांना—औषधोपचाराची व्यवस्था करतों आणि त्यांच्या तब्येतीविषयीं तुला ताबडतोब कळवितों. इतकेंच नव्हे तर श्री. बंडोपंत देशपांडे मजबरोबर येत आहेत त्यांनाहि १–२ दिवसांत महाराजांचे कुशल कळविण्यास तुझ्याकडे पाठवितों." श्री. अण्णा भडगांवला गेल्यानंतर मी अगदींच अस्वस्थ झालों! महाराजांच्या तब्येती विषयींच्या पत्राकडे सारखें लक्ष्य लागलें. अशा स्थितींत ५ दिवस कसेबसे गेले! मन शक्यतों समतोल ठेवून कीर्तन करण्याचा प्रयत्न करी. ६ व्या दिवशीं दुपारीं ३ वाजतां श्री. बंडोपंत तुर्म्यांस आले. अगदीं हंसत येऊन मला भेटले! श्री. अण्णांनीं 'सप्ताह संपेपर्यंत महाराज तिकडे स्वानंदवासी झाल्याची दुःखद बातमी मला सांगूं नये,' असें श्री. बंडोपंतांना बजावून पाठविलें होतें! 'कसें काय चाललें आहे' असें आल्याबरोबर त्यांनीं मला विचारलें. मी गुरुमहाराजांचें कुशल त्यांना विचारल्यावर म्हणाले, 'उत्तम आहे'! "आम्हीं गेल्यावर जळगांवच्या डॉक्टरना बोलावून औषधोपचार केल्यामुळें महाराजांची तब्येत सुधारली म्हणूनच तुला कळविण्यासाठीं मला अण्णांनींच पाठविलें." अशीहि थाप बंडोपंतांनीं ठोकून दिली! ही आनंदाची बातमी ऐकून मी बंडोपंतांना कडकडून भेटलों! बंडोपंतांना म्हटलें, आपले सद्गुरु कसे आहेतः—

त्रिभुवन चालक प्रणव–प्रकाशक। रंजन भक्ताचा ॥<br>
दीन दयाधन अखंड प्रेमळ। तारक विश्वांचा ॥

सद्गुरु भक्तांचे जीवन आहेत. वाळवंटांत तडफडणाऱ्या माशाला पाण्यांत सोडल्यावर जसें हायसें वाटत असेल तसेंच सद्गुरूंची तब्येत ठीक झाल्याचें ऐकून मला झालें आहे!" माझे हे शब्द ऐकून श्री. बंडोपंतांच्या हृदयांत कोंडून राहिलेलें परमावधीचें दुःख बांध फुटून एकदम बाहेर पडलें आणि खालीं बैठक मारून ते ढसढसा रडूं लागले! मग माझी स्थिति काय झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी! कोण, कोणाचें आणि कसें सांत्वन करणार? मंदिरांत जाऊन मी बंडोपंतांना म्हटलें "त्रिभुवन शेटना सांगून आपण लगेच भडगांवला परत जाऊं. हे शब्द ऐकल्यावर अण्णांनीं वारंवार बजावून सांगितल्याची जागृति बंडोपंतांना आली! मग भानावर येऊन ते म्हणाले "हे पहा मेघःशाम घडूं नये तें घडलें, पण अण्णांनीं तुला हें पत्र दिलें आहे तें वाचल्यावर पूर्ण विचार करूनच काय तें ठरीव." या पत्रांत पुढील आशयाचा मजकूर होता. "तुला भेटणेस बंडोपंतांना पाठविलें आहे. तुला मी निघते वेळीं सांगितल्याप्रमाणें गुरुमहाराजांनीं तुला सेवेस बोलावून सेवेच्या जागीं हजर केलें ती सेवा सोडून तूं इकडे आल्यास मला बरें वाटणार नाहीं." तरी रामजन्म करूनच तूं इकडे यावेंस! हें पत्र वाचून मन आवरून धरण्याचा प्रसंग माझेवर आला! मग मी बंडोपंतांना घेऊन

समुद्रावर गेलों. हातांत १०८ रुद्राक्षांची माळ घेऊन समुद्राचे पाण्यांत उभा राहून 'ॐ नमःशिवाय' मंत्राचा जप करू लागलों! पण मनांतील दुःखामुळें जपाकडे लक्ष लागावें तसें लागेना, हातांतील माळहि पाण्यात पडली! नंतर दुःखी अंतःकरणांनीं दोघेहि मंदिरांत परत आलों. कीर्तनाची वेळ रात्रीं ११ ची होती. त्रिभुवनशेटनीं मला 'गोपीचंद' आख्यान लावण्यास महाराज स्वानंदवासी झाल्याच्या दिवशींच सांगितलें होतें! आतां मजकडून कीर्तन कसें पार पडणार असा धाक वाटूं लागला! कारण दुःखातिशयानें सर्व शक्तीच गळल्यासारखें मला झालें होतें! ........अखेर कीर्तनाची वेळ येऊन ठेपली! मग अण्णांचे शब्द हृदयांत धरून कपडे केले आणि कीर्तनास उभा राहिलों. वृत्ति स्थिर ठेवून पूर्व रंग कसाबसा उरकला आणि आख्यानास सुरवात केली. आख्यान १५ मिनिटें झाल्यावर गोपीचंदाचें पद म्हणतांना सर्व शक्ति गेल्यासारखें होऊन मटकन् खालीं बसलों! जालदंर गुरूला गोपीचंदानें गर्तेत टाकल्यानंतर १२ वर्षांनी, माता मैनावती सद्गुरुची प्रार्थना करतांना म्हणते—

त्रिभुवन चालक। प्रणव प्रकाशक। रंजन भक्तांचा।
दोन दयाधन अखंड प्रेमळ तारक विश्वाचा।

हें पद म्हणतांना 'गुरुमाउलीच्या अखेरच्या दर्शनास अंतरलो या भावनेची खळबळ हृदयांत उठून शक्तिपात झाला व खालीच बसलों. सर्व श्रोते जवळ येऊन विचारपूस करूं लागले! पण त्रिभुवनशेटना याची ठीक कल्पना होती. 'आपले सद्गुरु गेल्याची कठोर दुःखाची बातमी नुकतीच बुवांना समजल्याचा हा परिणाम आहे' हें स्वतःशी ठरवून त्यांनीं आसपासच्या श्रोत्यांना सांगितलें. नंतर कीर्तन बंद करून शेटजींनीं मला हातीं धरून दिवाणखान्यांत नेलें त्रिभुवनशेट मला सांत्वनपूर्वक म्हणाले "बुवामहाराज आपले सद्गुरु स्वानंदवासी झाल्यामुळें आपण तीव्र दुःखांत आहां; तेव्हां आपल्याला जाणेची इच्छा असल्यास उदईक जावें" मी दुःख आवरून म्हणालो "आपला उत्सव पूर्ण करूनच येण्याचा मला सद्गुरुंकडून आदेश आहे, तेव्हां उत्सव पूर्ण करून मी जाईन" माझे उत्तर ऐकून शेटजींना बरं वाटलें. दुसरें दिवसापासून कीर्तन नित्याप्रमाणें केले. दिवसभर दुःखी विचारांचे काहूर माजले तरी कीर्तनाचे वेळीं मात्र वृत्ति स्थिर राही हीच गुरुकृपा! अशा प्रकारे तुर्म्यास रामजन्म उरकूनच मी भडगांवला गेलों.

## दोन प्रकारच्या दुःखांतील कर्तव्य

भडगावीं मठींत त्यावेळी आप्त संबंधीयांची व भक्तांची खूपच गर्दी होती. मी तेथें पोचल्यावर मठींत माडीवरील श्रीपंत-हॉल मध्ये जाऊन दुःख करीत बसलों. सकाळपसून १२ पर्यंत अनेक भक्तांनीं येऊन सांत्वन केले. पण मला त्या अलोट दुःखाचा विसरच पडेना! नंतर श्री. अण्णा येऊन मला म्हणाले

"तुझें गुरुचें नाते होतें तरी तूं या तीव्र दुःखानें इतका व्याकुळ झालास हें स्वाभाविक असल्यामुळें त्याविषयीं मी कांहीं बोलूं शकत नाहीं ! पण माझें तर दोन प्रकारचें नातें तीर्थरूप वडील व तेच सद्गुरु ! तेव्हां मला वास्तविक किती दुःखवेग होत असेल ! पण तें सर्व आवरून अत्यावश्यक ते सर्व व्यवहार मला करावे लागत आहेत ! तुझ्याप्रमाणेंच दुःख करीत बसलों तर पुढें आलेलें कार्य कोण करणार ? " अण्णांचें हें तळमळीचें भाषण ऐकून् मी चटकन् उठून पुढील उद्योगास लागलों ! खरोखर त्याप्रसंगीं आलेली सर्वच मंडळी दुःखात चूर झाली होती ! कोणी कोणास आवरावें, असा तो प्रसंग ! घडूं नये तो प्रसंग घडला, होता ! महाराजांचा वियोग सर्वांनाच जाणवला !

पण एकट्या अण्णानी सर्व जबाबदारी अंगावर घेऊन यथासांग पार पाडली आणि सर्व भक्तांचें समाधान करून त्यांना प्रेमानें परत पाठविलें. तेराव्या दिवशीं श्री. अण्णांच्या आज्ञेप्रमाणे मी मठींत भक्तिपूर्वक कीर्तन केलें, सर्व सोहाळा यथासांग पूर्ण झाल्याचें समाधान सर्वांनीं व्यक्त केलें.

× × ×

## फिरती व संतांचा आशीर्वादानंतर अडथळ्यांनीं लग्न

सदरील प्रसंगानंतर एक महिनाभर मी भडगावीं राहिलों व नंतर श्री. अण्णांचे बरोबर फिरतीवर गेलों. दोन महिन्यांच्या फिरतीनंतर 'पत्र देखत चांबवड्यास येऊन लग्न उरकून जाण्याविषयीं, पत्र आलें. मी तें पत्र अण्णांना दाखवितांच ते म्हणाले "गुरूमहाराजांची तुला लग्न करण्याविषयीं आज्ञा झालेली आहे व माझेंहि मत तसेंच आहे. तूंहि तें कबूल करून वचन दिलें आहेस. तें तूं आतां खरें केलें पाहिजेस."

नंतर बांबवड्यास जाऊन माझी चुलत बहीण गं. भा. हौशा अक्का यांची मुलगी पसंत करून अण्णाना पत्र पाठविलें "आपण येऊन मुलगी पाहिल्याशिवाय पुढें कांहींच ठरवीत नाहीं" श्री. अण्णानी या पत्राच्या उत्तरांत लिहिलें "मी बाळेकुंद्रीस जात आहे तेव्हां मुलीचे नात्यांतील मंडळी व तूं बाळेकुंद्रीस मुलीला घेऊन ये."

त्याप्रमाणें मी बाळेकुंद्रीस जरूर त्या मंडळींना घेऊन गेलों. श्री. अण्णा शिवाप्पा, व पंत मंडळींतील भाऊसाहेब व इतर गुरुबंधू इ. सर्वांनीं मुलगी पसंत करून आम्हांला पूर्ण आशीर्वाद दिला. मग आम्ही बाळेकुंद्रीहून गांवीं आलों. लग्नाची सर्व तयारी करून मुहूर्त ठरविला. पण मुलीचे वय कमी असल्याचा गवगवा, शारदा बिलाच्या आधारे करून, कांही हितशत्रूंनीं कार्यांत अडथळे उभे केले ! मग गांव सोडून मिरजप्रांत तालुक्यांपैकीं तानंगगांवीं जाऊन लग्नविधि करावा लागला ! त्या वेळीं कोणालाहि लग्नाला निमंत्रण करण्याची परिस्थिती नव्हती ! गुरुमहाराज लग्नाला हजर नाहींत याचें मलाहि अत्यंत वाईट वाटतच

होते ! गुरुमहाराजांनीं माझ्या लग्नाला म्हटल्याप्रमाणें यावें, असें पुण्य माझे पदरीं नव्हतें ! याशिवाय लग्नाला ज्या अनेक अडचणी उत्पन्न झाल्या त्यांचा उल्लेख करून येथील जागा अडविणें इष्ट नाहीं ! याप्रसंगी पंतांच्या पुढील उक्तीचा अनुभव आला ! :—

छळ करता जन । येईल उत्तेजन । श्रीगुरुचें भजन करा ।
छळण करिती परीक्षा घेती । निजशांति–द्याया

## मातृवचन व गुरुवचन यांची पूर्तता

माझ्या जन्मदात्या मातेला देखील माझ्या लग्न प्रसंगीं नेतां आलें नाहीं ! सर्व प्रेमांतील मंडळींना सोडूनच लग्न कार्य करावें लागलें ! पण ते यापेक्षां आणखी विघ्नें न येतां पार पडलें हीच गुरुकृपा !

मातृवचन आणि गुरुवचन अशा प्रकारें पुरें झालें ! गुरुमहाराजांच्या स्वानंदवासानंतर सहा महिन्यांनीं हा लग्नाचा योग आला. गुरु महाराजांच्या उपदेशावर विश्वास ठेवूनच मी गृहस्थाश्रम पत्करला. मग या गृहस्थाश्रमाला पोषक अशाच सर्व गोष्टी घडत गेल्या. माझ्या भक्तिमार्गांत कोणत्याही प्रकारची आडकाठी न आणतां प्रेमानें मदतच करणारी सौ. सुमन मला लाभली ! प्रेमळ अण्णांच्या योजकतेमुळेंच मला सुख लाभलें.

## श्री. अण्णांचें अपार बंधुप्रेम !

गुरुमहाराजांच्या वियोगानंतर श्री. अण्णांनीं बंधु–प्रेमानें मला अनेक प्रसंगीं धीर दिला आणि रक्षण केलें. अण्णांचें हें बंधु–प्रेम आणि माझ्या विषयींची कळकळीची काळजी, उदार विचार आणि आचार यांचे वर्णन करावें तितकें थोडेंच ठरणार आहे ! थोडक्यांत नमूद करावयाचें तर सद्‌गुरुंचा वियोग अण्णांनीं मला जाणवूं न देण्याची पराकाष्ठा केली.

## श्री दत्तमंदिराची उभारणी

१९३२ सालीं मी श्री दत्तमूर्ति घेतली. त्याच वर्षी गांवठाण येथें जागा खरेदी केली. पण अनेक अडचणींमुळें मंदिराचें बांधकाम लांबणीवर पडलें, १९३३ सालीं श्री. अण्णांनीं या कामास चालना देऊन, मंदिराचें थोडें फार बांधकाम माझेकडून करवून घेतलें. "ही दत्तमूर्ति घरीं न ठेवतां बाहेर जागा घेऊन छोटेसें मंदिर बांधून ठेव." हें **गुरू महाराजांचें वचन खरें ठरलें.** धन्य गुरुमाउली ! मंदिराचें बांधकाम चालूं असतां, अनेक अडचणी आल्या तरी हस्ते परहस्ते मदत मिळून त्या अडचणींतून पार पडतां आलें. थोडीं फार कामे अद्याप शिल्लक आहेत. पण हळू हळू पुढें पाऊल पडत आहे. २०–२–६४ रोजीं

सिंहासनाची जुडई करून तें काम पूर्ण केलें. वास्तविक मी निमित्त मात्र असून सर्व कांहीं कर्ता करविता माझा श्री सद्‌गुरूच आहे.

महाराजांनीं आपले सदगुरु श्री पंत महाराज बाळेकुंद्रीकर यांच्या अध्यात्म ज्ञान तत्त्वांचा प्रचार किती आत्यंतिक एकनिष्ठेनें केला आणि माझ्या सारख्या पंगू माणसाकडूनहि कीर्तन सेवा कशी करविली तें थोडक्यांत नमूद करण्या-सारखें आहे.

## श्रीगुरुमाउलीनें माझेकडून कीर्तनरूपी सेवा करविली

इ. स. १९३४ ला महाराज दादर येथें श्रीशंकराचे मंदीरात चैत्रमासी कीर्तन करीत होते त्यावेळी मी त्यांची पेटीची साथ करीत होतो. त्यावेळीं कीर्तनांत अनेक भक्त भावीक रंगून जात असत तेव्हां त्यावेळीं जें दृश्य होंते तें अवर्णनीय होतें. तसेंच महाराजाची विद्वत्ता व कुशाग्रबुद्धी पाहून ऐकून मी थक्कच झालो होतो! भावना वश होऊन मनामधे असे येई की "असें कीर्तन आपणास करता येईल का? या जन्मांत साधेल कां?" कल्पवृक्षाचे छायेखालीं बसून जी कल्पना करावी ती सिद्ध कां नाहीं होणार. पण यावेळेपासून कितर्नरूपी सेवा माझे हातून महाराज करून घेत आहेत इ. स. १९३४ ते आज इ. स. १९६५ पर्यंत परमपूज्य श्री. अण्णा यांचे सहवासांत राहून कीर्तन सेवा करण्याचा आनंद मी आजतागायत भोगीत आहे.

## महाराजांच्या अधिकारानें बांधकामास सुरवात

इ. स. १९६३ ला मी व श्री. अण्णा सहज बोलत असतां अण्णा मला म्हणाले मेघःशाम ज्या गुरुमहाराजांनीं आपणांवर येवढे उपकार केले त्यांचे अधिष्ठान बांधून—आपण डोंळेभर पहाणेचा योग घडून येतो कीं नाहीं? हें त्यांचे मनांत येतांक्षणींच इ. स. १९६४ ला ह्या अधिष्ठाना संबंधी विचारविनिमय होऊन जागा खरेदी करून बांधकामास सुरवात केली आहे. हीं इच्छा श्री. सद्गुरु लौकर पूर्ण करोत. **तुका म्हणे आम्ही जी जी इच्छा धरूं ॥ ती ती कल्पतरू पुरवावी**—हा अनुभव घेत आहों.

## श्री अवधूत महाराजांनीं आपले सद्‌गुरु श्री. पंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांच्या अध्यात्म तत्वज्ञानाची केलेली अपूर्व सेवा व प्रचार

गु. म. यांनीं श्री. पंताचा अनुग्रह घेतल्यानंतर त्यांनीं जी आज्ञा केली त्या आज्ञेनुसार वागून, भक्तिज्ञान, वैराग्य साध्य करून त्यांनीं लिहिलेलें वाङ्मय व त्यांतील रहस्य हजारों भाविकांना, देशोदेशी विदेशी अनेक खेडोपाडीं जाऊन कीर्तन

रूपानें सुलभ शब्दांत अवधूत महाराजांनीं गोड वाणींतून प्रगट केलें. **अशी ही श्रेष्ठसेवा कोणाचेही हातून घडलेली अद्याप पहाणेंत अथवा ऐकणेंत नाहीं.** इ. स. १९०५ ला श्रीपंत समाधीस्त झाले. ही दुःखद स्थिती विचारानें आवरून वैराग्य झाले. त्यावेळीं काशी यात्रेचें व्रत स्वीकारून बोध सांगून अज्ञजनोद्धाराचा प्रचार–तयश्चर्या इ. स. १९३९ पर्यंत अव्याहत चालू ठेऊन (श्री अवधूत महाराज) श्रीपंत वचनांतून मुक्त झाले. आपले अवतार कार्यांत त्यांनीं संसार अथवा परमार्थ यांत ऐक्य असलेचे आपले आचरणांत आणून दाखविले व हजारों भक्तांनाहि पटविले म्हणूनच **श्री. पंत घराण्यांतील व इतर भक्तांना ते प्रियच वाटू लागले.** त्यांच्या पश्चात त्यांनीं घालून दिलेले नियमानुसार त्यांचे घराणेंतील लहान थोर सर्वजण वागत असून त्या स्थितीचा आनंद भोगीत आहेत.

तसेंच आज त्यांचे वडील सुपुत्र ह. भ. प. श्री. दत्तात्रय महाराज यांनीं सेवा पूर्वीसारखी चालू ठेविली असलेमुळें आजपावेतों ' गुरुमहाराज नाहींत ' अशा प्रकारचा तिळमात्र भास ते होऊं देत नाहींत याविषयीं मोठ्या अनेक भक्तांविषयीं अंतःकरणपूर्वक साक्ष देतील हें सत्य त्रिवार सत्य आहे. तसेंच महाराजांचे द्वितीय चिरंजीव पांडुरंग मोरेश्वर उर्फ श्री. तात्या मोठ्या निष्ठेनें पोलीस हुद्यावर असून निराभिमान वृत्तीने सर्वांशीं वागत असून निस्सीम गुरुभक्त आहेत. तसेंच तृतीय पुत्र श्री. अनंतराव हे मधुसूदन मिल्समध्यें मोठ्या अधिकारावर असून आपले घराण्यास शोभेल असेच वागत आहेत. त्याच प्रमाणे त्यांची बहीण ति. सौ. द्वारकाबाई व त्यांचे यजमान श्री. रा. रा. दत्तात्रय कृष्णाजी देवधर व त्यांचे कुटुंबांतील लहानथोर सत्वशील वृत्तीनें वागून शांती भोगीत आहेत.

## धरमपूर संस्थानांत श्री. अण्णाबरोबर फिरतीस

१९४० सालीं श्री. अण्णा धरमपूर संस्थानांत फिरतीवर निघाले. त्यांचे-बरोबर सौ. माई, चि. बाळ, चि. अवधूत, कु. मीरा, मी आणि नांदडचे मंगा पाटील इतकेजण होतों. मोटारीनें प्रवास करून श्री. विनायकराव नाना वैद्य यांचे घरीं उतरलों. तेथें एक महिना कीर्तनाचा कार्यक्रम झाला. दर गुरुवारीं श्री. अण्णा फेरीस निघत. श्रीपंतांची गोड पदें श्री. अण्णा खड्या आवाजात म्हणतांना, अनेक लोक मोठ्या भक्तिप्रेमानें ऐकण्यास जमत, कीर्तनासाठीं लोकांचा अलोट समुदाय जमे आणि कीर्तनाला जो रंग भरे तो केवळ अवर्णनीयच होता. एक महिना कीर्तन झाल्यावर श्री. अण्णा आमच्यासह धरमपूर सोडून मुंबईकडे निघाले.

## अपघातापासून सद्‌गुरूनीं बाळचें रक्षण केलें !

धरमपूर सोडून मोटार नाशीक रोडला लागली. चि अवधूत आजारी

झाल्यामुळें सौ. माईंच्या मांडीवर होता. कु. मीरा व बाळ मागे जवळ जवळ बसून 'धन्य हो प्रदक्षिणा सद्गुरुरायाची' हें पद म्हणण्यात दोघेहि मुलें रंगलीं होतीं. मी पुढील सीटवर होतो. अण्णा ४० मैल वेगानें गाडी चालवीत होते. इतक्यांत मोटारच्या दाराचा खटका ढिला असल्यामुळें, दार खटकन् उघडलें, आणि चि. बाळ (श्री. अण्णांचा मोठा मुलगा) मोटारींतून खालीं रस्त्यावर पडला! श्री. अण्णा गाडी भरवेगानें चालविण्याचें तंद्रींत होते! 'बाळ पडला, गाडी थांबवा' म्हणून सौ. माई ओरडल्या, तें ऐकल्याबरोबर गाडी अण्णांनीं थांबविली. मी चटकन् उतरून धांवत जाऊन चि. बाळला उचललें. मागोमाग अण्णा व सौ. माईहि आल्या. मी बाळला विचारलें, "तुला प्रथम कोणी उचलून घेतलें?" तो म्हणाला, "मला प्रथम आजोबांनीं उचलून घेतलें!" मग आम्हांला वाटलें, "खरोखरीच बाळच्या आजोबांचीच ही कृपा!" कारण त्याला कांहींहि इजा झालेली नव्हती!

## १९६३ चे श्रावणांत श्री गुरुंनींच वांचविलें!

यावेळीं मुंबई उपनगर खार येथें कीर्तनें चालू होतीं. एके दिवशीं कीर्तनाहून परतल्यावर चर्चगेट स्टेशनवर उतरलों. रस्ता ओलांडीत असतां मोटारखालीं एक मुलगी सांपडणारसें पाहून मी धांवत जाऊन तिला बाजूस करतों तों मलाच एका मोटारीची धडक बसली आणि मी बेशुद्ध होऊन खालीं पडलों! सर्वांगाला मुका मार बसला आणि डोकीस व पायास थोड्या जखमा होऊन रक्तस्राव होऊं लागला! तेव्हां कांहीं दयाशील लोकांनीं टॅक्सीतून नजीकच्या हॉस्पिटलमध्यें नेऊन, जखमांना ड्रेसिंग करवून मला माझ्या रहात्या जागीं श्री. अण्णांकडे आणून सोडलें. त्यावेळीं मला तपासण्यास आलेल्या डॉक्टरनीं सांगितलें, "मला पूर्ण बरा होण्यास वर्ष दोन वर्षेंहि लागतील!" मला तें ऐकून अत्यंत वाईट वाटलें!

## श्री. अण्णांच्या शुश्रूषेला यश : सद्गुरूंची कृपा!

श्री. अण्णांनीं यावेळीं अत्यंत काळजीपूर्वक मेहेनतीनें शुश्रूषा केली. आणि त्यांच्या शुश्रूषारूपी तपश्चेला सद्गुरुकृपेनें यशहि मिळून मी लवकर बरा झालों! सातवे दिवशींच मी कीर्तनास उभा राहिलों! त्या नंतर अनेकांकडून माझ्या गुरुमाउलीच्या चरित्राची माहिती मिळवूं शकलों. एक महिना कीर्तन करण्याचा संकल्प मी पुरा करूं शकलों. दुखण्याच्या सर्व तक्रारी नाहींशा होऊन मी गुरुसेवेचें कार्य नेटानें पुढें चालविण्याइतकी माझी तब्येत सुधारली!

यानंतर अनेक गुरुबंधूच्या गांठी-भेटी घेतल्या आणि त्यांच्या आठवणी लिहून काढल्या. आणि छपाईच्या संस्कारासाठीं त्या श्री. काशिनाथ महादेव ताम्हनकर यांचेकडे सादर केल्या. अर्थात् यात सद्गुरुच कर्तेकरविते आहेत.

या चरित्र–छपाईच्या व संपादनाच्या कार्यासाठीं श्री. अण्णा महाराज आणि त्यांचे दोघे बंधू या सर्वांनीं त्यांच्या आते बहीण सौ. संतुताई तथा सौ. शांताबाई ताम्हनकर यांचे पति श्री. काशिनाथ महादेव ताम्हनकर यांची निवड केली. त्याचप्रमाणें महाराजांच्या निवडक भक्तांनींहि तिला हार्दिक दुजोरा दिला आणि येथूनच चरित्रप्रकाशनाच्या कार्याचें बीजारोपण झालें. 'शुद्ध बीजा पोटीं, फळें रसाळ गोमटीं' ही थोर संतपुरुषांची उक्ति या चरित्रप्रकाशन कार्यांत साकार होईल अशी आम्हां सर्वांनाच उमेद वाटते !

या ठिकाणीं हें माझें लिखाण बरेंच लांबल्यामुळें आवरतें घेतों. कारण यापुढें चरित्रप्रकाशन वेळेवर व्हावें, अशीं मनाला ओढ लागली असून अवधी थोडा आणि कार्य मोठें आहे.

१९३९ च्या मध्यावर श्री. सद्‌गुरुमहाराज अचानक स्वानंदवासी झाले. भडगांव येथील श्री. सद्‌गुरु–माउलीचें अधिष्ठान अत्यंत जागृत असल्याचा अनुभव आहे. श्रद्धेनें येऊन महाराजांच्या समाधिस्थानाचें दर्शन घेणाऱ्यांना शांति समाधान लाभते आणि इच्छित सद्‌भावनाहि पूर्ण होतात. अनेकांनीं याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला आहे.

श्री सद्‌गुरु–माउलीनेंच या आठवणी माझे हातून लिहवून आणि अनेक भक्तांच्या आठवणी मिळविण्याची शक्ति मला देऊन चरित्रप्रकाशनाचें हें कार्य माझें हातून करवून घेतलें. मी केवळ निमित्त मात्र आहे. अशी माझी भावना व श्रद्धा आहे.

आज दिनांक १६–१०–६५ मुक्काम बांबवडे.

मेघःशाम......सकपाळ

---

एक महत्वाची आठवण

# तीन पिढ्यांत अवधूत मार्गाचे भक्त

[ श्री. चिन्नापा आबाजी कलाल, मु. व पोस्ट यलवर्गी,
ता. शिगांव, जि. धारवाड ]

## श्री. पंतांची प्रेरणा

श्री अवधूत महाराजांसारख्या थोर सत्पुरुषांची भेट स्वानंदवासी श्री पंत महाराजांच्या प्रेरणेनेंच झाली अशी माझी श्रद्धा आहे. कारण माझ्या मातुश्रींचे वडील ति. कल्लाप्पा हे स्वानंदवासी श्रीसद्गुरू बालमुकुंद महाराजांचे शिष्य होते; अर्थात् श्री सद्गुरु पंत महाराज यांचे गुरुबंधु होते. श्री बालमुकुंद अखेरच्या श्री शैल्य यात्रेस गेल्यानंतर श्री पंत महाराजांनाच सद्गुरूंच्या जागीं ती.॥ कल्लापा यांनीं मानलें आणि त्यांच्या वारंवार घडणाऱ्या सहवासाचा लाभ घेऊं लागले.

## लहान वयांतच श्री पंतांचा अनुग्रह देवविण्याचा प्रयत्न

माझ्या आईकडील या आजोबांनीं ( तीं.॥ कल्लापांनीं ) श्री. पंतांची दैवी योग्यता लहानपणींच माझ्या मनावर बिंबवण्यासाठीं पंतांच्या थोर योग्यते-विषयींच्या गोष्टी मला सांगितया. श्री. पंतांचा उपदेश मला देण्यासाठीं वयाच्या अंदाजें ९ व्या वर्षींच एकदां या आजोबांनीं सुंठणकरांचे वाड्यांत नेऊन श्री पंतांचें दर्शन करविलें. इतकेंच नव्हे तर मला अनुग्रह देण्याविषयींहि पंतांना आग्रह-पूर्वक विनंतीहि माझ्या आजोबांनीं केली! तेव्हां पंत म्हणाले "कल्लाप्पा, हा तुझा नातू लहान आहे, त्याला उपदेश देण्याची गडबड इतक्यांतच करूं नको. या मुलाचा उद्धार योग्य वेळीं होईलच." पंतांचें हें आशीर्वादाचें आणि आश्वासनाचें वचन ऐकून घेऊन माझे आजोबा कल्लापा आमचे गांवीं परत आले.

## संत साधूंच्या भेटीचा छंद

वरील वर्णनाप्रमाणें भक्ति-प्रेमाचें बाळकडूच मला मिळाल्यामुळें मी साधु-संतांच्या भेटी घेऊं लागलों. श्रीसिद्धारूढ स्वामींच्या अनेक शिष्यांच्या व गुरुबंधूंच्या भेटी घेतल्या; परंतु त्यांच्या भेटीमुळें आणि अध्यात्मचर्चेमुळें माझें समाधान झालें नाहीं. अर्थात् यांपैकीं कोणाचा उपदेश घेण्याची बुद्धि मला झाली नाही.

## श्री. अवधूत महाराजांच्या उपदेशानुग्रहाचा योग

हुबळी पासून बऱ्याच मैलांवर सौंशी हा गांव आहे. तेथील श्री. दुर्गाराम कट्टी हे अवधूत महाराजांचे अनुग्रहीत होते. त्यांची मी जाऊन भेट घेतली.

माझी उपदेश घेण्याविषयींची हौस त्यांनीं माझ्याकडून समजून घेतली, आणि मला योग्य तो सरळ मार्ग सुचविला. ते मला म्हणाले "चिनाप्पा, तुला तुझ्या शंकांचें समाधान करून घेण्याची तीव्र इच्छाच असेल तर तूं श्री अवधूत महाराज कुरुंदवाडकर यांना भेट. सध्यां ते कुरुंदवाडास आहेत. ते श्रीपंत बाळेकुंद्री महाराजांचे अधिकारी शिष्य आहेत. त्यांना 'मोरेश्वर महाराज दातार' म्हणून लोक ओळखतात. त्यांना तूं शरण गेलास तर तुझें समाधान तेच करतील.

## अनुग्रह

श्री. दुर्गाराम कट्टी यांच्या वचनावर विश्वास ठेवून मी कुरुंदवाडाला गेलों आणि श्रीअवधूत महाराजांची भेट घेऊन त्यांचा अनुग्रह घेतल्यावर मला समाधान वाटलें. यामुळें मी श्रीदुर्गाराम कट्टी यांचा अखंड ऋणी आहे.

१८८२ सालीं श्रीपंत महाराजांनीं लहानपणींच मला दिलेला शुभाशीर्वाद वरील वर्णनाप्रमाणें १९१० सालीं फलद्रूप झाला! माझ्या मातुलघराण्यांतील बरीच मंडळी, श्री. बालमुकुंद महाराज व पंतमहाराज यांची अनुग्रहीत होतीं. अशा थोर पुरुषांच्या अनुग्रहानें व सहवासानें पावन झाल्यामुळेंच त्या थोर पूर्वजांच्या पुण्याईनेंच मला श्रीअवधूत महाराजांची भेट होऊन माझें आध्यात्मिक समाधान झालें, अशी माझी श्रद्धा आहे. यामुळेंच मला धन्य धन्य वाटलें!

१९१० सालीं अनुग्रह घेतल्यानंतर मी दरसाल कुरुंदवाडास श्रीपंत जन्मोत्सवासाठीं श्रीअवधूत महाराजांकडे जात असे. श्रीअवधूत महाराजांनीं मला एकदां बाळेकुंद्रीस नेऊन श्री पंतमहाराजांच्या अधिष्ठानाचें वैभवहि दाखविलें.

श्रीअवधूत महाराजांच्या भाषणांत विलक्षण गोडवा होता. त्यांच्या भाषणांतील अध्यात्मचर्चा ८-१० तास सारखी ऐकत रहाण्याचा मोह सर्व भक्तांना होई! माझी मायबोली कानडी असून देखील श्री अवधूत महाराजांची मोहक अध्यात्म चर्चा ऐकून मला आपोआप मराठी भाषा समजूं लागली! यामुळें त्यांच्या अध्यात्मचर्चेचा पूर्ण लाभ मला मिळूं लागला.

## श्री सिद्धारूढ स्वामीशीं श्री अवधूत महाराजांची भेट

हुबळीचे अध्यात्म योगी व श्रीपंतमहाराजांचे गुरुबंधु श्री सिद्धारूढ स्वामी कोणाच्या कीर्तनास जात नसत. पण १९१३ सालीं श्री अवधूत महाराजांचीं कीर्तनें हुबळींतील श्री मारुती मंदिरांत सुरूं झालीं त्यावेळीं श्रोत्यांची अलोट गर्दी होऊं लागली! मी महाराजांबरोबर तिकडे गेलों होतों. श्री सिद्धारूढ स्वामी, महाराज उतरले होते त्या ठिकाणीं आले आणि त्यांनी अध्यात्म विषयांवर महाराजांशीं मनमोकळेपणाने खूपच चर्चा केली. महाराजांच्या एकतारीवरील 'ॐ नमःशिवाय' ही अक्षरें पाहून श्रीसिद्धारूढस्वामी म्हणाले "या वचनाचा

हेतू काय ?" त्यावर सद्गुरु श्री मोरेश्वर महाराज म्हणाले, "माझे सद्गुरू श्री पंत महाराज यांनीं ही एकतारी माझे हातीं दिली ती मी कीर्तनांत हातीं घेतों इतकेंच !"

## श्री सिद्धारूढ मठांतील कीर्तनांत 'तारक मंत्राचें' विवरण

श्री सिद्धारूढ स्वामींनीं त्याच दिवशीं श्री अवधूत महाराजांना स्वतःच्या मठींत कीर्तन करण्याचें आमंत्रण दिल्यामुळें त्यांचे मठीचे आवारांत श्री अवधूत महाराजांचे कीर्तन झालें. कीर्तनाचे पूर्व रंगांत 'ॐ नमः शिवाय, तरणोपाय तारक मंत्र गुरूचा' या तारक मंत्रावरच श्री अवधूत महाराजांनीं भर देऊन पूर्व रंग उत्तम रंगविला ! उत्तर रंगासाठीं महाराजांनीं 'चर्पटीनाथ' या नवनाथांपैकीं एकाचें आख्यान लावलें. या आख्यानांतील विवेचनांत '**हटयोगापेक्षां राजयोग श्रेष्ठ कां व कसा**' याचें महाराजांनीं सुंदर सयुक्तिक स्पष्टीकरण केलें. कधीं सहसा न हंसणारे श्रीसिद्धारूढस्वामीहि कीर्तनांत खदखदा मनमोकळेपणानें हंसत होते ! मध्येंच उठून श्रीअवधूतमहाराजांना त्यांनीं घट्ट मिठीच मारली ! कीर्तन सप्ताहांत सातीहि दिवस सिद्धारूढस्वामी हजर असत.

श्रीसिद्धारूढस्वामींचे मठांत श्रीअवधूतमहाराजांचें कीर्तन झालें त्यावेळीं त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव श्रीदत्तमहाराज अवघ्या १२ वर्षें वयाचे होते. श्रीसिद्धारुढ महाराजांच्या सूचनेप्रमाणें टेबलावर उभें करून हजारों श्रोत्यांसमोर श्रीदत्त-महाराजांना कीर्तन करावयास लाविलें !

सिद्धारूढ मठांत श्रीअवधूतमहाराजांचीं कीर्तनें चालू आहेत असें समजल्या-वर, बाळेकुंद्रीहून श्रीगोविंदरावदादा (श्रीपंत महाराजांचे भक्त बंधु) आणि त्यांचेबरोबर तीन चार पंतभक्त आले होते. एकदां मठांत हे थोरपंतभक्त बसले असतां श्रीसिद्धारूढ स्वामींचा शिष्य 'माळी' स्वामीजींना हार घालणेस आला. त्यावेळीं श्रीसिद्धारूढ स्वामींनीं तो हार श्रीगोविंददादांना घालणेस सुचविलें. तेव्हां श्रीगोविंददादांनीं त्याला सांगितलें "हा हार श्रीअवधूतमहाराजांना घाल" ! त्यानंतर श्रीअवधूत महाराज म्हणाले "श्रीपंतांच्या फोटोलाच तो हार घाल, म्हणजे आम्हा सर्वांनाच हार घातल्याचें श्रेय तुला मिळेल" !

हा सर्व प्रकार पाहून श्रीसिद्धारूढ स्वामींनीं आपलें व्याघ्रासन श्रीअवधूत महाराजांना दिलें आणि म्हणाले "**तुम्ही खरे अवधूत मार्गी असून या गादीचे वारसच आहांत. इतकेंच नव्हे तर श्रीपंतमहाराजांसारख्या सिंहाचे छावेच आहां !** आपण येथें येऊन हुबळींतील अनेकांना भक्ति-प्रेमाचा छंद लाविलात यांत शंका नाहीं." !

## श्रीसिद्धारूढ शिष्य ‘कबीर’ यांचे दोन प्रश्न

श्रीसिद्धारूढ मठींतील एका जागीं श्रीअवधूत महाराज एकांतांत बसले असतां तेथें श्रीसिद्धारूढ स्वामीजींचे शिष्य कबीर हे आले आणि त्यांनीं महाराजांना एक प्रश्न केला "महाराज, आपली एकांतीं बसून कालक्रमणा कशी होते?" श्रीअवधूत महाराजांनीं उत्तर दिलें "अगदीं खोल अशा अध्यात्म-चिंतनांत निमग्न राहून मी निजानंद भोगीत असतो!"

श्री. कबीरांनी दुसरा प्रश्न केलाः—"आपण अक्कलकोट स्वामींना पाहिलेंत कां?" श्रीअवधूत महाराज स्मित हास्य करीत म्हणाले "होय! कारण हें शरीर अक्कलेची कोठी आहे. ती मध्ये श्रीसद्गुरूंचें वास्तव्य असून त्यांना हिंडतां, फिरता बसतां, उठतां मी पहात असतो!" महाराजांचें हें उत्तर ऐकून श्री. कबीर यांनीं महाराजांना नमस्कार केला आणि ते आनंदानें बाहेर पडले!

## सेवेच्या संधी विषयीं आभार

माझी मातृभाषा कानडी असूनहि, मी वेड्यावाकड्या मराठींत ज्या आठवणी सांगितल्या त्या मोठ्या आस्थापूर्वक गुरुबंधु श्रीमेघःशाम यांनी उतरून घेऊन मला या मार्गानें सद्गुरूंची सेवा करण्याची संधि दिल्या बद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. मी भडगांवला जाऊन महाराजांच्या अवधूत मठीचें दर्शन घेऊन यथाशक्ति सेवा केली आणि कांहीं तीर्थयात्राहि केल्या आहेत.

## प्रास्ताविक

(लेखकः—श्री. नामदेव मांगो नेमाडे, मु. नांदेड ता. अमळनेर,
जि. पूर्वखानदेश)

मी नांदेड गांवचा शेतकरी पेशाचा. महाराजांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज तथा श्री. अण्णा–यांच्या आदेशाप्रमाणें आणि माझे गुरुबंधू श्री. मेघःशाम यांनीं महाराजांचे चरित्रासाठीं अविश्रांत श्रम करून व आठवणींचे रूपानें माहिती जमवून मला आग्रह केल्यामुळें, त्यांच्या सूचनेप्रमाणें यथाशक्ति व यथामति पुढील आठवणी लिहिल्या आहेत त्यांचा जरूरीप्रमाणें चरित्रांत योग्यतो उपयोग व्हावा इतकीच अपेक्षा आहे.

## दुःखांत श्री. मामांचें मार्गदर्शन

१९१८ च्या इन्फ्लुएंझाचे साथींत माझे वडील, मातुश्री आणि आजोबाहिं थोड्याच दिवसांच्या अंतरानें निवर्तले (त्यावेळीं मी २० वर्षांचा २ लहान भाऊ व एक बहीण होती.) या मृत्यूमुळे माझे मनावर दुःखांचा डोंगरच कोसळल्या-प्रमाणें झालें! त्यावेळीं माझे मामा श्री. तोताराम मास्तर चौधरी यांनीं माझें

सांत्वन करून, दुःख परिमार्जनासाठीं मला पारमार्थिक वाङ्मय वांचण्याचा नाद लावला. त्यावेळीं बरींच पोथ्या पुराणें, रामकृष्ण परमहंस व श्रीविवेकानंद यांची चरित्रें इत्यादि पारमार्थिक ग्रंथांचें भरपूर वाचन केलें. त्यानें मातृपित्रांचें दुःख विसरण्यास मदत झाली. या ग्रंथांतील तत्वचर्चाहि श्री. चौधरीमामा मधूनमधून करीत. अंतःकरणांत परमार्थ जिज्ञासा जागृत होऊन वाढीस लागली; ती तृप्त करण्यासाठीं साधुसंत व गुरुभक्तादि मंडळींना शंकाकुशंकादि प्रश्न विचारूं लागलों. पण कोणाकडूनहि समाधान लाभेना! सर्वांचा चर्चेचा प्रकार एकच! अशा शंकांच्या आंदोलनांत राहिलों! या बाबतींत माझे परममित्र श्री. दगडूबुवा नागांवकर हे माझे समाधान करूं शकले नाहीत म्हणून त्यांच्याच मध्यस्थीनें पूज्य **बंकटस्वामी** नांदेडला आले त्यावेळीं त्यांना **'परोक्ष–अपरोक्ष'** ज्ञानाविषयीं प्रश्न विचारले. **'याचि देहीं याचि डोळा मुक्तीचा सोहाळा'** कसा हाहि प्रश्न विचारला. **बंकटस्वामींनीं आपल्या पद्धतीनें खुलासा केला.** "संतग्रंथाचें वाचन मनन केलें कीं परोक्षज्ञान, त्यांतूनच आपोआप अपरोक्षज्ञान. संतसहवासानें 'याचि देहि याचि डोळा, मुक्तीचा सोहळा' याचाहि आपोआप उलगडा होतो" असा त्यांच्या खुलाशाचा निष्कर्ष. बंकटस्वामींचा पुष्कळ सहवास, **तोतारामबुवा गाडेगांवकर, श्री. दिगंबरबुवा विनायकराव, श्री. लक्ष्मणबुवा** यांना प्रश्नांनी त्रासून सोडलें. त्यांनीं 'अमृतानुभवाचा' अभ्यास सांगितला! अखेर कोणाकडून तरी भडगांवच्या अवधूत महाराजांची कीर्ति ऐकली!

## गुरुमहाराजांची प्रथम भेट व थक्क करणारे बोल!

१९२० सालीं मी श्रीदत्तजयंती पूर्वीच सपत्नीक भडगांवीं गेलों. महाराज धुनीशीं बसून भक्त व शिष्य मंडळी बरोबर पारमार्थिक चर्चा करीत होते. माझ्या बरोबर फकीरशेट व मंगापाटील नांदेडकरहि होते. आम्हांला पहातांच पूज्य गुरुमहाराज म्हणाले "आलीं रे, माझी प्रेमळ पोरं! अरे मनःशांती साठीं पुष्कळ दिवस फिरणाऱ्या, तुझ्या सर्व शंकाचें येथें पारणें फिटेल! पण तेंहि आतांच फेडतो! मग तुम्ही कितीहि श्रमानें थकले भागलेले असलात तरी हरकत नाहीं"

आमच्या मनांतीलच विचार आम्ही न सांगताहि महाराज कसे बोलले असें वाटून आम्ही आश्चर्यचकितच झालो! महाराज पुढें म्हणाले—"परोक्ष अपरोक्ष ज्ञानासाठीं प्रश्न विचारून दमलास ना? आतां ऐक. तुझें पुस्तकी ज्ञान प्रथम बाजूस ठेव. परोक्ष–अपरोक्ष ज्ञानापूर्वी तूंच, तें ज्ञान जाणणारा तूंच ना? तू आहेस याचा शोध अगोदर घे म्हणजे झालें! परोक्ष-अपरोक्ष ज्ञान तुजजवळच आहे, असें तुला आढळून येईल! तूं ज्याचे आधारानें मला पाहतोस तो मीच व तो तूच आहेस. तो अवयवरूपी नाहीं. येथेंच गुरुस्मरण व गुरुज्ञान स्थिरावयाचें असतें."

## अनुग्रह घेतला

महाराजांच ते बोल ऐकून मी आश्चर्यानें थक्कच झालों होतों! आतां काय बोलावें हेंच मला कळेना! माझे मनांत आलें "ही नवीन विचारसरणी प्रासादिक व अलंकारिक! यांचे जवळ मोहिनी घालणारी जादु विद्या तर नसेल ना?" मग मी धैर्य धरून विचारलें—"मला उधार उसनवार भाषा नको, अपरोक्षज्ञानाचा उलगडा हवा आहे. मलत्या समजुतीनें वहावत जाणें मला नको!"

महाराजांनीं माझ्या सदरील प्रश्नाचें उत्तरच दिलें नाहीं. मी पण पुढें बोलण्याचें धाडस केलें नाहीं! दत्तजयंतीचा उत्सव नजीकच होता. रात्रीं कीर्तन आणि दिवसा अवधूत धुनीजवळ बसून ज्ञानचर्चा, असा कार्यक्रम चालूंच होता. मी पुष्कळ ज्ञान चर्चा ऐकली व पारमार्थिक वाङ्मय वांचून विवरणहि ऐकलें होतें. पण महाराजांची सोप्या उदाहरणांनीं अध्यात्मज्ञान पटवून देण्याची हातोटी आणि तीहि पुस्तकीज्ञान अगर संतवाचनाचा आधार न घेतां स्पष्ट करण्याचें सामर्थ्य केवळ अपूर्व वाटलें! **बोध ऐकतां ऐकतांच माझ्या मनीच्या शंका फिटून गेल्या!** मग शांति समाधान लाभून सोमवारी दत्तजयंतीच्या दिवशींच (१९२७ इ. स.) मी महाराजांचा अनुग्रह घेतला! नांदेडला येण्याचें आमंत्रण महाराजांना दिलें आणि त्यांनी तें आनंदानें मानलें.

## नांदेडला महाराजांची पहिली भेट

निमंत्रणा प्रमाणें १९२८ च्या गुढी पाडव्यास महाराज नांदेडला आले. त्यांच्या तेजस्वी व्यक्तिमत्वामुळें हजोरों लोक त्यांच्या दर्शनास येऊं लागले! महाराजांची कीर्तनाची हातोटी व एकंदर थाट तसाच तेजस्वी असल्या कारणानें कीर्तन ऐकण्यासहि हजारों श्रोत्यांची गर्दी होई! त्यांच्या गोडवाणीमुळें आणि पदांच्या सोप्या विवेचनांतील रंगतीमुळें श्रोते तल्लीन होऊन डोलूं लागत! लोकांना वाटे **"हा कोणी सामान्य कीर्तनकार नसून अवतारी पुरुष आहे!"** त्यावेळीं नांदेड व आसपासच्या अनेक लोकांनीं महाराजांचा अनुग्रह घेतला!

महाराज एकदां कीर्तनप्रसंगीं 'अनादिसिद्ध अवधूत सांप्रदायाची पीठिका सांगत असतां कांहींनीं पश्न केला "आपण तुकारामाची गाथा ज्ञानेश्वरी इत्यादीचें विवेचन कराल कां?" महाराज त्यांना म्हणाले "अनादिसिद्ध भक्ति प्रेमेश्वरी मी सदैव वाचीत असल्यामुळें ज्ञानेश्वरीचें विवेचन मला अवघड वाटत नाहीं. मग महाराजांनीं तुकारामाच्या गांथेतील एक ओळ विवेचनासाठीं घेतली. त्या ओळीच्या संदर्भातहि अध्यात्माची भूमिका कशी स्पष्ट होते, याचें महाराजांनी सुंदर विवेचन केलें! तुकाराम व ज्ञानेश्वर यांच्या वचनांचे दुवे महाराज सहज उलगडून दाखवीत; त्यामुळें माझ्या

जुन्या वारकरी बंधूंनाहि फार समाधान वाटे! अध्यात्म विषयांवरील महाराजांच्या बालबोध पण भक्तिप्रेम रंगानें थबथबलेल्या विवेचनांत अफाट श्रोतृवर्ग दंग होऊन जाई!

## नांदेडला महाराजांची दुसरी भेट

१९३० सालच्या उन्हाळयांत महाराज आमच्या आग्रहामुळें दुसऱ्या खेपेस नांदेडला आले. यावेळीं नांदेडला त्यांचा १४ दिवस मुक्काम होता. या भेटींतील अध्यात्म चर्चेत महाराजांनीं पुढील मुद्यांवर जास्त स्पष्ट प्रकाश टाकला ते मुद्दे पुढील प्रमाणें:—(१) अवधूत सांप्रदायाची पंचप्रणवासकट पंचदीक्षा कशी असते, याची प्रत्यक्ष फोड करून कीर्तनांत माहिती दिली. (२) सदरील तत्वाचें भांडारच फोडून तें श्रोत्यांना सुबोध भक्तिप्रेमाचे रंगांत वाटलें!

## नांदेडला सद्‌गुरूंची तिसरी भेट

१९३१ सालीं गुरुमहाराज तिसऱ्या खेपेस नांदेडला आले. दररोज कीर्तनांतील व बैठकींतील सतत चाललेला परमार्थ चर्चेचा खुराक श्रोत्यांना दररोज मिळूं लागला! अवधूत सांप्रदायाचा भक्कम पाया महाराजांच्या या तिसऱ्या भेटींत खानदेशच्या या भागांत रोवला गेला. ज्ञानतृप्तीची इच्छा आणि जीवनाचें सार्थक्य साधण्याची तळमळ, यामुळें अनेक लोक अवधूत सांप्रदायाचे अनुयायी स्वखुषीनें झाले! अनेक सांप्रदायांतील लोकांची दृष्टि अवधूत सांप्रदायाकडे वळून त्या सांप्रदायाविषयीं सर्वांना सहानुभूति व आपुलकी वाटूं लागली. वारकरी सांप्रदायांतील अनेकांनीं अवधूत सांप्रदायाची दीक्षाहि घेतली!

## मत्सरी विरोधक!

पण प्रत्येक गोष्टीला उजेड व अंधाराच्या बाजू असायच्याच! अवधूत 'सांप्रदायामुळें वारकरी सांप्रदाय ओहोटीला लागला' अशी भीति व मत्सर ह्या सांप्रदायांतील कांही लोकांना वाटून ते अवधूत सांप्रदायाला मत्सरानें व द्वेषानें विरोध करूं लागले! अशा विरोधाचा एक नमुना लक्षांत घेण्यासारखा आहे तो पुढें थोडक्यांत नमूद करतों:—

या तिसऱ्या भेटींतील गुरुमहाराजांच्या कीर्तनाची समाप्ती फक्त प्रमुख मंडळींना प्रसाद देवून करावी, असें आम्हीं भक्तांनीं ठरविलें. नांदेडच्या आम्हीं रहात असलेल्या पांढरी भागांतील भक्तांनाच तेवढें प्रसादास बोलाविलें. त्यासाठीं ११ डोले [अंदाजें २॥। पोतीं] गहू जमा झाला होता. स्वयंपाकासहि तितक्याच प्रमाणानें सुरवात झाली होती. पण निमंत्रण देणारांची, उलट कट करणारांनीं,

दिशाभूल करून, गांवांतील सर्वांनाच प्रसादासाठीं आमंत्रण दिलें! सर्व गांवाला प्रसाद वांटण्यासाठीं १२ पोतीं गव्हाचा आटा लागतो! पण स्वयंपाक सुरू झाला तो फक्त २॥। पोतीं गव्हाच्या आट्याचाच होता!

स्वयंपाक तयार होत आल्यावर मला सुचविण्यांत आलें कीं सर्व गांवाला निमंत्रण आहे! 'आतां स्वयंपाकासाठीं आणखी कांहीं तरी व्यवस्था त्वरित केली पाहिजे' अशी चिंता उत्पन्न झाली! माझ्या तोंडचें पाणीच पळालें! पूज्य महाराजांना हा प्रकार कळल्यावर मला हांक मारून ते म्हणाले, "**नामदेव, घाबरूं नका! कसोटीस उतरणें हेंच संतांचें ब्रीद आहे**'—आजच्या भिक्षेचें धान्य धांदलीनें दळवून आणून त्याच्या भाकऱ्या करा. त्या भाकरी, वरण, भाजी एकत्र करून तापी नदीस थोडा नैवेद्य अर्पण करा. परत येतांना गाई, कुत्री वगैरेना घांस घालीत या. आणि उरलेला शेष सर्व स्वयंपाकांत मिसळा." महाराजांच्या या आज्ञेप्रमाणें सर्व केल्यावर महाराजांनीं एकतारी हातीं घेऊन अधिष्टानापुढें भक्तिप्रेमानें रंगून थोडें भजन केलें आणि सर्व गांवच्या लोकांना प्रसाद वांटण्यास सांगितलें.

पहिली प्रसादाची पंगत बसली तोंच अमळनेर, जळगांव आणि नांदेडच्या आसपासच्या भागांतून अनेक भक्त, शिधा, तुपाचे डबे, भाज्या, पत्रावळी, द्रोण इत्यादि साहित्य ढिगावारी घेऊन आले! स्वयंपाकाचा वाढता धडाका उडाला! प्रसादाचा स्वयंपाक फारच रुचकर झाला आणि उरला होता! गावचे सर्व लोक प्रसाद जेवून गेले तरी बराच स्वयंपाक शिल्लक होता. इतकेंच नव्हे तर आवश्यकतेपेक्षां जास्त साहित्य स्वयंपाकासाठीं उरलेंच होतें! सर्व गावासाठीं १२ पोती गव्हाच्या आट्याची नेहमींची गरज असतांना अवघ्या २॥। पोती गव्हाच्या आट्यांतच सर्व गांव जेवण होऊनहि आणखी स्वयंपाक शिल्लकच राहिला! परंतु कुत्र्याचें वांकडें शेंपूट नळींत घातलें तरी सरळ होत नाहीं, त्याप्रमाणें विरोधी मत्सर द्वेष करणारे इतका अनुभव आल्यानंतरहि म्हणूं लागले "या **महाराजांजवळ कांहीं तरी सिद्धी असलीच पाहिजे**! नाहीं तर १२ पोती आट्याची गरज २॥। पोती आट्यांत भागूनहि शिल्लक स्वयंपाक कसा उरला!

माझी व गुरुमहाराजांची सत्व परीक्षाच या विरोधी लोकांनीं केली म्हणावयाची! पण गुरुमहाराजांच्या कृपेनें व सामर्थ्यानें देवपणासाठीं असे टाकीचे घांव सोसणें भागच होतें!

## कांहीं मत्सरी वारकरी सांप्रदायाच्या लोकांशीं खटका !

अवधूत सांप्रदाय घेतलेल्या आम्हा तीघांची भरपूर निंदा नालस्ती करून भागत नाहीसे 'वारकरी सांप्रदायी' म्हणवून घेणाऱ्या कांहीं मत्सरी व द्वेषी लोकांनीं आमची खोड मोडण्यासाठी नवा कट रचला ! कुकरमुंडे ( धुळे ) येथील संतोजी महाराज हे नांदेडला आले असतां त्यांच्याजवळ अवधूत सांप्रदायाविरुद्ध गरळ ओकून त्यांच्यापुढें आमची फजीति उडविणें हा या कटवाल्यांचा मुख्य डाव होता ! श्री. संतोजी महाराजांनी आम्हांस विचारलें 'तुम्हांस परमार्थ शास्त्राची चर्चा करतां येते म्हणे" ! आम्ही म्हटलें "आपल्यासारख्या संतांच्या कृपेनें बोलवेल तसें बोलूं"—पहिल्या दिवशीं ज्ञानेश्वरीवर चर्चा करावी असें ठरलें. गावांतील राममंदिरांत होणारी ही चर्चा ऐकण्यासाठीं, व आमची फजीति पाहण्यासाठीं संध्याकाळीं ४ वाजतांच अलोट गर्दी जमली ! त्या देवळांत इतकी गर्दी कधीहि जमली नव्हती ! ज्ञानेश्वरींतील '**अद्वेष्टा सर्व भूतानां मैत्रः करुण एवच**" या श्रीभगवद्गीतेवरील ज्ञानेश्वरीचें निरूपण चर्चेसाठीं निवडलें गेलें. दीडतास या निरूपणांतील अध्यात्मविषयाचें स्पष्टीकरण यथामति मी केलें, त्यावर श्री. संतोजी महाराज खूष झाले व त्यांनीं माझी पाठ थोपटली ! एकनाथी भागवतावर चर्चा ठरली होती ती त्यांनींच रहित केली ! **संतोजी महाराज म्हणाले "मला विरोधकांची अवधूत सांप्रदायी भक्तांविषयींचा डाव समजला ! आतां अवधुत सांप्रदायाचे हे लोक मी येथें असेपर्यंत माझ्या पंक्तीलाच राहतील"** ! यामुळें 'फजीति करण्यास गेलों काय आणि आमचेच उलटे झाले पाय !' असें मत्सरी विरोधकांचे हंसे झालें !

## कोणत्याहि सांप्रदायावरील बांडगुळेंच त्या सांप्रदायाला शाप ठरतात !

विरोधकांच्या कारवायांमुळें अवधूत सांप्रदायाची फजिती तर झाली नाहींच; पण ह्या सांप्रदायांतील 'सर्वांशीं समतेचा भाव ठेवण्याचें श्रेष्ठत्व' सर्वांच्या निदर्शनास आलें. सद्गुरू स्मरणानें निष्कपट भाव ठेवून हातीं घेतलेल्या कामांत सद्गुरू आपला पाठपुरावा करीत असल्याचा प्रत्यक्ष अनुभव मला या प्रसंगीं आला !

**'केलें तुका अन् झालें माका'** या न्यायानें विरोधकांचीच उलट फजिती झाली ! संतोजी महाराजांच्या सहज व सरळ धोरणामुळें त्यांचीं डोकीं जास्तच भणाणली ! प्रत्येक **सांप्रदायावर ढोंगी बांडगुळें उगवून वाढीला लागलीं कीं तीच त्या सांप्रदायाला शाप ठरतात** ! हा सर्व सांप्रदायांना ठरणारा शाप वारकरी सांप्रदायालाहि बाधक ठरला !

## गुरु महाराजांची नांदेडला चौथी भेट : भेटींतील विशेष प्रसंग !

पुढें 'परमार्थ हेंच जीवनाचें सार आणि गुरु महाराजांचा सहवास हाच माझा छंद' अशी माझी स्थिति झाली! अंदाजें १९३४–३५ सालीं मला महाराजांनीं एकदां सहज म्हटलें होतें, "**असें एकान्ताचें रम्य ठिकाण शोधून काढ कीं ज्या ठिकाणीं आपण कांहीं दिवस–गुरु–भक्ति–प्रेमाच्या सागरांतच आनंदानें पोहत राहूं**" मी या दृष्टीनें तापी नदी तीरावरील श्री महादेवाचें मंदिर सुचविलें. मी त्या ठिकाणीं '**सात दिवसांचा अखंड नाम सप्ताह समारंभ**' करण्याचें ठरवून गुरु महाराजांना आमंत्रण दिलें व त्यांनींहि तें प्रेमानंदानें मान्य केलें.

महादेवाच्या मंदिरासमोर मोठा मंडप उभारण्यात आला. सप्ताहानिमित्त आसपासच्या खेड्यांतील हजारों लोक येऊं लागले. महाराजांचें अपूर्व तेज पाहून व ओजस्वी वाणी ऐकून प्रत्येक भक्त स्तिमितच होई! भजनासाठीं आसपासचे सर्व भजनी फड बोलाविले होते. अखंड भजनासाठीं त्यांना वेळापत्रक आंखून दिलें. त्या **भजनी पथकांत एक हरिजन पथकहि होतें**. पहिल्या दिवशीं हें हरिजन मंडळ आलें, पण दुसऱ्या दिवशीं त्यांना कोणी तरी विघ्न संतोषी लोकांनीं धाक घातल्यामुळें बिचारे आले नाहींत! सप्ताहाचे समाप्तीसाठीं गांवांतून भरपूर धान्य जमा झालें. **नांदेड गांवचे लोक अशा प्रकारच्या औदार्याबद्दल प्रसिद्ध आहेत**. कोणत्याहि सत्कार्याला ते धान्याची मदत सढळ हातांनीं करतात!

स्वयंपाक सकाळीं लवकर तयार झाला पण ऊन्ह मी म्हणत असल्यामुळें तीव्र उन्हाचा त्रास चुकवावा कसा असा प्रश्न पडला! मग गुरुमहाराजांनीं महादेवाचें मंदिरांत जाऊन ४ भक्तिप्रेमपूर्ण पदें म्हटलीं. त्यांच्या सूचनेप्रमाणें नैवेद्य अर्पण करून अग्नि, गाय, कुत्रे इत्यादीना घांस देण्यांत आले. **थोड्याच वेळांत सर्व आकाश अभ्राच्छादित झाले** आणि सर्वांना उन्हाचा त्रास न होतां प्रसादाचें भोजन आनंदानें घेण्याची परिस्थिति निर्माण झाली 'गुरुमहाराजांच्या प्रार्थनेचेच हें फळ' असें आम्ही समजलों!

## विघ्नसंतोषींच्या कारवाया! सज्जनांकडून थप्पड!

सर्व भक्त प्रसादाच्या भोजनास बसले. महाराजांनीं नैवेद्यांतील शेषप्रसाद सर्वांना वाटून देण्यास सांगितलें. २०–२५ शंकेखोर विघ्नसंतोषी लोकांनीं शंका उपस्थित केली कीं, 'प्रसाद सर्वांना वाटावयास सांगणारे महाराज स्वतः ब्राह्मण आहेत कां?' एकानें तर ठाम ठोकून दिलें कीं 'ते ब्राह्मण नसून परसाई

( हीन जातीचे ) आहेत ! ' आपण असल्याच्या हातचें खायचें कां ? या शंकेमुळें बरेच 'प्रतिष्ठित लोक' प्रसादाचे पंक्तींतून उठून गेले ! त्यांनीं गांवात जाऊन श्री. पंढरीनाथ कुलकर्णी यांचे अध्यक्षतेखालीं एक सभा घेतली. मला या सभेपुढें बोलावण्यात येऊन अध्यक्षांनीं प्रश्न केला कीं " महाराज ब्राह्मण कीं परसाई ? " मी म्हणालो " ते कुरुंदवाडचे रहाणारे दातार या आडनांवाचें कोकणस्थ ब्राह्मण आहेत आणि धार्मिक बाणा परमहंसवृत्तीचा आहे. तुम्ही वाटल्यास याची चौकशी करूं शकतां. " **अवधूत मालिकेची ही गादीच 'परमहंसगादी' आहे.** हा खुलासा माझे कडून ऐकल्यानंतर शंका घेऊन महाराजां विरुद्ध काहूर उठविणाऱ्या **शंकेखोर विरोधकांची श्री. पंढरीनाथ कुलकर्णी यांनीं चांगलीच हजिरी घेतली !** आणि म्हणाले " तुम्ही सामाजिक परमार्थरूपी कार्यांत विघ्न उत्पन्न करण्याची मोठी दुष्ट आगळिक केली आहे. परमहंस बाण्याच्या साधुपुरुषाचा छळ करणें निंद्य होय. **हजारों भक्तांना रखरखीत उन्हांत छाया निर्माण करून ज्यांनीं भोजन प्रसाद दिला त्यांचें सामर्थ्य व अधिकार लक्ष्यांत घ्या !** त्यांनीं तुमच्या दुष्कृत्यां विषयीं शाप दिला तर काय होईल याचा विचार केलात कां ? "

या विरोधी रावण–राक्षसी वृत्तीला दुसरी सणसणीत चपराक बसल्यावर मात्र ती चूपचाप झाली ! इकडे महादेव मंदिराचे मंडपांत प्रसादाच्या सर्व पंक्ती उठेपर्यंत आकाशांतील ढगांच्या सावलीचा फायदा मिळून सर्व भक्तगण संतोषानें प्रसाद जेवून आनंदानें आपापल्या स्थळीं गेले.

**रावणवृत्तीच्या विरोधकांपैकीं एकाच्या गाडीची उत्तम बैलजोडी एकाएकीं मरण पावली !** दुसऱ्याचा मुलगाच यमराजानें ओढून नेला ! त्यावेळीं त्यांना श्री. पंढरीनाथ कुलकर्णी यांनीं दिलेला इषारा आठवला असेल ! पुढें श्री. पंढरीनाथ कुलकर्णी यांच्याच अत्याग्रहानें महाराजांनीं गांवांतच दुसरा कीर्तन सप्ताह केला. या सप्ताहांत गुरुमहाराजांनीं वारकरी पंथांचें श्रेष्ठ कार्याचा गौरव करून त्या पंथाचे कर्म आणि वर्म यांविषयीं सोप्या भाषेंत खुलासा केला. या खुलाशाचीं टिपणें थोडक्यांत पुढीलप्रमाणें:—

( १ ) रसाळवाणी, अंतरींची निर्विकल्प निर्मळ वृत्ति–मग गळां माळ असो वा नसो–१०० मण्यांची माळ जपणें म्हणजे चारी वेदांतील १०८ तत्वांची सतत स्मरणी ठेवून आत्मस्वरूप ओळखणें. ज्यानें आत्मस्वरूप ओळखलें तोच खरा वारकरी ( माळकरी ) होय.

( २ ) 'दशांगुळें ज्योत' ही विज्ञानरुपी असते. ही अनुभवी खूण सद्गुरु मुखानें समजून घेऊन वागणारा तोच खरा वारकरी.

(३) अंधश्रद्धेपेक्षां डोळस श्रद्धा श्रेष्ठ. अशा डोळस श्रद्धेच्यावृत्तींत पंथभेद, सांप्रदाय भेद, निंदा, स्तुति अशा थोतांडांना स्थानच नसते ! ॥
वारकरी संतांनीं म्हटलेंच आहेः—

विष्णुमय जगत्, वैष्णवाचा धर्म, **भेदाभेद भ्रम अमंगल !"**

ही विज्ञानाची 'दशांगुली ज्योत' लहान थोरांना, उच्चनीच जातींना स्त्री-पुरुषादींना सर्वांना सारखीच. या भेदांना या पंथांत थाराच कोठें ? श्रीगुरुप्रसादानेंच या 'ज्योतीचें मर्म व वर्म' समजूं शकते. ज्याना समजलें **तोच खरा वैष्णव.**

अध्यात्म अवधूत सांप्रदायांत आध्यात्मिक तत्वबोध आणि सद्गुरुभक्ति व तीवरील निष्ठा यांनाच प्राधान्य आहे. **त्यांत भेदाभेदांना थारा नाहीं. कोणत्याहि सांप्रदायाची निंदा** अवधूत **पंथीयांना मान्य नाहीं.**

(४) स्मार्त व भागवत धर्मांनें टाळ घेतले पण 'कंथा' मात्र ज्याच्या त्याच्या अधिकारानुसार ज्यानें त्यानें घेतली.

## अवधूत सांप्रदायाविरुद्ध अखेरचें कारस्थान व त्याचीच अखेर !

वारकरी सांप्रदायांतील कांहीं दुरभिमानी व मत्सरी लोकांच्या पोटांतील मत्सर व द्वेष अजूनहि शांत झाला नव्हता. शल्य अजूनहि त्यांना बोचतच होतें ! मला 'नांदेड गांवांतील अवधूत सांप्रदायी लोकांचा प्रमुख' असें समजून **मला गाडून टाकलें कीं अवधूत सांप्रदायच गाडला जाईल** असा भ्रमहि त्यांच्या डोकींत होता ! 'खोड मुळांतच तोडले कीं फांद्या आपोआपच नाहींशा होतात' असें ते म्हणत !

म्हणून आणखी एक कारस्थान या विरोधी लोकांनीं माझ्या विरुद्ध रचलें. तापी नदीच्या तीरावर पूर्व खानदेश मधील मेहूण गांवीं **श्री. बंकट स्वामींचा नाम सप्ताह ठरला.** त्यासाठीं कामाच्या जबाबदारीच्या वांटण्याहि झाल्या. त्यावेळीं विरोधकांनीं असा डाव रचला कीं श्री. नामदेव नेमाडे यांची सप्ताहासाठीं धान्य जमविण्याचे कामीं सोबत बरोबर असली तर भरपूर धान्य गोळा होईल ! त्यांनीं असें सहकार्य नाकारलें तर वारकरी आदि सांप्रदायाविषयीं ते भेदाभेद करतात असा त्यांचेवर आरोप करून त्यांची भक्तमंडळींत नालस्ती करण्याची आयतीच संधि मिळेल'! धान्य गोळा करण्यांत या प्रसंगीं श्री. लक्ष्मण शिवराम चौधरी वकील यांनीं पुढाकार घेतला होता. 'कोणी किती धान्य द्यावें, यांची आंकडेवारी या कटवाल्यांनीं अगोदरच तयार केली होती ! मग हे कारस्थानवाले माझ्याकडे धान्याची मागणी करण्यास आले. आलेल्या ह्या कारस्थानी कंपूत नगांवकर दगडूबुवा, श्री. लक्ष्मण शिवराम चौधरी वकील (कंपूचे पुढारी) त्यांचे वडील बंधू श्री. गोटू चौधरी, श्री. दामू रडे

इत्यादि लोक होते. मजजवळ त्यांनीं सप्ताहासाठीं २ डोले ( ३–४ पोतीं ) गव्हाची मागणी केली. मी म्हटलें " श्री बंकट स्वामीसारख्या संत पुरुषाच्या नाम सप्ताहा-साठीं २ डोले ( पाऊण पोतेंच ) काय मागतां ! मी ६ डोले २ पोती गहू देण्यास तयार आहे !" माझें हें उत्तर ऐकून विरोधक आश्चर्यानें थक्क होऊन स्तब्ध बसले ! माझ्या प्रमाणेंच सर्वांनीं ( त्या प्रमाणाला साजेसें ) धान्य दिलें तर ४५ पोत्यां-ऐवजीं ८४ पोतीं धान्य जमलें असतें ! पण धान्य जमवणें हा या विरोधी कटवाल्यांचा हेतू नव्हता ! माझी नाचक्की करण्याचें एक साधन म्हणून धान्याच्या मागणीचा डाव त्यांनीं टाकला तो माझ्या उत्तरानें हुकला !

## अवधूत व वारकरी सांप्रदायांच्या तत्वांचा थोडक्यांत खुलासा

मग दगडू गांवकरांनीं सांपदाय विरोधांचें खुसपट काढून भांडण उपस्थित केलें ! प्रश्नांचा भडिमार मजवर केला ! आगींत तेल ओतावें त्याप्रमाणें चौधरी वकिलांनीं त्यांत 'कटवाल्यांचे पुढारी' या नात्यानें भर टाकली. त्यांच्या प्रश्नांचें व मी दिलेल्या उत्तरांचें चऱ्हाट लांबवून चरित्रांतील मर्यादित जागा मी विटाळूं इच्छित नाहीं !

मात्र माझ्या उत्तरांचा थोडक्यांत गोषवारा देतोः—

आम्ही अवधूत सांप्रदायी, ज्ञानेश्वरांचा वारकरी सांप्रदाय किंवा श्रीतुका-रामांचा चैतन्य सांप्रदाय यांचा तिरस्कार व द्वेष करीत नसून त्यांतील चांगल्या आचारविचारांविषयीं आदरच बाळगतों. पण या दोन्ही सांप्रदायांतील बरेच अनुयायी त्यांतील विचारांची व आचारांची आध्यात्मिक तत्वें समजून न घेतां नुसत्या बहिरंगभेदांवरच वाद माजवितात. यामुळें दांभिक वर्गाचीं बांडगुळेंच माजूं लागतात. असल्या दांभिकांना (१) नाकाच्या टोकांपासून ब्रम्हरंध्रापर्यंत गंध कां लावावें (२) १०८ मण्यांचीच स्मरणी का वापरावयाची (३) तीर्थयात्रा कां करावयाच्या ? तुम्हांला या प्रश्नांचें वर्म सांगतां येत नाही. मी अवधूत सांप्रदायी असलों तरी हीं वर्मे सांगतों (१) नाकापासून ब्रह्मरंध्रापर्यंत दशांगुली ज्योत खेळवली पाहिजे हें गुरुभक्तीनें समजलें ही खूण म्हणूनच तसें गंध लावतात. आत्मस्वरूप ओळखण्याची प्रेरणा या खुणेनें मिळावी. (२) ३६ तत्वें व ७२ नाड्या मिळून सोहंतत्व खेळत रहावें ही खूण १०८ मण्यांची स्मरणी सुचविते. हें तत्व गुरुमुखांतून समजूनच ही स्मरणी भक्तीनें घ्यावयाची असते. (३) याच प्रमाणें तीर्थयात्रा संत संगतीचा लाभ मिळविण्यासाठीं करावयाची असते. हीं तत्वें समजून कितीसे वारकरी ती आचरणांत आणतात ? मग मी म्हटलें, "अवधूत सांप्रदायांत कर्मकांडापेक्षां अध्यात्म ज्ञानावर भर आहे. त्यामुळें मनाचें समाधान होऊन बुद्धि डोळस व तेजस्वी होते. स्वतःची फसगत होण्याचा संभव टळतो."

दगडू व गांवकर निरुत्तर झालेले पाहून या विरोधी कटवाल्यांचे 'पुढारी' म्हणवून घेणारे चौधरी वकील मजवर उसळून संतापानें म्हणाले "अहो नामदेव बुवा तुमच्या अवधूत संप्रदायाचा बडेजाव मिरवूं नका" मी म्हणालो मी बडेजाव नाहीं मिरवत! आतांपर्यंत सत्कर्माला मदत म्हणून चूप बसलो; पण आतां मात्र मला तुम्हींच तुमचें बेंड फोडण्यास भाग पाडीत आहां! श्री बंकट स्वामींच्या सप्ताहासाठीं धान्य जमविण्याचा 'पुढाकार' तुम्ही स्वतःच्या बडेजावासाठींच जाहीर केलात नां? मग 'अन्नधान्य पुरविण्याचा बोजा स्वतः उचलतो' म्हणून बडेजावी जाहीर केलीत ना? मग समाजांतून गोळा केलेले इतके गहूं स्वतःच्या नांवावर दिल्याचा बडेजाव मिरविणार आणि उरलेल्या गव्हाचे ते काय करणार?" अशा रीतीनें 'पुढारी' म्हणवून घेऊन फुकटचा बडेजाव मिरविणाऱ्या चौधरी वकिलाचेंच बेंड बाहेर फोडल्यावर ते चूप राहिले! मी पुढें म्हणालों "वकील साहेब, तुम्ही शब्दांची 'कायदेशीर' या नांवाखाली हातचलाखी व तोंडचलाखी चालविण्यांत तरबेज असाल, पण सत्य विचार व आचार यासाठीं प्राण पणाला लावण्याचा बाणा पत्करलेल्या परमार्थांत आपली असली ही शब्द-चलाखी कशी फोल ठरते, हें तुमच्या अनुभवास आतांच यावें आणि पुढेंहि थपडा बसाव्या, हें उघड आहे"! या उत्तरानें स्वतः चौधरी वकिलांचें तोंड तर बंदच झालेंच! पण बरोबर आलेल्या बांडगुळी विरोधकांच्या डोळयांतहि चांगलेंच अंजन घातलें गेले!

## जाति बहिष्कृत करण्याच्या कुभांडाचेंहि कंबरडेंच मोडलें!

वरील प्रकारानंतर वारकरी भक्तांनीं जागरूक होऊन सप्ताहाला आवश्यक तेवढें धान्य जमवून ७ मण (२१ पोतीं गहूं) गोळा करून तें चौधरी वकिलांच्या नांवें मेहूणच्या सप्ताहासाठीं पाठवावयाचे ऐवजीं नांदेडगावच्या भक्तांतर्फे म्हणून पाठविलें!

याचें उट्टें श्री. लक्ष्मण चौधरी वकिलांनीं वेगळयाच प्रकारें काढून मजवर सूड उगविला! एका गुरुबंधूच्या घटस्फोट प्रकरणांत "नामदेव नेमाडे लेवा परिषदेनें दिलेला आदेश सुद्धां मानीत नाहींत" असा आरोप, माझ्या पश्चात्, पाडळसे येथील लेवा परिषदेनें करून मला 'जाति बहिष्कृत' करण्याचा ठराव पास करून घेतला!

पुढें नशिराबाद येथें भरलेल्या लेवा परिषदेस हजर राहून मी माझी बाजू सत्य असल्याचें सिद्ध केलें, तेव्हां मला परत समाजांत घेऊन श्री. लक्ष्मण चौधरींना त्यांच्या खोडसाळ आरोपांचा जाब विचारावा, असा ठराव परिषदे पुढें आला असतां, हें दुष्ट प्रकरण आतां सर्वांनींच विसरावें; कारण '**कोळसा उगाळावा तितका काळाच**' या न्यायानें चौधरी वकिलांच्या जबानींतून सत्य

व चांगलें कांहींच निष्पन्न होणार नाहीं आणि समाजहित साधणार नाहीं, असा खुलासा मी केल्यावर ठराव रहित केला गेला. नशिराबाद परिषदेंत केलेल्या भाषणांत मी म्हणालों " लेवा समाज पांजणगड (गुजराथ) तेथून आला. हा समाज देवाची भक्ती करी. म्हणून निरहंकार वृत्तीनें देवाची सेवा करणें हें आपल्या समाजांचें कर्तव्य, पण आपण द्वेष, मत्सर, चुरस इत्यादि दुष्ट चक्रांत सांपडून स्वकर्तव्यास विसरलों म्हणून आपल्या समाजाला आपल्या देवतांचा शाप तर बाधला नसेल ना?" पूज्य गुरुमहाराजांचे स्मरण करून मी छातीठोक भाषण करीत होतों! त्याचा समाजांतील लोकांवर फार चांगला परिणाम झाला! आणि **गुरुमाउलीच्या कृपेनें सामाजिक छळांतून मी सही-सलामत सुटलों!**

## महाराजांचा सहवास आणि भक्तिप्रेम

पूज्य महाराजांचा सहवास मला १९२५ ते १९३९ पर्यंत म्हणजे अंदाजें एक तप (१२ वर्षें) लाभला, त्यांच्या सहवासानें मनांतील शंका कुशंका दूर होऊन आत्मस्वरूप ओळखण्याचे प्रयत्न मी करूं शकलों. माझें सर्वच घराणें महाराजांच्या सहवासानें उज्वल झालें. माझ्यासारख्या अनेक शिष्यांना संसार-परमार्थांत अशा उज्वलतेचा लाभ मिळाला!

मध्यंतरी विरोधकांच्या टीका व कारवायांमुळें अवधूत सांप्रदायाविषयींचें आमचें भक्तिप्रेम तावून सुलाखून स्वच्छ व तेजस्वी होण्यास मदतच झाली! अशा प्रकारच्या धकाधकींचा कालखंड संपून मोठा भक्तगण शुद्ध निर्मळ प्रेम-भावनेनें आणि श्रद्धेनें अवधूत सांप्रदायांत सामील झाला.

वारकरी सांप्रदायावर टीका करण्याची माझी मनोवृत्ति नव्हती पण विरोधी अज्ञात टीकाकारांच्या उपद्व्यापांमुळें त्या सांप्रदायावरील बांडगुळांच्या दुराचारावर टीका करून थोर वारकरी सांप्रदायांतील थोरवीचें रहस्य सर्वांपुढें मला अवधूत सांप्रदायाच्या प्रेरणेनें मांडावें लागलें! वारकरी सांप्रदायांतीलहि अनेक थोर संत होऊन गेले, आजहि आहेत. **कोठें हे थोर संत आणि कोठें त्या सांप्रदाया-वरील बांडगुळें!** असल्या बांडगुळांमुळें सांप्रदायांना कमीपणा येण्याचा काल आतां मार्गे पडला! गुरुमहाराजहि कीर्तनांत इतर आणि विशेषतः वारकरी सांप्रदायांतील सत्य-रहस्यें सुबोध व स्पष्ट करीत असल्यामुळें हजारों भक्त त्यामुळें संतुष्ट होऊन श्रद्धावान् होत!

## वाट चुकलेले भक्त-शिष्य!

'महाराजांचा कृपा प्रसाद न घेतां आणि अधिष्ठानाची रीतसर परवानगी

न मिळविता स्वतःच गुरु बनून 'गुरुबाजीनें' शिष्य गोळा करण्याचा धंदाच करण्याची घाई कांहीं अर्धवट शिष्य भक्तांना सुटली !

१९३४ सालचे सुमारास श्री. फकीराशेट सोनार या शिष्यभक्तानें दोन्ही खानदेशांत गुरुबाजीनें बराच 'शिष्यगण' गोळा केला होता. या शिष्यगणांचें प्रदर्शन आमच्यापुढें करण्यासाठीं फकीराशेटनी गुरुमहाराजांना रोहिणी [इंदूर विभागांत] गांवी येण्याचे निमंत्रण दिले. महाराजांसोबत मी, आंकातबुवा, श्री. नामदेव वाघळे असे कांहीं शिष्य होतों. प्रवासांत शिरपूर जवळील दहिवदहून पुढें जावयाचें ठरलें. दहिवद येथेंच फकिरांशेटनीं स्वतःच्या शिष्यगणांचें प्रदर्शन आम्हां सर्वांपुढें केलें ! हे खूप मागासलेले लोक असून त्यांना साधे शिष्टाचारहि माहित नसलेले दिसलें ! महाराजांनीं सर्व गोष्टींचें बारकाईनें निरीक्षण करून ठरविलें कीं फकिराशेटच्या म्हणण्याप्रमाणें पुढें गेल्यास सर्वांचे हाल होतील ! फकिराशेटच्या अनियमित वर्तनाचा ठसा त्यांच्या शिष्यगणांवरहि स्पष्ट होता ! **महाराजांनीं परत फिरण्याचा निर्णय ठरविला आणि रात्रीं थांबण्याचीहि सूचना न मानतां परत फिरून दुसऱ्या ठिकाणीं रात्र काढण्याचें ठरविलें !** परत येतांना महाराजांसह आम्हीं चोपडें तालुक्यांतील 'आकुल खेड' येथील देवालयांत मुक्काम केला. आकुलखेडच्या भक्तांनीं आमचा परिचय नसतांना आमची रात्रीच्या भोजनाची वगैरे सर्व व्यवस्था ठीक केली ! दुसऱ्या दिवशीं सौखेडा (ता. अमळनेर) येथें पोचल्यावर श्री. कृष्णामास्तर यांच्या आग्रहावरून तेथें महाराजांनीं दोन दिवस कीर्तन केलें आणि नंतर गुरुमहाराज भडगांवीं गेले.

महाराज परत गेल्यानें फकीराशेटना वाईट वाटलें ! **पुढें फकीराशेटच्या सूचनेवरून महाराजांनीं कोठेंहि दौरा काढला नाहीं.** अनेक शिष्यांना फकीराशेटनें अनियमित व अनीतीच्या मार्गाला लावल्याचें दृश्य महाराजांना दिसून आलें होतें ! म्हणून महाराजांना एक प्रकारें त्या विषयींची चीडच आली होती !

## गाणगापूर–यात्रा !

चैत्र शु. ८ शके १८५८ (इ. स. १९३६) या वर्षीं गुरुमहाराज गाणगापूर यात्रेस गेले होते. सोबत मी स्वतः, आंकात बुवा, श्री. तुकाराम काळे (सहकुटुंब) श्री. गंगा पाटील, गंगूताई कडगांवकर, भागूबाई गटाले, माधवराव पाटील, कडगांवकर इत्यादि मंडळी होती. बरोबरच बरीचशी शिधा सामुग्री घेतली होती. गाणगापुरास मुख्यतः तीन कार्यक्रम झाले. (१) सकाळीं प्रेमभेट-वाचन व चर्चा (२) दुपारी प्रेमतरंग वाचन व त्यावरील चर्चा. हे दोन्हीहि कार्यक्रम देवालयासमोरील झाडाच्या छायेंत चालत. (३) रात्रीं संगमावरील वाळवंटांत

दिवसभर झालेल्या परमार्थ चर्चेचे विषयच स्पष्ट करण्यात येत. शुक्लपक्ष पौर्णिमेच्या आसपासचे ते दि वस असल्यानें रात्रींच्या चंद्रप्रकाशांत ही अध्यात्म-चर्चा फारच रंगत असे ! भीमा-अमरजांच्या संगमाचें तें पवित्र ठिकाण आणि विस्तीर्ण वाळवंट, यांमुळें त्या चर्चेला आगळीच रंगत येई ! भक्ति-प्रेमाचा जणु कैफच सर्वांना चढे ! रात्र केव्हां उलटून जाई, याचें भानच रहात नसे !

**महाराजांनीं यावेळीं सर्व शिष्यांना जानवी घालावयास देऊन ब्राह्मण केलें होतें !** अष्टमीपासून पांच दिवसांनी महाराजांनी सर्वांना गाणगापूर गांवांत नृसिंह सरस्वतीच्या पादुकांचे दर्शनासाठीं नेलें. **या पादुकांचं दर्शन सर्वांनाच घडत नाहीं असें म्हणतात ! पण महाराजांच्या कृपेनें ते आम्हांला मात्र घडलें खरें !** दर्शनानंतर दुपारी १२ वाजतां, महाराजांनीं सर्वांसह फक्त तीन घरीं भिक्षा मागितली. मग एका पुजाऱ्याचे घरीं जाऊन ती भिक्षा एकत्र करून सर्वांनीं प्रसाद घेतला ! **नृसिंह सरस्वतींच्या पादुकांचें दर्शन घेतल्यापासून महाराज अत्यंत तेजःपुंज दिसूं लागले ! या अफाट तेजामुळे ते देहभानावर नाहींत असें वाटूं लागले.**

यात्रेच्या अखेरच्या दिवशीं संगमावरील भक्तांना महाराजांनीं आमटी भात व शिरा यांचा भोजन-प्रसाद दिला ! सोबत घेतलेले गावरानी तूप यावेळीं चांगले कामास आलें. तेथील **पुजाऱ्यानें देखील बोलून दाखविले कीं "इतका स्वादिष्ट व रुचकर स्वयंपाक आपण उभ्या जन्मांत खाल्ला नाहीं !"**

## एकतारीच्या खुंटीचा अपशकून !

आम्ही मोटारीनें परतलां त्यावेळीं सुरक्षित रहावी म्हणून महाराजांनी एकतारी माझ्या हातीं दिली आणि नीट सांभाळ म्हणून बजावलें. मोटार एका अरुंद पुलावर आली, उलट बाजूनें एक मोटार येत होती. तिचा धक्का लागू नये म्हणून मी एक तारीला जपतच होतो. पण एकतारीची खुंटी बाहेर होती. उलट जाणाऱ्या मोटारीचा धक्का नेमका त्या खुंटीला लागला व ती मोडली ! **महाराज लगेच मोठ्यानें म्हणाले "नामदेवा झालें ! संपलें ! आतां कार्यभागहि संपला !" महाराजांचे ते शब्द पुढील दुःखद घटनेला सूचकच ठरले !**

गुरुमहाराज गाणगापुराहून मुंबईस पोचले पण त्यांची तब्येत तेथें एकदम बिघडली असें मला मुंबईस गेल्यानंतर कळलें !

## विश्रांति आणि बोलण्यावर निर्बंध !

मुंबईस महाराजांच्या दुखण्यावर भरपूर डॉक्टरी इलाज झाले. डॉक्टर पथ्य सांगतांना म्हणाले "कांहीं दिवस तुम्ही पूर्ण विश्रांति घेणेंच आवश्यक आहे. बोलणें

मात्र अगदीं बंद करा"! महाराज लगेच म्हणाले "**सर्व कांहीं बंद करतां येईल. पण बोलणें बंद कसें होणार? माझा जीवन-व्यवसायच मुळीं बोलण्याचा आहे**"!

घरांतील सर्व मंडळीहि महाराजांना फार बोलण्याचा मोह पडूं नये म्हणून कोणासहि त्यांना भेटूं देत नसत. दीड वर्षांनंतर महाराजाना थोडें बरें वाटलें. नंतर ते भडगांवीं आले. पण त्यांना फार बोलावें लागूं नये म्हणून वरच्या मंडळीनीं त्यांची माडीवर निजण्या बसण्याची व्यवस्था केली. त्यांतून कोणी भेटण्याचा योग जमला कीं ते भरपूर बोलून घेत!

पुढें तर महाराज निजानंद अखंड स्थितींत रमूं लागले. मात्र त्यांच्या शरीरावरील कांति व तेज दिवसें दिवस जास्तच प्रभावी दिसूं लागलें!

## १९३७ ची बाळेकुंद्रीकडील यात्रा

१९३७ सालीं गाणगापुरा प्रमाणें बाळेकुंद्रीच्या यात्रेलाहि महाराजांबरोबर यात्रेला जाण्याचा योग मला लाभला. महाराजांबरोबर भडगांवहून श्री. अण्णा, मेघः शामबुवा व दौलू होते शिवाय भडगांवचे बंडू सोनू हिरामण रामदास गुरव इत्यादि भक्त होते. आणि मी स्वतः, नामदेव चौधरी, आकांत चौधरी, हरी सोनार तुकाराम काळे हे जळगांवकर भक्त होते. **सर्व खर्च महाराजांनींच केला.** आपल्या सद्गुरुंचें अधिष्ठान व बेळगांवकडील उत्सव आम्हांस दाखवासा. असा महाराजांचा सद्धेतू होता. तेथील उत्सवांतील अध्यात्म चर्चेंत आम्ही दंग होतो!

पण **कांहींजण निराळ्याच उपद्व्यापांत गढले होते**! 'महाराजांच्या गादीचा वारस पुढें कोण', या प्रश्नाचा खल बंडूलोहार, हिरामण प्रभृति कंपू करीत होता. बेळगांवाहून कोल्हापुरास व नंतर गुरुबंधु मेघःशाम बुवांच्या आग्रहावरून बांबवडे गांवीं आम्ही गेलों.

गुरुबंधु मेघःशाम बुवांनीं बांबवाड्यास अधिष्ठान मंदिराची स्थापना, येणाऱ्या भक्तांच्या पद्धतशीर सोयी वगैरेंची आंखणी करून बांधकाम चालविलेलें पाहून, मजसारख्या मोकळ्या मनाच्या गुरुबंधूंना फार समाधान वाटलें.

पण महाराज हजर नसतांना भडगांवच्या गादीचे वारसासंबंधी 'नसती उठाठेव' वर उल्लेख केलेल्या उपद्व्यापी गुरुद्रोह्यांनीं एकीकडे सुरूंच ठेवली होती! ही गडबड नजरेस आल्यावर मेघःशाम बुवांना व मला संताप येऊन आम्ही या उपद्व्यापी कंपूला त्यांच्या **कारवाईविषयीं नापसंती दाखवून कडक इषारा दिला**!

## सद्‌गुरू महाराजांच्या स्वानंदवासापर्यंत

अनुग्रह होऊन महाराजांचा निकट सहवास अनेकदां लाभल्यापासून त्यांच्या सहवासावांचून मला चैन पडेनासें झाले! धान्य वा जळणाची गाडी भडगांवास पोचविण्याचे निमित्तानें मी वारंवार भडगांवास जाऊन अनेक दिवस गुरु-माउलीच्या सहवासाचा व भक्तिप्रेमाच्या बोधाचा फायदा लुटत असे. पूर्वी अनेक ठिकाणीं फिरलों व भटकलों पण अखेर भडगांवीं येऊनच माझ्या अंतःकरणांतील पारमार्थिक इच्छांचें व आकांक्षांचें पारणें फिटलें! माझ्या मनःशांतीचें तें एकमेव स्थानच होऊन बसलें!

## एकतारीची खुंटीं मोडल्यानंतरच्या महाराजांच्या शब्दांची प्रचीति?

शके १८६० फाल्गुन वद्य ३० सन १९३९ रोजीं मी शेतांतील धान्य-मळणीच्या मळयांतच झोंपलों होतों. फाटका जवळून मला हांक ऐकूं आली! 'अरे ऊठ झोंपतोस काय?' मी जाऊन पाहिलें तें कोणीच नव्हतें म्हणून फिरून आडवा झालों, तो फिरून हांक आली 'अरे ऊठ म्हणतोनां? झोंपलास काय असा?' फिरून जाऊन पाहिलें कोणी नाहीं! पुन्हा झोंपी गेलों तेव्हां मात्र जवळ येऊन गुरुमाउलीनें उठवून बसविलें व म्हणाले 'अरे ऊठ म्हणतोनां?' मग मात्र माझी झोंप साफ उडाली! महाराजांची मूर्ति डोळयांसमोर दिसूं लागली! तेवढ्या रात्रीं घरीं येऊन घडलेला सर्व प्रकार घरच्या मंडळींना सांगितला–इतक्यांत तारवाला तार घेऊन हजर! 'पूज्य सद्‌गुरू स्वानंदवासी झाल्याचें दुःखद वृत्त त्या तारेंत होतें! **गाणगापुराहून एकतारीची खुंटी मोडल्या बरोबर महाराज म्हणाले होते 'झालें सर्व संपलें आतां! आतां सर्व कार्यभाग संपला!' महाराजांच्या त्या शब्दांची इतक्या थोड्या काळांत प्रचीती** आल्याचें पटून दुःखातिशयानें आमच्या कोणाचेहि तोंडून शब्दच फुटेना! मग स्पेशल मोटार करून आम्ही भडगांवीं गेलों! अनेक ठिकाणच्या भक्तांची तेथें गर्दी झाली होती! २४ तासांवर पार्थिव देह ठेविला तरी महाराजांचा तो देह तेजःपुंज दिसत होता! महाराजांच्या पार्थिव देहाचे मुखावर तेज नुसतें सांडत होतें, असें गांवांतून काढलेल्या अंत्ययात्रेचे प्रसंगीं सर्व भक्तांना दिसलें! अखेर चंदनाच्या लांकडांत महाराजांचा पार्थिव देह गिरणाकांठच्या महादेव मंदिराजीक अग्नीला अर्पण करण्यांत आला! चंदनाबरोबर चितेवर कापराचे ढीगहि अग्नीला अर्पण झाले! नजीक नारळांचे व पुष्पहारांचे ढीगहि जमले होते.

## माझें आराध्य दैवताचें सगुण स्वरूप काळानें हिरावून नेलें!

माझें आराध्य दैवताचें सगुण स्वरूप काळानें हिरावून नेल्यामुळें कांहीं काल तरी माझ्या जीवनांत मोठी पोकळी निर्माण झाली. पायाखालील जमीन

खचत आहे असें वाटूं लागलें. तें सगुण स्वरूप अग्नीला अर्पण होत असतां तर माझ्यासह असंख्य लोकांना भडभडून आलें !

कांहीं काल गेल्यावर सद्गुरू माऊली माझ्याशीं बोध रूपानेंच बोलत आहे, असें वाटूं लागलं. मला बोधासाठीं दर्शन देऊन महाराज म्हणत "अरे देह केव्हांना केव्हां नाश पावावयाचाच! म्हणून मजकडे आतां बोध रूपानें पहा म्हणजे तुला कसलीहि उणीव भासणार नाहीं. माझें बोधामृत भक्तगणांना पाजणें हें तुझें कर्तव्य नाहीं कां ? मग ऊठ या कर्तव्याला जाग"!

## गुरु महाराजांच्या कांहीं अविस्मरणीय आठवणी

अंदाजें १९३२-३३ सालची गोष्ट. महाराजांचा मुक्काम मुंबईस असतांना मीहि बरोबर होतो. महाराजांचा पोषाख राजविलासी थाटाचा असे! मला वाटे कीं, महाराज सत्पुरुष असल्यानें त्यांनीं साध्या पोशाखांत असावें! मी हे माझे विचार त्यांचे समक्ष बोलण्याचेंहि धाडस एकदां केलें! महाराज म्हणाले "माझ्या राजविलासाचें एखादें उदाहरण सांग पाहूं!" मी म्हटलें, 'तुम्ही रेशीमकांठी, जरीकांठी धोतरें नेसतां त्या ऐवजीं साधी नेसलात तर ?' हें ऐकून महाराज हंसले आणि रस्त्याने चाललेल्या **एका भिकाऱ्याला हांक मारून त्यांनीं आपली नेसूंची रेशीमकाठी धोतर जोडी त्याला देऊन टाकली!** आणि मग मला म्हणाले 'झालें तुझें समाधान ?' हें पाहून मी अगदीं चाट झालों! 'कुठून असं बोलायचं धाडस केलें!' असें मला वाटलें!

ह्याच दिवशीं दोन प्रहरीं एक भक्त महाराजांचे दर्शनास येऊन त्यानें जरीकांठी धोतरजोडी महाराजांना अर्पण केली! तो भक्त गेल्यावर महाराज मला म्हणाले, "**नामदेवा. सांग आतां या धोतरजोडीचें काय करूं?**" मी म्हटलें "**मी आतां तसलें कांहींच बोलत नाहीं! तुमचा राजयोगच दिसतो!**" मग महाराज व माझ्या सकट हजर असलेले सर्वच भक्त मनसोक्त हंसले, मग महाराज म्हणाले "**अरे मी गुरुमहाराज नसून पंतांचा शिष्य आहे. पंताची हमाली, पंताची निस्सीम सेवा, येवढेंच मला माहीत!" प्रपंच व्यवहाराची काळजी मला कशाला ? पंत ठेवतील तसें रहावें इतकेंच मला माहीत"**

## महाराजांचे प्रवासांतील वैशिष्ट्य

स्वतःचा व्यवहार असो व दुसऱ्याचा, व्यवहारांविषयींची उठाठेव महाराज करीतच नसत! मात्र त्यांच्या प्रवासांतील वागण्याचें वैशिष्ट्य हें कीं त्यांच्या

आटपशीर दिसणाऱ्या सामानांत चहा साखरेपासून स्वयंपाकाच्या जरूर तितक्या भांड्यांच्या संचापर्यंत सर्व तयारी असे! मी महाराजांना एकदां म्हटलें, "इतकी तयारी कशाला? तुम्हाला बोलावणारा इतकी साधी व्यवस्थाहि नाहीं कां करणार?" महाराजांनीं उत्तर दिलें "अरे **आपणास कोणाजवळहि कांहीं मागावयाचे नाहीं. आपल्या जवळ आहे तेवढे वापरून अयाचित रहावें.** संपलेंच तर पंतच आपली काळजी करणें आवश्यक असेल तर करतील" प्रपंचही परमार्थ वृत्तीनें चालविण्यांतला हा एक प्रकार आहे! यावरून पंतांवर केवढी सोज्वल भक्ति व निष्ठा महाराजांची होती, हेंहि निजभक्तांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे!

× × ×

## महाराजांचे आणखी कांहीं विशेष

कोणीहि व्यक्ति भेटीला आली तरी त्याच्याशीं महाराज आपुलकीनें आणि सहानुभूतीनेंच वागत. जात धर्म इत्यादींची चौकशी ते करीत नसत.

महाराजांचें तेजस्वी स्वरूप पहातांच भेटीला येणारा स्तिमित होई! आलेल्या व्यक्तीचें मनोगत सहज जाणण्याचा विशेष गुण महाराजांचे ठिकाणी होता. म्हणून त्या व्यक्तीचें मन प्रसन्न राहील असेंच त्यांचे बोलणें व त्याच्याशीं वागणें असे. त्यामुळें त्यांच्या विषयीं प्रेम व आदराची भावना आलेल्या व्यक्तींत निर्माण होत असल्यास नवल नाहीं. संतापून आलेला मनुष्यहि महाराजांपुढें आला कीं शांत होई! हाहि महाराजांचा विशेष होता! महाराजांच्या या गुणविशेषांचीं कांहीं उदाहरणें नमूद करतों:—(१) समोर येणाऱ्या व्यक्तीचा हेतू ताबडतोब हेरून त्याप्रमाणेंच ते त्याच्याशीं बोलत. एकदां **नांदेडचे लोटूबुवा जंगले** यांनी महाराजांना भेटून विनंति केली कीं 'योगविद्या मला शिकवा' महाराजांनीं लगेच उत्तर दिलें "तुला वियोगच नाहीं, मग योगाची इच्छा कशाला? वायु-तत्वाच्या योग-साधनेनें सिद्धि प्राप्त करून घेऊन जगापुढें 'बडेजाव' मिरविण्याची कां तुला इच्छा झाली आहे? मी (आत्मरूपानें) प्रत्यक्षच असल्यावर योगाची वा वियोगाची उठाठेवच कशाला? प्रत्यक्षांत योग-वियोग दोन्हीहि नाहींत. **सूर्य प्रकाशाला अमावास्येच्या काळोखाची भेट कशी होणार?**"

(२) जळगाव जिल्ह्यांतील **चोपडे गांवचे दोन शास्त्री पंडित** महाराजांच्या भेटीसाठीं भडगांवीं आले. नांदेड मुक्कामीं महाराजांचीं कीर्तनें ऐकून टीका करणारे हे होते! ते म्हणत "**ब्राह्मणावर टीका करणारे हे महाराज कसले? अब्राम्हण समाजाला कशाला येवढें ब्रम्हज्ञान हे सांगतात?**

भडगांवीं कांहीं कामाकरितां आलेल्या या ब्राम्हणांना वाटलें की येथपर्यंत

आलोंच आहो तर येथील त्या अवधूत महाराजांना भेटून जावें. महाराजांच्या भेटीसाठीं हे ब्राम्हण आलेलें महाराजांना दुरूनच नमस्कार करून ते म्हणाले "आम्हीं तुमची कीर्तनें नांदेडला ऐकलीं आहेत" अशी प्रस्तावना करूनच त्यांनीं आपली ओळख करून दिली. नांदेडच्या या टीकाकार ब्राम्हणांना ओळखून महाराज त्यांना म्हणाले **"या या तुमची मुंज झाली कां हो?"** महाराज असे काय विचारतात!' म्हणून बुचकळयांत पडलेले ते ब्राम्हण म्हणाले "इतक्या वयापर्यंत आमची मुंज कशी राहील हो!" त्यावर महाराज बोलले "**तुमची मुंज खरोखरीच अद्याप झाली नाहीं!** नुसते **वयानेंच वाढलां आहांत:** खरे अनुभविक ज्ञानवृद्ध ब्राम्हण तुम्ही दिसत नाही!" त्या ब्राम्हणांनीं पुन्हा मोठ्यानें सांगितलें "आमची मुंज केव्हांच खरोखर झाली!" मग महाराजांनीं प्रतिपादन केलें **"मुंज झाली म्हणता मग त्यावेळीं जो गायत्री मंत्र तुमच्या कानांत सांगितला गेला तो तुमच्या हृदयांत ठसलेला दिसत नाहीं! जानव्याची ब्रह्मगांठ खरा ब्राह्मण होऊनच मारावी लागते"!** मग **गायत्री मंत्राच्या थोरवीविषयीं** दोन तास विवेचन करून महाराजांनीं त्यांचें मर्म सुबोध रूपांत स्पष्ट केलें! **मग त्या टीकाखोर ब्राह्मणांनीं अखेर कबूल केलें कीं या अर्थानें खरोखरच आमची मुंज झाली नाहीं"! मग त्यांनीं महाराजांची शरणागति पत्करून त्याच रात्रीं त्यांचा अनुग्रहहि घेतला!**

(३) महाराज आपल्या निवासस्थानीं बसले असतां जवळ असलेल्या आरशाची उपमा देत. ते म्हणत. **आरशांत तू व तुझें प्रतिबिंब असे दोघे दिसतांना?** आरशाच्या पारदर्शकत्वाचा हा परिणाम आहे. मनुष्य त्रैगुण्यात्मक असल्यामुळें त्यांच्या अंतःकरणांत पारदर्शना-सारखे तरंग उमटलेले जाणवतात. वास्तविक आरशाचें पारदर्शकत्व कांहीच करीत नाहीं. **पाहणाऱ्याचा दृष्टिकोन त्रैगुण्यात्मक असतो.** रजोगुण आपल्या दृष्टींत असतो. कांचेंत कांहींच नसते. **गुरुत्व कांचे-सारखें पारदर्शक असते. गुरुत्वाची भावना व श्रद्धा आपल्या हृदयांत स्थिर करावयाची असते.**

## नांदेड गांवासाठीं हितकारी सूचना

नांदेडला महाराज अंदाजे वर्षांतून दोन वेळां येत असत. नांदेडगांवीं पाणी पुरवठ्याचा भारी त्रास! विहिरींचे पाणी ७५ ते ८० फूट खोलींतून काढाव लागतें! महाराजांनीं सर्व गांवकरांना सुचविले की एक **निधी जमवून पाण्याची सोय लावतां येईल. परंतू या सुचनेतील लोककल्याणाचा स्वार्थरहित**

हेतू न समजल्यामुळें गांवच्या अज्ञ व अडाणी जनतेची एकजूट या स्वतःच्या हिताकरितांहि अद्याप होऊं शकली नाहीं! नांदेडच्या गांवठाणावरील राम मंदिरा करितां महाराजांनीं स्वखर्चानें दोन मण वजनाची घंटा देऊं केली. "फक्त तीं आणवून बसविण्याचें काम तुम्ही करा!" पण महाराजांनीं स्वखर्चानें देऊं केलेली इतकी मूल्यवान् घंटा आणावयासच कोणी नांदेडकर गेले नाहींत, मग ती मंदिरांत टांगली जाणारच कशी!

नांदेडकरांच्या कल्याणासाठीं अनेक सूचना महाराजांनीं केल्या होत्या पण त्यांचा उपयोग नांदेड गांवकऱ्यांनीं करून घेतला नाहीं! **महाराज स्वानंदवासी झाल्यावर त्यांच्या सूचनांचें महत्व गांवकरांना पटूं लागलें! पण ती वेळ व तो काळ निघून गेला!**

## भडगांवींच अधिष्ठान क्षेत्र कसें व कां झालें?

गुरूमहाराज काशी यात्रेस खानदेश मार्गानें गेले, चाळिसगांव, भडगांव, मलकापूर, इत्यादि पूर्व खानदेशांतील गांवीं त्यांचीं कीर्तनें लोकप्रिय झालीं. बेळगांव बाजूस व मुंबई व पुणें शहरीं गुरुभक्तीचें बीज पेरलें जाऊन अवधूत सांप्रदायाचा डंका गाजतच होता. पण खानदेश भागांत सांप्रदायाचा प्रचार कांहीं नव्हता, हा प्रचार करण्यास पूर्व खानदेश भाग अनुकूल आहे असें महाराजांना आढळून आलें. काशी यात्रेहून परत येतांनाहि महाराज खानदेशच्या बाजूनेंच आले, आणि त्यांना या अनुकूलतेची खात्री पटली. भडगांवचाळीसगांवकडे महाराजांच्या आणखी कांहीं खेपा झाल्यानंतर तेथील व मुंबई–पुण्याकडील कांहीं भक्तांच्या सहानुभूतिपूर्ण आग्रहानें महाराजांनीं गिरणा नदीकाठीं भडगांवास अवधूत मठी स्थापन करून अधिष्ठान मांडलें.

**महाराजांनीं स्थापन केलेल्या अवधूत सांप्रदायाचा वृक्ष आतां मोठा मजबूत झाला आहे.** या आध्यात्मिक शीतल छायेखालीं खानदेश विभागांतील हजारों भक्त संसार परमार्थ रूपानें करण्याचा बोध मिळवत असून भक्तिप्रेमाचा आनंद लुटीत आहेत.

भडगांव मठींत दरसाल अनेक उत्सव व्यवस्थित थाटांत होत असतात आणि त्या प्रत्येक उत्सवांत अन्नदान होतें. इतकें **उदार वृत्तीचें अन्नदान निस्वार्थ बुद्धीनें होत असलेलें दुसऱ्या कोठेंहि माझ्या पहाण्यांत नाहीं!** आजकाल अन्नधान्य पुरवठ्याचा प्रश्न किती कठीण होऊन बसला आहे, याची कल्पना सर्वांना आहे! तथापीहि भडगांवचा अन्नदानाचा कार्यक्रम **गुरुमहाराजांच्या कृपेनें त्यांचे सुपुत्र श्री. दत्तमहाराज उर्फ अण्णा यांनीं चालू ठेविला आहे. सद्गुरु कृपेचाच हा प्रभाव होय!**

## 'भुताटकीची जागा' 'भूत रहातें कीं आम्हीं गुरुभक्त रहातों' पाहूंया कसोटी !

झडगांव मठीचें पुढें वड व मागें पिंपळ होता. 'भुताटकीची जागा' म्हणून कोणी इकडे फिरकतहि नसे. महाराजांनीं ही जागा घेऊन तेथें अधिष्ठान मांडलें तेव्हां लोकांनीं त्यांना भुताटकीची भयंकर भीति घातली, त्यांना महाराजांनीं उत्तर दिलें "होऊं दे काय व्हायचें असेल तें, अखेर भुतें इथें रहातात कीं आम्हीं राहतों, हेंच आतां पाहूं'! अनुभव असा आला कीं, 'भुतें गेलीं पळून व गुरुभक्तच टिकून राहिले.'

## भुताटकी व चोरी : दोन प्रसंगीचे अनुभव

महाराजांचे सर्वांत लहान चिरंजीव श्री. अनंतराव यांच्या लग्न समारंभासाठीं मठींतील सर्व मंडळी मुंबईस गेली. मठींत राहून मठीचें रक्षण करणारा विश्वासू व प्रेमळ भक्त म्हणून, महाराजांच्या प्रेरणेनें माझी नेमणूक मठीचे रक्षणासाठीं झाली. माझ्या सोबतीला पैलाडचा ठाकूर होता तो बाहेरच बसायचा; आंत झोपण्याला तो भीत असे ! मठींतील मंडळी परत येईपर्यंत मी गुरुकृपेनें मठीचें रक्षण 'भूतबाधा' न होता चांगलें करूं शकलों !

## चोरहि पळून गेले !

वर उल्लेख केलेल्या मुदतींतच आम्हांस भिववून चोरी करण्याचे निमित्तानें कांहीं चोर मागील पिंपळाच्या बाजूनें आले. माझ्या बरोबर एक भयंकर रागीट कुत्रा आणला होता. त्या चोरांनीं थोडा प्रयत्न करून पाहिला. पण त्या कुत्र्याच्या भुंकण्यामुळें आणि मी बंदुकीचें लायसन घेतलेलें असून बंदुकहि वापरण्यास कमी करणार नाहीं या भीतीनें ते चोर पळून गेले ! हे चोर गुरुबंधूंपैकींच कोण कोण होते याची मला माहिती आहे. कांही दिवसांनीं मठींत कोणी पुरुष नसून बायकाच होत्या, अशावेळीं, याच चोरांनीं शंकराची चांदीची उत्सवमूर्ति चोरून नेली हें पुष्कळांना आतां माहीत झालें आहे !

× × ×

## माझ्या मुलांना उच्च शिक्षण देण्याचा महाराजांचा आग्रह

महाराजांच्या माझ्यावरील विशेष प्रेमामुळें आणि माझ्या निष्ठावंत सेवाभक्तीमुळें, महाराज माझ्या सर्व कुटुंबाच्या उन्नतीविषयीं काळजी बाळगून आग्रही मार्गदर्शन करीत. नांदेड गांवचे लोक हुषार, चाणाक्ष व भाविक खरे; पण छिद्रान्वेषीपणाचे व इतर कांही मागासलेपणाचे दुर्गुण त्यांच्या आंगी आहेत, ते

मुलांना बाधूं नयेत, म्हणून मुलांना शहरांत पाठवून उच्च शिक्षण द्यावें, असें महाराजांनीं सुचविलें. '**शिक्षण हाच मानवी उत्कर्षाचा पाया**' होय, असें ते वारंवार म्हणत. महाराजांनी अशी आग्रही सूचना केल्यानंतर ते फार दिवस पार्थिव स्वरूपानें आम्हाला लाभले नाहींत. पण **त्यांचीच मुलांच्या शिक्षणाविषयींची सूचना त्यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. दत्तमहाराज यांनी पुढें उचलून धरली** व मला त्या विषयीं जास्त आग्रह चालविला.

प्रथम मी एक मुलाला शहरांत शिक्षणाला ठेवून बराच प्रयत्न केला, पण त्या प्रयत्नाला यावें तितकें यश आलें नाहीं. तेव्हां सर्व घरदार शेती सोडून एप्रिल **१९४१ सालीं मी अमळनेरास आलों.** हा बदल उदरनिर्वाहाच्या साधनेच्या दृष्टीनें बराच त्रासदायक ठरला. परावलंबनामुळें शेतीचें उत्पन्न घटलें. मी कधीं शेती व्यतिरिक्त दुसरा कामधंदा केला नव्हता. शहरांतील खर्चाची तर वाढ झालेली, महागाईहि वाढत चाललेली पण श्री. दत्तमहाराजांची हिंमत दांडगी ! यांच्या आधारानेंच ५ मुलांचें शिक्षण कसेंबसें पुढें रेटीत राहिलों. पण अखेरीस सर्व मुलें शिकून चांगलीं तयार झाली.

सद्गुरूंच्या कृपेनें माझीं सर्व मुलें चांगलीं शिकून तयार झालीं; त्यांचा शैक्षणिक आणि सांस्कृतिक दर्जाहि वाढला; पण या सर्वांपेक्षांहि मला धन्यता वाटणारी वस्तुस्थिति ही कीं, **सर्वांच्या ठिकाणीं सद्गुरुभक्तीचा व निर्मळ भक्तिप्रेमाचाहि पूर्ण विकास झालेला आहे !**

आम्हा पतिपत्नींना सद्गुरुभक्तीचा जो खुराक पचनीं पाडण्यास सद्गुरूंची कृपा उपयोगी पडली तसेंच आमची सर्व **मुलेंहि सद्गुरु भक्ति-प्रेमाचे सात्विक तेजानें** तळपावी, हेंहि **सद्गुरू कृपेचेंच मधुर फळ नव्हे काय ?**

**ॐ नमः शिवाय**

**ॐ तत् सत् ब्रह्मार्पणमस्तु**

( श्री. फकीरा गणपत दुखाणे उर्फ ' सुखानंदबुवा नांदेडकर "
हल्लीं मुक्काम जळगांव. )

[ श्री. मेघःशामबुवा श्री. अवधूत महाराजांच्या चरित्रासाठीं आठवणी जमवीत असतां सर्व अनुग्रहीत शिष्यभक्तांकडे आठवणी मागून जमविल्या, त्यांत फकीरा शेट यांनीं सेप्टेंबर १९६४ चे अखेरीस स्वतःच्या 'आत्मचरित्राची' वही आणून दिली. या वहींतून योग्य त्या आठवणी दुरुस्त करून सारांशानें पुढें दिल्या आहेतः—संपादक. ]

## नांदेड सोडून जळगांवास

या आत्मचरित्रांतील ७–८ पानांपर्यंत फकीरा शेटनीं आपल्या पूर्वायुष्यात, परमार्थ मार्गांत, उलाढाली केल्याचें वर्णन असून खूप ग्रंथ वाचले, पुष्कळ साधुसंतांच्या भेटी घेऊन पारमार्थिक चर्चा केली व ऐकली त्याचप्रमाणें अनेक संतांचें शिष्यत्वहि पत्करलें आणि वारकरी संप्रदायाची माळ घालून वावरले, इत्यादि हकीकती आहेत त्या आठवणीशीं श्री अवधूत महाराजांचा कांहींहि संबंध नाहीं. त्यावरून असें दिसतें कीं परमार्थाच्या या नादांत धंद्याकडे दुर्लक्ष झाल्यामुळें वडिलांचा राग झाला आणि नांदेड सोडून जळगांवला ते आले.

जळगांवीं श्री. नामदेव मांगो नेमाडे आणि कांहीं भक्तांकडून फकीरा शेट यांना श्री. अवधूत महाराजांची कीर्ति ऐकावयास मिळाली. मनसाराम मास्तर ( रावेरी ) यांच्या बिऱ्हाडीं पंतमहाराज बाळेकुंद्रीकर व श्री. अवधूत महाराज यांच्या फोटोचे अधिष्ठानापुढें भजन पूजनादि कार्यक्रम चाले. ही मंडळी श्री. अवधूत महाराजांची अनुग्रहीत होती. फकीराशेटहि त्या भजनांत भाग घेऊं लागले आणि ज्ञान चर्चा ऐकूं लागले. मग श्री. नामदेव मांगो नेमाडे यांच्या आश्रयामुळें आणि त्यांनीं केलेल्या प्रेरणेमुळें '**आपणहि श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घ्यावा**' असें त्यांना वाटूं लागलें! त्याप्रमाणें पंत महाराजांच्या जन्मोत्सवासाठीं १९२८ सालीं श्री. नामदेव मां. नेमाडे, त्यांचेबरोबर फकीराशेट व त्यांच्या पत्नी भडगांवीं जाऊन उभयतांनीं श्री अवधूत महाराजांचा अनुग्रह घेतला. त्यावेळीं महाराज धुमीजवळ बसून ज्ञान चर्चा करीत होते.

## फकीराशेट म्हणतात

तो उत्सव समाप्त झाल्यावर सर्वजण घरीं आले. नंतर नांदेडला घरीं आल्यावर ते लिहितातः—पुढें " मार्गशीर्षांतील श्री. दत्तजयंतीच्या उत्सवासाठीं बायांसुद्धा आम्ही १०–१२ जण भडगांवीं गेलों. त्यांत मी व माझ्या वारकरी संप्रदायांतील लोक असल्यामुळें माझ्या गळयांत तुळशीची माळ होती. मनसाराम मास्तर व

त्याच्या कांही गुरुबंधूंना माझी टिंगल करण्याची लहर आली. माझी माळ काढून लपविण्यापर्यंत हें चेष्टा प्रकरण वाढलें! गुरुमहाराजापर्यंत हें माळ-प्रकरण जाऊन पोचलें. महाराजांनीं चेष्टा करणारांविषयीं चार शब्द बोलून ती तुळशीची माळ मला घालण्यास परत दिली. आणि म्हणाले "जा, तुम्ही स्वस्थ रहा." नंतर माझे गुरुबंधू नामदेव यांनीं गुरुमहाराजांना चैत्र महिन्यांत आमचे गांवीं येण्याचें आमंत्रण दिलें. श्री. मंगा पाटील यांचेकडे चोपडेकर महाराज वर्षासनासाठीं चैत्र शुद्ध प्रतिपदेला येत त्याचवेळीं महाराजहि आमचे गांवीं येण्याचा तो योग होता त्यावेळीं वारकरी व अवधूत सांप्रदायी असे दोन्हीहि पंथाचे लोक श्री. नामदेव नेमाडे यांचे घरी जमत असत.

## गुरु महाराज नांदेडला आले

मग फाल्गुन वद्य १४ ला आम्ही भडगांवीं जाऊन गुरु महाराजांना व श्री. अण्णारायांना घेऊन आलों. गुरुमहाराजांचा मुक्काम श्री. नामदेव नेमाडे यांचे माडीवर आणि चोपडे महाराजांचा मुक्काम ५–७ घरें सोडून पुढें होता. **चोपड्याचे महाराज श्री. अवधूत महाराजांच्या भेटीला माडीवर आले त्यावेळीं** वारकरी पंथाचा एक भांडखोर इसम मला म्हणाला "पहा तुमचे अवधूत महाराज कसे अहंकारी . आहेत! ते चोपडे महाराजांच्या भेटीला आले नाहींत तरी चोपडे महाराज मात्र त्यांच्या भेटीला निरहंकार वृत्तीनें आले!" त्यांना उत्तर देण्यात आले, "चोपडे महाराज दरसाल वर्षासनासाठीं श्री. मंगा पाटील यांचेकडे येतात तेव्हां तें त्यांचेच घर असल्यासारखें आहे; पण श्री अवधूत महाराज निमंत्रणावरून पाहुणे म्हणून आले, वर्षासनासाठीं नाहीं! अर्थात् घरच्यांनीं पाहुण्यांना भेटण्याची रीत चोपडे महाराजांनी आचरणांत दाखविली. **यांत 'अहंकार निरहंकार' या सारखा प्रश्नच येत नाहीं"** हें उत्तर ऐकून कुत्सित प्रश्न विचारणारा वारकरी चूप बसला!

श्री अवधूत महाराजांचीं कीर्तनें या खेपेस (मंगा पाटलांचे घरासमोरील मंडपांत) रामनवमीपर्यंत झालीं आणि श्री. अण्णांची भिक्षेची फेरीहि झाली. भंडारा वगैरे नित्याचे कार्यक्रम पार पडल्यानंतर गुरु महाराज व श्री. अण्णा भडगांवला परत गेले. नंतर श्री. नामदेव यांचे बरोबर मी १-२ महिन्यांत भडगांवीं जात येत असे.

## नांदेडच्या महादेव मंदिरानजीक महाराजांचा कीर्तन सप्ताह

नंतर आम्ही गुरुबंधूनी सद्गुरूंना फिरून नांदेडच्या कीर्तन सप्ताहासाठीं निमंत्रण दिलें आणि त्या प्रमाणें ते श्री. अण्णा व कांहीं भक्तांसह आले. या वेळीं महाराजांनीं कीर्तनात आणि चर्चेत अवधूत पंथ आणि दिगंबर दीक्षा वगैरेवर

अत्यंत सुबोध विवरण केलें. तें रहस्यपूर्ण विवेचन ऐकून अनेक शिष्य भक्तांना समाधानाचा आनंद लाभला. यावेळीं दोंडाईचे बरेच भक्त अनुग्रहीत होऊन आनंदानें स्वस्थळी परत गेले. **नंतर श्री. महादेवाचे मंदिराजीक महाराजांनीं कीर्तन सप्ताह केला.** सर्व गांवकरी लोकांना भंडाऱ्याचें निमंत्रण देण्यात आले. समर्थ सद्गुरू मोठ्या आनंदोत्साहानें पंगतीस स्वतः वाढूं लागले. त्यांत प्रतिस्पर्धी विरोधी लोकांनीं महाराजांना 'परसाई' ठरविण्याची कशी हूल उठविली आली त्यांना परस्पर थप्पड बसून ते कसे थंड पडले आणि शरण आले याचें समग्र वर्णन श्री. नामदेव नेमाडे यांचे आठवणींत दिलें असल्यामुळें येथें त्याकरितां जागा अडविण्याचें प्रयोजन नाहीं.

नंतर दोंडाईचे शिष्य भक्तांमार्फत ७ दिवस दोंडाईला आणि ३ दिवस मालपूर येथील माझे बहिणीचे घरीं श्री. अण्णासह गुरुमहाराज आमच्या निमंत्रणावरून आले आणि कीर्तनें केली. याप्रसंगीं दोंडाईतील माझे जावई, व बापूराव नाईक आणि दोन्ही गांवच्या व आसपासच्या बऱ्याच मंडळीना महाराजांचा अनुग्रह मिळाला...

त्या नंतर मी माझ्या मंडळी व मुलींसह बाळेकुंद्रीच्या उत्सवासाठी महाराजांबरोबर गेलों. त्यावेळीं पंत अधिष्ठानावरील श्री. गोविंदराव दादाचें दर्शन आणि त्यांचा व अवधूत महाराजांचा भक्तिप्रेम संवाद ऐकण्याचा लाभ झाला; नंतर महाराजांबरोबर आम्ही कुरुंदवाडास महाराजांच्या घरी जन्मस्थानीं गेलो तेथें ३-४ दिवस मुक्काम केला. काषाय वस्त्रें जोंग घेण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें ह्या पुढील मार्गशीर्षांतील श्रीदत्त जन्मोत्सवांत भडगावी महाराजांकडून भगवें घेतलें व गांवीं आलों. **मी गावांत भगवें घालून फेरा करूं लागलो तेव्हां आप्तेष्ट व गांवकरी माझी निर्भत्सना करूं लागले! माझ्या उदर-निर्वाहाच्या व्यवसायावरच आघात झाला!** यावेळीं माझे चुलत बंधू शंकरराव यांनीं माझा प्रचंड संसार उध्वस्त होत असलेला पाहून, सातपुड्यांतील नेमाड जिल्ह्यांत आंबावली येथें रहात होते त्या गांवीं मला सहकुटुंब बोलावून नेऊन माझी बिऱ्हाडाची वगैरे व्यवस्था करून दिली. तेथेंहि ग्रंथवाचन, भजन प्रवचन, रात्रीं सुरू केलें व मंडळीहि जमूं लागली. १०-११ वर्षांचा काल अशा रीतीनें सहज निघून गेला. मधून मधून भडगांवास येऊन महाराजांचें दर्शन घेऊन चर्चेच्या फायदा करून घेतला.

## गुरुमहाराजांची ६० वर्षांची जुबिली

गुरुमहाराजांना ६० वें वर्ष संपल्याबद्दल जुबिली उत्सव झाला. त्याकरितां आम्ही २ गाड्या भरून मंडळी गेलों होतों. दूर दूर गांवची मंडळी आली त्यांचें

महाराजांनीं स्वागत केलें. तिकडील शिरपूर तालुक्यांतील दहिवद गांवच्या कृष्णा पाटील या गृहस्थांनीं माझा अनुग्रह घेऊन परमार्थ मार्गांत मला पुष्कळ मदत केल्यामुळें आणि गुरुमहाराजांचे कृपेनें माझी स्थिति सुधारल्यामुळें मी माझे गांवीं परत आलों, आणि सर्वांना माझी सुधारलेली स्थिति सांगितली. पण त्याचा परिणाम उलटाच झाला ! आमच्याच बठैकींतील एकानें जाऊन महाराजांना सांगितलें कीं "फकीराशेट पहाडांत जाऊन स्वैर वर्तन करतात आणि अद्वैताचाहि स्वैर वर्तनाला अनुकूल असा प्रचार करतात." म्हणून प्रत्यक्ष परिस्थिति पहाण्यासाठीं महाराजांना पहाडांत जाण्याचें निमंत्रण देण्यात आलें ! मी महाराजांना सर्व परिस्थिति दाखविण्याचे दृष्टीनें तयारीला लागलों.

मी दहिवद गांवांतील शिष्यांना भेटून महाराज येणार असल्याचें सांगितलें. त्यांनीं आनंदानें त्यांचें स्वागत करण्याचें कबूल करून 'दहिवदपर्यंत महाराजांना मोटारींतून आणा. पुढें त्यांना टांग्यानें पहाडी वस्तींत नेऊं.' असें सांगितलें. मग मी घरीं येऊन गुरुबंधूंना विनंति केली कीं, त्यांनीं दहिवदपर्यंत महाराजांना मोटारीनें घेऊन यावें. मग त्यांना टांग्यांतून पहाडांत नेण्याची व्यवस्था आम्ही करतों !' महाराजांनीं मला प्रचार-नीतीविषयीं शब्दांनीं छेडल्यावर मी माझ्या वर्तनाचा खुलासा प्रांजलपणें करण्याचा प्रयत्न केला; पण सर्व ऐकून घेऊन गुरुमहाराजांनीं ठरविलें "**मला पहाडांत आतां जावयाचें नाहीं. येथून भडगांवीं परत जाणार !**" महाराजांचा हा निश्चय समजल्यावर त्यांना आम्हीं टांगा करून देऊन चोपडे तालुक्यांतील **वाबुल** गांवीं पोचविण्याची व्यवस्था केली. तेथें श्री. चौधरी शाळा मास्तर यांचेकडे महाराजांनीं मुक्काम केला. तेथेंच आमच्या गांवच्या आणि आमच्या नेहमींच्या बैठकींतील त्या व्यक्ति आल्या. त्यांनीं माझ्यावर अनेक प्रकारचे आरोप करून त्या लोकांनीं मला सतावलें !

महाराज म्हणाले 'अरे हा भक्त तुमचाच नां ? मग असें कां करतां ?' मला हें पाहून फार वाईट वाटलें ! मी महाराजांचे चरणांवर पडून म्हटलें "माउली, तुझ्याजवळ राहण्याची माझी लायकी राहिली नाहीं ! माझी ही शेवटचीच भेट" असें म्हणून महाराजांना नमस्कार करून गांवीं निघालों. माहेरून सासरी जाणाऱ्या मुलीप्रमाणें कंठ दाटून येऊन महाराजांकडे मागें वळून पहात पहात गांवीं आलों ! तों कुटुंब बाळंत होऊन चार दिवसांची बाळबाळंतीण सुखरूप होती ! गुरुमहाराजांच्या कृपेचेंच हें सुफल ! घरीं आल्यावर महाराजांना नांदेडला नेण्यासाठीं गाडी ठरविली, पण महाराज धरणगांव मार्गें **शेट भडगांवीं गेले !**

## जळगांवीं बिऱ्हाड

मग मी त्यावेळीं रहात असलेल्या गांवींच पुढें रहाणें मुष्किलीचें झाल्यामुळें,

मी मुलाबाळांसह जळगांवीं येऊन बिऱ्हाड केलें. तेथें माझा सोनारकीचाच व्यवसाय करून राहिलों. सग्यासोयऱ्यांचा तो गांव झाल्यामुळें तेथें फेरी वगैरे करीनासा झालों ! २–३ **वर्षे महाराजांच्या भेटीला सुद्धां गेलों नाहीं.** सासरी पुष्कळ दिवस राहिलेल्या सुनेला जशी माहेरची ओढ लागते तशी मला भडगांवीं जाऊन गुरुमाउलीला भेटण्याची ओढ लागली ! अखेर भाद्रपद संकष्टीला भडगांवला कसेंबसें पाचोऱ्यापर्यंत रेल्वेनें भाडें खर्चून गेलों. पाचोऱ्याहून भडगांवला पायीं चालतच गेलों. गांवचे गुरुबंधू मात्र मोटारीनें गेले. मी सायंकाळीं ५ चे सुमारास भडगांव-मठींत पोचलो त्यावेळीं सर्व गुरुबंधु मठींत पोचले होते. गुरुमहाराज आराम खुर्चींत बसलेले दिसले. त्याबरोबर मी त्यांचे चरणांना मिठीच मारली ! त्यावेळीं मला गुरुमाउलीची मुद्रा वात्सल्यपूर्ण धेनूसारखी वाटली ! मध्यंतरीच्या काळांत गुरुमहाराज गाणगापुरीं कांहीं नांदेडकर भक्तांना घेऊन गेले होते त्यावेळीं कडक उन्हांत वावरल्यामुळें त्यांना उर्ध्ववायूचा (ब्लड प्रेशरचा) विकार जडला होता. तेव्हां पासून त्यांच्या नित्याच्या संवयी आणि बोलण्यावर डॉक्टरनीं निर्बंध घातले होते व ते शक्य तों पाळलेहि जात होते ! ती रात्र गेल्यावर सकाळीं भक्तजनांनीं बँडच्या वाद्यांत समाधीला व महाराजांना मंगलस्नान घातलें. मग सूर्योदयानंतर महाराज भगवा पोषाख करून सज्जात उभे राहिले आणि मी बाहेरील आडावर स्नान करून राहिलो. महाराजांभोंवतीं जळगांव. नांदेड व भडगांवची भक्त मंडळी उभी होती.

## गुरुमहाराज स्वानंदवासी झाल्यानंतर

वर्ष प्रतिपदेच्या रात्रीं, १९३९ सालीं, गुरुमहाराज स्वानंदवासी झाल्यानंतर जळगांवच्या भक्तमंडळींना तारेने ती दुःखद बातमी समजली तेव्हां कांहीं भक्त त्वरेनें भडगांवीं गेले. परंतु माझा याप्रसंगीं विपरीत योग असा कीं मासोळी पाण्यावांचून तडफडते तसा जाण्यासाठीं तडफडूनहि महाराजांच्या पार्थिव देहाचे अंत्यदर्शन मला घडलें नाहीं ! पण भडगाव श्रीदत्त पीठाची गादी बाणेदार-पणानें चालविणारे श्री. अण्णा उर्फ श्री दत्तमहाराज यांचेच हृदयांत गुरुमहाराज वास करीत आहेत अशी माझी श्रद्धा आहे. केव्हांहि भडगांव मठींत गेलें तरी श्रीदत्त महाराजांच्या दक्षतेनें आणि कर्तबगारीनें मठींत जिकडे तिकडे श्रीअवधूत सांप्रदायच भरला आहे, असें वाटूं लागतें. माझ्या गुरुमाउलीची जागृति अद्यापहि मठींत सर्वत्र दिसते ! श्री. दत्तमहाराजांप्रमाणेंच त्यांच्या धर्म पत्नी सौ. माईसाहेबहि मठीत येणाऱ्या सर्व भक्तांच्या मर्जीप्रमाणेंच त्यांना भक्ति प्रेमानें वागवितांना दिसतात. महाराजांच्या स्वानंदवासानंतर २४–२५ वर्षें या उभयतांनीं अव्याहत अशी कर्तव्य कर्मांची पारमार्थिक जागृति सदैव राखली आहे !

महाराजांच्या माझ्या रुपांतील चरण रजाच्या आधारें स्वानुभवाचें कथन करीत आहे:— मी पुष्कळ सांप्रदायिक पीठें पाहिली परंतु भडगांव श्रीदत्त पीठ हें गुरुभक्तीचें माहेरघरच बनलें असून त्याची सर इतरांना नाहीं. माझ्या गुरुमाउलीचा कृपा-प्रसाद पुष्कळांना लाभला आणि श्री. दत्तमहाराजांच्या कारकीर्दींत तो प्रसाद आजहि पुष्कळ भक्त अनुभवीत आहेत! भडगांवच्या श्री अवधूत माउलीचा प्रेषित म्हणूनच मी ठिकठिकाणीं अनुभव घेऊन सांगतो. मी **गुरु महाराजांचा हुजऱ्या असून ते हुजूर आहेत. चिंचाळे** येथें आम्ही भक्तांनीं, आमंत्रण दिल्यावरून श्री. दत्तमहाराज येऊन सात दिवस कीर्तन सप्ताह, फेरी वगैरे करून भंडारा केला व सर्व भक्तांना प्रसाद दिला. **चिंचाळे** हेहि यामुळें गुरुभक्तीचें केंद्र झालें आहे. त्याचप्रमाणें **कडावद्दि** अशाच कारणांमुळें गुरुभक्तीचें दुसरें केंद्र बनलें आहे. **नंदुरबारची** गुजर मंडळीहि येऊन गुरुमाउलीच्या दरबारांत धन्य झाली!

## माझ्या हातून सद्गुरु कृपेमुळें घडलेली सेवा

" गुरुमहाराजांचे श्लोक, अभंग, पदें वगैरे सर्वांचे अर्थ दोंडाईस असतांना लिहून काढले. त्याचप्रमाणें पुढें पंतप्रेम लहरींचेहि विवरणात्मक अर्थ लिहिले. चार महिन्यांत ही सेवा माझे हातून घडली. बाळेकुंद्रीस बाबासाहेब वकील व भाऊसाहेब तसेच श्री. दड्डीकर पंतशालक वकील या सर्वांनीं माझें विवरण तपासून 'प्रमाणपत्र' दिलें; तसेंच यंकण मर्डीकर हरीकाका नाथभक्त यांनींहि प्रमाणपत्रें देऊन मुद्रण करण्यास संमति दिली. निजामपूरकर मुरलीधर महाराजांचे भाऊ राजेश्वर यांनीहि अशीच संमति दिली.

त्याप्रमाणेंच गुरुमहाराजांविषयीं वाङ्मयाची अर्थासह वही श्री. दत्तमहाराज उर्फ अण्णा यांचेकडे २ महिने तपासून वाचण्यासाठीं ठेविली, त्यांनींहि तपासलें. तशीच स्फूर्ति वाटून 'श्रीदत्तप्रबोध' ग्रंथाचे चालीवर ओव्या व खालीं विवरणात्मक अर्थ असे लिहिले. गुरुमाउली करून घेईल ती सेवा करीत आहे. त्यांच्याच कृपेनें आजपर्यंत योगक्षेम ठीक चालला आहे. पुढें चालविणारी गुरुमाउलीच आहे. मी गुरुमाउलीचा केवळ चरणरज आहे.

---

